नमो भगवते दत्तात्रेयाय ॥

# श्री निरंजन रघुनाथांचे ग्रंथ.



ह्मणती रे! तू धन्यधन्य। होशील सर्वांमाजि मान्य।
तुझी कविता वाचितां अन्य। तेही धन्य होतील पैं ॥ १ ॥
सद्गुरूंचा निरंजनांस आशीर्वाद.

[ स्वात्मप्रचीति ५-६८. ]

संग्राहक व प्रकाशक.
**यशवंत व्यंकटेश कोल्हटकर,** बी. ए., एल्.एल्. बी.
**सांगली.**

**सन १९३५ इ.**

आवृत्ति पहिली.

**किंमत ३ रुपये.**

श्रीमंत सर गंगाधरराव ऊर्फ बाळासाहेब पटवर्धन, के. सी. आय्. ई.



मिरज संस्थानाधिपति.

श्री

# अर्पणपत्रिका.

श्रीमंत सर

## गंगाधरराव बाळासाहेब पटवर्धन,

सरकार, मिरज, यांचे सेवेसी.

जे शापादपि वा शरादपिहि वा होऊन गेले बळी ।
त्यांच्या आपण साजतां गुणगणें जन्मूनि मोठ्या कुळीं ॥
त्यांना वार्धक सार्थकीं खरचिलें जोडूनि सत्संगति ।
राखोनी व्यवसाय आपणहि तो झालांत धर्म-व्रती ॥१॥

संतांचीं वचनें रसाळ सुमनें एकत्र गुंफून हीं ।
कंठीं हार समर्पितों तुमचिया मी पुण्य-शोभावहीं ॥
पुष्पें त्यागहि आपल्याच घरचीं, स्वामी तुह्मी सन्मुनी ।
माझें येथ विशेष एकहि नसे माळी-पणा-वांचुनी ॥२॥

श्रीमंतांचा नम्र सेवक,

य. व्यं. कोल्हटकर.

श्रीनिरंजन रघुनाथ.



जन्म कालः-
कार्तिक शुद्ध ८
शके १७०४

समाधि कालः-
भाद्रपद शु. ११
शके १७७७.

# उपोद्घात.

‘ निरंजन रघुनाथांचे ग्रंथ ’ या नांवाचा, त्या सत्पुरुषाच्या गद्य व पद्य लिखाणाचा हा संग्रह वाचकांस सादर करितांना मला फार आनंद होत आहे. निरंजन रघुनाथ हे महाराष्ट्रीय कवि असूनही त्यांच्या उमाप लिखणापैकीं फारच थोडें लिखाण छापून निघालें, व बरेंच लिखाण आजवर अप्रकाशित राहिलें, ही आश्चर्याची गोष्ट होय! तशाच कांहीं योगायोगानें त्यांचा अप्रकाशित ग्रंथसंग्रह माझे हातीं आला, व तो वाचून पाहिल्यावर मला त्यानें मोठाच चटका लाविला. वेदान्तशास्त्र हें नुसतें बुद्धिगम्य व वाक्चातुर्यदर्शक शास्त्र नसून प्रत्यक्ष अनुभवगम्य शास्त्र आहे हें निरंजन रघुनाथ यांचे ग्रंथावरून स्पष्ट दिसून येतें. सबब हें महत्वाचें लिखाण माझ्या महाराष्ट्रबंधूंना वाचावयास मिळावें या हेतूनें उचल खाल्ली, व त्याचेंच फल हा संग्रह वाचकांच्या हातीं देण्याचा सुयोग आला हें होय.

निरंजन स्वामींचें जन्मस्थान कळंब हें गांव, बालाघाटीं वंजरानदीच्या तीरावर, परळी वैजनाथाच्या पूर्व बाजूला चार योजनांवर आहे. हा गांव निजाम हैद्राबादपैकीं तालुके धारूर मध्यें असून, बार्शी-लातूर रेल्वे लाइनवरील कळंबरोड स्टेशनापासून बारा मैल अंतरावर आहे. तेथें निरंजन स्वामींचा जन्म शके १७०४ सालीं कार्तिक शुद्ध ८ रोजीं पंच पंच उषःकालीं झाला. त्यांच्या वडिलांचें नांव श्रीधरपंत श्रोत्री असें असून, ते त्या गांवचे कुलकर्णी होते. त्यांच्या मातुश्रींचें नांव लक्ष्मी व कुलदैवत माहुरगडची महिषासुरमथिनी जगदंबा ही होय. श्रीधरपंत कौशिक गोत्री आश्वलायनशाखी देशस्थ ब्राह्मण होते.

निरंजन स्वामींचें पूर्वाश्रमींचें नांव ‘ अवधूत ’ असें होतें, तें शके १७३३ मध्यें त्यांचे गुरू रघुनाथ स्वामी यांनीं पालटून “ निरंजन ” असें ठेविलें; व तेव्हां पासून ते त्याच नांवानें महशूर झाले. त्यांची बुद्धि अत्यंत तीव्र व वृत्ति पराकाष्ठेची भावनाशील असावी, असें त्यांच्या लिखा-

णावरून दिसतें. त्यांचें शिक्षण काय झालें होतें, हें आज नक्की कळण्यास मार्ग नाहीं; तथापि " अनुभवामृतगदबोधिनी " नांवाची त्यांनीं श्री ज्ञानेश्वरांच्या अमृतानुभवावर जी टीका लिहिली आहे, तिजमध्यें मल्लिनाथाची पद्धति त्यांनीं बहुतांशीं उचललेली दिसते, तिजवरून व सदर टीकेमध्यें जागजागीं विखुरलेल्या स्पष्टीकरणावरून त्यांचें वेदांतशास्त्राचें अध्ययन जबर होतें असें दिसतें. त्यांच्या लिखाणांत अपसिद्धांत कोठेंच येत नसून त्यांच्या अपरोक्ष ज्ञानाच्या प्रभावानें त्यांच्या परोक्षज्ञानाची ह्मणजे शास्त्रविवेचनाची पद्धति फार ओजस्वी भासते.

त्यांची घरची स्थिति अत्यंत गरिबीची असून त्यांचा पिता त्यांच्या बालवयांतच निवर्तला असावा, असें त्यांनीं आपल्या " स्वात्म-प्रचीति " नामक प्रकरणांत आपल्या कुटुंबियांचें जें वर्णन केलें आहे त्यावरून दिसून येतें.

निरंजनस्वामींना घरच्या गरिबीमुळें तरुण वयांतच नोकरी शोधण्याचा प्रसंग आला, व त्यांनीं पुण्यास नष्टे या नांवाच्या हुंडेकऱ्याच्या दुकानीं कारकुनाची कामगिरी पतकरली. ही नोकरी त्यांनीं थोडे दिवसच केली असेल, पण तेवढ्या अवधींत त्यांना सेवाधर्माचा कटु अनुभव आला, आणि स्वार्थ-दृष्टी कुटुंबियांविषयींहि त्यांचें मन पूर्णपणें विटलें. त्याच मनःस्थितींत शके १७३२ सालीं पुण्यास बेलबागेंत ठाकूरदास नामक प्रख्यात हरिदासाचें कीर्तन ऐकत असतां त्यांना एकदम विरक्ति उत्पन्न झाली आणि त्यांनीं पुणें सोडिलें. पुण्याहून चिंचवड घेऊन ते देहूस आले व इंद्रायणीचें पाणी हातांत घेऊन " आजपासून एक वर्ष सात दिवसांत सगुण-साक्षात्कार झाला नाहीं तर प्राणत्याग करीन " अशी सूर्याकडे पाहून व तुकोबारायांस साक्षी ठेवून घोर प्रतिज्ञा भाद्रपद वद्य ४, शके १७३२ रोजीं करून, त्यांनीं देहू गांव सोडलें. तेथून घोडनगरी, ब्राह्मणवाडा, जुन्नर, कोतूळ अशीं गांवें घेत ते अकोल्यास आले व तेथें कांहीं दिवस राहून देपूर, सिन्नर, सिंदे हीं गांवें करून कार्तिक वद्य १४.स नाशिक येथें येऊन दाखल झाले. तेथें त्यांची रघुनाथ भटजी नांवाच्या सत्पुरुषांशीं गांठ पडली व त्यांना शके १७३२

कार्तिक वद्य ३० स रात्रौ रघुनाथ भटजींनीं आत्म्याचा अपरोक्ष साक्षात्कार करून दिला. तेथेंच त्यांना कवित्वाची स्फूर्ति झाली, व पहिले पांच अभंग करून आपल्या सद्गुरूंस त्यांनीं अर्पण केले.

आध्यात्मिक दृष्ट्या निरंजनस्वामी कृतकृत्य झाले, तथापि श्रीदत्त महाराजांच्या सगुण दर्शनाची प्रतिज्ञा त्यांच्या मनांत डांचत होती. वचन-बद्धतेमुळें मन अतृप्तच राहिल्यानें त्यांनीं आपल्या सद्गुरूंची आज्ञा घेऊन नाशिक सोडलें, व तेथून ते त्रिंबकास गेले. तेथें थोडे दिवस राहून ते कोंकणांत उतरले व रानावनांतून आणि काट्या कुट्यांतून मार्ग काढीत गुजराथेंतील धर्मपूर गांवास जाऊन पोंचले. तेथून ते सुरतेस गेले, व सुरतेहून ढवळक्यास, व तेथून भीमनाथाच्या शिवलिंगाचें दर्शन घेऊन ते गिरनार पर्वताजवळ येऊन पोंचले. अद्याप त्याच्या प्रतिज्ञापूर्तीस बराच अवकाश असल्यामुळें त्यांनीं गिरनार पर्वताला प्रदाक्षिणा घालण्यास सुरवात केली आणि प्रतिज्ञापूर्तीची मुदत भरण्यास तीन दिवसांची सवड राखून ते पर्वतावर चढले. शके १७३४ च्या भाद्रपद वद्य ८ स श्री दत्तमहाराजांच्या पादुकांपुढें जाऊन त्यानीं धरणें घेतलें. पहिल्या रात्रीं सोसाट्याचा वारा सुटून पावसाची मुसळधार चालू झाली, आणि निरंजन स्वामींची दांतखिळी बसून त्यांना मूर्च्छा आली. मूर्च्छेंतच एका सुवासिनीनें येऊन त्यांना मूठभर खिचडी दिली. दुसऱ्या रात्रीं त्यांना एक स्वप्न पडलें व स्वप्नांत त्यांना एक पिवळें वस्त्र व रुमाल मिळाला. निरंजन स्वामी जागे होऊन पाहतात तों स्वप्नांत मिळालेलीं वस्त्रें आपणापाशीं खरोखरीच असल्याचें त्यांना आढळून आलें ! आणि त्यांनीं तिसऱ्या रात्रींही देवापुढें चिकाटीनें ठाण मांडलें. तिसऱ्या रात्रीं स्वप्नांत एका ब्राह्मणानें येऊन निरंजन स्वामींना खडावांचा जोड दिला व तेथून निघून जाण्यास सांगितलें. तिन्ही रात्री निघून गेल्या. प्रतिज्ञेची मुदत संपली असें पाहतांच निरंजन स्वामींनीं निराश होऊन एका दगडावर कपाळ-मोक्ष करून घेण्याचा प्रयत्न केला. तो साधला नाहीं ह्मणून अधिक जोरानें फिरून एकदा केला. त्याबरोबर त्यांचें मस्तक छिन्न भिन्न होऊन ते अचेतन पडले. तशा स्थितींत आपल्या तोंडांत कोणी तरी कमंडलूंतलें पाणी

घातल्याचा निरंजन स्वामींना भास झाला आणि ते सावध होऊन पाहतात तों आपणापुढें श्रीदत्तमहाराज सगुणरूपानें उभे आहेत, असें त्यांना दिसून आलें! निरंजन स्वामींच्या खडतर तपश्चर्येचें सार्थक झालें. श्रींनीं त्यांच्या मस्तकावरून प्रेमपुरःसर हात फिरवितांच निरंजनांच्या मस्तकाचीं दगडाच्या मारानें झालेलीं शकलें जडून गेलीं आणि रघुनाथ स्वामींनीं दिलेल्या अनुग्रहाचें मनन करण्यास सांगून श्रींनीं निरंजन स्वामींस निरोप दिला. या सगुण साक्षात्काराची चालती बोलती खूण ह्मणून निरंजन स्वामींच्या कपाळावर 'केशापर्यंत भिवयाहून' एक वण अखेरपर्यंत राहिला होता. वरील दर्शनाचा प्रसंग भाद्रपद वद्य ११ सोमवार रोजीं झाला.

गिरनारहून निरंजन स्वामी जहाजाच्या मार्गानें गुरुदर्शनासाठीं निघाले व थोड्याच दिवसांत नाशिकास आले. तेथें गुरूजवळ कांहीं दिवस राहून 'स्वात्मप्रचीति' व "साक्षात्कार" हीं दोन प्रकरणें लिहून त्यांनीं सद्‌गुरूंस अर्पण केलीं. नंतर ते आपल्या गांवीं आले, व तेथें कांहीं दिवस राहून तेथून जुन्नरास रा. बळवंतरावदादा देशपांडे यांचे ओळखीनें कांहीं दिवस जाऊन राहिले. जुन्नर मुक्कामीं त्यांचा एथपर्यंत लिहिलेला ग्रंथसंग्रह जळाला! राख घेऊन ते सप्तशृंगावर ५ दिवस उपोषित जाऊन बसले. पांचव्या रात्रीं श्रीदत्तात्रेयांनीं त्यांचा ग्रंथ-संग्रह त्यांस पूर्ववत् करून दिला, (पान ३१-३२ अभंग २३ ते २९ पहा). तेथेंच एका संक्रातीस त्यांनीं ब्राह्मण सुवासिनीं-कडून आपलें घर लुटविलें (पान ३३ अभंग ३१). नंतर आपले गुरुबंधू श्रीमंत वासुदेव पंडित ऊर्फ भाऊमहाराज यांचेपाशीं कोल्हापूर प्रांतांतील वळवडें गांवीं ते सहकुटुंब जाऊन राहिले. त्यांची कीर्ति श्रीमंत गंगाधरराव बाळासाहेब पटवर्धन (हल्लींच्या मिरज संस्थानाधिपतींचे आजोबा) यांच्या कानावर जाऊन त्यांनीं त्यांना कोल्हापूरचे नाना महाराज पंडित यांचे ओळ-खीनें मिरजेस आणविलें. श्रीमंतांनीं निरंजन स्वामींचा अनुग्रह तर घेतलाच, पण स्वामींनीं आपल्या वृत्तीकरितां मठ किंवा इनाम वगैरे कांहीं करून घेतल्याचें दिसत नाहीं. स्वामींची विरक्त वृत्ती पाहून त्यांचे चिरंजीव योगिराज यांना मठ बांधून देऊन श्रीमंत मिरजकर यांनीं इनाम जमिनीची सनद करून दिली.

कै. श्रीमंत थोरले बाळासाहेब पटवर्धन, मिरज.



निरंजनस्वामी मिरजेस केव्हां आले, तो नक्की शक मिळाला नाहीं. तथापि ते शके १७६७ च्या सुमारास आले असावे असें अनुमान करण्यास जागा आहे. मिरज कोल्हापूर वगैरे ठिकाणीं त्यांची शिष्यशाखा बरीच वाढली आणि रा. रामचंद्रतात्या गोखले, रा. गोविंदराव नाना पटवर्धन शास्त्री इत्यादि मिरजेचे मोठमोठे शिष्ट त्यांच्या शिष्यशाखेंत दाखल झाले. निरंजन स्वामींची वृत्ती पूर्वीप्रमाणें विरक्तच राहिल्यानें त्यांची सांपत्तिक स्थिती अखेर-पर्यंत जिकिरीचीच राहिली. ज्ञानेश्वरीवर टीका, अनुभवामृतावरील टीका, पद-पदांतरें वगैरे आपली बहुतेक ग्रंथरचना स्वामींनीं मिरज येथेंच केली. स्वामींनीं स्वमुखानें ग्रंथ सांगावा व तो त्यांचे शिष्य रा. रामचंद्र तात्या गोखले यांनीं उतरून घ्यावा, असा प्रकार बहुधा चालत असे. पुढें गोखले यांच्या लिखाणावरून निरंजन स्वामींचे नातू व इतर आप्त इष्ट वगैरेनीं त्यांच्या ग्रंथांच्या नकला करून घेतल्या. अशा रीतीनें प्रपंच व परमार्थ यथोचित रीतीनें साधून शके १७७७ च्या प्रारंभीं निरंजनस्वामींनीं संन्यास घेतला व त्याच सालच्या भाद्रपद शुद्ध ११ स त्यांनीं श्रीकृष्णाप्रवाहांत जलसमाधी घेतली.

निरंजन स्वामींच्या पत्नी भगवती बाई ह्या त्यांच्या पश्चात् बरींच वर्षे हयात होत्या. स्वामींची वंशावळ पुढील प्रमाणें:—

**श्री निरंजनस्वामी.**



वरील मंडळींपैकीं आत्माराम यांच्या पत्नी रमाबाई हयात असून त्या मिरज येथील मठांत राहतात. काशीनाथ यांच्या तिसऱ्या मुलीचीं तीन मुलें हयात असून तीं मिरज येथें रा. तात्या गोखले यांनीं स्वामींचे नातू काशीनाथ, यांना बक्षिस करून दिलेल्या घरांत राहतात. खुद्द स्वामींच्या बंधूच्या घराण्यापैकीं कांहीं मंडळी कळंब येथील त्यांच्या मूळ घरांत आहेत. मिरज मठांत स्वामींच्या भिक्षेचा वाडगा, पूजेंतील बाण, पितळेच्या पादुका व जपाची माळ इतक्या वस्तु आज विद्यमान आहेत. कळंब येथील घराचा बराचसा भाग पडून गेलेला आहे. स्वामी ज्या खोलींत बसत असत ती खोली शाबूत आहे. स्वामींच्या वस्त्रांपैकीं एक भगवा तुकडा तेथें अद्याप जतन करून ठेवला आहे. श्रीदत्तमहाराजांकडून पर्वतावर निरंजन स्वामींना ज्या पादुका मिळाल्या होत्या त्या लाकडी असून त्यांवर सोनेरी रेषा होत्या. त्या मला पहावयासही मिळाल्या होत्या, पण दुर्दैवानें संगृहीत करितां आल्या नाहींत. पुढें त्या मिरजमठांतून नाहींशा झाल्या. त्यांचा पुन्हा पत्ता लागला नाहीं ! स्वामींच्या हातचीं दोन अस्सल पत्रें मला मिळालीं असून त्यांचे हस्ताक्षराचा फोटो पुस्तकांत दिला आहे. कऱ्हाडांत राहणारे महान् अधिकारी पुरुष शांताश्रमस्वामी यांना पुष्कळांनीं पाहिलें असेल. ते निरंजन रघुनाथ यांच्या शिष्यपरंपरेंतीलच होत.

निरंजन स्वामींची ग्रंथरचना गद्य व पद्य अशा दोनी स्वरूपाची असून ती सारीच उपलब्ध झाली आहे असें ह्मणतां येत नाहीं. त्यांचे नातू वामन रामकृष्ण यांचे हातची जून १९०२ इसवीची एक यादी मला मिळाली आहे. तिजमध्यें स्वामींनीं केलेल्या ग्रंथांची यादी खालील प्रमाणें आहे :—

१ ज्ञानेश्वरीवर टीका (गद्य)

२ अमृतानुभवावर टीका (गद्य)

३ स्फुट पदें, साक्षात्कार व आत्मप्रचीती हीं दोन प्रकरणें (पद्य)

४ गीतेवरील शांकरभाष्याची टीका (पद्य)

५ केनोपनिषद् टीका (गद्य)

३ मांडुक्योपनिषत् टीका (गद्य)

ही यादी वामन बुवांनीं " एकंदर ग्रंथ " ह्मणून दिली आहे, पण ती

खरोखरी एकंदर ग्रंथांची नव्हे. कारण त्यांचे धाकटे बंधू विश्वनाथ रामकृष्ण यांच्या खुद्द हातचें एक बाड मला मिळालें आहे, त्यांत निरंजन स्वामींच्या नांवावर (१) श्रीशंकराचार्यांच्या "आत्मबोधा" वरील पद्य टीका व (२) श्रीमत् विद्यारण्यकृत "महावाक्या" वर गद्य टीका हीं दोन प्रकरणें, वरील यादीशिवाय उपलब्ध झालीं आहेत. यापैकीं महावाक्यावर टीका हें छोटें प्रकरण खुद्द निरंजन स्वामींनीं केलेलें नसून जगन्नाथ नांवाच्या दुसऱ्याच एका गृहस्थानें केलें आहे आणि निरंजन स्वामींनीं तें शुद्ध केलें आहे. हा जगन्नाथ त्यांचा नातू कीं दुसरा कोणी शिष्य होता हें निश्चित करण्याजोगा पुरावा अद्याप मिळाला नाहीं. या शिवाय पुण्याचे रा. नारायण चिंतामण केळकर यांनीं संपादिलेल्या 'अनेक कविकृत भक्तिपरमार्थपर कविता' या पुस्तकांत (अ) पतिव्रताख्यान ओव्या ४३ (आ) निरंजनपर स्फुट ओव्या ५२ (इ) गोंधळी नांवाचें ७ कडव्यांचें पद, इतकी फुटकळ कविता आणि (ई) केशवचैतन्य-कथा-तरु नांवाचें एक मोठें सहा अध्यायांचें प्रकरण, इतकें निरंजन स्वामींचें लिखाण पूर्वीच प्रसिद्ध झालें आहे, तेंही मी या ग्रंथांत सामील केलें आहे. या शिवाय निरंजन स्वामींची आणखी काहीं ग्रंथरचना, विशेषतः स्फुट पदें काळाच्या उदरांत गडप झालीं असण्याचा संभव आहे. वरील सर्व ग्रंथांपैकीं श्री ज्ञानेश्वरी वरील टीका, गीतेवरील शांकरभाष्यावरील टीका आणि मांडुक्योपनिषदावरील टीका, हीं तीन प्रकरणें मला अद्याप मिळालीं नाहींत. स्वामींच्या आतांपर्यंत मिळालेल्या लिखाणाचा तूर्त हा एकच संग्रह करण्यांत आला आहे. या संग्रहांत अनुभवामृतावरील टीका [ ही टीका पूर्वीं काशीनाथ महादेव थत्ते, यांनीं शिळा-प्रेसवर इसवी सन १८८२ सालीं छापविली होती ती प्रत हल्लीं मला मिळाली आहे ] स्वात्मप्रचीति, साक्षात्कार, श्री रघुनाथ चरित्र, स्फुट पदपदांतरें, आत्म बोधावरील टीका, केनोपनिषदावरील टीका आणि महावाक्यावरील टीका, इतकीं प्रकरणें समाविष्ट केलीं आहेत. सुदैवानें ज्ञानेश्वरी, गीतेवरील शांकरभाष्य आणि मांडुक्योपनिषदावरिल टीका हीं प्रकरणें उपलब्ध झाल्यास त्यांचा दुसरा खंड करून वाचकांस सादर करितां येईल.

ह्या संग्रहांत प्रसिद्ध होणाऱ्या प्रकरणांची वाचकांस थोडी बहुत कल्पना आणून देणें जरूर वाटल्यावरून ती मी पुढीलप्रमाणें थोडक्यांत देत आहे.

१ **अनुभवामृत-पद बोधिनी**—ही श्री ज्ञानेश्वरांच्या सुप्रसिद्ध अनुभवामृत उर्फ अमृतानुभव ग्रंथावरील गद्य टीका आहे. निरंजनस्वामी आळंदीस जाऊन अनुभवामृताचा अर्थ आपणास कळावा ह्मणून श्री पुढें प्रार्थना करते झाले "त्याज वरून या ग्रंथावरि टीका करण्याविषयीं स्वप्नांत प्रसाद झाला" असें खुद्द त्यांनींच ह्मटलें आहे. ही टीका तत्कालीन मराठी गद्याचा एक उत्कृष्ट मासला आहे.

२ **स्वात्म-प्रचीति**—हें एक पांच अध्यायांचें छोटें प्रकरण असून त्यांत स्वामींनीं पुणें सोडल्यापासून नाशिकास जाऊन रघुनाथ भटजींचा अनुग्रह आपणास मिळेपर्यंतचा मजकूर सुबोध व रसाळ भाषेंत वर्णिला आहे.

३ **साक्षात्कार**—हें सात अध्यायात्मक छोटें प्रकरण असून यामध्यें नाशिक सोडल्यापासून गिरनार पर्वतावर जाऊन श्री दत्त महाराजांचें सगुणदर्शन होईपर्यंतचा सर्व अनुभव निरंजन स्वामींनीं वर्णिला आहे. हें व वरील स्वात्मप्रचीति हीं दोन्ही प्रकरणें पराकाष्ठेचीं प्रेमळ असून मनास मोठा चटका लावणारीं आहेत. त्यांत स्वामींनीं आपलें त्रोटक चरित्र तत्कालीन समाजस्थिति वगैरे अनेक विषयांचें शब्दचित्र स्पष्ट उभें केलें आहे. या दोन्ही प्रकरणांत स्वामींनीं प्रसंगांच्या सूचक नक्की तिथी, वार दिले आहेत, हा त्यांचा विशेष होय.

४ **श्री रघुनाथ चरित्र**—हेंही एक ३९६ ओंव्यांचें छोटें प्रकरण असून त्यांत स्वामींनीं आपले सद्गुरु रघुनाथ भटजी यांचें थोडक्यांत चरित्र-वर्णिलें आहे.

५ आत्मबोधप्रकाशिनी, व ६ केनोपानिषत्-टीका हीं त्या त्या ग्रंथां वरील लहान लहान टीकात्मक प्रकरणें आहेत. ७ महावाक्यावर टीका, ( जगन्नाथकृत ) या प्रकरणांत चार महावाक्यांचे स्पष्टीकरण केलें आहे. ८ केशव-चैतन्य-कथातरु हा सहा अध्यायांचा ग्रंथ असून त्यांत

तुकोबारायांचे गुरु केशव-चैतन्य यांचें चरित्र वर्णिलें आहे. ९ पतिव्रताख्यान या स्फुट प्रकरणांत सतीधर्माचें दिग्दर्शन केलें आहे. १० पदपदांतरें, गोंधळी, कटिबंध वगैरे स्वामींची स्फुट कविता कांहीं प्रासंगिक व कांहीं नित्य स्वरूपाची असून उपदेशपर आहे.

**श्रीमंत बाळासाहेब पटवर्धन,** मिरजसंस्थानचे सुशील व बहुश्रुत अधिपति यांना हा ग्रंथ अर्पण करण्याचा योग आला, ही विशेष समुचित गोष्ट झाली. त्यांचे आजोबा श्री. कै. थोरले बाळासाहेब यांनीं निरंजन स्वामींना मिरजेस आणिलें आणि आज स्वामींच्या कवितांचा संग्रह प्रकाशित होण्यास श्रीमंत धाकटे बाळासाहेब निमित्त होत आहेत, हा योगायोग अपूर्व नाहीं असें कोण ह्मणेल ? सांगली संस्थानचे प्रजावत्सल अधिपति, **हिज हायनेस श्रीमंत चिंतामणराव आप्पासाहेब** यांनीं आपल्या सरकारी छापखान्यांत हा ग्रंथ छापण्यास परवानगी देऊन मला निरंतर ऋणी करून ठेविलें आहे. पुण्याचे ह. भ. प. प्रो. शंकर वामन दांडेकर एम्. ए. यांनीं प्रस्तावना लिहिली, माझे परमस्नेही सांगलीचे ह. भ. प. रघुनाथ हणमंत कोटनीस यांनीं मोठ्या श्रमानें उपयुक्त माहिती पैदा केली, माझे ऋणानुबंधी शिष्य सांगलीचे राजकवि रा. गोपाळ गोविंद मुजुमदार उर्फ साधुदास यांनीं प्रेस कॉपी तयार केली व प्रुफें तपासलीं, आणि सांगली स्टेट प्रेसचे मॅनेजर रा. लोंढे व त्यांचा सहकारी वर्ग यांनीं ग्रंथाची छपाई सुबक व त्वरित करून दिली. या सर्वांचा मी उपकारबद्ध झालों आहे तसेंच मिरजेचे रहिवासी नरहर अनंत आपटे यांनीं ग्रंथ मिळविण्याचे कामीं बरीच खटपट केली याबद्दल त्यांचाही मी फार आभारी आहे.

निरंजनांचे पणतू भास्करबोवा यांचे जावई श्रीयुत कृष्णाजी श्रीधर देशपांडे राहणार बार्शी, यांनींही फार उत्सुकतेनें स्वामींचें आपल्यापाशीं असलेलें सर्व बाड दिलें, या उपकारामुळे मी त्यांचा ऋणी झालों आहे. अनुभवामृताची अस्सल प्रत श्रीमती रमाबाई कळंबकर, निरंजनांची नातसून यांनीं मला कित्येक दिवसांपूर्वी दिली व प्रसादपादुकाही कांहीं दिवस

माझ्याकडे ठेविल्या, ही त्यांची उपकृति शद्बांनीं फिटणें शक्य नाहीं.

शेवटीं चिरकाळचा मानस आज फलद्रूप होत आहे याबद्दल श्री निरंजनांच्या चरणीं अखंड-दंडाय-मान होऊन हा उपोद्घात पुरा करितों.

सांगली,
अनंत चतुर्दशी, शके १८५७ } य. व्यं. कोल्हटकर.



# परिचय.



गुरुवर्य श्री. यशवंतरावजी कोल्हटकर हे महाराष्ट्रांतील एक सुप्रसिद्ध लेखक असल्यामुळें त्यांचा वाचकांस परिचय करून देण्याची यत्किंचित् आवश्यकता नाहीं; पण ते ज्या सत्पुरुषाचा ग्रंथ-संग्रह आज प्रसिद्ध करीत आहेत ते सत्पुरुष सांगलीच्या अगदीं शेजारीं आणि शंभरांहूनही कमीच वर्षांपूर्वीं राहून गेले असूनही, त्यांची प्रसिद्धी व्हावी तितकी झाली नव्हती, यामुळें त्यांच्या ग्रंथांचा परिचय वाचकांस करून देणें जरूर झालें आहे. सदर ग्रंथांचें आशयदृष्ट्या जरूर तें निरीक्षण गुरुवर्य तात्यासाहेबांनीं आपल्या उपोद्घातांत केलेंच आहे. आतां भाषादृष्ट्या जें थोडें विवेचन करावयास पाहिजे तें करण्याची कामगिरी गुरुवर्यांनीं मजवर सोपविल्यामुळें मी पुढील चार शद्ब लिहीत आहे.

निरंजनस्वामींचें लिखाण गद्य व पद्य अशा उभयविध स्वरूपाचें आहे. स्वामींची कारकीर्द पेशवाई बुडाल्यानंतर लगेच होऊन गेली असल्यामुळें एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभींच्या मराठी भाषेचे बहुतेक विशेष त्यांच्या गद्यांत दिसून येतात. विरामचिन्हांचा अभाव, मुसलमानी शद्बांचा संचार, महाप्राणाची जोडणी ( उदाहरणार्थ ‘कोणी’ बद्दल ‘कोर्न्हा,’ ‘वरी’ बद्दल ‘वऱ्ही’ इ. ), ऱ्हस्वदीर्घांचा अनियम, लिंगांचा व पुरुषांचा विसंवाद ( उदा. ‘ते स्त्रीपुरुषें,’ ‘आम्ही बोलतात’ इ. ), असम शद्बांचे समास इत्यादि प्रयोग स्वामींच्या गद्य व पद्य रचनेंतही भरपूर आढळून येतात. त्यामुळें त्यांचें लिखाण, विशेषतः गद्य लिखाण आजच्या महाराष्ट्रवाचकांना पहिल्या पहिल्यानें परकें व अपरिचित वाटण्याचा संभव आहे. पण त्यांची लेखनशैली दूरान्वय व क्लिष्टता या दोनी दोषांपासून सर्वथा अलिप्त असल्यामुळें अर्थबोध होण्यास कोठेही अडचण पडत नाहीं.

जुन्या ग्रंथांना पाठभेदांचा उपद्रव होण्याचा जो एक परिपाठ आपल्या इकडे पडून गेला आहे त्याची झळ निरंजन स्वामींच्या ग्रंथांनाही भरपूर

लागली आहे. प्रस्तुत संग्रहांत जें लिखाण संगृहित झालें आहे तें गुरुवर्य तात्यासाहेबांना दोन बाडांतून मुख्यतः मिळालें आहे. पैकीं अनुभवामृता-वरील टीका ही निरंजन स्वामींचे मिरज एथील शिष्य कै. रामचंद्र तात्या गोखले यांच्या हस्तलिखित पोथीवरून घेतली आहे. गोखले मजकूर यांचें हस्ताक्षर उत्कृष्ट आहे पण त्यांची व्युत्पन्नता बेताचीच असल्यामुळें त्यांच्या लेखनांत जागजागीं प्रमाद झाले आहेत. सदर पोथीवरून कोणा तरी तज्ञाची, कदाचित् खुद्द निरंजनस्वामींची नजर फिरली असावी, असें पोथींत जागजागीं हरताळानें व आळित्यानें केलेल्या दुरुस्त्यांवरून दिसतें. पण त्यासंबंधीं निश्चित मत देतां येत नाहीं. विशेषतः सदर पोथींत ज्ञानोबारायांच्या अनुभवामृतांतील ओव्यांचे जे पाठ घेतले आहेत त्यांच्या श्रेष्ठपणावरून, व सुप्रसिद्ध इतिहाससंशोधक राजवाडे यांनीं संपादिलेल्या ज्ञानेश्वरीच्या भाषेशीं दिसून येणाऱ्या त्यांच्या साम्यावरून, निरंजनस्वामींना अनुभवामृताची एखादी फार जुनाट प्रत उपलब्ध झाली असावी, पण तिचें अस्सल स्वरूप स्वामींचे लेखक जे तात्या गोखले यांना निर्दोप राखतां आलेलें नसावें असें वाटल्यावांचून राहत नाहीं. निदान माझ्या मनाची ही दृढ समजूत झाल्यामुळें, 'अनुभवामृत-बोधिनी' ची मुद्रण प्रत तयार करितांना मी ज्ञानेश्वरांच्या ओव्या राजवाडी ज्ञानेश्वरीच्या भाषेस अनुसरून लिहिल्या आहेत आणि त्यांच्यावरील निरंजनस्वामींची टीका मात्र गोखले मजकूर यांच्या लिखाणाबरहुकूम उतरली आहे, हा थोडासा अधिक प्रसंग झाला आहे, पण त्याचें परिमार्जन करण्याकरितां गोखले मजकूर यांनीं लिहिलेल्या अनुभवामृतांतील मूळ ज्ञानेश्वरी ओव्या जशाच्या तशा उतरून मी स्वतंत्र परिशिष्टांत एकत्र दाखल केल्या आहेत. अशा रीतीनें सर्व ग्रंथांत मूळ लेख-कांच्या लेखनांत कोठेंही छापतांना बदल होऊं न देण्याची खबरदारी शक्य तोंवर घेण्यांत आली आहे.

प्रस्तुत संग्रहांतील केनोपनिषद्, आत्मबोध व महावाक्य यांवरील निरं-जन स्वामींच्या टीका स्वामींचे खुद्द नातू विश्वनाथ रामकृष्ण कळंबकर यांचे हातच्या बाडांतून घेतल्या आहेत. सदर विश्वनाथबोवा यांचें हस्ताक्षर सुबक आहे, पण त्यांच्या लेखनांतही जागोजाग दोष राहिले आहेत. ते मी टीकांना

आधारभूत असणाऱ्या मूळ संस्कृत ग्रंथांतील उताऱ्यांपुरते शुद्ध करून घेतले आहेत, पण विश्वनाथबोवांच्या मराठी लेखनांत मात्र मुळींच फरक केलेला नाहीं. प्रस्तुत ग्रंथसंग्रहांतील राहिलेला भाग जो 'स्वात्मप्रचीति,' 'साक्षात्कार,' 'श्रीरघुनाथचारित्र,' 'पदपदांतरें' वगैरे तो मिरज येथील निरंजनस्वामींच्या मठांतील एका चोपडीवरून गुरुवर्य तात्यासाहेब यांनीं नक्कल करून घेतलेला आहे. सदर चोपडींतही असेच पुष्कळ लिपिदोष झालेले असून, निरंजनस्वामींच्या हिंदुस्थानी पदांत तर ते फारच विपुलतेनें झालेले आढळले. त्यांची दुरुस्ती केवळ अर्थहानी होईल असें वाटलें तेवढ्याच स्थळांपुरती करून बाकीचा भाग मी मुळाबरहुकूम जशाचा तसाच राखला आहे. समाधानाची गोष्ट एवढीच कीं तात्या गोखले यांच्या हातची पोथी विश्वनाथबोवांच्या हातचें बाड, आणि मिरजमठांतील चोपडी या सर्वांतून अशुद्धें जरी मुबलक असलीं, तरी निरंजनस्वामींची ग्रंथरचनाच इतकी सुबोध आहे कीं 'अनुभवामृता'सारख्या वेदांतरूप गहन विषयापासून तों 'साक्षात्कारा'सारख्या सामान्य वर्णनात्मक विषयापर्यंत वाचकांस अर्थबोध होण्यास अवघड असें एकही स्थळ मला आढळलें नाहीं! आणि याच कारणाकरितां प्रस्तुत संग्रहांत अर्थबोधक टीपा देण्याचें प्रयोजन उत्पन्न झालें नाहीं.

सदर संग्रहांत दाखल केलेल्या छायाचित्रांसंबंधी थोडी माहिती वाचकांस देणें जरूर आहे. श्री ज्ञानेश्वरमहाराजांची अस्सल तसबीर आज उपलब्ध असणें शक्य नाहीं. सबब त्यांच्या प्रचलित छायाचित्राच्या खरेपणासंबंधीं खात्री देतां येत नाहीं. निरंजनस्वामींच्या छायाचित्रासंबंधीं मात्र खात्रीलायक पुरावा मिळाला आहे. त्यांच्या छायाचित्राची कांच त्यांच्या एका भक्ताचे घरच्या संग्रहांत मिळाली, त्या संग्रहांत पुष्कळच कांचा असून त्यांचें व्यवस्थित वर्गीकरण केलेलें आढळलें, त्यापैकीं सांगली-संग्रहांत श्रीनृसिंहसरस्वतीं (सांगलीकरांचे गुरु) ची कांच सापडली आणि मिरजसंग्रहांत श्रीअण्णाबुवांची एक व प्रस्तुतची एक अशा दोन कांचा सापडल्या, यावरून ही कांच निरंजनस्वामींचीच असावी असें अनुमान झालें. त्यांतच स्वामींचे कळंब येथील पुतणे रा. अण्णा श्रोत्री (वय ९५) यांनीं हे छाया-

चित्र पाहून त्याच्या खरेपणाबद्दल खात्री दिली आहे. षड्भुज दत्तमहाराजांचीं जीं दोन छायाचित्रें संग्रहांत घेण्यांत आलीं आहेत त्यांतील एक मिरज येथील सरकारी किल्ल्यांत कै. थोरले बाळासाहेब पटवर्धन यांनीं स्वामींच्या सूचनेवरून खुद्द स्वामींच्या हस्तें स्थापन केलेल्या प्रतिमेचें आहे व दुसरें श्रीकाशीक्षेत्रीं निरंजनस्वामींचे नातू विश्वनाथबुवा यांनीं स्थापन केलेल्या प्रतिमेचें आहे. स्वामींच्या हस्ताक्षराचें छायाचित्र ज्या अस्सल पत्रावरून तयार केलें आहे तें पत्र निरंजनस्वामींचे पणतू भास्करबोवा यांचे जावई श्रीयुत कृष्णाजी श्रीधर देशपांडे रा. बार्शी यांचे संग्रहांत मिळालें असल्यामुळें त्याचे अस्सलपणाबद्दल संशय नाहीं.

उत्तम काव्यासंबंधीं हल्लीं ज्या कल्पना रूढ आहेत त्यांच्या साच्यांत निरंजन स्वामींची कविता येणार नाहीं हें खरें, पण त्या दृष्टीनें त्यांच्या कवितेकडे पाहणेंच आधीं रास्त नाहीं. समर्थांनीं दासबोधांत उत्तम काव्याची जी व्याख्या केली आहे तिच्या कक्षेंत निरंजन स्वामींची कविता बसते हें खास, आणि तशा प्रकारच्या अभिरुचीच्या वाचकांचें ती भरपूर समाधान करील हेंही पण तितकेंच सत्य आहे. स्वामींच्या गद्यासंबंधींही तोच प्रकार आहे. त्यामध्यें अलीकडील पद्धतीचा नटवेपणा जरी आढळला नाहीं, तरी सदभिरुचि, औचित्य, उच्च कोटिक्रम आणि अनुभवाचा जिव्हाळा वगैरे गुणांनीं त्यांचें गद्य लिखाण पद्य लिखाणासारखेंच आपल्या पुराण स्वरूपांतही आकर्षक उतरलें आहे. त्यांची ‘ अनुभवामृतबोधिनी ’ वाचल्यावर माझ्या विधानाची सत्यता वाचकांना पटणार आहे. त्यांची ज्ञानेश्वरील गद्य टीका अद्याप उपलब्ध झाली नाहीं ही खेदाची गोष्ट होय, तथापि तीही लवकरच उपलब्ध होईल अशी आशा करण्यास जागा आहे. शेवटीं पेशवाई व आंग्लाई यांच्या संधिकालीं होऊन गेलेल्या या एका मोठ्या महाराष्ट्रीय लेखकाचा ग्रंथसंग्रह वाचकांच्या हातीं दिल्याबद्दल गुरुवर्य तात्यासाहेब कोल्हटकर यांचें मनःपूर्वक अभिनंदन करून वाचकांचा निरोप घेतों.

**सांगली,** } **साधुदास.**
**गणेशचतुर्थी, शके १८५७.**

# प्रस्तावना.



साधुवर्य श्रीज्ञानेश्वरमहाराज यांचा अनुभवामृत हा ग्रंथ महाराष्ट्र भाषेंतील आध्यात्मिक तत्वज्ञानाच्या ग्रंथांत अत्यंत श्रेष्ठ ग्रंथ आहे, हें पुरावे देऊन सिद्ध करण्याची जरूरी नाहीं. त्यांच्या नंतर झालेल्या साधु, पंडित, योगी वाङ्मयभक्त या सर्वांनीं त्या ग्रंथाची थोरवीच वर्णिली आहे. नेवासें मुक्कामीं ज्ञानेश्वरीचें लेखनकार्य संपल्यावर गुरुआज्ञेनें श्रीज्ञानदेवांनीं स्वानुभव ज्या ग्रंथांत कथित केला तो हा ग्रंथ. या ग्रंथाचें वैशिष्ट्य हें आहे कीं यांत आपला अनुभव मांडण्याची पद्धत जी ज्ञानराजांनीं स्वीकारली आहे ती त्यांचा सुप्रसिद्ध ग्रंथ जो ज्ञानेश्वरी त्यांतील पद्धतीहून भिन्न आहे. या ग्रंथांत ग्रंथकार श्रोत्यांस आपलें मत सरळ समजून द्यावें येवढाच प्रयत्न करीत नाहीं. या ग्रंथांत ज्ञानराज हे आपल्या सिद्धान्ताहून भिन्न पक्ष मांडणारे वादी यांच्याशीं दंड थोपटून दोन हात करतांना दिसत आहेत. ज्ञानराजांनीं आपल्या अनुभवास सिद्धान्ताचें रूप देऊन तद्विसंगत असे प्रमुख बौद्धांचा शून्यवाद, सांख्यांचा प्रकृति-पुरुषवाद इत्यादि जे वाद आहेत, त्यांचें संशोधन करून ते विसंगत कसे आहेत हें युक्तिपूर्वक दाखविलें आहे. हें दाखवीत असतांना अर्थातच त्यांची दासीच होऊन राहिलेल्या कल्पनाशक्तीचा त्यांनीं भरपूर उपयोग केला आहे. सत्-चिद्-आनंद विवरण अथवा अविद्या-विचार असला रुक्ष विषय, पण ज्ञानराजांच्या मुखांतून तो आला कीं तो रसमयच होऊन जातो. त्यांची लेखणी ज्याला लागेल तो विषय रसाची सुपट मूर्तीच बनतो अशी अजब जादू त्यांच्या लेखणींत भरलेली दिसते. अनुभवामृत ह्मणजे ज्ञानराजांनीं निर्माण केलेली, अलंकारांनीं भरलेली, एक नवी आध्यात्मिक सृष्टिच होय असें ह्मणावयास हरकत नाहीं.

हा ग्रंथ अंतर्बाह्य फारच सुंदर उतरला आहे, पण त्यामुळेंच तो समजण्यास कठिण होऊन राहिला आहे. ज्ञानेश्वरीचें मूळ गीता असल्यानें, ज्ञानेश्वरी समजण्यास गीतेच्या अर्थाचें ज्ञान हा एक तरी आधार आहे.

पण अनुभवामृत हा ग्रंथ स्वतंत्र होण्यास्तव तो निरालंब अत एव तीक्ष्ण बुद्धीच्या पायासहि निसरडा होऊन राहिला आहे. पूर्वपक्ष कोठें संपला, उत्तरपक्षास आरंभ कोठें झाला, कोणच्या ओवींत कोणवा विचार चालला आहे हें बहुतेक ठिकाणीं वाचणाऱ्यास आपल्याच बुद्धीनें ठरवावें लागतें. यामुळें या ग्रंथाचा अर्थ लावतांना बुद्धि अगदी टेंकीस येते. संपूर्ण ग्रंथांत 'जग ज्ञानांत स्फुरतें,' अथवा 'इये स्फूर्ति कडौनि । नाहीं स्फूर्ति मात्र वांचोनि' अशी चित्प्रकाशाची महती वर्णिली आहे. पण अनुभवामृताच्या अभ्यासूस हें सर्व समजून घेण्याचा मार्ग अंधकारमय भासतो. त्याला प्रकाशा-विना कित्येक ठिकाणीं ठेंचाळण्याचा प्रसंग येतो. यामुळें या ग्रंथज्ञानाच्या मार्गावर प्रकाश पाडणाऱ्या दीपिका जितक्या प्रज्वलित केल्या जातील तितक्या पांथिकास त्या उपयोगीच होणाऱ्या आहेत. ह्मणूनच आमची अशी खात्री आहे कीं श्री. कोल्हटकर प्रसिद्ध करीत असलेल्या श्रीनिरंजन रघुनाथकृत ग्रंथ-संग्रहामधील ही 'अनुभवामृत-पदबोधिनी' टीका इचें अनुभवामृत-पथ-गामी पांथिक आनंदानें स्वागत करतील.

एक काळ असा होता कीं, श्रीज्ञानदेवांचा ग्रंथ ह्मणजे अभ्यासी फक्त ज्ञानेश्वरीच पहात. अजूनहि प्रामुख्यानें ज्ञानेश्वरमत प्रगट करणारी ज्ञाने-श्वरीच होय असा बहुजनसमाजाचा समज आहे. पूर्वीं अनुभवामृत फारसें कोणी वाचीत नसे. अलिकडे ही प्रवृत्ति बदलली आहे. या ग्रंथावर गेल्या एक दोन वर्षांत दोन तीन अर्थ स्पष्ट करणाऱ्या अशा विवेचनात्मक टीका प्रसिद्ध झाल्या आहेत. त्या टीकेंत आणि प्रस्तुतच्या टीकेंत थोडासा फरक आहे. तो काय आहे हें सुज्ञ वाचक, आम्ही निरंजन रघुनाथ आपण ग्रंथ करावयास केव्हां हातीं घेतला तो प्रसंग सांगतात तो देत आहोंत, त्यावरून जाणतीलच 'श्रीरघुवीर चरणारविंद पराग सेवन भ्रमर भूत । श्रीदत्तात्रेय-लब्धप्रसाद । श्रीज्ञानेश्वर प्रेरित निरंजनाख्य' असा आपला उल्लेख करून आपणांस अनुभवामृताचा अर्थ कसा कळला तें निरंजन आपल्या टीकेच्या शेवटीं खालीलप्रमाणें सांगतातः

"ग्रंथ परम दुर्बोध. त्याचें व्याख्यान करावयाचें माझें सामर्थ्य नाहीं ॥ परंतु मनास फार हौस जे या अनुभवामृताचा अर्थ आपणास कळावा ॥ याजकारितां श्री अलंकापुरीं जाऊन लेकरासारिखे रडून प्रार्थना श्रीज्ञानेश्वर-पदीं केली ॥ त्याजवरून या ग्रंथावरी टीका करण्याविषयीं स्वप्नांत प्रसाद झाला."

निरंजनस्वामी हे मोठे गुरुभक्त सगुण साक्षात्कारी अनुभवी महात्मे होते. अर्थातच अनुभवामृत ग्रंथाचा अंतर्भाग जो अनुभव तो समजण्यास त्यांचा अधिकार होता हें निराळें सांगणें अनवश्य आहे. हा ग्रंथ लावीत असतांना त्यांनीं प्रामुख्यानें अनुभवात्मक दृष्टीचा उपयोग केला आहे. यामुळें पुष्कळशा अज्ञात ठिकाणांचा त्यांच्या बोधिनीनें चांगला बोध होणार आहे.

अनुभवात्मक दृष्टि ही मुख्य ठेवून त्यांनीं तार्किक दृष्टीचाहि ठिकठिकाणीं उपयोग केला आहे. अनुभवामृताच्या सर्व प्रकरणांतून, विशेषतः ७।८।९।१० या प्रकरणांतून चालू ओळींत मागील ओवीवर उत्पन्न होणाऱ्या कोणत्या शंकेचें निरसन ज्ञानराज करतात, कोठच्या ओळी पासून कोठच्या-ओळीपर्यंत कोणच्या विषयाची चर्चा आहे हें दाखवण्याचा त्यांनीं बराच प्रयत्न केला आहे. ठिकाठिकाणीं प्रकरण-संगतिहि सांगितली आहे. निरंजन स्वामींच्या स्पष्टीकरणानें कित्येक गूढ ठिकाणीं चांगलाच प्रकाश पडतो यांत शंका नाहीं. उदाहरणार्थ प्र ७ ओवी ३५--५३--७१--७२. प्र. ९. ओवी २६, या ओव्यांचे अर्थ सुंदर आहेत.

निरंजनस्वामींनीं अनुभवामृत सर्व अद्वैतपरच लावला आहे व तो लावतांना परमात्मा, पुरुष, ईश्वर आणि चिच्छक्ति, प्रकृति, माया या कल्पनांचा उपयोग केला आहे.

श्री. कोल्हटकर यांनीं संगृहीत केलेल्या निरंजन स्वामींच्या ग्रंथरचनेपैकीं 'अनुभवामृत-पद-बोधिनी' हें प्रकरण सर्वांत अधिक महत्वाचें असल्यामुळें त्याचें मी मुख्यतः दिग्दर्शन केलें. स्वामींनीं श्रीज्ञानेश्वरीवर जी टीका

लिहिली आहे, तीही अशीच नितांत मनोहर असेल यांत तिळमात्र संशय नाहीं. ती पुढेंमागें उपलब्ध जाहल्यास छापून काढण्याचा श्री. कोल्हटकर यांचा मनोदय आहे. निरंजन स्वामींचीं केनोपनिषद् टीका, व आत्मबोध-प्रकाशिनी हीं छोटीं प्रकरणेंही अशींच वेदांतपर असून मोठीं अर्थसूचक उतरलेलीं आहेत. महावाक्य टीका हें प्रकरण त्यांच्या एका जगन्नाथ नांवाच्या शिष्यानें लिहिलें असलें तरी स्वामींनीं तें शुद्ध केलें असल्यानें त्यालाही रेखीवपणा आला आहे. स्वात्मप्रचीती व साक्षात्कार हीं प्रकरणें विशिष्ट प्रसंगांच्या वर्णनात्मक असून श्रीरघुनाथ चरित्र व केशवचैतन्यकथातरु या प्रकरणांत निरंजन स्वामींनीं अनुक्रमें आपल्या सद्गुरूंचें चरित्र व तुकोबारायांच्या सद्गुरूंचें चरित्र वर्णिलें आहे. हा केशवचैतन्यकथातरु पतिव्रताख्यान व गोंधळी अशीं प्रकरणें पूर्वीं प्रसिद्ध जाहलेलीं आहेत. तथापि तीं श्री. कोल्हटकर यांनीं आपल्या संग्रहांत सामील केलीं आहेत हें ठीकच केलें आहे. निरंजनस्वामींचीं पदपदांतरें अध्यात्मरसानें ओथंबलेलीं असून मनाला चटका लावणारीं झालीं आहेत.श्री. कोल्हटकर यांनीं म्हटल्याप्रमाणें निरंजन-स्वामींच्या ग्रंथांचा हा सर्वच संग्रह मोठा रसाळ व प्रेमळ उतरला असून तो वाचकांच्या हातीं दिल्याबद्दल श्रीयुत कोल्हटकर यांचें मी मनःपूर्वक अभिनंदन करतों.

पुण्यपत्तन.
गणेशचतुर्थी शके १८५७

शंकर वामन दांडेकर.

# अनुक्रमणिका.

## श्री ज्ञानेश्वरमहाराज.



त्यांची समाधी.



त्यांनीं चालविलेली भिंत.



इंद्रायणीचा देखावा, अळंदी.



॥ श्रीगणेशाय नमः ॥

ॐ नमो भगवते दत्तात्रेयाय

# अनुभवामृत–पद–बोधिनी.

## ( अनुभवामृतावर टीका )

## प्रकरण १ लें.

श्रीगणेशायनमः ॥ श्रीसरस्वत्यैनमः ॥ श्रीगुरुदत्तात्रेयायनमः ॥ श्रीगुरुरघुनाथाय नमः ॥ श्रीज्ञानेश्वरायनमः ॥ श्रीरघुवीरचरणारविंदपरागसेवन–भ्रमरीभूत, श्रीगुरुदत्तात्रेयलब्धप्रसाद **निरंजनाख्य** जो, येणें **श्रीज्ञानेश्वर** जे यांसी प्रार्थना केली जे, स्वामींचा **अनुभवामृतग्रंथ** जो त्याजवरी मी टीका करूं इच्छितों; त्यांस स्वामींचा प्रसाद झाला ह्मणजे ग्रंथांतील प्रमेय निघेल. ऐसी प्रार्थना ऐकिली असतां श्री ज्ञानेश्वर स्वप्नांत येऊन आज्ञा करिते झाले जे, तूं निर्भय अनुभवामृतावरि टीका करी, अर्थे करून सांग होईल. ऐसा प्रसाद जाला. आतां श्रोते जे त्यांनीं ही आज्ञा केली जे, या कालीं अनुभवामृतग्रंथ परम दुर्बोध आहे, दृष्टांतांतील प्रमेयें निघत नाहींत, याजकरितां प्रतिदृष्टांताचे अर्थ वेगळाले दार्ष्टान्तयुक्त स्वानुभवें करून वर्णावे. ऐसी श्रोत्यांची आज्ञा शिरसावंद्य करून स्वानुभवयुक्त अधिष्ठान धरून, संपूर्ण श्रुतीचा अभिप्राय मनांत आणून, जनस्थानवासी **श्रीरघुनाथ** यांचा चरणरज **निरंजन** जो तो **अनुभवामृत** ग्रंथराज जो याची टीका प्राकृत फक्किकारूपें करावयासी प्रवृत्त झाला. आतां **श्रीज्ञानेश्वर**, संपूर्ण ज्ञानियांचे सार्वभौमराजे सर्वांवरि अनुग्रह करावयासाठीं सर्व श्रुतींचा सिद्धांत हा **अनुभवामृत** ग्रंथ जो तो प्रथमारंभीं संस्कृत पंच श्लोकेंकरून नमनपर वर्णितात ॥

**यदक्षरमनाख्येयमानंदमजमव्ययं ॥**
**श्रीमन्निवृत्तिनाथेतिख्यातं दैवतमाश्रये ॥ १ ॥**

अथ मंगलस्य कायिक-वाचिक-मानसिक-भेदेन त्रैविध्यसत्वाच्छक्तिविशिष्टचैतन्यस्यैव गुरुरूपत्वेन परमात्मतया कर्तुमकर्तुं समर्थत्वेन मंगलोद्देश्यत्वात् ॥ तत्र चैतन्यस्य मुख्यत्वेन प्रथमतः चैतन्यस्य वाचिकं मंगलं करोति ॥ यदक्षरमिति ॥ अक्षरं नक्षरतीत्यक्षरं ॥ अनाख्येयं ॥ आख्यातुमशक्यं वागविषयमितियावत् ॥ आनंदमानंदस्वरूपं ॥ अजमुत्पत्तिरहितं ॥ अव्ययं नाशरहितं ॥ श्रीमन्निवृत्ति

नाथेतिख्यातमेतन्नाम्नाप्रसिद्धं ॥ गुरोश्चैतन्यस्यचाभेदेनस्वीकारात् ॥ दैवत स्वप्रकाशं ॥ आश्रयेनमस्करोमि ॥१॥

अक्षर ह्मणजे कधींहि क्षरत नाहीं; अनाख्येय म्हणजे सांगावयाविषयीं अशक्य होय; कारण जे वाणीचा विषय नव्हे म्हणून; आनंदं आनंदस्वरूप; अजं उत्पत्तिरहित; अव्ययं नाशरहित; आणि श्रीनिवृत्तिनाथ या नामें करून प्रसिद्ध जें दैवत म्हणजे स्वप्रकाशमान जो गुरु त्या कारणें मी ज्ञानेश्वर जो तो नमस्कार करितों.

गुरुरित्याख्यया लोके साक्षाद्विद्याहि शांकरी ॥
जयत्याज्ञा नमस्तस्यै दयार्द्रायै निरंतरम् ॥ २ ॥

गुरुरिति । त्रिविध लोके साक्षाद्विद्यैव प्रसिद्धा । साच विद्या कथंभूतेत्याकाक्षायां शांकरीति । शं मूढानां ज्ञानप्राप्तिरूपं सुखं करोतीति शंकरश्चैतन्यं तस्येयमेकदेशस्था शांकरी । आज्ञा अतिशयेन ज्ञेत्याज्ञा ज्ञानरूपेत्यर्थः । जयति सर्वोत्कर्षेण वर्तते । तस्यै बुद्धिस्थायै । दयार्द्रायै दया लोकोद्धारबुद्धिस्तयार्द्रा स्निग्धा चैतन्यं ज्ञापयित्वा स्वयं गन्तुमुद्यतेति यावत् । निरंतरं व्यवधानरहितं यथा भवति तथा । नमः प्रणामोस्तु ॥ २ ॥

आतां श्रीगुरूंनीं उपदिष्ट जे ब्रम्हविद्या तीतें नमस्कार करितात. गुरु म्हणजे श्रेष्ठत्वेंकरून जे त्रैलोक्याचे ठायीं प्रसिद्ध ब्रम्हविद्या; ती कोणते प्रकारची म्हटली असतां, शांकरी होय; मूढातें ज्ञानप्राप्तिरूप सुखातें करून देणारा जो चैतन्यरूप शंकर, त्याचे एकदेशाचे ठायीं स्थिति करणारी ही, म्हणून शांकरी; आज्ञा, म्हणजे अतिशयेंकरून ज्ञानरूपा ऐसी; जयति, म्हणजे सर्वोत्कर्षेंकरून वर्तते; दयार्द्रा, जे दयेंकरून आर्द्र म्ह० स्निग्ध तिजकारणें; निरंतर नमस्कार असो ॥ २ ॥

सार्धं केनच कस्यार्धं शिवयोः समरूपिणोः ।
ज्ञातुं न शक्यते लग्नमितिद्वैतच्छलान्मुहुः ॥ ३ ॥

इदानीं तृतीयेन शिवशक्त्युभयोरभेदं दर्शयति । द्वैतमन्तरेण सृष्ट्युत्पत्तेरसंभवात् । तदुत्पत्तिसमये यद्यपि मुहुर्मुहुः पुनःपुनर्द्वैतच्छलाद्द्वैतमिषेण लग्नं संयुक्तमिव भवति । तथापि शिवयोः शिवश्चशिवाच शिवौ तयोः शिवयोः शिवशक्त्योरित्यर्थः । समरूपिणोर्वस्तुतो ऽभिन्नरूपयोरित्यस्माद्धेतोः । सार्धं केनच केनाचिद्द्वितीयेन साहित्यं । कस्यार्धमनयोर्मध्ये कस्यार्धं किमिति भेदव्यवहाराविषयीभूतं ज्ञातुं बोद्धुं न शक्यते न समर्थो भूयते ॥ ३ ॥

आतां शिवशक्तींचें अभेदरूपें वर्णन करितात. शिव परमात्मा, आणि आदिशक्ति हे दोघे एकचि आहेत, परंतु यांचें वारंवार द्वैतमिषेंकरून कैसा योग झाला आहे हें जाणावयाविषयीं शक्य नाहीं; कारण जे हे दोघेंही समानरूपी आहेत म्हणून; आणखी शिवशक्ति जे, यांमध्यें कोण जें तें कोणत्या द्वितीयाच्या योगेंकरून सहित आहे आणि कोण जें तें कोणाचें अर्ध आहे हें जाणावया विषयीं ही कोणी समर्थ नाहीं ॥ ३ ॥

अद्वैतमात्मनस्तत्वं दर्शयन्तौ मिथस्तराम् ॥
तौ वंदे जगतामाद्यौ तयोस्तत्वाभिपत्तये ॥४॥

चतुर्थेन तयोर्वंदनं करोति । मिथस्तरामातिशयेन मिथ इति मिथस्तरां । परस्परमात्मनः स्वस्य तत्वं यथातथ्यमद्वैतं द्वैतरहितं दर्शयन्तौ । जगतां हिरण्यगर्भादीनामाद्यौ प्रागपि विद्यमानौ तौ बुद्धिस्थौ । तयोः शिवशक्त्योस्तत्वाभिपत्तये ब्रम्हप्राप्तये तदुपकारत्वेन वन्दे वंदनं करोमि ॥४॥

हे शिवशक्ति जे ते आपलें अद्वैत स्वरूप ब्रम्ह जें त्यातें अतिशयेंकरून परस्परें दाखवितात; आणखी ते कैसीं आहेत, हिरण्यगर्भादि जगतांचें आद्य होत; या उभयांच्या वास्तविक ब्रम्हस्वरूपाची प्राप्ति व्हावयाकारणें; तौ वन्दे, त्या शिवशक्तींतें वंदन करितों ॥४॥

मूलायाग्राय मध्याय मूलमध्याग्रमूर्तये ॥
क्षीणाग्रमूलमध्याय नमः पूर्णाय शंभवे ॥५॥

परमात्मशक्तेरवस्थाभेदेन चिच्छक्ति–प्रकृति–माया–शब्दवाच्यायाः सर्वसंसारकारणत्वेन क्रमान्मूलमध्याग्ररूपायास्तस्यास्तत्तदुपहितशिवपुरुषेश्वरत्रिविधचैतन्यस्य पूर्णशंभोर्नमस्काररूपं मंगलं करोति । मूलायाग्रायेति । चिच्छक्तिस्संसारमूलं तस्मै मूलाय । मायाशक्तिस्संसाराग्रं तस्मै अग्राय । प्रकृतिः शक्तिस्संसारमध्यं तस्मै मध्याय । मूलमध्याग्रमूर्तये मूलंचमध्यंचाग्रंचैषां समूहो मूलमध्याग्रंतदेव मूर्तिः स्वरूपं यस्य शबलब्रम्हणः स मूलमध्याग्रमूर्तिस्तस्मै ॥ क्षीणाग्रमूलमध्याय क्षीणान्यविद्यमानान्यग्रमूलमध्यानि यस्मिन्शुद्धब्रम्हणि तत् क्षीणाग्रमूलमध्यंतस्मै ॥ कथंभूताय तस्मै पूर्णाय देशकालवस्तुपरिच्छेदरहिताय । पुनः कथंभूताय । तस्मै शंभवे शंनिरतिशयं सुखं तद्भावयति जीव उत्पादयतीति शंभुस्तस्मै ॥ नमः मम प्रव्हीभावोऽस्तु ॥ ५ ॥

आतां संपूर्ण शक्तियुक्त चैतन्य शबलब्रम्ह जें तोचि पूर्ण शंभु त्याकारणें नमस्कार करितात. आतां तो पूर्ण शंभु कैसा; मूलाय, संपूर्ण संसारास मूल म्ह० कारण अशी जे ज्ञानरूपा आदिशक्ति तिणेंकरून युक्त; अग्राय, संपूर्ण जगताचें अग्र असी जे त्रिगुणात्मिका मायाशक्ति तिणेंकरून युक्त; मध्याय संपूर्ण जगताचें मध्य असी जे अष्टधाप्रकृति तिणेंकरून युक्त; ऐशा तीन शक्ति आहेत ज्या शबलब्रम्हाच्या, आणखी तो शंभु कैसा होय; मूलमध्याग्रमूर्तये, चिच्छक्तियुक्त चैतन्य जें त्यास परमात्मा शिव ऐसें नाम, आणि प्रकृतियुक्त चैतन्य जें त्यास पुरुष ऐसें नाम, आणि मायायुक्त चैतन्य जें त्यास ईश्वर ऐसें नाम, ऐशा तीन मूर्ति आहेत ज्याच्या; आणखी तो शंभु कैसा होय; क्षीणाग्रमूलमध्याय; पूर्वी वर्णिल्या ज्या मूल, मध्य, अग्र, रूपेंकरून शक्ति तीन, त्या क्षीण म्हणजे अविद्यमान आहेत ज्याचे ठायीं ऐसा होय; आणखी तो शंभु कैसा होय; पूर्णाय; देशकालवस्तुपरिच्छेदरहित ऐसा; अस्तु, या संपूर्ण विशेषणेंकरून युक्त जो शंभु, त्याजकारणें माझा नमस्कार असो ॥ ५ ॥

ऐसें पंचश्लोकेंकरून नमनामिषें अनुभवामृत वर्णून आतां त्याचा विस्तार देशभाषेंकरून सूत्रप्राय ग्रंथ आठशें तीन ओवीनें वर्णितात. आतां अन्यग्रंथाचे ठायीं अनुबंध चतुष्टय असतात तैसे येथें नाहींत, कारण जे हा **अनुभवामृत** ग्रंथ परमसिद्धांतरूप आहे म्हणून. येथील अधिकारी, विषय, प्रयोजन, संबंध हें अनुबंधचतुष्टय तें ऐसें:– अपरोक्षब्रम्हसाक्षात्कारवान् जीवन्मुक्त जो तो या ग्रंथाचा अधिकारी होय, आणि अद्वितीय परमात्मा जो तो येथील विषय होय, आणि मूल अविद्यासहित ब्रम्हाविद्येची निवृत्ती जें तें येथें प्रयोजन होय, आणि श्रुतिशास्त्रांच्यानें केवल ब्रम्हवस्तु प्रतिपादिली जात नाहीं ऐसें सांगणें हाचि येथें संबंध होय. आतां श्रोते विचारतात जे " सर्व ग्रंथाचे ठायीं तत्पदार्थीचें वर्णन जें एक ब्रम्ह आणि मायोपाधि ईश्वर एक, ऐसें असतां तुवां तत्पदार्थीचा इतुका विस्तार कशावरून लिहिलासी? " श्रोत्यांसि विनंति जे, निरालंब उपनिषदाचे ठायीं ऐसें वर्णन आहे जे सर्वोपाधिविनिर्मुक्त तें शुद्ध ब्रम्ह, आणि अनेक शक्तींकरून युक्त जें तें शबल ब्रम्ह होय. आणि **श्रीमद्भगवद्गीतेचे** ठायीं शबल ब्रम्हाचे तीन भेद सांगितले आहेत ते ऐसें:– " उत्तमः पुरुषस्त्वन्यः परमात्मेत्युदाहृतः । " यावरील ज्ञानेश्वरीः– " तो गा उत्तम पुरुषु । जो तृतीय कां निष्कर्षु । दोहींहूनि आणिकु । मागील जो ॥ १ ॥ " हें परमात्मशिवाचें लक्षण होय. आतां प्रकृति पुरुषाचें लक्षण ऐसें:– " प्रकृतिं पुरुषंचैव विध्यनादी उभावपि. " यावरील ज्ञानेश्वरीः–

" तरि केवल जे सत्ता । तो पुरुष गा पांडुसुता । प्रकृति ते समस्ता । क्रियानामें । १ । ( अ० १३. )" हें प्रकृतिपुरुषांचें लक्षण. आतां माया आणि ईश्वराचें लक्षण तें ऐसें:– " ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति । भ्रामयन्सर्वभूतानि यंत्रारूढानि मायया ॥ १ ॥ ( अ० १८ )" यावरील ज्ञानेश्वरी:– " स्वमायेचें आडवस्त्र । लाऊनि एकला खेळे सूत्र । बाहेर नाटि छायाचित्र । चौऱ्यांसि लक्ष ॥ १ ॥ " हें ईश्वराचें आणि मायेचें लक्षण.

ऐसें श्रोत्यांनीं ऐकून आज्ञापिलें जे, तुवां हें वर्णिलें तें प्रमाण आहे. आतां मूळ ओव्यांचा अर्थ सांगावयासी आरंभ करी. तथास्तु म्हणोनि **निरंजन रघुनाथ** जो तो **अनुभवामृता**चा अर्थ सांगावयासी प्रवृत्त झाला :—

**ऐसीं जीं निरुपाधिकें । जगाचिं जियें जनकें ।**
**वंदिलीं मिया मूलिकें । देवोदेवी ॥ १ ॥**

ऐसीं म्हणजे तृतीयचतुर्थश्लोकेंकरून वर्णिलीं जे शिवशक्ति ते निरुपाधिक ब्रम्हस्वरूप हीं होत; आणि हिरण्यगर्भादि जगतांचीं जनकें म्हणजे मातापितरेंही होत; आणखी ते कैसीं, देवोदेवी म्हणजे नित्य द्योतमान आहेत; आणि संपूर्ण जगताचीं मूलिकें म्हणजे विवर्तउपादानत्वेंकरून कारणही होत. ऐसीं हे शिवशक्ति मी ज्ञानेश्वर जो येणें वंदिलीं, नमस्कारिलीं. अहो, शिव तो कोणता, आणि शक्ति ते कोणती? यासी उत्तर देतात,

**जो प्रियुचि प्राणेश्वरी । उलथे आवडीचिये सरोभरी ॥**
**चारुस्थळीं एकाहारी । एकांशाची ॥ २ ॥**

परमप्रिय आत्मा जो तोचि प्राणेश्वरी, चिच्छक्ति होय. आणि पूर्वीं जगताचा उपसंहार करून स्वस्वरूप केवल ब्रम्ह जें त्याचे ठायीं स्वरूपनिद्रा करिता झाला होता. ते स्वरूपनिद्रा विसर्जन करून परम आवडीनें आत्मा जो तो शक्तिचि सरोभरी म्हणजे शिवरूपत्वें बरोबरी करून उलथे, म्ह० पुनरपि जगत्कल्पना करावयासाठीं उफराटा होता झाला. आतां मूळचे पांचवे श्लोकीं वर्णिला जो पूर्ण शंभु तोचि शबल ब्रम्ह एक अंग होय. त्याचा प्रकार चतुर्धा वर्णितात; सकलशक्तींकरून युक्त ऐसें जे शबलब्रम्ह तें सर्वांचें एक अंग होय, त्या एकांगाची एकाहारी म्ह० एका पंक्ति जे चारु सुंदर चतुर्विध स्थळें अधिकरणें असतीं झालीं:– सकलशक्तीकरून युक्त चैतन्य जें शबलब्रम्ह तें एक अधिकरण होय, आणि शिव-

आपुले अंगिं संसारा । देखिलें चराचरा ॥
परि नेदितीची तिसरा । झोंक लागों ॥ ७ ॥

या प्रकृति-पुरुषांनीं चराचरात्मक संपूर्ण संसार आपुले अंगाचे ठायींच पाहिला; परंतु जग म्हणून या दोहोंहुनि वेगळें कांहीं आहे, ऐसा तिसरा झोंक लागूं दिल्हाचि नाहीं.

कैसा मेळु आला गोडिये । जे दोघें न माति जगिं इयें ॥
परमाणुमाजि हि उवायें । मांडिलीं आहाति ॥ ८ ॥

जे प्रकृतिपुरुष हे दोघेही ब्रम्हांडापेक्षां मोठे आहेत, म्हणून संपूर्णत्वें या जगताचे ठायीं मात ( मावत ) नाहींत. तथापि परमाणुमाजिहि उवायें मांडिलीं आहाति, परमाणु आंतही वोऊन, व्यापून स्थितितें पावलीं आहेत.

जिहीं एक एकेंविण । न कीजे तृणाचेंहि निर्माण ॥
जिये दोघें जीवप्राण । जयां दोघां ॥ ९ ॥

या प्रकृतिपुरुषांची प्रीति इतुकी आहे जे, एकमेकांवांचून तणाचेंहि निर्माण करित नाहींत; मग वरकडाचें निर्माण करणें एकमेकांवांचून कैसें घडेल ? आणि देहाचे ठायीं प्रकृति जे ती प्राणरूपा होउनि जीवदशेतें पावला जो पुरुष त्याचें रक्षण करिती. आणि पुरुष जो तो जीवपणें प्राणरूपा प्रकृतीचें जीवन करितो. ऐसीं हे प्रकृतिपुरुषें परस्परें रक्षणार्थ एकमेकांचे जीवप्राण होत.

जेयां एकसत्तेचें वसणें । दोघां एक प्रकाशाचें लेणें ॥
जे अनादि एकपणें । नांदति दोघें ॥ १० ॥

एक परमात्मसत्ता जे तेंचि आहे वसतें स्थान जें तें ज्यास, आणि परमात्मचिद्रूपता जे तेंचि आहे प्रकाशमान लेणें म्हणजे वस्त्रभूषणें जें तीं ज्यास, ऐसीं जे प्रकृतिपुरुषें या दोघांची एकपणेंकरून नांदणूक किती काळची आहे म्हटलें तरि अनादि म्ह० ज्यांचे नांदणुकीस आरंभाचि नाहीं ऐसीं हे बहुकाळचीं आहेत.

भेदें लाजोनि आवडी । एकरसीं देती बुडी ॥
तो भोगणें थावो काढी । द्वैताचा जेथें ॥ ११ ॥

आपण दोघें एक असतां स्थितिकाळीं स्थावरजंगमात्मक भेद दिसूं लागला म्हणोनी प्रकृतिपुरुष हे लज्जा पावले. मग सर्वांचा उपसंहार करून एकरस ब्रम्हाचे ठायीं मोठे आवडीनें बुडी देते झाले. ऐसा बहु काळ लोटला असतां जैसा पाणबुड्या सखोल उदकांतून थाव घेऊन येतो तैसा या प्रकृतिपुरुषांनीं जीवरूपें करून पूर्वील स्थितिकाळीं भोग भोगिले होते, ते भोगेच्छा जे ते, जेथें बुडी दिल्ही होती तेथून द्वैताचा थाव काढिती झाली. सारांश, पुनरपि सृष्टिचा उपक्रम करिते झाले हा भाव.

जेणें देवें संपूर्ण देवी । जियेवीण काइ ना तो गोसांवी ॥
किंबहुना एकोपजीवी । एकएकाची ॥ १२ ॥

परमपुरुष देव जो येणें, देवी प्रकृति जे, ती शोभती झाली; आणि प्रकृतिवांचून पुरुष जो त्यास गोसावित्व म्ह० सर्वस्वामित्व येत नाहीं. प्रकृतियोगेंचि पुरुषातें गोसावित्व येतें. किंबहुना आतां फार काय सांगावें, एकएकाचीं वेगळालीं वेगळालीं लक्षणें दिसतात, परंतु या प्रकृतिपुरुषांची एक अद्वितीय परमात्माचि उपजीविका आहे. सारांश परमात्मयोगें या उभयांचें वांचणें आहे.

घरवातें मोटकीं दोन्हें । जैं गोसावी सेजे रिघे ॥
तैं दंपत्यपणें जागे । स्वामी निजे ॥ १३ ॥

सृष्टिरूप गृहाचार करण्याविषयीं हे प्रकृतिपुरुषें दोन्हेंही मोठे कुशल आहेत. ईक्षणमात्रें संपूर्ण सृष्टि करण्याविषयीं गोसावी पुरुष जो तो कुशल आहेचि. परंतु तो पुरुष जेव्हां हृद्गुहेचे ठायीं अंतःकरण सेजेवरी रिघतो आणि निद्रिस्तासारखा स्वस्वरूप ब्रम्ह जें त्यातें विसरतो, तेव्हां हे प्रकृति जे ते दंपत्यपणें म्ह० जीव आणि बुद्धिरूपें स्त्रीपुरुषपणें व्यवहार करावयाविषयीं जागती.

दोहीं अंगाची आटणी । गिंवसित आहाति एकपणीं ।
जालीं भेदाचिया वाहणीं । अधाधी जियें ॥ १४ ॥

हे स्वरूपनिद्राकालीं केवलब्रम्हस्वरूपीं दोहीं अंगांची म्ह० प्रकृतिपुरुषपणाची आटणी जेव्हां करितात, तेव्हां एक अद्वितीय ब्रम्ह जें त्यातें गिंवसितात (हुडकून काढितात). आणि जगत्कल्पना करावयासि जेव्हां उठली, तेव्हां भेदाचिया वाहणीं म्ह० जगद्भेदाचे प्रवाहीं पडून ते प्रकृतिपुरुषें जे, तीं अर्ध अर्ध भागें होतीं झालीं.

विषयी एकमेकाचिं जियें । एकमेकाचि विषयें ॥
जियें दोघें सुखियें । जियां दोघां ॥ १५ ॥

जगत्स्थिति-कालाचे ठायीं, प्रकृति जे ती पंचविषयरूपा होउनि राहति. तिज-प्रत पुरुष जो तो जीवरूपेंकरून भोगतो. आणि प्रकृति जे ती बुद्धिरूप होऊनि अस्ति-भाति-प्रियत्वें पुरुषाचें स्वरूप आहे. त्यातें विषय करून आपण विषयी होती. ऐसीं हे प्रकृति-पुरुषें दोघें परस्परांच्या योगेंकरून सुखियें ( सुखी ) होतात. आतां प्रकृतिपुरुष हे दोन्ही मिळून एक शिवाचि आहे ऐसें वर्णितात,

स्त्री-पुरुष-नाम-भेदें । एकलें शिवपण नांदे ॥
जग सगळें अधाधे- । पणें जिहीं ॥ १६ ॥

ज्यांच्या अर्ध्या अर्ध्या भागाचें हें सगळें म्ह० संपूर्ण जगत् आहे, ऐसीं जीं स्त्री-पुरुषें याप्रकारें नामाचे भेद वर्ततात. ते काय म्हणाल, तरि एकला शिव परमात्माचि नांदत आहे, दुसरें कोणी नाहीं. असो, हें सप्तम प्रकरणीं विस्तारपूर्वक वर्णिजेलें जाईल. आतां प्रकृति पुरुष या दोघांपासून एक सृष्टि कैसी झाली, तें दृष्टांतेंकरून सांगतात.

दो दांडीं एक श्रुति । दो फुलीं एक द्रुती ॥
दो दिवीं दीप्ति । एकचि जेंवि ॥ १७ ॥

कानाच्या उभय दांड्या ज्या त्यांयोगें एक श्रुति म्ह० एकशब्द श्रवण होतो जैसा, तैसा अपंचीकृत भूतापासून आणि पंचीकृत भूतापासून एक शब्द विषय होता झाला. उभय फुलांच्या योगेंकरून द्रुति म्हणजे एक गंध जैसा तैसा अपंचीकृत भूतापासून आणि पंचीकृत भूतापासून एक गंधविषय होता झाला. उभय दीपांच्या योगेंकरून एक दीप्ति जेवीं तेंवि अपंचीकृत आणि पंचीकृत भूतापासून एक रूप-विषय होता झाला.

दो वोठीं एक गोठी । दो डोळां एक दीठि ॥
तेंवि दोघियें सृष्टि । समस्त हे ॥ १८ ॥

गोठी म्ह० गोष्टीसदृश हरिश्चंद्रादिकांचे इतिहास आहेत ज्याचे ठायीं ऐसा, जो वेद, त्यातें उच्चारावयासाठीं हिरण्यगर्भ आणि ब्रह्मदेव हेचि कोणी उभय ओठ यांनीं अनादि वेद जो त्यातें उच्चारिलें. आणि उभय डोळयांची दृष्टि जैसी एक

होय, तैसी समष्टीचे ठायीं पुरुष जो त्याची आणि व्यष्टीचे ठायीं द्रष्टा जो याची दृष्टि मिळोनि एक होय. तेंवि, त्याचि प्रकारें व्यष्टि-समष्टयात्मक संपूर्ण सृष्टि जे ते प्रकृतिपुरुषात्मक होय.

दाऊनि दोनपण । एकरसाचें आरोगण ॥
करिताहे मेहुण । अनादि जें ॥ १९ ॥

हे प्रकृतिपुरुषे उगेच दोनपण दावितात मात्र, परंतु जैसें मेहुण ( दंपत्य ) जें तें एका पंक्तीस बैसतें, तैसीं हे अनादि कालापासून एक-रस ब्रह्म जें त्यांचेंच आरोगण ह्म० सेवन करीत आले आहेत.

जे स्वामीचिये सत्ता- । वीण असों नेणे पतिव्रता ॥
जियेवीण सर्वकर्ता । कांहीं ना जो ॥ २० ॥

जैसें पतिव्रतेचें जीवन भर्त्याचे स्वाधीन असतें, तैसी हे प्रकृति परम पतिव्रता होय; पुरुषाचे पारमार्थिक सत्तेवांचून असूं जाणत नाहीं. आणि जैसा पंगु भर्ता स्त्रीचे स्वाधीन असतो, तैसा अपाणि-पाद पुरुष जो याजला सर्वकर्तृत्व प्रकृति-वांचूनि नाहीं.

जें कीं भाताराचे दिसणें । भातारुचि जियेचें असणें ॥
नेणीजति दोघेजणें । निवडों जीयें ॥ २१ ॥

प्रकृतीचा भ्रतार पुरुष जो त्यातें चर्मचक्षूनें पाहूं गेलें असतां पुरुषाचे ठायींचि नामरूपेंकरून प्रकृतीच दिसती, आणि विचारदृष्टीनें प्रकृतीचें असणें पाहूं गेलें असतां पुरुषाची परमार्थिक सत्ताचि सिद्ध होती. अस्तु, हे दोघेजणेंही वेगळालीं निवडितां येत नाहींत. आतां हे कैसीं निवडितां येत नाहींत हें दृष्टान्तेंकरून सांग-तात,

गोडी आणि गुळु । कापूर आणि परिमळु ॥
निवडितां होय पांगुळु । निवाडुचि ॥ २२ ॥

जैसी गोडी आणि गूळ निवडितां येत नाहींत, तैसी प्रकृति आणि पुरुष हे निवडितां येत नाहींत. आणखी कापुराचीं आणि परिमळाचीं स्वरूपें निवडितां येत नाहींत, त्या प्रकारें पुरुषाचें आणि परमात्म शिवाचें स्वरूप वेगळालें निवडितां येत नाहीं. आणि विचारेंकरून यांचा निवाडा करूं गेलें असता निवाडु ह्म० विचाराचि

पांगुल, गलित होतो. आतां परमात्म शिवाचा लाभ होण्याचा प्रकार सांगतात,

समग्र दीप्ति घेतां । जेंवि दीपुचि ये हातां ॥
तेंवि जे निर्धारितां । शिवुचि लाभे ॥ २३ ॥

संपूर्ण दीप्ति, प्रभा घेतली असतां जेंवि दीपचि हातास येतो, तेविं प्रकृति-माया-आदिकरून संपूर्ण जगद्रूपें चिच्छक्तिच प्रकाशित झाली आहे, ऐसें निर्धारिलें असतां शिव परमात्मा जो त्याचा लाभ होतो. कारण, जे शक्तिहि शिवचि झाला आहे ह्मणून. आतां परमात्मा, आणि शक्ति आणि पुरुष यांचें एकत्व सांगतात,

जैसी सूर्य मिरवी प्रभा । प्रभे सूर्यत्वाचा गाभा ॥
तेविं भेद-गिलित शोभा । एकचि जे ॥ २४ ॥

जैसा सूर्य जो तो आपले प्रभेतें मिरवितो, आणि त्या प्रभेचा गाभा जो तोहि सूर्यचि असतो. ऐसी त्रिप्रकारक व्यवस्था झाली तरी भेदरहित सूर्य जो तो एकचि होय. तेंवि परमात्मा शिव जो येणें धारणा केलेली जे चिच्छक्ति आणि तिच्या अंतःस्थिति पावला जो पुरुष, ऐसे हे तीन प्रकार आहेत ऐसें जरी वाटेल तरी भेदगिलित ह्म० भेदरहित शोभा एकचि आहे. आतां पुरुषाचें आणि ईश्वराचें एकत्व वर्णितात,

कां बिंब प्रतिबिंबा द्योतक । प्रतिबिंब बिंबा अनुमापक ॥
तैसें द्वैतमिषें एक । वर्तत असे ॥ २५ ॥

मायेच्या ठायीं प्रतिबिंबला जो ईश्वर त्यातें पुरुष जो तो द्योतक ह्म० प्रकाशक होय. आणि प्रतिबिंबरूप ईश्वर जो तो त्याचा अनुमापक ह्म० अनुमान करावयासि योग्य होय. अस्तु, पुरुष आणि ईश्वर हे द्वैताचें मिष मात्र होय, परंतु एक अद्वितीय परमात्माचि वर्तत असे. आतां शिवशक्तीचें कर्तृत्व काय तें वर्णितात,

सर्व शून्याचा निष्कर्षु । जिया बाइला केला पुरुषु ॥
जिये दादुलेनि सत्ताविशेषु । शक्तिचा जाला ॥ २६ ॥

सर्व जग ज्याचे ठायीं शून्य म्ह० नाहींसें होऊन निष्कर्ष म्ह० केवलत्वें अवशिष्ट राहणरा ऐसा जो परमात्मा, त्यातें जिया बाइला म्ह० ज्या शक्तीनें पुरुषपणातें आणिलें आणि शक्तिचा दादुला परमात्मा जो येणेंकरून शक्ति जे तीस सत्ता विशेष असता झाला, म्ह० प्रकृति-माया-आदिकरून संपूर्ण जगताचे आहेपणाचा व्यवहार असता झाला.

जिये प्राणेश्वरीवीण । शिवींही शिवपण ॥
थारों न शके ते आपण । शिवें घडली ॥ २७ ॥

जगत्प्राणसूत्रात्मा त्याची ईश्वरी म्ह० स्वामिणी चिच्छक्ति जे तिजवांचून स्वरूपनिद्राकालीं शिवपरमात्मा जो त्याचे ठायीं शिवपण जें तें थारों न शके, राहूं शकत नाहीं. ऐसी ही जे शक्ति ते स्वरूपनिद्रा-विसर्जनकाळीं शिव परमात्मा जो येणें घडिली म्ह० प्रकृतिरूपें उभारिली. आतां ते चिच्छक्ति जे, ती प्रकृतिरूपा होऊन काय काय करिती झाली तें वर्णितात,

ऐश्वर्येंसी ईश्वरा । जियेचें अंग संसारा ॥
आपलाही उभारा । आपणचि जे ॥ २८ ॥

ईश्वर जो त्याजला संसार उभारणी करावयास षड्गुणैश्वर्यसहित अवघें अंग प्रकृतीचेंचि होय. आणि प्रकृति जे ते मायारूपेंकरून आपलीही उभारणी आपणचि करिती.

पतिचेनि अरूपपणें । लाजोनि अंगाचें मिरवणें ॥
केलें जगाएव्हडें लेणें । नामरूपाचें ॥ २९ ॥

आपला पति जो त्यास हातपाय नाहींत, अरूप आहे, या हेतूस्तव प्रकृति जे ती लज्जा पावून ब्रम्हांडादि-तृणपर्यंत जगाएवढें नामरूपात्मक मिरवावयाजोगें आपुलें अंगाचें लेणें करून पुरुषातें शोभेप्रत आणिती झाली.

ऐक्याचेया दुकाला । बहुपणाचा सोहला ॥
जिया सदैवेचिया लीला । दाखविला ॥ ३० ॥

पुरुष जो तो स्वरूपनिद्राकालीं ऐक्यभावातें पावला होता. तेव्हां द्वैत सर्वथा नसणें हाचि कोणी एक दुष्काळ पडला होता. मग दैव-शालिनी हे प्रकृति जे, हिच्या लीलामात्रें करून बहुपणाचा सोहाळा दाखविजेला.

अंगाचिया आटणिया । कांतु उवाया आणिला जिया ॥
स्वसंकोचें प्रिया । रूढविली जेणें ॥ ३१ ॥

या प्रकृतीनें बोधप्रसंगीं आपले सर्वांगाची आटणी केली, म्हणजे आपण सर्वथैव नाहीं, आणि काय जो आहे तो अवघा पुरुषचि आहे ऐसा ज्ञानियाचे बुद्धिस

प्रत्यय आणून दिधला. आणि पुरुषसूक्ताचे ठायीं प्रतिरूपें करून प्रकृति वदली जे, अवघा पुरुषचि आहे म्हणून. ऐसा श्रुति-युक्ति-अनुभूतिनें पुरुष उवाया, उदयाप्रत आणिला. आतां तो परमात्मा शिव जो तो पुरुषरूपें होऊनि काय काय करिता झाला हें वर्णितात. पुरुष जो येणें अज्ञानी सांख्यमताभिमानी जे त्यांचे बुद्धीस आपला संकोच करून परमप्रिय प्रकृति जे तीच रूढविली, प्राधान्यत्वें करून अवघी प्रकृतीच आहे ऐसें प्रसिद्ध केलें.

जिये पाहावयाच्या लोभा । चढे द्रष्टृत्वाचिया क्षोभा ॥
जियेतें न देखत उभा । अंगचि सांडी ॥ ३२ ॥

जागृतावस्थेचे ठायीं हा पुरुष जो तो दृश्यरूपा प्रकृतीतें पाहावयाचे लोभास्तव द्रष्टृत्वाच्या क्षोभातें पावतो. आणि ब्रम्हानुभवप्रसंगीं दृश्यरूप प्रकृतीतें न देखतां एकाएकीं उभ्यानें अंगचि टाकल्यासारखें द्रष्टृत्वचि सांडतो.

कांतेचिया भिडा । अवगला होय दृश्याएव्हडा ॥
अंगविला उघडा । जीयेवीण ॥ ३३ ॥

**या ओंवीचा अन्वयः—** जीयेवीण अंगविला उघडा ( असतां ) कांतेचिया भिडा दृश्याएव्हडा अवगला होय. ज्या प्रकृतिवांचून हा पुरुष जो तो अंगविला उघडा होय, म्ह० निजांगब्रम्हस्वरूपत्वेंकरून देशकालवस्तुपरिच्छेदरहित उघडा आहे; परंतु निजकांता प्रकृति जे तिचे भिडेस्तव दृश्याएव्हडा अवगला होय, म्ह० गमला होय.

हा ठावोवरि मंदरूपें । जो उवायिलेपणें हारपे ॥
तो जाला एणें पडपें । विश्वरूप ॥ ३४ ॥

अन्वयः— मंदरूपें हा ठावोवरि जो उवायिलेपणें हारपे, तो एणें पडपें विश्वरूप जाला. हा ठावोवरि, एथपर्यंत या पुरुषाची गुप्तरूपता होय जे मंदरूपें ह्म० मंदरूप जिज्ञासु जो येणें पाहूं गेलें असतां उवाइलेपणें हारपे ह्म० सर्वरूपें उदयमान असतांही हारपतो, सांपडत नाहीं. ऐसा हा पुरुष दुर्विज्ञेय असतांही या प्रकृतीच्या पडपास्तव ह्म० भूषणास्तव पुरुषसूक्ताचे ठायीं वर्णिल्याचे परि विश्वरूप झाला. आतां शिव परमात्मा जो तो ज्ञानियाचे रूपेंकरून प्रकृतीला खाऊन जातो ऐसें वर्णितात,

जिया चेवविला शिवु । वेद्याचें बोनें बहु ॥
वाढितेनिसीं जेऊ । जेऊनि धाला ॥ ३५ ॥

शिव जो तो हृद्गुहेचे ठायीं निद्रिस्त झाला होता. त्याजला प्रकृति जे, ती वेद्याचें बोनें ह्म० दृश्याचे नैवेद्य बहु प्रकारें करून वाढीत होती. मग कोण्हे एके दिवशीं द्रष्टा जो त्यातें ब्रह्म-बोध करून जागे करूं गेली, तंव जेऊ ह्म० जेवणारा ज्ञानी जो तो वाढतेनिसीं, वाढणारी प्रकृति जे तिजसहित, संपूर्ण दृश्यातें जेऊनि धाला, खाऊन तृप्त झाला. आतां प्रकृतिपुरुषाची जागृति वर्णितात,

तेयां दोघांमाजि एखादें । विपायें उमजलें होय निदें ॥
तरि घरवात गिळोनि नुसधें । कांहीं ना करी ॥ ३६ ॥

या प्रकृतिपुरुषांतून एखादेंही विपायें ह्म० कदाचित् अनादि मोहरूप निद्रेंतून उमजले ऐसे होतात, तेव्हां घरवात ह्म० संपूर्ण दृश्यजात गृहाचार जो तो गिळून, नाहींसा करून, आपण नुसधे राहतात. ते कैसे ह्मटलें असतां, ज्ञानियाचे ठायीं निर्विकल्प समाधिप्रसंगीं बुद्धिरूपा प्रकृति जे ती संपूर्ण दृश्य नाहींसें करून आत्मयासी ऐक्य पावून आपण ज्ञप्तिरूपें राहती; आणि पुरुष जो तो द्रष्टृरूपेंकरून गुरुप्रसादें केवल ब्रह्म तें मी होय ऐसें अनुभवून, संपूर्ण जगत् कालत्रयीं नाहीं, एक अद्वितीय ब्रह्मचि आहे ऐसा निर्धार करितो. आतां हे प्रकृति व्यभिचारिणीसारखी होय ऐसें वर्णितात,

निदेलेनि भातारें । जे वियाली चराचरें ॥
जियेचा विसंवला नुरे । आपुलेपणाही ॥ ३७ ॥

या प्रकृतीचा भ्रतार परमपुरुष जो तो अविद्यादरीचे ठायीं एक जीवरूपेंकरून निजला असतां, हे प्रकृति जे ती मायारूपेंकरून चराचरातें वियाली, हें केवढें आश्चर्य पाहा? इचे ठायीं विसंवला ह्म० विसाव्याप्रत आलेला जो एक जीव त्यातें कळवून हें जगत् प्रसवली ह्मणावी तरी तो आपलेपणाही नुरे ह्म० आपण कोण आहों हें स्मरणही ज्यास उरलें नाहीं. आतां हा पुरुषही मोठा कपटी आहे ऐसें वर्णितात,

जंव कांतु लपूं बैसे । तंव नेणिजे जीच्या दोषें ।
जियें दोघें अनारिसे । जियां दोघां ॥ ३८ ॥

कांत ह्मणजे पुरुष जो तो जेव्हां लपूं बैसतो ह्म० सर्वांतर्यामी असतां नाहींच ऐसा होतो, तेव्हां रजस्वला माया जे इचे दोषभूत शद्वादि विषय जे त्यांचे संसक्तीस्तव जीव जे ते अंतर्यामी पुरुषातें जाणत नाहींत. अस्तु, हे प्रकृतिपुरुष दोन्हीही परस्परांतें अनारिसे ह्म० भिन्नस्वभाववान् आहेत, एक असज्जडरूप आणि एक सच्चिदानंदलक्षण ऐसे. आतां पुरुष जो तो प्रकृतीच्या स्वाधीनत्वें वर्ततो ऐसें वर्णितात,

जियेचेनि अंगलगें । आनंद आपणा आरोगूं लागे ।
सर्वभोक्ता परि नेघे । जियेवीण कांहीं ॥ ३९ ॥

पुरुष जो तो स्वयें आनंदरूप असतांहि याजला आनंद स्वयें घेतां येत नाहीं. बुद्धिरूपा प्रकृति जे तिच्यायोगें व्यष्टीचे ठायीं समाधिकालीं अथवा सुप्तिकालीं आपला आनंद आपण आरोगूं लागे, सेवन करूं लागतो. आणि ईश्वररूपें सर्वभोक्ता आहे परंतु व्यष्टीचे ठायीं अंतःकरण-इंद्रिय-वृत्तिरूपा प्रकृति जे तिजवांचून पुरुष जो तो कांहींएक ग्रहण करीत नाहीं. आतां परमात्मा शिव आणि शक्ति यांचें वर्णन करितात,

किंबहुना जियें । प्रणवाक्षरीं विरूढतियें ।
दशेचिं हे वैरियें । शिवशक्ति ॥ ४० ॥

किंबहूना, आतां काय सांगावें? परमात्मा शिव आणि शक्ति हे दोघेही स्वरूपनिद्राविसर्जन जाल्याचे नंतर आणि सृष्टि होण्याचे पूर्वींची जे प्रणवाक्षराची विरूढिदशा ह्म. भूमींतून कोमल तृणांकुर निघाल्याचे परी प्रणवाची स्फुरणदशा जे तिचे वैरी ह्म० नाश करणारे होत. आतां प्रकृतिपुरुषांचें वर्णन करितात,

जेया प्रियेचें जें अंग । जो प्रिय जियेतें चांग ।
कालवूनि दोन्ही भाग । जेवीत आहाती ॥ ४१ ॥

निराकार पुरुष जो त्याजला अंग ह्म० शरीर निजप्रिया प्रकृति जे तिचेंच आहे. आणि अष्टधा भेदरूपा साकार प्रकृति जे तिजला चांगुलपणा परमप्रिय पुरुष जो त्याचाचि होय. ऐसे साकार निराकार दोन्ही भाग कालवून जेवीत आहेत, ह्म० परस्परें व्यवहार-सुखातें भोगितात. आतां पुरुषासहित प्रकृति आणि परमात्मशिवासहित शक्ति होय ऐसें वर्णितात,

जैसी समीरासगट गति । कीं सोनयासगट कांति ॥
तैसी शिवेंसी शक्ती । अवधीच जे ॥ ४२ ॥

जैसा वायु जो, त्यासगट त्याची गति असे, तैसी पुरुष जो त्यासहित त्याची प्रकृति होय. किंवा सुवर्णासहित कांति जैसी, तैसी परमात्मा शिवासहित अवघी आदिशक्ति होय. आतां प्रकृतिसहित पुरुष आणि शक्तिसहित परमात्मा शिव ऐसें वर्णितात,

कां कस्तुरीसगट परिमळु । उष्णतेसहित अनळु ॥
तैसा शक्तिसी केवळु । शिवचि जो ॥ ४३ ॥

जैसा उष्णतेसहित अनळु म्ह० अग्नि असे, तैसा प्रकृतिसहित पुरुष होय. किंवा कस्तुरीसकट जैसा परिमळ असे तैसा परमात्मा शिव जो तों केवळ म्ह० नुसधी शक्ति तिंजसहित होय. आतां प्रकृतिपुरुष हे दोघेंही परमात्मस्वरूपीं गेली असतां मृषा होतात ऐसें वर्णितात,

राति आणि दिवो । पातलिया सूर्यठावो ॥
तैसीं आपुले साचि वावो । दोन्हीं जियें ॥ ४४ ॥

रात्री आणि दिवस हे सूर्याचे स्थानीं गेलीं असतां दोन्हीही वाव ह्म० मृषा होतात. तैसीं हे प्रकृतिपुरुष दोन्हीही आपलें सत्यस्वरूप परमात्मशिव जो त्याचे ठायीं गेलीं असतां वाव, मृषा होतात. आतां श्रीज्ञानेश्वर शिवशक्तीतें नमन करितात.

हें असो, नामरूपाचा भेसिरा । गिळित एकार्थाचा उजिरा ॥
नमो तया शिववोहरा । ज्ञानदेवो म्हणे ॥ ४५ ॥

आतां हें असो ह्म० हें क्रीडावर्णन पुरे. ज्या शिवशक्तिच्या एकार्थाचा उजिरा ह्म० सत्यस्वरूप ब्रम्हाचा प्रबोध झाला असतां या संपूर्ण नामरूपाचा भेसिरा, भेसळ झालेली खिचडी जे ते ज्ञानी जो येणें गिळिली जाती ह्म० जगतचि नाहीं, ऐसें केलें जातें, त्या शिवशक्तिवोहरा, मंगलप्रद नवरानवरीतें मी ज्ञानेश्वर जो तो सर्व प्रकारें नमन करितों. अहो, तुम्ही शिवशक्तीतें नमन करितात आणि त्याचें शुद्ध स्वरूप ब्रम्ह जें त्यातें नमन कां करीत नाहींत? यासि उत्तर,

जेयाचे आलिंगनीं । विरोनि गेलीं दोन्हीं ॥
अवघियाचि रजनी । दिठीचि जे ॥ ४६ ॥

अवघियाचे दिठीचि रजनी म्ह० परमात्मा आणि पुरुष आणि ईश्वर या संपूर्णांचे दृष्टीचें विलयस्थान ऐसें जें केवळ भूमा अनंत स्वरूप ब्रह्म जें त्याचें आलिंगन करावयासि गेलीं जंव शिवशक्ति तंव दोन्हीहि विरोनि गेलीं म्ह० वेगळेंपणें राहिलीं नाहींत; मग तेथें नमन करणें तें कैचें ? अहो, ब्रह्मस्वरूपाचें स्तवन तरि घडेल कीं ? यासि उत्तर,

जेयाच्या रूप-निर्धारिं । गिळित परेसी वैखरी ।
सिंधूसीं प्रलयनीरीं । गंगा जैसी ॥ ४७ ॥

ज्या स्वरूपाचा निर्धार करूं गेलें असतां स्मरणरूपा परा-वाणीसहित शब्द-रूपा वैखरी जे ते गिळिली जाती, नाहींसी होती. मग स्तवन कैसें घडेल? आतां त्या पूर्णस्वरूपीं चिच्छक्ति जे ते कैसी लयातें पावती तें वर्णितात; प्रलयनीर क्षोभातें पावलें असतां जैसी गंगा जे ते सिंधूसहित विलयातें पावती, तैसी ब्रह्म-स्वरूपाचे ठायीं शक्ति जे ती परमात्म शिवासहित विलयातें पावती. आतां त्या पूर्णस्वरूपीं पुरुष आणि परमात्मा शिव हे उभयही लयातें पावतात ऐसें वर्णितात,

कीं वायो चळवळेंसी । जिराला व्योमाचे कुसीं ।
किं आटला प्रलयप्रकाशीं । सप्रभ भानू ॥ ४८ ॥

किंवा आपले चळवळेसहित वायु जो तो व्योमाचे कुशींत जिरतो; तैसा आपले प्रकृतीसहित पुरुष जो तो चिद्व्योम ब्रह्म जें त्याचे ठायीं विलीन होतो. किंवा प्रलयप्रकाशाचे ठायीं आपले प्रभेसहित भानु जैसा जिरेल, तैसा ब्रह्माचे ठायीं आपले चिच्छक्तिसहित परमात्मा शिव जो तो विलीन होतो.

तेविं निहालितां जेयातें । गेलें पाहणेंसी पाहातें ।
पुडुतीं तियें घरवातें । वंदिलीं मियां ॥ ४९ ॥

तेंवि, त्या परमात्मियाचे प्रकारें मी ज्ञानेश्वर जो येणें जया ब्रह्मवस्तूतें ज्ञान-दृष्टीनें निहाळिलें, तेव्हां पाहण्यासहित पाहतें विलया गेलें. पुढतीं जैसा परमात्मा शिव स्वरूपनिद्रा विसर्जन झाल्यानंतर प्रकृतिपुरुषपणातें भजतो, तैसी प्रकृतिपुरुष-रूपेंकरून घरवातें म्ह० गृहाचार करणारी जे शिवशक्ति ते मियां वंदिली. अहो, तुह्मी ब्रह्मवस्तूतें निहाळिलें ह्मणतां, तेव्हां तेथें वेद्यवेदकत्व झालें असे कीं? यासी उत्तर,

जेयाचिये आवाहनीं । वेदक-वेद्याचे पाणी ॥
न पिये परि सांडणी । अंगाचीच करी ॥ ५० ॥

ज्या ब्रह्मवस्तूंचे आवाहन-वंदन-प्रसंगीं वेदक, ब्रह्मवेत्ता जो तो वेद्याचें पाणी न पिये, ब्रह्मवस्तूतें दृश्यासारखें वेद्य करीत नाहींच, परंतु निजांगाची ह्म. द्रष्टेपणाचीच सांडणी करितो. मग तेथें वेद्यवेदकत्व कैसें घडणार? अहो, तुह्मी शबल ब्रम्हस्वरूपातें नमन कां करीत नाहींत? यासी उत्तर,

तेथें मी नमस्कारा- । लागी उरूं जैं दुसरा ॥
तैं लिंग-भेदी परा । जोडूं जावें ॥ ५१ ॥

जें परमात्मशिवाचें अभेदलिंग तेथें ज्या शबलब्रह्मस्वरूपीं नमन करावयालागीं मी दुसरा जरी उरूं, तरी मी या शिवाचें आत्मलिंगभेदी होऊन ह्म. ब्रह्माचा भेद-कर्ता होउन परा, परतून जोडूं जावें (ऐसें होईल). याकरितां शबल ब्रह्मीं नमस्कार करावयासी द्वितीयत्वें उरूं नये हा भाव. अहो परमात्म शिवातें तुह्मी नमन करितां, तें तरी वेगळेपणें नमन होईल कीं? यासि उत्तर,

परि सोनेंनसी दुजें । न होतु लेणें सोनया भजे ॥
हें नमन करणें माझें । तैसें आहे ॥ ५२ ॥

मी या परमात्म शिवातें नमन केलें, परंतु जसें लेणें अधिष्ठानत्वेंकरून सुवर्णातें भजतें, तैसें अधिष्ठान-विवर्तत्वें करून परमात्मयातें माझें नमन करणें आहे. अहो; परमात्मशिवाचे ठायीं नानाविध भेद आहे कीं? यासि उत्तर सप्त दृष्टान्तेंकरून सांगतात,

सिंधु आणि गंगे मिळणी । स्त्रीपुरुषनावांचि मिरवणी ॥
दिसे तरी काइ पाणी । द्वैत होईल ? ॥ ५३ ॥

स्त्री-पुरुषनामें करून मिरवणारी सिंधू आणि गंगा, त्यांतील गंगा जे ती समुद्राप्रत जाऊन मिळाली ऐसें दिसलें तरी पाण्याचे ठायीं द्वैत होईल काय? द्वैत होणार नाहीं हा भाव.

सांगतां वाचेतें वाचा । ठावो वाच्य-वाचकाचा ॥
पढतां काइ भेदाचा । विटाळु होय ॥ ५४ ॥

कोण्ही एकाची वाचा जे ते आपलें चांगलेपण सांगती झाली, तरी वाच्य-वाचकाचा भेद झाला नाहीं. तैसी परमात्मवाणी वेद जो त्यातें वाचक ब्रह्म जो तो पढला, पठण करिता झाला. जे वाच्यरूप जगताचा आणि आपला ठाव, अधिष्ठान परमात्माचि होय. असो, ऐसें झालें तरी भेदाचा विटाळ होतो काय? भेदाचा स्पर्शही होत नाहीं.

पाहे पां भास्य-भासकता । आपुले ठायीं दावितां ॥
एकपणें काइ सविता । मोडतु असे? ॥ ५५ ॥

सविता सूर्य जो तो आपले ठायीं भास्य-भासकत्व दाखवीत असतां त्याचें एकपण मोडत असे काय? एकपण मोडत नाहीं जैसें, तैसा जगत्प्रसविता परमात्मा जो तो भास्यरूपा माया आणि भासकरूप ईश्वर झाला, तरी त्या परमात्मयाचें एकपण मोडत असे काय? एकपण मोडत नाहीं.

मात्रांचिया त्रिपुटिया । प्रणवु केला चिरटिया ॥
किं णकारु तीं रेघटया । भेदवला ॥ ५६ ॥

अकार, उकार, मकार, या मात्रांचे त्रिपुटीनें परमात्मरूप जो प्रणव तो चिरटिया ह्म० चिंध्या केला काय? चिंध्या केला नाहीं, प्रणव एकचि आहे. किंवा तीन रेघांच्या योगें एक 'ण' कार भेदवला काय? भेदातें पावला नाहीं जैसा, तैसा अविद्या, आवरण, विक्षेप, या तीन शक्ति आहेत ज्याच्या, असा जो समष्टि एक जीव तो शक्तित्रयाच्या योगें भेदातें पावला काय? भेदातें पावला नाहीं. आतां परमात्मा जो तोचि प्रतिव्यष्टीचे ठायीं दृष्ट्रा-दृष्टिरूपें स्थितीतें पावला हें सांगतात,

चांदाचिये दोंदावरि । होत चांदणेयाचि विखुरी ॥
कां येऊनि दीप्तीवरि । गिंवसे दीपु ॥ ५७ ॥

चंद्राचे दोंदावर, अंगावर, चांदणें विखुरलें जातें काय? चांदणें बाहेरून येऊन विखरलें नाहीं. तैसा द्रष्टा जो त्याचे ठायीं ज्ञानदृष्टि जे ते बाहेरून आली नाहीं. द्रष्टा आणि दृष्टि एकचि आहे. कां दीप जो त्यातें दीप्तीनें बाहेरून येऊन गिंवसिलें, व्यापिलें, काय? व्यापिलें नाहीं. तैसा प्रमाता जीव जो त्यातें बुद्धीनें बाहेरून येऊन व्यापिलें नाहीं. जीव आणि बुद्धि या उभयांचें स्वरूप एकचि होय. अहो, परमात्म शिवाचे ठायीं शक्तीचा स्वीकार करणें कशास पाहिजे? यासी उत्तर,

मोतियाची कील । होय मोतियावरी पांगुल
आगले ते निर्मल । रूपा येकिं ॥ ५८ ॥

जैसी मौक्तिकाची कीळ ह्मणजें कांति जे ती मोतियावरी पांगुळ ह्म० स्थिति पावली ऐसें होय, तरि ते निर्मल आगलेपणें रूपांसि येतें कीं; तैसी मुक्तस्वरूप परमात्मयाची शक्ति परमात्मयाचे ठायीं स्थिति पावली ऐसी होयं. तरी ते निर्मळ परमात्मस्वरूप आगले ह्मणजे विशेषत्वें करून नामरूपत्वास येत असे कीं. अहो, संपूर्ण जगदाकार परमात्माचि झाला ह्मणतां, तेव्हां त्यातें विकारित्व येईल कीं? यासि उत्तर,

अहो ऐक्याचें मुद्दल न ढले । आणि साजिरेपणाचा लाभु मिले ।
तरी स्वतरंगांचि मुकुलें । तुरंबु कां पाणी ॥ ५९ ॥

अहो, पाणी जें त्याचें ऐक्याचें मुद्दल तरि ढळत नाहीं, आणि साजिरे-पणाचा लाभ मिळतो; तरी पाणी जें तें स्वतरंगांचि मुकुलें म्ह० कमळांचे तुरे स्वमस्तकीं तुरंबीना कां, खोवीना कां? तैसा शिव परमात्मा जो त्याचें मूळचें ब्रह्मैक्य तरि ढळत नाहीं, आणि साजिरेपणाचा लाभ मिळतो; तरी मग विवर्तरूप जगताचे तुरे स्वमस्तकीं शोभवीना कां? काय हानी आहे?

ह्मणोनी भूतेश भवानी । वंद्यत्वें न करोनि सिनानीं ।
मी रिघालों नमनीं । तें हें ऐसें ॥ ६० ॥

ऐसा आत्मविलास परमात्मियानें केला असतां ब्रह्मस्वरूपत्वाची हानी होत नाहीं: तैसीच ज्ञानीयाचे ब्रह्मरूपतेची हानी होत नाहीं. म्हणोनि भूतेश-भवानी हे वंद्यत्वें सिनानीं ह्म० वेगळालीं न करोनि, एक परमात्मरूपत्वें नमन करावयासी मी रिघालों, तें ऐसें.

जैसें दर्पणाचेनि त्यागें । प्रतिबिंब बिंबीं रिघे ॥
कां बुडी देईजे तरंगें । वायुच्या ठेल्या ॥ ६१ ॥

जैसें दर्पणत्यागें करून मुखाचें प्रतिबिंब जें तें बिंबरूप मुखाचे ठायीं रिघतें, तैसा चिदाभास जो तो अंत:करणत्यागें द्रष्ट्याचे ठायीं रिघता झाला. किंवा वायुच्या ठेल्या, निश्चलत्वें, तरंग जो तो उदकांत बुडी देतो, तैसा द्रष्टा जो तो स्वदृष्टीचे निश्चलत्वेंकरून ब्रह्मीं बुडी देता झाला.

नातरिं निद जातखेंवो । पावे आपला आपण ठावो ।
तैसीं बुद्धित्यागें देवी-देवो । वंदिलीं मियां ॥ ६२ ॥

अथवा जैसा कोण्ही एक निद्रा जातेक्षणींच आपला पूर्वठिकाणा जो त्यातें आपण पावतो; तैसा अविद्या जातेक्षणींच मीं आपलें पूर्वसिद्ध ब्रह्मरूप जें त्यातें पावलों. तैसें, त्याचि प्रकारें, जीव आणि शिव यांविषयीं भेदबुद्धि होती, तिच्या त्यागें करून मी ज्ञानेश्वर जो येणें देवी, चिच्छक्ति आणि नित्य द्योतमान देव परमात्मा हे वंदिलीं ह्म० नमस्कारिलीं. अहो, या शिवशक्तींच्या नमनेंकरून तुह्मांस काय प्राप्त झालें ? यासि उत्तर,

सांडूनि मीठपणाचा लोभू । मिठें सिंधूचा घेतला लाभु ॥
तैसा अहं देऊनि मी शंभु । शांभवी झालों ॥ ६३ ॥

मीठ जें तेणें मीठपणाचा म्ह० खडेपणाचा लोभ सांडुनी सिंधूचा लाभ घेतला, सैंधव सिंधुरूप झालें. तैसा मी परमात्मरूप असतां अहंकारयोगें भिन्न ऐसा वाटलों होतों, तो अहंकार परमात्मस्वरूपीं समर्पण करून शंभुशांभवीरूप झालों; ऐसा चित्सिंधूचा लाभ घेतला. ऐसें हें विधिमुख नमन सांगिजेलें; आतां निषेधमुखेंकरून नमनाचा प्रकार सांगतात,

शिवशक्तिसमावेशें । मियां नमन केलें ऐसें ।
रंभागर्भ आकाशें । रिगाला जैसा ॥ ६४ ॥

शिवशक्तिसमावेशें म्ह० शिवशक्तियुक्त होउनि म्या ऐसें नमन केलें. जैसा केळीचे पोटांतील गर्भगत आकाश जो तो रंभा म्ह० केळी जे ती विदारण झाल्यावरी महदाकाशीं मिळतो, तैसी चिच्छक्ति, प्रकृति, माया, आदिकरून आहेत सोंपटें जे तीं जिचीं, ऐसी जे आदिशक्ति रंभा तिचा अंतर्गर्भ प्रत्यगात्मा जो तो विवेकें शक्तीचें विदारण करून चिदाकाशब्रह्मीं मिळता झाला. जेथें संपूर्ण शक्ति सरतात त्या ब्रह्माची प्राप्ती जे ते गुरुप्रसादें होती ह्मणोनी आतां द्वितीय प्रकरणेंकरून श्रीगुरुतें नमन करितात.

इतिश्री अनुभवामृते प्रकृतिपुरुषवर्णनं नाम प्रथमप्रकरणम् ॥

———o———

ऐसें हें प्रथम प्रकरण । जैसें जांबूनद सुवर्ण ।
ज्ञानी श्रोतयांचे कर्ण । धारण करोत सर्वदा ॥ १ ॥

ग्रंथराज हें अनुभवामृत । विबुध श्रोते जीवन्मुक्त ।
सेवन करूनि होवोत तृप्त । ज्ञानेश्वरप्रसादें ॥ २ ॥

रघुवीर अद्वैत सच्चिदानंद । त्या चरणकमळींचा मकरंद ।
सेवोनी निरंजन हा मिलिंद । गुंजारव करितसे ॥ ३ ॥

अनुभवामृतपदबोधिनी । निरंजनाची साबडी वाणी ।
श्रीरघुवीरप्रसादेंकरूनि । ज्ञानेश्वरपदीं अर्पिली ॥ ४ ॥

श्रीगुरुदत्तात्रेयायर्पणमस्तु ॥

# अनुभवामृत—पद—बोधिनी.

## प्रकरण २ रें.

श्रीज्ञानेश्वरायनमः । श्रीदत्तात्रेयाय नमः । श्रीरघुवीरचरणारविंद-परागसेवन-भ्रमरीभूत, श्रीदत्तात्रेयलब्धप्रसाद, श्रीज्ञानेश्वरप्रेरित निरंजनाख्य जो तो जीवन्मुक्त श्रोत्यांप्रत प्रार्थितो जे, श्रवण करावें. श्रीज्ञानोबा यांणीं प्रथम प्रकरणीं द्वय श्लोकें-करून नमन केलें, तेंचि येथें विस्तारपूर्वक ओव्या करून वर्णितात, आतां श्रीगुरूंचें स्वरूप त्रिप्रकारक होयः—एक शुद्धब्रम्हस्वरूप, एक परमात्मस्वरूप, एक उपदेशकर्ता श्रीनिवृत्ति; ऐशा त्रिविध स्वरूपें करून एक गुरुचि होय. आतां जेथें जैसें वर्णन करितील तेथें श्रोत्यांनीं त्रिविध गुरूचेंचि रूप जाणावें.

आतां उपाय-वन-वसंतु । जो आज्ञेचा अहेवतंतु ।
अमूर्तुचि मूर्तु । कारुण्याचा ॥ १ ॥

अथ शद्ब जो तो मंगलवाचक आणि अनंतरवाचक होय, म्हणोनिया अथ शद्बाचा अर्थ आतां ऐसा बोलिजेला. आतां या शद्बें श्रीगुरूतें नमस्कार करून प्रथम प्रकरणानंतर द्वितीय प्रकरण आरंभितों ऐसें सुचविलें. उपायवनवसंतु; श्रवण, मनन, निदिध्यास आणि कर्म, उपासना, ज्ञान हे मोक्षास मुख्य आणि अमुख्य उपाय होत. आणखीही योगादिक उपाय बहुत आहेत. अस्तु, अनेक साधनरूप उपाय हेचि कोण्ही एक वन होय; या वनाचा माळी साधन-चतुष्टय-संपन्न अधिकारी प्रमाता

जीव जो तो जन्म-जन्मांतरीं अभ्यासाचें पाणी घालून उपायवनाची वृद्धि करिता झाला; परंतु मोक्षरूप फल प्राप्त न झालें; कारण जे, सद्गुरुवसंतकाल प्राप्त झाला नाहीं. ज्या वेळेस हरिप्रसादें दैवगत्या सद्गुरुवसंतकाल प्राप्त होतो, त्यावेळेस साधकास मोक्षरूप फल प्राप्त होतें, अन्यथा प्राप्त होत नाहीं. म्हणोनि उपायवनाचा वसंत हा सद्गुरु होय. जो आज्ञेचा अहेवतंतु, मनुष्यमात्रातें वर्णाश्रमादि व्यवस्थारूप प्रवृति आणि श्रवणमननादिरूप निवृत्ति सांगणारी अशी जे वेदरूपा आज्ञा तिचा भर्ता, स्वामी परमात्मा हे गुरूची द्वितीय मूर्ति होय. आणखी श्रीगुरु कैसा; अमूर्तोचि, जें कधींही मूर्त झालें नाहीं असें जें केवल ब्रह्म तें श्रीगुरूचें वास्तविक स्वरूप होय. मूर्तु कारुण्याचा, श्रीगुरु अमूर्त ह्म. निराकार असतां स्वशरणागत जिज्ञासूचे प्रार्थनेस्तव करुणामूर्तित्व-प्रतीयमान होतो. वस्तुतः गुरु अमूर्तचि, ब्रह्मरूपचि आहे. आतां श्रीगुरूची अघटित करणी होय ऐसें वर्णितात,

मोडोनि मायाकुंजरु । मुक्तमोतियांचा वोगरु ॥
जेवविता श्रीगुरु । निवृत्ति वंदूं ॥ २ ॥

माया तल्लक्षण हाचि कोण्ही एक भयंकर कुंजर होय. त्यातें मोडोनि, नाशातें पाववून, तदंतर मुक्ति जे तोचि कोण्ही एक वोगर ह्म० ओदन (भात) जो, त्यातें मुमुक्षुकरवीं जेवविणारा ऐसा श्रीगुरु जो निवृत्ति त्यातें वंदूं. आतां श्रीगुरु संकटांतून काढणारा ऐसें वर्णितात,

अविद्येच आटवे । भुंजीत जीवपणाचे भंवे ॥
तेया चैतन्याचिये धावे । धावेकरु जो ॥ ३ ॥

अविद्या हेचि कोण्ही एक आटवी, भयंकर झाडी, तिचे ठायीं जीवपणेंकरून भंवे ह्म० जन्ममरणाचें परिभ्रमण भुंजीत, भोगीत होतें जें चैतन्य त्याचे धावण्यास धाउनी निजस्वरूपीं मेळविणारा हा श्रीगुरु होय.

जेयाचेनि अपांगपातें । बंधु मोक्षपणियातें ॥
भेटे, जाणतेया जाणतें । जेयापाशीं ॥ ४ ॥

ज्या गुरूच्या अपांगपातें, कृपादृष्टीकरून, संसार बंध जो तो मोक्षपणियातें, मोक्षरूपत्वातें पावतो. जेयापाशीं, ज्याच्या समागमेंकरून जागतेया, अवस्थात्रयातें

जाणणारा जो द्रष्टा त्याकारणें जाणतें म्ह० संपूर्णातें एकसमयावच्छेदें जाणणारें जें परमात्मचैतन्य तें भेदतें, ऐक्यभावातें पावतें. आतां श्रीगुरु जो तो उदारचक्रवर्ती होय ऐसें वर्णितात,

कैवल्यकनकाचेया दाना । न कडसी थोर साना ॥
द्रष्टेयाचेया दर्शना । पाढाउ जो ॥ ५ ॥

कैवल्य, मोक्ष, तल्लक्षण हेंचि कोण्ही एक सुवर्ण त्याचें दान करण्याविषयीं साधनचतुष्टयसंपन्न अथवा अनधिकारी आहे, हे कडसणी म्ह० शोध करीत नाहीं. जो शरण येईल त्यास श्रीगुरु मोक्ष देतो. कारण जे, गुरु जो तो परमात्मा होय, तो जें करील तें होईल म्हणून. आतां श्रीगुरू जो तो शून्यरूपा माया जे तिचा पार दाखविणारा होय ऐसें वर्णितात, जैसे बद्रीनारायणाचे दर्शनास पहाडी लोक जे ते यात्रेकरास शिंक्यांत बसवून दुर्लंघ्य दरीपार करून देतात तैसें स्वशरण ब्रम्हाजिज्ञासु जे त्यांस शून्यरूपा माया हेचि कोण्ही एक सखोल दरी, तिजमध्यें न पडूं देतां शक्तिपातसामर्थ्यप्रभावें द्रष्टा जो त्याचें वास्तविक स्वरूप निर्विशेष ब्रम्ह जें त्याचें चरम वृत्तीनें दर्शन करून देतो, म्हणून हा गुरु जो तो पाढाऊ होय, अलाग ब्रम्हीं पावविण्याविषयीं तेथील माहितगार होय. आतां श्रीगुरूचें सामर्थ्य मोठें होय ऐसें वर्णितात,

सामर्थ्याचेनि बिकें । शिवाचेंही गुरुत्व जिंकें ।
आत्मा आत्मसुख देखे । आरसा जियें ॥ ६ ॥

ज्या सद्गुरूच्या सामर्थ्याचे बिकें, पुष्टीकरून शिष्य जो तो परमात्मा शिव जो त्याचेंही गुरुत्व, श्रेष्ठत्व जिंकतो; म्हणजे शिव परमात्मा जो त्याचे शबल रूपाचा अतिक्रम करून शुद्धब्रम्ह स्वरूपीं पावतो. आतां श्रीगुरूचें स्वरूप निर्मल आरशासारिखें होय ऐसें वर्णितात. जैसें दर्पणातें पाहिलें असतां पुरुष जो तो आपले ग्रीवास्थ मुखातें पाहतो; तैसें गुरूचें स्वरूप निर्मल ब्रम्ह जें त्यातें पाहिलें असतां द्रष्टा जो तो आपलें मुख, स्वरूप पाहतो, म्ह० स्वत्वेंकरून अनुभवितो; कारण जे, गुरूचें आणि शिष्याचें स्वरूप एकचि आहे म्हणून. आतां श्रीगुरुकृपेचें वर्णन करितात,

बोधचंद्राचिया कला । विखुरलिया एकवला ॥
कृपापुनीव-लीला । करी जेयाची ॥ ७ ॥

ज्याची कृपा तल्लक्षण पूर्णिमा जे ते लीलामात्रें बोधचंद्र जो त्याच्या कला म्ह० नानाविध विषयाकार वृत्ति ज्या त्या विखुरल्या होत्या, त्यांस एककला म्ह० एकच योगादिक साधनावांचून करिती; ऐसा हा गुरुकृपेचा महिमा होय. आतां श्रीगुरुचे भेटीचा महिमा वर्णितात,

जो भेटलियासर्वे । पुरती उपायांचे धावे ॥
प्रवृत्ति-गंगा स्थिरावे । सागरीं जिये ॥ ८ ॥

जो भूमास्वरूप गुरु भेटला असतां, अपरोक्षत्वेंकरून अनुभविला असतां, मोक्ष-विषयीं श्रवणमननादिक नाना उपायांचे धावे पुरती, यत्न सरतात; कां जे, शिष्य जो तो मोक्षरूप आपणाचि होतो म्हणून. आणखी प्रवृत्ति म्ह० प्राक्प्रवणवृत्ति हेचि कोण्ही एक गंगा जे ती आनंदसिंधु अपारावार गुरु तल्लक्षण सागर जो त्याचे ठायीं स्थिरावे, विलयातें पावते.

जेयाचेया अनवसरें । द्रष्टा ले दृश्याचे मोहरे ॥
जो भेटतखेंवो सरे । बहुरूप हें ॥ ९ ॥

ज्या गुरूच्या अनवसरें, अदर्शनास्तव ऐसें घडतें. जैसा बहुरूपी जो तो अनेक पक्ष्यांचे परांचा टोप करून, आपले अंगावर घेऊन विचित्र पक्षिरूप दिसतो; तैसा द्रष्टा जो तो दृश्याचे मोहरे म्ह० पंचभूतांची खोळ हा देह जो त्यातें लेऊन, धारण करून, आपणातें देहत्वें मानितो. त्यातें ब्रम्हरूप गुरु भेटतखेंवो, भेटते क्षणींच हें बहुरूप म्ह० दृश्य-दर्शन-द्रष्टा हे त्रिपुटी सरती, निःशेष नाहींसी होती. आतां गुरु-प्रसादाचा महिमा वर्णितात,

अविद्येचें कालवखें । स्वबोधसुदिनें फांके ॥
सिवतलेंनि प्रसादार्कें । जेयाचेया ॥ १० ॥

श्रीगुरुचा प्रसाद हाच कोण्ही एक अर्क, सूर्य, त्यायोगें स्वशरण जे त्यांस बोध हाचि कोण्ही एक सुदिन प्राप्त होऊन अविद्येचें कालवखें, निबिड तम अज्ञान तें फांके, नाहींसें होतें. आतां श्रीगुरुची कृपा हेंचि कोण्ही एक सलिल ऐसें वर्णितात,

जेयाचेनि कृपासलिलें । जीवु हा ठावोवरि पाखाले ॥
जे शिवपणही वोवलें । अंगीं न लावी ॥ ११ ॥

ज्या गुरूची कृपा हेचि कोण्ही एक सलिल, स्वच्छ उदक होय; त्यायोगें जीव जो तो हा ठावोवरि, येथपर्यंत पाखाळे म्ह० मूळ अविद्यासहित पिण्डब्रम्हांडरूप मळ जाऊन धुतला जातो, केवलब्रम्हरूप होतो. तेव्हां त्यातें शिवपण म्ह० शबल-ब्रम्हशक्तिसहित परमात्मशिवपदवी जे तेहि वोवळी वाटून तें शिवपण अंगीं लावीत नाहीं. म्हणजे तें शबल ब्रह्म जें तें मी होय ऐसें मानीत नाहीं. कां जे, अखिल उपाधिविनिर्मुक्त शुद्ध शांत पूर्वसिद्ध आपली ब्रह्मरूपता अनुभविली आहे ह्मणून. अहो, गुरु जो तो शिष्यातें बोध करून, शिवपण मात्र वोंवळें वाटवून आपलें गुरुत्व ठेवीत असेल कीं? यासि उत्तर;

राखों जातां शिष्यातें। गुरुपण धाडिलें थितें।
तरि गुरुगौरव तेयातें। सांडीचि ना ॥ १२ ॥

शिष्य जो तो मरणधर्मवान् जीवत्व जें त्यास स्वकिारून रक्षणकर्ता गुरु जो त्यातें शरण गेला. त्या काळीं गुरु जे त्यांनीं तूं अविनाश ब्रह्म आहेस ऐसा बोध केला. त्यायोगें शिष्याचें जीवत्व आणि बोधापूर्वी गुरुत्व जें शिष्यदृष्टीनें स्थित होतें, हें उभयही नाहींसें झालें. ऐसें हें कृत्य गुरूंनीं केलें; कारण जे शिष्याला शिष्यत्वभान राहिलें नाहीं, मग गुरुत्वभान कोठून असणार? अस्तु, पुनरपि शिष्य वृत्तीवर येऊन आपलें भूमा ब्रह्मस्वरूप स्मरूं लागला. तेव्हां गुरूचा गौरव म्ह० अतिशयेंकरून स्तुति करूं लागला जे, ज्याचे प्रसादें मजला इतुकी पदवी प्राप्त झाली तो गुरु परमधन्य, परमधन्य, त्याचा जय असो! या प्रकारें गुरुचा गौरव म्ह० योग्यता गुरूतें सांडीचिना, टाकीत नाहीं. अहो, परमात्मरूपें श्रीगुरु एक असतां गुरुशिष्य हें दोनपण कशास दाखविलें? यासि उत्तर,

एकपण नव्हे सुखास। ह्मणोनी शिष्याचें करौनि मिस।
पाहाणेंचि आपली वास। पाहातसे ॥ १३ ॥

परमात्मा जो गुरु त्यास एकपण सुखास पडेनासें झालें ह्मणोनि तेणें शिष्याचें मिष मात्र केलें. परंतु पाहाणें ह्म० सर्वद्रष्टा परमात्मा जो तोचि आपली वास ह्मणजे आपलें वसतें स्थान ब्रह्म जें त्यातें शिष्यरूपेंकरून पाहतो. आतां गुरुकृपा हे माघोटीचा पर्जन्य होय ऐसें वर्णितात,

जेयाचे कृपातुषारें। परतलें अविद्येचें महुरें।
परिनमलें अपारें। बोधामृतें ॥ १४ ॥

जैसा काशीकडे माघमासापासून पुढें पर्जन्य पडून आम्रवृक्षाचा महुर म्ह० आंबट आवे जे त्यांतें पिकवून अमृततुल्य मिष्ट करितो, तैसा गुरुकृपातुषारमात्रेंकरून अविद्येचा महुर, अविद्याकार्य अज्ञान जें तें, परतलें, तत्वज्ञानरूप होतें झालें; आणि अपारबोधामृतें परिनमलें, परिपाकातें पावलें. आतां श्रीगुरूचें शक्तिपात करण्याचा प्रकार वर्णितात,

वेद्या देतां मिठी । वेदकत्व सुवोनि पोटीं ।
तरी नोहेचि उशिटी । दिठी जेयाची ॥ १५ ॥

श्रीगुरु जो तो ब्रह्मसाक्षात्कार-प्रसंगीं स्वशिष्य जो त्यातें सन्मुख बैसवून निजदृष्टीचें वेदकत्व म्ह० ज्ञान जें तें शिष्याचे पोटीं सुवोनि, शिष्याचे हृदयीं प्रविष्ट करून उपनिषदैक-वेद्य वस्तु ब्रह्म जें त्यातें मिठी, आलिंगन देतो. तथापि त्या गुरुची निजदृष्टि जे ते शिष्याचे उदरांत गेली म्हणोन उष्टी होत नाहीं; कारण जे, द्वितीय शिष्यास ब्रह्मसाक्षात्कार करण्याचे उपयोगीं पडती म्हणून. आतां श्रीगुरूचे साहायत्वाचा महिमा वर्णितात,

जेयाचिनि सावायें । जीवु ब्रह्मउपरी लाहे ।
ब्रह्म तृणतळिं आये । उदासें जेणें ॥ १६ ॥

ज्या गुरूचे सावायें म्ह० साह्यत्वेंकरून जीव जो तो ब्रम्हादिक पदें अवर आहेत ज्याच्या त्या पदाप्रत लाहे, पावतो. आणि योग-कर्म-उपासना-प्रभावें जीव जो तो ब्रम्हदेवपदवीप्रत पावला तरी श्रीगुरु उदासें, गुरुप्रसाद नाहीं संपादिला तरि ब्रह्मदेव कां होईना, त्यातें पुनरावृत्ति होऊन तृणतळिं जाय, तृणापेक्षां निकृष्ट जन्माप्रत पावतो; कारण कीं तत्वज्ञान नाहीं म्हणून. आतां गुरूपासक जो त्यासचि फलसिद्धि होती ऐसें वर्णितात,

उपस्तीवरी राबतेया । उपायफळें येती मोडोनिया ॥
बन चले जेयाचिया । अनुज्ञा कां ॥ १७ ॥

अन्वयः—उपाय बन जेयाचिया कां अनुज्ञा चले, उपास्तीवरी राबतेया फळें मोडोनिया येती. श्रवणमननादि नानाविध उपायांचें बन, वसतेंस्थान, असा जो देह तो जयाच्या कां अनुज्ञा म्ह० आज्ञेंकरून चले, चलन पावतो; त्या परमात्मगुरुच्या उपास्तीवरी राबतेया, उपासना करून निष्कपट सेवा करणारा जो शिष्य

त्याजला साधनोपायाचीं फळें मोडोनि येती, अनायासेंकरून पुष्कळ फळें प्राप्त होतात. आतां श्रीगुरुनें दिलेली दृष्टि ती वसंतरूपें वर्णितात,

जेयाचा दिठिवा वसंतु । न रिघे निगमवना आंतु ॥
तंव आपुलिया फला हातु । न घापति ॥ १८ ॥

ज्या श्रीगुरुचा दिठिवा ह्म० अनुभवरूप ज्ञानदृष्टि हाच कोण्ही एक अलौकिक वसंतकाल होय, तो श्रीगुरुप्रसादें प्राप्त नसतां जिवाचें मोक्षरूपफल निगमवनाचे ठायीं असतांही बापुडे जीव जे ते आत्मफलातें हात न घापति ह्म० अंतःकरणवृत्तीनें स्वत्वेंकरून अनुभवूं शकत नाहींत; कारण जे, निगम, ह्म० वेदान्तशास्त्र जें तें वनासारिखें परम दुर्गम होय, म्हणून कदाचित् शब्देंकरून ब्रह्म जाणितलें तरी त्याची ओळखी नाहीं म्हणोनि परोक्ष राहतें. याजकरितां श्रीगुरुकृपाकटाक्षें आत्मओळखी करून अनंतर अनुभवदृष्टीनें शास्त्रांत पाहूं गेलें असतां ठायीं ठायीं ब्रह्मदर्शनाचि होतें. तस्मात् श्रीगुरूदृष्टिरूप वसंतकालाची प्राप्ति पाहिजे. आतां श्रीगुरूची अघटित करणी आणि निराभिमानित्व वर्णितात,

पुढें दिठीचेनि अलगें । खाचि किं निवटि मागें ।
एव्हडिया जैता नेघे । आपणपें जो ॥ १९ ॥

शिष्य जो त्याचे दृष्टीचे पुढील अलगें ह्म० दृष्टीचे पुढले बाजूला जें दृश्य दिसत होतें त्यातें खाचि ह्म० नाशातें पाववितो, कीं सवेंचि माघील द्रष्टा जो त्यातें निवटी ह्म० नाशातें पाववितो. एवं शिष्याचे ब्रह्मानुभवप्रसगीं दृश्यद्रष्टृत्व नाहींसें करूनं ऐसा जय मिळविला. परंतु एव्हडिया जैता, जयाभिमानातें श्रीगुरु आपले ठायीं धारण करीत नाहीं. कारण जे आपली अद्वितीय परमात्मरूपता स्मरतो ह्मणून. आतां शुद्धब्रह्मरूप जो गुरु त्याचे ठायीं उपदेशकर्तृक गुरुरूपता आली त्यास हेतु सांगतात,

लघुत्वाचिया मुदले । बैसला गुरुत्वाचिये सेले ।
नासोनिया नाथिले । सदेव जो ॥ २० ॥

जैसें आर्या छंदाचे ठायीं पुढील अक्षर लघु असतां पाठीमागील अक्षर गुरु होतें, तैसें लघुत्वाचिये मुदले म्ह० अग्रभागीं लघुशिष्य जो त्याजमुळें पाठीमागील अक्षर शुद्धब्रह्मरूप जें त्यास गुरुत्वाचे सेले म्ह० शबलत्वाचे पंक्तीस बसणें आलें.

वस्तुतः त्या शुद्ध स्वरूपीं शिष्यत्व, गुरुत्व हे दोन्हीही नाहींत. परंतु नाथिलें म्ह० नाहीं तेंचि शिष्यत्व, गुरुत्व जीवदृष्टीनें भासलें होतें तें नासून सदेव म्ह० सन्मात्र श्रीगुरू असता झाला. आतां शिष्याचें बुडणें आणि गुरुचें तारणें हे दोन्हीही विलक्षण प्रकार होत ऐसें वर्णितात,

नाहीं त्या जळीं बुडिजे । तेथें घनवटें येणें तरिजे ।
जेणें तरलियाही नुरिजे । कवणिये ठायीं ॥ २१ ॥

लोकीं व्यवहार ऐसा आहे जे उदक असतां कोण्ही बुडत असतो. त्यास जो तो नौका अथवा भोपळा आदिकरून पोकळ पदार्थानें तारितो आणि तरला तो जिवंत असतो, ऐसा प्रकार आहे. या श्रीगुरूचे घरचा प्रकार याहुनी सर्व विलक्षण होय ऐसें जाणावें. नाहीं जे मृगजळरूपा माया तिचे ठायीं शिष्य बुडत होता, तो श्रीगुरूचें घनवट म्ह० परिपूर्ण स्वरूप जें त्यायोगें तरतो आणि त्या तरल्याचे योगेंकरून शिष्याचें जीवित्व जें तें कोठेंही उरत नाहीं. आतां ज्या योगें शिष्य तरतो ती घनवट वस्तु कोणती हें सांगतात,

जेथें आकाश हें सावेव । न बांधे अवकाशाची हांव ।
ऐसें कोणी एक भरीव । आकाश जें ॥ २२ ॥

जेथें, ज्या स्वरूपाचे ठायीं, हें सावयव आकाश ह्म० ब्रह्मांडादि घटांत उपाधियोगें वर्तुल चतुष्कोणादि रूपें अवयवांतें पावलें आणि साक्षी जो त्यास दृश्य झालें; तें आकाश ज्या वस्तूचे ठायीं अवकाशाची हांव बांधीत नाहीं ह्म० पोकळपणाची टाकितें, ऐसें, या प्रकारचें कोण्ही एक जें भरीव आकाश ह्म० अलौकिक परिपूर्ण सन्मात्र आकाश, ज्यास लक्षणावृत्तीकरून श्रुति जे ती, मायातीत, शुद्ध, निरंजन, केवल, भूमा, अनंत, ब्रह्म ऐसें ह्मणती; आणि व्याससूत्रांचे ठायीं आकाश त्याचें लिंग ऐसें वर्णिजेलें, आणि श्रीमच्छंकराचार्य जे ते प्रमातृ-कल्पित साक्षिदृश्य पोकळ आकाश जे त्याची निवृत्ति करून तदधिष्ठानभूत जें भरीव आकाश त्याचें केवलब्रह्मत्वेंकरून शारीरभाष्याचे ठायीं स्थापन करितात; आणि या भरीव आकाशातें वसिष्ठही ब्रह्म ऐसें बृहद्वासिष्ठाचे ठायीं स्थापन करितात; आणि या भरीव आकाशातें वसिष्ठही ब्रह्म ऐसें बृहद्वासिष्ठाचे ठायीं ह्मणतात; संमतिश्लोकः— "अचेतनाकाशमनन्यदेकं तदेवमस्तित्विदमर्थहीनं । तद्व्योमरूपं यत एतदेवं निरामयं चेतनसारमाहुः ॥१॥" अस्तु, ऐशा पूर्णानुभवी अकर ग्रंथकारांच्या संमति

अनेक आहेत. सारांश, श्रीगुरूचें भरीव आकाशतन्मात्र ब्रह्मरूप जें तेणेंकरून शिष्य जो तो या भवसमुद्रातें तरतो आणि जीवत्वें नाहींसा होतो हा सिद्धांत. आतां श्रीगुरूचे पूर्णस्वरूपाचें आनंदमात्रत्व आणि चिन्मात्रत्व वर्णितात,

चंद्रादि सुशीतळें । घडिलीं जेयाचेनि मेळें ॥
सूर्य जेयाचे उजळे । कडवसेंनि ॥ २३ ॥

सुखास निमित्तभूत असे जे सुशीतल चंद्रादिक पदार्थ ते, ज्या केवलस्वरूप गुरूच्या मेळें ह्म० योगेंकरून घडले जातात, तेव्हां त्या गुरूचें आनंदमात्रस्वरूप आहे म्हणून काय सांगावें ? हें अर्थात् सिद्धचि आहे. आणि ज्या परमात्म गुरूचे एकांशाचे ठायीं भासली जे माया, तिचे ठायीं कडवशासारिखा बिंबला जो ईश्वर त्या योगेंकरून सूर्य जो तो उजाळपणातें पावला आहे. तेव्हां मग या गुरूचें चिन्मात्र स्वप्रकाशमान स्वरूप आहे म्हणून काय सांगावें ? हें अर्थात् सिद्ध आहे. आतां जोशियाचे रूपकेंकरून श्रीगुरुचें वर्णन करितात,

जीवपणाचेनि त्रासें । यावया आपुलिये दशे ॥
शिवुहि मुहूर्त पुसे । जेया जांसिया ॥ २४ ॥

परमात्मा शिव जो तो आत्मविलासप्रसंगीं अविद्यारूप मायेच्या योगेंकरून जीवत्वदशा पावून बहुत त्रासला. तेव्हां आपली दशा ह्म० पूर्वसिद्ध नित्यमुक्तस्वभावता जे तिजप्रत यावयाकरितां उपदेशकर्ता श्रीगुरु ज्योतिषी जो त्याजला तत्वज्ञान तल्लक्षण मुहूर्तातें पुसतो; ऐसी या श्रीगुरूची योग्यता होय. आतां परमात्मरूपेंकरून श्रीगुरूतें वर्णितात,

चांदिणें स्वप्रकाशाचें । लेइला द्वैत दुणींचें ।
तरि उघडेपण न वचे । चंद्राचें जेया ॥ २५ ॥

जैसा चंद्राचे मंडळान्तर्वर्ती प्रकाश असून संपूर्ण भूमंडळीं प्रकाश विस्तारातें पावतो, ऐशा द्विगुणित प्रकाशेंकरून चंद्र जो तो आच्छादित न होतां उघड दिसतो; तैसा परमात्मा गुरु जो याचे प्रकाशाचे योगें संपूर्ण जगद्रूप द्वत प्रकाशित होतें आणि तें जगतही परमात्मप्रकाशचि होय. ऐशा द्विविध प्रकाशातें लेइला म्ह० धारण केलें, परि उघडेपण न वचे, श्रीगुरूचें उघडेपण जात नाहीं; कारण जे सर्वस्वरूपें श्रीगुरुचि आहे म्हणून.

जो उघडु की न दिसे । प्रकाशु परि न प्रकाशे ।
असतेपणेंचि नसे । कवणीकडे ॥ २६ ॥

जो गुरु उघड असतांही अज्ञानियांसी दिसत नाहीं, जो इंद्रियांस प्रकाशित करतो परन्तु इंद्रियें त्यातें जाणत नाहींत, मूढजन मायेचें सत्व जाणतात आणि परमात्मगुरु कोणीकडे नाहीं ऐसेंच मानितात. आतां ज्ञानी जो तो या परमात्म गुरुसी संवाद कैसा करितो हें वर्णितात,

शब्दाची लिपी पुसे । तेव्हां तणासी चावला बैसे ।
दुजेयाच्या रागीं रुसे । एकपणा हा ॥ २७ ॥

जेव्हां शब्दांची लिपि जे ते पुसावी, तेव्हां त्या गुरुसीं चावलों, बोलू, बसाव म्ह० शब्दरहित होऊन ब्रम्हवस्तूतें अनुभवावें. आणि दुजियाच्या रागीं, द्वैताचा त्याग केला असतां तत्सापेक्ष एकपणा म्ह० अद्वैतत्व, त्याचा राग येऊन रुसतों, एकत्वही स्वीकारीत नाहीं. ऐसा श्रीगुरुचा केवलब्रह्मत्वेंकरून तुसडा स्वभाव आहे, अहो, श्रीगुरू शब्दाचा विषय नसो, परंतु मनाचा विषय तरी मूल-अज्ञाननिवृत्ति-साठीं झाला पाहिजे कीं ? यासि उत्तर तेथें विषय-विषयित्वें भेद राहत नाहीं ऐसें सांगतात,

कांहींबाहीं अलुमाळ । देखे जंव एखादे वेळ ॥
तव देखतेंही टवाळ । जेया गांवीं ॥ २८ ॥

कांहीं बाहीं अलुमाळ म्ह० भलतैसा कचित् ज्ञानी जो तो देखे, जंव एखादे वेळ तंव जया गांवीं, ज्या श्रीगुरुचे पूर्ण स्वरूपीं देखतेंचि टवाळ, मिथ्या, होऊन जातें. कारण जे, श्रीगुरुचे पूर्ण स्वरूपीं दृष्टीचा प्रवेश होत नाहीं म्हणून. आतां श्रीगुरु प्रत्यक्षादि प्रमाणाचा विषय नव्हे ऐसें वर्णितात,

आतां पुरे, जो तो इहीं शब्दीं । कें मेळउं अनुमानांचि मांदी ॥
हा प्रमाणाहि वो नेदी । कवणाहि मा ॥ २९ ॥

आतां पुरे, जो तो या उपमा भाषेंकरून अनुमानांची मांदी, समुदाय, किती मेळवावे ? हा सर्वोपाधिविवर्जित होय. शब्द, प्रत्यक्ष, अनुमान, उपमान, अर्थापत्ति, अनुपलब्धि, ऐसे हे षट् प्रमाणें जे ते या गुरुचे नांवें हाका मारमारून राहिलीं. परंतु केवलब्रह्मरूप गुरु जो तो येक्याही प्रमाणास ओ देत नाहीं, कोणत्याही प्रमाणाचा विषय होत नाहीं. आतां श्रीगुरुचे केवल-ब्रह्मस्वरूपाचें मोठें आश्चर्य वर्णितात,

प्रमाणांची परी सरे । तैं प्रमेय आविष्करे ॥
नवल मेचु धुरे । कांहीं नापणाची ॥ ३० ॥

**अन्वय**—नवल प्रमाणांची परी सरे, तैं मेचु धुरे नापणाची प्रमेय आविष्करे. या श्रीगुरुचें नवल, आश्चर्य, काय वर्णावें पहा! जैसा मनुष्याचा संचार जेव्हां नाहींसा होतो, तेव्हां महासर्प किंवा निधी हे प्रकट होतात, नाहींतरी मेचून, आच्छादून, राहतात; तैसें संपूर्ण प्रमाणांची परी, प्रकार, जेव्हां सरतात तेव्हां हा श्रीगुरु संपूर्ण मेच घेणाराची धूर ह्म० आच्छादून मागें मागें राहणार जे त्यांजमध्यें श्रेष्ठ; आणि कांहीं नापणाची ह्म० कांहीं नाहीं ऐसीच आहे स्थिति जे ते ज्याची, आणि अप्रमेय ऐसा श्रीगुरु जो तो आविष्करे, आविर्भावातें पावतो.

तेथें नमनें कां बोलें । केउतीं सुवों पाउलें ॥
अंगीं लावूनि नाडिलें । नाम येणें ॥ ३१ ॥

ज्या श्रीगुरूच्या शुद्ध-ब्रम्ह-स्वरूपाचे ठायीं श्रुतीचा आणि मनाचा प्रवेश नाहीं, तेथें नमनेंकरून अथवा बोलेंकरून पावलें कैसीं ठेवावीं? श्रीगुरु जो तो साकार असेल ह्मणून नमन आणि स्तवन करावें ह्मटलें तरि श्रुतिवाक्यें परमात्मरूपेंकरून या गुरूनें उच्चारिलें जे संपूर्ण नामरूपात्मक जग मीच आहे. ऐसें प्रथम आपले अंगीं लाउनी पुन्हा नाडिलें ह्म० निषेधिलें जे नामरूपें माझे ठायीं नाहींत ऐसें सांगिजेलें. कारण जे स्वयें अरूप अनाम आहे ह्मणून. अहो, श्रीगुरूचें **निवृत्ति** ऐसें नाम असतां त्या नामेंकरून स्तुति कां होत नाहीं? यासि उत्तर,

नाहीं आत्मया आत्मप्रवृत्ति । वाढविता कें निवृत्ति ॥
परि या नामाची वायबुंथी । सांडीचि ना ॥ ३२ ॥

मुळीं आत्मा गुरु जो याची आपले ठायीं आपली प्रवृत्तीच नाहीं, मग निवृत्ति तरी कोठून वाढविता होईल, म्ह० वृद्धीतें पावविता होईल? परि आकाशाचे ठायीं व्यर्थ काळेपणाची बुंथी दिसल्यावांचून राहत नाहीं, तैसी निवृत्तिनामाची वाय, व्यर्थ, बुंथी ( आच्छादन, आवरण ) जे ती सांडीचिना, सोडून राहातचि नाहीं. अहो, श्रीगुरूचे ठायीं प्रवृत्ति-निवृत्ति नसोत, परंतु श्रीगुरु द्वैतनिवृत्ति तरी करील कीं? हें घडत नाहीं ऐसें सांगतात,

निवर्त्य तवं नाहीं । मा निवर्तवि हा काई ॥
तरि कैसा बैसे ठाई । निवृत्तिनामाच्या ॥ ३३ ॥

आतां निवृत्त करावयाविषयीं योग्य जो द्वैतप्रपंच तोचि गुरुचे ठायीं मुदल नाहीं, मग त्याची या गुरुनें निवृत्ती तरी काय करावी ? तरि निवृत्तिनाम याजला कैसें झालें ह्मणाल तर सांगतों,

सूर्यासि अंधकारु । कैं झाला होता गोचरु ।
परि तमारि हा डगरु । आलाचि कीं ? ॥३४ ॥

जैसा सूर्यासि तरी अंधकार गोचर ह्म० दिसत नसतां त्या सूर्यप्रकाशेंकरून जीवासी तमनिवृत्ति अनुभवासि येती, ह्मणोनी सूर्यासि तमारि हा डगरु, शब्द, आलाचि कीं; तैसा श्रीगुरु जो यास अज्ञानरूप द्वैतप्रपंच प्रतीयमान नसतां जीव-कोटि-विशिष्ट विचारवान् जे त्यांस आत्मप्रकाशेंकरून अज्ञानरूप द्वैतप्रपंचाची निवृत्ति अनुभवासि येती. म्हणून आत्मा गुरु जो त्यास निवृत्ति हा शद्व आलाचि कीं? या निमित्तेंकरून प्राप्त झालाचि कीं ? आणखीही याजवरी शद्व येण्याचें मिमित्त काय तें सांगतात,

लटकें येणें रूढे । जड येणें उजियेडे ॥
न घडतेंही घडे । याचिया मावा ॥ ३५ ॥

लटकें जगत् या परामात्मगुरुच्या योगेंकरून रूढीप्रत येतें. आणि जडरूपा माया जे ते या गुरुच्या योगेंकरून उजियेडे, चेतन होती. अस्तु, जें न घडायाचें तें याचिया मावा, याचे मायेंकरून घडतें. आतां अत्यंत लडिवाळपणें ज्ञानेश्वर जे ते श्रीगुरुसी भाषण करितात,

हां गा मायावसें दाविसी । आणि मायिक म्हणोनि वालिसी ।
अमाईक तवं नव्हसि । कोणा विषो ॥ ३६ ॥

अगा श्रीगुरु ! स्वमायेच्या योगेंकरून संपूर्ण जगत् आम्हांतें दाखवितोस आणि श्रुतिवाक्येंकरून पुन्हा हें जगत् मायिक, मृषा, म्हणून वालितोस, निषेधितोस आणि अमाईक तुझें निरंजन स्वरूप तरी कोणास विषय होत नाहीं, ऐसा तुझा प्रकार आहे. आतां पश्चातापपुरःसर श्रीगुरुसी भाषण करितात,

शिव शिव सद्गुरु । । तुजला गूढा काइ करूं ॥
एकाही निर्धारा धरु । देतासि कां ॥ ३७ ॥

शिवशिव हा परमविस्मय होय. तूं परमगूढ, दुर्विज्ञेय आहेस. मी जो येणें तुजप्रत कैसें करावें ? कांहो इतुकी अडचण म्हणाल, तरि सांगतों. तुजला सविशेष म्हणावें कीं निर्विशेष म्हणावें, या उभयांतून एकाही निर्धारासि धर देतासी तरी बरें होतें. आतां सविशेष परमात्मरूपेंकरून तुझा स्वभाव जें दाखवावें एक आणि करावें एक ऐसा आहे हें वर्णितात,

नामरूपें बहु असे । पुढां उभारूनि पाडिलीं वोसें ।
सत्तेचेनि आवेसें । तोखलासी ॥ ३८ ॥

अनेक नामरूपात्मक जगत् आपले दृष्टीचे पुढें उभारुनी तत्वज्ञानियाचे रूपें तुवां वोस पाडिलीं, दिसत असतांचि मृषा ऐसीं ठरविलीं. आणि सत्तेच्या आवेशें ह्म० परमार्थिक सत्ता जे तिचे ठायीं व्यावहारिक सत्तेचा आवेश, अंतर्भाव, करून तोखलासी, संतोषातें पावलासी. तैसाचि देशिक-रूपेंकरूनही तुझा स्वभाव परम घातक होय ऐसें वर्णितात;

जीवु घेतलियावीण । चालूं नेणसी साजण ।
भृत्यु नुरे स्वामीपण । तेंही नोहे ॥ ३९ ॥

तूं शिष्याचा जीव घेतल्यावांचून साजण, सख्य, चालूं नेणसी, करूं नेणसी. सारांश, शिष्यास जीवितनिरासें स्वस्वरूप ऐक्य पाववितोस. अस्तु, इतकेंचि करून राहतोस ऐसें नाहीं, ( तर ) भृत्यु नुरे, शिष्यत्व तरी राहताचि नाहीं, परंतु स्वामीपण, देशिकत्व, तेंही नोहे, राहत नाहीं. कारण जे शिष्य सापेक्षित गुरुत्व आहे ह्मणून. आतां निर्विशेषत्वें श्रीगुरूचा तुसडेपणा किती आहे हें वर्णितात,

विशेषाचेनि नावें । आत्मत्व तेंही न साहवे ।
किंबहुना नोहावें । कांहींच येया ॥ ४० ॥

विशेषेंकरून पाहूं गेलें असतां याजला आत्मत्व तेंही नकोसें आहे; कारण जे अततीत्यात्मा अततिव्याप्नोति ह्म० व्यापनशील तो आत्मा व्याप्यसापेक्षित हें व्यापकत्व होय. ऐसें विशेष आत्मत्व आहे म्हणून या गुरूस नको. किंबहुना

फार काय सांगावें, विशेषणेंकरून जें जें विशेष्य असेल तें तें कांहीं याजला न व्हावें, नकोसें आहे; कारण जे हा निर्विशेष आहे ह्मणून. अहो भृत्यु ह्म० शिष्य उरत नाहीं ऐसें तुह्मी बोललेत, तें शिष्याचें न उरणें कैसें आहे, ऐसे आक्षेपीं दृष्टान्तेंकरून उत्तर सांगतात,

रात्री नुरेचि सूर्या । नुरे लवण पाणिया ।
नुरेचि चेइलिया । नीद जैसी ॥ ४१ ॥

जैसी रात्री जे ते सूर्योदयकालीं नाहींसीच होती; तैसी अविद्या जे ती ज्ञानियाचे ठायीं उरत नाहीं, सर्वस्वें नाहींसी होती. आणि लवण जें तें पाण्याप्रत भेटूं गेलें असतां उरत नाहीं, मीठपणचि टाकतें; तैसा द्रष्टा जो तो श्रीगुरुचे केवल ब्रह्मस्वरूपासी भेटूं गेला असतां, आपणच्चि विलया जातो. मग नामरूपात्मक दृश्य तें कोठून उरणार? आणि चेइलिया म्ह० जागे झाल्यावरी निद्रा उरत नाहीं जैसी, तैसी ज्ञानी जो याणें आपलें पूर्वसिद्ध ब्रम्हरूप जें त्याचे ठायीं स्थिति केली असतां मोहमयी माया जे ते उरत नाहीं. आतां शिष्याची दृष्टी जे ते आपण नाहींसी होऊन गुरुचें नामरूप नाहींसें करिती ऐसें वर्णितात,

कापुराची थलीव । नुरवी आगीची बरव ।
नुरेचि रूपनावं । तैसें येया ॥ ४२ ॥

जैसी कापुराची थलीव म्हणजे वडी जे ते अग्नीसी योग पावली असतां आपण नाहींसी होऊन अग्नीची बरव, चांगलेपण, उरूं देत नाहीं, तैसी द्रष्ट्याची दृष्टी जे ते ज्ञानाग्नीसी योग पावली असतां आपण नाहींसी होऊन तत्वज्ञानास सत्यत्व राहूं देत नाहीं. त्याचि प्रकारें ज्ञानियाची दृष्टी जे ते आपण नाहींसी झाली असतां या श्रीगुरूचे रूपनांव उरूं देत नाहीं.

याचिया हातापाया पडे । तंव वंद्यत्वें पुढा न मंडे ।
न पडेचि हा भिडे । भेदाचिये ॥ ४३ ॥

परमभक्तिकरून या श्रीगुरुचे हातापायां पडूं गेलें जरी तरी वंद्यत्वेंकरून म्ह० दृश्य होऊन पुढें न मंडे, 'दृग्गोचर होऊन पुढें राहत नाहीं; आणि गुरुशिष्य ऐसा जो भेद त्याचे भिडेसही पडत नाहीं. आतां श्रीगुरु नामरूपत्वें वंद्य दिसतो हें कैसें म्हणाल, तरी सदृष्टान्तें सांगतात,

आपणाप्रति रवि । उदयो न करि जैंवि ।
हा वंद्यु नोहेचि तैंवि । वंदितांही ॥ ४४ ॥

जैसा रवि म्ह० सूर्य जो तो आपण आपले ठायीं उदयास्तरहित नित्य प्रकाशमानचि आहे; आणि अन्य जीव जे त्यांस तत्संबंधी उदयास्त दिसत असावे, परंतु रवि जो तो स्वउदयास्तातें पाहत नाहीं. तैसा परमात्मा गुरु जो तो आपण आपले ठायीं वंद्य-वंदित्व-रहित नित्यप्रकाशमानचि आहे; आणि वंदिणार प्रमाता जो त्याचे कल्पनेकरून नामरूपवान् वंदावयासी योग्य ऐसा दिसत असावा. परन्तु वंदिणारानें भेदकल्पना केली तरि श्रीगुरु वंद्य होत नाहीं, कारण जे संपूर्ण रूपें परमात्मा गुरु एकचि आहे म्हणून.

कां समोरपण आपलें । न लाहिजे कांहीं केलें ॥
तैसें वंद्यत्व घेतलें । हारोनि येणें ॥ ४५ ॥

अथवा जैसा कोणासही आपला समोरपणा जो तो कांहीं केलें असतां न लाहिजे, नाहीं पाविजेत; तैसा परमात्मा गुरु जो तो सर्वरूपेंकरून एक आहे, म्हणून यातें वंद्य-वंदित्वभेद करितां येत नाहीं. आणि शिष्याचे ठायीं पूर्वी वंद्यत्व जें वाटत होतें तेंहि या गुरुनें शिष्यातें एकत्व उपदेश करून हारून घेतलें, हिसकाऊन घेतलें. आतां श्रीगुरुचें स्वरूप निरवयव केवलब्रह्मरूप आहे ह्मणूनहि वंद्य होत नाहीं ऐसें वर्णितात,

आकाशाच्या आरिसां । नुठे प्रतिबिंबींचा ठसा ॥
हा वंद्यु नोहे तैसा । नमस्कारा ॥ ४६ ॥

काचेच्चे दर्पणाचे ठायीं पाहाणाराचे प्रतिबिंबाचा ठसा दिसतो, तैसा आकाशाचे ठायीं पाहणाराचा ठसा उमटत नाहीं. याप्रकारें द्रष्टयाचें प्रतिबिंब अंत:करणाचे ठायीं जीवरूपें होतें, परन्तु श्रीगुरुचें परिपूर्ण चिदाकाशस्वरूप जें त्याचे ठायीं द्रष्टयाचा प्रतिबिंबत्वें ठसा उठत नाहीं, उमटत नाहीं. कारण जे श्रीगुरूचें स्वरूप निरवयव आहे म्हणून, आणि त्या निरवयवत्वास्तव श्रीगुरु नमस्कारास वंद्य होत नाहीं.

हा नोहे तरि न हो । हें वेखासें कां येवो ॥
परि वंदितयांही ठावो । उरोंचि नेदी ॥ ४७ ॥

हा श्रीगुरु वंद्य न होईल तरि न हो; हें वेखासें ह्म० एखादें न व्हावयाचें तें कां घेवों, त्याचा आग्रह कां करूं ? आमचें आह्मांसचि पडलें आहे. तें कोणतें संकट ह्मणाल, तरि मी वंदन करणारा जो थासाचि ठाव उरूं दिला नाहीं. अहो, आधीं गुरुत्वाची निवृत्ति होती, कीं, शिष्यत्वाची निवृत्ति होती ? ऐशा आक्षेपीं उत्तर आदौ शिष्यत्वनिवृत्ति सांगतात,

अंगौमि एक ना झोळु । फेडितां तो बाहेरिलु ॥
कट फिटे आंतिलु । न फेडितांचि ॥ ४८ ॥

अन्वय—अंगौमि एक झोळु फेडितां बाहेरिलु कट न फेडतांचि फिटे ना. जैसे द्रविड देशांतील स्त्रियांचे लुगड्यास दोन वेष्टनें असतात, त्यांतील अंगौनि, अंगास लाविलेला, झोळ, पदर, फेडिला असतां, बाहेरील कट, पदर, न फेडितांचि फिटतो. तैसी शिष्यत्वाची निवृत्ति अगोदर होऊन मग गुरुत्वाची निवृत्ति न करितांचि होती.

नाना बिंबपणा सरिसें । घेऊनि प्रतिबिंब नासे ॥
नेलें वंद्यत्व येणें तैसें । वंदितेनसीं ॥ ४९ ॥

ना ना, अथवा, कांहीं एका निमित्तानें चंद्राचें प्रतिबिंब नाशातें पावतें तेव्हां तत्सापेक्षित चंद्राचे ठायीं जें बिंबत्व असतें त्याजला तें प्रतिबिंब घेऊन जातें, तैसें द्रष्ट्याचें प्रतिबिंब चिदाभास जीव जो तो ब्रह्मानुभवप्रसंगीं नाशातें पावतो तेव्हां आपला बिंबरूप द्रष्टा जो त्याचें द्रष्टृत्व घेऊन जातो; त्याप्रकारें श्रीगुरूनें शिष्याचें वंदिणारत्व आणि गुरूचें वंद्यत्व हे दोन्हीही नेलीं, नाहींशीं केलीं. अहो गुरूची मूर्ति अवलोकन करावयासी काय चिंता आहे ? यासि उत्तर,

नाहीं रूपाची जेथें सोये । तेथें दिठीचें काइ आहे ॥
आम्हां फललें पाये । ऐसी दशा ॥ ५० ॥

या गुरूतें रूपचि नाहीं, तेथें आमचे दृष्टीचा काय उपयोग आहे ? अस्तु, आमचा शिष्यपणा सर्वस्वें नाहींसा व्हावयासी गुरुचे पाय फळले ह्म० ऐसी आमची दशा झाली. आतां साकार उपासक जो तो बोलतो,

गुणा तेलाच्या सोइरिका । निर्वाहिलीं दीपकलिका ।
तें काय होईल पोलिका । कापुराचिये ? ॥ ५१ ॥

अहो, जैसी गुण ह्म० वाति आणि तेल यांची सोइरीक, ह्म० एकत्र मिळवून दीपकलिका निर्वाहिली, लाविली, जाती; तैसी चिंतन करणारी वृत्ति जे तिणें चिदाभास आणि अतःकरण या उभयांचे योगें करून झाली, तिणें श्रीगुरुचें ध्यान करावें कीं ! आतां सिद्धान्ती दीड ओवीकरून यासी सांगतात, जैसी दीपकलिका चिरकाल राहती, तैसी चित्तवृत्तीनें साकार ध्यान केलें असतां वृत्ति स्थिर होऊन चिरकाल राहती. त्याप्रकारें कापुराचे पोळीचे ठायीं होईल काय ? होणार नाहीं. तें कैसें ह्मणाल, तरि,

तेयां दोघां परस्परें । होइना जंव मेळिरें ॥
तंव दोहींचेंही सरे । सरिसेंचि ॥ ५२ ॥

जैसी कापुराची पोलिका, वडी, तल्लक्षण द्रष्टयाची दृष्टि आणि तत्वज्ञानरूप आग्नि या दोघांचें परस्परें मेळिरें ह्म० भेटी झाली कीं नाहीं तंव दोघांचेंही आयुष्य सरसें, बरोबरच, सरतें.

तेंवि वंदिना मी येयातें । तंव गेलें वंद्य-वंदितें ॥
चेइलिया कांतें । स्वप्नीचें जेंवि ॥ ५३ ॥

तेंवि, कापुराचा आणि अग्नीचा दृष्टान्त सांगितला त्या प्रकारें, या भूमास्वरूप गुरूतें मी या ज्ञानदृष्टीनें दर्शनरूप वंदन केलें कीं नाहीं तंव, इतुकियांत, वंद्य-वंदितें हीं दोन्ही गेलीं. ते कैसीं ह्मणाल तर याप्रकारें. कोण्ही एक पुरुष जो तो लग्न न झालेला स्वप्नाचे ठायीं पाहता झाला जे आपणास नवरी मिळून आपण कांत, हळदी लावून सुशोभित नवरा, झालों आहे; तंव, अकस्मात्, चेइला, जागा झाला; तंव नवरानवरीपण उभयही गेलें. तैसा मी संसारस्वप्नाचे ठायीं गुरुशिष्यत्वसमारंभ पाहत होतों. तंव पूर्ण बोध झाला, तेव्हां वंद्यवंदिणारत्वें गुरुशिष्यपण हें उभयही गेलें.

किंबहुना यया भाखा । अद्वैताचा उफखा ॥
फेडोनिया स्वसखा । श्रीगुरु वंदिला ॥ ५४ ॥

किंबहुना, फार काय सांगावें? या भाषेनें वर्णन करून द्वैताद्वैतविवर्जित श्रीगुरु जो त्याजवरी अद्वैत शद्बाचा उफखा ह्म० द्वैतसापेक्षित अद्वैत शद्बाचा उपराळा आला होता तो फेडूनि, निवारोनि, स्वसखा निवृत्ति वंदिला.

येयाचे सख्यत्वाची नवाई । अंगीं एकपणाही ठावो नाहीं ॥
कीं गुरुशिष्य दुवाई । पवाडु केला ॥ ५५ ॥

या श्रीगुरुसी आम्ही सख्य केलें, परंतु याचे सख्यत्वाची नवाई, ह्म० मोठें नवल वाटतें जे, याचे केवलस्वरूपीं एकपणाही ठाव नसतां, गुरुशिष्यपणें दुवाई पवाडु केला, गुरुशिष्यत्वें द्वैविध्य नांदविलें!

कैसा आपणा आपण । दोंवीण सोईरेपण ॥
हा याहोनि विलक्षण । नाहींना नोहे ॥ ५६ ॥

परमात्मा गुरु जो तो गुरुशिष्यत्व या दोनपणावांचून आपल्यास आपण सोईरेपण ह्म० गुरुशिष्यत्वें सख्य कैसें करितो कीं? अस्तु, संपूर्णरूपें करून एक गुरुचि आहे म्हणूनि हा आपण आपणाहून विलक्षण होत नाहीं, आणि पहिलेपासून विलक्षणही नाहीं; कारण जे अवघा श्रीगुरु एकचि आहे म्हणून. अहो, तुमचा श्रीगुरु साकारचि असेल कीं? यासि उत्तर श्रीगुरु आकाशासारिखा निराकारही आहे ऐसें सांगतात,

जग अवघें पोटीं माये । गगनाएव्हडा होऊनि ठाये ॥
किं ते नीस न साहे । नाहींपणाची ॥ ५७ ॥

ज्या गगनाचे पोटीं अवघें जग माईजेतें, त्या गगनाएव्हडा परमात्मा गुरु होउनि ठाये, अपारावार पुष्कळपणें राहिला आहे. आतां हेहि उपमा संभवत नाहीं ऐसें सांगतात. नीस नाहींपणाचि ते न साहे किं, नीस नाहींपणाची ह्म० निस्तूक नाहींपणेंकरून जें आकाश त्याची उपमा श्रीगुरूस साहत नाहीं किं. काय म्हणून सहन होत नाहीं म्हणाल तरि गगन पोकळ आणि श्रीगुरूचें स्वरूप भरीव परिपूर्ण आहे ह्मणून, या हेतूस्तव उपमा न साहे. अहो, तुमचा गुरु साकार आहे कीं निराकार आहे? यासि उत्तर,

कां पूर्णते तरि आधारू । सिंधु जैसा दुर्भरु ।
तैसा विरुद्धा पाहुणेरु । येयाचे घरीं ॥ ५८ ॥

जैसा सिंधु जो तो पृथ्वीवरील उदकें जे त्यांस पूर्णता करावयास आधार होय, कारण होय, आणि ते पृथ्वीवरील उदकें जे ते. महानद्यांचें द्वारें येऊन साठवलीं

तरि सिंधु जो तो पुर्थंग होय, दुःखकरूनहि भरावयासी अशक्य; तैसें एके काळीं न राहणारें ऐसें साकार-निराकारत्व जें त्याविरुद्ध धर्मद्वावास या श्रीगुरुचे घरिं पाहुणेर होतो, साकार निराकार जे ते परमात्म गुरुचे ठायीं विवर्तरूपें वर्ततात. आतां ज्ञानाज्ञानाचा प्रकार वर्णितात,

तेजा तमा कांहीं । परस्परें विके नाहीं ।
पारि सूर्याचिया ठायीं । सूर्यचि होती ॥ ५९ ॥

जैसें तेज आणि तम हे परस्परें विरोधी ऐसे जीवाचे प्रतीतिस येतात; परंतु सूर्याचे ठायीं भिन्न राहत नाहींत, सूर्यचि होतात; तैसीं ज्ञान—अज्ञानें परस्परें विरोधी होत, आणि ज्ञानि अज्ञानि जीवाचे प्रतीतिसही येतात, परंतु परमात्मस्वरूपीं भिन्न रहात नाहींत, परमात्मगुरुरूपचि होतात. कारण जे ज्ञानाज्ञानविलासरूप एक परमात्मा गुरुच आहे ह्मणून. आतां या श्रीगुरुचे स्वभावाचा नेम करितां येत नाहीं ऐसें वर्णितात,

एक म्हणतां भेदें । तो किं नानात्वें नांदे ॥
विरुद्धें आपणया विरुद्धें । होति काई ॥ ६० ॥

या श्रीगुरुतें तत्वज्ञानेंकरून अनुभवून एक ह्मणावयासि गेलें असतां ह्मणणाराच्या योगें भेदातें पावतो. तोचि गुरु अज्ञानियानें पाहूं गेलें असतां नानात्वें नांदे, अनेकत्वेंकरून प्रतीतीस येतो. अहो, परमात्मा गुरु जो त्यास हीं ज्ञानाज्ञानमूलक सुखदुःखें होत असतील कीं? यास उत्तर. ज्ञानाज्ञानें परस्परें विरोधि असून जीवास मात्र बंधमोक्षदायक आणि सुखदुःखदायक होतात. परंतु ज्ञानअज्ञानस्वरूप परमात्मा गुरु जो त्यास विरुद्धें होतील काय? कोणहीही आपण आपणांस विरोधी होत नाहीं ऐसा न्याय आहे, या हेतूस्तव परमात्मा जो त्यास ज्ञानाज्ञानें सुखदुःखास कारण होत नाहींत. कारण जे संपूर्ण स्वरूपें एक परमात्मा परमात्माचि आहे ह्मणून.

म्हणोनि शिष्य गुरुनाथ । या दो शद्बांचा अर्थ ॥
श्रीगुरुचि होत । दोहीं ठायीं ॥ ६१ ॥

म्हणोनि, या हेतूस्तव शिष्य आणि उपदेशकर्ता श्रीगुरुनाथ हे दोन्ही शब्द मात्र उच्चारावे, परंतु या दों शब्दांचा अर्थ म्हणजे वास्तविक स्वरूप परमात्मा श्रीगुरुचि दों ठायीं होत असे. आतां चंद्रदृष्टान्तेंकरून श्रीगुरुचें वर्णन करितात,

सुवर्ण आणि लेणें । वसे एकें सुवर्णें ।
कां चंद्र आणि चांदणें । चंद्रिं जेविं ॥ ६२ ॥

जैसें एक सुवंण असतां त्यातें घडिल्यावरी विवर्तरूप अळंकार आणि तत्सापेक्षित अधिष्ठानभूत सुवर्णत्व, ऐसे तीन प्रकार वाटले तरि सुवर्ण एकचि आहे, तैसें मूळचें एक शबल ब्रह्म जें प्रथम प्रकरणीं संस्कृत पांचवे श्लोकेंकरून वर्णिलें तें श्रीगुरूचें स्वरूप जें त्याचे ठायीं विवर्तरूप संपूर्ण जगत् आणि तत्सापेक्षित अधिष्ठानभूत परमात्मा, ऐसे तीन प्रकार वाटले तरि शबलब्रम्हरूप श्रीगुरु जो तो एकचि होय. किंवा मूळचा चंद्र एकचि असतां त्याचे ठायीं शुक्ल पक्षीं चांदणें जें तें विकाशातें पावलें आणि त्या चांदण्याचे योगें विशेष शोभा आली तरी चंद्र जो तो एकचि आहे. तैसा पुरुषसूक्तें वर्णिला जो पुरुष तो मूळचा एक असून त्याचे ठायीं संपूर्ण कार्यरूप जगत विस्तारातें पावलें. आणि जग व्हावयासि हेतुभूत प्रकृति ऐसे हे तीन प्रकार जाले तरि श्रीगुरू जो तो परमपुरुषरूपें एकचि होय.

कापूर आणि परिमळु । कापुरचि केवळु ।
गोडि आणि गुळु । गूळचि तो ॥ ६३ ॥

जैसा कापूर आणि परिमळ ह्म० सुगंध हे दोन्ही मिळून एक कापूरचि होय, तैसा पुरुष आणि परमात्मा हे दोन्ही मिळून केवळ एक श्रीगुरु परमपुरुषाचि होय. किंवा गुळाची गोडी आणि गूळ एकचि होय जैसा, तैसा मायावी ईश्वर आणि माया हे दोन्ही मिळून एक ईश्वररूप श्रीगुरुचि होय.

तैसा गुरुशिष्यमिसें । हाचि एकला उल्हासे ॥
जरि कांहीं दिसे । दोनीपणें ॥ ६४ ॥

तैसा, त्याचि प्रकारें, गुरु-शिष्य या उभय मिषेंकरून जरि दिसला तरि हा एकला श्रीगुरुचि उल्हासे, उदयातें पावला आहे. आतां ज्ञानियाचे ठायीं श्रीगुरुचें स्वरूप वर्णितात,

मुख असे मुखीं । आरिसा दिसे उखी ॥
हे आपुली वोलखी । जाणे मुख ॥ ६५ ॥

जैसें ग्रीवास्थ मुख जें तें मुखाचे ठायीं असून आरशाचे ठायीं जें दिसतें तें उखी, वृथा होय, आणि ग्रीवास्थ मुख जें तें सत्य होय, ऐसी ओळखी मुखाचि

जाणतें; तैसा द्रष्ट्याचे रूपें श्रीगुरु जो तो आपण आपले ठायीं असून बुद्धीचे ठायीं प्रतिबिंबरूपें जाला जो चिदाभास जीव त्यातें मिथ्यात्वें वोळखून, आपलें पूर्वसिद्ध ब्रह्मरूप जें त्यातें वोळाखितो, साक्षात् करून अपरोक्षत्वें श्रीगुरुचि जाणतो. आतां श्रीगुरुचे ठायीं जाणतें आणि जाणवणें हे उभय धर्म आहेत ऐसें वर्णितात,

पाहे पां निरंजनिं निदेला । तो निर्विवाद येकला ॥
परि चेता चेवविता जाला । दोन्ही तोचि ॥ ६६ ॥

पहा हो हें आश्चर्य ! कोण्ही एक पुरुष जो तो निरंजनिं, विजनाचे ठायीं, शद्बरहित एकला निद्रिस्त झाला होता. तेथें कोणी जागें करायासि नाहीं, परंतु उत्थित काळीं जागा होणारहि आपणचि आणि जागे करणाराही आपणचि होय; त्या प्रकारें परमात्मा गुरु जो तो आपलें केवळ निरंजन स्वरूप ब्रह्म जें त्याचे ठायीं निर्विवाद होत्साता स्वरूपनिद्रा करिता जाला. तेथें कांहीं द्वैत राहिलें नाहीं. तेव्हां उत्थित काळीं जागा होणाराहि आपणचि आणि जागें करणाराही आपणचि होय.

जे तो चेता चेववी । तेंवि हा बुझे बुझावी ॥
गुरुशिष्यत्व नांदवी । ऐसेंनि हा ॥ ६७ ॥

जैसा परमात्मा जो तो योगनिद्रेंतून उत्थितकाळीं चेता, जागें होणारा, आणि चेवविता, जागें करणारा आपणचि होतो; तेंवि श्रीगुरु जो तो बुझे, शिष्य होऊन जाणतो, आणि बुझावी, देशिक होऊन जाणवितो. ऐसें गुरुशिष्यत्व जें तें आपलें ठायीं नांदवितो. अहो ज्ञानोबा, तुह्मी हा प्रकार जो सांगिजेला तो परम दुर्ज्ञेय होय, येथें आमची मति कुंठित झाली. यासि उत्तर सांगतात,

दर्पणेंवीण डोला । आपुलिये भेटिचा सोहला ।
भोगिता तरि लीला । सांगतों हें ॥ ६८ ॥

दर्पणावीण डोळयानें आपले भेटीचा सोहळा म्ह० सुखानुभव भोगिजे जैसा तैसा बुद्धिसंबंधावांचून द्रष्टा जो येणें आपलें पूर्वसिद्ध ब्रम्हस्वरूप जें त्याचे भेटीचा सोहळा म्ह० ऐक्यावबोधाचा सोहळा, सुखानुभव, घेतला असला तरी मी सांगतों हे लीला प्रतीतीस येईल. नाहीं तरि दुर्ज्ञेयचि आहे. सारांश पूर्ण वस्तूचा बोध असला तरि हा सिद्धांत समजेल, नाहीं तर समजणार नाहीं हा निर्धार. आतां हा श्रीगुरु द्वैत होऊं देत नाहीं आणि अद्वैतहि होऊं देत नाहीं ऐसें वर्णितात,

एवं द्वैता उमसों । नेदूनि ऐक्या विसकुसों ।
सोइरिकीचा अतिसो । पोखीतसे ॥ ६९ ॥

एवं, पूर्वोक्त प्रकारें द्वैताचा उमस, उदय, होऊं न देतां आणि ऐक्याची ऐक्यभावाची कुसमूस होऊं न देतां, गुरुशिष्यपणें सोईरिकीचा, प्रेमाचा, अतिशय पोखीतसे, वृद्धीतें पाववितसे.

निवृत्ति जेया नांव । निवृत्ति जेया बरव ॥
जेया निवृत्तिची राणीव । निवृत्तीसीं ॥ ७० ॥

श्रीगुरु जो यासि नामही निवृत्तिचि, आणि बरव, शोभा ही, निवृत्तीच आहे; आणि राणीव, राज्यही, निवृत्ति ह्म० स्वमहिमेचे ठायीं स्थिति आहे. आतां तत्ववेत्या जीवासारिखी याची निवृत्ति नाहीं ऐसें व्यतिरेक दृष्टान्तें सांगतात,

वांचोनि प्रवृत्तिविरोधें । निवृत्तीचेनि बोधें ॥
आणिजे तैसा बाधे । निवृत्ति नोहे ॥ ७१ ॥

तत्ववेत्यास प्रवृत्तीचा विरोध करावा लागतो, तैसा विरोध यास नको. तत्ववेत्यास नित्यनिवृत्त स्वरूपाचा बोध संपादून आपणासुद्धा संपूर्ण जगतावरि बाध, मिथ्यात्व, आणावें लागतें; म्हणून तैसा हा निवृत्ति नव्हे, कारण जे हा अविद्यावृत नाहीं ह्मणून.

आपणा देऊनि राति । दिवसा आणी उन्नती ॥
गोसांवी हा निवृत्ती । नोहे तैसा ॥ ७२ ॥

जैसी रात्रि जे ते आपणातें बळी देऊन दिवसातें उन्नती, योग्यतेस आणती; तैसी अविद्या जे ते बोधाप्रत आपणाला बळी देऊन तत्ववेत्याला उन्नतीप्रत, योग्यतेप्रत आणिते, आणि तत्ववेत्ता जो तो ब्रह्मविद्यारूपें तीचा उपकार मानितो. अस्तु गोसांवी, ब्रह्मविद्येचा स्वामी तैसा त्या जीवन्मुक्तासारिखा नव्हे. कारण जे हा नित्यमुक्तस्वभाववान् आहे ह्मणून. आणखीही तत्ववेत्यासारिखा श्रीनिवृत्ति नव्हे ह्मणून व्यतिरेकदृष्टान्तें सांगतात,

वोपसलेचें बल । घेऊनि मिरवे रत्नकील ।
तैसा नोहे हा निःखल- । चक्रवर्ती ॥ ७३ ॥

मंद तेजाचें रत्न असलें ह्मणजे जडे सोनार जें ते डांकाचें, तगटाची वोपसळ करून रत्नासि जडवितात, तेव्हां त्या रत्नाची कीळ, तेज, विशेषेंकरून मिरवतें, शोभतें जैसें, तैसें तत्ववेत्याचें द्रष्टृचैतन्य जें तें सामान्यरूप असतां ब्रह्मविद्येचें बळ, साह्यता जाली तेव्हां मी ब्रह्म होय ऐसें विशेषत्वें मिरवतें, ह्मणून आपणातें जीवन्मुक्तत्वें आणि कृतकृत्यत्वें मानितें. अस्तु, त्या प्रकारें हा श्रीगुरु नव्हे. तरि कैसा आहे ह्मणाल, तरि जैसा सर्व रत्नांचा राजा निःखलचक्रवर्ती अमोल्य हिरा जो तो वोपसळेचे साह्यतेवांचून प्रकाशित असतो, तैसा हा श्रीगुरु जो तो निःखलचैतन्यरूप, अलुप्तदृष्टि, नित्यमुक्तस्वभाववान् अशेष-विशेष-संबंध-रहित होय. आतां श्रीगुरु परमपुरुषरूपेंकरून वर्णितात,

गगन सुवोनि पोटीं । जैं चंद्राची पघले पुष्टि ॥
तैं चांदणिया उटी । अंगाचि कीजे ॥ ७४ ॥

ज्या वेळे आकाश जें तें पोटीं सुवोनि, पोटीं घेऊन, चंद्राची पुष्टि पघळे, चंद्राचा मोठेपणा विस्तारातें पावतो, त्या वेळीं चांदण्याची उटी चंद्राचे अंगासीच करिजेती; तैसा परमपुरुषरूपें गुरु जो तो संपूर्ण प्रपंच पोटीं घेऊन आपले भूमास्वरूपत्वें विस्तारातें पावतो, त्यावेळीं प्रकृति जे ते पुरुषाचे अंगींचि जिरूनि जाती.

तैसें निवृत्तिपणा कारण । हाचि आपणया आपण ।
फूलचि जालें घ्राण । आपुलिये दृति ॥ ७५ ॥

**अन्वय :—** फूलचि आपुलिये दृति घ्राण जालें तैसें हाचि निवृत्तिपणा आपणया आपण कारण ( होय ). फूल, तल्लक्षण अपंचीकृत गंध जो तो आपुलिये दृति, सुगंधी घ्यावयासाठीं घ्राणेंद्रिय होता जाला; तैसा श्रीगुरु जो तो ईश्वररूपें स्वमायेंकरून भोग्यभोक्ता होऊन उपभोग घेता जाला. आणि तैसा, त्याचि प्रकारें, स्वरूपनिद्राप्रसंगीं निवृत्ति, सर्वविसर्जन करावयासि आपणास आपण कारण, हेतु, असता जाला. आतां तत्वज्ञानी जो यासि परोक्षज्ञान व्हावयासाठीं शास्त्राची अपेक्षा आहे, तैसी या श्रीगुरुतें शास्त्रापेक्षा नको ऐसी व्यतिरेकें अभूत उपमा देऊन सांगतात,

दिठी मुखाचिये बरवे । जऱ्ही पाठिकडौनि फावे ।
तरि आरिसें धांडोळावे । लागती काइ? ॥ ७६ ॥

कोण्ही एकाचे दृष्टीस आपले मुखाचें बरवेपण जरी पाठीकडून फावलें, प्राप्त झालें, तरी मग त्यातें आपलें मुख पहावया आरसे धुंडाळावे लागतील काय? आरसे धुंडाळावे लागत नाहींत. तैसा परमात्मस्वरूप श्रीगुरु जो याचे ईक्षणरूप निजदृष्टि जे तीस पाठीमागील अपार अनंत भूमास्वरूपाचें बरवेपण नित्य प्राप्त आहे; आणि तत्वज्ञानियासि परोक्षज्ञानसंपादनार्थ शास्त्ररूप आरसे धुंडाळावे लागतात, तैसे या गुरूस आपले शुद्धस्वरूपाचें ज्ञान संपादावयास शास्त्रें हुडकणें नकोत, कारण जे हा श्रीगुरु नित्य आपणातें अपरोक्ष आहे ह्मणून. आतां तत्व-ज्ञानियाला आपण ब्रह्मरूप व्हावें लागतें, तैसें श्रीगुरुचे ठायीं नाहीं ऐसें व्यतिरेक-दृष्टान्तें सांगतात,

कां राती गेलिया । दिवस ज्ञान आलिया ।
काइ सूर्यपणें सूर्या । होआवें लागे? ॥ ७७ ॥

तत्वज्ञानी जीव जो त्यास अविद्या, तल्लक्षण रात्रि आहे तोंपावेतों स्वप्रकाश परमात्मा चित्सूर्य जो याचें दर्शन होत नसतें; ज्ञान, आणखी, तत्वज्ञान हाचि कोण्ही एक दिवस आलिया, प्राप्त झालियावरि, चित्सूर्य परमात्मा जो याचें अभे-दत्व होतें. परंतु परमात्मा श्रीगुरु जो याजला आपलें अभेदत्व व्हावें लागतें काय? अभेदत्व व्हावें लागत नाहीं. कारण जे नित्य आपण आपणातें अखंड स्फुरद्रूपाचि आहे म्हणून. आणखीहि तत्ववेत्ता जीव जो त्याहून गुरुचें वैलक्षण्य वर्णितात,

म्हणोनि बाध्य बाधौनि । घेपे प्रमाणें साधौनि ।
तैसा नोहे भरंवसेंनि । गोसांवी हा ॥ ७८ ॥

जीव जो तो मायेचे स्वाधीन होतो ह्मणून बाध्यरूप माया आणि मायाकार्य जें त्यातें बाधून, मिथ्या करून, शब्दप्रत्यक्ष–अनुमान–उपमान–अर्थापत्ति–अनुप-लब्धि या षट्प्रमाणेंकरून आपलें पूर्वसिद्ध ब्रम्हरूप जें त्यातें साधूनि घेतो, ब्रम्हरूप-त्वातें पावतो. तैसा श्रीगुरू त्या तत्ववेत्यासारिखा नव्हे. कारण जे भरंवसेंनि, निश्चयेंकरून, मायेचा गोसांवी, नियंता होय ह्मणून. आतां तत्वविदाचे निवृत्तप-णाहून या श्रीगुरुचें निवृत्त होणें विलक्षण होय ऐसें वार्णितात.

ऐसें करणियेवीण । स्वयंभ जें निवृत्तिपण ।
तेयाचे श्रीचरण । वंदिले ऐसे ॥ ७९ ॥

ऐसें, पूर्वोक्त रीतीकरून, करणियेवीण, साधनावांचून, स्वयंभ, पूर्वसिद्ध, जें निवृत्तिपण म्ह० कधींही प्रवृत्ति न होतां नित्यनिवृत्तत्वेंकरून स्थित जे गुरुमूर्ति तयाचे श्रीचरण वंदिले ऐसे. ते कैसे ह्मणाल, तरि सांगतों. नित्यनिवृत्त परमात्मा गुरू जो तोचि एकला सत्य आहे, मी म्हणून या श्रीगुरुवांचून कांहीं नाहीं ऐसा जो निर्धार हेंचि कोण्ही एक वंदन, नमन, होय, ऐसें वंदन करून तुम्ही विशेष काय केलें ? ऐशा आक्षेपीं उत्तर देतात,

आतां ज्ञानदेवो म्हणे । श्रीगुरुप्रणामें येणें ॥
फेडिलीं मियां ऋणें । चहूं वाचांचिं ॥ ८० ॥

आतां, अथशद्वार्थ मंगलवाचक तो आदिअंतीं असावा म्हणून या प्रकरणाचे अंतीं बोलिजेला; आणि तृतीय प्रकरण पुढें आरंभावयाचें आहे म्हणून आतां ऐसें बोलिजेला; आणि तृतीय प्रकरण पुढें आरंभावयाचें आहे म्हणून आतां ऐसें बोलिजेलें. ऐशा वंदनें करून विशेष काय केलें म्हणाल, तरि या नमनेंकरून मी ज्ञानेश्वर जो येणें परा-पश्यंती–मध्यमा वैखरी या चहूं वाचांचीं ऋणें, आभार फेडिले. अहो ज्ञानोबा, तुह्मी म्हणतात कीं चहूं वाचेचें ऋण म्या फेडिलें आणि वरकडांवरि वाचेचें ऋण राहतें काय ? ऐशा आक्षेपीं उत्तर पुढें तृतीय प्रकरणीं वाचेचें ऋण राहतें म्हणून विस्तारपूर्वक सांगणार तें श्रवण करावें.

॥ इतिश्री अनुभवामृते श्रीगु वंदनं नाम द्वितीयप्रकरणं समाप्तम् ॥

---

अनुभवामृतपदबोधिनी । निरंजनाची साबडी वाणी ॥
श्रीरघुनाथप्रसादें करूनि । ज्ञानेश्वरपदां अर्पिली ॥ १ ॥

श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

---

# अनुभवामृत—पद—बोधिनी.

## प्रकरण ३ रें.

श्रीगणपतये नमः । श्रीदत्तात्रेयाय नमः । श्रीज्ञानेश्वराय नमः । श्रीरघुवीरचरणारविंदपरागसेवन-भ्रमरीभूत, श्रीदत्तात्रेयलब्धप्रसाद, श्रीज्ञानेश्वरप्रेरित, निरंजनाख्य जो तो जीवन्मुक्त श्रोत्यांप्रत प्रार्थना करितो जे, तुम्ही श्रवण करावें. श्रीज्ञानेश्वर यांणीं श्रीगुरुप्रत वंदन करून चतुर्विध वाचेचें ऋण फेडिलें. आतां वाचेचें ऋण कैसें असतें तें सांगतात,

जियेचेनि बोभाटें । आत्मयाची झोप लोटे ॥
तरि ऋण न फिटे । जे चेणेंचि नीद कीं ॥ १ ॥

ज्या वाणीचे बोभाटें, गर्जनेकरून जीवात्मा जो त्याची झोप लोटे ह्म० अविद्या निवृत्त झाली तरि ऋण न फिटे, वाणीचा उपकार फिटत नाहीं. कारण जे, चेणें ह्म० तत्वज्ञान जें तें नीदच कीं, अविद्याच कीं! मुळीं मायेचें नाम अविद्या, तेव्हां तिचा भेद विद्या जे तिचेंही नाम अविद्याच होय. आतां अविद्याकार्य चतुर्विध वाणी ज्या त्या जीवास उपकारकर्त्या होत ऐसें सांगतात,

यऱ्हवीं परादि चौघी । जीवा मोक्षाचिये उपेगी ॥
अविद्यासवें अंगीं । वेंचति कीर ॥ २ ॥

यऱ्हवी, सहज रीतीनें पाहिलें तरी, परा-पश्यन्ती मध्यमा-वैखरी या अविद्याकार्य चतुर्विध वाणी ज्या त्या चिदाभासरूप जीव जो त्यास श्रवणादि साधनेंकरून मोक्षोपयोगी होऊन स्वकारण अविद्या जे तिजबरोबर अंगें, सर्वस्वें, वेंचतात कीर ह्म० परंतु वेंचत नाहींत ऐसा भाव पुढें सांगिजेल. आतां चतुर्विध वाणी ज्या त्या कोणते वेळेस कैशा वेंचल्या जातात हें दृष्टान्तें करून सांगतात,

देहासवें हातपाये । जाती मनासवें इंद्रियें ।
कां सूर्यासवें जाये । किरणजाल ॥ ३ ॥

जैसा देह कोठें गेला असतां त्याचे अंगभूत हातपायही जातात, तैसा मरण काळीं अविद्यायुक्त जीव जो तो स्वर्गनरकादि स्थानास गेला असतां त्याजबरोबर

चतुर्विध वाणी ज्या त्या त्याही जातात. जैसे मनासवें इंद्रियें जातात, तैसे मूर्च्छावस्थेंत ताडनादिकेंकरून प्राण एकवटले असतां बुद्धियुक्त चित्प्रतिबिंब जें तेंही लयाप्रत जातें, तेव्हां चतुर्विध वाणी ज्या त्याही त्याजबराबर जातात. किंवा सूर्य जो तो अस्ताप्रत गेला असतां किरण जाळ त्याजबरोबर जातें, तैसा गाढ सुषुप्तीचे ठायीं जीवात्मा जो तो सत्संपन्न होतो तेव्हां त्याच्या किरणभूत चतुर्विध वाणी त्याही लयाप्रत जातात.

नातरि निद्रेचिये अवधीं । स्वप्नें सरति आधीं ।
तेविं अविद्यासंबंधीं । आटती इया ॥ ४ ॥

अथवा जैसी निद्रा जे ती सरली असतां तीचे संबंधी म्ह० कार्यभूत स्वप्नें जे तिं पूर्वींच नाहींशीं होतात, तेविं तत्वज्ञानेंकरून अविद्या सरली असतां तीचे संबंधी म्ह० कार्यभूत परादिक वाणी ज्या त्याही आटतात, नाशातें पावतात.

परि मृतें लोहें होति । तियें रसरूपें जिती ॥
जळोनि इंधनें येति । वन्हिदशे ॥ ५ ॥

अविद्येबरोबर चाऱ्ही वाचा आटतात परी त्या ऐशा. जैसें लोहें म्ह० अनेक धातु मारल्या असतां रसायनरूपें वाचतात, तैसी ज्ञानियाचीं इंद्रियें जे तीं वैराग्येंकरून मारिलीं असतां समाधिकाळींचे रसास्वादनेंकरून वांचतात. किंवा इंधनें म्ह० काष्ठें जे तीं जळालीं असतां वन्हिरूपाचि होउनि असतात, तैसें ज्ञानियाचे मनबुध्यादि अंःतकरणवृत्ति ज्या त्या ज्ञानाग्नीमध्यें जळालीं असतां ज्ञानरूप होउनि राहतात.

लवण अंगें विरे । परि स्वादें जळिं उरे ।
मरोनि जागरें । जिये नीद ॥ ६ ॥

जैसा मिठाचा खडा जो तो पाण्यांत विराला तरि स्वादें म्ह० खारटपणेंकरून जळाचे ठायीं उरत असतो, तैसा ज्ञानियाचा चिदाभास जीव जो तो असंप्रज्ञात समाधिकाळीं गलित होतो, परंतु रसास्वादसुखानुभव घेऊन असतो. कशावरून ह्मटलें तरि उत्थित जाल्यावरि निजानंदाची अनुभूति सांगतो ह्मणून. किंवा निद्रा जे ती मरोनि ह्म० सरल्यावर ती जागृतीचे ठायीं स्मरणरूपें राहती. तैसी अविद्या जे ती तत्वज्ञानानंतर ब्रह्मविद्यारूपेंकरूनाचि वांचती.

तेविं अविद्यासवें । चौघी वेंचती जीवें ॥
परि तत्वज्ञानाचेनि नावें । उठती इया ॥ ७ ॥

तेविं, या प्रकारें अविद्यानिवृत्तीबरोबर जीवेंनसी चाऱ्ही वाणी ज्या त्या वेंचल्या जातात, परंतु तत्वज्ञानाचे नावें म्ह० तत्वज्ञानाचे मिषेंकरून उठतात.

आतां तत्वज्ञानदिवा । मरौनी इहीं लावावा ।
तऱ्ही तोहि सिना लेवा । बोध्यरूपें ॥ ८ ॥

आतां, असो, या चाऱ्ही वाणी ज्या इहीं आपण मरोनि जिज्ञासूचे ठायीं बोध्यरूपें म्ह० ज्ञातेपणेंकरून तत्वज्ञानाचा दिवा लावावा तरि तोही सिना लेवा, वेगळा लेपचि होय. कारण जे आपले ब्रह्मस्वरूपीं अज्ञान नसतां एक अज्ञान आहे ऐसें मानिलेंचि होतें, आणखी ज्ञातेपणही एक जोडलें म्हणून. आतां अविद्या जे ती उभयरूपें जीवास बंधकारक होय ऐसें सांगतात,

येऊनि स्वप्नें मेलवि । गेलिया आपणपें दावी ॥
दोन्ही दिठी नांदवी । नीद जैसी ॥ ९ ॥
जिति अविद्या तैसी । अन्यथाबोधें गिंवसी ॥
तेचि यथाबोधेंसी । निमाली उठे ॥ १० ॥

जैसी जीवातें निद्रा आली असतां नानाप्रकारचीं सुष्ट दुष्ट स्वप्नें मेळविती, भेटविती, आणि निद्रा गेली असतां आपणातें गेलेपणें दाखविती; ऐशा उभय दृष्टीतें एकलि निद्रा जीवातें दाखविती; तैसी अविद्या जीवातें प्राप्त असतां नानाप्रकारचीं सुखदुःखें दाखविती, आणि अविद्या गेलिया मी नाहीं ऐसें दाखविती; तैसी, त्याचि प्रकारें अविद्या जिवंत होती तेव्हां जीवातें अन्यथा बोधें, विपरीत ज्ञानें गिंवसिती, सांपडविती. आणि ते अविद्या निमाली, मेली, असतां यथाबोधेंसी म्ह० बोधासारखीच होऊनि उठती; बोधाहून भिन्न दिसत नाहीं.

परि जिती ना मेली । अविद्या हे न मोकली ॥
बंध-मोक्षीं घाली । बांधौनिया ॥ ११ ॥

प्रमात्यास तत्वज्ञान जालें आणि अविद्याही नाहींसी केली, परंतु जीत अथवा मेलेली ऐसी अविद्या जे ती जीवातें न मोकली, सोडीत नाहीं. तर काय करिती

ह्मणाल, तरि मी अज्ञानी आहे ऐशा अभिमानास बांधोनि घालिती; अथवा मी ज्ञानी आहे, मी मुक्त आहे, ऐशा अभिमानानें जीवातें बांधून घालिती. आतां मुक्ताभिमानी बोलतो,

मोक्षचि बंधु होये । तरि मोक्षशब्द कां साहे ॥
परि अज्ञानावरि त्राये । वाउगि हे ॥ १२ ॥

अहो ज्ञानोबा, मोक्ष जो आहे तोच्चि जरी बंध ऐसा होईल तरि मोक्ष ऐसा शब्द कां साहील ? म्हणजे मोक्ष जो त्याजला मोक्ष म्हणूं नये ऐसें जालें! यासि सिद्धांती उत्तर देतात; अरे मुक्ताभिमानी, ऐकतोस; पूर्ण ज्ञानी जे आहेत त्यांचे घरीं या मोक्ष शब्दास त्राय नाहीं, ठिकाणा नाहीं; परंतु अज्ञानी जन जे याचेवरी वाउगी, व्यर्थ, योग्यता आहे जे मोक्ष म्हणून कांहीं एक पदार्थ असेल ऐसें अज्ञानी मानितात.

बागुलाचेनि मरणें । तोखावें किं बालपणें ॥
येरां तोचि नाहीं मा कोणें । मानावा मृत्यु? ॥ १३ ॥

बागुल मेला म्हणून ऐकिलें असतां बालकाला संतोष वाटतो; आणि येर, त्या बाळकाहून अन्य प्रौढ शहाणा जो त्यास मुळीं बागुलचि नाहीं, मग त्याचा मृत्यु तो खरा कोण्ही मानावा ? तैसा अज्ञानी जो त्यास हा संसार खरा आहे आणि त्यायोगें मजला बंध आहे ऐसें श्रुतिवचनेंकरून ऐकत होता, आणि पुढें श्रुतिवाक्यें ऐकलें जे बंध नाहीं, तूं मुक्तचि आहेस; ऐसें ऐकुनी संतोष मानिता झाला. आणि अन्य पूर्णज्ञानी जो त्यास संसारचि खरा नाहीं, मग त्यायोगें बंध तो कैचा आणि मोक्ष तो कैचा असणार? पूर्ण ज्ञानियाचे दृष्टीनें बंध आणि मोक्ष हे दोन्हीही मिथ्या होत.

घटाचें नाहींपण । फुटलियाची नागवण ॥
मानिती ते जाण । ह्मणों येती? ॥ १४ ॥

जैसा मृद्विवर्त घट जो तो घटत्वेंकरून नाहीं, कां जे मृत्तिकाचि आहे म्हणून. ऐसा नाहींपणेंकरून प्रतीतीस येतो जो घट त्याचें फुटणें ह्म० नाहींसें होणें, त्याची नागवण, हानी, जे मानणारे त्यांतें ज्ञानी जे ते जाण ह्म० शहाणे म्हणतात काय ? नाहीं ह्मणत. तैसा चिद्विवर्त हा संसार तो संसारत्वें नाहीं; कां जे चैतन्यचि आहे

म्हणून. ऐसा नाहींपणेंकरून प्रतीयमान जो संसार त्याची हानी जाली ऐसें मानणारे जे त्यांतें श्रुतिज्ञानी ह्मणती काय ? ज्ञानी ह्मणत नाहीं, कारण जे ब्रह्मवस्तूचे ठायीं जगताचे भावाभाव नाहींत ह्मणून.

ह्मणौनि बंध तवं वावो । मा मोक्षा कें प्रस्तावो ।
परि मरौनि केला ठावो । अविद्या इया ॥ १५ ॥

श्रुतिसिद्धांतेंकरून एक अद्वितीय परमात्माचि आहे, म्हणून बंधचि वाच, मिथ्या; मग मोक्ष जो येणें कोठें रहावें ? जरि बंधमोक्ष—व्यवस्था कैसी जाली म्हणाल तरि आत्मस्वरूपिं नाहींत, परतु या अविद्येनें मरोनि बंधमोक्ष नामाला ठिकाणा केला आहे.

आणि ज्ञानबंधु ऐसें । शिवसूत्राचेनि मिसें ।
ह्मणितलें असें । सदाशिवें ॥ १६ ॥
वैकुंठिंचेही सुजाणें । ज्ञानपाशीं सत्वगुणें ।
बांधिजे हें बोलणें । बहु केलें ॥ १७ ॥

आणखी सदाशिव जो येणें शिवसूत्राचें मिष, उद्देश करून तत्वज्ञान जें तोचि बंध होय ऐसें म्हणितलें आहे. आणि भगवद्गीतेचे ठायीं वैकुंठवासी सर्वज्ञ कृष्ण जो येणें म्हणितलें असे जे, ज्ञान तल्लक्षण सत्वगुणात्मक पाशाचि होय, त्यायेगेंही जीवास बंध होतो, ऐसें बोलणें बहु केलें आहे.

परि शिवें कां श्रीवल्लभें । बोलिलें येणेंचि लोभें ।
मानूं तें, नव्हे, हें लाभे । न बोलतांही ॥ १८ ॥

परंतु शिव अथवा विष्णु यांनीं बोलिजेलें म्हणूनाचि ज्ञानबंध आह्मी मानितों ऐसें नाहीं. ते न बोलते तरि ज्ञानबंधरूप हें अर्थात् सिद्ध होतें.

जो ज्ञानमात्र निःखल । तोही घे ज्ञानाचें बल ।
तऱ्ही सूर्य चिंति सवल । तैसें नोहे ॥ १९ ॥

जो निःखळ ज्ञानमात्र, केवळ ब्रह्मस्वरूप आत्मा जो तोही ज्ञानाचें बळ, साह्यता जरि करून घेईल, तरि चित्सूर्य परमात्मा जो येणें सवळ वेळ ह्म० प्रबोध तल्लक्षण पहाटेची वेळ जे ते मनुष्यासारिखी चिंतिजेती, तैसें नव्हे काय ? तैसेंचि

जालें. सारांश, मुळीं परमात्मयासी ज्ञानाची अपेक्षा नसतां हा द्रष्टा जो तो ज्ञानाची इच्छा करतो, तेव्हां तो ज्ञानबंध नव्हे काय? तो ज्ञानबंधचि होय हें सिद्ध जालें.

म्हणौनि ज्ञानें श्लाघतु मोहे । तैं ज्ञानपण धाडिलें वायें ।
दीप वांचूनि दिवा लाहे । तैं अंग भुलला किं ॥ २० ॥

ऐसा द्रष्टा जो त्याचें परमात्मस्वरूप असतां मायाकार्य देहत्रय जें त्यांत प्रविष्टासारिखा होऊन मोहातें पावला, म्हणोनि ज्ञानाची श्लाघ्यता मानिता झाला. परंतु तेणें आपली मूळची ज्ञानस्वरूपता आहे ती वायां दवडिली कीं. कशावरून ज्ञानपण वाया दवडिलें म्हणाल, तरि दीप जैसा जो तो आपणास प्रकाशमान करावयासाठीं आपणावांचून अन्य दीपाची अपेक्षा करूं लागला, तेव्हां तो आपले प्रकाशमान अंगातें भुलला कीं नाहीं बरें? तो दीप आपले अंगातें भुललाच. तैसा द्रष्टा जो तो आपल्यास ज्ञान व्हावयासाठीं आपणावांचून अन्य ज्ञानाची अपेक्षा करूं लागला, तेव्हां तो आपलें पूर्वसिद्ध ज्ञानरूपत्वातें भुलला कीं नाहीं बरें? द्रष्टा जो तो आपलें ज्ञानरूपत्व भुलला ऐसेंच जालें. अहो ज्ञानी जो तो आपणातें जाणून आपण संतोषातें पावला तरि काय हानि आहे? यासि तीन वोवीकरून उत्तर सांगतात,

आपणापें आपणासी । नेणतां देशोदेशिं ।
आपणातें गिंवसी । हें कीर होय ॥ २१ ॥
परि बहुतां कां दियां । आपणपें आठविलिया ।
म्हणे मी मियां । कैसा रिझों ॥ २२ ॥
तैसा ज्ञानरूप आत्मा । ज्ञानेंचि आपुली प्रमा ।
करितां सोहमा । ऐसा बंधु ॥ २३ ॥

जैसा नवां जणांतें मोजून आपले ठायीं आपणातें नेणतां दशम पुरुष जो तो देशोदेशीं हिंडून आपणातें गिंवसि, आपण आपणातें सांपडवितो, हें कीर होय म० हें तर होईलचि. परंतु आपले ठायीं आपणातें आठविलियावरि मी जो तो माझ्या प्राप्तीनें कैसा रिझों, कैसा संतोष पावूं, ऐसें म्हणतो. माझा मी पहिलाचि होतों आतां नूतन सांपडलों ऐसा नाहीं; तैसा इंद्रियप्राणादिकांतें जाणून आपले ठायीं आपणातें नेणता द्रष्टा जो तो श्रवणमननादि साधनें करून आणि वेदांतशास्त्रविचारें

करून आपण आपणातें सांपडावितो हें तरि होईलचि. कारण जे, आपला आपण कधींही नाहींसा न होतां सर्वदा भासमान आहे म्हणून. आतां द्रष्टा जो तो ज्ञानरूप आत्मा असतां, ज्ञानेंकरून आपली प्रमा, ज्ञान, संपादून सोहं ह्म० सच्चिदानंदलक्षण परमात्मा जो तो मी होय ऐसा ध्यास करितां समाधियोगें संतोषातें पावतो. तस्मात् ज्ञानरूप आत्मा जो त्यास हा बंध होय. कारण जो तो आपला निजध्यास करीत नाहीं, आणि आपण सापडल्याचा संतोषहि मानीत नाहीं म्हणून. अहो ज्ञाता जो तो दृश्य-दृष्ट्त्वें अल्पज्ञान संपादून संतोष मानितो, तो पूर्ण स्वरूपाचें ज्ञान कां संपादीत नाहीं? यासि हेतू सांगतात,

जें ज्ञान स्वयें बुडे । म्हणौनि भारि नावडे ।
ज्ञानें मोक्षु घडे । तो निमालेनि ॥ २४ ॥

तत्पदलक्ष्य पूर्णचैतन्य जें त्याचे ठायीं ज्ञान जें तें ज्ञात्यासि घेऊन स्वयें आपण बुडतें, नाहींसें होतें. म्हणून पूर्ण स्वरुपाचें भारि ह्म० महान् ज्ञान जें तें कोण्हास आवडत नाहीं. कदाचित् पूर्ण वस्तूचे ज्ञानानें मोक्ष घडतो म्हणावा, तरि तो निमालेनि ह्म० ज्ञात्यानें सर्वस्वें मरावें तेव्हां, मोक्ष होणार. अस्तु, ऐसी अडचण आहे म्हणून अल्पज्ञानी जो तो पूर्ण वस्तूचें ज्ञान संपादित नाहीं, परंतु त्याजवरी वाचेचें ऋण राहतें ऐसें जाणावें. आतां ज्ञाता जो येणें चौवाचेचें ऋण कैसें फेडावें तें सांगतात,

म्हणौनि परादि वाचा । तो शृंगार चौअंगाचा ।
वेंचु अविद्याजीवाचा । जीवत्व-त्यागें ॥ २५ ॥

अविद्येचे बरोबर चाऱ्ही वाणी ज्या त्या मरोनि, तत्वज्ञानाचें मिष करून राहिल्या आहेत. म्हणोनि अविद्यात्मक जीव जो त्याचे जीवित्वाचा त्याग पूर्णवस्तूचें बोधें करून वेंच केला असतां चौ अंगाचा शृंगार ह्म० स्थूळ, सूक्ष्म, कारण, महाकारण या चौदेहाच्या शृंगारभूत परादिक चार वाणी ज्या त्यांचा वेंच म्हणजे नाश होतो. तेव्हां मग चहू वाचेचें ऋण फिटलें ऐसें जाणावें. आतां पूर्ण ज्ञानियावरि ऋण कैसें राहतें तें सांगतात,

अंगाचेनि इंधनें दाहसु । उठौनि ज्ञानाग्निप्रवेशु ।
करितां तेथें भस्मलेशु । बोधाचा उरे ॥ २६ ॥

देहचतुष्टय हेचि कोण्ही एक इंधनें त्यासहित दाहसु म्ह० दहन व्हावयासी योग्य ऐसा जो प्रमाता जीव तो विषयवासनेंतून उठून पूर्ण वस्तूचा अनुभव हाचि कोण्ही एक ज्ञानाग्नि जो त्याचे ठायीं प्रवेश करून भस्म होता जाला. परंतु जैसा कोण्ही जळून त्याची राख उडून गेली तरी दहनस्थानीं भस्माचा लेश उरतो, तैसा जीव जो तो मरण पावून भ्रमरूप अविद्या गेली तरी ज्ञानियाचे ठायीं बोधाचा लेश उरतो, तें ॠणशेष होय. तें ॠणशेष कैसें राहतें, त्यास ज्ञानियाचे समाधि आणि उत्थापन प्रसंगींचे चार दृष्टान्त सांगतात,

जळिं ना जळावेगळु । कापूर न दिसे आडळु ।
परि होऊनि परिमळु । उरे जेविं ॥ २७ ॥

कापूर जो तो जळांत घातला असतां जळाबाहेर दिसत नाहीं आणि आंतही राहत नाहीं; परिमळरूपें उरतो. तैसा ज्ञानियाचे असंप्रज्ञात समाधिकाळीं द्रष्टा जो तो बाहेर दृश्यातें पाहत नाहीं आणि ब्रम्हवस्तूचें द्रष्ट्रत्व करून रहात नाहीं. तरि काय होतो म्हणावें, तरि परमात्मस्वरूप होउनि उरतो. कारण जे समाधिविसर्जन जाल्यानंतर पुनरपि दृश्यातें पाहतो म्हणून.

अंगिं लावितां विभूति । परमाणु तितुके झडती ।
तरि पांडुरत्वें कांति । उरे जेविं ॥ २८ ॥

अंगासि विभूति लाविल्यावरि संपूर्ण परमाणु झडून शुभ्रपणें कांति जैवि उरति, तेविं ज्ञानियाचे असंप्रज्ञात समाधिकाळीं अनेक दर्शनातें सांडून दृष्टि जे ते शक्तिरूपें उरती.

ना वोहळा अंगिं जैसें । पाणी पाणीपणें नसे ।
तरि वोल्हासाचेनि मिसें । आर्थीचि कीं ॥ २९ ॥

ना, अथवा, उष्णकाळीं पाणी जें तें वोहळाचे अंगीं पाणीपणें तरि नाहीं; परंतु वोल्हासाचे, ओलाव्याचे, मिषेंकरून आर्थी, आहेचि कीं. तैसा चिदाभास जीव जो तो समाधिकाळीं नसतो म्हणून त्यास पारमार्थिक सत्यत्व तरि नाहींच, परंतु प्रारब्धाचें मिष करून व्यावहारिक सत्यत्वेंकरून जीवन असतेंच कीं. कारण जे समाधिविसर्जन जाल्यावरि ज्ञानियास प्रारब्धयोग होतो म्हणून.

नातरि मध्यान्हकालिं । छाया न दीसे वेगली ।
परि असे पायातालिं । रिगोनिया ॥ ३० ॥

अथवा कोण्ही एकाचि छाया जे ते मध्यान्हकाळाचे वेळेस शरीराहून वेगळी दिसत नाहीं, परंतु पायातळीं रिघून असती. तैसी ज्ञानियास अविद्या जे ती पूर्णज्ञानकाळीं दृश्यत्वेंकरून वेगळी दिसत नाहीं, परंतु अंत:करण उपाधिरूप होऊन चिदाभासाचे तळीं असती.

तैसें ग्रासूनि दुसरें । स्वरूपीं स्वरूपाकारें ॥
आपलेपणें उरे । बोधु जो कां ॥ ३१ ॥

पूर्वी चार वोवीनें सांगिजेलें तैसें, त्याप्रकारें, संपूर्ण द्वैतातें ग्रासूनि, उपसंहार करून, स्वस्वरूप ब्रम्हाचे ठायीं ब्रह्मासारिखा निर्विकार होउनि आपलेपणें उरतो जो कां बोध तो वाचेचें ऋणशेष होय. आतां बोध जो तो समाधिकाळीं आपलेपणें वेगळा उरतो, तो कशावरून म्हणाल तरि समाधींतून उत्थित जाल्यावरि मी अखंड परिपूर्ण अद्वितीय ब्रह्मस्वरूप होतों ऐशा अनुभवातें ज्ञानी स्मरतो म्हणून.

तें ऋणशेष वाचा इया । न फेडवेचि मरौनिया ॥
तें पायां पडौनि मियां ॥ सोडविलें ॥ ३२ ॥

तें, बोध तल्लक्षण ऋणशेष जें तें चतुर्विधा वाचा ज्या यांनीं मरोनिया न फेडवे, मरोनिही नाहींसें केलें जात नाहीं. अस्तु, ऐसें जें बोधरूप ऋणशेष तें मी ज्ञानेश्वर जो येणें पायां पडोनि सोडविलें. तें कैसें पायां पडणें म्हणाल तरि प्रथम प्रकरणाचे अंतीं वोवी जे " शिवशक्तिसमावेशें । म्यां नमन केलें ऐसें । रंभागर्भ आकाशें । रिघाला जैसा ॥ १ ॥, " आणि द्वितीय प्रकरणाचे अंतीं वोवी जे " ऐसें करणियेवीण । स्वयंभ जें निवृत्तिपण । तेयाचे श्रीचरण । वंदिले ऐसे ॥१॥," या वोवीचे अर्थ पूर्वी वर्णिजेले आहेताचि. आतां सारांश हाचि जे शिव आणि श्रीगुरु जो यातें नमन करावयासि गेलों तेथें मीच नाहींसा जालों. कारण जे, केवळब्रह्मवस्तूवांचून दुसरा पदार्थ नाहीं म्हणून. आतां या तृतीय प्रकरणाचा सारांश सांगतात,

ह्मणौनि परा पश्यंती । मध्यमा हान भारती ।
इया निस्तराविया लागती । ज्ञानेंचि पां ॥ ३३ ॥

जैसें कोण्ही एका लोभी सावकाराचें रीण कोण्ही एकानें घेतलें होतें, तें व्याजसुद्धां फेडिलें; परंतु त्यांतील एक कवडा देणें राहिला, तरि खतपत्र फाटत नाहीं. तैसें ज्ञानी जो येणें त्वंपदार्थ ज्ञान संपादिलें, तरि वाणीचा उपकार फिटत नाहीं, आणि तत्पदलक्ष्य पूर्ण ब्रह्माचें ज्ञान संपादिलें तरि वाणीचें बोधरूप ऋण शेष राहतेंच, आणि जन्मपत्रहि फाटत नाहीं. ह्मणूनि परा, पश्यंती, मध्यमा, भारती ह्म० वैखरी या चाऱ्ही वाणी ज्या त्या ज्ञानेंकरूनचि निस्ताराव्या ऐसें ज्ञानें करून निर्धारावें लागतें, ज्या ज्ञानेंकरून परादिक वाणी निस्तारिल्या जातात. तें ज्ञान तरि कैसें आहे ह्मणाल, तरि विस्तारपूर्वक पुढें चतुर्थ प्रकरणीं सांगिजेल.

॥ इतिश्री अनुभवामृते वाक्चतुष्टयऋणनिरसनं नाम तृतीयप्रकरणं समाप्तम् ॥

रघुनाथ अद्वैत सच्चिदानंद । त्याचे चरणकमळांचा मकरंद ।
सेवोनि निरंजन हा मिलिंद । गुंजारव करीतसे ॥ १ ॥

अनुभवामृतपदबोधिनी । निरंजनाची साबडी वाणी ॥
श्रीरघुनाथप्रसादें करूनि । ज्ञानेश्वरपदां अर्पिली ॥ २ ॥

श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

# अनुभवामृत-पद-बोधिनी.

## प्रकरण ४ थें.

श्रीज्ञानेश्वरायनमः । श्रीरघुवीरचरणारविंदपरागसेवनभ्रमरीभूत श्रीदत्तात्रियलब्धप्रसाद, श्रीज्ञानेश्वरप्रेरित निरंजनाख्य जो तो जीवन्मुक्त श्रोत्यांप्रत प्रार्थना करितो जे, तुह्मी श्रवण करावें. पूर्वी तृतीय प्रकरणाचे अंतीं प्रतिज्ञा केली जे, परादिक वाणी ज्या त्या ज्ञानेंकरून निस्ताराव्या लागतात, त्या ज्ञानाचा प्रकार आतां सांगतात,

आतां अज्ञानाचेनि मारें । ज्ञान अभेदें वावरे ॥
नीद सारौनि जागरें । नांदिजे जेंवि ॥ १ ॥

पुरुषाचे ठायीं जागर जे ते निद्रेस मागें सारोनि अभेदपणें नांदते जेंवि, तेंवि ज्ञानियाचे ठायीं तत्वज्ञान जें तें अज्ञानाचा मारा करून, नाश करून, ज्ञात्यासि अभेदपणें वावरते, वर्तते.

कां दर्पणिंचा निघाला । ऐक्यबोध पहिला ॥
मुख भोगी आपला । आपणचि ॥ २ ॥

कां अथवा; मुख, तल्लक्षण द्रष्टा जो तो; आपले ज्ञानरूपेंकरून बुद्धिरूप आरशाचे ठायीं प्रतिबिंबला होता. तेथून निघून पहिला ह्म० पूर्वसिद्ध आपला ब्रह्मैक्यबोध जो त्यातें आपण भोगितो. अहो, कोण्हीएकाचे मतें ऐसें आहे जे, ज्ञान जें तें अहंकारादि जगतासि आणि आत्म्यासि ऐक्य करिजेतें तें कैसें? यासि उत्तर देतात,

ज्ञान जिया तिया परि । जगिं आत्मैक्य करि ।
तैं सुरिया खोंचे सुरी । तैसें जालें ॥ ३ ॥

अरे, ज्या मताचा सिद्धांत तूं बोलतोस त्याप्रमाणें ज्ञान जें तें अहंकारादि जगतासि आणि आत्मयासि जरि आत्मैक्य करील, तेव्हां सुरीनें सुरी खोंचिली, टोंचिली, तैसें जालें. एका सुरीनें आपण आपणातें टोंचणें होत नाहीं, तैसें संपूर्ण जगत् आणि आत्मा मिळून ज्ञानस्वरूप परमात्मा एकचि आहे; तेव्हां तें ज्ञान जें तें आपण आपलें

ऐक्य कैसें करील ? आपलें आपणासि ऐक्य करणें घडत नाहीं. आतां विद्या-अविद्या-रूप बोध जो तो दों प्रकारचा ऐसें वर्णितात,

लावि आंत ठावोनि कोंपटा । तो सांधि आपणासकटा ॥
कां बांधे आपणया चोरटा । मोटेमाजि ॥ ४ ॥

जैसा कोसल्यांतील कीटक जो तो आपले मळाचें कोंपट, घर, जालेलें त्यांत ठावून बसून, बाहेर निघावयाचें द्वार लावितो, बुजितो; तैसा जीव जो तो अनादि वासनायोगें स्वकर्मनिर्मित स्थूळ देह जो त्यांत बसून पापपुण्यात्मक संकल्पयोगें मुक्तीचें द्वार बुजितो, आणि आपणातें बद्ध ऐसें मानितो. कां, अथवा, चोरटा ह्म० कावळ्याचे मोटेंतील कीटक जो तो अंग चोरोनि राहतो, परंतु त्या मोटेंतचि बांधला आहे; तैसा अल्पचैतन्यज्ञानी जो तो मायाकार्य देहत्रयात्मक पंचकोश जे त्यांतून व्यतिरेकें मार्गें सरकून आपलें द्रष्टृत्वरूपें अंग चोरोनि दृश्याहूनि वेगळा होऊनि राहतो. परंतु तो विद्यारूप मायेंतचि बांधला आहे. अस्तु, हा तृतीय प्रकरणीं ज्ञानबंध ऐसा सांगिजेला. आतां पूर्ण ज्ञानाचा प्रकार वर्णितात,

आगी पोतासाचेनि मिसें । आपणापें जाळिलें जैसें ॥
ज्ञानें अज्ञाननाशें । तैसें केलें ॥ ५ ॥

अग्नि जो येणें पोतासाचे ह्म० अनेक चिंध्यांचा केला जो पोत त्यातें जाळावयाचें उगेंच मिष मात्र केलें; परंतु त्या अग्नीनें आपणातेंचि जाळिलें जैसें; तैसा ज्ञानाग्नी जो येणें पोतासारिखा पंचमहाभूतांचा घडिलेला जो देह त्याचे नाशाचें मिष मात्र केलें. आणखी तैसें, त्याचि प्रकारें ज्ञान जें येणें अन्यथाज्ञानरूप अज्ञान जें त्याचे नाशाचें मिष मात्र केलें, परंतु तेणें आपलाचि नाश करून घेतला ऐसें जालें. आतां विशेष ज्ञानाचा प्रकार वर्णितात,

अज्ञानाचा टेंका । नसतांही ज्ञानाधिका ॥
फांके तंव उपखा । आपुला पडे ॥ ६ ॥

मी कोण आहे हें न कळणें ऐसें जें अज्ञान त्याचा टेंका, आश्रय, आहे ज्या अधिक ज्ञानास, तत्वज्ञानरूप विशेष ज्ञानास; अस्तु, न जाणणेंरूप अज्ञान जें तें ब्रह्मानुभवप्रसंगीं जेव्हां फांकतें, वितळून जातें तेव्हां आपुलाही उपखा पडे, तत्वज्ञानरूप अधिक ज्ञान जें त्यातेंही उपशांत होणें पडतें ह्म० नाहींसें होणें लागतें.

दशाहि ते निमालिया । येणें जें उवाया ॥
तें केवळु नाशावया । दीपाचे परी ॥ ७ ॥

जैसा दीप जो त्याचें तैल सरल्यावरी उदयाप्रत येऊन मोठा प्रकाशमान होतो, तो प्रकाश केवळ दीपाचे नाशार्थाचि होय. तैसा तत्ववेत्ता जीव जो त्याची ते पूर्वोक्त अज्ञानदशा निमालियावरि तत्वज्ञान जें तेणें उवाया, उदयाप्रत, जें येणें तें केवळ स्वनाशार्थचि होय. कारण जे ब्रम्हा अतिरिक्त कांहीं एक राहत नाहीं म्हणून. आतां तें कार्यसहित अज्ञान किती प्रकारचें तें चहूं दृष्टान्तेंकरून वर्णितात,

उठणें कीं पडणें । कचभाराचें कोण जाणे ॥
फांकणें कीं सुकणें । जाउलाचें ॥ ८ ॥

अनादि वासना हेचि कोण्ही एक आंविद्येचे कचभार, लंबायमान वेणीचे केश, त्यांचें उठणें किंवा पडणें, ह्म० वासना किती उत्पन्न होतात आणि किती विलयातें पावतात याचा ठिकाण नाहीं. आणखी जाणणें आणि नेणणें होचि कोण्ही एक जाउलें, एकावरिचीं आवळीजावळीं मुलें त्यांचें फांकणें म्ह० उत्पन्न होणें आणि सुकणें, नाहींसें होणें हें किनिदा होतें जातें याचा ठिकाण नाहीं.

तरंगाचें रूप येणें । तेयाचि नांव निमणें ॥
कां विजूचें उदैजणें । तोचि अस्तु ॥ ९ ॥

मनोरूप तरंग जो त्याचें संकल्परूपें उदया येणें कीं सवेंचि विकल्परूपें निमणें विलया जाणें होय. किंवा वीज तत्क्षण चित्तवृत्ति जे तिचा उदय होणें जो तोचि अस्त होय.

तैसें खाउनि अज्ञान । तंवरिच वाढे ज्ञान ॥
जंव आपुलें निधन । निःशेष साधी ॥ १० ॥

हें अनादि वासनादिचित्तपर्यंत अविद्याकार्य आणि तैसें, त्याचि प्रकारें स्वस्व-रूपाविषयक अज्ञान जें त्यातें खाउनि ज्ञान जें तें तोंवराचे वाढतें, वृद्धीतें पावतें; जोंवरि आपलें निधन, नाश, निःशेष साधीत नाहीं, करीत नाहीं तों पावेतों. सारांश पूर्वदृष्टान्तें करून सांगीजेला दीप जैसा तेल खाईतों पावेतों असतो, तैसें

तत्वज्ञान जें तें अज्ञानातें खाईतोंपावेतों असतें. आतां वस्तुतंत्र बोध जो त्याचा प्रकार वर्णितात,

जैसें कल्पांतिंचें भरितें । स्थला जला दोहींतें ॥
बुडविलियाअरौतें । राहोंचि नेणें ॥ ११ ॥

जैसें कल्पांतकाळीं उदकाचें भरतें जें तें कोरडे स्थळातें आणि जळातें बुडविल्याअरौतें, बुडविल्यावांचून राहों जाणत नाहीं, तैसा ज्ञानी ब्रम्हानुभव घेऊं गेला असतां ते ब्रम्हवस्तु जे ते संपूर्ण ज्ञाताज्ञानातें बुडविल्यावांचून राहूं जाणत नाहीं. सारांश ज्ञानाज्ञानासहित ज्ञाता जो त्यासहि ब्रम्ह जें तें नाहींसें करून टाकितें हा भाव.

कां विश्वाही वेगल । वाढे जैं सूर्यमंडल ।
तैं तेजतम निखल । तेंचि होये ॥ १२ ॥

अथवा सूर्यमंडळ जें तें विश्वाही वेगळ ह्म० संपूर्ण जगतापेक्षां मोठेपणें जेव्हां वाढतें, तेव्हां तेज आणि तम जें तें निखळ सूर्यमंडळरूपचि होतात. तैसें ज्ञानियाचें प्रत्यक् चैतन्य जें तें संपूर्ण विश्वापेक्षां परमात्मचैतन्यैंकरून जेव्हां वाढतें, विस्तारातें पावतें, तेव्हां ज्ञानाज्ञानें दोनी निखळ चैतन्यरूपचि होतात.

ना नीद मारौनि । आपणपेंहि नुरौनि ।
जागणें ठाके होउनि । जागणेंचि ॥ १३ ॥
तैसें अज्ञान आटौनिया । ज्ञान ये जैं उवाया ।
ज्ञानें ज्ञान गिळौनिया । ज्ञानचि होये ॥ १४ ॥

अथवा निद्रेतें नाहींसें करून प्रातःकाळींचें जागणें जें तें मी जागा झालों ऐशा स्मरणरूपें आपलेपणें न उरोनी केवळ प्रबोधरूप जागणें होउनि ठाके, राहतें; तैसें तत्वज्ञान जें तें मूळ अज्ञानातें आटोनिया, नाहींसें करून, आपण उदयाप्रत येतें आणि तें तत्वज्ञान जें त्यातेंही पूर्ण स्थितिचे ज्ञानानें गिळोनी केवल ज्ञानमात्र ब्रह्म जें तद्रूप होउनि राहतें.

तेव्हलिं पुनिवां भरे । ना अवंसे सरे ।
तें चंद्रिं उरे । सतरावी जैसी ॥ १५ ॥

जैसी पौर्णिमेचे दिवशीं अधिक होऊन भरत नाहीं आणि अमावास्येचे दिवशीं सरत नाहीं, उणी होत नाहीं, ऐसी जे सत्रावी कळा ते चंद्राचे ठायीं उरती; तैसी ब्रह्मविद्येच्या योगेंकरून वृद्धीतें पावत नाहीं आणि अविद्येच्या योगेंकरून क्षीण होत नाहीं, ऐसी ज्ञप्तिरूपा कळा जे ती ते वेळीं ह्म० असंप्रज्ञातसमाधिकाळीं द्रष्टा जो याचे ठायीं उरती.

कां तेजांतरें नाटोपे । कोणें तमें न वासिपे ॥
ते उपमेचे जाउपें । सूर्य नोहे? ॥ १६ ॥
म्हणौनि ज्ञानें उजळे । कां अज्ञानें रुळे ॥
तैसें नोहे निर्वाळें । ज्ञानमात्र जें ॥ १७ ॥

अथवा सूर्य जो तो अग्न्यादिक तेजांतरें जे त्यांस आटोपत नाहीं, कारण जे अग्न्यादि तेजांपेक्षा सूर्याचें तेज विशेष आहे ह्मणून; आणि सूर्य जो तो कोणत्याही तमेंकरून न वासिपे, आच्छादिला जात नाहीं; तैसा परमात्मा जो तो ईश्वरादिकांचिं ज्ञानांतरें जे त्यांस आटोपत नाहीं, कारण जे ईश्वरादिकापेक्षां परमात्मयाची शक्ति जे ते अधिक असून ज्ञानरूपा आहे म्हणून; आतां ऐसा परमात्मा जो तो या पूर्णज्ञानियासि उपमा द्यावयासि जाउपें ह्म० जोडपें नव्हे काय? उपमा द्यावयासि जोडपेंचि होय. म्हणोनि ज्ञानियाचें शुद्ध स्वरूप जें तें तत्वज्ञानें करून उजळत असेल, अथवा अज्ञानेंकरून रुळत असेल म्हणजे मलिन होत असेल, तैसें नव्हे; निर्वाळें ह्म० निर्मल ज्ञानमात्र जें ह्म० ज्ञानाज्ञानातीत केवळब्रह्म-स्वरूप होय म्हणून. आतां ज्ञानाभिमानी जो तो बोलतो,

परि ज्ञानपणें निखळें । तोंचि किं तेया कळे ॥
काइ देखिजे बुबुळें । बुबुळातें ॥ १८ ॥

अहो ज्ञानोबा, जीवकोटिनिविष्ट ज्ञानी आणि नित्यमुक्तस्वभाववान् अलुप्तज्ञान परमात्मा या उभयतांची समानता तुह्मी करितां, परंतु निखळज्ञानपणेंकरून आपण आहे तेंचि तया परमात्मयातें सर्वदा कळतें; तेव्हां जीवकोटिनिविष्ट ज्ञानियाची आणि परमात्मयाची समानता कैसी घडेल कीं? आतां सिद्धांती बोलतात जे ज्ञानियासि ब्रह्मीं विषय-विषयित्व करितां येत नाहीं आणि परमात्मयासिहि विषय विषयित्वेंकरून आपण आपणास जाणतां येत नाहीं, ह्मणोनि ज्ञान्याची समता होय. जैसें बुबुळ

जें तें अन्य घटादिकांतें देखतें, परंतु आपणातें पाहतें काय? आपणातें पहात नाहीं. तैसा ज्ञानस्वरूप परमात्मा जो तो आपले सर्वज्ञत्वेंकरून संपूर्ण जगतातें पाहून जाणतो, परंतु आपणातें जाणत नाहीं, कारण जे आपला विषय आपण होत नाहीं म्हणून.

आकाश आपणया रिघे। आगि आपणया लागे ॥
आपुला माथा वलगे। आपण कोणी? ॥ १९ ॥

आकाश जें तें सर्व पदार्थांत रिघतें, व्यापतें; परंतु आपणांत रिघेल काय? आपणांत रिघत नाहीं. तैसा निराकारत्वें परमात्मा जो तो संपूर्णासि व्यापितो, परंतु आपण आपणातें व्यापील काय? आपणातें व्यापीत नाहीं. आणि संहारकाळीं परमात्मा जो तो कालाग्निरूपें संपूर्णातें लागून जाळितो, परंतु आपणातें लागून जाळितो काय? आपणातें जाळीत नाहीं. आणि कोण्ही तरी अन्याचे माथ्यावरि वळघून राहील, परंतु आपण आपल्या मस्तकावरी कोण्ही वळघून राहील काय? वळघून राहणार नाहीं. तैसा परमात्मा सर्वांचे मस्तकावरि रक्षणार्थ अथवा शासनार्थ वर्तत आहे, परंतु आपले मस्तकीं वर्तेल काय? वर्तणार नाहीं.

दिठी आपणया देखे। स्वाद आपणया चाखे ॥
नाद आपुलें आइके। नादपण काई? ॥ २० ॥

जैसी नेत्रदृष्टि जे ती अन्य पदार्थांतें देखती, परंतु आपणातें देखेल काय? आपणातें पाहणार नाहीं; तैसी परमात्मयाची ईक्षणरूपा दृष्टि जे ती जगताचें ईक्षण करिते. परंतु स्वनिरीक्षण करिते काय? स्वनिरीक्षण करीत नाहीं. आणि स्वाद तल्लक्षण सर्वभोक्ता परमात्मा जो तो पदार्थाचा स्वाद घेतो, परंतु आपणातें चाखून आपला स्वाद घेतो काय? आपला स्वाद घेत नाहीं. आणि नाद तल्लक्षण वेद जो तेणेंकरून परमात्मा जो तो सर्वांतें स्वहित ऐकवितो, परंतु आपण आपणातें ऐकवितो काय? आपणातें ऐकवीत नाहीं.

सूर्य सूर्यातें विवले। कां फल आपणया फले।
परिपलु परिमळें। घेपत असे? ॥ २१ ॥

सूर्य जो तो संपूर्ण जगतास प्रकाशित करतो परंतु आपणातें विवळे, प्रकाशित करून घेतो काय? प्रकाशित करून घेत नाहीं. तैसा स्वप्रकाश परमात्मा जो तो

जगतातें प्रकाशित करतो, परंतु आपणातें प्रकाशित करीत नाहीं. अथवा फळ तल्लक्षण सर्वफळदाता परमात्मा जो तो अन्य जीव जे यांणीं विचारें करून ग्रहण करिजेतो; परंतु परमात्मा जो तो आपण आपलें ग्रहण करीत नाहीं. कारण जे एकत्वीं कर्म-कर्तृ-विरोध आहे ह्मणून.

तैसें आपणया आपण । जाणतें नोहे जाण ।
म्हणौनि ज्ञानपणेंवीण । ज्ञानमात्र जे ॥ २२ ॥

तैसें, त्याचि प्रकारें बुध्यादिकांतें जाणणारें ज्ञान जें तें आपलें केवल ज्ञानमात्र स्वरूप जें त्यातें आपण जाणत नाहीं. कारण जे केवल स्वरूपातें ज्ञेयज्ञातृत्वेंकरून जाणणें घडत नाहीं ह्मणून. ज्ञेयातें जाणणारें जें ज्ञान त्याजवांचून जे वस्तु तें ज्ञान-मात्र होय. आतां ज्ञानाभिमानी जो याजप्रत समजऊन सांगतात,

आणि ज्ञान ऐसी सोये । ज्ञानपणेंचि जरि साहे ।
तरि अज्ञान हें नोहे । ज्ञानपणेंचि ॥ २३ ॥

अरे ज्ञानाभिमानी, ऐकतोसि ? जाणणारें जें ज्ञान तेणें ज्ञानपणेंकरून ज्ञानमात्र वस्तुची ऐसी सोय जरि धरिली कीं मी ब्रह्मस्वरूप होय, तरि मग अज्ञान जें तेंहि ज्ञानपणें करूनाचि नव्हे काय ? अज्ञान जें तेंहि ज्ञानपणें करूनाचि होय. कारण जे अन्यथा ज्ञान जें तें अज्ञान होय म्हणून. आतां ज्ञानमात्र वस्तु जे ते आपणातें जाणत नाहीं ऐसें सांगतात,

जैसें तेज जें आहे । तें अंधारें कीर नोहे ॥
मा तेज तरि होये । तेजासि काई ॥ २४ ॥
म्हणौनि जाणणें नेणणें । हें नाहींच जेया होणें ॥
आतां मिथ्या ऐसें येणें । बोलें गमे ॥ २५ ॥

तैसें तेज म्हणून जो पदार्थ आहे तो तरि अंधार नव्होचि, कारण जे दोन्हीही विलक्षण आहेत म्हणून. मा, परंतु मी तेज आहे म्हणून तेजासि तरि ठाऊक आहे काय ? तेजासि ठाऊक नाहीं. तैसें स्वप्रकाश ब्रम्हवस्तु जें आहे तें तरि अज्ञान नव्होचि; परंतु मी स्वप्रकाश ज्ञानमात्र आहे म्हणून ब्रम्हवस्तूसि तरि ठाऊक आहे काय? ब्रह्मवस्तूसि ठाऊक नाहीं. म्हणोनि जाणणें नेणणें ह्म० ज्ञानाज्ञानें जे ते

जया ब्रह्मवस्तूसि होणें घडत नाहीं. आतां शून्यवादी बोलतो, अहो ज्ञानोबा, तुह्मी ज्ञानाज्ञानें ब्रह्मीं नाहींत ऐसें म्हणतां तेव्हां या बोलण्याचे योगेंकरून आह्मांस ऐसें गमतें ह्म० वाटतें जे तुमचें ब्रह्म मिथ्या होय. आह्मी शून्य म्हणतों तैसेंच तुमचेंही मतें सिद्ध जालें. आतां सिद्धान्ती शून्य- मताची विस्तारपूर्वक खंडना करितात,

कांहींच नाहीं सर्वथा । ऐसी जरि व्यवस्था ॥
तरि नाहीं हे प्रथा । कवणासि पां ॥ २६ ॥

अरे शून्यवादी, सर्वथा कांहीं नाहीं ऐसी तुझे मताची व्यवस्था, निर्धार, जरि आहे; तरि तुजला विचारितों जे कांहीं नाहीं ऐसी प्रथा ह्म० प्रमात्मक ज्ञान जें तें कोण्हासि पां, कोण्हासि आहे हें सांग. शून्यासि तरि नाहींपणाचें ज्ञान नाहींच, आणि नाहींपणाचें ज्ञान तरि होतें; तस्मात् आहे जो आत्मा त्यासचि नाहींपणाचें ज्ञान होतें ऐसें जाण.

शून्यसिद्धांतबोधु । कोण सत्ता होय सिद्धु ॥
नसताचि अपवादु । वस्तूसि हा ॥ २७ ॥

अरे नास्तिका, शून्य आहे ऐशा सिद्धांताचा जो बोध होतो तो कोणाचे सत्तेस्तव होतो हें सांग. आत्मा जो त्याचे सत्तेनेंच तुझे शून्यसिद्धांतबोधाचें अस्तित्व सिद्ध होतें. ऐसें असतां आत्मवस्तु नाहीं ह्मणोनि नसता, नाहीं तोच अपवाद दुर्भाषण, करितोसि!

मालवितां दिवे । मालविता जरि मालवे ॥
तरि दीप नाहीं हें फावे । कवणासि पां? ॥ २८ ॥

जैसा दिवे मालविता ह्म० नाहींसे कर्ता पुरुष जो तोचि जरि मालवे ह्म० नाहींसा होईल तरि मग आतां दीप नाहीं हें कोण्हासि फावे, कोण्हास समजेल? दीप नाहीं हें कोण्हासि समजतोंचि ना, आणि दीप नाहीं हें समजतें तरी खरें, तस्मात् दीप मालविणारा आहे ऐसें सिद्ध होतें. तैसा ब्रम्हानुभवेंकरून जीवदशा नाहींसी करणारा द्रष्टा जो तोचि जरि नाहींसा होईल तरि मग माझी जीवदशा गेली हें कोण्हासि कळतें? कोण्हासि कळतेंचि ना. आणि माझी जीवदशा गेली हें कळतें तरि खरें. तस्मात् तत्वज्ञानानंतर ज्ञानी जो तो असतोचि, नाहींसा होत नाहीं.

निदेंचे आलेपणें । निदेलें तें जाय प्राणें ।
तऱ्ही नीदभुली हें कोणें । अनुभवींजे ॥ २९ ॥

निद्रा आल्याबरोबर निजलेला पुरुष जो तो प्राणेनसि जरि जाईल म्ह० मेरल, तेव्हां नीदभुलि, निद्रासंबंधी विस्मृति जे ते कोण्हें अनुभवावी ? अनुभवायास कोण्ही राहणार नाहीं. आणि सुप्तिकाळीं मी कांहीं जाणत नव्हतों ऐसें अनुभवणें तरि आहे. कशावरून ह्मटलें तरि सुषुप्तींतून उठल्यावरि मी कांहीं जाणत नव्हतों ऐसें स्मरतो म्हणून. सारांश, सुषुप्तिकाळींही आत्मा नाहींसा होत नाहीं हा भाव.

घटु घटपणें असे । तद्भंगें भंगु आभासे ॥
सर्वथा नाहीं तेथें नसे । कोणें म्हणावें ? ॥ ३० ॥

म्हणौनि कांहीं नाहींपण । देखतां नाहीं आपण ॥
ऐसें न होनि असणेंपण । असणें जें ॥ ३१ ॥

भूतळाचे ठायीं घट आहे ह्मणोनि त्याचे भंगें करून भंग, घटाचा नाश जो तो भासतो; तैसें शबल ब्रह्माचे ठायीं संपूर्ण जगत् आहे म्हणोनि त्याचा नाश जाला असतां जगत् नाहीं ऐसें वाटतें. परंतु केवल ब्रह्माचे ठायीं संपूर्ण जगत् सर्वथा नाहीं, मग तेथें जगत् नसे तरि कोणें म्हणावें ? आतां केवल ब्रह्मीं जगत् सर्वथा नाहीं ह्मणोनि ब्रह्मीं कांहीं नाहींपण देखता जो द्रष्टा तोही आपण नाहीं. कारण जे दृश्य-भावाभावसापेक्षित द्रष्टृत्व होय म्हणून. अस्तु, हाहि विचार ज्ञानियाचे ठायींच वर्ततो. आणि ब्रह्म जें तें ज्ञानिया ऐसें न होनि आपलेपणेंकरून असणें जें असे त्यास शून्य कोण्हें म्हणावें ? आतां शून्यवादी जो तो बोलतो,

परि आणिका कां आपणया । न पुरेचि विषो होआवया ॥
म्हणौनिहि असावया । कारण कीं ॥ ३२ ॥

अहो, तुम्ही शून्य नाहीं म्हणतां आणि ब्रह्म आहे म्हणतां, परंतु तें अन्यास अथवा आपण आपणास विषय व्हावयापुरतें नाहीं ह्म० योग्य नाहीं. तेव्हां ब्रह्म आहे ह्मणून तरि काय प्रमाण ? यासि सिद्धांती सांगतात, अरे शून्यवादी, ऐकतोसि? ब्रह्मवस्तु जे ते अन्यास विषय होत नाहीं, आणि आपण आपणासहि विषय होत

नाहीं, म्हणोनिहि ब्रम्हवस्तु असावयासि कारण आहेच्चि. आतां परमात्मयाचा सद्भाव सांगतात,

जो निरंजनीं निदेला । आणिकें नाहीं देखिला ॥
आपलाही निमाला । आठऊ तेया ॥ ३३ ॥

परि जिवें नाहीं नोहे । तैसें शुद्ध असणें आहे ।
बोलणेंही न साहे । आहेनाहींपणाचें ॥ ३४ ॥

कोण्ही एक पुरुष जो तो निर्विवाद ह्म० शब्दरहित एकला जाऊन निरंजन जनरहित, स्थानाचे ठायीं निजता झाला; तो अन्यांनीं पाहिला नाहीं, आणि त्याजलाही आठव राहिला नाहीं जे मी निजलों म्हणून. परंतु तो पुरुष जो तो जीवेंनसी नाहींसा होत नाहीं, जिवंत असतो. तैसें, त्या प्रकारें, परमात्मा जो तो जगत्कल्पनारहित एकला अद्वितीयपणें निरंजन, केवलब्रह्मस्वरूपीं जाऊन स्वरूपनिद्रा करिता जाला, तो अन्यांनीं पाहिलाचि नाहीं. कारण जे स्वरूपनिद्रेचे आरंभींच संपूर्ण जगत् नाहींसें जालें होतें म्हणून. आणि त्या परमात्मियातें आपलाहि आठव राहिला नाहीं, परंतु तो नाहींसा होत नाहीं. त्याचे शुद्धब्रम्हस्वरूपत्वें असणें आहे, तेव्हां आहेनाहींपणाचें बोलणेंही सहन होत नाहीं; कारण जे तेथें ह्मणावयासि दुसरा कोण्ही नाहीं ह्मणून. अहो, त्यावेळीं परमात्मा आहे ह्मणून तुम्ही तरि कशावरून ह्मणतां ? यासि उत्तर,

दिठी आपणया मुरडे । तैं दिठीपणचि मोडे ।
परि नाहीं नोहे हें फुडें । जाणेचि किं ॥ ३५ ॥

जैसी कोण्ही एकाची दृष्टि जे ते आपणाकडेस मुरडतां, फिरली असतां, तिचा दृष्टिपणाचि मोडतो. परंतु माझी दृष्टि नाहींसी झाली नव्हती ऐसें फुडें, चांगलें, स्पष्ट जाणतोचि कीं. तैसी ईक्षण करणारी परमात्मयाची चिच्छक्ति जे ती स्वस्वरूप ब्रह्म जें त्याजकडेस मुरडती, तेव्हां ईक्षणरूपा शक्तिपणाचि मोडते; आणि स्वरूपनिद्राविसर्जन करून परमात्मा जो तो जगत् ईक्षण करावयासि लागतो तेव्हां माझी दृष्टि नाहींसी जालि नव्हती ऐसें हें स्पष्टत्वेंकरून परमात्मा जाणतोचि किं. आतां प्राकृतिक प्रलयाचे ठाईंचा ईश्वरसद्भाव सांगतात,

**काळा राहे काळवखा । तो आपणा ना आणिका ॥**
**न चोजवे तऱ्हि असिका । हा मी बाणे ॥ ३६ ॥**

जैसा कोण्ही एक काळा पुरुष जो तो गडद काळोखाचे ठायीं राहिला असतां तो आपण आपणास चोजवत नाहीं, दिसत नाहीं, आणि अन्यासहि दिसत नाहीं. तरि असिका ह्म० संपूर्ण अवयवत्वें हा मी होय ऐसें बाणे, समजतें. तैसा मायावी ईश्वर जो तो तमोरूप अव्याकृत प्रकृति जे तिचे ठायीं प्रळयकाळीं निराकारत्वें स्थित असतां तो आपण आपणातें साकारपणें पहात नाहीं, आणि अन्य कोण्हीही पहात नाहींत, कारण जे सर्वांचा उपसंहार जाला आहे म्हणून. अस्तु, ऐसेंही जालें तरी संपूर्णत्वें हा मी आहे ऐसें त्या ईश्वरातें बाणतें, समजताचि आहे. आतां पूर्वोक्त परमात्मयाचे आणि ईश्वराचे असणेपणाहून विलक्षण केवल ब्रह्मवस्तूचें असणेपण सांगतात,

तैसें असणें कां नसणें । हें कांहींचि माणुसपणें ।
नसौनि जें असणें । ठाये ठावो ॥ ३७ ॥

तैसें पूर्वीं वर्णिलें जें परमात्मा आणि ईश्वर या उभयांचें स्वरूप निद्राकाळीं आणि प्रळयकाळीं असणें आणि केवलब्रह्मीं परमात्मा आणि ईश्वर या उभयांचें नसणें हे दोन्हीही पूर्ण ज्ञानियासि वाटतें, परंतु हेंहि वाटणें केवल ब्रह्मवस्तूसि नसोनि, ठाये ठावो, आपले ठायीं आपण जें असणें आहे.

निखलपणें आपुला । आकाशाचा संचु उरला ॥
तो स्वयें असे, पुढिला । कांहीं ना कीं ॥ ३८ ॥

निखळपणेंकरून आकाशाचा संच जो उरला, तो स्वयें आपला आपण असे. तेव्हां मग पुढील वाय्वादिक भूतें आणि भौतिकें ऐसा जो कार्यवर्ग त्यास कांहीं होणें नाहींच कीं. तैसें, निखळपणें ब्रह्मवस्तूचा संच जो उरला आहे तो स्वयें आपला आपण असे. तेव्हां मग हिरण्यगर्भादि लिंगदेहपर्यंत जगताचे समुदायास कांहीं होणें नाहींच कीं. सारांश शुद्ध ब्रह्मीं जग कधींही जालेंचि नाहीं हा भाव. अहो, शुद्धब्रह्मीं नसो, परंतु शबल ब्रह्मीं तरि जग होतें जातें कीं? यासि उत्तर,

कां आंगिकें निर्मळपणीं । हारपलिया पोखरिणी ॥
तें आणिकावांचौनि पाणी । सगळेंचि आथी ॥ ३९ ॥

अथवा जिचे योगेंकरून पाण्यास अनेकत्व आलें होतें ती पोखरिणी, पुष्करिणी, कमळिणी ह्मणताहेत जीस ती हारपलिया, हरण केलियावरि, आंगिकें निर्मळपणेंकरून पाणी जें तें आणिकावांचून सगळेंचि आथी, सगळेंच आहे, उणें जालें नाहीं. तैसें चिच्छक्ति प्रकृति माया आदिकरून अनेकविध शक्तिरूपा कमळिणी जे तिचे योगेंकरून शुद्धब्रह्म जें तेंचि शबल ऐसें वाटलें होतें. अस्तु, ती अनेकरूपा शक्ति जे ती, तें ज्ञानेंकरून हरण केलें असतां निजांगें निर्मळत्वेंकरून ब्रह्म जें तें ज्ञानियासि द्वैतावांचून सगळेंचि, भेदरहित आहे. मग तेथें जगताचें होणें जाणें कैचें असणार?

आपणा भागु तैसें । असणेंचि जें असे ॥
आहे नाहीं ऐसें । सांडौनिया ॥ ४० ॥

आकाश आणि पाणी हे उभय दृष्टांत सांगितले. तैसें, त्या प्रकारें ब्रह्म वस्तु जे ते आपणा भागु, आपले स्वरूपेंकरून आहेचि. ते कैसी ब्रह्मवस्तु ह्मणाल, तरि नास्तिक शून्यवादी याचें ह्मणणें जे नाहीं, आणि आस्तिक याचें ह्मणणें जे आहे; ऐसें दोन्हीहि ह्मणणें सांडोनि सर्वदा असतचि असे. अहो, ज्ञानी जो तो विदेह कैवल्यानंतर काय होऊनि असतो, यासि उत्तर,

निद्रेचें नाहींपण । विझालिया जागरण ॥
असिजे नेणों कोण । होऊनिया ॥ ४१ ॥

तत्वज्ञानेंकरून निद्रा, तल्लक्षण अज्ञान जें तें नाहींसें जाल्यावरि, आणि जागरण, तल्लक्षण ज्ञानाचा दीप जो तो विझालियावरि, आणि ज्ञानियानें कोण होउनि असिजे हें आह्मी नेणों, जाणत नाहीं. कारण जे ज्ञानियाचें स्वरूप जंव जंव जाणावयासि लागावें, तंव तंव त्या स्वरूपास शबलत्व येतें ह्मणून. आतां ज्ञानी जो तो देहपातानंतर काय होउनि असतो, यासि उत्तर सांगावें तरि तें स्वरूप वाणीचा आणि मनाचा विषय नव्हे, तथापि उपलक्षणें करून सांगतात,

कां भुइं कुंभ ठेविजे । तैं सकुंभता आपजे ॥
तो नेलिया म्हणिजे । तेणेंविण ॥ ४२ ॥

परि दोन्हीहि भाग । न शिवती भूमिचें अंग ॥
ते वेळिं ऐसें चांग । चोख जें असणें ॥ ४३ ॥

कां अथवा, ज्ञानियाचा आणखी एक प्रकार, जैसा कुंभ जो तो भूमीवरि ठेवावा तेव्हां त्या भूमीस सकुंभता आपजे, भूमीस सकुंभता उत्पन्न होते; आणि तो कुंभ नेलियावरि तेणेंवीण भूमि आहे ऐसें बोलों येतें; परंतु कुंभाचें असणें आणि नसणेंपणाचे दोन्हीही भाग भूमीचे अंगासि शिवले नाहींत, तैसा संपूर्ण जगताचा अध्यारोप करावा तेव्हां शुद्ध ब्रह्म जें त्यासचि शबल ह्मणावें ऐसें बोलणें उत्पन्न होतें; आणि अपवाद केलियावरि सर्वोपाधिविवर्जित शुद्ध ब्रह्म ऐसें बोलों येतें. परंतु त्या संपूर्ण जगताचें असणें आणि नसणें हे दोन्हीही विभाग शुद्ध भूमास्वरूप ब्रह्म जें त्याचे अंगास शिवतले नाहींत आणि ब्रह्मास ठाऊकही नाहींत. कारण जे तें निर्विकार, अरूप, अनाम आहे ह्मणून. अस्तु, ऐसें, या प्रकारचें चांगलें चोख ह्म० शुद्ध निर्मळ जें असणें आहे तें ज्ञानियाचे तेवेळीं, विदेहकैवल्यकाळीं असणें असे. अहो, केवल ब्रम्हवस्तुसि नाम नाहीं म्हणतां, त्यास सच्चिदानंद ऐसें नाम आहे कीं? यासि उत्तर पुढें पांचवे प्रकरणीं सांगितलें जाईल.

॥ इतिश्रीमदनुभवामृते अज्ञाननिरसन-शून्यखंडनं नाम चतुर्थप्रकरणम् ॥

रघुनाथ अद्वैत सच्चिदानंद । त्याचे चरणकमळींचा मकरंद ।
सेवोनि निरंजन हा मिलिंद । गुंजारव करीतसे ॥ १ ॥
अनुभवामृत-पद बोधिनी । निरंजनाची साबडी वाणी ॥
श्रीरघुनाथप्रसादें करूनि । ज्ञानेश्वरपदां अर्पिली ॥ २ ॥

श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

# अनुभवामृत-पद-बोधिनी.

## प्रकरण ५ वें.

श्रीज्ञानेश्वरायनमः श्रीरघुवीरचरणारविंदपरागसेवनभ्रमरीभूत श्रीदत्तात्रेयलब्ध-प्रसाद श्रीज्ञानेश्वरप्रेरित निरंजनाख्य जो तो जीवन्मुक्त श्रोत्यांप्रत प्रार्थना करितो जे तुह्मी श्रवण करावें. आतां सत्, चित्, आनंद हे तीन्ही विशेषणें ब्रम्हवस्तूचीं आहेत आणि नाहींतहि ऐसें सांगतात,

तेंविचि सत्ता प्रकाश सुख । या तिहीं उणे लेख ॥
विखपणें विख । विषा नाहीं ॥ १ ॥

पूर्वी चतुर्थ प्रकरणीं वर्णिलें जे ज्ञानाज्ञानातीत चिन्मात्र वस्तु आहे परंतु त्या वस्तुसि ठाउकें नाहीं जे मी चिन्मात्र आहे म्हणून. तेंविचि मी सद्रूप, प्रकाशरूप; सुखरूप, आहे हेंहि वस्तुसि ठाउकें नाहीं. आणखी श्रुतिचे लेख तरि ऐसे आहेत जे सत्ताप्रकाश-सुख हे केवल वस्तुचे ठायीं उणीं आहेत. ते कैसीं म्हणाल तरि जैसीं विषपणें करून मारकत्वप्रतीति अन्य जीवास येती आणि मारकत्व विषाचें विषास नाहीं. तैसे वस्तुहून अन्य जे त्यांस चिन्मात्र वस्तूचे योगेंकरून बाध ह्म० मिथ्यात्व येतें, आणि चिन्मात्रवस्तुयोगें चिन्मात्रवस्तुचा बाध ह्म० मिथ्यात्व होत नाहीं. आतां सत्ताप्रकाशसुख यांची आटणी करावयासाठीं दृष्टान्तेंकरून परमात्मा आणि पुरुष यांची स्वरूपें सांगतात,

कांति-काठिण्य-कनक । तिन्ही मिळौनि एक ॥
द्राव-गोडी-पीयूख । पीयूष जेंवि ॥ २ ॥

जैसें कांति आणि काठिण्य आणि कनक ह्म० सुवर्ण, हे तिन्ही मिळून एक सुवर्ण होय तैसी चिच्छक्ति आणि संपूर्ण जगत् आणि परमात्मा हे तिन्ही मिळून एक शबल ब्रह्म होय. आणखी द्राव, गोडी आणि पीयूष हे तिन्ही मिळून एक पीयूष म्हणजे अमृत जेंवि तेंवि संपूर्ण जगत् आणि चिच्छक्ति आणि परमात्मा हे तिन्ही मिळून एक सच्छिदानंदलक्षण परमात्माचि होय.

उजाळ द्रति मार्दव । या तिहीं तिहीं उणीव ॥
देखिजे सावेव । कापुरीं एकीं ॥ ३ ॥

जैसा उजळपणा आणि दृती, सुगंधी, आणि मृदुत्व हे तिन्हीही सावेव एका कापुराचे ठायीं देखिजेतात आणि स्वयें कापुराचे ठायीं तिन्हीं उणीं आहेत; तैसा परमपुरुष जो तो एक असून अनेकत्वें साकारपणें नटला आहे, त्याचे ठायीं सत्व, चित्व, सुखरूपत्व हे तिन्हीही देखिजेतात. परंतु स्वरूपनिद्राकाळीं निराकार कापुराचे ठायीं हे तिन्ही उणीं आहेत. कारण जे पुरुष जो तो स्वरूपनिद्राकाळीं मी सद्रूप चिद्रूप सुखरूप आहे ऐसें स्मरत नाहीं म्हणून.

अंगें कीर उजाळ । उजाळ तोचि मवाळ ॥
दोन्ही ना परिमळ । मात्र जो कां ॥ ४ ॥

कापूर जो तो निजांगेंकरून उजळ आहे आणि उजळ तोचि मृदु होय. अथवा हे दोन्ही नाहींसीं झालीं तरि परिमळ मात्र असतो. तैसा पुरुष जो तो निजांगें-करून प्रकाशरूप आहे आणि जो प्रकाशरूप तोचि सुखरूप होय. अथवा स्वरूप-निद्राकाळीं हे दोन्हीही नाहींसी जालीं तरि स्वयें सुखमात्र असतो. कारण जे ती स्वरूपनिद्रा विसर्जन जाल्यावरि आपलें सुखमात्रत्व स्मरतो म्हणून.

ऐसीं इये कापूरपणीं । तिन्ही इयें तिन्ही उणीं ॥
इयापरी आटणी । सत्तादिकां ॥ ५ ॥

ऐसीं हे सांगिजेलिया प्रकारचीं कापूरपणाचे ठायीं उजाळ दृति मार्दव हे तिन्ही एके काळीं असतात, आणि एके काळीं हे तिन्ही उणेही आहेत. तैसा परमात्मा जो तो पुरुषपणेंकरून अवतरतो तेव्हां त्याचे ठायीं सत्ता प्रकाश आणि सुख हे तिन्हीही जगत्स्थितिकाळीं देखिजेतात. आणि स्वरूपनिद्राकाळीं सत्ता प्रकाश आणि सुख हे तिन्हीही उणीं ह्म० क्षीण असतात. कारण जे स्वरूपनिद्रा-काळीं आहे कोण्ही म्हणावें, प्रकाशन तें कोण्हाचें करावें आणि सुखानें कोण्ही अनु-भवावें, ऐसा प्रकार आहे ह्मणून. अस्तु, इयापरि सत्तादिकांची आटणी होय.

यऱ्हविं सच्चिदानंदभेदें । चाललीं तिन्ही पदें ॥
परि तिन्ही उणीं आनंदें । केलीं येणें ॥ ६ ॥

एरवीं, जीवाचे उद्धारासाठीं वेदवाक्याचे ठायीं सच्चिदानंद हे तीन पदें जे ते भेदें म्हणजे वेगळालीं चाललीं आहेत. परंतु हा आनंदरूप परमात्मा जो येणें स्वरूपनिद्राकाळीं आपले पूर्ण स्वरूपीं जाऊन उणीं केलीं, नाहींत ऐसीं केलीं. आतां सच्चिदानंदलक्षण परमात्मा जो तो एक आहे ऐसें सांगतात,

जे सत्ताचि प्रकाशु । प्रकाशचि सत्ता उल्हासु ॥
हें न निवडे मिठांशु । अमृतीं जेवि ॥ ७ ॥

सत्ता जे आहे तोचि प्रकाश आणि प्रकाश जो तोचि सद्रूपत्वें उल्हासातें, उदयातें पावला आहे. जैसा अमृताचे ठांईचा मिठांशु, मिष्टपणा निवडितां येत नाहीं, तैसा सत्ताप्रकाशरूप परमात्मा जो याजहून सद्रूपत्व अथवा चिद्रूपत्व वेगवेगळें निवडितां येत नाहीं. आतां पुरुषाचें स्वरूप सांगतात.

शुक्ल पक्षींचिया सोला । दिवसां वाढति कला ॥
परि चंद्र मात्र सगला । चंद्रिं जेविं ॥ ८ ॥

जैशा शुक्ल पक्षीं दिवसाचे ठायीं सोळा कळा ज्या त्या वाढतात, परंतु चंद्र जो तो आपले ठायीं आपण सगळाचि असतो; तसी अष्टधा प्रकृति जे ती सृष्टि-उपक्रम-काळीं व्यष्टि-समष्टित्वें वृद्धीतें पावती, आणि उपसंहारकाळीं क्षीण होती. परंतु परमपुरुष जो तो आपण आपले ठायीं वृद्धिक्षयरहित सगळाचि असतो. आतां सर्वेश्वर जो त्याचें स्वरूप सांगतात,

थेंबिं पडतां उदक । थेंबा धरों ये लेख ॥
परि पडिला ठायीं आणिक । वांचौनि आहे ? ॥ ९ ॥

वरून थेंब थेंब उदक पडूं लागतें, तेव्हां त्या थेंबाचा लेख, गणना केली जाईल. परंतु जेथें उदक पडतें तेथें उदकावांचून भिन्न भेद आहे काय, ज्या हेतूस्तव गणना केली जाईल ? भिन्नपणें उदकाचा प्रकार नाहीं जैसा तैसा सर्वेश्वर जो तो सृष्टिउपक्रमकाळीं आपले मायेकरून महत्तत्वापासून स्थूळदेहापर्यंत नटला आहे, त्याचा लेख, गणना, वेद जो येणें करिजेली जाईल, परंतु प्रळयकाळीं सर्वेश्वरावांचून दुसरें कांहीं आहे काय, ज्या हेतूस्तव वेदानें गणना केली जाईल ? दुसरें कांहीं नाहीं हा भाव.

तैसें असदाचिये व्यावृत्ति । सत् ह्मणों आलें श्रुति ॥
जडाचिये समाप्ति । चित्पण ऐसें ॥ १० ॥

दुःखाचिये सर्वनासें । उरलें तें सुख ऐसें ॥
निगदिलें निश्वासें । प्रभूचेनि ॥ ११ ॥

तैसें, त्याचि प्रकारें, आत्मा जो त्यास श्रुति ज्या यांनीं असद्रूप जगताचे व्यावृत्तीकरून, निवृत्ति करून सत् ऐसें ह्मणों आलें; आणि जडरूप जग जें त्याचे समाप्तीकरून आत्मा जो त्यास चित् ऐसें म्हणों आलें, आणि दुःख जें त्याचे सर्वस्वनाशें करून जें उरलें तें सुख होय ऐसें ह्मणों आलें. या प्रकारें श्रुतिवाक्येंकरून कोण्ही बोलिजेलें म्हणाल तर सर्व विश्वाचा प्रभू, स्वामी, परमात्मा जो त्याचे निश्वासरूप वेद जे त्यांनीं निगदिलें, निश्चयेंकरून बोलिजेलें.

ऐसीं सत्प्रतियोगियें । असदादि तिन्ही इयें ॥
लोटतां जाली त्राये । सत्तादिकां ॥ १२ ॥

ऐसें, या प्रकारचीं; असत्-जड दुःखें हे तिन्ही जे ते विवेकेंकरून लोटिलीं असतां त्याचे प्रतियोगी, विरोधी, सत्चित्-आनंद हें पदत्रय जें यास त्राय नाहीं, राहावयासाठीं ठिकाणा राहिला नाहीं.

एवं सच्चिदानंद । आत्मा हा ऐसा शब्द ॥
अन्य- व्यावृत्ति-सिद्ध । वाचकु नोहे ॥ १३ ॥

आत्मा जो तो सच्चिदानंदलक्षण होय ऐसा श्रुतिचा जो शद्ब तो आत्म्याहून अन्य जे अहंकारादिक त्यांची व्यावृत्ति, वेगळेपणा, दाखवावयाविषयीं सिद्ध होय, आत्मवस्तूचा वाचक नव्हे. अन्यथा घटासारिखा आत्मा जो तो वाच्य होईल !

सूर्याचेनि प्रकाशें । जें कांहीं आभासे ॥
तेणें तो दिसे । सूर्यु काई ? ॥ १४ ॥

जैसे सूर्याचे प्रकाशेंकरून घटादिक जे कांहीं असतील ते ते भासतात; परंतु घटादिक जे त्यांस सूर्य जो तो दिसतो काय ? सूर्य दिसत नाहीं. तैसें आत्मप्रकाशें-

करून महदादिक जगत् जें जें कांहीं असेल तें तें भासतें, परंतु त्या जगतास परमात्मा जो तो दिसतो काय ? दिसत नाहीं.

तेविं जेणें तेजें । वाचेसि वाच्य सुजे ॥
ते वाचा प्रकाशिजे । हें कें आहे ? ॥ १५ ॥

तेविं, त्याचि प्रकारें, ज्या तेजेंकरून वेदरूप वाचा जे तीस वाच्यत्व सुजे, घटादि वाच्य पदार्थ बोलावयासि येतात, त्या आत्मवस्तूला वेदरूप वाचा जे तिणें प्रकाशिजे ऐसें कोंठे तरि आहे काय ? ऐसे कोठेंहि नाहीं.

विषो नोहे कवणाही । जेया प्रमेयत्वचि नाहीं ॥
तेया स्वप्रकाशा काइ । प्रमाणें होति ? ॥ १६ ॥

जया आत्मयातें प्रमेयत्व, दृश्यत्वाचि नाहीं म्हणोनि आत्मा जो तो कोण्हासही ग्रहण करावयासी विषय होत नाहीं, आणि आत्म्याचे योगेंकरून प्रकाशित होणारीं जे प्रत्यक्षादि प्रमाणें ते तया स्वप्रकाश आत्म्याचें प्रकाशन करण्याविषयीं प्रवृत्त होतील काय ? प्रवृत्त होणार नाहींत.

प्रमेयपरिच्छेदें । प्रमाणत्व नांदे ॥
ते काइ स्वतः सिद्धें । वस्तुचे ठायीं ॥ १७ ॥

प्रमाता जीव जो त्यास विषय व्हावयासि योग्य ऐसें जें प्रमेय, घटादि पदार्थ, त्याचे परिच्छेदें, मर्यादेंकरून प्रमाणत्व ह्म० प्रमात्याची वृत्ति जे ती नांदत आहे. अस्तु, तें प्रमाणत्व जें तें स्वतःसिद्ध आत्मवस्तूचे ठायीं उपयोगीं पडणार काय ? वस्तूचे उपयोगीं पडणार नाहीं हा भाव.

ह्मणौनि सच्चित्सुख । हे बोल वस्तुवाचक ॥
नव्हति हे शेख । विचाराचे ॥ १८ ॥

आत्मा जो तो वाच्य नव्हे म्हणोनि सच्चित्सुख हे श्रुतिचे बोल जे ते आत्मवस्तूचे वाचक नव्हेति. तरि काय म्हणाल तरि, जैसा मरुत्त राजानें यज्ञ केला होता, त्याचें यज्ञशेष उरलें तें पांडवांचे अश्वमेध यज्ञाचे उपयोगीं पडलें; तैसे पूर्वाचार्य शुकवामदेवादिक जे त्यांणीं ज्ञानयज्ञ केला त्यांतील श्रुतीचे बोल जे तें विचाराचें

शेष उरलें आहे. तेचि उत्तरोत्तर ज्ञानियांचे उपयोगी पडतात. आतां तत्वज्ञानाचा प्रकार वर्णितात,

ऐसेनि इयें प्रसिद्धें । चाललीं तीन्ही पदें ॥
मग द्रष्टया स्वसंवादें । भेटति जेव्हां ॥ १९ ॥
तेव्हलिं वरिसौनि मेघ । समुद्र होऊनि वोघ ॥
सरे दाऊनि माग । हारपे जैसा ॥ २० ॥

पूर्वीं वर्णिजेलीं सत्, चित्, आनंद, ऐसीं हे तिन्ही पदें वेदांताचे ठायीं प्रसिद्धपणें चालिलीं आहेत. ते मग तत्वजिज्ञासा जालियानंतर द्रष्टा जो त्यास स्वसंवादें जेव्हां भेटति, साह्य होतात, तेवेळीं गुरुशिष्यसंवादप्रसंगीं जैसा मेघ जो तो वृष्टी करून नदीचे वोघरूपेंकरून, समुद्राचा माग दाखवूनि मेघ जो तो हारपे, निवृत्त होतो आणि नदीचा वोघही सरतो, नाहींसा होतो. तैसा वेद जो तो महावाक्यादि अवांतर वाक्यें जीं त्यांची वृष्टि करून चरमवृत्तीचे बोधरूपेंकरून द्रष्टा जो त्यास चित्समुद्राचा माग दाखउनि शब्द जो तो निवृत्त होतो; आणि चरमवृत्ति जे तेही सरती, नाहींसी होती.

फल विऊनि फूल सुके । फळपाकें रसु पोखे ॥
तोही रसु उफखे । तृप्तिदानीं ॥ २१ ॥

चूतवृक्षाचा महुर, तल्लक्षण फूल जें तें आम्रफळातें विऊन सुकतें, आणि तें फळ परिपक्व जाल्यावरि रस जो तो पोखे, पुष्ट होतो आणि तोही रस जो तो सेवनकर्त्यास तृप्ति देऊन उपखे, उपशमातें पावतो; तैसें चंचलदेहसंबंधी श्रवणमननादि साधन जें तें ऐक्यावबोधफळासि प्रसऊन क्षीण होतें आणि बोध जो तो परिपाकातें पावल्यानंतर अखंडैकरस ब्रह्मसुखानुभव पुष्ट होतो, आणि तोहि अनुभव ज्ञानियासि निरंकुशा तृप्ति देउनि उपशमातें पावतो.

आहुति अग्निआंतु । घालौनि वोसरे हातु ॥
सुख चेवौनि गीतु । उगें राहे ॥ २२ ॥

जैसा अग्नीमध्यें आहुतीस घालून हस्त जो तो वोसरतो, निवृत्त होतो, तैसा ज्ञानाग्नीमध्यें चिदाभास जीवाची आहुति घालून ब्रह्म मी होय ऐसा सात्विक अहं-

कार जो तो निवृत्त होतो. आणि गीत, मधुर आलाप, जो तो सुखातें चेववून जागवून उगा राहतो, तैसा वेद जो तो ज्ञानियासि सुखरूपतेविषयीं जागवून उगा राहतो.

नाना मुखा मुख दाउनी । आरिसा जाय निघौनि ॥
कां निदेलें चेवौनि । चेविर्ते जैसें ॥ २३ ॥

नाना, अथवा, निर्मळ आरसा जो तो ग्रीवास्थ मुखाला वास्तविक मुख दाखवून आपण निघून जातो, तैसी निर्मळ शुद्धसत्वात्मिका बुद्धि जे ते अवस्थात्रयाचा द्रष्टा जो त्याचें वास्तविक मूळचें ब्रह्मरूपत्व त्यास दाखउनि आपण निघून जाते. आणि जैसें निजलेलें मनुष्य जें त्यातें चेवाविर्ते, जागें करणारें जें तें चेववून ह्म० जागें करून निघून जातें, तैसें अनादिमोहरूप निद्रेकरून हृद्गुहेचे ठायीं निजलेलें जें चैतन्य त्यातें तत्वज्ञान जें तें स्वस्वरूपविषयीं जागें करून निवृत्त होतें.

तैसें सच्चिदानंद चोखटा । दाऊनि द्रष्टया द्रष्टा ॥
तीन्ही पदें लागति वाटा । मौनाचिया ॥ २४ ॥

तैसें, त्याचि प्रकारें, श्रुतिवाक्यांतील सत्-चित्-आनंद हे तीन्ही पदें जे ते देहत्रयाचा द्रष्टा जो त्यास सर्व जगाचा द्रष्टा परमपुरुष जो त्याचें चोखट, शुद्ध, स्वरूप ब्रह्म जें त्यातें दाखवुनी मौनाचे वाटेस लागतात, मुकाट्यानें राहतात हा भाव. अहो, ब्रह्मवस्तु जे ते वेदैकगम्य आहे, तव्हां वेद जो तो ब्रह्म वस्तूला बोलून दाखवीत असेल कीं? यासि उत्तर,

जें जें बोलिजे तें तें नोहे । होये तें तवं न बोलवे ॥
साउलीवरी न मववे । मविर्ते जैसें ॥ २५ ॥

वेद जो येणें विशेषणेंकरून विशेष्य जें जें कांहीं बोलिजे तें तें केवळ वस्तु नव्हे, आणि जें केवल वस्तु होय तें तंव वेदाच्यानें न बोलवे; कारण जे सर्वोपाधिविवर्जित वस्तु जें तें वाणीचा विषय नव्हे ह्मणून. अहो, ज्ञानदृष्टी जे ते दृश्यावरी विस्तारातें पावती तैसी ब्रह्मीं विस्तारातें पावत असेल कीं? यासि उत्तर; जैसें मविर्तें, मोजणारें मनुष्य जें तें आपले सावलीवरि उभें राहून मोजूं गेलें असतां त्यातें आपली सावली जे ते न मववे, मोजणें घडत नाहीं, तैसें द्रष्टृचैतन्य जें तें

आपले दृष्टीनें कल्पिलेलें जगत् जें त्यातें मोजूं गेलें असतां त्यास आपले दृष्टीनें मोजणें घडत नाहीं, कारण जे जंव जंव द्रष्टयाची दृष्टि जे ते दृश्यातें पाहती तंव तंव दृश्य जें तें वृद्धीतें पावतें ह्मणून.

मग आपुलियेकडे । मवितया से पडे ॥
तैं लाजलाजों आखुडे । मविती जैसी ॥ २६ ॥

मविता, मोजणारा जो त्यास कोण्हे एके दिवशीं आपलिये कडे से पडे, जेव्हां मोजावयाचा प्रसंग पडतो, तेव्हां मग मविती, मोजणाराची छाया जे ते, लाजलाजों आखडती जैसी; तैसा दृश्यातें नानात्वें करून मोजणारा द्रष्टा जो त्यास ब्रह्मजिज्ञासा जाल्यानंतर आपलें निजस्वरूप ब्रह्म जें त्याजकडे ज्ञानदृष्टीनें अवलोकन करून ते वस्तु किती आहे म्हणून मोजावयाचा जेव्हां प्रसंग पडतो तेव्हां मग ज्या दृष्टीचा कधींही लोप नाहीं ऐसी ही निजदृष्टि आहे परंतु ते लाजलाजों आखडती, कारण जे ते ब्रह्मवस्तु अनंत अपार आहे ह्मणून. आतां केवल ब्रम्ह सच्चिदानंद म्हणणें नाहीं हें सांगतात,

तैसें सत् चि स्वभावें । असत् तवं नोहे ॥
मा सत्त्व संभवे । सतासि काइ? ॥ २७ ॥

तैसें, त्या प्रकारचें केवल ब्रह्म वस्तु जे ते स्वभावता सत्चि आहे ह्म. काल-त्रयाचे ठायीं असत् होत नाहीं. मग सद्वस्तूसि सत्–त्व हा धर्म संभवेल काय? संभवणार नाहीं.

अचिदाचेनि नाशें । जें चिन्मात्र आलें दशे ॥
आतां चिन्मात्रचि मा कैसें । चिन्मात्रिं इये? ॥ २८ ॥

अचित्, मायाकल्पित जड पदार्थ जे त्यांचे नाशेंकरून ज्ञानियाचे अनुभव-प्रसंगीं जे वस्तु चिन्मात्रदशेप्रत आली, ब्रह्म वस्तु चिन्मात्र आहे ऐसें वाटलें. परंतु आतां जें चिन्मात्रचि असे त्याजला मी चिन्मात्र आहे हें कैसें वाटेल? वाटणार नाहीं.

नीद प्रबोधाचिये ठाईं । नसे तैसें जागणेंही ॥
तेविं चिन्मात्र काई । चिन्मात्रीं ये? ॥ २९ ॥

ज्ञानियाचा प्रबोध, अद्वितीय वस्तुबोध जो त्याचे टायीं निद्रा, तल्लक्षण अज्ञान नसे; तैसेंचि जागणें, तल्लक्षण तत्वज्ञान जें तेंही नाहीं. तेविं त्या ज्ञानियाचे प्रबोधासारिखे या चिन्मात्रवस्तूसी मी चिन्मात्र आहे म्हणून आपला बोध आहे काय? आपला बोध नाहीं.

ऐसें यया सुखपणें । नाहिं दुःख कीर होणें ॥
आतां सुखचि मा गणणें । सुखासि काई? ॥ ३० ॥

कोण्ही एकास सुख जालियावरि दुःख होत असे. ऐसें या ब्रह्मवस्तूस सुखपणें, सुखसापेक्षित दुःख होणें नाहींच. मग आतां सुखस्वरूप ब्रह्म जें त्यास सुख होणें तें काय? सुख होणें नाहीं, कारण जे सुखदुःखातीत ब्रह्मवस्तु सुखरूपाचि आहे ह्मणून.

ह्मणौनि सत् सत्-त्वें गेलें । चित् चित्-त्वें मावललें ॥
सुखा सुख जालें । कांहीं ना किं ॥ ३१ ॥

ब्रह्मवस्तु जे ते सद्रूप आहे म्हणोनि सत् त्वें करून श्रुतीचें बोलणें वाया गेलें, आणि ब्रह्मवस्तु चिद्रूप आहे ह्मणून चित्-त्वें करून श्रुतींचें बोलणें मावळलें, आणि ब्रह्मवस्तु सुखरूपाचि आहे म्हणोनि सुखाला सुख झालें हें घडत नाहींच कीं!

आतां द्वंद्वाची लवचक । सांडौनि दुणीचें कंचुक ॥
सुखमात्रचि एक । स्वयें आथी ॥ ३२ ॥

केवल ब्रह्म जें तें सुख अनंतर दुःख आणि दुःखानंतर सुख, ऐसी सुखदुःखांची लवचक, लटपट हे सांडुनी; आणि असत् जडदुःखसापेक्षित सच्चित्सुख हें दुणीचें कंचुक, आंगरखा, सांडुनी केवल वस्तु स्वयें सुखमात्रचि एक आथी, आहे.

वरि एकपणें गणिजे । तैं गणितेनसिं होय दुजें ॥
ह्मणौनि कांहीं न ह्मणिजे । ऐसें एक ॥ ३३ ॥

वरि, जरि, या ब्रह्मवस्तूतें एकपणेंकरून गणिजे, मोजिजे, तेव्हां गणितेनसि, मोजणारासहित ब्रह्मीं दुजेपण होतें, म्हणोनि कांहीं न म्हणावें ऐसेंचि एक होय. अहो, ब्रह्म जें तें आपण आपणातें सुखरूपत्वें अनुभवीत असेल कीं? यासि उत्तर,

सुखाआंतौनि निघणें । तैं सुखिया सुखी तेणें ॥
हें सुखमात्रचि मा कोणें । अनुभवावें? ॥ ३४ ॥

योगी जो तो निर्विकल्पसमाधि–काळीं सुखांत बुडी देवोनि असतो, आणि उत्थित जाल्यावरि सुखांतूनि निघणें घडतें, तेव्हां त्या समाधिकाळचे सुखानुभवेंकरून योगी जो तो आपणातें सुखिया ऐसें मानतो, आणि हें ब्रह्मस्वरूप तरि केवल सुखरूपचि आहे, मग सुख तें कोण्हें अनुभवावें? आपलें सुख आपण घेणें घडत नाहीं. कारण जे, ते ब्रह्मवस्तु निरंतर सुखरूपचि आहे म्हणून,

जैं प्रकृतिडंकु अनुकरे । तैं प्रकृति डंकीं अवतरे ॥
मा डंकुचि डंका भरे । ऐसें आहे? ॥ ३५ ॥
तैसें आपुलेनि सुखपणें । जेया नाहीं सुखावणें ॥
आणि नाहीं हेंही जेणें । नेणिजे सुखें ॥ ३६ ॥

प्रकृती, देवी जाणाई, तिचे डाकेचा अनुकार म्हणजे शब्द जेव्हां होतो, ते वेळीं प्रकृति जाणाई जे ते त्या डाकेच्या शब्दामध्यें अवतरूनि निजभक्ताचे ठायीं संचार करिती. मा, परंतु, जाणाईचा डंका जो तोचि आपले ठायीं आपण भरून संचार करितो ऐसें आहे काय? ऐसें नाहीं. तैसें शुद्धसत्वात्मिका प्रकृति ब्रह्मविद्या जे तिचा डंका हा वेद जो त्याचा शब्द जेव्हां होतो, तेव्हां ब्रह्मविद्या जे ते त्या वेदवाक्याचे ठायीं अवतरोनि जिज्ञासूचे ठायीं संचार करिती. परंतु वेद जो तो आपण आपणातें ब्रह्मविद्या उपदेश करितो ऐसें आहे काय? ऐसें नाहीं. त्या प्रकारें ब्रह्मसुखेंकरून ज्ञानी जे ते सुखी होतात, परंतु ब्रम्हवस्तूस आपले सुखपणेंकरून सुखावणें नाहीं. आणि अज्ञानियासारिखें सुखस्वरूप ब्रम्हवस्तु जे ते सुख पावत नाहीं ऐसें नाहीं. सारांश, सुख पावणें आणि सुख न पावणें हे उभयही नसून सुखस्वरूप ब्रम्ह आहे हा भाव.

आरिसा न पाहतां मुख । स्वयें सन्मुख ना विन्मुख ॥
तैसें नसौनि सुखासुख । सुखचि जें ॥ ३७ ॥

मुख तल्लक्षण द्रष्टा जो येणें बुद्धि तल्लक्षण आरशातें न पाहिलें असतां स्वयें द्रष्टा जो तो आपण आपणातें सन्मुखहि होत नाहीं, आणि विन्मुखहि होत नाहीं.

तैसें ब्रम्हवस्तुसि सुख आणि असुख, दुःख हे उभयहि नसोनि जे सुखरूपचि होय. अहो, प्रळयकाळीं तें ब्रम्हस्वरूप सुखरूप आहे हें तुह्मी कशावरून ह्मणतां? यासि उत्तर,

न लावितां उसु । तैं जैसेनि असे रसु ॥
तेथिंचा जो मिठांशु । तोचि जाणे ॥ ३८ ॥

उसाची लावणी केली नाहीं ते वेळीं बेणियाचे ढिगाऱ्यांत जैसा रस असतो, तैसा परमात्मा जो तो स्वरूपनिद्रेंतून तरि उत्थित जाला आणि सृष्टीची लावणी करावयासाठीं परमपुरुषत्व तरि पावला नाहीं. ते वेळीं सुखरूप केवळ ब्रह्म जें त्याचा मिष्टांश, अनंत सुखाचा एक अंश जो त्यातें रसास्वादेंकरून तो परमात्माचि एकला जाणतो, अन्यासि ठाऊक नाहीं.

कां न सज्जितां वीणा । नादु जेविं अबोलणा ॥
तेयातें तेणेंचि जाणा । होआवें जैसें ॥ ३९ ॥

कां, अथवा, वीणा जो तो तारा लाऊन सज्ज केल्याचे पूर्वीं त्यांत नाद आहेचि, परंतु तो नाद अबोलणा आहे जैसा; तैसा परमपुरुष जो तो स्वरूपनिद्रेंतून उत्थित झाला आणि त्रिगुणात्मक मायोपाधि ईश्वरत्वाप्रत तरि पावला नाहीं; ते वेळीं नादरूप वेद जो तो अबोलणा असतो. त्या वेदार्थातें परमपुरुष जो तेणेंचि जाणा होआवें, जाणावें. कारण जे त्यावेळीं अन्य कोण्ही जाणावयासि नाहीं ह्मणून.

ना ना पुष्पाचिया उदरा । न येतां पुष्पसारा ।
आपणचि भंवरा । होआवें पडे । ४० ॥

नाना, अथवा, पुष्पसार ह्म० अपंचीकृत गंध जो तो पंचीकृत होऊनि पुष्पाचे उदरीं आला नाहीं, तैसा ईश्वर जो तो प्राकृतिक प्रलयांतून उत्थित जाला आणि भूतसृष्टि तरि आरंभिली नाहीं. ते वेळीं ईश्वर जो तेणें आपणचि गंधादि विषय सेवन करावयासाठीं भंवरा, भ्रमर, व्हावें पडे, व्हावें लागे.

न रांधितां रससोये । ते गोडी कैसी आहे ।
हें पाहणें नोहे । आणिका जोगें ॥ ४१ ॥

परमेश्वर जो येणें अपंचीकृत भूतांचें पंचीकरणरूप रंधन केलें नाहीं, ते वेळीं

रससोय ह्म० पंच विषयांचें रसास्वादन कैसें आहे हें पाहणें आणिकाजोगें नव्हे. तरि परमेश्वर जो येणेंचि अनुभवावें,

तैसें सुख आपणपें येवों । लाजे आपले सुख पावों ।
तें आणिका चाखों सुवों । येईल काई? ॥ ४२ ॥

पूर्वी वर्णिले परमात्मा–पुरुष–ईश्वर जे तैसें, त्याप्रकारें, ब्रह्मवस्तु जे ते आपले सुखपणातें पावावयासि लाजते, आपण आपलें सुखग्रहणकर्ते होत नाहीं. मग ते ब्रह्मवस्तु जे ते आणिकास, अन्य जे त्यांस चाखों सुवों, चाखून ब्रह्मवस्तूचे आंत प्रवेश करितां येईल काय? चाखून प्रवेश करितां येणार नाहीं. अहो, स्वरूपनिद्राकाळीं परमपुरुष असतो हें कशावरून जाणावें? यासि उत्तर,

देहाचिये दुपारिं । चंद्रमा जैसा अंबरीं ।
तें असणें चांदाविरि । जाणावें किं ॥ ४३ ॥

तत्वज्ञान, तल्लक्षण दिवस जो त्याचे दुपारीं, असंप्रज्ञात समाधिकाळीं चंद्र, तल्लक्षण द्रष्टा जो तो निजदृष्टिरूप प्रभा जे ते क्षीण होऊनि चिदाकाशाचे ठायीं असतो. तैसा परमपुरुष जो तो स्वरूपनिद्राकाळीं शुद्धचिदाकाश ब्रह्म जें त्याचे ठायीं प्रकृतिक्षीण होऊनि असतो. तें परमपुरुषाचें असणें चांद, तल्लक्षण द्रष्टा जो त्याज-वरून जाणावें कीं. आतां नास्तिकवादी बोलतो,

रूप नाहीं तैं लावण्य । अंग नुठि तैं तारुण्य ।
क्रिया नसे तैं पुण्य । कैसें असे? ॥ ४४ ॥

अहो ज्ञानोबा, जसें रूप नाहींसें जालें असतां मग लावण्य कैचें राहणार? तैसें प्राकृतिक प्रळयकाळीं रूप आहे श्रेष्ठ जें तें ज्यामध्यें ऐशा ज्या तन्मात्रा त्या नाहींशा जाल्यावरि प्रकृतीचें लावण्य चांगुलपण तें कैचें राहणार? आणि अंगचि नुठी, अंग न उत्पन्न जालें असतां तारुण्य तें कैचें होणार? तैसें प्रलय जाल्यानंतर विराट् रूपें परम पुरुषाचें अंगचि न उत्पन्न जालें असतां तारुण्य ह्म० जगताचा स्थितिकाळ तो कोठून होणार? आणि उपक्रम-उपसंहार-रूप क्रियाचि नसे तेव्हां पुण्य, तल्ल-क्षण पुरुष जो तोहि कैसा असेल? सारांश, प्रलय जाल्यानंतर कांहींच रहात नाहीं हा भाव. आतां सिद्धांती उत्तर देतात,

जैं मनाचा अंकुर नुदैजे । तैंचेनि मकरध्वजें ।
असणें हें न साजे । तऱ्ही तेंचि घडे ॥ ४५ ॥

सुषुप्तिकाळीं संकल्प-विकल्परूप मन जें त्याचा अंकुर उदयातें पावला नाहीं जेव्हां त्यावेळचा मकरध्वज, काम, जो त्याचें असणें साजत नाहीं जरि, तरि जागृतिकाळीं तेंचि घडे; मनाचा अंकुर उदयातें पावल्यानंतर कामाचें असणें साजतें जैसें तैसें प्रळयकाळीं महत्तत्वाचा अंकुर उदयातें पावत नाहीं तेव्हां परमपुरुषाचा जगत्कल्पनारूप काम जो त्याचें असणें साजत नाहीं जरि, तरि सृष्टि—उपक्रमकाळीं तेंचि घडतें; महत्तत्वाचा अंकुर उदयातें पावल्यानंतर जगत्कल्पनारूप परमेश्वराचा काम जो त्याचें असणें साजतें, शोभतें.

कां वाद्यविशेषाचिये सृष्टि । जैं जन्म नये हृष्टि ।
तैं नाद ऐसी गोठी । नादाचि जोगी ॥ ४६ ॥

अथवा वाद्यविशेष जो सारमंडळ त्याचे शब्दाची सृष्टि जे ते प्रकट न होतां ऐकणारास हृष्टि, हर्ष उत्पन्न होत नाहीं. परंतु नाद व्हावयाऐसी नादाची गोष्टी तेथें आहेचि. तैसें प्रळयकाळीं वेद जो त्याची शब्दाची सृष्टि जे ते प्रगट न होतां कोण्हास हृष्टि, हर्ष उत्पन्न होत नाहीं. कारण जे त्या वेळेस शब्दहि नाहीं आणि ऐकणाराहि नाहींत ह्मणून. परंतु जिज्ञासूतें विचार व्हावया ऐसी गोठी, इतिहास तेथेंचि आहे.

नाना काष्ठाचेया विटाला । वोसरलिया अनला ।
लागणें तें केवला । अंगासीचि ॥ ४७ ॥

नाना, अथवा; अनळ, अग्नि जो तो काष्ठाचे विटाळा, स्पर्शापासून वोसरलिया, निवृत्त जालियावरि, मग अग्नि जो येणें पंचमहाभूतांतील केवल निजांग तेज जें त्यासि लागणें घडतें. तैसा स्वरूपनिद्राकाळीं पुरुष जो तो अष्टधा-प्रकृति-संयोगापासून निवृत्त जालियावरि मग पुरुष जो येणें नित्य प्रकाशमान केवळ निजांग-ब्रह्मस्वरूप जें त्यासींच एकीभावत्व पावणें घडतें. अहो ज्ञानी जो तो कोणते प्रकारें स्वस्वरूप ब्रह्माचे ठायीं प्रेम ठेवतो हें सांगावें; यासि उत्तर,

दर्पणाचिये नियमें । वीण मुखिं प्रेमे ।
आणिजे ते क्रमे । वर्मे येणें ॥ ४८ ॥

जैसा कोण्ही एकास दर्पण पहावयाचा नेम होता, तेव्हां त्या दर्पणांत आपलें मुखाचें चांगुलपण पहात होता. मग तेणें दर्पणाचे नियमावांचून क्रमेंकरून निज-

मुखाचे ठायीं प्रेम आणिजेतें. तैसा अवस्थात्रयाचा ज्ञाता द्रष्टा जो तो निजदृष्टीनें सत्वरूपा बुद्धि जे तिचे ठायीं आपलें प्रतिबिंब चिदाभास जो त्यातें पाहून तो मीच होय ऐसें अज्ञानेंकरून पहात होता. मग तत्वज्ञानप्रसंगीं द्रष्टा जो येणें बुद्धिरूप दर्पण पहावयाचा नियम टाकून प्रत्यक्प्रवण ज्ञानदृष्टीनें क्रमेंकरून येणें वर्मे, या युक्तीनें ब्रह्माचे ठायीं प्रेम आणिजेतें. तें कैसें म्हणाल तरि तें ऐसें. सर्वसामान्य परमपुरुष जो त्याचा विशेष भाग मी द्रष्टा होय आणि जैसें परम पुरुषाचें मुख्य स्वरूप केवल ब्रह्म, तैसोंचि माझेंही स्वरूप केवल ब्रह्म होय. सारांश, ज्ञानी जो येणें स्वस्वरूप ब्रह्म जें त्याचे ठायीं निरतिशय प्रेम या प्रकारें ठेविजेतें हा भाव. आतां संपूर्णास आदिकारण शबल ब्रह्म जें त्याचें स्वरूप सांगतात,

न पेरितां पीक जोडे । तें मुडांचि आहे रोकडें ।
ऐसिया सोई उघडे । बोलणें हें ॥ ४९ ॥

जैसें बीज जें तें क्षेत्राचे ठायीं न पेरितां रोकडें पीक मुढ्याचे ठायीं आहेचि ऐसें कृषीवळातें जोडे, प्राप्त होतें; तैसें जगत्कारण परमात्मा आणि पुरुष आणि ईश्वर हे आपलालें क्षेत्र चिच्छक्ति-प्रकृति-माया ज्या यांचे ठायीं जगदाकार विस्तारातें न पावतां रोकडे, स्पष्टपणें शबलब्रह्माचे ठायीं आहेत, ऐसें ज्ञानियाचे अनुभवें-करून जोडे, प्राप्त होतें.

एवं विशेष सामान्य । दोन्हितें नातले चैतन्य ॥
जे भोगिजे अनन्य । तेणेंसि सदा ॥ ५० ॥

पूर्वी सांगिजेलें एवं, या प्रकारें, शबल ब्रह्म जें तें, महत्तत्वापासून स्थूळदेहपर्यंत सृष्टि-उपक्रमकाळीं संपूर्ण जगदाकार होणें जें तें विशेषत्व आणि स्वरूपनिद्राकाळीं आणि प्रळयकाळीं परमात्मा पुरुष आणि ईश्वरत्वें जें असणें तें शबल ब्रह्माचें सामान्यत्व होय. अस्तु, या प्रकारें विशेषसामान्यत्व जरि जालें तरी या दोन्हीसी शुद्ध चैतन्य केवल ब्रह्म जें तें नातळे, स्पर्शलेंहि नाहीं. कारण जे तें अस्पर्श निर्विकार अचल आहे ह्मणून. तें ब्रह्म कोणतें ह्मणाल तरि जें ज्ञानियानें अनन्यत्वें, त्याजहून भिन्न न राहतां, सदा सर्व काळ तेणेंसी एकपणें भोगिजेतें.

आतां इयावरि जें बोलणें । तें येणेंचि बोलें साहणें ॥
जे मौनाचें हि पढणें । पिऊनि गेलें ॥ ५१ ॥

आतां या उपरांतिक जें बोलणें बोलावयाचें होईल, तें या बोलण्याप्रमाणेंचि साहणें, आवधारण करावें. कां जे मौनाचें ह्म० अवाङ्मनसंगम्य केवल ब्रह्म वस्तूचें पढणें, उपनिषद्रूप पढणें, जें त्यातेंहि माझें बोलणें पिऊन गेलें ह्मणून.

एवं प्रमाणें प्रमाण । येणें केलें अप्रमाण ॥
दृष्टान्तें वायिली आण । दिसावयाची ॥ ५२ ॥

एवंप्रमाणें, या प्रकारेंकरून, शद्ब-प्रत्यक्ष-अनुमान उपमान-अर्थापत्ति-अनुपलब्धि हे षट् प्रमाणें जे तीं केवल ब्रह्म जें येणें अप्रमाणें केलीं, मिथ्यत्वाप्रत पावविलीं. कारण जे केवल ब्रह्मीं या प्रमाणांची गति नाहीं ह्मणून. आणि संपूर्ण दृष्टान्त जे यांणीं तरि दिसावयाची आण, शफतचि, वाहिली जे आह्मी केवल ब्रह्मवस्तूसारखे नाहींत ह्मणून.

जेथें अंगाचीच अनुपपत्ती । म्हणौनि आटलिया उपपत्ती ॥
तेथें उठिल्या पांती । लक्षणाचिया ॥ ५३ ॥

न्यायशास्त्राचे ठायीं उपपत्ति ह्म० युक्ति ज्या त्या जेथें अंगाची उपपत्ती, प्राप्ती, असती तेथें उपयोगी पडतात; आणि जेथें, ज्या ब्रह्मवस्तूचे ठायीं अंगाचीच अनुपपत्ती, ह्मणोन युक्तिही आटोनि गेल्या, नाहींशा झाल्या. आणि तटस्थलक्षणा, स्वरूपलक्षणा, जहल्लक्षणा, अजहल्लक्षणा जहदजहल्लक्षणा आणि लक्षित लक्षणा या संपूर्ण लक्षणा ज्या त्या ब्रह्मवस्तूचें लक्षण सांगावयासाठीं न्याय-वेदांत शास्त्रांचे ठायीं पांती, पंक्तिनें बसल्या होत्या त्या उठोनि गेल्या. कारण जे अलक्ष्य वस्तु जे ते लक्षणेंकरून लक्षिली जात नाहीं ह्मणोनि.

उपाय मागील पाय । घेऊनि जाले वाय ॥
प्रतीतीं सांडिली सोय । प्रत्ययाचीं ॥ ५४ ॥

केवळ ब्रम्हवस्तुविषयीं योगादिक नाना उपाय जे त्यांणीं मागील पाय घेउनि, मागें मागें सरकून, वाय, व्यर्थ, झाले; कारण जे ब्रह्मीं आपला उपयोग नाहीं म्हणून. आणि प्रमात्यास वस्तुप्रत्यय आणून देण्याविषयीं प्रवृत्त जाली जे प्रतीति तिणें तरि प्रत्यय आणून देण्याची सोयेचि सांडिली, प्रतीति मावळली हा भाव.

येथें निर्धारेंसी विचारु । निमौनि गेला साचारु ॥
स्वामिचेया संकटिं शूरु । सुभट जैसा ॥ ५५ ॥

जैसा सुभट, महान् योद्धा शूर जो तो युद्धप्रसंगीं स्वामिचे संकटीं निमोनि जातो, तैसा तत्वविचार जो तो येथें, ब्रम्हस्वरूपीं स्वस्वामी प्रमाता जीव जो त्याचे संकटीं, जीवत्वनाशकाळीं साचार निमोनि गेला, खराखुरा मरण पावला.

नाशु साधौनि आपुला । बोधु बोधेंसी लाजिला ॥
नुसधेपणें थोंटावला । अनुभव येथें ॥ ५६ ॥

बोध जो तो घटादिकांचें बोधन करीत होता; तैसें येथें या ब्रह्मस्वरूपाचें बोधन, जाणणें करावयासि गेला तंव बोधेंनसी, जाणण्याचे योगेंकरून, लज्जा पावला. कारण जे ब्रम्हस्वरूप अपार आहे ह्मणून. आणि अनुभव जो तो तरि येथें या ब्रह्मस्वरूपीं कोण्हीं अनुभविता नाहीं ह्मणून नुसधेपणें थोटावला, व्यर्थ ज़ाला. अहो, ब्रह्मवस्तूसी अनुभविता कां नाहीं ह्मणतां? द्रष्टा जो तो अनुभविता आहे कीं? यासि उत्तर,

भिंगाचेया चडला । पदराचा पुंजा वेगला ॥
करितां जैसा निफाला । अंगाचा होये ॥ ५७ ॥

सुताचे चिवटांतून पदराचा पुंजा वेगळा करितां येतो. त्याप्रकारें भिंगाचें चडळ बोटानें काढूं गेलें असतां अंगाचाचि निफाळा होय, अंगचि फाटतें. तैसा द्रष्टा जो तो आपल्याहून देहत्रयाचा वेगळेपणा करून जातो. त्याप्रकारें केवळ वस्तूसी जाणूं जातो तंव अनुभविता द्रष्टा जो तो आपगचि नाहींसा होतो.

कां गजबजिला उबा । पांघरुणें केळीचा गाभा ॥
सांडि तेव्हलिं उभा । कैंचा कीजे ? ॥ ५८ ॥

अथवा प्रकृति, तल्लक्षण केळी जे तीचे आंतील गाभा तल्लक्षण परमपुरुष जो तो महत्तत्वादिक पांघरुणाचे योगेंकरून उबा, त्यातें पावला म्हणून स्वरूपानिद्राकाळीं ते महत्तत्वादि पांघरुणें सोडलीं. ते वेळी केवलब्रह्मस्वरूपाचे ठायीं पुरुष म्हणून उभा कैचा कीजे ? सारांश, प्रकृतीचे सांपटें टाकल्यानंतर पुरुष म्हणून ब्रह्मीं रहात नाहीं हा भाव.

तैसें अनुभाव्य-अनुभावक । इहीं दोहीं अनुभूति-बिक ॥
तें गेलिया कैसें एक । एकासीचि ॥ ५९ ॥

तैसें, त्याचि प्रकारें; अनुभाव्य, अनुभविली जे एक अद्वितीय वस्तु, आणि अनुभावक, अनुभाविणारा जो द्रष्टा, आणि त्यासि जाली जे अनुभूति तिचें बिक, पुष्टि, जे ते गेलिया, ब्रह्मवस्तुयोगें मधील अनुभूतीच नाहींसी जालियावरी मग केवळ वस्तु एक राहिली, त्या एकासि एक तरि म्हणणें कैसें? ब्रह्मवस्तु जे ते आपणातें एकहि म्हणत नाहीं हा भाव. आतां या पंचम प्रकरणाचा उपसंहार करून ब्रह्मीं कोणाचाही प्रवेश नाहीं ऐसें सांगतात,

अनुभव हा ठावोवरि। आपुलीचि अनवसरी ॥
तेथें अक्षरांचि हारी। वायील काई? ॥ ६० ॥

हा ठावोवरि, येथपर्यंत, ब्रह्मवस्तु जे ते अप्रवेश्य होय, तेथें आपली ह्म० अनुभविता ज्ञानी जो याची आणि अनुभवाची अनवसरी ह्म० ब्रह्मीं प्रवेश करण्याविषयीं संधि नाहीं. मग तेथें त्या ब्रम्हवस्तूचे ठायीं सत्-चित् आनंद या अक्षरांची मुंग्याचे हारीसारिखी हारि, पंक्ति, जे ते वायील काई, वाहील काय? अक्षरांची पंक्ति वाहणार नाहीं. कारण जे ब्रम्हवस्तु भरीव परिपूर्ण एकरस आहे म्हणून. अहो, बिसतंतूसारिखा दीर्घ प्रणवाचा उच्चार केला असतां सेवटीं नाद जो उरतो त्याचा तरि ब्रम्हस्वरूपीं प्रवेश होत असेल कीं? यासि उत्तर,

जेथें परेसी पडे मिठी। तेथें नादा सलु उठी ॥
मा वावरिजैल वोठीं। हें कें आथी? ॥ ६१ ॥

ज्या ब्रम्हवस्तूचे ठायीं स्मरणरूपा पराख्य वाणी जे तिची मिठी पडती, मुरकुंडी वळती; तेथें ध्वनिरूप प्रणवाच्या अंतीं निनाद जो त्याजला ब्रम्हस्वरूपीं प्रवेश करण्याविषयीं सळ उठि, आवेश उत्पन्न होईल काय? आवेश उत्पन्न होणार नाहीं. मग त्या ब्रम्हवस्तूतें वैखरी वाणी जे ते होटीं वावरिजेल, उभय ओठांनीं उच्चारिजेल, हें कें आहे, हें कोठून घडणार? कधींही घडावयाचें नाहीं. अहो ज्ञानोबा, हें तुम्ही वर्णन केलें येणेंकरून तत्वज्ञानाचा आणि साधनाचा कांहीं ठिकाणा राहिला नाहीं कीं? यासि उत्तर,

चेइलिया पाठीं। चेवणेयाचिया गोठी ॥
किं धाला बैसे पाठीं। रंधनाचेया? ॥ ६२ ॥

जागें जाल्यावरि कोण्ही तरी चेवणेयाच्या, जागें होण्याच्या गोष्टी सांगत

असतो काय ? गोष्टी सांगत नाहीं. तैसें असंदिग्ध अविपर्यस्त ब्रह्मवस्तूचें नित्य अपरोक्ष ज्ञान जाल्यावरि मग उग्याच तत्वज्ञानाच्या गोष्टी कोणी सांगत असतो काय ? ज्ञानी जो तो उगेंच ज्ञानाचें विकत्थन करीत नाहीं, आणि जो पुरुष जेऊन धाला, तृप्त जाला, तो पाठीं, अनंतर रंधनाच्या, स्वयंपाकाच्या यत्नास प्रवृत्त होईल काय ? यत्नास प्रवृत्त होणार नाहीं. तैसा ब्रह्मामृतानें जो ज्ञानी धाला तृप्त झाला तो श्रवणमननादिक साधनांविषयीं प्रवृत्त होईल काय ? साधनास प्रवृत्त होणार नाहीं. कारण जे तो स्वयें ब्रम्हाचि आहे म्हणून.

उदेलिया दिवसपति । ते किं दिवे सेजे येति ॥
पिकला सेतिं सूजती । नांगर काई ? ॥ ६३॥

संपूर्ण दिवसाचा पति सूर्य जो तो ज्ञानियाचे रूपें उदयाप्रत आला असतां संपूर्ण प्राणिमात्राची दीपासारिखी जीवदशा जे ते नाहींसीं होती. सारांश, ज्ञानियास संपूर्ण जगत् मुक्तचि आहे ऐसें वाटतें. कारण जे एक अद्वितीय ब्रह्मवस्तूच आहे तदतिरिक्त कांहीं नाहीं म्हणून. अहो, ज्ञानी जो येणें चित्तशुध्यर्थ वेदोदित कर्में तरि केलीं पाहिजेत कीं ? यासि उत्तर. जैसें पूर्वी शेत जें तें नांगरून पर्जन्य-वृष्टी जाल्यानंतर बीजारोपण करून क्षेत्र चहूंकडून पिकलें, त्यांत कोण्ही परतून नांगरावयाकारितां नांगर सूजति, घालतात काय ? भरल्या पिकांत नांगर घालीत नाहींत. तैसे पूर्वी वेदोदित कर्मानुष्ठानयोगें चित्तशुद्धि होऊन श्रुतिवाक्यानुसारें श्रीगुरूपदिष्ट पूर्वसिद्ध ब्रह्मप्राप्ति होऊन नरदेहक्षेत्र जें तें पिकलें, सफळ जालें. मग त्यास श्रुति जे ती कर्मकर्तव्य सांगेल काय ? ज्ञानियासि कर्मकर्तव्य सांगत नाहीं.

म्हणौनि बंधमोक्षाचें व्याज । निमालिया जालें काज ।
आतां निरूपणभोज । वळघेल काई ? ॥ ६४ ॥

ज्ञानी जो तो स्वयें ब्रह्मचि होय, म्हणोनि बंधमोक्षाचें व्याज, मिष, जें अज्ञान तें निमालिया, नाशातें पावलिया, ज्ञानियासि काज, कर्तव्य जें तें संपलें. मग आतां ज्ञानियाचे ब्रम्हस्वरूपावरि श्रुतिचे निरूपणाचें भोज, झेंडा, वळघेल म्ह० चढेल काय ? ज्ञानियाचे शुद्धस्वरूपावरि श्रुतिचा झेंडा चढणार नाहीं.

॥ इतिश्रीमदनुभवामृते सच्चिदानंदविवरणं नाम पंचमप्रकरणम् ॥

---

रघुनाथ अद्वैत सच्चिदानंद । त्याचे चरणकमळांचा मकरंद ।
सेवोनि निरंजन हा मिलिंद । गुंजारव करीतसे ॥ १ ॥
अनुभवामृत-पदबोधिनी । निरंजनाची साबडी वाणी ॥
श्रीरघुनाथप्रसादें करूनि । ज्ञानेश्वरपदीं अर्पिली ॥ २ ॥

श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

---

# अनुभवामृत–पद–बोधिनी.

## प्रकरण ६ वें.

श्रीज्ञानेश्वरायनमः । श्रीरघुवीरचरणारविंदपरागसेवन भ्रमरीभूत श्रीदत्तात्रेयलब्धप्रसाद श्रीज्ञानेश्वरप्रेरित निरंजनाख्य जो तो जीवन्मुक्त श्रोत्यांप्रत प्रार्थना करितो जे तुह्मीं श्रवण करावें. पंचम प्रकरणीं बंधमोक्षाचें मिप सरल्यावरी निरूपणाचा उपयोग नाहीं ऐसें सामान्यता सांगिजेलें. आतां निरूपणहेतु शब्द जो याचा उपयोग नाहीं हें विशेषेंकरून वर्णितात. प्रथम ध्वन्यात्मक वेद, नंतर वर्णात्मक जाला तो शब्दब्रम्ह होय. आणि 'नाममात्रमिदंजगत्' या न्यायेंकरून संपूर्णजगतहि शब्दरूप आणि परा-पश्न्ती मध्यमा वैखरी या संपूर्ण शब्दरूपाचि होत ऐसें जाणावें. आतां कोण्हास तरी स्मरण करून देण्याविपयीं उपयोगी हा शब्दचि होय ऐसें वर्णितात,

आणि पुढिलां कां आपणापें । जे विसराचेनि हातें हारपे ।
तें शब्देंचि घेपे । आठौनिया ॥ १ ॥

पुढिला, दुसरियास, आणि आपणातें जें जें कांहीं विसराचे योगेंकरून हारपतें तें तें या शब्दाचे योगें करूनाचि आठऊन घेईजेतें.

इतुलियापरौतें । चांगावें नाहीं शब्दातें ।
जें स्मारकपणें कीर्तितें । भोगी हा जगीं ॥ २ ॥

हा शब्द स्मरण करून देणेंपणेंच जगताचे ठायीं कीर्तीतें भोगितो. यापरतें या शब्दाचें चांगलेपण नाहीं हा सिद्धांत. आतां बाप बाप! (धन्यधन्य) ऐसी शाबासकी देऊन शब्दाची योग्यता वर्णितात,

बाप उपेगी वस्तु शब्द । जिया धरा सधर नाद ।
अमूर्ताचा विशद । आरिसा नोहे? ॥ ३ ॥

उपयोगाची वस्तु, पदार्थ हा शब्द होय, ऐसा ज्या चा पृथ्वीभर सधर नाद, बळकट डंका वाजताहे, आणि प्रमाता जिज्ञासु जो त्यातें अमूर्त ब्रह्मविषयक परोक्षज्ञान व्हावयास हा आरसा नव्हे काय? आरसाचि होय.

पाहातें आरिसा पाहे । एथें कायि नवल आहे ।
परि दर्पणें येणें होये । न पाहातें हि ॥ ४ ॥

पाहणारें मनुष्य आरसा पाहीलचि, यांत कांहीं नवल नाहीं. परंतु बुद्धिरूपें करून शब्दकार्य दर्पण जें तेणेंकरून न पाहतें, अचक्षु आत्मचैतन्य जें तेंही द्रष्टृरूपत्वें पाहणारें होतें, येवढें शब्दाचें महिमान!

वडिला अव्यक्ताचेया वंशा । उद्यत्कारु सूर्यु जैसा ।
येणें एकें गुणें आकाशा । अंबरत्व ॥ ५ ॥

अव्यक्त, अव्याकृत जें त्याचे वंशीं शब्द जो तो उत्पन्न होऊन सूर्य जैसा सर्व प्रकाशित करतो तैसा हा शब्द जो तो वेदरूपेंकरून सर्व प्रकाशित करतो. आणखी या शब्दाचें करणें दुष्कर आहे तें सांगतात. चिदाकाश जें त्यास शब्दगुण जो येणें अंबरत्वेंकरून अज्ञानी जनास पहावया लाविलें आहे.

आपण तर्‍ही खपुष्प । परि फळें दे सद्रूप ।
शब्द मवितें माप । कोण आहे? ॥ ६ ॥

हा शब्द आपण तंव खपुष्प, मिथ्या आहे, परंतु जिज्ञासुजीव जे त्यांतें फळ सद्रूप, सद्वस्तु फळातें देतो; आणि आपण मिथ्या होऊनि जातो. ज्या शब्दाच्या योगें करून सर्व मोजिलें जातें त्या शब्दातें मवितें, मोजणारें माप, कोणतें आहे? शब्द मोजणारें माप, गणना करणारें माप कोणतेंही नाहीं. आतां शब्दास सूर्याची उपमा दिल्ही, तेही उपमा संभवत नाहीं ऐसें वर्णितात,

दिवसातें उरौं गेला । तंव रात्रिचा द्रोह आला ।
म्हणौनि सूर्यु एया बोला । उपमा नोहे ॥ ७ ॥

सूर्य जो तो दिवसातें उरवूं, रक्षूं गेला, तंव रात्री जे तिचा नाश जाला. म्हणोनि या बोलास, शब्दास, सूर्य जो तो उपमीय होत नाहीं. आतां सूर्यापेक्षा शब्दाची योग्यता मोठी ऐसें वार्णितात,

प्रवृत्ति आणि निवृत्ति । विरुद्धाही हात धरिती ।
ते शब्देंचि चाल्ती । एकलेंनी । ८ ॥

प्रवृत्ति, धर्मशास्त्र आणि निवृत्ति, मोक्षशास्त्र वेदांत हे परस्परें विरुद्धहि आहेत परंतु त्यांतें हात धरून चालविल्यासारखें शब्द जो तो एका पुरुषाचे ठायीं वर्तवितो. आतां शब्दाचा दुर्घट स्वभाव वार्णितात,

हा अविद्या अंगिं पडे । तैं नाथिलें ऐसें रूढे ।
जे न लाहे तीन कवडे । साच वस्तु ॥ ९ ॥

जैसा गारोडियानें खापरखुंटीचा रुपाया दाखविला, तो साच वस्तु ह्म० खरेपणें दोन कवड्यांचाही माल नसतो. तैसा हा शब्द अविद्या अंगिं पडे, अविद्येस बुद्धिरूपेंकरून साह्य जाला असतां, नाथिलें, नाहीं तेंच दृश्य नामरूपात्मक ऐसें रूढीतें वाढवितो; आणि अविद्यास्वीकार करून अध्यारोप करावया लागला असतां नाहीं तेंच महदादि स्थूलदेहपर्यंत प्रपंच जो तो वस्तुत्वें नसतां सत्यत्वें रूढीस आणतो.

विधि-निषेधाचिया वाटा । दाविता हाचि दिवटा ।
बंध-मोक्ष-कलिकटा । शिष्ट हाचि ॥ १० ॥

जैसा दिवटा जो तो मार्गातें दाखवितो तैसा वेदांत प्रकरणीं सत्यंज्ञानमनंतं ब्रह्म इत्यादिक विधिवाक्यें आणि ब्रह्मणि नाना नास्ति इत्यादि निषेधवाक्यें ऐशा उभय वाटा प्रकाशन करणारा हा शब्दाचि होय. मुळीं ब्रह्मीं कांहीं नसतां द्रष्टा जो येणें देहत्रयातें मी ह्मटलें असतां हा बंध होय, आणि ब्रह्म जें तें मी होय ऐसें अनुभविलें असतां हा मोक्ष होय; ऐशी कळी यानेंचि लाविली आहे म्हणोनि हा शब्द कळिकांठा, कळी लावणारा होय. आपणातें शिष्ट तरि म्हणवितो परंतु महालबाड आहे हा भाव.

शुद्ध शिवाचेया शरीरीं । हा कुमारु जीवत्व भरि ।
जैसा अंगें पंचाक्षरी । तैंवि हा बोल ॥ ११ ॥

जैसा लबाड पंचाक्षरी दुसऱ्यास पीडा नसतां त्याचे अंगावरि भुतें घालून नाचावयासि लावितो, तैसा शिव, ईश्वर जो तो शुद्ध ब्रम्हस्वरूप असतां त्याचा कुमार, पुत्र हा शब्द जो येणें प्राणरूपेंकरून शिवाचे ठायीं जीवत्व भरलें, आरोपिलें आणि संसारी केलें.

जीवा देहें बांधला । तो बोलें एकें सुटला ।
आत्मा बोलेंची भेटला । आपणपया ॥ १२ ॥

शब्द जो येणें अहंकाररज्जूनें जीव जो तो हाडामांसाचे देहासि बांधून घातला देह मी ऐसें म्हणावयासि लाविला; आणि तो जीव बोलें एकें, एक महावाक्य जें तेणेंकरून सुटला, मुक्त जाला. आणि शब्देंकरून सर्वव्यापक आत्मा जो तो आपणपयां, निजदेहींच भेटला, प्राप्त जाला. आतां हा परोपकारीही मोठा होय ऐसें वर्णितात,

हा साह्य आत्मयाचें । करावया अंगें वेंचे ।
गोमटें काय शब्दाचें । एकैक वानूं ? ॥ १३ ॥

जीवात्म्यास ब्रह्मदर्शन करून देण्याविषयीं हा शब्द जो तो अंगें, सर्वस्वें वेंचला जातो. याचें एकेक गोमटें, चांगलेपण किती वर्णावें ?

किंबहुना हा शब्दु । स्मरणदानीं प्रसिध्दु ।
परि एयाहि संबंधु । नाहीं येथें ॥ १४ ॥

किंबहुना, फार काय सांगावें ? स्मरण करून देण्याविषयीं हा शब्द प्रसिद्ध होय. परि येथें, ब्रम्हस्वरूपीं, या शद्वाचा कांहीं संबंध नाहीं. अहो केवल ब्रहीं शद्वाचा उपयोग नसेल तरि नसो, परंतु परमात्म्यास तरि उपयोग असेल कीं ? यासि उत्तर,

आत्मया एया बोलाचें । कांहीं उपेगा नवचे ।
स्वसंवेद्या कवणाचें । वोझें आथी ? ॥ १५ ॥

नित्यमुक्तस्वभाववान् परमात्मा जो त्यास या शब्दाचें करणें कांहीं एक उपयोगीं पडत नाहीं. कारण जे तो स्वसंवेद्य, आपले स्वरूपातें आपण जाणत आहे ह्मणून. अस्तु, कोण्हाचें तरि त्याजवरि वोझें आथि, उपकार आहे काय ? कोण्हाचाही त्याज

वर उपकार नाहीं. अहो, सर्वाधार एक ब्रम्हचि आहे त्यापेक्षां अद्वितीय ब्रह्मींच या शद्वाचा आभार असतो. यासि उत्तर, अद्वितीय ब्रह्मीं शद्वाची प्रवृत्ती नाहीं ऐसें सहेतुक सांगतात.

आठवे कां विसरे । विषो होऊनि अवतरे ।
परि वस्तूसी वस्तु दुसरें । असेना कीं ॥ १६ ॥

व्यवहारप्रसंगीं पुरुषांहून पदार्थ भिन्न असतो, म्हणून शद्व आठव-विसराचा विषय होउन अवतरतो, प्रगट होतो. परंतु ब्रम्हवस्तु जे त्यास दुसरी वस्तूच नाहीं, मग आपण आपणातें आठवील विसरेल कैसें? अहो परमात्मा जो तो आपण आपलें स्मरण करून आपलें सेवन करीत असेल कीं? यासि उत्तर, ऐसें घडत नाहीं ऐसें दृष्टान्तेंकरून सांगतात,

आपण आपणयातें । आठवि विसरे केउतें ।
काइ जीभ जिभेतें । चाखे न चाखे? ॥ १७ ॥

जैसें जिव्हेस आपण आपणातें चाखणें अथवा न चाखणें होत नाहीं, तैसा अद्वितीय परमात्मा जो त्यास आपलें सेवन करणें न करणें दोन्हीही घडत नाहींत. कारण जे परमात्मा एकचि आहे तेव्हां आपण आपणातें आठवणें विसरणें कैसें घडेल?

जागतेया नींद नाहीं । मा जागणें घडे काई ॥
स्मरणास्मरणें दोहीं । स्वरूपीं तैसीं ॥ १८ ॥

सर्वकाळ जागृत आहे त्यास निजणें नाहीं, मग त्यातें जागणें घडेल काय? जागणें घडत नाहीं. तैसा स्वयें प्रकाशमान परमात्मा जो त्यास विस्मृति करणार अविद्याचि नाहीं मग स्मृति करून देणार विद्या तरी कोठून असणार? तैसी त्या जीवासरिखीं परमात्मस्वरूपाचे ठायीं स्मरण अस्मरण हे उभयही नाहींत. अहो, परमात्मियास तत्वज्ञान तरी असेल ना? यासि उत्तर,

सूर्यु रात्रितें नेणे । मा दिवो काय जाणे ।
तेंवि स्मरणास्मरणें । वस्तुचे ठायीं ॥ १९ ॥

चित्सूर्य परमात्मा जो तो अज्ञानरात्रितेंचि जाणत नाहीं, मग तत्वज्ञानाचा दिवस तरि कोठून जाणणार? अहो, स्मरणविस्मरण हे जीवाचे ठायीं असतात

तैसीं ब्रह्मवस्तूचे ठायीं असतीलना? यासि उत्तर, तेंवि त्या परमातमियाचे प्रकारें ब्रह्मवस्तूचे ठायीं आपलें स्मरण आणि विस्मरण हे दोन्हीही नाहींत. कारण जे ब्रह्म अखिलउपाधिरहित आहे ह्मणून.

एवं स्मरणास्मरण नाहीं। तरि स्मारकें काज काई।
म्हणौनि इये ठायीं। बोल न सरे ॥ २० ॥

एवं, पूर्वोक्त रीतीनें ब्रह्मवस्तूचे ठायीं स्मरणविस्मरण हे दोन्हीही नाहींत, तेव्हां मग स्मारक, स्मरण करून देणारीं शास्त्रें जीं त्यांचें काज तें काय आहे? उपयोग नाहीं. म्हणोनि इये ठायीं बोल न सरे, ब्रह्मीं शब्दाची प्रवृत्ति होत नाहीं हा भाव. आतां शब्दरूप शास्त्रानें अविद्यानाश होतो ऐसें बोलणें लोकांचे ठायीं आहे त्याचा निषेध करितात,

आणिक एक शब्दें। काज कीर भलें सिध्दे।
परि धिंवसा न बांधे। विचारु येथें ॥ २१ ॥

शब्द जो येणें आणिक एक भलें सिद्धे काज; चांगलें निश्चित कार्य करिजेतें ऐसें लोकांच ठायीं वदतात; परंतु आम्हांस येथें धिंवसा न बांधे, निश्चयत्वें स्थैर्य होत नाहीं. यासि कारण काय म्हणाल तरि सांगतों,

जे बोलें अविद्या नासे। मग आत्मया आत्मा दिसे।
हें म्हणतखेंवो पीसें। आलेंचि कीं ॥ २२ ॥

बोलें, शास्त्र जें तेणेंकरून अविद्या जे ते नाशातें पावती, मग आत्मयातें आत्मा दिसतो ऐसें ह्मणतात. परंतु हें म्हणतखेंवो, हें ह्मणते क्षणींच पीसें, वेडेपण आलेंच कीं! कां पिसेपण आलें ह्मणाल तरि सांगतों,

सूर्यु रातीतें मारील। मग आपणा उदो करील।
हे कुडे न सरति बोल। साचाचे गावीं ॥ २३ ॥

सूर्य जो तो रात्रीतें मारून आपणातें उदयाप्रत आणील जरि, तरि परमात्मा जो तो अविद्या मारून आपणातें प्रगट करील. अस्तु, हें म्हणणें कुडे, खोटे बोल, साचाचे गावीं, सत्यवस्तूचे बोधेंकरून जाले जे साच ब्रह्मवेत्ते त्यांजपाशीं न सरति, नाहीं शोभणार. आतां ज्ञानियाचे ठायींहि अविद्या नाहीं ऐसें दृष्टान्तें-करून वर्णितात,

चेइलिया नीद रुसे । ऐसी नीद येक असे ? ॥
कीं चेइलें चेऊं बैसे । ऐसें चेणें आहे ? ॥ २४ ॥

चेइला, जागा झाला, त्याची निद्रा एकीकडे रुसून बसती काय ? रुसून बसत नाहीं. तैसा निभ्रांत तत्वतेत्ता जो त्यास अविद्या रुसून येकीकडे राहत नाहीं. तरि काय, माझे ब्रह्मस्वरूपीं अविद्या पहिलेपासूनाचि नाहीं ऐसा तत्ववेत्याचा अनुभव आहे. आतां प्रसंगोपात्त विद्येचीही निवृत्ति सांगतात; कीं जागा जाला जो तो आणखी जागा होऊन बैसेल ऐसें चेणें, जागणें, असे काय ? जागणें नाहीं. तैसा तत्ववेत्ता जो तो ऐसा जागा झाला जे मी स्वप्रकाश परमात्मरूपेंकरून नित्य जागाचि होतो, कधींही निजलों नाहीं; तो मी ब्रह्मविद्येनें जागा होऊं तें काय ? सर्वदा जागरूकाचि आहे.

ह्मणौनि नाशावेया पुरती । अविद्या नाहिं निरुति ।
मा आतमा आत्मप्रतीति । रिगेल कैसा ? ॥ २५ ॥

म्हणोनि शद्ब जो येणें नाशावयापुरती अविद्या नाहीं निरुती, निश्चयेंकरून. मग आत्मा जो तो आत्मप्रतीती, आपले प्रतीतीकारणें कैसा रिगेल ? आतां इत्थंभूत अविद्येचें स्वरूप वर्णितात,

अविद्या तवं स्वरूपें । वांझेचें कीर जाउपें ।
मा तर्काचें खुरपें । खांडी कोणा ? ॥ २६ ॥

मुळीं अविद्येचें स्वरूप पाहिलें असतां प्रकृति वंध्या जे तिचें जाउपें, लेकरूं होय. मग तर्कशास्त्र जें हेंच कोण्ही एक मुंढें खुरपें वरचेवर छेदणारें जें तें कोण्हातें खांडील, कोण्हाचा नाश करील ? सारांश, अविद्या नासावयाजोगी नाहीं हा भाव. आतां शब्दाभिमानी बोलतो, अहो, जैसा हराळीचा वेल प्रति कांड्यास मुळया फुटून भूमींत रुजला जातो, तैसी हे अविद्या पंच प्रकारची होय. ते ऐसी:- ज्ञान, अज्ञान, अस्मिता, राग, द्वेष, अभिनिवेश. याजला शास्त्रकार पंचक्लेश ऐसेंही ह्मणतात. अस्तु, ऐसी हे अविद्या आहे कीं ? यासि उत्तर पंच दृष्टान्तें करून सांगतात,

दीपाचिये सोये । अंधार किर न साहे ॥
परि तेथें कांहिं आहे । जावयाजोगें ? ॥ २७ ॥

दीपाचिये सोये, दीप लाविला असतां अंधार न साहे, अंधार राहत नाहीं. तैसा तत्वज्ञान तल्लक्षण दीप लाविला असतां अज्ञानरूप अंधार राहत नाहीं. परंतु तेथें जावयाजोगें अज्ञान ह्मणून कांहीं पदार्थ आहे काय? कांहीं पदार्थ नाहीं.

इंद्रधनुष्यि सीतें । कवण पां न घालितें ॥
तें दिसे तैसें होतें । साच जर्‍हि? ॥ २८ ॥

आकाशाचे ठायीं पर्जन्यकाळीं इंद्रधनुष्य जैसें दिसतें तैसेंचि तें खरें असतें तरि रामचंद्रादिक मोठमोठे धनुर्धारी जाले त्यांणीं इंद्रधनुष्यास सीत, दोरी, लावली असती. अस्तु, तें इंद्रधनुष्य मिथ्या जैसें तैसें अस्मिता, अहंप्रत्ययरूप अविद्या मिथ्या होय हा अभिप्राय.

अगस्तीचिया कवतुका । पुरती जर्‍हि मृगतृष्णिका ॥
तरि मारा दे तो तर्का । अविद्येविर्सि ॥ २९ ॥

अगस्ति ऋषिनें कवतुका, लीलामात्रेंकरून समुद्राचें आचमन केलें. तैसें मृगजलाचें जरि अगस्ति आचमन करिता तरि राग ह्म० विषय प्रीतिरूप अविद्या जे तिजविषयीं तर्कशास्त्र जें त्यातें मारा देतो, मारावयासि योजितो. जरि मृगजलाचें पान करणें हें घडत नाहीं, तरि तर्कशास्त्राच्यानें विषयप्रीतिरूप अविद्यानाशहि होत नाहीं, हा अभिप्राय.

साहे बोलाचि वलघी । ऐसी अविद्या आथि जगिं ॥
तर्‍हि जालेना कां आगी । गंधर्वनगरें ! ॥ ३० ॥

बोलाची वळघी, शब्दाचें चढणें सहन करावयासि जगताचे ठायीं अविद्या योग्य आहे, तरी सायंकाळीं पश्चिमेस अभ्राचीं गंधर्वनगरें दिसतात त्यांसहि अग्नीनें जाळावें ऐसें व्हावें. हें कांहीं होत नाहीं तेव्हां द्वेषरूपा अविद्येचाहि शद्वाच्यानें नाश करणें होत नाहीं हा अभिप्राय. अहो परमात्मियाचे ठायीं प्रतिबिंब नाहीं म्हणून कर्तृत्वाभिनिवेशहि नाहीं. परंतु अंतरात्म्याचे ठायीं तरि चिच्छायारूप चिदाभास आहे, तेव्हां कर्तृत्वाभिनिवेशरूप अविद्या आहेच कीं, यासि उत्तर चिदाभासचि मिथ्या होय ऐसें सांगतात.

जेथें साउलि न पडे । तेथें नाहिं जेणें पाडे ॥
मा जेथें पडे तेथें जोडे । पदार्थ कांहीं? ॥ ३१ ॥

अद्वितीय आत्मा एकचि आहे, तेव्हां तेथें परमात्मा आणि अंतरात्मा हे भेद कोठून असणार? तथापि तूं पुसतोस म्हणून सांगावें. परमात्मस्वरूपीं साउली म्ह० प्रतिबिंब जेणें पाडें, ज्या प्रकारें त्या प्रकारें अंतरात्म्याचे ठायींही प्रतिबिंब नाहीं. मा, अथवा द्रष्टयाची छाया पडून प्रतिबिंब जाहलें तरि तो जीव सत्य पदार्थ नव्हे, तेव्हां त्यानें कर्तृत्वाभिनिवेश धरिला तरि तो काय सत्य आहे? सत्य नाहीं. तस्मात् अभिनिवेशरूप अविद्या मिथ्या होय, हा भाव. अहो, ब्रह्मीं जगत् नसो, परंतु परमात्मियाचे एकांशीं तरि अविद्यात्मक जगत् आहे किं? यासि उत्तर.

मृगजल जेथ नुमंडे । तेथें असे कोरडें ॥
मा उमंडे तेथें जोडे । वोल्हासा काई? ॥ ३२ ॥

मृगजळ ज्या स्थानीं नुमंडे, न उमटलें, तेथें असें कोरडे, परंतु जेथें उमंडे, मृगजळ उमटलें तें स्थळ काय वोलें जालें आहे? वोलें जालें नाहीं जैसें तैसें भूमास्वरूपीं जग नाहींच नाहीं, परंतु परमात्म्याचे एकांशीं जग दिसतें तेंही नाहीं. कारण जे मृगजळासारखें मृषा होय म्हणून. सारांश त्या जगताच्या योगेंकरून परमात्मयाचा एकांशहि विकारातें पावला नाहीं हा भाव. अहो अविद्या निवृत्त जाली असतां मात्र मिथ्या, परंतु अज्ञानकाळीं तरी अविद्या खरी आहे कीं? यासि उत्तर अविद्यात्मक संपूर्ण जगत् दिसत आहे त्या काळींच मिथ्या होय ऐसें सांगतात.

दिसतचि स्वप्न लटिकें । तें जागरीं होये ठाउकें ॥
तेविं अविद्याकालिं सतुकें । अविद्या नाहीं ॥ ३३ ॥

स्वप्नकाळींचें जगत् स्वप्नकाळींही लटिकें आणि जागृतकाळींही लटिकें, हें जागृत अवस्थेंत ठाऊक होतें जैसें, तैसी अविद्याकाळींही सतुकें, जैसी अविद्या पाहिली होती तैसी कोण्हे काळींही नाहीं हें ब्रम्हानुभवकाळीं ठाउक होतें; म्हणून अविद्या नाहींच हा सिद्धांत. अहो, अविद्यात्मक पंच विषय खरे आहेत म्हणून सेवन करितां बंध होतो आणि विषय त्यागितां मुक्ति होते कीं? यासि उत्तर हे दोन्हीही मिथ्या ऐसें दृष्टान्तेंकरून सांगतात,

वोडंबरीचेया लेणियां । घरें भरति आतुडलेया ।
किं नागवे नागविलिया । विशेष काई? ॥ ३४ ॥

राक्षसी माया बोडंबरी जे तिणें निर्मिले अळंकार ते आतुडलिया, प्राप्त जालिया, घरें भरति काय ? अलंकार घरांत रहात नाहींत जैसे तैसे ईश्वरमायेनें निर्मित जे शब्दादि पंच विषय ते प्राप्त जाले असतां मिथ्या होत. कारण जे भूत-प्रळयकाळीं तरि नाशातें पावतात म्हणून. तैसेचि पंचाविषय त्यागीले तरि काय विशेष जालें ? जैसे नंगे गोसावी कोण्ही एकानें नागविले तैसें नाहींत. त्याप्रकारें विषयातें त्यागिलें म्हणून विशेष काय जालें ? विशेष कांहीं नाहीं हा भाव. अहो, अविद्यात्मक मनाचे चंचलत्वें अकृतार्थता आणि मनाचे निश्चलत्वें कृतार्थता वाटति कीं ? यासि उत्तर तें मनचि मिथ्या होय ऐसें सांगतात,

मनोरथांचे परिमल । आरोगु कां सहस्रवेल ॥
परि उपवासा वेगल । आन आथी ॥ ३५ ॥

कोण्ही एक मनोराज्य करीत बसला जे परियळ ह्म० सुवर्ण ताटांत पक्वान्नें घालून सहस्रवेळ ग्रास घेतों ऐसी कल्पना करिता जाला. तरि त्यातें उपवासावांचून अन्य कांहीं आहे काय ? अन्य तुष्टि पुष्टि हे नाहींत. तैसें मन जें तें पदार्थ स्मरून चंचल जालें अथवा पदार्थ विसरून निश्चल जालें, तरि दोन्हीही खरे नाहींत. कारण जे मनाचि मिथ्या होय म्हणून. अहो, हें अविद्यात्मक दृश्य दिसतें तेव्हा खरें आहे कीं ? यासि उत्तर,

हे दिसे तैसें असे । तर्‍हीं चित्रिंचेनि पाउसें ॥
वोल्हावोत माणुसें । आगरातें ॥ ३६ ॥

हें दृश्य दिसतें ह्मणून खरें नव्हे. जरि दिसणेपणानेंचि याजला खरेपणा येईल, तरि भिंतीवरि चित्रें काढतात तेथें चित्राचा पाऊसहि काढतात; तो दिसत असतो ह्मणून मनुष्यें जीं यांहीं आगरातें, सेतातें, पाट लावून ओलवावें, तें घडत नाहीं. कारण जे तो पर्जन्य दिसत असतां सत्य नाहीं ह्मणून. तैसें हें दृश्य दिसत असतां खरें नाहीं हा भाव. अहो, गाढ सुषुप्ति हें अविद्येचें रूप आहे कीं ? यासि उत्तर, तेंही खरें नव्हे ऐसें सांगतात,

कालौनि अंधारें । लिहों येती आखरें ।
तन्हि मसीचे वोरबारें । सिणे कवणु ? ॥ ३७ ॥

रात्रीचे वेळेसि अंधारें असतें तें कालऊन अक्षरें लिहितां येतील तरी मसीचे चोरबारें, शाईचे खटपटीविषयीं कोण्हीही न सिणतें. तैसी गाढ सुषुप्ति हे खरी नव्हे. जरि सुषुप्ति खरी असती, तरि योगी जे ते समाधिविषयीं कां सायास करिते? झोंपचि घेउनि राहते ना काय? अहो, अविद्या नसेल तरि संपूर्ण जग डोळ्यासि दिसतें ना कीं? यासि उत्तर डोळेही अविद्येचे पोटांतील लबाडीचेंचि कलम आहे ऐसें सांगतात,

आकाश काय निळें । न देखति हे डोळे ।
अविद्येचिं टवाळें । जाणा तैसीं ॥ ३८ ॥

आकाश निर्मळ असतां त्यातें नीलवर्ण हे डोळे पाहत नाहींत काय? नीळवर्ण पाहताताचि. तेसें निर्मळ निराकार ब्रह्म असतां साकार नामरूपात्मक जगद्रूपत्वें डोळे पाहतात. अहो, डोळ्यांनीं तरि लटिकें जगत् पहावयाचें कारण काय? यासि उत्तर सांगतात; जैसी मैंदाचिया गांवांत येकासि येक लबाड साक्ष देतात, तैसी हे अविद्या स्वयें मिथ्या असतां प्रमाता प्रमाण प्रमेय संपूर्ण जगद्रूपें आपण होउनि एक्या भागें करून दृश्य होति, आणि एक भागेंकरून आपण पाहणारे डोळे होऊन जगतातें पाहून सत्य मानिति. तस्मात् हे संपूर्ण अविद्येचिंच टवाळें, लबाड्या होत. कारण जे ब्रह्मिं हे धर्म नाहींत ह्मणून. अहो, दुसऱ्यानें लबाड ह्मटल्यानें कोण्ही लबाड होत नाहीं, ज्याची त्यानें ही लबाडी कबूल केली पाहिजे कीं? यासि उत्तर जिची तीच मी लबाड आहे ऐसी सांगती, या प्रकारें वर्णितात,

आणि इयेचें अनिर्वाच्यपण । तें दुजें देवांगण ।
आपुला अभावो आपण । साधीत असे ॥ ३९ ॥

कोण्ही एक स्त्रियेनें व्यभिचार केला. तिजला लोक विचारूं लागले जे तुवां व्यभिचार केलास काय? ती ह्मगे मी लबाड नाहीं. यासी प्रमाण काय ऐसें पुसलें असतां ती ह्मणती मी देवांगण, दिव्य करिते. तेव्हां तप्त कढईंतून तप्त रवा काढूं गेली तंव तिचा हात भाजला. अस्तु, ती आधीं लबाड होतचि आणि दुसरें देवांगण, दिव्य, करूनहि ती लबाड जाली. तैसी अविद्या हे प्रमाण नाहीं ह्मणून विचारवान् ह्मगतचि होते आणि स्वयेंही ह्मगती जे मी अनिर्वाच्य, सत्हि नव्हे आणि असत्हि नव्हे; ऐसी अनिर्वचनीया मिथ्या होय. माया जे इचा उलटा उच्चार यामा ह्म० मी नाहीं ऐसें नाम सांगून आपला अभाव आपग साधीत आहे.

अविद्या येणें नांवें । मी विद्यमान नव्हे ।
हे अविद्याचि स्वभावें । सांगत असे ॥ ४० ॥

मी विद्यमान नाहीं हे आपले नामेंकरून आणि स्वभावेंकरून हे अविद्याचि सांगत आहे. आतां शब्दाभिमानी अविद्येचें स्थापन करणारा जो त्यातें पुसतात,

ना कांहीं जर्‍हि आहे । तर्‍हि निर्धारु कां न साहे ।
जेविं घटभावीं भोये । अंकित दिसे ॥ ४१ ॥

अथवा जैसी घटभावें, घटाचे असण्यानें भूमि अंकित, चिन्हित दिसती, तैसी अविद्या म्हणून कांहीं पदार्थ जरी आहे तरी हे या प्रकारची आहे, ऐसा निर्धार कां सहन करीत नाहीं? अस्तु, हे अविद्या मिथ्या होय. आतां तुझ्या शब्दानें नाश तो कोण्हाचा करावा हें सांग. आतां शब्दवादी बोलतो,

अविद्या नाशी आत्मा । ऐसी न घडे प्रमा ॥
सूर्याअंगीं तमा । घडे योग ॥ ४२ ॥

अहो, आमचा शब्द जो तो आत्म्याला साह्य होऊन आत्मा जो तो अविद्येचा नाश करितो. तस्मात् अविद्या आहे हा भाव. आतां सिद्धांती उत्तर देतात, तूं म्हणतोस ऐसी न प्रमा, निश्चयात्मक ज्ञानेंकरून ऐसें घडत नाहीं. जैसा सूर्याचे अंगीं तमाचा योग घडत नाहीं तैसा आत्म्यासि आणि अविद्येसी योग घडत नाहीं. तेव्हां मग आत्मा नाश कोण्हाचा करील? आतां शब्दवादी बोलतो,

हे अविद्या तरि मायावी । मायावीपण न लपवी ॥
सहजीं आली अभावीं । आपुलिया ॥ ४३ ॥

अहो, राक्षसिणीसारिखी हे अविद्या मायावी आहे. आतां सिद्धांती उत्तर देतात, अरे, मायावी राक्षसीण असती ते मी मायावी आहे ऐसी सांगत नाहीं. आपला मायावीपणा लपवीत असते. आणि हे तरि आपला मायावीपणा लपवीत नाहीं, मी माया होय ऐसें सांगती. तेव्हां सहज रितीनें आपले अभावास आपण कारण झाली.

बहुतापरी ऐसी । अविद्या नाहीं अपैसी ।
आतां बोलु हात वसी । कोणावरी? ॥ ४४ ॥

बहुता प्रकारें अविद्या पाहूं गेलें असतां इचा कोण्ही नाश न करितां अविद्या जे ती अऐसी, आपले आपणचि नाहीं. तेव्हां आतां हा बोल, तर्कशास्त्र जें तें हात कोण्हावरी वसी, वसवील, चालवील! अहो अविद्या छायारूपें साकार, आणि निराकारही आहे. तिजवरी आमचा शब्द, तर्कशास्त्र, हात वसवील. यासी उत्तर,

साउलियेतें सबलें । खोचिलिया भुई आदले ।
कीं हाणितलिया अंतरालें । थोटावे हातु ? ॥ ४५ ॥

बलात्कारें साउलीतें टोचिलिया भूमी आदळती, छाया टोचिली जात नाहीं. तैसी अविद्या साकार म्हणून तिचा नाश करावा तरी नाशातें पावत नाहीं. निराकार होती. आणि निराकार अविद्येचा नाश करावा तरि अंतराळ म्हणजे आकाश जें त्यांतें चापट हाणितली असतां हात थोटावतो, हासडला जातो जैसा. तैसी नाहीं जे अविद्या तीचा नाश करूं गेलें असतां शब्दाचे हासडतो, नाहींसा होतो हा भाव. आतां शब्दवादी म्हणतो, अहो, तुम्ही आमचा फार तेजोभंग केला. काय चिंता आहे अविद्या नाहींपणें करून! असेल तैसीचाचि आम्ही शास्त्ररूप शस्त्रानें नाश करूं. यासि उत्तर, तुझ्या शास्त्राच्यानें कांहीं व्हावयाचें नाहीं ऐसें सांगतात.

मृगजलाचे पानीं । कां गगनाचे आलिंगनीं ।
नातरि चुंबनिं । प्रतिबिंबाचे ४६ ॥
उठावला तवका । तंव सुना ठाव पडे असिका ।
अविद्या-नाशीं तर्का । तैसें होय ॥ ४७ ॥

अरे शब्दवादी, तुजसारिखा एक शहाणा होता, तो मृगजलाचें पान, प्राशन करण्याविषयीं आणि गगनाचें आलिंगन करण्याविषयीं आणि प्रतिबिंबाम चुंबन देण्याविषयीं तवका, मोठें अवसान धरून उठावला. तंव ते ते पदार्थ खरे नाहींत म्हणून असिका संपूर्ण तो तो ठाव सुना पडिला. तैसी मृगजळासारिखी साकारत्वें प्रतीति मात्र आणि आकाशासारिखी पोकळ आणि प्रतिबिंबासारिखी आभासमात्र ऐसी अनेकविभ्रमरूप अविद्या जे तिचा नाश करण्याविषयीं तर्कशास्त्र जें त्यातें कैसें होईल? आतां साधनचतुष्टयसंपन्न जन्मजन्मांतरीं भगवदाराधन करीत आलेले जिज्ञासु जे ते प्रार्थना करितात, हे जगद्गुरु श्रीज्ञानेश्वर, तुम्हीं सांगितलें जे अविद्या नाहींच हें ठीकचि आहे; अविद्या ब्रह्मीं नाहीं, परमात्मस्वरूपीं नाहीं, आणि तुम्हां-

सारिखे ज्ञानी जे त्यांसहि नाहीं. परंतु हे अविद्या पिशाचिनी आमचे बोकांडीं बसून जन्ममरणाचीं भ्रमणें करविती ऐसें वाटतें. जैसें पिशाच दिसत नाहीं, आणि लोकही त्यातें मिथ्या म्हणतात, परंतु ज्यांस लागतें त्यांस पीडा होती. तैसी हे अविद्या दिसत नाहीं, आणि तुह्मी मिथ्या म्हणतां म्हणून युक्तीनें आह्मांसही मिथ्या वाटती. परंतु आमचा देहाभिमान आणि विषयासक्ति सुटत नाहीं, यासि उपाय सांगावा ही आमची प्रार्थना. आतां दयाळ श्रीज्ञानेश्वर साधनें करून प्रत्यक्ष ब्रह्मानुभूति होऊन ब्रह्मविषयीं जी मूळ अविद्या तिचा नाश करण्याचा उपाय संज्ञादृष्टांतेंकरून ब्रह्मजिज्ञासूस सांगतात,

ऐसी हे अविद्या नाशावी । ऐसें कवणु वाहेल जीवीं ।
तेणें साली काढावी । आकाशाची ॥ ४८ ॥

सत् म्हणतां येत नाहीं, असत् ह्मणतां येत नाहीं, सदसत् उभयरूपा ह्मणतां येत नाहीं, ऐसी जे अनिर्वचनीय मूल अविद्या, जी शास्त्राध्ययनानें आणि शाब्दिक परोक्षज्ञानानें नाशातें पावत नाहीं ऐसी ही आहे परंतु जीवातें दुःख देती. ती नाशातें पाववावी हें कोण्ही वाहेल जीवीं, म्हणजे संसारदुःख त्रिविध तापेंकरून संतप्तशिर जाला आणि बंधनिवृत्ति कधीं होईल ऐसें जिवेंभावें स्मरतो; ऐसा तीव्र जिज्ञासु जो येणें आकाशाची साल काढावी ! ती कैसी साल काढावी म्हणाल, तरि श्रवण करा, सांगतों. जैसें पूर्वसिद्ध आकाश जें त्यातें पोटीं घेऊन कर्दळी जे ते पुड बांधिती; तैसें आकाश ह्म० काशतीत्याकाशः प्रकाशरूप आकाश, चिदाकाश, पूर्वसिद्ध निराकार ब्रह्म जें त्यातें एकांशी अवच्छेद करणारी अनेक शक्तिरूपा कर्दळी तीच कोण्ही एक साल, चिच्छक्ति प्रकृति माया आणि महदादि सर्व प्रपंच, हे संपूर्ण सोपटें विवेकाचे हस्तें काढावीं. मग अवशिष्ट राहील निरुपाधिक ब्रह्म, तेव्हां अविद्या नाशातें पावली ऐसें जाणावें हा भाव. अहो, हें उत्तम अधिकारियासि प्राप्तीचें लक्षण सांगितलें, आतां मध्यम अधिकारी जो येणें काय करावें ? त्यास उपाय सांगतात,

तेणे सेली गला दुहावी । गुडघा वास पाहावी ।
वालौनि कांचरी करावी । सांजवेलेची ॥ ४९ ॥

मध्यम अधिकारी जिज्ञासु जो तेणें सेळी, अजा लोहित शुक्लकृष्णा माया ते कधीं जन्मली नाहीं ह्मणून अजा होय; तिचे अधोभागचे त्वंपद-तत्पद-वाच्यार्थ

हेचि कोण्हीएक दोन स्तन होत, त्यांतें टाकून गळयापासील सर्वज्ञत्व किंचिज्ञत्व लक्षणेंकरून युक्त असे जे लक्ष्यार्थ हेचि कोण्हीएक गळा स्तन होत, ज्यांचें महावाक्याचे ठायीं वर्णन आहे; अस्तु त्यांतें दुहून, शोधून सर्वज्ञत्व-किंचिज्ञत्व-उपाधिविवर्जित केवल ब्रह्म जें तें स्वत्वेंकरून अनुभवावें, ह्मणजे अविद्येचा नाश होईल. द्विरेफा सारिखी लक्षित लक्षणा होय. अहो हे केवल ब्रह्मवस्तु जे ते कशानें अनुभवावी? यासि उत्तर. जैसें स्वतः वोझें उचलतेवेळेस गुढग्याचा टेंका देतात, तैसा संसार वोझ्यास गुढघा, टेका जो द्रष्टा तेणें संसारदृष्टीतें सोडोनी निजदृष्टीनें वास पाहावी, ह्मणजें आपलें वसतें स्थान ब्रह्मवस्तु जें त्यातें पाहावें. अहो विषयवासना सुटत नाहीं तेणें काय करावें? यासि उत्तर. जैसा वासनवेल वरचेवर फांटे फुटून लांबत जातो, तैसी अनादि जे वासना हेचि कोण्हीएक सांजवेळ, भयंकर संध्याकाळची वेळा तीतें विवेकें उपटून पर अपर वैराग्यानें वाळवून कांचरी करावी, नाशातें पाववावी हा भाव. अहो कनिष्ठ अधिकारी जो येणें मनोनाश-वासना-क्षयार्थ योगाभ्यासही केला, परंतु संकल्परहित मन होत नाहीं, तेणें काय करावें? यासि योगशास्त्रप्रकरणीं वनस्पतिकल्प आहे तो सांगतात,

जांभई वांटुनि रसु । तेणें काढावा बहुवसु ।
कालौनि आलसु । मोदला पाजावा ॥ ५० ॥

जांभई म्हणजे जांभूलवर्ण आहेत बोंडें जे तें जीर्चा असी जे गोरखमुंडी ती वांटून बहुवसु, पुष्कळ रस काढावा, आणि आळस, अळशी, आणि जवस म्हणताहेत ज्यास त्याचें पिष्ट त्या रसांत कालवून मातीचे मोधळ्यासारखा हा पार्थिव देह जो त्यातें पाजावा, म्हणजे मन जें तें संकल्परहित होईल. अहो ब्रह्मानंद सेवन करावयासि उत्सुक तेणें काय उपाय करावा? त्यातें संप्रज्ञात समाधि करावयाचें सांगतात,

तो पाटा पाणी परतू । पडली साउली उलथू ।
वारियाचे तांथु । वलो सुखें ॥ ५१ ॥

विषयभूमीप्रत पाण्यासारिखा बुद्धिवृत्तिचा पाट चालिला आहे, तो प्रत्यक्प्रवणत्वें माघारी परतवूनि द्रष्ट्याचे दृष्टीची छाया बुद्धीचे ठायीं पडली आहे तीतें उलथू ब्रह्माकार करो हा भाव. अहो, संप्रज्ञात समाधीचे ठायीं बुद्धिवृत्ति स्थिर न होय तेणें काय करावें? त्यातें प्राणायाम करणें सांगतात. प्राणरूप वायु जो त्याचे

इडा-पिंगला-नाडीद्वारें तांथूसारखे बाहेर प्रवाह चालले आहेत, ते सुखेंकरून, फार आयास न करितां हृदयदेशीं वळवावे, माघारीं परतवावे हा भाव. अहो संप्रज्ञात समाधीचे ठायीं ध्येय-ध्याता-ध्यान हे त्रिपुटी क्षीण होत नाहीं कीं? यासि निर्विकल्प असंप्रज्ञात समाधीकरण सांगतात,

तो बागुलातें मारु। प्रतिबिंब खोले भरु।
तळहातिंचे विंचरु। केश सुखें ॥५२॥

जन्ममरणरूप संसारभय दाखविणारा अहंकार जो तोचि कोण्ही एक बागुल त्यातें निर्विकल्पसमाधियोगें मारून, नाहींसें करून, प्रतिबिंब ह्म० बुद्धिस्थ चिदाभास जो त्यातें निर्विकल्प समाधि हेचि कोण्ही एक खोल, पिशवी जे, तींत भरो, लीन करो. तेव्हां त्रिपुटी क्षीण होऊन ब्रह्मानंदसुख होईल. अहो, समाधिकाळीं मात्र जगत् नाहीं आणि उत्थित जाल्यावरि पूर्ववत् जगत् भासतें तेणें काय करावें? यासि उत्तर; तळहाताचे ठायीं केश नसतां भ्रांतास केश आहेत ऐसें वाटतें जैसें, तैसें, केवल ब्रह्मीं जग नसतां अनादि भ्रांति–योगें अज्ञ जनास वाटतें जे हें जगत् सत्य आहे. अस्तु, त्या जगतातें विंचरावें, मिथ्यात्वें बाधित करावें. तें कैसें बाधित करावें ह्मणाल, तरि तें ऐसें; केवल ब्रह्मीं काळत्रयीं जग जालेंचि नाहीं आणि मजला जगत् भासतें, ते मिथ्या होय ऐसा सुखेंकरून विचार करावा. अहो, ब्रह्मीं जगत् नाहीं, परंतु जैसा भूतलाचे ठायीं घटाचा अभाव असतो, तैसा ब्रह्मीं जगताचा अभाव आहे ऐसें वाटतें त्यास कैसें करावें? यासि उत्तर, त्या जगदभावाचाहि नाश करावा ऐसें सांगतात,

घटाचें नाहींपण फोडू। गगनाचिं फुलें तोडू।
ससियाचें मोडू। सिंग सुखें ॥ ५३ ॥

अवघी मृत्तिकाचि असतां घट म्हणून काय पदार्थ आहे, ज्या हेतूस्तव घटाभाव असावा? तैसें सर्वदा ब्रह्मचि आहे, जग केव्हांही नाहींच; मग ब्रह्मीं जगताचा अभाव तो कोठून असणार? या प्रकारें घटाचे नाहींपण, जगताचें नाहींपण, फोडावें, नाहींसें करावें हा भाव. अहो, 'नाममात्रमिदं जगत्' ऐसें शास्त्रें वार्णितात, तेव्हां ब्रह्मीं नाममात्रेंकरूनच जग आहे कीं? यासि उत्तर, जग हें नामहि नाहीं ऐसें सांगतात; जैसें गगनाचे ठायीं फुलें नाहींत आणि खपुष्प ऐसें शब्दानें

म्हणावें, परंतु ती शब्द मिथ्या होय, कां जे आकाशाचे ठायीं पुष्पाचा असंभव म्हणून. तैसें चिद्गगन ब्रह्म जें तेथें जग नाहीं आणि जगत् ऐसें शब्दानें मात्र म्हणावें, परंतु ती शब्द मिथ्या होय? कां जे जग ऐसें नामहि ब्रह्मीं नाहीं म्हणून. ऐसीं चिद्गगनाचीं फुलें नाममात्र जग हें तोडावें, नाहींसें करावें हा भाव. अहो, विचारकाळीं जगत् मिथ्या वाटतें आणि व्यवहारकाळीं सत्यासारिखें वाटतें हें काय ? यासि उत्तर तेणें संकल्पाचा बाध करावा ऐसें सांगतात. सशाचे मस्तकीं शिंग नसतां उगेच भ्रांतास वाटतें जे सशाचेही मस्तकीं सिंग असेल. तैसे अनादि भ्रांतीस्तव अज्ञ जनास वाटतें कीं ज्या संकल्पाच्या योगेंकरून संपूर्ण जग भासलें तो संकल्प आत्म्याचे ठायीं असेल. अस्तु, त्या संकल्पाचा नाश करावा. कैसा करावा म्हणाल तरि तो ऐसा. केवल ब्रह्मीं संकल्प नाहीं, तेव्हां आपले ठायीं संकल्प होतो तो मिथ्या होय ऐसा बोध करावा. अहो मंद जिज्ञासु आणि कामादिकेंकरून पीडित जो तेणें काय करावें? त्याला अभ्यास करणें सांगतात,

तो कापुराचि मसी करू । रत्नदीपिं काजल धरू ।
वांझेचें लेकरूं । पर्णू मुखें ॥ ५४ ॥

कापुरासारिखा स्वच्छ जो सत्वगुण त्याची मसी करो, सोनेरी शाईसारिखा खलून वृद्धीतें पाववो. नंतर रत्नासारिखा स्वप्रकाश अंतरात्मा जो त्याचें काजळ धरो, अन्यथाज्ञानरूप अज्ञान जें त्यातें धरून त्या अज्ञानाचे नाशार्थ वंध्या प्रकृति जे तिचें लेकरूं विद्या जे तीतें पर्णो, वरो मुखें.

अवंसेचेनि सुधाकरें । पोसू पाताळिंचीं चकोरें ।
मृगजळिंचिं जलचरें । धरू सुखें ॥ ५५ ॥

अमावास्येचे दिवशीं आपले ठायीं चंद्र असतो, परंतु तमानें व्याप्त मनुष्याची दृष्टि म्हणून सुधाकर दिसत नाहीं. तैसें अविद्याकाळीं ब्रह्म आपलें आपण आहेचि, परंतु जीव जो तो अविद्या आवरणेंकरून व्याप्त झाला म्हणून ब्रम्हातें पहात नाहीं. तेणें शुद्धबुद्धियोगें केवल ब्रम्ह अनुभवून, अभानावरणाचा नाश करून बहुकाळ समाधि करावा आणि ब्रह्मानंदसुखेंकरून मनाचीं द्वारें पाताळींचीं चकोरें, इंद्रियें, पोसावीं, सुखातें पाववावीं हा अभिप्राय. अहो, इतुका ब्रह्मानंद जो तो कामक्रोधादिक शत्रु जे ते कैसे सेवन करूं देतील ? यासि युक्ती सांगतात. सुखेच्छा

ज्यास आहे तेणें मायामृगजळनदीचीं जळचरें है कामक्रोधादिक जे त्यांतें धरावें, जिंकावें हा अभिप्राय. आतां जिज्ञासू जे ते कृतार्थ जाले, त्यांस आसीर्वाद देऊन सांगतात,

असो हें किती बोलावें । अविद्या रचिली अभावें ।
आतां काइ नासावें । शब्दें एणें ? ॥ ५६ ॥

तुह्मांस उपदेशिलें केवल ब्रह्म जें तें तुमचें तुह्मास नित्य प्राप्त असो. आतां अविद्या नाहीं हें किती बोलावें ? अहो गुरुमहाराज, हे अविद्या आहे ह्मणून आह्मांस कशास्तव वाटलें होतें हे आज्ञा व्हावी. अरे, ब्रह्मवस्तु सबाह्य परिपूर्ण असतां तुह्मांस त्याचा अभाव वाटला होता ह्मणून त्या अभावानें हे अविद्या रचिली, उभी केली होती. आतां शब्दाभिमानी अविद्येचा नाश करीन ह्मणतो, त्या शब्दानें काय नाशावें बरें ? नाश करावयाजोगा पदार्थ नाहीं हा भाव.

नाहीं तेयाचेनि नासें । शब्द नये प्रमाणदसे ।
अंधारिं अंधारा जैसें । नोहे रूप ॥ ५७ ॥

अविद्या सर्वथैव नाहीं जे तिच्या नाशांकरून शब्द जो तो प्रमाणदशेप्रत येणार नाहीं. आणि जैसें अंधारिं रात्रीचे ठायीं अंधार जो त्याचें वेगळें स्वरूप रहात नाहीं, तैसें अविद्या आणि अविद्याकार्य शब्द जो त्याचें वेगळें रूप नाहीं, ह्मणूनहि शब्दाच्यानें अविद्यानाश होणार नाहीं हा भाव. आतां शब्दवादी हें ऐकून ह्मणतो जे, आह्मांपासीं युक्ति आहेत, त्या युक्तिनेंहि नाहीं जे अविद्या तसीसाच नाश करूं. त्यांसि उत्तर ती अविद्या नित्य नाहीं ऐसें सांगतात,

अविद्या नाहीं जाति । तेथें नाहीं ह्मणतया युक्ति ।
दुपारिंच्या होति वाती । अंगणींचिया ॥ ५८ ॥

तुमचे न्यायमतीं जाति म्हणून नित्य आहे, तैसि हे अविद्या नित्य नाहीं. तेथे तुमच्या नाहीं म्हणावयाच्या युक्ति ज्या त्या जैशा दोनप्रहरीं दिवसा तम जावयासाठीं अंगणांत वाती लावणें व्यर्थ होय तैशा होतील. अहो, आमचें न्यायशास्त्र तीक्ष्ण आहे, अविद्या आम्ही कापून काढूं ? या बोलण्याचा उपहास करितात,

न पेरितां सेति । संवगणी जे जाती ।
तेयां लाजेपरति । जोडी आहे? ॥ ५९ ॥

शेतांत धान्य न पेरिलें असतां, संवगणि, काढणी, करावयास जे जातात त्यांजला लोक हसतात कीं हा मूर्ख आहे ह्मणून. मग त्या काढणीस जाणारास लज्जेपरती जोडी आहे काय? जोडी नाहीं, लज्जाच प्राप्त होणार. तैसा तूं किती शहाणा ह्मणावास, जे मुळीं अविद्या जन्मलीच नाहीं आणि तीतें कापून काढीन ह्मणतोस? तस्मात् तूं फार शहाणा दिसतोस. अहो, आह्मी अविद्येचे उरावरी चढून तीतें मारूं. यासि व्यर्थत्व सांगतात,

खवनियाचेया अंगा । जेणें केला वलघा ।
तो न करितां उगा । घरिं होता! ॥ ६० ॥

खवनिया, पिशाच खशब्दें करून आकाश जें तें आहे वाहन ज्या वायूचें आणि तो पिशाचही वायुस्वरूप ह्मणून त्यातें खवनिया ऐसें ह्मणावें. त्याचे अंगावरी वळघा ह्मणजे चढणें ज्यानें केलें त्यानें न केल्यासारिखेंचि होय. कारण जे त्यातें आकार नाहीं ह्मणून. पिशाच्यानें आकार दाखविला तरी तो मिथ्या होय, ह्मणुनि त्याजवरी बसूं गेला जो तो घरींच असल्यासारिखा होतो; त्याजवरी बसून कोठें जात नाहीं. तैसी हे अविद्या होय, तीतें मारूं जातां क्रिया व्यर्थ होती. अहो, शब्दाची शक्ति पर्जन्यासारखी आहे, तेव्हां शब्दवृष्टि करून अविद्या नाहींसी करूं. यासि उत्तर,

पाणियावरि वरिखु । होतां कवण विशेखु ।
अविद्यानासिं उन्मेखु । फांकावा तैसा ॥ ६१ ॥

भूमीवरि पाऊस पडिला तरि उपयोग तरी होतो. परंतु पाणियावरी वरिखु, वृष्टि जाली तरि कोण विशेष, काय उपयोग? व्यर्थ होय. तैसा स्वकारणरूप अविद्येचा नाश करण्याविषयीं शब्दाचा उन्मेष, उत्साह व्यर्थ होईल. ऐसी न्यायशास्त्राची निर्भत्सना केल्यानंतर आतां वैयाकरणी बोलतो, अहो, संपूर्ण शब्दांस तुह्मी व्यर्थता कैसी आणली? आमचे व्याकरणानें शब्दाचें प्रमाण केलें आहे, तेव्हां अविद्येचेंही प्रमाण करील. यासि उत्तर हें घडणार नाहीं ऐसें सांगतात,

माप मापपणें श्लाघे । जवं आकाश मवों न रिघे ।
तम न पाहतां वाउगे । दीपाचे जन्म ॥ ६२ ॥

अरे, तुझें व्याकरण शब्द मोजावयास माप खरें, परंतु मापपणाची श्लाघा तों पावेतोंचि जंव आकाशासरिखी पोकळ हे अविद्या तीतें मोजूं निघालें नाहीं तोंपावेतों. अस्तु, तुझ्या व्याकरणाच्यानें अविद्या मोजणें होणार नाहीं हा भाव. आतां ज्योतिष-शास्त्री म्हणतो, आमचे शास्त्रानें अप्रसिद्ध राहूचें प्रकाशन केलें तैसें अविद्ये-चेंही प्रकाशन करील. यासि उत्तर. अरे, ज्योतिषा, दीपासारिखें तुझें ज्योतिष-शास्त्र जें तेणें अदृश्य गृह सांगितला, तो अवसे पुनवेस तरि दिसतो; परंतु अविद्या-तैसी नव्हे कीं ज्योतिषशास्त्र तीतें प्रकाशित करील. अस्तु, या हेतूस्तव तुझे ज्योतिषशास्त्राचा जन्म वाउगा, व्यर्थ होय. आतां वैद्यराज म्हणतो, आमचा आयुर्वेद वैद्यशास्त्र, मोठे मोठे रोग दूर करून जिव्हेस पाकाच्या योगेंकरून रुचि आणतें. तें वैद्यशास्त्र भवरोग दूर करून जिव्हेकडून अविद्या खाववील. यासि उत्तर,

गगनाचि रससोये । जीभ आरोगुं जै जाये ।
तैं रसना हें होये । आडनावं कीं ! ॥ ६३ ॥

गगनासारिखी पोकळ अविद्या जे तीतें जिव्हा जे ते रससोय, पाकासारिखी, आरोगूं, सेवन करावयास जेव्हा जाईल, तेव्हां रसना हें आडनांव मात्र राहील. ह्मणोनि वैद्यशास्त्राच्यानें जिव्हेकडून अविद्या खाववणें होणार नाहीं हा भाव. आतां अन्य शास्त्रांचा उपहास करितात,

न निफजतेनि अन्नें । जेवणें तेंचि लंघनें ।
निमालेनि नयनें । देखणा अंधु ॥ ६४ ॥

अन्नातें न निफजवितां भुलेंभुलीचे खेळांत जें जेवणें तें लंघनाचि होय. तैसे शून्यवादी जे यांनीं सद्वस्तूचें स्थापन न करितां ग्रंथविस्तार करिजेले, ते न केल्या-सारिखेचि होत. कोणहासही त्याचा उपयोग नाहीं, कारण जे शून्यवाद स्थापिला आहे ह्मणून. अंधाचे डोळे निमाले, गेले असतां डोळे वासवासूं पाहतो. तैसा हा बौद्धशास्त्रकर्ता होय. कां जे द्रष्ट्याचे दृष्टीनें सर्व प्रपंच उभा केला ऐसें असतां तो ह्मणतो जे बुद्धींत प्रपंच होता तोचि बाहेर आला ऐसें वर्णितो, ह्मणून तो अंध होय. आणि आपणातें शास्त्रदृष्टीनें देखणारा ह्मणवितो, परंतु तेणें व्यर्थ बडबड केली.

नव्हतेनि वल्लभें । अहेवपण शोभे ।
खाता न खाता गाभे । केळिचे जैसे ॥ ६५ ॥

जीचा वल्लभ, पति नाहीं, तीचें अहेवपण शोभतें काय? शोभत नाहीं. तैसे शृंगारशास्त्राचे ठायीं स्त्रियांचे रूप-गुण-चातुर्य-भूषणांचें आणि व्यभिचाराचें वर्णन आहे, तें शृंगारशास्त्र व्यर्थ होय. त्यांत ईशवर्णन नाहीं आणि प्रवृत्ति-निवृत्तिमार्गाचे उपयोगी नाहीं; मग अविद्यानाशनार्थ तें कैचें प्रवृत्त होणार? ऐसें ऐकून आतां धनुर्वेदवेत्ता बोलतो. अहो, आमचा धनुर्वेद ऐसा व्यर्थ नव्हे, ज्याचे ठायीं ब्रह्मास्त्रादिक मोठमोठे अस्त्रें सांगिजेलीं आहेत. त्या अस्त्रानें अविद्येला खावऊन टाकूं. यासि उत्तर अस्त्राच्यानें अविद्या खाणें होणार नाहीं ऐसें सांगतात. जैसा सर्व खाणारा आहे तो केळीचे गाभे खाऊं गेला असतां न खाणाराचि होय, तैसीं तुह्मीं अस्त्रें संपूर्णाचा नाश करून खातील, परंतु नाहीं जे अविद्या तीचा नाश करून कैसे खातील? सारांश, अविद्यानाशनाविषयीं धनुर्वेद व्यर्थ होय हा भाव. आतां वैदिक बोलतो, आमचा वेद सर्वप्रकाशक तेव्हां तो तमोरूप अविद्येचें प्रकाशन करील. यासि उत्तर वेदाच्यानें अविद्येचें प्रकाशन करणें होत नाहीं ऐसें सांगतात,

स्थूल सूक्ष्म कवणयेकु । पदार्थ न प्रकाशि अर्कु ।
परि रातींविखिं अप्रयोजकु । जालाचि किं ! ॥ ६६ ॥

जैसे स्थूळसूक्ष्म जे जे पदार्थ असतील त्यांतें सूर्य जो तो प्रकाशित करीत नाहीं काय? प्रकाशित करितोची. परंतु रात्रिविखीं, रात्रीविषयीं अप्रयोजक, अनुपयोगी जालाचि कीं. तैसा संपूर्ण वेदराशि धर्माधर्मप्रवृत्तिनिवृत्ति संपूर्ण प्रकाशित करितो, परंतु अविद्येविषयीं तो अप्रयोजक जाला, त्याच्यानें अविद्येचें प्रकाशन करणें होत नाहीं हा भाव. अहो शब्दप्रमाणानें तरि अविद्येचें कांहीं होत नाहीं, परंतु प्रत्यक्ष प्रमाण तरि अविद्येतें हुडकून काढील कीं? यासि उत्तर प्रत्यक्ष प्रमाणाच्यानें अविद्येतें पाहणें होत नाहीं ऐसें सांगतात,

दिठीसि काइ एक न फावे । परि निद्रेतें न देखवे ॥
चेइतां न संभवे । म्हणौनिया ॥ ६७ ॥

दिठी, नेत्रदृष्टी जे तीतें काय एक न फावे, काय एक दिसत नाहीं? सर्व दिसतें. परंतु निद्रेतें न देखवे, कारण जे चेइतां जागें झालें असतां निद्रा संभवत नाही ह्मणून.

तैसे योगशास्त्रोक्त योगाभ्यासेंकरून शोधित केली जे ज्ञानदृष्टि तीतें काय एक दिसत नाहीं ? स्वर्गीचे अथवा येथील सर्व पदार्थ दिसतात. परंतु अविद्या दिसत नाहीं. त्याचि प्रकारें वेदांतशास्त्राच्या योगें जाली जे ज्ञानदृष्टि तिजलाही अविद्या दिसत नाहीं आणि तीचा संभवही नाहीं. कारण जे एक अद्वितीय वस्तुबोध जाला आहे म्हणून. अहो, अद्वितीय-वस्तुबोध तरि जाला आहे आणि अविद्या हे सत्य आहे ऐसें ज्यास वाटतें त्याचे बोधास काय म्हणावें ? यासि उत्तर देतात,

चकोराचिया उद्दिमा । लटिकेपणाचि सीमा ।
जर्‍हि दिहाचि चंद्रमा । गिंवसों बैसे ॥ ६८ ॥

चकोर पक्षी जो तो रात्रिसारिखें चंद्रातें दिवसा जरि गिंवसूं, सांपडवूं बैसला तरि त्याचे उदिमास म्ह० यत्नास लटिकेपणाचि सीमा जाली. तैसा ज्ञानियाचा मानसचकोर जो तो अज्ञानरात्रीचे ठायीं अविद्यायुक्त अन्यथा बोध जो त्यातें सांपडवीत होता. तैसेंचि ज्ञानोदय जाल्यावरि अविद्यायुक्त बोधातें सांपडवूं गेला तरि त्याचे श्रवणमननादि साधनातें लटिकेपणाची सीमा जाली ऐसें जाणावें. आतां शब्दप्रमाण आणि प्रत्यक्षप्रमाणें जे तीं केवल ब्रह्म वस्तूतें विषय करीत नाहींत, तैसेंचि अविद्येतेंही विषय करीत नाहींत ऐसें सांगतात,

नुसधिया साचा । मुका होय वाचकाचा ।
अंतराळिं पायाचा । पेंधा होय ॥ ६९ ॥
तैसीं अविद्यासन्मुखें । सिध्दांतप्रतिच्छेदकें ।
उठलिं निरर्थकें । प्रमाणें होति ॥ ७० ॥

अन्यासि भाषण केल्यावांचून कोण्ही एक पुरुष जो तो बृहस्पतिसारिखा वाचक, वक्ता जरि आहे, आणि नुसधा एकला बसला तरि साच मुक्यासारिखा होतो; तैसा वेद जो तो सृष्टि उपक्रम उपसंहाराचा वक्ता जरि आहे तरि नुसधया साचा म्ह० सर्वोपाधिविवर्जित सत्य ब्रह्म वस्तु जे तत्पर जाला असतां मौनस्वरूप ब्रह्मासारिखा मुका होतो आणि दृश्यभूमिवरि पायानें चालणारा मनोरूप संकल्प जो तो अंतराळीं, निरालंब ब्रह्माचे ठायीं पेंध्यासारिखा पांगुळ होतो. तैसीं त्याचि प्रकारें वेदबाह्य बौद्धादि मताचे जे सिद्धांत त्याचे च्छेद करणारे शब्दादि प्रमाणें जे ते नाश करावयाविषयीं अविद्येच्या सन्मुख उठविलीं असतां निरर्थक, व्यर्थ होतात. अहो शास्त्रविचार जो तो अविद्येचा नाश करील कीं नाहीं ? यासि उत्तर,

**अवंसे आला सुधाकरु । न करि काय अंधारु ।**
**अविद्यानासिं विचारु । तैसा होय ॥ ७१ ॥**

सुधाकर चंद्र जो तो पूर्णिमेस आला तरि प्रकाश करील, आणि अमावास्येस चंद्र आल्यावरि त्यातें अंधार जो तो आपले स्वाधीन करणार नाहीं काय? स्वाधीन करून घेईलाचि. तैसा शास्त्रानुकूळ विचार जो तो तत्वज्ञानाकडे प्रवृत्त जाला तरि जिज्ञासूतें वस्तुरूप करील आणि अविद्येचा नाश करावयाविषयीं विचारप्रवृत्त जाला तरि त्यातें अज्ञानरूप अंधार जो तो आपले स्वाधीन करून घेणार नाहीं काय? स्वाधीन करून घेईलाचि. आतां शब्दासि मिथ्यात्व सांगतात,

आतां अविद्याचि नाहीं । हें कीर ह्मणों काई ॥
परि ते नासितां कांहीं। नुरेचि शब्द ॥ ७२ ॥
कैसेनहि वस्तु नसे । जैं शब्दार्थ होऊं बैसे ।
तैं निरर्थक पणें नासे । शब्दहि थिता ॥ ७३ ॥

आतां अविद्या नाहीं हें काय ह्मणावें? परंतु अविद्येनें नाशिता शब्दही उरत नाहीं, मिथ्या होतो. आणि कोणत्याही प्रकारेंकरून वस्तु नसावी आणि ज्या वेळेस उच्चारिल्या शब्दाचा अर्थ होऊं बैसावा तो ऐसा. जैसा वंध्यापुत्र पदार्थतत्वें तरि नसावा आणि वंध्यायाः पुत्रः वंध्यापुत्रः ऐसा व्याकरणानें शब्दार्थ तरि व्हावा. तैसा पदार्थ नसून अर्थ होऊं बसतो, तो अर्थ थिता ह्मo होत असताही निरर्थकपणें नाशातें पावतो, व्यर्थ होतो.

या लागिं अविद्येचिया महुरा । उठिलियाहि विचारा ।
अंगाचाचि संसारा । होउनि ठेला ॥ ७४ ॥

यालागीं अविद्येचिया मोहरा, सन्मुख, विचार जो येणें उठावणी केली असतां त्याचे अंगाचाचि संसार, मिथ्यात्व होउनि ठेले, राहिलें. ह्मणोनि अविद्येचे मरणेंकरून बोलणें शब्द जो तो प्रमाणतेसि येईल हें अविद्याचि घडूं देत नाहीं. अविद्या ह्मणती कीं मी जैसी नाहीं तैसा तूंही परमार्थदृष्ट्या नाहींसचि. आतां अविद्यानाशनाचे उपयोगी हा शब्द नाहींच परंतु आत्म्यास आत्मा दाखविण्याचेहि उपयोगी हा शब्द नाहीं ऐसें सांगतात,

तरि आत्मा ह्मान आत्मया । दावोनि बोल महिमे इया ।
येईल हे सविया । विरुध्दाचि ॥ ७५ ॥

ह्मान, आणखी आत्मा तरी आत्म्यास दाखउनी बोल या महिमेस येईल हें सविया, सर्वेचि विरुद्ध होय. अहो हा शद्ब जो तो जिज्ञासुतें वृत्तिद्वारा आत्मप्रकाशन करून देतो कीं ? यासि उत्तर,

पहावेया दिवसु । कीजे वातिचा सोसु ।
तो तेव्हडाहि उद्वसु । उदीम पडे ॥ ७६ ॥

सूर्यासारिखा नित्य स्वयंप्रकाश आत्मा जो त्याचे योगेंकरून बुद्धि प्रकाशित होती. मग त्या बुद्धिवृत्तीनें आत्मा प्रकाशित करून पाहणें कैसें घडेल ? जैसा दिवस उगवला कीं नाहीं हें पहावयासाठीं वातीचा सोस, आयास करणें तो तेवढाही उदीम उद्वस पडे, व्यर्थ होय. अहो शद्ब जो तो आत्म्याकरऊनचि आत्म्याला पाहविवील कीं ? यासि उत्तर,

आपणया आपणासी । लागलें लग्न कोण्हे देसीं ।
सूर्य निजांग ग्रासी । ऐसें ग्रहण आहे ॥ ७७ ॥

जैसें कोणतेही देशीं आपलें आपणासी लग्न लागत नाहीं. तैसा सर्वव्यापक आणि एक आहे ह्मणोनि आत्म्याला आत्मा पाहत नाहीं आणि भेटतहि नाहीं. अहो, शद्बाच्या योगेंकरून आत्मा जो तोचि आपलें आपण ग्रहण करील कीं ? यासि उत्तर, चित्सूर्य आत्मा जो तो आपलें निजांग केवल ब्रह्म जें त्यातें ग्रासून आपण आपलें ग्रहण करितो ऐसें आहे काय ? कारण जे स्वप्रभ आत्मा अद्वितीय आहे ह्मणून.

गगन आपणया निगे । सिंधु आपणया रिगे ।
आपुला माथा वलघे । आपण कोणी ? ॥ ७८ ॥

गगनासारिखा आत्मा जो तो आपण आपणांतून निघत नाहीं, मग भेटणें तें कैंचें असणार ? आणि सिंधूसारिखा आत्मा पूर्ण आहे म्हणून आपण आपणांत रिघत नाहीं, प्रवेश करीत नाहीं, आणि जैसा कोण्ही आपल्या माथ्यावरि आपण वळघत नाहीं, चढत नाहीं, तैसा अद्वितीय आत्मा आपण वळघत नाहीं, चढत

नाहीं. अहो शब्द जो तो जीवात्म्यासि आणि परमात्मयासि एकरसत्व करून देतो कीं ? यासि उत्तर,

चराचरातें पाजणी । करूं येईल येके क्षणिं ।
परि पाणियासि पाणी । पाजवे काई ? ॥ ७९ ॥

मेघ जे यांनीं चराचरातें पाणी जे तें एके क्षणीं पाजतां येईल. परंतु पाणियासीच पाणी पाजतां येईल काय ? पाजतां येणार नाहीं. तैसी शब्दरूप अनेक शास्त्रें जे यांणीं चराचरातें आत्मरूप करितां येईल, परंतु आत्म्यासीच आत्मा करितां येईल काय ? करितां येणार नाहीं. कारण जे आत्मा पूर्वसिद्ध एकरस आहे ह्मणून. अहो, शब्दरूप शास्त्रें जे तीं जीवात्मियास परमात्मदर्शन करून देतात कीं ? यासि उत्तर हें घडत नाहीं ऐसें सांगतात,

साठीतिसां दिवसां । एखादा होये ऐसा ।
सूर्यासि सूर्य जैसा । डोला दावि ? ॥ ८० ॥

जैसें वर्षाचे तीनशेंसाठ दिवस आहेत, परंतु एखाद्या दिवसानें तरि ऐसें असावयाचें होतें, जे सूर्यासि सूर्य डोळा दाखवावयाचा होता. तैसे शब्दरूप शास्त्रें अनेक आहेत, परंतु एखाद्या तरि शास्त्रानें ऐसें करावयाचें होतें जे जीवात्म्यास परमात्मा दाखवावयाचा होता. अस्तु, हें घडत नाहीं, कारण जे सूर्यासारिखा एक अद्वितयि आत्मा नित्य प्रकाशमान आहे म्हणून.

कृतांत जर्‍हि कोपेल । तर्‍हि त्रैलोक्य जालील ।
वांचौनि आगी लाविल । आपणा काइ ? ॥ ८१ ॥

कृतान्त, प्रळयाग्नि जो तो कोपातें पाऊन त्रैलोक्यातें जाळील, परंतु आपणातें जाळील ऐसें होतें काय ? होत नाहीं. तैसा परमात्मा जो तो स्वरूपनिद्राकाळीं चित्तावरि धरील तरि संपूर्ण जगतासि कारणभूत चिच्छक्ति, प्रकृति, माया ज्या त्यातें नाहींसें करील. परंतु आपण आपणातें नाहींसें करील ऐसें घडत नाहीं. आतां शब्दाभिमानी सांख्य जो तो बोलतो,

आपणपें आपणया । समोर होआवया ॥
दर्पणेंवीण धातया । ठाकि आहे ? ॥ ८२ ॥

अहो ज्ञानोबा, तुमचा आत्मा कांहीं करीत नाहीं, परंतु जैसा धाता, ब्रह्मदेव जरि असला, तरि आपले सन्मुख आपण व्हावयास दर्पणावीण ठाकी, स्थिति आहे काय ? स्थिति नाहीं. तैसा आत्मा जो त्यास शुद्ध सत्वात्मिका बुद्धि जे तिजवांचून आपणातें जाणावयाची ठाकी, स्थिति आहे काय ! स्थिति नाहीं. या हेतूस्तव आमचा शब्द जो तो बुद्धिकरऊनच आत्मदर्शन करऊन देईल कीं ! आतां सिद्धांती बोलतात,

दिठी दिठीतें रिघों पाहों । शके रुचि रुचीतें खावों ।
चेता आणि चेवो । तें नाहींच किं ॥ ८४ ॥

जैसी नेत्रदृष्टि जे ते आपण आपणांतें पाहूं सकत नाहीं, किंवा मुखाची रुचि जे ते आपण आपणातें खाऊं सकत नाहीं, तैसी द्रष्ट्याची दृष्टि जे ते आपण आपणातें पाहूं सकत नाहीं; मग आत्म्यास कैसी पाहूं शकणार ? किंवा बुद्धि जे ते सुप्ति-समाधिकाळीं आपले आहेनाहींपणाची रुचि घेऊं सकत नाहीं, मग आत्मयाची भेटी घेऊन आत्मसुखाची रुचि कैसी घेऊं शकेल ? अथवा बुद्धि आणि दृष्टि ज्या यांनीं आत्मयातें जागें करूं ह्मटलें तरि हेंही होत नाहीं. जैसा चेता, जागा आहे त्यातें, चेवो ह्म० जागें करणें घडत नाहीं, तैसा आत्मा स्वयंप्रकाश नित्य आपण आपले ठायीं जागाचि आहे, त्यातें बुद्धीनें आणि दृष्टीनें जागें तें काय करावें ? आतां तत्पदार्थांचे दृष्टांत देऊन तैसें त्वंपदार्थी घडत नाहीं ऐसें सांगतात,

चंदनु चंदना लावि । रंगु रंगपणा रावि ।
मोतीपण मोतिं लेववी । ऐसें कैचें ? ॥ ८५ ॥

चंदन, गंध, जे तें मनुष्यादिकांनीं लावलें असतां सुगंधिक शरीर होऊन सुख होतें. त्याचिप्रकारें चंदन वृक्ष जो येणें आपणातें सुख व्हावयाकरितां गंध लाउनि सुगंधित केलें आहे काय ? आपणातें सुगंधित केलें नाहीं. कारण जे चंदन वृक्ष जो तो स्वयें सुगंधिरूपचि आहे म्हणून. तैसा मायावी ईश्वर जो येणें आपणास सुख व्हावयाकरितां आकाशादि गंधवतीपृथ्वीपर्यंत पंचभूतें जे त्यातें अंगीं लाऊन घेतलें ऐसें नाहीं. तरि काय पंच महाभूतें जे ते ईश्वराचें शरीरचि होय. आणि रंग जो तेणें करून अन्य भुवट वस्त्रें जे तीं रंगविलीं जातात, तैसे रंग जो येणें आपणातें राविलें, रंगविलें आहे काय ? आपणातें रंगविलें नाहीं. कारण जे स्वयें रंगस्वरूपचि आहे ह्मणून. तैसा परमपुरुष जो येणें स्वप्रकृतियोगेंकरून अनेक अंत:करणें प्रकाशीत

केलीं जातात. त्याप्रकारें प्रकृतीच्या योगें परमपुरुष जो तो आपणातें प्रकाशित करून घेत नाहीं. कारण जे प्रकृतिसहित एक पुरुषचि आहे ह्मणून. आणि मोत्याचें मौक्तिकपण जें तें मोत्याकरऊन आपणातें लेववील ऐसें घडेल काय? ऐसें घडणार नाहीं. तैसा नित्यमुक्तस्वभाववान् परमात्मा जो त्याची चिच्छक्ति जे ती परमात्मयाकडून आपलें धारण करवील ऐसें कैचें घडणार? ऐसें घडणार नाहीं. कारण जे चिच्छाक्तिसहित एक परमात्माचि आहे ह्मणून.

सोनेंपण सोनें कसिं । दीपपण दीप प्रकाशि ।
रसपण बुडी दे रसीं । तें कें जोडे ॥ ८६ ॥

जैसें सोनें जे तें कसवटीवर घासलें असतां त्याचा कस जो तो उमटतो, आणि मोठ्या सुवर्णगोळ्यावरि लहान सोनें घासलें असतां कस उमटतो काय? कस उमटत नाहीं. तैसें प्रत्यगात्मचैतन्यैंकरून अंतःकरण जें तें चेतनत्व पावतें त्याप्रकारें प्रत्यगात्मयोगेंकरून परमात्मा जो त्यास चैतन्यत्व येतें काय? नूतन चैतन्यत्व येत नाहीं. कारण जे प्रत्यक्चैतन्य आणि परमात्मचैतन्य एकाचि आहे ह्मणून. आणि जैसें दीपाचें दीपपण जें तें घटातें प्रकाशित करतें त्यापरि दीपातें प्रकाशित करतें काय? दीपातें प्रकाशित करीत नाहीं. तैसें जीवचैतन्य जें तें इंद्रियांतें प्रकाशित करितें, त्यापरि ईशचैतन्याला प्रकाशित करितें काय? प्रकाशित करीत नाहीं. कारण जे जीवचैतन्य आणि ईशचैतन्य एकाचि आहे ह्मणून. आणि जैसें रसपण जें तें पृथ्वीवर पडलें असतां बुडी देतें त्याप्रकारें रसाचे ठायीं बुडी देतें काय? रसपण बुडी देत नाहीं. तैसें द्रष्टृचैतन्य जें तें देहत्रयाचे ठायीं बुडी देऊन असतें, त्याप्रकारें सर्वांतर्यामी परमपुरुष जो त्याचे ठायीं बुडी देत नाहीं. कारण जे सर्वांतर्यामी सर्वद्रष्टा एक परमपुरुषाचि आहे ह्मणून.

शिवमुकुट आइता । ह्मणौनि चंद्र बैसला वरुता ।
परि चंद्र चंद्राचे माथा । बैसे काई? ॥ ८७ ॥

जैसा चंद्र जो तो शिवमुकुट आइता ह्म० पूर्वसिद्ध आहे ह्मणून त्याचे ठायीं बसता झाला. परंतु जो तो आपण आपले माथा बैसेल काय? आपले माथा बसणार नाहीं. तैसे परमात्म शिवाचे मुकुटस्थानीं शुद्ध ब्रह्म जें त्याचे ठायीं परम पुरुष जो तो स्थितीतें पावतो. परंतु सर्वांतर्यामी परमपुरुष जो तो द्रष्टृरूपत्वेंकरून आपण आपले ठायीं स्थिति पावणार नाहीं. कारण जे अवघा पुरुषचि आहे ह्मणून,

तैसा आत्मराज तवं । ज्ञानमात्र भरिवं ।
ज्ञानें ज्ञाना खेंव । कैसें दीजे? ॥ ८८ ॥

पूर्वी दृष्टांन्तेंकरून सांगिजेले परमात्मा आणि पुरुष ईश्वर जे जैसे आपले ठायीं आपण स्थिती पावत नाहींत, तैसा प्रत्यगात्मा जो तो ज्ञानमात्र भरींव म्ह० पूर्ण केवळब्रह्मरूप तेणें या शद्वाचे योगेंकरून आपण आपणासि खेंव, भेटी, कैसी द्यावी? भेटी देतां येत नाहीं. अहो आत्मयानें आपण आपणांतें जाणावयासि तरि अडचण नाहीं कीं? यासि उत्तर,

आपलेनि जाणपणें । आपणा जाणों नेणे ।
डोलेया आपुलें पहाणें । दुवाड जैसें ॥ ८९ ॥

जैसा डोळा जो तो सर्व पदार्थास पाहतो, परंतु त्यास आपणातें पाहाणें दुवाड दुर्घट होय, तैसा आत्मा जो तो बुद्धि आदिकरून दृश्य पदार्थांतें जाणतो परंतु दृश्यासारिखें आपणातें जाणत नाहीं. अहो, आत्मा जो तो आपले दृष्टीकरून आपणातें पाहील कीं? यासि उत्तर,

दिगंतापैलिकडिचे । धावोनि सुरिया खोचे ।
मा तियेसि तियेचें । अंग फूटे ॥ ९० ॥

द्रष्ट्याची दृष्टि जे होचि कोण्ही एक सुरी होय. ती धाऊनि दिगंतरापैलीकडिचे देशांतराहूनि पलीकडील दृश्य जें त्यातें खोचि, व्यापिते: म्हणूनि तियेसी तियेचें अंग, आत्मस्वरूप जें ते फुटतें काय, भेदातें पावतें काय? भेदातें पावत नाहींच, मग त्या आत्मयातें दृष्टीनें पाहणें तें कैसें घडेल? घडणार नाहीं. आतां अंतरात्मा जो तो आपण आपणातें कां जाणत नाहीं याविषयीं एक हेतु सांगतात,

आरिसा आपुलिये । अंगिं आपणा पाहे ।
तन्हि जाणा जाणों लाहे । आपणातें ॥ ९१ ॥

शुद्ध स्फटिकाचे आरशासारिखें निर्मळ भूमास्वरूप ब्रह्म जें तें आपला अंगीं, आपलें ठायीं आपणातें पाहील जरि तरि जाणा, प्रत्यगात्मचैतन्य जें तें आपणातें जाणों लाहे, आपणातें जाणों पावेल. सारांश, शुद्ध ब्रह्म जें तें आपणातें जाणत नाहीं तेवि आत्म्याचें शुद्ध स्वरूपहि होय. या हेतूस्तव आत्मा आपण आपणांतें जाणत

नाहीं हा सिद्धांत. अहो, आत्मयाची संवित् जे आहे तेचि आत्मयातें जाणेल कीं ! यासि उत्तर,

रसवृत्ति रस उगाणे । जिव्हा घेवों जाणे ।
परि काय कीजे नेणे । आपणा चाखों ॥ ९२ ॥
तन्हि जिभे हान आपुलें । पावणें ह्मणों काय ठेलें ।
तैसें नोहे संचलें । तेंचि तें किं ॥ ९३ ॥

जैसी जिव्हा जे ती रसवृत्ति, रसग्रहण करण्याचे इंद्रियवृत्तिकरून कटुतिक्तादि षड्विध रसाचे उगाणे, कडू गोड-तिखट ऐसे उलगडे, करूं जाणती, परंतु तिणें काय करावें, आपणातें चाखूं जाणत नाहीं. तरि हान, आणखी, जीभ जे तीतें आपलें पावणें ठेलें, राहिलें ऐसें ह्मणों येईल काय ? ऐसें म्हणतां येणार नाहीं. जिव्हा जे ते जाणीववृत्तीकरून जागृदादि अवस्थेचे ठायीं बरें वाईट सुखदुःखादिकाचे उलगडे करूं जाणती. परंतु आपण कैसी आहे हें जाणूं सकत नाहीं. तरी संवित् जे तीतें आपलें आत्मस्वरूपत्व पावणें घडत नाहीं ऐसें म्हणों येईल काय ? तेसें नव्हे, त्या संवितेसहित आपण आपले ठायीं संचलें आहे जें आत्मचैतन्य तेंचि तें कीं, परमात्मस्वरूप पूर्वी सांगिजेलें तेंचि हें होय. आतां शब्दाभिमानियातें आणखी सांगतात,

तैसा आत्मा सच्चिदानंदु । आपणया आपण सिद्धु ।
आतां काय हे शब्दु । तयाचे तेया ? ॥ ९४ ॥

जैसा सच्चिदानंदलक्षण परमात्मा आहे तैसाच हा प्रत्यगात्मा जो तो सच्चिदानंदलक्षण असून आपले ठायीं आपण सिद्ध आहे. तेव्हां मग आतां संपूर्ण शास्त्ररूप शब्द जो तो त्याची त्याला प्राप्ति करून देईल काय ? प्राप्ति करून देणार नाहीं हा भाव. आतां प्रत्यक्षादि प्रमाणांचाही आत्मयास उपयोग नाहीं ऐसें सांगतात,

कवणा प्रमाणाचे हातें । वस्तु नेघे आपणातें ।
जे स्वयें आइतें । घेना नेघे ॥ ९५ ॥
ह्मणौनि आत्मा आत्मलाभें । नांदवौनि शब्दशोभे ।
येईल ऐसा न लभे । उमस घेवों ॥ ९६ ॥

कोणत्याही प्रमाणाचे हातेंकरून ब्रह्मवस्तु जे ते अन्या सारिखी आपणातें ग्रहण करिते आणि ग्रहण करीत नाहीं ऐसे दोन्हीही नाहींत. कारण जे ब्रह्मवस्तु जे ते

पूर्वसिद्ध आइतें आहे ह्मणून. अस्तु, तें ब्रह्मवस्तु प्रत्यगात्मयाचें स्वरूप होय. ह्मणोनि शब्द जो तो आत्मयातें आत्मलाभ करून देऊन शोभिप्रत येईल ऐसा उमस घेऊं न लभे, उच्छ्वास घेऊं शकत नाहीं. आतां शब्दास व्यर्थत्व सांगतात,

एवं मध्यान्हिंची दिवी । तम दवडिना दिवो दावी ।
तेविं उभयता पदवी । बोला जाली ॥ ९७ ॥

एवं, पूर्वी ग्रंथ वर्णिला त्याप्रमाणें जैसी मध्यान्हकाळीं दिवटी लाविलेली ते तमातें दवडीत नाहीं, आणि दिवसातेंही दाखवीत नाहीं, तैसी उभयता, अविद्या-नाशनाविषयीं बोल जो त्यास मिथ्यात्वपदवी प्राप्त जाली. सारांश, शब्दाचें जिणें व्यर्थ झालें हा भाव.

जे अविद्या नाहींपणें । नाहीं तियेतें काइ नासणें ।
आत्मा सिद्धचि मा तेणें । काइ साधावें ? ॥ ९८ ॥

जे अविद्या नाहीं तीतें नाहीपणें, निषेधत्वेंकरून काय नासणें? आणि आत्मा जो तो पूर्वसिद्धचि आहे; तेव्हां या शब्दानें काय साधावें, काय सांपडऊन घ्यावें?

ऐसा उभय पक्षीं । बोल न लाहोनि नखी ।
हारपला प्रलयोदकिं । बोध जैसा ॥ ९९ ॥

ऐसें पूर्वी सांगिजेलें याप्रकारेंकरून अविद्या आणि आत्मा या उभयपक्षींही बोल जो तो नखही न टेकणें लाहून, पाऊन जैसा प्रळयोदकाचे ठायीं पाण्याचा बोध जो तो हारपतो तैसा केवळ ब्रह्मीं हा शब्द हारपला, नाहींसा जाला.

आतां बोला भागु कांहीं । असणें जेया ठाईं ।
अर्थता तन्हि नाहीं । निपटौनिया ॥ १०० ॥

आतां बोला भागु ह्म० श्रुतिस्मृतिपुराणें आणि संपूर्ण शास्त्रें हे निपटोनि, पुरता विचार करून पाहिलें असतां ब्रह्मवस्तूचे ठायीं या शब्दाचें असणें अर्थता, अर्थेंकरून कांहीं नाहीं.

बागुल आला ह्मणतें । बोलणें जैसें रितें ।
आकाश वोलंबतें । तरि हान ॥ १०१ ॥

तैसीं निरर्थकें जल्पें । इयें उठलिं सपडपें ।
शोभती जैसिं लेपें । रंगावरी ॥ १०२ ॥

जैसें लेंकुरासि सांगावें जे बागुल आला आहे, हान ह्म० आणखी आकाश जें तें तळीं वोळंबलें, तळीं लोंबलें आहे; ऐसें कोण्हीही बोललें असतां मुलाला सत्य वाटतें, परंतु तें बोलणें रितें, पोकळ होय. तैसें, त्याचि प्रकारें, या शास्त्रांचीं जल्पें, शब्दजाल, सपडपें ह्म० मोठ्या आवेशेंकरून उठावलेलीं जे, ते कैसीं ह्मणाल तरी जैसी भिंतीवरी चित्रविचित्र रंगेंकरून काढिलीं व्याघ्रहरिणादि लेपें, चित्रें जे ते शोभतात; तैसी या संपूर्ण शब्दजालाची शास्त्रांचे ठायीं शोभा मात्र पहावी!

एवं शब्दैकजीवनें । बापुडीं ज्ञानाज्ञानें ।
साचपणें वनें । चित्रिचीं जैसीं ॥ १०३ ॥

शब्द जैसा निरर्थक, एवं या प्रकारें, शब्दाचि आहे उपजीवन जे ते ज्यांस ऐसीं जे ज्ञानाज्ञानें हे दोन्ही कैसीं ह्मणाल तरि जैसीं चित्रींचीं वनें, केळी नारेळीची झाडें काढितात ते भक्षणोपयोगी न पडतां उगेचि शोभा मात्र होय; तैसीं शास्त्रांनीं वर्णिलीं जे ज्ञानाज्ञानें ते व्यर्थ होत. अस्तु, हें पुढील सप्तम प्रकरणीं विस्तारपूर्वक वर्णिजेलें जाईल. आतां ब्रह्मअपरोक्षज्ञानी जे त्यांस सांगतात,

एया शब्दाचा निमाला । महाप्रलय हों सरला ।
अभ्रासवें गेला । दुर्दिन जैसा ॥ १०४ ॥

शब्दमात्र संपूर्ण जगत् आहे, या हेतूस्तव हा या शब्दाचे निमालेपणें संपूर्ण जगताच्या महाप्रलय हों सरला, होता झाला. आणि जैसें अभ्राच्या योगेंकरून मनुष्यातें दुर्दिन वाटत असतो, आणि ते अभ्रें गेलीं असतां दुर्दिनही जातो, तैसीं शब्दरूप अनेक शास्त्रें जीं त्यांयोगें कोवळे कच्चे ज्ञानी जे त्यांस मळमळीत अनेक संदेह प्राप्त होते, ते या शब्दखंडणेच्या योगेंकरून सर्व संदेह गेले ऐसें जाणावें.

। इतिश्रीमदनुभवामृते शब्दखंडननाम षष्ठं प्रकरणम् ।

रघुनाथ अद्वैत सच्चिदानंद । त्याचे चरणकमळांचा मकरंद ।
सेवोनि निरंजन हा मिलिंद । गुंजारव करीतसे ॥ १ ॥
अनुभवामृत-पदबोधिनी । निरंजनाची साबडी वाणी ॥
श्रीरघुनाथप्रसादें करूनि । ज्ञानेश्वरपदां अर्पिली ॥ २ ॥

॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

# अनुभवामृत—पद—बोधिनी.

## प्रकरण ७ वें.

श्रीगुरुदत्तात्रेयाय नमः । श्रीज्ञानेश्वराय नमः । श्रीरघुवीरचरणारविंदपराग-सेवन-भ्रमरीभूत श्रीदत्तात्रेयलब्धप्रसाद श्रीज्ञानेश्वरप्रेरित निरंजनाख्य जो तो जीवन्मुक्त श्रोत्यांप्रत प्रार्थना करितो जे तुम्ही श्रवण करावें. सहावे प्रकरणीं शब्दखंडन करून तो शब्दचि आहे उपजीवन जो तो जीस ऐसी जी ज्ञानाज्ञानें त्यांचीं स्वरूपें आणि पूर्ण शंभु परमात्मियाचा विलास या प्रकरणीं वर्णितात. आतां अज्ञानाचा प्रकार सांगतात,

यऱ्हविं तरि अज्ञाना । जें ज्ञानाची नसे क्षोभना ।
तें तरि कां ना । खालींच दडे ॥ १ ॥

यऱ्हवीं, सहज रीतीनें पाहिलें असतां, अज्ञान जें त्यास ज्ञानाची क्षोभना, तत्वज्ञानाची क्षोभरूपता जेव्हां नसे तेव्हा तरि कां नाहीं अन्यथा ज्ञानरूप अज्ञान जें तें व्यष्टिगत द्रष्टा जो त्याचे दृष्टिखालीं अविद्यारूपें दडून असतें. आतां चिदाभास जीवाचा प्रकार सांगतात,

आड सुवोनि अंधारिं । खद्योत दीप्ति झिरमिरी ।
तैसें हें लटिकें वरि । अनादि होये ॥ २ ॥

जैसा खद्योत रात्रीचे वेळेस अंधाराचा पडदा आड सुवोनि, स्वीकारून दीप्ति झिरमिरितो, कांहीं प्रकाश कांहीं तम ऐसें करितो, तैसा चिदाभास जीव जो तो जागृत अवस्थेचे ठायीं जगतातें जाणतो आणि सुषुप्तिअवस्थेंत कांहीं जाणत नाहीं ऐसें यावत् आयुष्य आहे तोंपावेतों करितो. तैसें हें अज्ञान लटिकें, वरि, लटिकेपणानेंच अनादि होय. आतां या अज्ञानाचा नाश तत्वज्ञानेंकरून होतो ऐसें सांगतात.

हें जाणतेयाचे घरिं । खाचिलें आनन न करि ।
काइ चांदिणा उठे लहरी । मृगाजलाची ? ॥ ३ ॥

ऐसें हें अज्ञान जें तें जाणतियाचे घरीं, तत्वज्ञानियाचे घरीं ह्म० हृदयदेशीं खाचिलें आनन न करि, नाशातें पावाविलें असतां डोसकें उचलीत नाहीं. अहो,

तत्वज्ञानियानें ज्ञानाभ्यास न केला तरि आणखी अज्ञान उत्पन्न होईल कीं ? यासि उत्तर, स्वच्छ चांदण्याचे ठायीं मृगजळाची लहरी उठती काय ? लहरी उठत नाहीं जैसी, तेसें असंदिग्ध अविपर्यस्त तत्वज्ञान जें त्याचे ठायीं अज्ञान आणि जगत्सत्यत्वबुद्धि उत्पन्नचि व्हावयाचि नाहीं. अहो, वेदांतशास्त्राचे ठायीं भावरूप अज्ञान स्थापितात तें कशावरून ? यासि उत्तर,

जैसी स्वप्निं स्वप्नमहिमा । किं तमिं मान असे तमा ।
तेविं अज्ञानगरिमा । अज्ञानींचि ॥ ४ ॥

जैसी स्वप्नांतील राज्यप्राप्तीची महिमा स्वप्नाचे ठायींच, किं तमोरूप सुषुप्ति जी तिचे ठायीं तम, अज्ञान जें त्याचा मान, योग्यता असती; तेंवि जगत्सहित अज्ञानाची गरिमा, श्रेष्ठता अज्ञानी जनाचे ठायींच वर्तताहे. अहो, आमचे वेदांत शास्त्रांतिल ज्ञान जें तेणेंकरूनच अज्ञाननाश होतो कीं ? यासि उत्तर, परोक्षज्ञानानें अज्ञाननाश होत नाहीं ऐसें सांगतात,

कोल्हेरीचे वारु । न येती धारकीं धरुं ।
नये लेणा श्रृंगारु । वोडंबरीचा ॥ ५ ॥

कोल्हेरीचे वारू, आकाशदिव्याचे कागदावरिल घोडे जे हे दीपाचे वायोकरून मोठे पलायमान असतात, परंतु ते धारकीं धरू येत नाहींत, युद्ध प्रसंगीं उपयोगी पडत नाहींत. तैसी स्वरूपें करून जड असीं जे वेदांतशास्त्रे त्यांचा संग्रह केला असता अज्ञान नाशनाचे उपयोगीं पडत नाहींत. आणि वोडंबरीचीं लेणीं, राक्षसी मायेनें निर्मिले जे अलंकर ते श्रृंगार करावयास येत नाहींत, आपातरमणीय होत. तैसीं शास्त्राध्ययनेंकरून घोकून पाठ केलीं जे शास्त्रीय ज्ञानें ते सभेचे ठायीं मात्र शोभतात, परंतु अज्ञान निवृत्त करून निरतिशयानंदावाप्तीस कारण होत नाहींत म्हणून. कारण जे वैराग्यपुरःसर ब्रह्मनिष्ठ गुरुप्रत शरण जात नाहींत म्हणून. आतां केवल शुद्ध ब्रम्हाचे सिद्धांतेंकरून ज्ञान आणि अज्ञान हे दोन्ही समानचि होत ऐसें वर्णितात,

आणि ज्ञान जें म्हणिजे । तें अज्ञानचि पां दुजें ।
एक लपवोनि दाविजे । एक जैसें ॥ ६ ॥
परि असो हा प्रस्तावो । आधिं अज्ञानशुद्धि घेवों ।
मग तेयाचे लागिं लाहों । ज्ञानही लटिकें ॥ ७ ॥

आणखी व्यष्टीचे ठायीं आणि समष्टीचे ठायीं ज्ञान जें शास्त्रांनीं ह्मणिजेतें तेंही दुसरें अज्ञानचि होय. कारण जे शुद्धस्वरूपीं जाणणें नाहीं ह्मणून. जैसीं जावळीं मुलें सारिखीं असतात ते एक लपउनी एक दाखवावें; परंतु हा प्रस्तावा असो, हा प्रकार असो, पुढें अष्टम प्रकरणीं स्पष्टत्वें बोलिजेल. आतां सांप्रत आधीं अज्ञानाची शुद्धि, शोध घेउं. मग त्याचे लागीं, लटिकेपण ठरल्यावर, ज्ञान जें त्यासही लटिकें ह्मणों लाहों, लटकें ह्मणों पाउं. आतां भावरूप अज्ञानस्वीकार करणारा अज्ञानाभिमानी जो त्यास विचारतात,

अज्ञान ज्ञानातें। अधिष्ठौनि जर्‍हि वर्ते।
तर्‍हि जेथें असे तेयातें। नेण कां न करि? ॥ ८ ॥

कळत नाहीं ऐसें जें अज्ञान तें ज्ञानासि अधिष्ठूनि, आश्रय करून, जरि राहतें, तरि जेथें असे त्या ज्ञानातें नेण, न जाणतें, कां करीत नाहीं? मला कांहीं कळत नाहीं हें ज्ञानातें कळतचि आहे कीं?

अज्ञान जेथ असावें। तेणें सर्वनेण होआवें।
ऐसी जाति स्वभावें। अज्ञानाची ॥ ९ ॥

जैसें तम जेथें असतें तेथें सर्व तमोरूप करितें, तैसें अज्ञानतमानें जेथें असावें तेथें सर्वनेण, अज्ञानरूप व्हावें, ऐसी अज्ञानाची जाती, प्रकार स्वभावता आहे. आतां अज्ञानाभिमानी प्रमाणयुक्त बोलतो,

शास्त्रसंमत ऐसें। अज्ञान ज्ञानींच असे।
तेणें तो गिंवसे। आश्रयो जर्‍हिं ॥ १० ॥
तर्‍हि नुठतां दुजें। अज्ञान जें बीजें।
तें आथी हें बुझे। कवणु हान? ॥ ११ ॥

अहो ज्ञानोबा, शास्त्राचें संमत, प्रमाण ऐसें आहे जे अज्ञान जें तें ज्ञानाचे ठायींच आहे. यासि सिद्धांती विचारतात. अज्ञान जें तेणें तो ज्ञानरूप आश्रय गिंवसतो, अवच्छेद पावतो, म्हणसील तरी परमात्मस्वरूपीं दुजें, द्वैत, उठिलें नाहीं. तेव्हां ज्ञान हें ही म्हणणें नाहीं. ते वेळां तें बीजरूप अज्ञान आहे म्हणोनि हान कोण बुझे, आणखी कोण जाणतो? अहो ते वेळीं बीज अज्ञानचि आपण आपणातें जाणेल कीं? यासि उत्तर,

अज्ञान आपणातें । जडत्वें नेणे निरुतें ।
अप्रमाण प्रमाणातें । येत असे ॥ १२ ॥
यालागीं अज्ञान । करि आपुलें ज्ञान ।
ह्मणतां घेववी मौन । विरोधुचि ॥ १३ ॥

जडत्वेंकरून सिद्ध ऐसें जें अज्ञान तें प्रमाणातें येत असे काय? प्रमाणत्वातें येत नाहीं हा निश्चितार्थ. अरे, अज्ञान जें तेंचि आपलें ज्ञान करितें म्हणतोस, यालागीं हें विरोधी भाषण ऐकूण मौन धारण करावें लागलें. आतां अज्ञानवादी बोलतो,

जाणती वस्तु एक । तें अज्ञानें कीजे मूर्ख ।
तैं अज्ञान हें लेख । कवण धरी ? ॥ १४ ॥

जाणणारी एक वस्तु, अद्वितीय परमात्मा त्यातें अज्ञान जें तें मूर्ख, सर्वज्ञतेरहित प्रळयकाळीं करिजेतें कीं? आतां सिद्धांती बोलतात, तेव्हां तरि अज्ञान आहे हा लेख कोण धरील? सारांश अज्ञान नाहींच हें सिद्ध जालें. अहो, मूर्च्छावस्थेंत द्रष्ट्यातें अज्ञान मूढ करितें कीं? यासि उत्तर,

आपणेयाहि पुरता । नेणु न करवे जाणता ।
तेयातें अज्ञान ह्मणतां । लाजिजे कीं ! ॥ १५ ॥

मूर्च्छावस्थारूप अज्ञानातें द्रष्टा, जाणता तो त्यास अज्ञानाच्यानें इतुकें करणें होत नाहीं जे द्रष्ट्यानें आपणातें न जाणावें. ऐसें असतां त्या जाणत्याला तूं या अज्ञान म्हणतां लाजिजे कीं. अहो मूळ अज्ञान जें तें परमात्वस्वरूप कोण्हातें जाणूं देत नाहीं कीं? यासि उत्तर,

आभाळें भानु ग्रासे । तें अभ्र कवणें प्रकाशे ।
सुषुप्ति सुषुप्तीस रुसे । तैं तेचि कवणें ? ॥ १६ ॥

अभ्राच्या योगें भानु ग्रासिला ऐसें वाटतें, परंतु तें अभ्र भानूच्या योगेंच प्रकाशित होतें. तैसा स्वप्रकाश परमात्मा जो तो मूळ अज्ञानानें आच्छादिला ऐसें वाटतें परंतु हें वाटणें तरि कोण्हाच्यानें प्रकाशित होतें बरें? आत्मप्रकाशानेंचि प्रकाशित होतें हा भाव. अहो, सुषुप्तिरूप अज्ञान जें तें द्रष्ट्याला मूढ करितें कीं? त्यासि सिद्धांती पुसतात, सुषुप्ति जे ते आपलेपणास रुसती, निवृत्त होती, तें कोण्हें जाणि-

जेती बरें ! द्रष्टा जो तोचि जाणतो जे हे वेळपर्यंत सुषुप्ति होती, आणि आतां गेली. तस्मात् सुषुप्तिरूप अज्ञान द्रष्ट्यातें मूढ करीत नाहीं हा भाव. अहो, हे उत्थित जाल्यावरि जाणतो परंतु गाढ सुषुप्तींत तरी द्रष्ट्याला अज्ञान जें तें जाणणेंपणारहित करितें कीं ? यासि उत्तर,

तैसें अज्ञान असें जेथें । तेंचि जर्‍हि अज्ञान आते ।
तर्‍हि अज्ञान अज्ञानातें । नेणत गेलें ॥ १७ ॥

सुप्तावस्थेंत द्रष्ट्याचे ठायीं अज्ञान राहून त्याजलाचि न जाणतें करितें तैसें तुवां मानिलें तरि अज्ञान सिद्ध होत नाहीं. कारण जे ते वेळीं अज्ञानातें वेगळेपणें द्रष्टाही जाणत नाहीं आणि अज्ञान आपणातें न जाणतां गेलें ह्मणून.

नातरि अज्ञान एक घडे । हें जेयास्तव निवडे ।
तें अज्ञान नोहे फुडें । कवणें कालिं ॥ १८ ॥

अथवा अज्ञान एक पदार्थ आहे ऐसें तुझें बोलणें घडतें हें ज्या द्रष्टृचैतन्यास्तव फुडें निवडे, स्पष्ट कळतें, तें कोणतेही काळीं अज्ञान नव्हेचि हा सिद्धांत. आतां शास्त्रप्रमाणानें अज्ञानवाद करणार जो त्याचा उपहास करून बोलतात,

पडल आथी डोला । आणि डोला नोहे आंधला ।
तर्‍हि त्या पोकला । बोलिया कीं ! ॥ १९ ॥

कोण्ही एकानें कोण्हीएकास ह्मटलें जे तुझे डोळ्यास पडळ आलें, आणि त्याचा डोळा तरि आंधळा नव्हे. कारण जे तो पहात आहे ह्मणून. तैसा द्रष्टा जो त्यातें तुवां ह्मटलें कीं, त्याचे दृष्टीस अज्ञानपडळ आहे तरि त्या बोलियां पोकळ, व्यर्थ होत. कारण जे द्रष्ट्याचे दृष्टीचा कधींही लोप नाहीं ह्मणून. आतां अज्ञानवादी जो तो द्रष्ट्याचे दृष्टीस व्यर्थत्व आणून बोलतो,

इंधनाचे अंगीं । खवलिलेनि आगी ।
न जले तैं वाउगी । शक्तीचि ते ॥ २० ॥

मणिमंत्र अथवा औषधीसांनिध्येंकरून अग्निची दाहकशक्ति क्षीण जाली, ऐसा अग्नि जो तो कापूस आदिकरून इंधनाचे अंगीं खवळला, व्यापला असतांही कापुसादिक इंधनें जळत नाहींत. तैसें अज्ञान जें तें दृश्यत्वेंकरून द्रष्ट्याचे जवळ

असून त्यातें द्रष्टयानें व्यापिलें असतांही न जळे. तैं वाउगी शक्तीचि कीं, अज्ञान नाशातें पावत नाहीं तेव्हां द्रष्टयाची दृष्टिरूपा शक्ति व्यर्थचि कीं, ! आतां सिद्धांती अज्ञानासि अज्ञानत्वाचि नाहीं ऐसें सांगतात,

अंधार कोंदौनि घरिं । घरा पडसाई न करि ।
तैं अंधारु इहीं अक्षरीं । न ह्मणावा कीं ॥ २१ ॥

दिवसा बाहेरून घराचे ठायीं येणारास डोळ्याचे ठायीं अंधार कोंदला असतां घरांत अंधार कोंदला ऐसें मानितो. परंतु नेत्रस्थ अंधार जो तो घरा पडसाई न करि, घरातें अंधाररूप करीत नाहीं. कारण जे तो पुरुष घरांत स्थिर जाला असतां तो अंधार नाहींसा होतो ह्मणून. तैसा चिदाभास जीव जो तो बाह्य पदार्थ टाकून अंतरात्माचे ठायीं येऊं पाहतो तेव्हां बुद्धिचे ठायीं अज्ञानतम आहे तें भ्रमेंकरून आत्म्याचे ठायीं मानितो. परंतु अंतरात्म्याचे ठायीं अज्ञान तम नाहींच.

वोसरों नेदी जागणें । तियेतें नीद कोण म्हणे ।
दिवसा नाणी उणें । ते रात्रि कैंची ? ॥ २२ ॥

जैसा कोण्ही एक जागा असतां उगाच लवंडला आहे, तेव्हां तें निजणें त्याचे जागेपणास वोसरूं देत नाहीं. तैसा द्रष्टा जो तो हृद्गुहेच्या ठायीं सर्वदा जागतचि आहे. त्याचें जागेपण अविद्या निद्रेच्यानें निवृत्त होत नाहीं, तेव्हां तीतें अविद्या ऐसें कोण ह्मणेल ? तीतें अविद्या ऐसें कोणी म्हणणार नाहीं. आणि दिवस तल्लक्षण ज्ञान जें त्यातें अज्ञानरात्रि जे ते उणेपण आणीत नाहीं, तेव्हां ते अज्ञानरात्रि कैंची ? अज्ञान नव्हे हा भाव. आतां अज्ञानवादियासि पुसतात,

तैसें आत्मविं अज्ञान असिकें । असतां कां न माखे ।
तैं अज्ञान शब्दा लटिकें । आलेंचि कीं ! ॥ २३ ॥

पूर्वी वर्णिलें तैसें त्याप्रकारें आत्म्याचे ठायीं असिकें, संपूर्ण अज्ञान आहे म्हणतोस तरि त्या अज्ञानानें आत्मा माखला, आच्छादिला कां जात नाहीं ? जेव्हां अज्ञानाच्यानें आत्मा आच्छादिला जात नाहीं, तेव्हां अज्ञान शब्दास, अज्ञानप्रतिपादक शास्त्रास लटकेपण आलेंच कीं !

यऱ्हविं तरि आत्मया- । माजि अज्ञान असावया ॥
कारण ह्मणतां न्याया । चुकिजे कीं ! ॥ २४ ॥

यऱ्हवीं, स्वभावता तरि आत्म्याचे ठायीं अज्ञान असावयासी कारण काय ऐसें ह्मणतां, पुसलें असतां, तुजसारिख्या सांगणारानें न्यायास चुकिजे कीं, देहात्म-बुद्धि स्वीकारली पाहिजे कीं !

अज्ञान-तम मेळणी । आत्मा प्रकाशाची खाणी ।
आतां दोहींसि मिळणी । एक कैची ? ॥ २५ ॥

अज्ञान तरी तममेळणी ह्म० अन्यथात्वें जाणणें हें आणि न जाणणें हें तम या उभयांची मेळणी ह्म० मिसळणी; आणि आत्मा स्वप्रकाश ऐसें विरुद्ध लक्षण असतां, या दोहींसी मिळणी एकत्र कैसी करितोसि ? आतां अज्ञानवादियाचे मनांतील अभिप्राय बोलून दाखवितात,

निद्रा आणि जागरु । आठव आणि विसरु ।
इयें युग्में एका हारु । चालती जरि ॥ २६ ॥

अरे अज्ञानवादी, तुजला वाटतें जे आत्मा आणि अज्ञान एकत्र करावें. तें ऐसें जालें तरि घडेल. निद्रा आणि जाग्रति या उभय अवस्था ज्या अहंकारास होतात तो आणि आठवविसर ज्या बुद्धीस होतात ती हे युग्में, जोड्या, एक पंक्तीनें जीवाचे ठायीं चालतात, तो जीव मी ऐसें कोण्ही मानील तरि अज्ञानाचें असणें आत्म्यासहित होईल.

सीतातप एकवट । वस्तिच वाहे वाट ।
तमें बांधिजे मोट । सूर्यरश्मींचि ! ॥ २७ ॥

सीतातप ह्म० सीत, उष्णादि द्वंद्वें हे एकवट होऊन बाधितात ज्यांस ऐसीं जीं त्वगादि इंद्रियें हे माझिं, आणि वस्तिच वाहे वाट, हृदयाचे ठायीं वसत असतां इडा पिंगळा नाडीकरून आयुष्याची वाट चालणारे असे जे प्राण ते माझे होत ऐसें कोण्ही मानील तरि अज्ञानाचें असणें आत्म्यासहित होईल.

नाना राति आणि दिवो । येति एके ठायीं राहों ।
तैं आत्मा जीवें जिवो । अज्ञानाचेनि ॥ २८ ॥

अथवा राति, अविद्या आणि दिवो, ज्ञान हे दोन्हीही एका अंत:करणाचे ठायीं राहों येतील, तेव्हां जीवात्मा जो तो अज्ञानाच्यानें जीवन पावेल.

हें असो मृत्यु आणि जिणें । इयें शोभति मेहुणें ।
तर्‍हि अज्ञानें असणें । आत्मेनसीं ॥ २९ ॥

हें असो, फार काय सांगावें? मरण आणि वांचणें हे ज्या स्थूळ देहाचे ठायीं मेहुण्यासारखे एकत्र शोभतात, तो अस्थिमांसमय देह मी ऐसें कोण्ही मानील तरि अज्ञान जें तें आत्म्यासहित राहील. आतां अज्ञानवादियाचा सिद्धांत ऐकून आश्चर्य करितात,

अहो आत्मेनि जें बांध । तेंचि आत्मेनसीं नांदे ।
ऐसीं कायसीं विरुद्धें । बोलणीं इयें? ॥ ३० ॥

अहो इत्याश्चर्ये. केवढें हें आश्चर्य जे आत्म्याचे योगेंकरून बाधे, मिथ्या होऊन जातें, तेंचि अज्ञान आत्म्यासह नांदतें, हे बोलणें विरुद्धें कशास बोलावीं? आतां अज्ञानवादी अज्ञानप्रतिज्ञा सोडून बोलतो,

अहो अंधारपणाचि पैज । सांडौनि अंधारचि तेज ।
जाला तैं सहज । सूर्यचि तो! ॥ ३१ ॥

अहो ज्ञानोबा, जैसी तमानें अंधारपणाची प्रतिज्ञा सांडुनि दिवसरूप जाला तेव्हां अंधाराचि जो तो सहज रीतीनें सूर्यचि होय; तैसा जो येगें अज्ञानपणाचा पैज, मी अज्ञानी ऐसा जो तो विचारेंकरून सांडिला असतां प्रमाता जीव जो तोचि आत्मा होय.

लाकुडपण सांडिलें । आणि आगीपण मांडिलें ।
तैं तेंचि आगी जालें । इंधन कीं ॥ ३२ ॥

जैसें इंधन जें तें अग्नीचें ग्रहण करून पूर्वील लाकूडपणातें टाकून तेंचि इंधन अग्निरूप होतें, तैसें मन जें तें आत्मानुसंधान करितां करितां पूर्वील देहाभिमानातें टाकून तेंचि मन ज्ञानरूप होतें कीं.

गंगा पावतखेंवो । आनपणाचा ठावो ।
सांडि तैं गंगा हों । लाहे पाणी ॥ ३३ ॥
तैसें अज्ञान तें अज्ञान नोहे । म्हणौनि आत्मा असों लाहे ।
यर्‍हवीं अज्ञान तें आहे । वेगळेंचि ॥ ३४ ॥

अथवा पाणी जें येणें अन्यपणाचा ठिकाणा सोडून गंगेस भेटूं गेलें असतां गंगाच होतें, तैसें आमचें अज्ञान तें केवळ अज्ञानपणानें, येकलें न जाणणेपणानेंच राहतें ऐसें नाहीं. तत्वज्ञानरूप गंगेस मिळून तत्वज्ञानरूपही होतें म्हणून आत्मा असों लाहे, ह्म० आत्म्यासहित रहावयासि योग्य होय. आणि यऱ्हवीं, स्वाभाविक, अज्ञ जनाचे दृष्टीनें माझें अज्ञान म्हणून आत्म्याहून वेगळेंही आहे, सारांश अज्ञान आत्मस्वरूपींही रहात आहे, आणि वेगळेपणींही आहे हा भाव. आतां तुझें अज्ञान स्थापणें व्यर्थ ह्मणून सिद्धांती उत्तर देतात,

आत्मेनसीं विरोधि । ह्मणौनि नुरे येक-संधि ।
ना वेगलें तऱ्हि सिद्धि । जायेचिना ॥ ३५ ॥

अरे अज्ञानवादी, तुझें अज्ञान कसें नाहीं तें ऐकून घेई. आत्म्यासि त्यासि प्रकाशतमासारिखा विरोधी भाव आहे ह्मणून, आणि आत्मा एकसंधी, एकत्र रहात नाहींत. आणि अज्ञानाला स्वतंत्रता नाहीं ह्मणून अज्ञान वेगळें आहे ह्मणणें सिद्धीस जाईचना. ते कैसें ह्मणशील तरि ऐक.

लवणाचि मासोली । जऱ्हि होये जिव्हाली ।
तऱ्हि जलिं ना जलावेगली । न जिये जेंविं ॥ ३६ ॥

अभूत उपमा. मिठाचा मासा जिवंत होतचि नाहीं. परंतु कदाचित् जिवंत जाला तरि जळांत गेला असतां विरोनि जातो आणि वेगळा तरि, जळाबाहेर तरि त्याचें वांचणें सिद्धीस जाईचिना. तैसें तुझें अज्ञान जें तें आत्मस्वरूपीं विरोनि जातें आणि आत्म्यावांचून तरि सिद्धीस जातचि नाहीं. आतां अज्ञानवादी बोलतो, अहो तुमचें म्हणणें जे अज्ञानाला पृथक् सत्ता नाहीं म्हणून वेगळें सिद्ध होत नाहीं, त्यास आह्मी म्हणतों ऐसें कां होईना ?

जें येथें अज्ञान नसे । तऱ्हींच आत्मा असे ।
हें बोलणें वाय-सें । नाइकावें किं ! ॥ ३७ ॥

आमचें ह्मणणें ऐसें आहे जे पश्वादिकाचे ठायीं जैसें अज्ञान असतें तैसें या ममुष्यदेहाचे ठायीं नसे. परंतु मी अज्ञानी ऐसें वाटतें त्याचे निवृत्तिसाठीं कोण्ही विचार करील तरिच तो आत्मा असे ह्म० तो आत्मरूपें असें कीं ? आतां सिद्धांती ह्मणतात, अरे ऐसें ह्मणणारा तूं विवेकीच नव्हेस. हें ब्रह्मानुभवावांचून बोलणें वाय सें

व्यर्थ होय. हें तत्वविद् जो येणें नायकावें कीं ! आतां हें संपूर्ण जगत् विवर्तरूप होय ऐसें सांगतात,

दोरिं सर्पाभास होये । तो तेणें दोरें बांधों नये ।
ना दवडणेंही न साहे । जेयापरी ॥ ३८ ॥

ज्या रज्जूचे ठायीं सर्पाभास भासला, तो रज्जू घेऊन तो सर्प बांधतांही येत नाहीं आणि त्या दोरेंकरून तो सर्प दवडणें, हांकून लावणेंही होत नाहीं ज्याप्रकारें; त्याप्रकारें सन्मात्र आत्मा जो त्यातें अनुभविलें असतां संपूर्ण जगदाभासाचें स्थापनही घडत नाहीं आणि निवारणही घडत नाहीं. आतां अज्ञान जें तेंचि सिद्ध होत नाहीं ऐसें सांगतात,

ना ना पुनिवेचे अंधारें । दिहाभेणें रात्रि महुरे ।
किं येतांचि सुधाकरें । गिळिलें जेंवि ॥ ३९ ॥
तियापरि उभयता । अज्ञानशब्द गेला वृथा ।
हा तर्कावांचौनि हाता । स्वरूपें नये ॥ ४० ॥

अथवा पूर्णिमेचें अंधारें जें तें दिवसाच्या भयानें रात्रीं मोहरे, रात्रीचे वेळेस येतें जालें, तंव येतांचि चंद्र जो येणें गिळिलें जैसें; तैसें अज्ञान जें तें परमात्मस्वरूपिं आपली गति नाहीं ह्मणून ब्रह्मविद्येच्या घरास येतें जालें. तंव निर्विशेषविषयीं निर्मळ बोध तल्लक्षण चंद्र जो येणें अज्ञान जें तें गिळिलें, कधीं नव्हतें ऐसेंच केलें. ऐसा या प्रकारें परमात्मस्वरूपीं आणि जीवात्मत्स्वरूपीं उभयता अज्ञानशद्ब वृथा गेला, व्यर्थ झाला. अरे अज्ञानवादी, अज्ञान शद्बविषयीं उगाच तर्क मात्र करावा, परंतु अज्ञान शद्बाचा वाच्य पदार्थ तुझे हातीं लागावयाचा नाहीं. ऐसें शद्बप्रमाण अज्ञानविषयीं व्यर्थ केलें, आणि अन्यप्रमाणेंकरून तरि अज्ञान सिद्ध होतें काय, ऐसें विचारतात,

अज्ञानस्वरूप कैसें । कार्यानुमेय असे ।
किं प्रत्यक्ष दिसे । धांडोलितां ? ॥ ४१ ॥

अरे अज्ञानवादी, तुझे अज्ञानाचें स्वरूप कैसें आहे ? कार्यानुमेय असे, कीं धांडोळितां प्रत्यक्ष दिसताहे हें सांग. आतां अज्ञानवादी जो तो प्रत्यक्ष प्रमाणानें आणि अनुमानप्रमाणानें अज्ञान स्थापन करितो,

**प्रत्यक्षादि प्रमाणीं । कीजे जेयाची वेणी ।**
**तें अज्ञानकार्य म्हणौनि । अज्ञान नोहे ॥ ४२ ॥**

जागृत अवस्थेच्या ठायीं प्रत्यक्षादि प्रमाणीं, नेत्रादि इंद्रियें जे यांनीं ज्या पंच विषयांचें ग्रहण करिजेतें ते पंच विषय अज्ञानकार्य होय, म्हणोनि तें अज्ञान नव्हे काय ? कार्यकारणासि अभेद असतो म्हणून तें अज्ञानाचि होय.

**अंकुरेंसि सरल । वेली दिसे वेल्हाल ।**
**तें बीज नव्हे केवल । बीज कार्य ॥ ४३ ॥**

अनेक संकल्प आहेत अंकुर जे ते जीस अशी जी सरळ, बहुकाळची वेल्हाळ विस्तृत, वासना हेचि कोण्ही एक वेली ते अज्ञानमूलक होय. तेव्हां बीजकार्य तें बीज नव्हे काय ? बीजचि होय.

**कां शुभाशुभ रूपें । स्वप्नसृष्टि आरोपे ।**
**ते नीद नव्हे जाउपें । निदेचें कीं ॥ ४४ ॥**

जैसी स्वप्नावस्थेचे ठायीं शुभाशुभ रूपें स्वप्नसृष्टि आरोपिली जाती तें निदेचें जाउपें, लेकरूं होय. तेव्हां ती निद्रा नव्हे काय ? निद्राचि होय. तैसी बरी-वाईट सृष्टि परमात्मियाचे ठायीं आरोपिली जाती, ते अविद्येचें कार्य होय, तेव्हां ते अविद्या नव्हे काय ? अविद्याचि होय.

**ना चांदु एक असे । तो व्योमिं दुणा दिसे ।**
**तें तिमिर-कार्य जैसें । तिमिर नोहे ॥ ४५ ॥**

अथवा आकाशाचे ठायीं चंद्र एक असतां नेत्रास दोन चंद्र दिसतात तें तिमिराचें कार्य जैसें तिमिर नव्हे काय ? तिमिराचि होय. तैसा परमपुरुष जो तो एक असतां नानात्वेंकरून दिसणें हें आज्ञानाचें कार्य नव्हे काय ? अज्ञानकार्यचि होय.

**तैसें प्रमाता-प्रमेय- । प्रमाण हें जें त्रय ।**
**तें अज्ञानाचें कार्य । अज्ञान नोहे ॥ ४६ ॥**

त्या प्रकारें प्रमाता, जीव; प्रमाण, अंतःकरणवृत्ति, आणि इंद्रियें; आणि प्रमेय, विषय हें अज्ञानाचें कार्य होय, तेव्हां तें अज्ञान नव्हे काय ? अज्ञानाचि होय.

ह्मणौनि प्रत्यक्षादिकिं । अज्ञानकार्य-विशेखीं ।
न घेपे येविखीं । आन नाहीं ॥ ४७ ॥

ह्मणोनि प्रत्यक्ष, अनुमान, उपमान, या प्रमाणेंकरून अज्ञानकार्यविशेष जे ते न घेईजेते याविषयीं आन नाहीं, प्रमाणें करून ग्रहण करिजेते हा भाव. आतां सिद्धांती जे ते अज्ञानवादियाचे सिद्धांतानें त्याची त्यालाच खंडणा सांगतात,

अज्ञानकार्यपणें । घेइजे तें अज्ञान ह्मणणें ।
तर्‍हि घेताति जियें करणें । तियें तेयाचींच किं ! ॥ ४८ ॥

अरे अज्ञानवादी, तुझें ह्मणणें ऐसें जे, कारण अज्ञान प्रत्यक्ष न जालें तरि काय चिंता आहे? कार्यकारणासि अभेद आहे, तव्हां पंचविषयक कार्यपणें जे दिसतात तेचि आह्मी अज्ञानत्वें घेइजेतें. ऐसें तुझें ह्मणणें आहे तरि घेतात जे करणें, इंद्रियें, ते तया अज्ञानानेंच कीं? जैसी खोट्याची साक्ष खोट्यानें द्यावी तैसें जालें. विषयही अज्ञानरूप आणि त्याला प्रत्यक्ष करणारीं इंद्रियेंही अज्ञानरूप, तव्हां त्यांचें पाहणें तें काय खरें आहे? इंद्रियांचें पाहणें खरें नाहीं हा भाव.

स्वप्निं दिसे तें स्वप्न । मा देखतां काय आन ।
तैसें कार्यचि अज्ञान । केवल जर्‍हीं ॥ ४९ ॥

जैसें स्वप्नावस्थेचे ठायीं जें दिसतें तें स्वप्न आणि त्याचा पाहणारा तोही अन्य नाहीं, स्वप्नरूपचि होय; तैसें कार्य जें आहे तेंहि कारण होय ऐसें तुझें बोलणें जरि आहे,

तार्‍हि चाखिला गूल गुळें । माखिलें काजल काजळें ।
काइ घेपे दीजे शूळें । आपुले सूला ॥ ५० ॥

गुळासारखीं गोड विषय आणि इंद्रियें हे दोनीही भूतकार्य जड होत, ते आपण आपणातें चाखितात काय? चाखीत नाहींत. आणि काजळासारिखें अज्ञान जें तें काजळासारिखी वासना जे ते तिजला माखितें काय; आवरण करितें काय? आवरण करीत नाहीं. आणि सत्व, रज, तम आहेत अग्र जे ते ज्यास ऐसा जो महेश्वररूप त्रिशूळ तो आपण-आपणावरि जगद्रूप आरोप करून घेपे, घेतो काय? आरोप करून घेत नाहीं. कारण जे अवघा ईश्वर एकचि ह्मणून.

तैसें कारण अभिन्नपणें । कार्यही अज्ञान होणें ।
तें अज्ञान मा कवणें । काइ घेपे ? ॥ ५१ ॥

याच प्रकारचे प्रमाता प्रमाण हे अज्ञानकारणासि अभिन्नपणें आहेत तेव्हां ते अज्ञानचि; मग कोण्हें काय घेपे, काय घेइजेतें ? अहो आमचें अज्ञान जें तें कारणत्वेंकरून जड आहे, परंतु त्याचें कार्य चेतन आहे कीं ? यासि प्रतिबंदित्वें उत्तर देतात,

आणि घेतें घेवितें ऐसा । व्यवहारु ये उमासा ॥
तर्‍हि प्रमाण जाला मासा । मृगजळींचा ॥ ५२ ॥

आणि तुझें ह्मणणें जें प्रमाता प्रमाण हें अज्ञानकार्य असतां विषयास घेतें आणि इंद्रियांकरवीं घेववितें, ऐसा व्यवहार उमासा, उमजण्यांत येतो, तेव्हां हें कार्य चेतन आहे. अरे, या प्रकारें चेतनत्व येईल, तरी मृगजळाची नदी वाहिल्या- सारिखी दिसती, तेव्हां त्यांतील पोहणारा मच्छही प्रमाण, खरा, व्हावा ! अहो, व्यवहारप्रसंगीं 'अहमज्ञ' ऐसी अज्ञानाची सर्वजनप्रसिद्धि असतां तुम्ही मिथ्या जें म्हणतां, तें कोणत्या हेतूस्तव ? त्यास मोठी योग्यता देऊन सांगतात,

जें प्रमाणाचिया मापा । न सांपडेचि बापा ।
तेया आणि खपुष्पा । विशेषु काइ ? ॥ ५३ ॥

अरे बापा, जें अज्ञान प्रत्यक्ष अनुमान प्रमाणांचे मापांत सांपडत नाहीं, त्याजला आणि खपुष्पाला विशेष म्ह० भेद काय आहे ? भेद नाहीं.

ना हें प्रमाणचि नुरवि । मा आथि कोण प्रस्तावी ? ।
येणेंहि बोलें जाणावी । अज्ञान उखी ॥ ५४ ॥

तूं कदाचित् म्हणशील कीं हें अज्ञान जें तें प्रमाणातें उरूं देत नाहीं, तरि हें अज्ञान आहे म्हणून तरि प्रस्तावा कोण्ही करावा ? अस्तु, हें प्रमाणातें उरूं देत नाहीं या बोलण्यानेंही अज्ञान उखी म्ह० अज्ञान निश्चीं ऐसेंचि जाणावें.

एवं प्रत्यक्ष अनुमान । इयां प्रमाणां भाजन ।
नहोनि अप्रमाण । अज्ञान जालें ॥ ५५ ॥
आत्मया स्वप्न दाऊं । न शके कीर बहु ।
परि ठायें ठावू । निदेजौं न सके ॥ ५६ ॥

या प्रकारें अज्ञान जें तें प्रत्यक्ष अनुमानें प्रमाणास भाजन म्ह० पात्र न होतां अप्रमाण जालें. अंतरात्म्यातें हें अज्ञान अनेकत्वें स्वप्न तरि दाखवीत नाहींच परंतु ठायें ठावो म्ह० ठिकाणचे ठिकाणींच निदेजौं न सके, विस्मृतीही पाडीत नाहीं.

ना स्वकार्यातें वियें । कारणपणाही नये ।
मा अज्ञान ऐसें वियें । कवण साच ? ॥ ५७ ॥

अज्ञान जें तें स्वकार्यातें वीत, प्रसवत नाहीं, आणि कारणपणातेंही येत नाहीं. मग अज्ञानबीज म्हणून कोणते प्रकारें सत्य होय?

हें असो, जिये वेळे । आत्मपणें निखळें ।
आत्मा अज्ञानमेळें । असे जऱ्हीं ॥ ५८ ॥

हें असो, ज्यावेळेस म्ह० स्वरूपानिद्राकाळीं परमात्मा जो तो निखळ म्ह० केवळ ब्रम्हपणेंच होता, त्यावेळेस आत्मा जो तो अज्ञानमेळें म्ह० अज्ञानासहित असता जरि तरि अज्ञान आहे ऐसें म्हणतां येतें. आतां अज्ञानवादी बोलतो,

न करतां मथन । काष्ठिं असे अवस्थान ।
जैसें कां हुताशन- । सामर्थ्याचें ॥ ५९ ॥

जैसें मथन केल्याचे पूर्वीं काष्ठाचे ठायीं हुताशनसामर्थ्याचें अवस्थान, स्थिति असती, तैसे सृष्टि उत्पन्नाचे पूर्वीं अव्याकृत उपाधीचे ठायीं एक जीव उद्भूत होण्याची स्थिती आहे म्हणून तेथें आमचें अज्ञान आहेचि कीं. आतां सिद्धांती बोलतात,

जैं आत्मा ऐसें नांव । न साहे आत्मबरव ।
तैं अज्ञान हांव । बांधे तेथें ॥ ६० ॥

ज्या वेळेस परमात्मा स्वरूपनिद्रा करितो, त्यावेळीं आत्मा ऐसें नांवही सहन करीत नाहीं, आणि आत्मबरव म्ह० मी चांगला आहे, सुखी आहे, हेंही सहन होत नाहीं. ऐसा प्रसंग असतां ते वेळीं तुझें अज्ञान आहेपणेंकरून तेथें हांव बांधील काय? हांव बांधणार नाहीं हा भाव. आतां अज्ञानवादी बोलतो, अहो, पाण्याचें आधीं वळण बांधतात, तैसें पुढें अज्ञान प्रादुर्भूत होणार त्याचे निवृत्तिचे उपाय तरी शास्त्रानें सांगितले पाहिजेत कीं? यासि उत्तर,

काइ दीपु न लाविजे । तैंच काजलि फेडिजे ।
किं नुगवतिया चालिजे । रुखानी छाया ? ॥ ६१ ॥
नुठतां देहदशा । कें लाविजेचि कसा ।
न घडतां आरिसा । उटिजे काइ ॥ ६२ ॥

दीप लाविला नसतां त्यावरील काजळी कोण्ही फेडीत, काढीत असतो काय? तैसी जीवाची उत्पात्ति जाली नसतां अज्ञाननिवृत्ति कोण्ही करितो काय? करीत नाहीं. आणि संसार तल्लक्षण वृक्ष उगवलाचि नाहीं, त्याचे विक्षेपरूप छायेचे चालण्याचा, निवृत्तीचे उपाय विचारयोगादिक कशास पाहिजेत? देहदशा तरि उत्पन्न जालीचि नाहीं आणि कर्मकांडानें शरीरशुध्यर्थ सांगिजेली मृद्गोमयलेपनें हाचि कोण्ही एकचि कसा तो कोण्हास लावावा? आरशासारिखें स्वच्छ अंतःकरण हें घडिलेंचि नाहीं मग साधनचतुष्टयेंकरून उटणें ह्म० निर्मळ करणें घडतें काय? घडत नाहीं.

उहाचे दुधीं । सायेचि होआवी आधीं ।
मग फेडों या बुद्धि । पवाडु कीजे ॥ ६३ ॥

उहाचें ह्म० उधस आणि कास ह्मणतात जीस तिचे दुधाचे ठायीं अगोधर साय असावी, मग फेडूं, या बुद्धि पवाडू कीजे ह्म० निवृत्ति करण्याचे बुद्धीनें प्रवृत्त व्हावें. तैसी मुळीं परमात्मस्वरूपीं अविद्या असावी, मग तिचे निवृत्ति करण्याचे बुद्धीनें प्रवृत्त व्हावें.

तैसें आत्मयाचे ठाइं । जैं आत्मपणा ठावो नाहीं ।
तैं अज्ञान हें काई । कासया ऐसें ? ॥ ६४ ॥

तैसें त्याचि प्रकारें स्वरूपनिद्राकाळीं शुद्धब्रह्मस्वरूपीं जेव्हां परमात्मपणालाची ठिकाणा नाहीं, तेव्हां अज्ञान ह्मणून काय पदार्थ आहे? आणि अज्ञान ह्मणतोस तें तरि कशासारिखें ह्मणावें?

म्हणौनि तेव्हां अज्ञान नसे । हें जालेंचि अपैसें ।
आतां तन्हि काइसें । नाहीं म्हणों ॥ ६५ ॥

परमात्मियाचे स्वरूपनिद्राकाळीं कांहीं भेदाचि उरला नाहीं, ह्मणोनि तेव्हां अज्ञान नाहीं हें आपलें आपणाचि जालें आहे. आतां तुझे शास्त्रानें तरि अज्ञान-

निवृत्तिचे उपाय-सांगून काय करावयाचें आहे ? अहो ज्ञानोबा, आमचें अज्ञान केव्हांही नाहीं, मग तुह्मी तरि अज्ञान नाहीं नाहीं ह्मणून वारंवार कशास ह्मणतां ? अरे तुजला वाटतें कीं अज्ञान आहे, तें वाटणें घालवावयासाठीं आह्मी अज्ञान नाहीं ह्मणत गेलों, आतां तरि कायसें, कशास नाहीं ह्मणों ? नाहीं तें नाहीं ह्मणावयाचें कारण नाहीं हा भाव. अहो तुह्मी ह्मणतात जे अज्ञान सर्वथैव नाहींच आणि श्रुति तरि अज्ञानरूप जगताचा निषेध सांगती; त्यास श्रुतीचा अभिप्राय आह्मास ऐसा वाटतो जे प्राप्तिपूर्वक निषेध सांगिजेतो. तेव्हां कोणतेही काळीं अज्ञान आत्मस्वरूपीं असेल ह्मणोनि श्रुति निषेध सांगती कीं ? यासि उत्तर अज्ञानप्राप्तिपूर्वक श्रुति निषेध सांगती ऐसें नाहीं, अज्ञान नाहीं जे तेंचि नाहीं ह्मणोनि सांगती.

ऐसाही आत्मा जेव्हां । नातळेची भावाभावा ।
अज्ञान असे तेव्हां । परि तें ऐसें ॥ ६६ ॥

ऐसाही, व्यष्टीचे ठायीं, अंतरात्मा जो तोही नानास्वरूप अज्ञान जें त्याचे भाव अभावास नातळे, स्पर्श करीत नाहीं. मग परमात्म्याचे ठायीं अज्ञान नाहीं ह्मणणें तें कशास ह्मणावें ? तेव्हां परमात्मस्वरूपनिद्राकाळीं श्रुतिनें अज्ञान निषेधिलें आहे परि तें ऐसें,

घटाचें नाहींपण । फुटोनि होये चूर्ण ।
सर्वांपरि मरण । मारवलें ॥ ६७ ॥

ब्रह्मांडरूप घट जो त्याचें नाहींपण म्ह० प्रलयअवस्थेचे ठायीं जगताचा अभाव जो तोहि परमात्मस्वरूपनिद्राकाळीं चूर्ण होतो, नाहींसा होतो हा भाव. सर्वांस मारणारा काळ जो तोहि परमात्मस्वरूपनिद्राप्रसंगीं मारवला, नाशातें पावला, हा भाव.

कां निदे नीद आली । मूर्च्छा मूर्च्छित जाली ।
अंधारी पडली । अंधकूपीं ! ॥ ६८ ॥

ब्रह्मदेवाचे निद्राकाळीं स्थावरजंगमात्मक जगत् नाहींसें होतें, ती निद्रा जे तीस परमात्मस्वरूपनिद्रेंत निद्रा आली, नाहींसी जाली हा भाव. आणि सत्व-रज-तम या त्रिगुणांची मूर्च्छावस्था, गुणसाम्यावस्था जे ती परमात्मस्वरूपीं मूर्च्छित जाली नाहींसी जाली. आणि प्रळयअवस्थेचे ठायीं चंद्रसूर्यांचा नाश जाल्यावरि अंधारी

जे पडती ते अंधारी जे ते अंधकूप तल्लक्षण सखोल परमात्मा जो त्याचे ठायीं पडली, नाहींसी जाली हा भाव.

अभावो अवघडला । केलिचा गाभा मोडला ।
चाखला आसुडला । आकाशाचा ॥ ६९ ॥

संपूर्ण जगताचा अभाव हिरण्यगर्भाचे ठायीं होतो तो अभावरूप, निराकाररूप हिरण्यगर्भ जो तोहि परमात्मस्वरूपिं अवघडला, मरण पावला हा भाव, आणि माया तल्लक्षण केळी जे तीचा गाभा, एक जीव जो तो मोडला, परमामत्स्वरूपीं नाशातें पावला. आणि आकाशाचा चाखळा ह्म० वायोरूप आहे देह जो तो ज्याचा ऐसा जो जगत्प्राणसूत्रात्मा तो आसुडला, परमात्मस्वरूपीं नाहींसा झाला.

निवटिलिया मूदलें विश्व । मुकियाचें बांधिलें मुख ।
नाना नुठितां लेख । पुसिले जैसे ॥ ७० ॥

काक-भृशुंडि वकदाल्भ्य- लोमहर्पणादिक ज्ञानी जे ते तत्वज्ञानेंकरून निवटले, मरून राहिलेचि होते; परंतु कोण्ही ब्रह्मप्रळय, कोण्ही भूतप्रळय, कोण्ही प्रकृतिप्रळय पहात होते. त्यांजल्हाहि परमात्मस्वस्वरूपनिद्रेनें विप घातलें, दग्ध-पटन्यायेंकरून त्यांचे देह राहिले होते ते नाहींसे केले हा भाव. आणि परमात्मियाचें केवल भूमा अनंत स्वरूप जे त्याचे वर्णन करण्याविपयीं मुका असा जो वेद त्याचें मुख बांधलें ह्मणजे सृष्टिवर्णन करणें राहिलें हा भाव. एवं अनेकविध प्रळय जे त्यांचेही प्रळय परमात्म-स्वरूपीं श्रुतिनें सांगिजेले, परंतु ते न सांगितल्याप्रमाणेंच होत ऐसें जाणावें. आणि जेंस शुद्ध कोऱ्या कागदावरि लेख, अक्षरें, नसतां पुसावीं त्याप्रकारें परमात्मस्वरूपीं जग केव्हांही नाहीं तेंचि श्रुतिनें निषेधिलें.

तैसें अज्ञान आपुली वेल । भोगी हेंहि टवाळ ॥
आतां तरि केवल । वस्तुचि असे ॥ ७१ ॥

पूर्वी वर्णिलें त्याप्रकारें अज्ञान आहे आणि आपण आपणातें भोगितें ऐसें तुजला वाटतें, तें अज्ञान आपले वेळे वाटते वेळेसाचि, टवाळ, मिथ्या होय. आतां नाहीं जें जगत् त्यातें निषेधिल्यानंतर काय राहतें म्हणसील तरी, परमात्मियाचें शुद्ध स्वरूप केवळ ब्रम्हवस्तुचि असे. अहो, प्रकृतीचे ठायीं संपूर्ण जग लीन होऊन पुनरपि जग उत्पन्न होतें ऐसें सांख्यशास्त्र सांगतें कीं? यासि उत्तर,

देखा वांझ कैसी वियें । विरूढती भाजिलीं बियें ॥
सूर्यु कवणा लाहे । अंधारातें ॥ ७२ ॥

प्रकृति जे ती वंध्या आहे, तिजपासून कांहीं उत्पन्न होत नाहींच. कां जे अवघीं पुरुष प्रकृतीच आहेत म्हणून. अहो, कर्मचि सर्व उत्पन्न करितें ऐसें पूर्वमीमांसक म्हणतात तेव्हा तत्वविदही क्रियमाण कर्मयोगें पुन्हा जन्मास येतील असें मला वाटतें. यासि उत्तर, तत्ववेत्ते जे यांहीं संपूर्ण कर्मे जे तीं ज्ञानाग्नीनें भर्जित केलीं असतां पुनर्जन्माची विरूढी, अंकुरोत्पत्ती होईल काय ? व्हावयाची नाहीं. अहो, तत्वविदास वरकड जन्मास येत असतील ऐसें तरि वाटत असेल कीं ? यासि उत्तर, तत्वविदाचे दृष्टीनें कोणासीच जन्म नाहीं ऐसें सांगतात. जैसा सूर्य जो तो अनेक गुहेंतील अंधारातें लहात नाहीं, पहात नाहीं; ह्याप्रकारें तत्वविद् जो तो कोण्हातेंही जननमरणत्वें पहात नाहीं. आतां तत्वज्ञानाचा प्रभाव वर्णितात,

तैसा चिन्मात्रिं चोखडा । भलतैसा अज्ञानझाडा ॥
घेतला तर्‍हि पवाडा । येईल काइ ॥ ७३ ॥

तैसा, त्याचि प्रकारें, ज्ञानियासारिखा चिन्मात्र केवल ब्रह्म जें त्याचे ठायीं तुवां अथवा अन्य जे कोण्ही यांणीं भलतैसा, कोणतेही प्रकारें, चोखडा, चांगला, अज्ञानाचा झाडा घेतला, तरि पवाडा ह्म० अज्ञानस्थिती प्रतीतीस येईल काय, अज्ञान आहे ऐसें सिद्ध होणार नाहीं. अहो, आह्मी जरि ब्रह्मीं अज्ञानाचा शोध करूं तरि अज्ञान ठिकाणींच पाहूं कीं ? यासि उत्तर,

सायेचिये चाडें । डहुलितां दुधाचें भांडें ।
तें दिसे कीं विघडे । विचारी पां! ॥ ७४ ॥

अरे वेड्या, जैसें साजुक दुधाचें भांडें ठेविलेलें, त्यांत साय निघावी ऐसी चाड, इच्छा धरून, ढवळावयासी कोण्ही गेला तरि ते साय दिसेल कां विघडेल हें विचारी पां! तैसें परमात्मियाचें शुद्ध स्वरूप ब्रह्म जें त्याचे ठायीं विचार करून अज्ञानाचा शोध करूं गेलास तरि तें अज्ञान दिसेल कीं नाहींसें होईल हें विचारून पहा बरें!

नींद धरावेया हातीं । चेऊनि उठिला झडिती ।
तर्‍हि ते लाभे कीं थिती । नाशिली होये? ॥ ७५ ॥

तेंवि अज्ञान ऐसें । पहावेया काइसें पिसें ।
न पाहतां अपैसें । न पाहाणेनि गेलें ! ॥ ७६ ॥

तुजसारिखा एक शहाणा होता, तो निजला असतां आपली नीद हातीं धरावयासाठीं जागा होऊन झटित उठला. तरि ते लाभे, कीं थिती, आहे ती नाशली होय बरें ? तैंवि तुजला अज्ञान पहावें हें काय पिसें लागलें आहे ? तत्वज्ञानरूप जागृति जाल्यावरि अज्ञानरूप निद्रा दिसावयाची नाहीं हा भाव. अहो, बरें सांगितलें, तें विचार करून पाहिलें असतां अज्ञान आहे हें सिद्ध जालें कीं ? यासि उत्तर, अज्ञान जें तें विचारेंकरून पाहिलें तरि आपलें आपण गेलें. कारण जे अज्ञान आहे ह्मणून पहावयासि विचार नाहीं ह्मणून.

एवं कवणेही परी । अज्ञान भावाची उजरी ।
न पडेचि नगरीं । विचाराचिए ॥ ७७ ॥

अरे, कोणतेही प्रकारें अज्ञान आहे ऐसी उजरी ह्म० प्रसिद्धि विचाराचे गांवीं, ठिकाणीं लागणार नाहीं. आतां सिद्धांती आपले ठायीं आश्चर्य मानतात,

अहो कवणेही वेले । आत्मीं अथवा वेगलें ।
विचाराचे डोले । देखते कां ? ॥ ७८ ॥

अहो इत्याश्चर्ये. केवढें हें आश्चर्य पहा, विचार-दृष्टीनें आत्म्याचे ठायीं अथवा आत्म्याहून वेगळें कोणतेही वेळेस अज्ञान दिसतें तरि बरें होतें !

ना निर्धाराचें तोंड न माखे । प्रमाण स्वप्नीं नाइके ।
निरुक्ति हान मुके । अनसाईपणा ॥ ७९ ॥

हें अज्ञान तरि कैसें पहा ! निर्धार, निश्चय जो तो त्यातें खाऊं गेला असतां त्याचें तोंडही माखत नाहीं. आणि हें अज्ञान प्रत्यक्षादि प्रमाणांतें स्वप्नींहि ऐकत नाहीं. हान आणखी उलटें होतें; निरुक्ति ह्म० या अज्ञान-वादातें बोलणारा जो तो अनसाईपणा ह्म० नैय्यायिक ज्यातें अनुव्यवसाय ह्मणतात त्या आपलेपणातें मुकतो. सारांश, अज्ञान आहे ऐसें प्रतिपादन करणें ठीक नाहीं हा भाव.

इतुलियाहि भागु । अज्ञान हा मागु ।
निघे ऐसा बागु । पढता कां देवो ॥ ८० ॥

अन्वयः—देवो ऐसा बागु पढता कां इतुलियाही भागु अज्ञान हा मागु निघे. स्वप्रकाश नित्यद्योतमान परमात्मा देव जो तो अज्ञान म्हणून कांहीं एक आहे ऐसा बागु म्ह० शब्द आपली वेदरूप वाणी जे तीकरून पढता, उच्चारिता जरि तरि इतुक्याच भागानें अज्ञान आहे हा माग निघता. सारांश, श्रुतीचे ठायीं अज्ञानाची भावरूपता कोठें सांगितलीच नाहीं, मग अज्ञानाचा माग तरि कोठून लागेल? अहो, श्रुतीचे ठायीं अज्ञान स्थापित नाहीं म्हणून काय जालें! वरकड शास्त्रांचे ठायीं तरि अज्ञान भावरूप आहे म्हणून स्थापिताहेत कीं! यासि उत्तर,

अवंसेचे चंद्रबिंबें। निर्वाळिलिये शोभे।
कां मांडवति खांबे। शशविषाणांचे? ॥ ८१ ॥

जैसें अमावास्येचें चंद्रबिंब निर्वाळलें म्ह० निवडून शोभेप्रत येतें काय? येत नाहीं. तैसें अविद्याग्रस्त अविवेकी जनाचें मन शोभत नाहीं. कारण जे आपण आत्मा असून अहमज्ञ ऐसें मानितात म्हणून. आणि जैसे सशाचे शिंगाचे खांब घरास मांडवले, लावले जातात काय? जात नाहींत. कारण जे ते खरे नाहींत म्हणून. शशविषाण म्हणून उगाच उच्चार मात्र करावा, तैसें भावरूप अज्ञान आहे म्हणून शास्त्रकारांनीं अज्ञान जनानुभवावरून उगाच उच्चार मात्र करिजेतो. परंतु त्या अज्ञानाचें खरेपणेंकरून स्थापन होईल काय? स्थापन होणार नाहीं. अहो, श्रुतिचे ठायींही जगताचा उपक्रम वर्णिला आहे कीं? यासि उत्तर, सृष्टीची उत्पत्ति वर्णण्याविषयीं श्रुतीचा अभिप्राय नाहीं ऐसें सांगतात,

गगनफुलांचिया माला। वांझे जालयाच्या गला।
घापती तो सोहला। सांगता हा ॥ ८२ ॥

जैसी बालआख्यायिका, दाई बालकास सांगत असती जे कोण्हीएक वंध्यापुत्र होता, आणि त्यानें गगनफुलांच्या माळा घातल्या होत्या, ऐसा सोहळा सांगिजेतो; तैसा हा वेद जो तो सृष्टिक्रम सांगतो. सारांश सृष्टी उत्पन्न जाल्याचें सत्यत्वें कथन करीत नाहीं हा भाव. अहो, कैसेंहीकरून आह्मी अज्ञान सिद्ध करूंच करूं. ऐशा संकल्पास व्यर्थत्व सांगतात,

आणौनि कासवीचें तूप। भरों आकाशाचें माप।
साचा एति संकल्प। ऐसे ऐसे! ॥ ८३ ॥

अरे अज्ञानवादी, तुजसारिखा एक शहाणा यत्नवान् होता, त्याणें प्रतिज्ञा केली जे कासवीचें तूप आणून आकाशाचें माप भरूं, ह्मणून यत्न करिता जाला. त्याचे संकल्प जैसे खरे जाले, तैसे तुझेही ऐसे ऐसे संकल्प खरेपणास येतील. सारांश कासवीस दुग्धचि नाहीं, मग तूप तें कोठून? तैसें तुझे शास्त्रानें वर्णिलें जें अज्ञान तेंच नाहीं, मग त्याची भावरूपता स्थापन करणें तें कैसें घडेल, हा अभिप्राय, आतां सिद्धांती अज्ञानविषयीं उपरत होऊन बोलतात,

एवं पुढुती पुढुती । किती आणावें निरुक्ति ।
आतां नाहीं तें किती । वटवटों पां? ॥ ८४ ॥
ह्मणौनि अज्ञान अक्षरें । नुमसों आतां निदसुरें ।
परि आणिक एक स्फुरे । इये विखीं ॥ ८५ ॥

एवं, या प्रकारेंकरून, पूर्वोक्त बोलल्याचे प्रकारें पुढती पुढती, वारंवार, अज्ञान नाहीं ह्मणून किती निरुक्तींत आणावें, किती बोलण्यांत आणावें? आणि अज्ञान तें नाहींच, आतां किती वटवट करावी! आतां पुरे ह्मणोनि नेम केला कीं, अज्ञान हे अक्षरें निदसुरें नुमसों ह्म० भ्रमकारक आह्मी न स्मरों ह्मणोनि नेम केला. आतां अज्ञानवादी जो तो प्रौढवाद स्वीकारून मोठ्या श्रुतिसंमतीनें पूर्वपक्ष करून बोलतो, अहो ज्ञानोबा, तुह्मी बोलण्याविषयीं उपरत आहेत, परंतु अज्ञानस्थापनेविषयीं आह्मांस आणिक एक स्फुरतें जालें; तें काय ह्मणाल तरि श्रवण करावें,

जें आपणा ना आणिकातें । देखौनि होये देखतें ।
वस्तु तैसेयापुरतें । नोहे अंगें ॥ ८६ ॥

अहो ज्ञानोबा, छांदोग्य सप्तम अध्यायाचे ठायीं श्रुती आहे, जेथें अन्यातें पहात नाहीं, अन्यातें ऐकत नाहीं, अन्यातें जाणत नाहीं, तें भूमास्वरूप ब्रह्म होय. आणि तुमचाही सिद्धांत हाचि जे आपणांस अथवा दुसऱ्यास पाहून पाहणारें होतें तैसियापुरतें, तशासारिखी, ब्रह्मवस्तु स्वयें होत नाहीं; कारण जे अक्रिय आहे ह्मणून.

तें हें आपणापुढें । दृश्य पघले एव्हडें ।
आपण करी फुडें । द्रष्टेपण ॥ ८७ ॥

अहो ते ब्रह्मवस्तु एवढें दृश्य आपणांपुढें पघळेल काय, विस्तारातें पावेल काय? आणि फुडें, चांगलें, द्रष्टेपण आपण करील काय? दृश्य द्रष्टेपण करणार नाहीं हा भाव.

जेथें आत्मत्वाचें सांकडें । तेथ उठे हें एव्हडें ।
उठिलें तें तंव रोकडें । देखत असों ॥ ८८ ॥

ब्रह्मवस्तु जे तीस मी आत्मा होय ऐसें जाणावयाचेंही संकट, आणि तेथें एवढें हें जगत् उठेल काय? उठणार नाहीं हा भाव. तुह्मी ह्मणाल जगत् कोठें आहे? तरी जगत् उठलेलें आहे, तें तव रोकडें, स्पष्ट आह्मी पाहतोंत कीं! तस्मात् हें जगत् ब्रह्माचें कार्य नव्हे, तेव्हां हें आमचे अज्ञानाचेंच कार्य होय.

न दिसे तर्‍हि अज्ञान । आहे हें नोहे आन ।
येथें दृश्य अनुमान । प्रमाण जालें ॥ ८९ ॥

अहो, आमचें अज्ञान जरि न दिसलें, तरि आहे याविषयीं अन्यथा नाहीं. हें कशावरून ह्मणाल, तरि येथें आमचे अज्ञानाविषयीं अनुमान प्रमाण सिद्ध जालें.

चंद्र एक असे । तो व्योमीं दुणा दिसे ।
डोलां तिमिर ऐसें । मानूं ये कीं ! ॥ ९० ॥

जैसा चंद्र येक असतां आकाशाचे ठायीं दोन चंद्र दिसतात, त्याजवरून डोळ्यास तिमिर आहे ऐसें मानावें; तैसा परम पुरुष एक असतां नानात्वेंकरून जगत् दिसतें तेव्हां याचें कारण अज्ञान आहे ऐसें मानावें कीं. अहो, अज्ञान असण्याविषयीं आणखी अर्थापत्ति प्रमाणहि आहे.

भूमिवेगलीं झाडें । पाणी घेति कवणीकडे ।
न दिसति आणि आपाडें । सांजि असती ॥ ९१ ॥
तर्‍हि भरंवसेनि मूळें । पाणी घेती हें न ढळे ।
तैसें अज्ञान हें कळे । दृश्यास्तव ॥ ९२ ॥

जैसीं खदिरादिकांचीं झाडें कोण्हीकडून पाणी घेतात हें दिसत नाहीं, आणि अपाडें ह्म० सीमेपरतीं साजिपिजीं ( तरतरीत ) तरि असतात; तेव्हां भरंवसेनि या वृक्षांचीं मूळें तळचें पाणी घेतात हें न ढळे, ऐसा निश्चय ढळत नाहीं; तैसें हें जगत् कर्तृकर्म-क्रियात्वें करून संपूर्ण दिसतें, तेव्हां अर्थात् याचें कारण अज्ञान आहे ऐसें दृश्यास्तव कळतें.

चेइलीया नीद जाये । निद्रिता ठाउवी नोहे ।
परि स्वप्न दाऊनी आहे । ह्मणों ये कीं ॥ ९३ ॥

जागें जाल्यावर निद्रा जाति हें निजणार पुरुषास ठाउकी होत नाहीं, परंतु ती स्वप्नाचें स्मरण देऊन आहे ह्मणतां येती. तैसी अविद्या तत्वज्ञानेंकरून निवृत्त जरि जाली, तरि जगत्स्वप्न दाखऊन आहे ह्मणों येते कीं!

ह्मणौनि वस्तुमात्र चोखे । दृश्यादि हें फांके ।
तरि अज्ञान आथी सुखें । ह्मणों कीर ॥ ९४ ॥

अहो ज्ञानोबा, ऐसें आहे ह्मणोनि अज्ञान आहे हें सुखेंकरून मानावें कीं! कारण जे आमचें अज्ञान आहे ह्मणूनचि दृश्य - दर्शन - द्रष्टा आणि जो जो चोख, चांगला, पदार्थ वस्तुमात्र असेल तो तो फांके, विस्तारातें पावला आहे! आमचे अज्ञानाची हेळणा तुह्मी करूं नये. आतां सिद्धांती ज्ञानाचा पक्ष स्वीकारून विस्मय करून बोलतात,

अगा ऐसिया ज्ञानातें । अज्ञान ह्मणणें केउतें ।
काइ दिवो करि तेयातें । अंधारु ह्मणिपे ? ॥ ९५ ॥

अगा हे अज्ञानवादी, तुवां द्रष्टा आणि दर्शन हें अज्ञानाचें कार्य मानिलें, परंतु हें ज्ञान कीर होय. अरे ऐसिया ज्ञानातें अज्ञान कैसें ह्मणतोस? दिवो करि ह्म० तत्वज्ञानाचा उदय करणारें जें तयातें अंधार, अज्ञान ह्मणिजेतें काय! ज्ञानाला अज्ञान ह्मणूं नये हा भाव.

चंद्रापासौनि उजल । वस्तु रांविली धवल ।
होय तेयातें काजल । ह्मणिजेत असे ? ॥ ९६ ॥

हृदयकाशाचे ठायीं उदयातें पावला जो उज्वल चंद्रासारिखा द्रष्टा त्यापासून धवल वस्तु, शुद्ध अंतःकरण तें ज्ञानानें रांविलें होय, ह्म० रंगविलें ह्मणून दृश्यातें जाणतें. अस्तु, ऐशा ज्ञानातें काजळ, अज्ञान, ह्मणिजेत असे काय? ऐशातें अज्ञान ह्मणूं नये हा भाव. आतां अंतर्लापनिकें करून बोलतात,

आगीचें काज पाणी । निफजा जन्हिं आणी ।
अज्ञान इया वाहणी । मानूं तान्हिं ॥ ९७ ॥

पाण्यासारिखा निर्मळ अंतरात्मा जो तो सानुकूल होउनि आगीचें काज, ज्ञानाग्नीचें कर्तव्य मोक्षपर्यवसायी परिपाकातें जरि आणील, तरि ज्ञान तें अज्ञान

वाहणीं ह्म० अज्ञानावाणी आह्मी मानूं. अरे अतत्ववित् अज्ञानवादी, तत्वज्ञानास अज्ञानतुल्य मानावयाची तुजला योग्यता नाहीं हा भाव.

कळीं पूर्ण चंद्रमा । आणौनि मेळवि अमा ।
तऱ्हि ज्ञान तें अज्ञाननामा । पात्र होये ॥ ९८ ॥

संपूर्ण कळेनें पूर्ण चंद्रमा तल्लक्षण पूर्ण बोध जो तो जिज्ञासूप्रत अमा, माया, जे ती आणून मेळवील, प्राप्त करून देईल, तरि द्रष्टादर्शनरूप ज्ञान जें तें अज्ञान-नामास पात्र, योग्य होईल. अहो, माया कैसी बोधाची प्राप्ती करून देती? यासि उत्तर उभय कर्तृत्व तीचे ठायीं आहे ऐसें सांगतात,

वोरसोनि लोभें । विष कां अमृत दुभे ।
ना दुभे तऱ्हि लाभे । विष ह्मणणें ॥ ९९ ॥

वत्साकरितां लोभानें वोरसोनि, हंबरडा फोडोनि गाय दुग्धातें दुभती, त्या प्रकारें विष जें तें अमृतातें, अमरणातें प्रसवेल काय? प्रसवणार नाहीं. ना, अथवा, त्या सोमलरूप विषाची मात्रा करून घेतली तरी मरणारा रोगी वांचतो. मग त्या मात्रेला विष ह्मणणें लाभे, शोभतें काय? शोभत नाहीं. तैसी माया जे ती विषय तल्लक्षण विष देऊं लागली तरी जीवातें अमृतत्वास कारण होत नाहीं. आणि ब्रह्म विद्यात्वें परमात्मविषय करून देऊं लागली तरी अमृतत्वास, मोक्षास कारण होती; मग तीतें अज्ञान ह्मणणें शोभतें काय? मायेतें अज्ञान ह्मणणें शोभत नाहीं. आतां ब्रह्मीं जाणणें नेणणें हे दोन्हीहि नाहींत ऐसें सांगतात,

तैसा जाणणेयाचा व्यवहारु । जेथें मावळला सुभरु ।
तेथें आत्मा आणी पूरु । अज्ञानाचा ॥ १०० ॥

ब्रह्मविद्यायोगें करून जालें जें तत्वज्ञान, तैसाही जाणण्याचा व्यवहार जेथें मावळला, तेथें त्या केवल स्वरूपीं आत्मा जो तो अज्ञानाचा पूर आणील काय? अज्ञानाचा लोंढा आणणार नाहीं हा भाव.

तेया नावं अज्ञान ऐसें । तऱ्हिं ज्ञान होआवें कैसें ।
यऱ्हविं कांहीं असे । आत्मया काई ? ॥ १०१ ॥

अरे तत्ववित् अज्ञानवादी; ऐसिया तत्वज्ञानातें अज्ञान ऐसें नाम ठेवितोस, तेव्हां तुझे मतें ज्ञान तरि कैसें व्हावें, असावें! हे ज्ञान अज्ञानें जे ते जीवसंबंधीं

होत. यऱ्हवीं विचारून पाहिलें असतां आत्मा जो त्यास ज्ञानाज्ञानाचा कांहीं संबंध असे काय ? आत्म्यास ज्ञानाज्ञानाचा स्पर्शहि नाहीं हा भाव. आतां शुद्ध ब्रह्म केवल आत्मा जो त्याचें लक्षण सांगतात,

कांहींच जेया न होणें । होये तें स्वयें नेणें ॥
शुन्याचि दे वाणें । प्रमाणासी ॥ १०२ ॥

आत्मा जो तो जगदाकारत्वेंकरून होत नाहीं आणि जें जें मायिक जगत् होतें जातें त्यातें स्वयें जाणत नाहीं. आणि आत्मयातें प्रत्यक्षादि प्रमाणेंकरून कोण्ही जाणावयासि गेलें असतां प्रमाणास शून्याचीं वाणें देतो, प्रत्यक्षादि प्रमाणांतें आत्मा जो तो शून्यतेप्रत पाववितो, नाहींसें करितो हा भाव.

ऐसें म्हणावेयाजोगें । नाचरे कीर अंगें ॥
परि नाहींपणाहि लागे । जोडावाचि ॥ १०३ ॥

प्रमाणें नाहींसे करितो ऐसें ह्मणावयाजोगें आत्मा स्वयें आचरण करीत नाहीं, परंतु तत्वविद जे ते प्रमाणेंकरून त्याचें दर्शन घेऊं गेले असतां वृत्त्यादिक प्रमाणें नाहींसी होतात, ह्मणून आत्मा शून्याचीं वाणें प्रमाणासि देतो, ह्मणून हा नाहीं-पणाचा शद्ब जोडून ह्मणावा लागतो.

कवणाचे असणेनि असे । किं कांहीं देखतां दीसे ।
हें आथी तर्न्हि काइसें । हारतलेपण ? ॥ १०४ ॥

आत्मा कोण्हाचे असणेन असे ऐसें नाही, अथवा कोण्ही पाहिलें असतां कांहींसा दिसतो ऐसें नाहीं. कोण्हास्तव असणें आणि कोण्हास दिसणें हे याजला असे तरि काइसें हारतलेपण ह्म० सर्वोविषयीं हारपत करणें कैसें घडेल ?

मिथ्यावादाची कूटी आली । ते निवांतचि साहिली ।
परि विशेषा दीन्हली । पाठि जेणें ॥ १०५ ॥

या आत्म्यावरी मिथ्यावादाची कुटी आली, ह्म० नास्तिक जे यांहीं शून्य ह्मणून निंदा केली. ते या आत्मयानें निवांतचि साहिली. परंतु प्रगट होऊन नास्तिकाचा वध केला नाहीं, कारण जे ऐणें विशेषास पाठ दिल्ही आहे ह्मणून. आतां निर्विशेष परमात्म स्वरूप जें याचे ठायीं कोण्हाचाही प्रवेश नाहीं ऐसें वर्णितात,

जो निमाली नीद देखे । तो सर्वज्ञु यव्हडिया चुके ।
परि दृश्याचिया न ठके । सोईच जो ॥ १०६ ॥

सर्वांचे हृदयदेशीं राहून विश्वपणेंकरून निमाली ह्म० गेली असी जे निद्रा तीतें देखे, तो सर्वज्ञ ईश्वर जो तो आत्म्याचें स्वरूप किती कैसें आहे याचा शोध करणें यव्हाडिया गोष्टीस चुकेल काय? चुकणार नाहीं. त्या परंतु ईश्वरानें तरि काय करावें, आत्मा दृश्यत्वें करून पुढें उभा राहताचि नाहीं.

वेदु काइ एक बोले । परि नांवचि नाहीं घेतलें ।
ऐसें कांहीं जोडिलें । नाहीं जेणें ॥ १०७ ॥

वेद जो तो काय एक बोलला नाहीं? सर्व सृष्टिक्रम बोलला, परंतु आत्म्याचें नांवचि घेतलें नाहीं. कारण जे, वेद जो येणें ऐसें कांहीं पुण्य जोडलें नाहीं कीं वस्तुचें नांव घ्यावें.

सूर्यु कवण न पाहे । परि आत्मा दाविला आहे ।
गगन व्यापूनि ठाये । ऐसी वस्तु ॥ १०८ ॥

सूर्य जो तो सर्वांचे चक्षूचे ठायीं राहून काय एक पाहत नाहीं? सर्व पाहतो, परंतु आपले प्रकाशेंकरून कोण्हातें आत्मा दाखविला आहे काय? आत्मा दाखविला नाहीं हा भाव. गगन सर्वांसि व्यापितें परंतु आत्म्यास व्यापिलें नाहीं. गगन जें त्याजलाच व्यापूनि ठाये ह्म० आत्मवस्तु जे ते व्यापून अनंतत्वेंकरून राहिली आहे.

देहो हाडांची मोलि । मी ह्मणौनि पोटाळी ॥
तो अहंकारु गाली । पदार्थ हा ॥ १०९ ॥

हाडांची मोळी जो देह त्यातें मी ह्मणून पोटाळणारा स्वीकार करणारा जो अहंकार तेणें हा पदार्थ गाळला, आत्मा जो याचा स्वीकार करवला नाहीं.

बुद्धि बोधा सोके । ते एव्हडी वस्तु चुके ॥
मनाहूनि काल्पनिकें । कवण आहे? ॥ ११० ॥

बुद्धि जे ते पदार्थमात्राचा बोध करण्याविषयीं सोकती ह्म० हा पदार्थ ऐसा आहे, या प्रकारचा निर्धार करती. ते बुद्धि एवढी मोठी आत्मवस्तु जे तीचा निर्धार करावयासि चुकेल काय? चुकणार नाहीं. परंतु अप्रमेय वस्तुचा निर्धार

बुद्धिच्यानें होत नाहीं. पदार्थमात्राची कल्पना करण्याविषयीं मनापेक्षां कल्पिणार कोण आहे ? परंतु त्या मनाच्यानें आत्मकल्पना होत नाहीं.

विषयाचिए बरडी । अखंड घांसिती तोंडीं ।
तें इंद्रियें गोडी । न घेती हे ॥ १११ ॥

गाढवासारिखीं इंद्रियें हे विषय तल्लक्षण बरडीतें स्वीकारून अखंड तोंडीं घांसतात. परंतु आत्मवस्तुची ते गोडी घेऊं शकत नाहींत.

मीपणासकट । खाउनि भरी जे पोट ।
ते कोणाही कटकट । फावेल कां ? ॥ ११२ ॥

चिच्छक्ति आहे अभिन्नत्वें जे ती ज्यास असा जो परमात्मा तो चिच्छक्तीतें आणि मी नित्यमुक्त आहे असा जो मीपणा त्यासगट खाऊन पोट भरितो, ह्म० स्वरूपनिद्राकाळीं आपल्या भूमा अनंत ब्रह्मस्वरूपीं आश्लेषणातें नाहींसें करितो. ऐसा त्याचा प्रकार, मग अन्याचें तें काय सांगावें ? कटकटा ह्म० अहारे दैवा ! ते वस्तु कोण्हास तरि फावेल कां, प्राप्त होईल कां ? कोण्हासही ग्राह्यग्राहकत्वेंकरून प्राप्त व्हावयाची नाहीं हा भाव.

जो आपणा नव्हे विषो । तो कवणा लाहे देखों ।
जे वाणी न सके चाखों । आपणपें ॥ ११३ ॥

जेसी वाणी उपलक्षित जिव्हा जे ते सर्व पदार्थातें चाखों जाणती, परंतु आपणातें चाखं सकत नाहीं. तैसा परमात्मा जो तो संपूर्णातें विषय करितो, परंतु आपलें भूमास्वरूप ब्रह्म जें तद्रूपत्वें आपण आपणातें विषय होत नाहीं. तेव्हां तो कोण्हास देखों लाहे ह्म० देखतां येईल काय ? देखतां येणार नाहीं हा भाव.

जेया आपलें मुख । पहावयाचें सुख ।
न बने मा आणिक । रिगेल कें ? ॥ ११४ ॥

ज्या परमात्मियाचें मुख, स्वरूप कैसें किती आहे, आणि आपलें मुख कैसें आहे हें पहावयाचें बनत नाहीं, घडत नाहीं; तेव्हां मग आणीक तत्ववेत्ता जो तो ब्रह्मस्वरूप पहावयास अथवा ब्रह्मसुख घ्यावयास रिगेल कैसा ?

हें असो, नावें रूपें । पुढासूनि उमोपें ॥
जेथें आली वासिपे । अविद्या हे ॥ ११५ ॥

हें असो, फार काय सांगावें, हे अविद्या उमोपें, पुष्कळ नामरूपात्मक जग पोटीं घेऊन तत्ववेत्याचे परमवृत्तिरूपें पुढासूनि, अग्रभागीं होऊन ज्या परमात्म्याचे शुद्धब्रह्मस्वरूपीं आली असतां वासिपे, विलयातें पावती हा भाव. आतां परमात्मियाचे शुद्ध स्वरूपाचा निर्णय होत नाहीं ऐसें सांगतात,

खेलिजे वाधिकडे । ते अंतचि बाहेर सवडे ॥
तैसा निर्णयो सुनाट पडे । केला जेथें ॥ ११६ ॥

**पूर्वार्धाचा अन्वयः—** वाधिकडे खेलिजे अंताचि ते सवडे बाहेर. जैसे जुवेवाल्याचे येथें जाऊन वाधिकडे, वाधीचा खेळ खेळावा, तेव्हां ती काडी वाधिचे सवडे ह्म० संधिआंत घातल्यासारखी वाटती, परंतु वाधिचे सवडी बाहेर पडती. तैसा केवळ आत्मविषयीं निर्णय, विचार, सुनाट पडे, व्यर्थ होतो. [ वाधीचा खेळ हा एक प्रकारचा जुगार असून त्याचें वर्णन दास गणू यांनीं असें केलें आहेः— ‘ त्या खेळांत छिद्राचा ठाव । नुमगे एके ठाईं ॥ तें छिद्र वाटेल तेथें । विबुधहो फिरविलें जातें । ह्मणूनि नये काडीतें । नेमकें छिद्रांत घालितां ॥ ]. आतां विचारवान् योगाभ्यासी त्यातें दूषितात.

मस्तकान्त निर्धारिली । छाया उडे जो आपुली ।
तेयाची फांकावली । बुद्धि जैसी ॥ ११७ ॥

कोण्ही एक पुरुष आपली छाया मस्तकपर्यंत नेमून उडी मारिता जाला तरि छाया पुढेंच चालिली जाती; तैसा विचारवान् योगी जो तो आपले जाणिवेतें टाकून निर्विशेष ब्रह्म अनुभविलें ह्मणतो; तयाची बुद्धि फांकावली, बहकून गेली ऐसें जाणावें. कारण जे निर्विशेष ब्रह्मानुभव तरि कळल्यांतच्चि येतो, तेव्हां जाणीव आहेच तीतें सोडून तो कोठें जातो ?

तैसा टनकौनि सर्वथा । ते हे ऐसी व्यवस्था ।
निर्णयो करितो चूकता । इये वस्तुचा ॥ ११८ ॥

तो योगी सांगितला त्या प्रकारें सर्वथा टनकोनि, श्रवण-मनन-निदिध्यासनादि सर्व श्रम करून, ऐसी व्यवस्था, निर्धार करिता जाला जे, तत्पदलक्षण परमात्मा

जो तोचि येथें हें त्वंपदलक्ष होय. या प्रकारें निर्णय, विचार करणारा जो तो या वस्तुचा चुकणारा होय. कारण जे तेणें निरुपाधिक वस्तूतें सोपाधिक मानिलें ह्मणून. अहो ज्ञानोबा, मोठ्या अनुभवास तुह्मी दोष सांगतात, तरि तुमचा निर्धार तरि काय कैसा तो सांगावा. यासि स्वानुभवयुक्त उत्तर देतात,

आतां सांगिजे तें केउतें । शब्दाचा संचार नाहीं जेथें ।
किं दर्शनाची तेथें । राणीव आथी ? ॥ ११९ ॥

जेथें शब्दाचा संचार नाहीं, तेव्हां आतां ते वस्तु कैसी सांगावी? अथवा त्या वस्तुचे ठायीं दर्शनाची तरि राणीव, वहिवट आहे काय? दर्शनाचीहि वहिवट नाहीं हा भाव.

जेयाचेनि बळें । अचक्षुपण आंधळें ।
फिटौनि वस्तुसि मिळे । देखणी दशा ॥ १२० ॥

जया परमात्मगुरूचेनि बळें, प्रसादेंकरून, अचक्षुपण आंधळें ह्म० स्वरूपातें न जाणणेंरूप अज्ञान तें फिटोनि, जाऊन, आत्मवस्तु जे तिजप्रत देखणी दशा, द्रष्ट्याची दृष्टी जे ती मिळती. ऐसें हें गुरुप्रसादाचें महिमान द्वितीय प्रकरणीं वर्णिजेलेंचि आहे. अहो, परमात्मियाचें केवल शुद्ध भूमा अनंत स्वरूप जें त्याचें दर्शन होत नाहींच कीं काय? यासि उत्तर, केवल वस्तूचें दर्शन होतें, परंतु द्रष्टृत्वचि नाहींसें होतें ऐसें सांगतात,

आपुलेंचि दृश्यपण । उमसों न लाहे आपण ।
द्रष्ट्रत्वासींहि आण । पढली असे ॥ १२१ ॥

स्वरूपनिद्राकाळीं परमात्मा जो तो आपले भूमा अनंत स्वरूपाचें दर्शन घेतो ते वेळीं चिच्छक्तिरूपा दृष्टि जे ते मावळती, ह्मणोनि आपलेंचि स्वरूप केवल ब्रम्ह जें त्यातें दृश्यपणेंकरून आपण द्रष्टा होऊन उमसों न लाहे, विसावा खाऊं सकत नाहीं. मग व्यष्टिगत तत्ववेत्ता जो येणें ब्रह्मवस्तूचें दर्शन घेतल्यानंतर ब्रम्हवस्तूला दृश्य करणें कैसें घडेल? घडणार नाहीं. भेदज्ञान विषयीं तरि द्रष्टृत्वासही आण पढली असे, ह्म० वेदानें डंका वाजवून परमात्मद्वाही फिरविली असे जे माझ्या केवल अद्वितीय स्वरूपीं द्रष्टृत्वें अति अल्पहि अंतर करतील त्यातें भय होईल. या हेतूस्तव तत्ववेत्ता जो येणें ब्रह्मीं भेदक द्रष्टृत्वचि टेकूं नये हा अभिप्राय. आतां तत्व-

ज्ञानियाचा पांचवा आत्यंतिक प्रलय होऊन परमात्मियाचें शुद्ध भूमा अनंत स्वरूप राहतें त्याचा प्रकार वर्णितात.

कवण कवणा भेटे । दीठी कैची फुटे ।
ऐक्यासगट पुटें । आटौनि गेलीं ॥ १२२॥

द्वैताद्वैतविवर्जित केवल वस्तु राहिली तेथें कोण्ही कोण्हास भेटावें आणि त्यातें पाहावयासि परमात्मा आणि तत्ववेत्ता जो यासि दिठी कैची फुटावी, प्रकट व्हावी? जेथें त्वंपदार्थ आणि तत्पदार्थ हेचि कोण्ही एक नेत्रपुटें याचें ऐक्य करणें जे त्यासहित आटोनि गेलें ह्म० सर्वस्वें नाहींसें जालें. सारांश केवल ब्रम्हाचि राहिलें, दुसरें कोण्ही नाहीं. आतां अज्ञानवादी बोलिला होता जे संपूर्ण जगतास कारण आमचें अज्ञानाचि होय, त्याचें निवारण करण्याकरितां आणि प्रथम प्रकरणीं परमात्मा पुरुष ईश्वर आणि चिच्छक्ति प्रकृति माया ऐशा मूर्त्तित्रय सांगून त्यांत प्राधान्यत्वें प्रकृतिपुरुषाचा विलास वर्णिला. आतां पूर्णशंभु परमात्मा जो तोचि सर्वरूपत्वें होय ऐसा परमात्माविलास वर्णन करितात,

एव्हडेंहि सांकडें । सारौनि येकीकडे ।
उघडिलीं कवाडें । प्रकाशाचिं ॥ १२३ ॥

परमात्मा आपलें शुद्ध भूमा अनंत स्वरूपीं योगनिद्रापन्न होऊन दृश्यद्रष्टृत्वादि सर्व व्यवहार आपल्यासुद्धां कांहीं स्मरत नव्हता. परंतु एवढेंही सांकडें, आपलें ब्रह्म सुख आपण घ्यावयाचें जेथें संकट तें सारोनि येकीकडे, ती स्वरूपनिद्रा विसर्जन करून, विलास करावयासाठीं आपली सच्चिदानंदरूपता जे त्यांतील प्रकाशाचीं ह्म० सामान्यविशेष चैतन्याचीं उभय कवाडें उघडिलीं,

दृश्याचिये सृष्टि । वोपीत दिठीवरि दिठी ।
उठलीसे तलवटिं । चिन्मात्रचि ॥ १२४ ॥

परमात्मा जो तो दृश्याची सृष्टि विसर्जन करावयासाठीं वोपीत, योजीतसे दिठीवरि दिठी म्ह० परमपुरुषरूपत्वें सामान्य ईक्षण आणि व्यष्टीचे ठायीं विशेषरूप द्रष्ट्याची दृष्टि ऐसी एकीवर एक दृष्टि उठलीसे, आविर्भूत जाली असे. परंतु जैसी समुद्राच्या मोठ्या लाटेवरि धाकटी लाट उठली तरि तळवटीं निर्विकार निश्चळचि उदक असतें, तैसें परमात्मियाचें सामान्य विशेष उभय ईक्षणें जालीं

तरी तळवटीं म्ह० अधिष्ठानरूप परमात्मा जो तो चिन्मात्र, केवल ब्रह्मत्वेंचि आपणातें जाणत आहे. ऐसें संग्रहवाक्य वर्णून आतां विस्तारपूर्वक परमात्मक्रीडा वर्णितात, त्यांतील चिदाभास जीव जो त्याचें प्रथम वर्णन करितात,

दर्शनऋद्धि बहुवसा । चिच्छेषु मातला ऐसा ।
जे सिळा न पाहे आरिसा । वेद्यरत्नांचा ॥ १२५ ॥

जैसा रज्जुवरुते शेष म्ह० सर्प, भासतो तैसा हा चिच्छेष, चिदाभास जो तो देहपुरीचे ठायीं राज्य करणारा त्याची बहुवस दर्शनऋद्धि, नाना प्रकारची संकल्पाची संपत्ती जे तीकरून ऐसा मातला आहे. जे वेद्य, शब्दस्पर्शादिक जे विषय जीवास अत्यंत प्रिय यास्तव हाचि कोण्हीएक रत्नभूत आरसा तो सिळा जाला ह्मणून पाहत नाहीं. नवे नवे विषय सेवन करितो हा अभिप्राय.

क्षणक्षणा नींच नवी । दृश्याची चोख पदवी ।
दिठीकरवीं वेढवी । उदार जो ॥ १२६ ॥

हा चिदाभास जीव जो तो मोठा उदारहि आहे. याची दृष्टि हेचि कोण्ही एक अर्धांग स्त्री प्रज्ञानामक तिजकरवीं नित्य नूतन दृश्याची चोख पदवी म्ह० दृश्य हेंचि कोण्ही एक चांगल्या योग्यतेचीं लुगडीं जे ते क्षणक्षणा वेढवितो, नेसवितो.

मागिलिये क्षणिंचि अंगें । पारोसी ह्मणौनि वेगें ।
सांडूनि दिठी रिगे । नवेया रूपा ॥ १२७ ॥

ती दृष्टि म्ह. बुद्धि मोठी कवटाली होय. मागील क्षणींचि अंगें पारोसी म्ह० शिळी ह्मणून वेगें उत्तर क्षणीं नूतन रुप धारण करिती.

तैसेच प्रतिक्षणीं । जाणीवेचीं लेणीं ॥
लेवौनि चित्त आणी । जाणतेपणा ॥ १२८ ॥

हा चिदाभास जो तो स्त्रीचा जैसा लळा पुरवितो तैसेंच याचें धाकटें लेंकरू चित्त जें त्यातें जाणीवेचीं लेणीं प्रतिक्षणीं लेववून जाणतेपणास आणितो. ऐसा हा चिच्छेष ऐश्वर्येंकरून प्रमत्त जाला आहे.

तेया परमात्मपदिं चिच्छेष । ना कांहीं तेया सुसास ॥
आणि होय एव्हडी कास । घातली जेणें ॥ १२९ ॥

जैसा रज्जूचे ठायीं सर्प जावयासि छिद्र नसतें, तैसें त्या परमात्मपदिं, शुद्ध-स्वरूपीं, चिच्छेष ह्म० चिदाभास आंत प्रविष्ट व्हावयास सुसास, उच्छ्वास नाहीं. आणि द्रष्ट्याचें प्रतिबिंब मी होय, तेव्हां परमात्मसंबंधींच आपण ऐसी जेणें कास घातलीसे, कंबर बांधली आहे. सारांश जीव जो तो वऱ्हलेवराचे भासतो हा भाव.

सर्वज्ञतेची परी । चिन्मात्राचे तोंडवरी ॥
परि एकाहि प्रमाणाचे घरिं । जाणिजेना ॥ १३० ॥

फार काय सांगावें, मायोपाधि सर्वज्ञ ईश्वर जो त्याचीही परी, प्रकार, विचारून पाहिला तरि चिन्मात्राचे तोंडवरी ह्म० जैसा गारोडी जो तो गव्हानें घडा भरितो परंतु गहूं आंत नसतां घड्याचे तोंडावरीच असतात; तैसा मायावी ईश्वर जो तो परमात्मियाचें केवळ सन्मात्र स्वरूप जें त्याचे तोंडावरी, वरचेवरीच शोभतो. अस्तु, ईश्वर जो तो सत्यस्वरूप होय किं नव्हे ऐसें एकाही प्रमाणाचे घरीं, एकाही प्रमाणें-करून जाणिजेना, कळत नाहीं. कारण जे त्याची माया अनिर्वचनीय आहे ह्मणोनि त्याचेंही निर्वचन करितां येत नाहीं हा भाव.

एवं ज्ञानाज्ञानाची मिठी । ते हे फांकतसे दिठी ॥
दृश्यपणें ये भेटी । आपुलिया ॥ १३१ ॥

सर्वजगत्कारण परमात्मा जो त्याची दृष्टी जे तीतें सांख्य शास्त्राचे ठायीं प्रधान ह्मणताहेत तेचि प्रकृति जीवेश्वर उपाधित्वें ज्ञानाज्ञानाची मिठी, विद्या अविद्या उभयरूपा त्रिगुणात्मिका माया होऊन चराचर दृश्यरूपेंकरून फांकतसे, विस्तारातें पावतसे. एवं या प्रकारें, परमात्मदृष्टीच सर्व होऊन आपले भेटीस आपण येत असे.

तें दृश्य मोटकें देखे । आणि स्वयें द्रष्ट्रत्वें तोखे ।
तेचि दिठीचेनि मिखें । माजि दाटे ॥ १३२

ते परमात्मदृष्टी जे तीतें सेश्वर सांख्य जे ते पुरुष ऐसें ह्मणतात, ती दृष्टी जे ते व्यष्टीचे ठायीं राहून मोटकें दृश्य, चांगले इच्छित पदार्थातें पाहून स्वयें आपणाचि द्रष्ट्रत्वेंकरून संतोषातें पावती. आणि ते परमात्मदृष्टी जे ते द्रष्टा आणि दृश्य या उभयतांचे मधीं जाणीवरूप दृष्टीचें मिष करून दाटती ह्म० दृश्यातें व्यापिती.

तेधवा देणें घेणें घटे । परि ऐक्याचें सूत न तुटे ।
जैसे मुखाचें मुखवटे । दर्पणें केले ॥ १३३ ॥

ऐसी चिच्छक्तिरूपा परमात्मदृष्टी जे ती दृश्य-द्रष्टादर्शनरूप होती तेव्हां पदार्थाचें देणें घेणें घटे, घडतें. इतुकाही परमात्मदृष्टीनें आपला भेद दाखविला, परंतु ऐक्याचें सूत तुटत नाहीं ह्म० परमात्मयाचें एकत्व भेदातें पावत नाहीं हा भाव. अहो, जीवेश्वरभेद कैसे जाले? यासि उत्तर, जैसे पैलुदार दर्पणामध्यें एका मुखाचे अनेक प्रतिबिंबें पडतात, तैसी परमात्मदृष्टी जे ती प्रकृतिरूपा होउनि द्विप्रकारक होती जाली:- एक शुद्धसत्वात्मिका आणि मलिन सत्वात्मिका. ऐसी जे द्विप्रकारक प्रकृति तेच माया होय. शुद्धसत्वात्मिका माया जे तीचे ठायीं परमपुरुषाचें जें प्रतिबिंब तो ईश्वर होय. आणि मलिनसत्वात्मिका अविद्या जे तीचे ठायीं पुरुषाचें जें प्रतिबिंब तो एक जीव होय. कोण्हीएकाचे मतें यास ईश्वरहि ह्मणतात. कारण जे हा नाना जीवाचा समष्टि ह्मणून. अस्तु, अविद्येचें नानात्व आहे ह्मणून नाना जीव प्रादुर्भूत होते जाले. एवं संपूर्णरूपें एक परमात्मदृष्टीच विस्तारातें पावली हा भाव. आतां ईश्वराचे ज्ञानाचा प्रकार वर्णितात,

अंगें अंगावरि पहुडे। परि चेइला वेगला न पडे।
तेया वारुवाचेनि पाडें। घेणें देणें ॥ १३४ ॥

चेइला ह्म० नित्य स्वरूपविषयीं जागा जो ईश्वर त्याचें उजवें अंग विद्या आणि डावें अंग अविद्या होय. ऐसा जो ईश्वर तो अंगें अंगावरि पहुडे ह्म० उजवे अंगाहून डावे अंगावरि अविद्यात्मक जगद्रूपें जरि जाला, परि तो ईश्वर जो तो परमात्मस्वरूपाहूनि वेगळा पडत नाहीं, आणि आपली नित्यमुक्तता विसरत नाहीं. आतां जीवाचे ज्ञानाचा प्रकार वर्णितात. जैसा घोडा जो तो झोंपेंत आहार-भय-निद्रा-मैथुन करीत असतो, तैसा जीव जो त्यास जाग्रदवस्थेचे ठायीं आहार-भय-मैथुन-निद्रा यांचें ज्ञान व्यवस्थापूर्वक पराकाष्ठेचें असतें. परंतु अनादि अविद्येच्या योगें आपलें ब्रह्मस्वरूप भुलला, त्यास्तव आपणातें मुक्तपणें पहात नाहीं. कारण जे शुद्ध ब्रह्मस्वरूपाचें ज्ञान नाहीं ह्मणून. आतां शबल ब्रह्माचें वर्णन करितात,

पाणी कल्लोलाचेनि मिसें। आपणपें वेल्हावे जैसें ॥
वस्तुवरि वस्तु तैसें। खेलो सुखें ॥ १३५ ॥

जैसें पाणी जें तें कल्लोळाचें मिष करून आपण आपणावरि वेल्हावतें, हेलकावतें; तैसें शबलब्रह्मवस्तु जे ते आपले स्वरूपावरि परमात्मरूपें आणि पुरुषरूपें आणि नाना जीवत्वें सुखेंकरून खेळली तरि कांहीं चिंता नाहीं. कारण जे संपूर्ण खेळ विवर्तरूपें आहे ह्मणून. आतां मायावी ईश्वराचें स्वरूप वर्णितात,

गुंफिवा ज्वालांचिया माला । लेइलिया अनला ॥
भेदाचिया विटाला । पडणें आहे ? ॥ १३६ ॥

दावाग्नि जो तो गुंफिवा, एकांत एक गुंतलेल्या, ज्वाळा ज्या त्या लेइलिया अग्नि जो त्यातें भेदाचा विटाळ होतो काय? भेदाचा विटाळ होत नाहीं. तैसा ईश्वर जो तो एकांत एक गुंतलेल्या त्रिगुणात्मिका माया-अविद्यादि अनेक शक्ति ज्या त्यांतें लेइलिया ईश्वर जो त्यास भेदाचा विटाळ होत असे काय? भेदाचा विटाळहि होत नाहीं. कारण जे संपूर्णत्वें एक ईश्वरचि आहे ह्मणून.

किं रश्मींचेनि परिवारें । वेढोनि घेतला थोरें ।
तरि सूर्यासि दूसरें । बोलों ये काई ? ॥ १३७ ॥

जैसा सूर्य जो त्याचे थोरले प्रभेचा परिवार ज्या रश्मि त्यांनीं सूर्यासि वेढूनि घेतलें तरि सूर्यासि दुसरें ह्मणों येईल काय? दुसरें ह्मणतां येत नाहीं. तैसी परमात्मप्रभा जे चिच्छक्ति तिचा परिवार प्रकृति माया-अविद्यादि अनेक शक्ति ज्या त्यांनीं परमात्मियासि जरि वेढूनि घेतलें तरि परमात्मियासि दूसरें ह्मणों येईल काय? दूसरें ह्मणतां येत नाहीं. आतां पुरुषाचें स्वरूप वर्णितात,

चांदणियाचा गिंवसु । चांदावरि बहुवसु ।
काइ केवलपणा त्रासु । देखिजेल ? ॥ १३८ ॥

चंद्रासारिखा निर्मळ पुरुष जो त्याची चंद्रिकेसारिखी अष्टधा प्रकृति जे तीणें गवसणीसारिखें पुरुषातें वेष्टून जरि घेतलें, तरि त्याचे केवल अद्वितीयपणास त्रास होईल काय? त्रास होणार नाहीं.

दलाचिया सहस्रवरी । फांके आपुलिये परी ।
परि नाहींच दूसरी । भाष कमलीं ॥ १३९ ॥

आपले प्रकारचीं सहस्रावधि फांकली आहेत दळें जे ते ज्यास असें जें कमळ तें एकचि होय, दुसरी भाषा नाहीं. तैसीं आपलेसारिखीं नानाप्रकारचे प्राणिमात्रांचीं मस्तकें जे ते आहेत सहस्रशब्देंकरून असंख्यात शिरें जे तीं ज्यास ऐसा जो सहस्रशीर्ष पुरुष तो एकचि होय. त्यावांचून पुरुषसूक्ताचे ठायीं दुसरी भाषा नाहीं. अहो, जगत्कर्ता पुरुष आणि जगत् हे भिन्न भिन्न असतील कीं? यासि उत्तर,

सहस्रवरि बाह्या । सहस्रार्जुना राया ।
तर्‍हि तो काय तेया । एकोत्तरावा ? ॥ १४० ॥

राजा सहस्रार्जुन जो त्यास सहस्र बाहु होते, तरि तो एकोत्तरावा ह्मणजे एका आगळें सहस्रावा ऐसें नाहीं; तैसा जगत्कर्ता पुरुष जो तो जगताहून एक वेगळा असेल ऐसें नाहीं. पुरुष जो तो संपूर्ण जगतास अभिन्ननिमित्तोपादानकारण होय. आतां तो पुरुष सूत्रात्मरूपेंकरून एकचि होय ऐसें वर्णितात,

सवकटाचिया वोजा । पदर बहुवे पुंजा ।
परि तांथुविं दुजा । भावो आहे ? ॥ १४१ ॥

जैसें सवकट ह्मणजे सुताचे सोकटाची वोज, बरवेपणास, बहुत पदरांचा पुंजा असतो, परंतु प्रतितांथुविं एकचि सूत असतें. तेथें सुतावांचून दुजा भाव आहे काय? दुजा भाव नाहीं. तैसा सूत्रात्मा जो तो ब्रह्मांडाचे ठायीं महद्भूत वायोरूपेंकरून वर्तती. तोचि प्रतिशरीरीं पंचप्राणरूपें एकचि आहे, परंतु दुजा भाव नाहीं. आतां वेदाचें एकत्व वर्णितात,

कोडीवरि शब्दांचा । मेळावा जर्‍हि वाचेचा ॥
मीनला तर्‍हि वाचा- । मात्रचि कीं ? ॥ १४२ ॥

परमात्मवाणी वेद जो त्याचे शब्दांचा मेळावा जरि मीनला, समुदाय जरि एकत्र जाला तरि संपूर्ण वेदरूप वाणी जे ते एकचि होय. आतां ईश्वरमायेचें वर्णन करितात,

तैसे दृश्याचे डांखाले । नाना दृष्टिचे उमाळे ॥
उठती लेखावेगळे । द्रष्टृत्वेंही ॥ १४३ ॥

तैसे, त्याचि प्रकारें, मायानदीचे ठायी नानाविध दृश्याचे डांखाले, वेगळाले भेद, आणि अनेक दृष्टी हेचि कोण्ही एक मायानदीचे उमाळे होत; आणि लेखावेगळें, अगणित द्रष्टृत्वेंही उठतात. आतां हिरण्यगर्भाचें वर्णन करितात,

कां गुळाचा बांधा । फूटलिया मोडिचा धांदा ॥
जाला तर्‍हि नुसधा । गूळचि तो ॥ १४४ ॥

अज्ञानी जनास गुळासारिखी गोड ऐसीं जीं विषयेंद्रियें त्यांची प्रळयकाळीं विलीन दशा जाली होती, ते सृष्टिउपक्रमकाळीं गुळाचे बाध्यासारिखा हिरण्यगर्भ जो

त्याचे मोडिचा धांदा फुटला, देव-मनुष्य-तिर्यगादि लिंगदेहाचा भेद होता जाला तरि नुसधा गूळ तल्लक्षण हिरण्यगर्भाचि संपूर्णरूपें होय. आतां पुरुषापासून हिरण्यगर्भ-पर्यंत सांगिजेले तो अवघा परमात्माचि होय ऐसें वर्णितात,

तैसें दृश्य दावोनि देखो । किं बहु होवोनि फांको ॥
परि भेदाचा नोहे विखो । तेचि म्हणौनि ॥ १४५ ॥

ऐसी संपूर्ण रूपें परमात्मवस्तु जे ते समस्त जडाजड दृश्य जें त्यातें दाखवोनि आपण देखो, पाहो, किं बहुत होऊनि फांको, अनेकत्वें विस्तारातें पावो, परंतु भेदाचा विषय होत नाहीं; कारण जे अवघी परमात्मवस्तूच आहे ह्मणून.

तेया परमात्मियाचिया भाषा । न पडेचि दूसरी रेषा ॥
जर्‍हि विश्व अशेषा । भरलें असे ॥ १४६ ॥

अशेष, संपूर्ण, हें विश्व नानात्वेंकरून भरलें आहे तरि त्या परमात्मियाचे भाषेस, नामासि, दुसरी रेषा पडली नाहीं, भेद जाला नाहीं.

दुबंधीं क्षीरोदकीं । वाणेपरी अनेकी ॥
दीसती, तर्‍हि तितुकीं । सुतें आथी ? ॥ १४७ ॥

दुबंधीं क्षीरोदकीं ह्मणजे दुतारा पाटाव ( रेशमी वस्त्र ) जो त्याचे ठायीं वाणें, रंगाचे वर्ण अनेक दिसतात, परंतु तितकेही वेगळालीं सुतें आहेत काय ? वेगळालीं सुतें नाहींत. कारण जे पाटाउचे ठायीं वोतप्रोत ह्मणजे आडवें उभें सूत एकचि आहे ह्मणून. तैसा अधिष्ठानरूप परमात्मा जो तोचि आपण आपले ठायीं प्रकृतिपुरुषत्वेंकरून, आणि जातिगुणत्वेंकरून दिसला तरि परमात्मा भेदातें पावला नाहीं. कारण जे अधिष्ठानत्वें एकचि परमात्मा आहे ह्मणून. सारांश परमात्मविलास जो तो अधिष्ठानविवर्तत्वेंकरून जाणावा हा भाव. आतां परमात्म अद्वैत पाहण्याविषयीं स्वप्न-दृष्टांत सांगतात,

पातयाची मिठी । नुकलितां दिठी ॥
अवघिया सृष्टि । पाहे जर्‍हीं ॥ १४८ ॥

नेत्रपात्याची मिठी न उकलतां स्वप्नावस्थेंत अवघी सृष्टि जरि कोण्ही पाहील, तरि या परमात्मविलासास ती स्वप्नउपमा असे. सारांश, परमात्मविलास जो तो

स्वप्नतुल्य असे हा भाव. आतां हें परमात्म अद्वैत पाहण्याविषयीं प्रळयकाळचा दृष्टांत सांगतात.

न फूटतां बीजकणिका । माजि विस्तारे वट असिका ॥
तर्हि इया अद्वैतफांका । उपमा आथी ॥ १४९ ॥

वटाची बीजकणिका न फुटतां त्यामध्यें विस्तारपूर्वक जैसा वट असतो, तैसा प्रळयअवस्थेचे ठायीं परमात्मस्वरूपी बीजकणिकेसारिखी प्रकृति जे तिजमध्यें फांका ह्म० संपूर्णजगाद्विस्तारसहित वट तल्लक्षण ईश्वर जो तो सांटवतो. आतां सृष्टि उपक्रम वार्णितात,

मग मातें मिया देखावें । ऐसें जर्हि भरे हांवे ॥
तर्हि अंगचि ये विसांवे । सेजेवरी ॥ १५० ॥

ती प्रलयावस्था सरल्यानंतर मग मातें मिया नानात्वेंकरून देखावें ऐसा पुरुष जेव्हां हांवे भरतो, तेव्हां विद्या अविद्या आहेत उभय अंगें जे तीं ज्याचीं त्या ईश्वर-रूपेंकरून अंगाचे सेजेवरी, अविद्यात्मक अंगाचे ठायीं विद्यारूप अंग विसाव्याप्रत येतें, ईश्वर जो तो स्थितिअवस्था पावतो हा भाव. आतां उपसंहार वार्णितात,

पातयाची मिठी । पडलिया दीठी ॥
आपुलिये पोटीं । रिगौनि असे ॥ १५१ ॥

परमात्मदृष्टीची पातीं जे जीवेश्वर याची मिठी पडलियावरी, जीवेश्वर निवृत्त जालियावरी, परमात्मदृष्टि चिच्छक्ति जे ती परमात्मियाचे शबलब्रह्मस्वरूपीं रिघोनि असती.

कां नुदेलिया सुधाकरु । आपणपें भरे सागरु ।
ना कूर्मी गिळि विस्तारु । अपेंआप ॥ १५२ ॥

अथवा सुधाकर ह्म० चंद्र जो तो न उगवला असतां सागर जो तो आपले ठायीं आपण भरून राहतो, तैसा पुरुष जो त्याचा उपसंहार जाला असतां परमात्मा जो तो आपले ठायीं आपण भरून राहतो. आतां प्राकृतिक प्रलय वर्णितात. अथवा कूर्मी तल्लक्षण प्रकृति जे ती भूम्यादि अष्टधा प्रकारची जे ती परमात्मशक्ति निवृत्त जाली असतां आपला विस्तार संपूर्ण जग जें त्यातें गिळून आपण निवृत्त होती. आतां परमपुरुष जो तो योगियाचे रूपें करून व्यष्टीचे ठायीं उपसंहार करितो तें वर्णितात,

अवंसेचिया दिवसीं । सत्राविये अंशीं ।
स्वयें जैसें शशी । रिगणें होये ॥ १५३ ॥
तैसें दृश्य जीणतां द्रष्टें । पडे जैताचिये कटे ।
तया नावें वाघटे । आपणपांचि ॥ १५४ ॥

अमावास्येस स्वमंडळरूप सत्रावी कळा जे तीचे ठायीं चंद्र जो तो प्रविष्ट होतो. तैसा अविद्याग्रस्त आणि दृश्य जीणता ह्म० दृश्यातें वृत्तिउपरमेंकरून जिंकणारा हठयोगी जो तो प्राणायामबळें षोडशकलात्मक लिंगदेहातें जैताचि ह्म० क्षीण करतेक्षणींच दृश्यविवर्जित द्रष्टा जो तो एकटा राहतो. तयाच नावें आपले ठायीं आपण वावटणें, उपरम करणें हा भाव. आतां परमात्मयाची स्वरूपनिद्रा वर्णितात,

सहजें आपणचि आहे । तर्‍हि कवण कवणातें पाहे ।
तें न देखणेंचि होये । स्वरूपनिद्रा ॥ १५५ ॥

परमात्मा जो तो सहज रीतीनें पाहिला असता अवघा आपणचि आहे, आपल्यावांचून दुसरें कोण्ही नाहीं. तेव्हां कोण कोण्हातें पाहतो? आणि परमात्मियाचे उपसंहारत्वेंकरून न देखणें जे ते स्वरूपनिद्राचि होय.

ना न देखणें नको । ह्मणे मी मातें देखों ।
तर्‍हि आपेंआप विखो । अपैसा असे ॥ १५६ ॥

अथवा उपसंहारत्वें न देखणें आतां पुरे. उपक्रमत्वेंकरून दृश्यद्रष्ट्रूपें आपणातें पहावें ऐसें परमात्मा मानिता जाला तरि आपले ठायीं आपला विषय आपणचि असे. अहो, हे उपक्रमउपसंहारत्वें परमात्मयाची क्रीडा कितीदा जाली? यासि उत्तर ही परमात्मक्रीडा बहु वेळ अनादि होत आलीच आहे ऐसें सांगतात,

जें अनादि दृश्यपणें । अनादीच देखणें ।
हें काइ आतां कवणें । रचों जावें? ॥ १५७ ॥

दृश्यपण आणि देखणें हें अनादीच होय. आतां कोण्ही कविता करून नूतन रचूं जावें ऐसें आहे काय? ऐसें नाहीं. अहो, परमात्मा आणि पुरुष आणि ईश्वर यांणीं दृश्य पहावयाकरितां ज्ञानासि संबंध करावा लागत असेल कीं? यासि ज्ञानाचा संबंध पावणें नको, ऐसें तीन दृष्टांतेंकरून सांगतात,

अवकाशेंसि गगना । स्पर्शेंसी पवना ।
कां दीप्तिसी तपना । सबंधु कीजे ? ॥ १५८ ॥

गगन, वायू, तेज यांसि अवकाश, स्पर्श, उष्णत्व यांचा संबंध करावा लागतो काय ? करावा लागत नाहीं जैसा, तैसा परमात्मा-पुरुष ईश्वर यांसि ज्ञानाचा संबंध करावा लागत नाहीं. कारण जे ते स्वयें ज्ञानरूपचि आहेत ह्मणून. आतां परम पुरुष जो तो अंतर्यामित्वेंकरून प्रतिव्यष्टीचे ठायीं द्रष्टेपणें स्थित आहे, त्याची क्रीडा वर्णितात,

विश्वपणें उजियेडे । तन्हि विश्वचि देखे फुडें ।
नाहीं तर्‍ही तेव्हडें । नाहींच देखे ॥ १५९ ॥

विश्वाचें असणें नाहीं । विपायें बुडालें तेंही ।
तर्‍ही दशा ऐसीही । देखतचि असे ॥ १६० ॥

हृदयस्थानीं वसणारा द्रष्टा जो तो जाग्रदावस्थाभिमानी विश्वपणें उदयाप्रत आला तरि संपूर्ण विश्व, जगत् चांगलें पाहतो, आणि तेव्हडेंहि विश्व सुषुप्ति अवस्थेंत नाहींसें जालें तरि उत्थित जाल्यावरि न किंचिद्वेदिषामि ऐशा अनुभवें जग नव्हतें या अनुभवातेंच देखे, जाणतो. आणिक समाधिअवस्थेचे ठायीं तरि विश्वनामक अभिमानियाचें असणेंपण जाग्रति आणि विश्वाचें नसणेंपण सुषुप्ति हें असणें-नसणें-पण दोन्हीही नाहींसीं जालीं तरि ऐसी दशा, ह्म० एतावत्कालसमाहितोऽस्मि ऐसी समाधिस्थिति द्रष्ट्रत्वेंकरून परमपुरुष जो तो देखतचि असे.

कापुरा आंथीं चांदिणें । परि तोचि न माखे तेणें ॥
तैसें केवल जें देखणें । ठायें ठावो ॥ १६१ ॥

कापूर तल्लक्षण पुरुष जो त्याचें चांदणें, सर्वद्रष्टेपणेंकरून जें ज्ञान तेणेंकरून तो पुरुष माखला जात नाहीं; तैसें केवल, नुसधें ठायें ठाय म्ह० प्रतिव्यष्टीचे ठायीं जें देखणें तेणेंकरून द्रष्टा जो तो माखला जात नाहीं. कारण जे देखणें हें द्रष्ट्याचें स्वरूपचि होय ह्मणून. आता व्यष्टिसमष्टित्वें परमात्मवर्णन करितात.

किंबहुना ऐसैंसें । वस्तु भलतये दशे ॥
देखतचि असे । आपणयातें ॥ १६२ ॥

किंबहुना, आतां फार काय सांगावें? ऐसैंसें, समष्टीचे ठायीं सर्वद्रष्टा पुरुष आणि व्यष्टीचे ठायीं द्रष्टा या उभय रूपेंकरून परमात्मवस्तु जे ते भलतये दशे म्ह० उत्पत्ति-स्थितिसंहार आणि जागृति स्वप्न सुषुप्ति-तुर्या या अवस्थेच्या ठायीं एकत्वें आणि नानात्वें परमात्मवस्तु आपणातें देखताचि असे. आतां पुरुष जो याचे क्रीडेस मनोराज्याचा दृष्टांत देतात,

मनोरथांचीं देशांतरें । मनिं प्रकाशौनि नगरें ॥
मग तेथें आदरें । हिंडिजे जैसें ॥ १६३ ॥

मनोराज्याचे ठायीं मनाचीं देशदेशांतरें आणि नगरें प्रकाशित करून तेथें मोठे आदरेंकरून हिंडिजे जैसें, तैसा पुरुष जो तो आपले प्रकृतीच्या योगें संपूर्ण-जगत् प्रकाशित करून मोठे आदरेंकरून आंत प्रविष्ट होऊन हिंडतो. अहो, स्वप्नांतील गजतुरगादिक जैसें आरोपित तैसें हें संपूर्ण जगत् आरोपित असेल कीं? यासि उत्तर,

कां दाटला डोला डोलेया । डोलाचि चितारा होउनिया ॥
स्फुरे चोख ह्मणौनिया । विस्मो नाहीं ॥ १६४ ॥

या लागिं एकें चिद्रूपें । आपणिया आपणपें ॥
देखिजे कां आरापे । काय काज ॥ १६५ ॥

जैसें डोळयाचें बुबुळ चितारा ह्म० चित्रविचित्रत्वें पांढरें पिवळें-कर्बुर-काळे-पणेंकरून डोळयाचे ठायीं दाटलें, भरून राहिलें; तैसा पुरुष जो तो प्रकृतियोगें चित्र-विचित्र नानाविध जगद्रूपत्वें आपलेंच परमात्मस्वरूप जें त्याचे ठायीं चोख, चांगले पणें स्फुरे, शोभता जाला, ह्मणोनि विस्मयो नाहीं. तो पुरुष आणि परमात्मा एकचि होय, यालागीं एक चिद्रूपपरमात्मवस्तु जे तेणें आपले ठायीं प्रकृतिपुरुषरूपत्वें आपणातें देखिजेतें, तेव्हां आरोप ह्मणावयाचें काय काज? अन्याचा आरोप अन्यावर होत असतो आणि येथें तरि एक चिद्रूप परमात्माचि सर्वरूपें आहे हा भाव. अहो, चिच्छक्ति, प्रकृति आणि विद्याअविद्यारूप माया ह्या संपूर्ण शक्ति या कांहीं उपाधि नव्हेत ऐसें सांगतात,

कीलेचें पांघरूण । आपजवि रत्नकण ॥
सोनें ले सोनेंपण । जोडजोडूं ॥ १६६ ॥

रत्नकण, तल्लक्षण प्रत्यगात्मचैतन्य जें त्यातें संवित्-रूपा कीळ जे ते कोण्ही आपजविली, पाघरविली आहे काय? पाघरविली नाहीं. आणि सुवर्णरूप परमात्मा जो तो सुवर्णरूपा चिच्छक्ति जे तीतें अंगडीसारिखें जोडजोडूं लेत असे काय? लेत नाहीं.

चंदन सौरभ वेढि । सुधा आपणपा वाढि ॥
गूल चाखे गोडी । ऐसें आथी ॥ १६७ ॥

चंदन तल्लक्षण परमपुरुष जो तो सौरभ्य, सुगंधी, तल्लक्षण भूम्यादि अष्टधा-रूपाप्रकृति जे तीतें वस्त्रासारिखा आपणातें वेढितो काय? आपणातें वेढीत नाहीं. सुधा, तल्लक्षण शुद्धसत्वात्मिका विद्यारूपा माया जे ते आपलें स्वरूप ईश्वर जो त्यातें ब्रह्मविद्यात्वें वाढिती काय, ब्रह्मस्वरूपाचा अनुभव करून देती काय? ईश्वरास नूतन अनुभव करून देत नाहीं. कारण जे तो ईश्वर नित्यमुक्तस्वभाववान् आहे ह्मणून. गूळ तल्लक्षण समष्टि एक जीव जो त्याची अविद्या हेचि कोण्ही एक गोडी तीचे सुखदुःखाचें तो एक जीव सेवन करितो ऐसें आहे काय? ऐसें नाहीं.

कीं उजालाचे कले । कापुरा पूट दीन्हलें ॥
ताऊनि ऊन केलें । अग्नितें काई ॥ १६८ ॥

उजळ चुन्याच्या कळयानें कापुरातें पांढरें व्हावयासाठीं कोण्ही पूट दिल्हें काय? पूट दिल्हें नाहीं. तैसें शुद्ध अंतःकरणाच्या योगेंकरून चिदाभास जो त्याजला शुद्धता आली ऐसें नाहीं. आणि लोखंडास अग्निच्या योगें उष्ण करितात, परंतु अग्नि जो त्यास कोण्ही ताउनी ऊन केलें काय? ऊन केलें नाहीं. तैसें अंतःकरण जें तें चिदाभासयोगें प्रकाशित होतें, परंतु चिदाभासास अंतःकरणाच्या योगेंकरून प्रकाशित्व येतें ऐसें नाहीं. तस्मात् चिच्छक्ति, प्रकृति, विद्या, अविद्या ह्या उपाधि नव्हेत, हे सर्व आत्मप्रभा होय ऐसें जाणावें. आतां संपूर्णरूपें एक परमात्मदृष्टीच होय ऐसें वर्णितात,

ना जैसी लता । आपुलि वेली गुंडालितां ॥
घर करि न करितां । जिया परी ॥ १६९ ॥

ना, अथवा कोण्ही एक लता आपले वेलानें गुंडाळून घर न करितां जैसी करिती, तैसी परमात्म-दृष्टी जे ती भूम्यादि अष्टधा विस्तारातें पाऊन ब्रह्मांडरूप

सृह करून स्थावरजंगमरूपें आपण आंत बसून राहिली. परंतु गृह करून न केल्या-सारिखेंचि होय. कारण जे संपूर्ण एक परमात्मदृष्टीच आहे ह्मणून.

कां प्रभेचा उभला । दीपप्रकाश संचला ॥
तैसा चैतन्यें गिंवसिला । चिद्रूप स्फुरे ॥ १७० ॥

कां, अथवा, दीपप्रकाश जो तो प्रभेनें उभारिला होत्साता संचला असतो. तैसा पुरुष जो तो परमात्मदृष्टिचैतन्यरूपा जी ती करून उभारिला होत्साता चिद्रूपत्वें स्फुरतसे.

ऐसें आपणया आपण । आपुलें निरीक्षण ॥
करावें येणें वीण । करीतचि असे ॥ १७१ ॥

ऐसें, पूर्वी वर्णिलें त्या प्रकारें, परमात्मचैतन्य जें तें पुरुषरूपें आणि ईश्वररूपें-करून आपलें निरीक्षण, पाहणें करण्यावांचून करीतचि असे. आतां कैसें पाहणें करीत नाहीं ह्मटलें असतां चैतन्यरूप अवघा परमात्माचि आहे, तेव्हां अन्यानें अन्यास पाहिल्यासारखें नव्हे. ह्मणून न पाहिलें ऐसेंहि होय.

तैसें देखणें न देखणें । हें अंधारें चांदिणें ।
माजि चंद्रत्वा उणें । स्फुरतें काई ॥ १७२ ॥

तैसें, त्याचि प्रकारें, सृष्टिउपक्रमकाळीं ईक्षणरूपें देखणें आणि प्रळयकाळीं न देखणें हेंचि कोण्ही एक अंधार आणि चांदणें होय. याचे ठायीं चंद्र तल्लक्षण सर्वद्रष्टा पुरुष जो त्यास कांहीं उणेंपण स्फुरत असे काय? उणेपण स्फुरत नाहीं.

ह्मणौनि हें नोहावें । ऐसेंही करूं पावे ।
तर्‍हि तैसाचि स्वभावें । आइता असे ॥ १७३ ॥

परमात्मा जो तो स्वतंत्र आहे ह्मणून हें पुरुषत्व आणि ईश्वरत्व जें तें न व्हावें ऐसें जरी वाटलें तरि स्वभावेंकरून स्वरूपनिद्राकाळीं ह्म० प्रळयकाळासारिखाच परमात्मा जो तो सकळशक्तिरहितत्वेंकरून आइता असे. आतां व्यष्टींतील उपसंहार सांगतात,

जें द्रष्टादृश्य ऐसें । दोन्हींपण अलुमाल दिसे ॥
तेंहि परस्परानुप्रवेशें । कांहीं ना कीं ॥ १७४ ॥

कदाचित् दृश्यद्रष्टृत्व ऐसे जे दोन दिसतात तेही प्रत्यगात्मस्वरूपीं अनुप्रवेशें, प्रवेशातें पावून, परस्परें नाहींसे होतात.

भलतेथें भलतेव्हां । माझारिलिया दृष्टिभावा ।
आटणी करीत खेंवा । येती दोन्ही ॥ १७५ ॥

दृश्यद्रष्टा हे दोन्ही भलतेथें ह्म० नेत्र-कंठ-हृदयमूर्धा यांतील भलते येखादे स्थानीं, भलतेव्हां ह्म० जागृति-स्वप्न-सुषुप्ती-समाधि यांतून कोणते येखादे अवस्थेंत माझारिलिया दृष्टिभावा ह्म० आंतील प्रत्यक्प्रवण वृत्तीतें स्वीकारिलें असतां, दृश्य-द्रष्टा हे दोन्हीही आटणी करीत, प्रत्यगात्मखेंवा ह्म० भेटीस येतात.

तेथें दृश्य द्रष्टा भरे । द्रष्टेपण दृश्यीं सरे ।
दोन्ही नहोनि उरे । दोन्हींचें साच ॥ १७६ ॥

तेथें विचारसमाधिकाळीं नामरूपात्मक दृश्य जें तें द्रष्टयाचे दृष्टीनें कल्पित ह्मणोनि द्रष्टयाचे ठायीं सरे, प्रविष्ट होतें. आणि दृश्यसापेक्षित द्रष्टृत्व ह्मणोनि दृश्य नाहींसें होतांच द्रष्टृत्वहि नाहींसें होतें. ऐसे दृश्यद्रष्टृत्व दोन्ही नाहींसे जाल्यावरि या दोहींचें सत्यस्वरूप प्रत्यक् चैतन्याचि उरतें.

कापुरीं अग्निप्रवेशु । कां आगि घातला पोतासु ।
हा नेणिजे सौरसु । वेंचु जाला ॥ १७७ ॥

कापराचे ठायीं अग्नीचा प्रवेश, कीं अग्नीचे ठायीं पोतासु कापूर जो त्याचा प्रवेश, तैसा द्रष्टा जो तो दृश्यासहित नाहींसा जाला, कीं दृश्य जें तें द्रष्टयासहित नाहींसें जालें, हा नेणिजे सौरसु, हा समारंभ विचारावयाचें कारण नाहीं. द्रष्टा दृश्य या उभयांचा वेच जाला हें मात्र खरें.

एका एक वेंचला । शून्यबिंदु पुसिला ॥
द्रष्टा-दृश्याचा मेला । तैसें होये ॥ १७८ ॥

वजाबाकी करितेवेळीं एकानें एक वेंचून पाटीवरि शून्य बिंदुलें राहतें. मग तेंही शून्य पुसावें जैसें, तैसें ज्ञानियाचें शुद्धस्वरूप भूमाख्य ब्रह्म जें त्याचे ठायीं एक तत्पदार्थ एक त्वंपदार्थ हे निषेधिले. तेव्हां द्रष्टादृश्याचा मेळा जो त्यातें तैसें होय, द्रष्टा-दृश्य जे ते शून्य आहेत ऐसें होतें. मग तेंही शून्य केवलब्रम्हवस्तुयोगें पुशिलें, नाहींसें केलें जातें हा अभिप्राय.

किंबहुना आपुलिया । प्रतिबिंबा झोंबिलिया ॥
झोंबिसकट आटौनिया । जाइजे जेवीं ॥ १७९ ॥

किंबहुना, फार काय सांगावें? जैसा सिंह जो तो आपले प्रतिबिंबास झोंबावयाकरितां सखोल जळांत उडी घालतो, तेव्हां तो सिंह झोंबीसगट आटोनि जातो, नाहींसा होतो. तैसा द्रष्टा जो तो हृद्गुहेच्या ठायीं आपलें प्रतिबिंब चिदाभास जो त्यासि प्रकाशित करून पूर्वी जाणत होता. तोचि द्रष्टा सखोल जळासारिखें केवळ भूमास्वरूप ब्रह्म जें त्याचे ठायीं चिदाभास जीवासी झोंबी खेळावी म्ह० चिदाभासातें प्रकाशन करून जाणावें म्हणून ब्रह्मडोहीं उडी घालिता जाला. तंव झोंबसिकट आटोनि गेला म्ह० जीवत्व आणि प्रकाश करून जाणण्यासहित द्रष्टा जो तो नाहींसा जाला. आतां ब्रम्हानुभवप्रसंगीं मधील दृष्टीच सांडिली असतां द्रष्टा दृश्य दोन्हीही नाहींसे होतात ऐसें वर्णितात,

तैसें रुसतां दिठी । द्रष्टा दृश्य भेटी ॥
येति तेथें मिठी । दोहींची पडे ॥ १८० ॥

पूर्वी सांगितलें त्याप्रकारें दृष्टि, ब्रम्हाकार वृत्ति जे, तीतें रुसलें असतां, सांडिलें असतां, द्रष्टादृश्य हे माघारि प्रत्यगात्मयाचे भेटीस येतात; तेव्हां मिठी दोहींची पडे, द्रष्टा दृश्य दोन्हींही नाहींसे होतात. आतां ब्रम्हाकार दृष्टीचें सोडणें कैसें होतें तें सांगतात,

न मिळतां पूर्वापर । तंवरीचि सरितासागर ॥
मग येकवट नीर । जैसें होये ॥ १८१ ॥

पूर्वसमुद्र, पश्चिमसमुद्र हे वेगळाले आहेत तों पावेतों नद्या ज्या त्या समुद्राप्रत मिळत असतात. मग प्रळयोदक क्षोभाप्रत पावलें असतां नदी-समुद्रांचा भेद न राहतां नीर एकवट होय जैसें; तैसें परमात्मा आणि प्रत्यगात्मा हे भेद आहेत तोंपावेतों दृष्टीचे म्ह० ब्रम्हाकारवृत्तीचे प्रवाह जे ते संप्रज्ञात समाधिकाळीं चालिले असतात, मग पूर्णात्म ब्रम्हविषयीं वस्तुतंत्र बोध जाला असतां म्ह० ब्रह्मवस्तूनें बोधातें गिळिलें असतां दृष्टी जे ती परमात्म-प्रत्यगात्म-भेद-सहित मावळून प्रळयोदकासारिखें अपारावार अवघें केवळ ब्रम्हचि राहतें. हे जीवन्मुक्ति सांगिजेली.

किंबहुना हे त्रिपुटी । सहजें होत राहाटी ॥
प्रतिक्षणीं भेटी । करीतसे ॥ १८२ ॥

किंबहुना, फार काय सांगावें? द्रष्टा-दर्शन-दृश्य हे त्रिपुटी अयत्नसिद्ध सहजीं राहाटी होत असतां क्षणक्षणाचे ठायीं ब्रह्मवस्तुची भेटी करीत असे. कारण जे द्रष्टा-

दर्शन-दृश्य हे संपूर्ण ब्रह्मवस्तूहून वेगळे राहत नाहींत ह्मणून. हे तत्ववेत्याची उघड समाधि होय.

दोन्ही विशेषें गिली । मग निर्विशिष्टा उगली ॥
उघडझापि एक डोळीं । वस्तुचि असे ॥ १८३ ॥

एकसमयावच्छेदेंकरून जें सर्वद्रष्टत्व हाचि कोण्ही एक डोळा जो तो ज्याचा ऐसा जो परमात्मा तो दोन्ही विशेषें ह्म० परमपुरुषरूपत्वें जें जगद्द्रष्टृत्व आणि व्यष्टीचे ठायीं जें द्रष्टृत्व ऐशा उभय विशेषांतें जेव्हां गिळितो, उपरम करितो; तेव्हां मग निर्विशिष्टा उगळितो ह्म० सृष्टिसंकल्पन-काळीं आपले निर्विशेष ब्रह्मस्वरूपाचा अनुभव पोटीं घेऊन होता, ती आपली निर्विशेषता जे ती पुन्हा उगाळिता जाला ह्म० स्वरूपनिद्रा करिता जाला हा भाव. ऐसी एक-डोळी परमात्मवस्तु वारंवार उघड-झाप करिते, आपले पूर्णस्वरूपीं आपला उपक्रमोपसंहार करिते हा अभिप्राय.

पातेया पातें मिळे । किं दृङ्मात्र सैंघ पघळे ॥
तियें उन्मीलितां मावळे । नवलाव कीं ॥ १८४ ॥

सच्चिदानंदलक्षण परमात्मा हाचि कोण्ही एक अलौकिक डोळा त्याचीं जीवेश्वर होचि नेत्रपातीं ते परमात्मयाचे स्वरूप निद्राकाळीं मिळतात, उपरमाप्रत पावतात. तेव्हां सैंघ दृङ्मात्र पघळे, ह्म० सर्वद्रष्ट्याचें सार जें ब्रह्मस्वरूप तें विस्तारातें पावतें. आणि तें जीवेश्वररूप उभय पातीं जे ते परमात्मियानें स्वरूपनिद्राविसर्जनकाळीं उन्मीलतां ह्म० उघडिलीं असतां दृङ्मात्र, केवळ ब्रह्मरूपता मावळती हें मोठें नवलाव, आश्चर्य होय. आतां परमात्मशक्तीचें स्वरूप सांगतात,

द्रष्टा दृश्याचे ग्रासीं । मध्यें लेखु विकासी ॥
योगभूमिका ऐसी । अंगीं वागे ॥ १८५ ॥

ब्रह्मानुसंधानकाळीं ज्ञानी जो याचे दृश्य द्रष्टत्वाचा ग्रास, उपरम, जाला असतां ज्ञप्तिरूपें ज्ञानरूपा कळा राहती. ऐसीच स्वरूपनिद्राकाळीं परमात्मयाचे अंगीं, ठायीं, संपूर्ण योगैश्वर्य दाखवावयाची भूमिका जे ते लेख ह्म० लेशमात्र विकाशातें पावून वागे, वर्तत आहे ऐसें जाणावें. आतां स्वरूपनिद्राकाळीं परमात्मयाचें नुसधें ज्ञान-रूपत्व जें तें वर्णितात,

उठला तरंग बैसे । पुढिल अंशु नुमसे ॥
ऐसे ठायीं जैसें । पाणी होय ॥ १८६ ॥

उदकाचा तरंग उठलेला जो तो खालीं बसला आणि दुसरा तरंग उठणार तो उठला नाहीं, ते ठायीं पाणी जैसें होतें; तैसें परमात्मस्वरूपीं जगद्रूप तरंगाकार दृष्टि उठली होता, त बसून पुनरपि दृष्टि उठावयाचे पूर्वी जे परमात्म स्थिति तें नुसधें ज्ञान होय ऐसें जाणावें.

कां नीद सरौनि गेली । जागृति नाहीं चेइली ॥
तेव्हां होये आपुली । स्थिति जैसी ॥ १८७ ॥

अथवा निद्रा सरून जागृतीस आरंभ जाला नाहीं ऐशा मध्यभागीं आपली स्थिति असती जैसी, तैसी सच्चिदानंद परमात्मा जो त्याची स्वरूपनिद्रा तरि विसर्जन जाली आणि जगन्निर्माणदृष्टि तरि चेवली नाहीं, जागी जाली नाहीं, ते वेळीं परमात्मियाची नुसधी ज्ञानरूपता असती ऐसें जाणावें.

नाना एका ठावौनि उठी । आणि अन्यत्र नव्हे पैठी ॥
हे गमे तैसिया दिठी । दिठी सूतां ॥ १८८ ॥

नाना, अथवा; दिठी सूतां, सूक्ष्म दृष्टीनें पाहिलें असतां; परमात्मियाचें ज्ञानरूपत्व ऐसें गमे, ऐसें वाटतें. जैसी द्रष्ट्याची दृष्टि जे ती एका ठावौनि उठी, एका देशाला सोडोनि माघारी फिरली; आणि अन्यत्र नव्हे पैठी, अन्यत्र देशावरि बसावयासि तरि गेली नाहीं. तैसी परमात्मदृष्टीनें जगदाकार पाहणें सोडून माघारी उपरमातें पावली, आणि दुसऱ्यानें जगदाकार स्थिति पावली नाहीं ऐसी जे संधी ते परमात्मियाची स्वप्रकाश चिद्रूपता जाणावी. आतां निरंजन रघुनाथ जो तो जीवन्मुक्त श्रोत्यांप्रत विनंति करितो जे येथून पांचा वोव्यांचा अर्थ विचार करूं लागलों तेव्हां माझी ब्रह्माकार वृत्ती होऊन मावळून गेली. एक प्रहरभर देहभान राहिलें नाहीं. नंतर मातें ऐसें गमलें जे हा अनुभवामृत ग्रंथ उगाच नव्हे, संपूर्ण देशभाषेनें वोव्या बोलिल्या त्या महामंत्र होत. अस्तु, आतां तुह्मी ब्रह्मस्थितीनें हा अर्थ ध्यानांत आणावा. श्रीज्ञानेश्वर जे ते परमात्मियाचें शुद्ध चिदाकाशस्वरूप वर्णून ज्याचा त्यालाच दृष्टांत देतात,

कां मावळों सरला दिवो । राति न करी प्रस्तावो ।
तेव्हां गगना जो भावो । बाखाणिला ॥ १८९ ॥

दिवस मावळों सरला, अस्तातें पावला; आणि रात्रीचा प्रस्तावो, प्रकार, आला नाहीं. त्या उभय संधीस गगन जैसें प्रकाशरूप असतें, तैसें चिदाकाश जें तें

ब्रह्मांडाचे आंत असुन बाहेर अनंत स्वरूपें आहे आणि जेथें ब्रह्मांडाची प्रतिच्छाया-रूप अंधार नाहीं आणि सूर्यादिकांचा प्रकाश नाहीं तें चिदाकाश परमात्मियाचें स्वप्रकाशरूप होय. म्हणून स्मृतीनें गगनसदृश उपमा देऊन भाव वाखाणिला, वर्णिला. संमतिवासिष्ठ:--एकं ब्रम्ह चिदाकाशं सर्वात्मकमखंडितं। ऐसी परमात्मियाचे शुद्ध स्वरूपाचीच उपमा परमात्मियाचे प्रकाशतेसि आहे हा भाव. आतां सर्व ज्ञानियांमध्यें राजा, स्वस्वराड्ब्रम्हवेत्ता ज्ञानी जो त्याचे विदेहकैवल्यकाळचे आणि स्थितिकाळचे स्वरूपाचा दृष्टांत परमात्मियाचे स्वरूपास देतात,

घेतला श्वास बुडाला। घापता नाहीं उठला।
ऐसा दोहींसि शिवतला। नव्हे जो अंशु॥ १९० ॥
कां अवघाचि करणीं। सर्व विषयांचीं घेणीं।
करितां एके क्षणीं। जें कांहीं असे॥ १९१ ॥
तेयासारिखा ठावो। हा निकराचा आत्मभावो।
आतां येणें हा पाहों। न पाहों लाभे॥ १९२ ॥

देहपातकाळीं प्राणाचें उत्क्रमण होत नाहीं ऐसें श्रुति ज्या तत्वविदाचें वर्णन करिती त्याचा शेवटील घेतला जो श्वास तो बुडाला, विलयातें पावला आणखी पुढील घापता ह्म० पुढें घालावयाचा श्वास उठिलाचि नाहीं. ऐसें जें तत्वविदाच्या प्राणाचें असणें नसणें या दोहींसि शिवतला ह्म० शिवला नाहीं जो चिदंश, अथवा एके क्षणीं अवघ्या इंद्रियेंकरून सर्व विषयांचीं घेणीं करीत असतां जें कांहीं द्रष्टा-दर्शन दृश्य-विवर्जित केवलत्वें ज्ञानियाचें स्वरूप आहे तयासारखा परमात्मियाचा ठावो, वसतें स्थान, केवल ब्रह्मस्वरूप असे. हा निकराचा ह्मणजे शेवटचा आत्मभाव ब्रह्मभाव, होय. आतां ऐसें आहे तेव्हां ज्ञानी जो तो स्वदृष्टीनें आपण आपणांतें पाहो न पाहो, परंतु लाभे, ब्रह्मरूपें आपण आपणांतें नित्यप्राप्त आहेचि. अहो, ज्ञानी जो त्यासि आपलें ब्रह्मस्वरूपत्वेंकरून पाहणें घडतें कीं नाहीं? यासि उत्तर,

काइ आपुलिये भूमिके। आरिसा आपुलें निकें।
पाहों न पाहों सके। ऐसें आथी?॥ १९३ ॥

जैसा आरसा जो तो आपले भूमिके, आपले ठायीं; आपलें निकेंपण काय पाहों शके अथवा न पाहों शके ऐसें आहे काय? आरशास पाहणें न पाहणें दोन्हीही

नाहींत. तैसा ज्ञानी जो याचे द्रष्टा-दृष्टि-विवर्जित प्रत्यगभिन्न शुद्ध ब्रह्मस्वरूप जें तें आपण आपले ठायीं आपलें निकेपण पाहों न पाहों सकत नाहीं. कारण जे पाहणें नाहीं ह्मणून न पाहणेंहि नाहीं हा भाव. अहो, इतकी अडचण कशास सांगतात? ज्ञानी जो त्यास ब्रह्मानुभवचि होत नाहीं ऐसें कां ह्मणानात? यासि उत्तर,

समोर पाठमोरया । मुखें होइजे आपुलिया ।
वांचूनि आरिसया । ठाकी आहे? ॥ १९४ ॥

आपलें मुख जें तें समोर अथवा पाठिमोरें होतें, परतु आरशावांचून समोर अथवा पाठिमोरें व्हावयास ठाकी, स्थिति आहे काय? स्थिति नाहीं. तैसें ज्ञानियाचें स्वरूप शुद्धब्रह्म जें तें समोर अथवा पाठिमोरें होतें, परंतु बुद्धिवांचून समोर अथवा पाठिमोरें व्हावयासि ठाकी, स्थिति आहे काय? स्थिति नाहीं. सारांश, ज्ञानी जो तो शुद्ध बुद्धीनें आपलें ब्रह्मस्वरूप अनुभवितो, परंतु ब्रह्मस्वरूपत्वेंकरून आपण आपणातें पाहत नाहीं हा भाव. अहो, परमात्मा तरि आपण आपणातें पाहत असेल कीं? यासि उत्तर,

सर्वांगें देखणा रवि । परि ऐसें घडे कंवि ॥
जे उदो-अस्तांची चवी । स्वयें घेपे ॥ १९५ ॥

रवि, तल्लक्षण चित्सूर्य-परमात्मा जो तो सर्वांगें देखणा आहे, परंतु ऐसें केंवि घडेल जे ब्रह्मस्वरूपीं आपले उदयअस्ताची चवी आपण स्वयें घेपे, घेईल. कारण जे कोण्हासही आपला उदयास्त पाहणें घडत नाहीं ह्मणून. अहो, परम पुरुष तरि आपला आनंद सेवीत असेल कीं? यासि उत्तर,

रस आपणया पिये । किं तोंड लपौनि ठाये ॥
हें रसपणेंचि नोहे । तेयाजोगें ॥ १९६ ॥

जैसा सुधारस जो तो आपणातें पीत नाहीं आणि प्यावयाकरितां तोंड लपवून राहत नाहीं. तैसा परमपुरुष जो तो आपले आनंदमात्र स्वरूपीं एकरस होतो तेव्हां आनंदरसाचें आस्वादन करीत नाहीं, अथवा आनंदरसाचें आस्वादन न करोनि वेगळाही रहात नाहीं. हें आनंदाचें घेणें न घेणें रसपणें करूनचि पुरुषासि घडत नाहीं. कारण जे आनंदासि आणि पुरुषासि भेद राहिला नाहीं ह्मणून. आतां परमात्म-वर्णन करितात,

तैसें पाहणें न पाहणें । पाहणेंपणेंचि हा नेणें ॥
आणि दोन्हीहि एणें । स्वयें असिजे ॥ १९७ ॥

तैसा, त्याचि प्रकारें, सर्वांसि पाहणारा ज्ञानस्वरूप परमात्मा एकाचि आहे ह्मणून जगत्सर्जनरूप पाहणें आणि जगद्विसर्जनरूप न पाहणें हे दोन्हीही तो पृथक्त्वें जाणत नाहीं. आणि जगत् उपक्रम-संहार या उभय अवस्था ज्या त्या परमात्मयाच्याच आहेत ह्मणून पाहणें न पाहणें हे स्वयें येणेंचि असिजे.

जें पाहणेंचि ह्मणौनिया । पाहणें नोहे आपणया ॥
तैं न पाहणें आपसया । हाचि आहे ॥ १९८ ॥

संपूर्ण जगतासुद्धा पाहणेंचि, ज्ञानचि आहे ह्मणून ज्ञानरूप परमात्मा जो त्यास आपणातें पाहणें म्ह० भिन्नत्वेंकरून जाणणें होत नाहीं. आणि स्वरूपनिद्राकाळिंचें न पाहणें जें तेंही आपसया हा परमात्माचि आहे.

आणि न पाहणें कैसें । आपणपें पाहों बैसे ॥
तरि पाहणें ऐसें । हाचि पुढतीं ॥ १९९ ॥

ज्ञानरूप परमात्मा जो तो आपलें न पाहणें कैसें आहे हें आपले ठायीं पाहूं बैसेल जरि, तरि पुढती पाहणेंपण याजकडेचि येईल. याजकरितां पाहणें न पाहणियास बाध द्यावा हा अभिप्राय.

हे दोन्ही परस्परें । नांदती एकें हारें ॥
बांधौनि येरयेरें । नाहीं केलीं ॥ २०० ॥

पाहणया पाहणें आहे । तन्हि न पाहणेंहि हा नोहे ॥
ह्मणौनि एयाची सोये । नेणती दोन्ही ॥ २०१ ॥

एवं पाहणें न पाहणें । चोरौनि एया असणें ॥
ना पाहिलें तन्हि कवणें । काय पाहिलें ? ॥ २०२ ॥

पाहणें आणि न पाहणें हे दोन्ही एकावळीचेंचि होत. न पाहण्याचे अपेक्षेनें पाहणें आणि पाहण्याचे अपेक्षेनें न पाहणें ऐसे हे परस्परें येरयेरांची आकांक्षा करून आहेत. आणि परमात्मियाचे शुद्धब्रह्मस्वरूपीं हे दोन्ही नाहींत ह्मणोनि बाधित ह्म० मृषा केलीं. कां बाधित केलीं म्हटलें असतां या हेतूस्तव:—ज्ञानस्वरूप परमात्मा

पाहणें जरि होईल तरि न पाहणेंहि हा परमात्मा नव्हे काय ? म्हणोनि याची सोय नेणती दोन्ही. एवं, या प्रकारें, पाहणें न पाहणें चोरोनि ज्ञा० यावांचून ज्ञानरूप परमात्मियाचें असणें आहे ऐसें जाणावें. अथवा आपले आविर्भाव तिरोभाव परमात्मियानें पाहिले तरि तें कोण्हें काय पाहिलें? तें न पाहिल्यासारिखेंचि होय हा सिद्धांत. ऐसें सिद्धांतिवाक्यें ऐकून आतां चक्षूनें पाहिलेलें सत्य मानणारा प्रत्यक्षप्रमाणवादी बोलतो,

दिसत्यानें दृश्य भासे । तेया नावं देखिलें ऐसें ॥
तऱ्हीं दृश्यास्तव दीसे । एसें नाहीं ॥ २०३ ॥

अहो ज्ञानोबा, प्रत्यक्ष जगत् दिसत असतां तुह्मी ह्मणतां जे न पाहिल्यासारखें होय. तरा ऐसें ह्मणूं नये. आमचा सिद्धांत ऐसा जे दिसत्यानें, दृष्टीनें दृश्य भासतें त्याला देखिलें ऐसें ह्मणावें. अस्तु, दृश्यमान जगत् हें सत्य आहे. यासि सिद्धांती उत्तर विस्तारपूर्वक देतात. जरि दिसलें तरि दृश्यास्तव दिसतें ऐसें घडत नाहीं.

दृश्य कीर दृष्टी दिसे । परि साच द्रष्टा असे ॥
आतां नाहीं तेथ कैसें । देखिलें होय ? ॥ २०४ ॥

मुख दिसो कां दर्पणीं । परि असणें तेया मुखपणीं ॥
तऱ्हि जाली ते वायाणी । प्रतीती कीं ! ॥ २०५ ॥

जैसें मुख जें तें दर्पणाचे ठायीं दिसलें तरि मुखाचे ठायीं त्यास असणें आहे. तैसा द्रष्टा जो तो बुद्धीचे ठायीं चिदाभासत्वें दिसला तरी सर्वद्रष्टा पुरुष जो तो पुरुषपणींच आहे. तरि कर्तृ-भोक्तृत्वेंकरून प्रतीति जाली, तें काय ह्मटलें असतां वायाणी, व्यर्थ होय. अहो, सर्वद्रष्टा पुरुष आपलेपणातें विसरला नाहीं आणि व्यष्टीतील द्रष्टा जो तेणें आपणातें विसरावयाचें कारण काय? यासि विसरावयाचा हेतु सांगतात,

देखतांचि आपणयातें । आलिया निद्रेचेनि हातें ॥
तेया स्वप्नाऐसें येथें । निहालिजे ॥ २०६ ॥

पूर्वी आपल्यातें देखत असतां निद्रा आल्याच्या योगेंकरून पूर्वस्वरूप प्राणी विसरतो, तैसा व्यष्टीचे ठायीं परम पुरुष जो तो आपला डावा हात अविद्या जे तिच्या योगें आपलें पूर्व द्रष्टृरूपत्व विसरला आणि स्वप्नांत जैसा प्राणी एक असतां आप-

णातें अनेकत्वेंकरून पाहतो तया स्वप्नासारिखें येथें व्यष्टि देहाचे ठायीं द्रष्टा जो एणें आपणांतें विश्व-तैजस-प्राज्ञत्वेंकरून न्याहाळिजे, पाहिजेतें. आतां वेदांत एकदेसी मायावादी जो तो बोलतो,

निद्रिस्तु सुखासनीं । वाहिला अन्य वाहनीं ।
तैसाच किं तेसणी । पावला दशा ॥ २०७ ॥

ते निद्रा जेव्हां नाहीं । तेव्हां तो ठायींचे ठायीं ।
तैसाचि स्वप्निं कांहीं । न दाविजे ॥ २०८ ॥

अहो ज्ञानोबा, हें आमचे मायेचें सामर्थ्य कैसें आहे पहा! जैसा निद्रिस्त राजा सुखासनीं निजला असतां निद्रेच्या योगें अन्य वाहनीं वाहिला ह्म० अन्य प्रवाहीं पडला; तें स्वप्न लटिकें; परंतु तेसणी दशा, तेवढी स्वप्नावस्था तरि खरेंपण पावलाच कीं. तैसा जो द्रष्टा तो हृद्गुहेचे ठायीं अनादि अविद्यायोगें आपणांतें विसरून अन्य प्रवाहीं पडला, जीवत्वातें पावला, आणि तेसणी दशा, तेवढी बद्ध अवस्था पावला, ती साच मानिता जाला. आणि ते निद्रा नाहींसी होती तेव्हां तो आपणातें ठायींचे ठायीं पाहतो त्याप्रकारें स्वप्नाचे ठायीं आपणातें पाहत नाहीं. तैसा साधिष्ठान जीव जो तो अविद्या निवृत्त जाल्यानंतर विद्येच्या योगेंकरून ठायींचे ठायींच ह्मणजे आपणांतें द्रष्टृत्वेंकरून पाहतो, त्याप्रकारें अविद्याकाळीं आपणातें मुक्तत्वेंकरून पाहत नाहीं. सारांश बद्ध- मुक्त-व्यवस्था मायेस्तव होय ऐसा आमचा निर्धार असे. आतां मायावादी जो याजला सिद्धांती उत्तर देतात,

कीं सिसेंवीण एकें । राज्य करीति रंकें ॥
देखिलें तैसें सतुकें । आथी काई ॥ २०९ ॥

अरे मायावादी, तूं ह्मणतोस हें घडत नाहीं कीं. कोणेंही एक रंक, कृपण दरिद्री, होता; तेणें ऐसें स्वप्न पाहिलें जे युद्धांत आपलें मस्तक तुटोनि गेलें आणि शिसेंवीण आपण राज्य करितों. तैसा चिदाभास जो तो कृपण दरिद्री एक देहपुरीरूप खेड्यांत राहणारा, त्याचा विचारप्रकरणीं नाश जालेला, ऐसें असतां, मुक्तरूपत्वें आत्मसाम्राज्य आपणातें पाहतो तें स्वप्न होय. तेणें देखिलें तैसें सतुकें ह्म० देखिल्यासारिखें ज्ञान अज्ञानें हे दोन्ही खरे आहेत काय? खरे नाहींत. तस्मात्

ती मुक्तता स्वप्नतुल्य होय हा भाव. आतां जीवास विषयेंकरून बद्धता वाटते तेहि खोटी होय ऐसें सांगतात,

तान्हेलया मृगतृष्णा । न भेटतां सीणु जेसणा ॥
मा ते भेटालिया कवणा । काइ भेटिलें ? ॥ २१० ॥

तृषाक्रांत जालेलें हरिण जें त्यास मृगजल न भेटतां जेसणा, जेवढा, शीण होय, तेवढाचि सीण मृगजळ भेटलें असतां होतो. तैसा स्वर्गादिक विषयोपभोग-तृष्णा करणारे जे जीव त्यांस विषयप्राप्तीकरितां यज्ञादि-साधनरूप जेवढा शीण होतो, तेवढाचि शीण स्वर्गादि-विषय-प्राप्ती जाल्यानंतर क्षयिष्णुत्वादि दोषांस्तव होतो. अस्तु, तैसेही मृगजळासारिखें विषय भेटले तरि कोण्हास काय भेटलें ? भोक्ता जीवहि मिथ्या आणि विषयहि मिथ्या होत. तस्मात् बद्धता तूं मानितोस ती खोटी होय. आतां द्रष्टा जो त्यास जीवत्वाचि होत नाहीं ऐसें सांगतात,

कीं साउलिचेनि व्याजें । मेळविलें दुजें ॥
तेयाचें करणें वांझें । जालें जैसें ॥ २११ ॥

अरे मायावादी, द्रष्ट्यासि तुवां जीवत्व मानिलें तें घडत नाहीं, तुजसारिखा एक शहाणा होता तेणें आपले सावलिचें व्याज, मिष, करून ग्रामांतरास जावयास सोबतीस दुजे मेळविले, त्याचें करणें जैसें वांझें, व्यर्थ जालें, तैसें चिच्छायेच्या योगें द्रष्टा जो त्यास जीवत्व मानून अवस्थांतर कल्पून बद्धमुक्तत्व मानणें तुझें व्यर्थ जालें.

तैसें दृश्य करौनिया । द्रष्ट्यातेंचि द्रष्टया ।
दावोनि धाडिलें वाया । दाविलेंपणही ॥ २१२ ॥
जे द्रष्टा तो द्रष्टाचि आहे । मा दावणें काइसें वाये ।
न दाविजे तऱ्हि तो नोहे । तेया काई ॥ २१३ ॥

तैसें, त्याचि प्रकारें, विवेकवती बुद्धिरूपा माया जे तीणें नामरूपात्मक दृश्य जें त्यातें वेगळें करून, द्रष्ट्याचें स्वरूप द्रष्ट्याला दाखवून, दाविलेंपणही वाया दवडिलें कारण जे विवेकवती बुद्धिरूपा माया जे तिणें दाखविल्याचे पूर्वीं द्रष्टा जो तो द्रष्टाचि आहे. कधींहि दृश्य जालाचि नाहीं. मग दाखवणें कायसें वाये, व्यर्थ ? अस्तु, त्या मायेनें द्रष्ट्याचें अस्तिकत्व द्रष्ट्याला न दाखविलें तरी त्याजला तो

नव्हे काय ! द्रष्टा आपला आपण आहेच आहे. आतां वेदांतैकदेशी मायावादी पुनरपि आक्षेप करून बोलतो,

आरिसा पाहों न रहे । तऱ्हिं मुखचि वाया जाये ।
ना तेणेवीण आहे । आपणपें कीं ॥ २१४ ॥

अहो ज्ञानोबा, सुरूप आहे तेणें आरश्याचें योगें आपलें मुख जरी न पाहिलें तरी तें मुखाचें चांगुलपण वाया गेल्यासारिखें होतें. त्या प्रकारें द्रष्टा जो तो आपले ब्रह्मस्वरूपत्व जें त्यातें आरशासारिखी शुद्धबुद्धि जे तीणेंकरून चांगलें स्पष्टरूपत्वें न पाहील तरि निरतिशयानंदत्व आणि भूमास्वरूपत्व असतांचि वाया गेल्यासारिखें होईल कीं? आतां सिद्धांती उत्तर देतात. ना, तैसें नव्हे, तत्वज्ञान जें तेणेंविण द्रष्टा जो तो ब्रह्मरूपत्वें आपले ठायीं आपण आहेच कीं !

तैसी आत्मयातें आत्मया । न दावीचि पैं माया ।
तऱ्हिं आत्मा वावो, कीं वाया । तेचि कीं ना? ॥२१५॥

त्या प्रकारें परमात्मियाचें शुद्ध स्वरूप जें तें जीवात्म्यातें बुद्धिरूपिणी माया जे ती न दाखवील तरी आत्मा वावो, मिथ्या, कीं माया मिथ्या हें विचारून पाहे बरें! अरे मायावादी, ऐकतोसि, आत्मा मिथ्या होत नाहीं, परंतु मायाचि वाया, व्यर्थ होती कीं.

म्हणौनि आपणपें द्रष्टा । न करितां असे पैठा ।
आतां जालाचि पां दिठा । कां करावा ? ॥२१६॥

द्रष्टा जो तो आपणपें असे पैठा, आपले ठायीं आपण स्थित आहे; म्हणोनि बुद्धिवृत्तीनें दिठा, दिसता जालाचि पां ऐसा कशास करावा? अहो श्रुतीचें वचन ऐसें आहे जे येथेंचि जाणेल तरि सत्य आहे आणि येथें न जाणेल तरि मोठा नाश आहे; आणि दुसरी श्रुति सांगती जे अग्रबुद्धीनें आत्मा दिसतो. अस्तु, अज्ञानी जो त्याणें ब्रह्मवस्तू जाणल्यावांचून मूळ अविद्या निवृत्त होऊन मुक्तता कैसी घडेल? आतां सिद्धांती बोलतात,

ना मानुं तें दाखिलें । तऱ्हीं पुनरुक्त जालें ॥
एणेंही बोलें गेलें । दाविणें वृथा ॥ २१७ ॥

ना, अथवा, तू श्रुतिसंमतें बोलतोस तेव्हां तें आह्मी मानूं, परंतु अन्यश्रुति द्विवार सांगती जे विमुक्तासि मुक्त करिजेतें. या श्रुतीचे बोलेंकरून मायेनें आत्म्याचें पूर्वसिद्ध स्वरूप आत्म्याला दाखवून मुक्त करणें हें वृथा गेलें, फोल जालें. कारण जे ज्ञानी जो तो आपणातें पूर्वसिद्ध मुक्तरूपें पाहतो ह्मणून. आतां दोनसें-तिसरे वोवीचे ठायीं 'दिसत्यानें दृश्य दिसे' ऐसे प्रत्यक्षप्रमाणवादी चार्वाक बोलिला होता, त्यास उत्तर देत असतां मधींच मायावादी उठला. त्यास निरस्त करून पुनरपि प्रत्यक्षप्रमाणवादी चार्वाक जो त्यासि सिद्धांती बोलतात,

दोरा सर्पाभासा । साचपणें दोर जैसा ॥
द्रष्टा दृश्या तैसा । द्रष्टा साच ॥ २१८ ॥

अरे चार्वाक, तुझे मतीं द्रष्ट्याचे दृष्टीचा परिणाम हें जगत् होय. तरि ऐसें नाहीं. वेदांतास संमत विवर्तवाद त्याचा प्रकार सांगतों तो ऐक. दोर आणि सर्पाभास हे दोन वाटतात, परंतु खरेंपणें दोर जैसा आहे, तैसा द्रष्टा आणि दृश्य ऐसे दोन वाटतात, परंतु द्रष्टा जो तोचि साच, खरा, होय. आतां प्रत्यक्षप्रमाणवादी चार्वाक जो तो बोलतो,

दर्पणें आणि मुखें । मुख दिसे हें न चुके ॥
परि मुखीं मुख सतुकें । दर्पणीं नाहीं ॥ २१९ ॥

अहो दर्पण आणि मुख हें दोनी एकत्र जालीं असतां मुख दिसल्यावांचून राहत नाहीं. तैसे बुद्धि आणि आत्मा एके ठायीं असतां चिदाभास होण्याविषयीं चुकावयाचें नाहीं कीं. आतां सिद्धांती उत्तर देतात. जरि चिदाभास दिसला तरि जैसें मुखाचे ठायीं खरेपणें मुख असतें; सतुकें, त्या प्रकारें सत्यत्वें दर्पणीं नाहीं. तैसा द्रष्ट्याचे ठायीं खरेपणेंकरून द्रष्टा आहे त्या प्रकारें बुद्धीचे ठायीं प्रतिबिंबाला तो खरा नाहीं, उगाच आभासमात्र होय.

तैसा द्रष्टा दृश्य दोहीं । साच किं देखता ठावो ॥
ह्मणौनि दृश्य तें वावो । देखिलें जर्‍हि ॥ २२० ॥

जैसा द्रष्टा सत्य आणि चिदाभास मिथ्या, तैसा द्रष्टा आणि दृश्य हे दोन वाटतात, परंतु देखता ठाव, द्रष्टा जो तो, साच आहे ह्मणोनि दृश्य जरि देखिलें

तरि वाव, मृषा, होय. आतां प्रत्यक्षप्रमाणवादी जो तो आपली प्रतिज्ञा सोडून उगेंचि कांहीं बोलावें ह्मणून बोलतो,

वावो कीर होये । परि दिसत तवं आहे ।
एणेंहि बोलें हों ये । देखिलें ऐसें ॥ २२१ ॥

अहो ज्ञानोबा, तुह्मी ह्मणतां त्याप्रमाणें हें दृश्य वाव कीर होये, मिथ्या [illegible], परंतु दिसत तवं आहे कीं ? व्यवहारप्रसंगीं लोकास लोक पुसतात कीं, तुजला घट दिसतो काय ? तो ह्मणतो, म्यां प्रत्यक्ष घट देखिला. येणेंहि बोलें होय, दृश्य देखिलें ऐसें. आतां व्यवहार आणि शास्त्र हे दोन्हीही पोटीं घेऊन सिद्धांती परमात्मवर्णन करून सांगतात,

जन्हिं आन आनातें । देखौनि होय देखतें ।
तन्हिं मानों यतें । देखिलें ऐसें ॥ २२२ ॥
येथें देखौनि कां न देखौनि । ऐक्य किं नाना होउनि ।
परि हा वांचौनि । देखणें असे ॥ २२३ ॥

अरे प्रत्यक्षप्रमाणवादी, ऐकतोस ? जरि अन्याप्रत देखोनि देखतें होतें, तरि तूं ह्मणतोस देखिलें ऐसें तें मानितां येतें. परंतु येथें परमात्मविलासाचे ठायीं ऐसें आहे जे व्यष्टीचे ठायीं जागृतावस्थाकाळीं दृश्य देखोनि कां सुप्तावस्थाकाळीं दृश्य न देखोनि अथवा समष्टिरूपें उपसंहारत्वें ऐक्य होउनि कीं उपक्रमकाळप्रसंगी नाना होउनि आहे, परंतु हा परमात्मा जो यावांचून देखणें आहे काय ? परमात्मियावांचून देखणी दृष्टि नाहीं हा भाव. आतां द्रष्ट्यास बुद्धीची अपेक्षा नाहीं जैसी तैसी परमपुरुषासही मायेची अपेक्षा नाहीं ऐसें वर्णितात,

आरिसेनि हो कां दाविलें । परि मुखेंचि मुख देखिलें ।
तो न दावि तान्हीं संचिलें । मुखीं मुख ॥ २२४ ॥
तैसें दावितें जन्हि नाहीं । तन्हि हाचि येया ठायीं ।
ना दाविलें तन्हींहि । हाचि येया ॥ २२५ ॥

आरशानें मुख दाखविलें, परंतु मुखानेंच मुख देखिलें आणि आरशानें मुख न दाखविलें तरी मुखींच मुख संचलें असतें. तैसा बुद्धीनें द्रष्ट्याला चिदाभास

दाखविला तरी द्रष्टयानेंचि पाहिला जातो आणि चिदाभास बुद्धीनें न दाखविला तरी द्रष्टयाचे ठायीं द्रष्टा संचला असतो. त्या प्रकारें पुरुषाला दाखविणारी माया जे ते उपसंहारकाळीं जरी नाहींसी जाली तरी हाचि यया ठायीं, अथवा मायेनें उपक्रमकाळीं परम पुरुष जो तो ईश्वरत्वेंकरून दाखविला तरीही हाचि यया, आपण आपणातें आहे हा भाव. आतां ईश्वरत्व नसून पुरुषाची स्थिती वर्णितात,

जागृतीनें दाविला । कां निद्रा हारविला ।
परि जैसा एकला । पुरुष पुरुषीं ॥ २२६ ॥

चिदाभास जीव जो तो जागृतीनें प्रकट करून दाखविला किंवा सुषुप्तीनें हारविला जातो. परंतु द्रष्टयाचे ठायीं द्रष्टा ज्या प्रकारें असतो, त्या प्रकारें ईक्षणकाळीं ईश्वर प्रकट होतो आणि ईक्षणकाळ उपरमकाळीं हारविला जातो, परि द्रष्टा पुरुष आपले ठायीं एकला असतो. आतां मायेचा उपयोग अंतरात्मियास नाहीं ऐसें वर्णितात,

कां रायातें रावो । ऐसा दाविजे प्रत्ययो ।
तऱ्हीं ठाये ठावो । राजाचि तो ॥ २२७ ॥

ना रायपण राया । न आणिजे प्रत्यया ।
तऱ्हि कायि उणें तेया । माजीं असे ? ॥ २२८ ॥

कोण्ही दुसऱ्यानें राजास तूं राजा आहेस ऐसा प्रत्यय आणून दिल्हा तरी तो आपले ठायीं राजाच आहे. अथवा कोण्ही राजास राजेपणाचा प्रत्यय आणून दिला नाहीं तरी त्याचे राजेपणांत काय उणें आहे ? तैसी माया जे इणें अंतरात्म्यास तूं परमात्मा आहेस ऐसा प्रत्यय आणून दिल्हा तरी तो आपले ठायीं परमात्माचि आहे अथवा माया जे इणें अंतरात्म्यास परमात्मपणाचा प्रत्यय आणून दिल्हा नाहीं तरी त्याचे परमात्म पणातें काय उणें आहे ? कांहीं उणेपणा नाहीं हा भाव.

तैसें दावितां न दावितां । हा एयापरौता ।
वढे ना तुटे आइता । असतचि असे ॥ २२९ ॥

त्याप्रकारें हा परमात्मा जो तो दृष्टि जे ईणें उपक्रमकाळीं अनेकत्वेंकरून दाखविला, अथवा उपसंहारकाळीं अनेकत्वें न दाखविला तरि हा परमात्मा यया उपक्रम-उपसंहारापरोता, वेगळा, असून चढे ना तुटे आइता असतचि असे.

अथवा निमित्त वसें । हाचि एया दावो बैसे ।
देखतें नाहीं तैं आरिसे । देखावे कवणें ? ॥ २३० ॥

अथवा जीवेश्वराचें निमित्त करून हा परमात्मा आपण आपणातें नानात्वेंकरून दाखवावयास प्रवृत्त जाला तरि आपणचि आहे. अहो, माया आणि बुद्धिचे योगें जीवेश्वरास नानात्व पाहणें घडतें कीं? यासि प्रतिबंदिरूप उत्तर देतात. परमात्मियाचे स्वरूपनिद्राकाळीं देखता, सर्वद्रष्टा, परमपुरुषचि नाहींसा होतो, तेव्हां आरशासारिख्या, माया आणि बुद्धि यांतें देखावें कोणें? त्या काळीं जीवेश्वर जे तेही विलयास जातात. आतां परमात्मा जो तोचि संपूर्ण निमित्तासि हेतुभूत होय ऐसें व्यतिरेक-अन्वयें वर्णितात,

दीपु दावितयातें रचि । कीं तेणें सिद्धि दीपाची ।
तैसी सत्ता निमित्ताची । एणेंचि साच ॥ २३१ ॥

दीप तल्लक्षण चिदाभास जो त्यातें दाविता, प्रकाशित करिता, जो द्रष्टा त्याजप्रत चिदाभास रचितो, उभारणी करितो, कीं द्रष्टा जो तेणें सिद्धि दीपासारिखा अल्पप्रकाश जीव जो त्याची? ऐसा विचार केला असतां द्रष्टा जो त्यायोगेंकरून चिदाभास जीवाची आस्तिक्यता सिद्ध होय. तैसी ईश्वरत्वनिमित्ताची सत्ता, आहेपण, परमपुरुष जो येणें साच, खरी होय. आतां पुरुषाची सत्ता प्रकृतीस होय ऐसें वर्णितात,

वन्हीतें वान्हिशिखा । प्रकाशी कीर देखा ।
परि वान्हि न होनि लेखा । येईल काई ? ॥ २३२ ॥

वन्हि तल्लक्षण परमपुरुष जो त्याची शिखा तल्लक्षण प्रकृति जे ती पुरुषातें प्रकाशित करिते खरी, परंतु पुरुष वन्हि जो त्यावांचून लेखा येईल काई? ह्मणणेंत येणार नाहीं हा भाव.

ह्मणौनि स्वयंप्रकाशा एया । आपणपें देखावया ।
निमित्त हा वांचौनिया । नाहींच मा ॥ २३३ ॥

विद्या अविद्यारूप माया जे ती प्रकृतीचा अंश आणि प्रकृति जे ती चिच्छक्तीचा अंश आणि ते दृष्टिरूपा चिच्छक्ति जे ती परमात्मा जो त्याची अभिन्न प्रभा होय. ह्मणोनि स्वप्रकाश परमात्मा जो याजला आपणातें अनेकत्वें देखावया निमित्त आपणावांचोनिया नाहींच मा!

आणि निमित्त जें बोलावें । तें एणेंचि असौनि दावावें ।
देखिलें तर्‍हिं स्वभावें । दृश्यही हा ॥ २३४ ॥

आणि माया ईश्वर आणि प्रकृतिपुरुष हे निमित्तें जे जे बोलावीं ते ते या परमात्म्यानेंच असोनि दाखवावीं. स्वभावें देखिलें तरि, सहज रीतीनें विचार करून पाहिलें तरि स्थावरजंगमात्मक संपूर्ण दृश्यही हा परमात्माचि होय.

भलतेनि विन्यासें । दृश्यपणें दीसे ।
हावांचौनि नसे । एथ कांहीं ॥ २३५ ॥

भलतेनि विन्यासें, विस्तारें जरि दृश्यपणें दिसलें तरि येथें या जगताचे ठायीं हा परमात्मा जो यावांचून कांहीं एक नाहीं हा सिद्धांत. अहो, संपूर्णरूपें परमात्माचि जाला ऐसें ह्मटलें असतां परिणामवाद येऊं पाहतो कीं ? यासि विवर्तवादेंकरून दृष्टान्त देऊन सांगतात,

लेणें आणि भांगारें । भांगारचि एक स्फुरे ।
कां जेथें दूसरें । नाहीं ह्मणौनि ॥ २३६ ॥

लेणें आणि भांगारें, सुवर्ण आणि अळंकार, हे दोन्ही एक सुवर्णचि स्फुरतें; तैसें जगत् आणि अधिष्ठानभूत परमात्मा या उभयपदार्थत्वें एक परमात्माचि स्फुरतो. कां जें दूसरें नाहीं ह्मणोनि. आतां परमात्मियाचे शुद्ध भूमास्वरूपीं हें संपूर्ण जगत् नाहीं ऐसें वर्णितात,

जळ तरंगीं दोहीं । जळावांचौनि नाहीं ।
ह्मणौनि आन कांहीं । दिसे ना नसे ॥ २३७ ॥

समुद्राच्या वर्‍हील भागाचें जळ आणि त्यावर्‍हील तरंग हे दोन्ही तळचे न हालवलेल्या जळावांचून नाहींत. तैसें विवर्तभूत जगत् आणि अधिष्ठानभूत परमात्मा हे दोन्हीही भूमास्वरूप ब्रह्म जें त्यावांचूनि नाहींत. हें संपूर्ण निश्चयेंकरून ब्रह्मचि होय, जगत् नाहीं, ऐशा श्रुतीच्या अभिप्रायेंकरून केवल अन्वय सांगिजेला.

आतां ब्रह्माचे ठायीं नाना नास्ति ऐशा श्रुतिअभिप्रायें केवल व्यतिरेकें वस्तु वर्णून चिच्छक्ति आदिकरून संपूर्ण जगताचा बाध सांगतात; केवल भूमास्वरूप संपूर्ण शक्तिचक्राहून वेगळें ब्रह्म जें त्याचे ठायीं चिच्छक्ति आदिकरून दिसत नाहींत, ह्मणून परमात्मियाचे ठायीं अन्य कांहीं दिसे ना नसे. आतां पुरुष जो तो शुद्ध ब्रह्मचि आहे ऐसें कापुराचे दृष्टान्तानें वर्णितात,

हो कां घ्राणानुमेयो । येवो कां हातीं घेवों ।
लाहो कां दिठीं पाहो । भलेतैसा ॥२३८॥

परि कापुराचे ठायीं । कापुरावांचौनि नाहीं ।
तैसें भलतिया रीती पाहीं । हाचि एया ॥२३९॥

जैसा कापूर जो तो घ्राणेंकरून अनुमेय असो, किंवा हातानें घेतां येवो, कां भलतैसा दृष्टीनें पाहतां येवो, परतु कापुराचे ठायीं कापुरावांचूनि नाहीं, तैसा पुरुष जो त्यास कोण्ही जगताहून अनुमिति, अनुमान करोत, अथवा साकारत्वें मानून घेवोत, कां डोळियांनें भलतैसे पाहोत; परंतु संपूर्ण जगताचे ठायीं पुरुषावांचून कांहीं नाहीं, ह्मणून भलतया रीती पाहिलें असतां हाचि यया.

आतां दृश्यपणें दिसो । कां द्रष्टा होऊनि असो ॥
परि हावांचौनि अतिसो । नाहीं येथें ॥ २४० ॥

आतां ऐसें आहे, तेव्हां हा पुरुष जो तो नामरूपात्मक दृश्यपणें करून दिसला तरि दिसो, अथवा त्याचा द्रष्टा होऊनि असो; परंतु या संपूर्ण जगताचे ठायीं पुरुष जो त्या वांचून कोणताचि अतिशय, अधिकपणा, नाहीं, ऐसें पुरुषसूक्तेंकरून वेदही सांगत आहे. आतां चिच्छक्ति आणि प्रकृति ज्या यांजला बाधासामानाधिकरण्येंकरून ब्रह्मरूपत्व सांगतात,

गंगा गंगापणें वाहो । कां समुद्र होंनि राहो ॥
परी पाणीपणा नहो । आणिक तें ॥ २४१ ॥

चिच्छक्तिरूपा गंगा जे ती गंगापणें ह्म. अनेक दृष्टिरूपें प्राक्प्रवणत्वें वाहो, अथवा प्रत्यक्प्रवणत्वेंकरून चित्समुद्रपरमात्मरूप होवोनि राहो; परंतु पाणीपण ह्म. तिचें ब्रह्मरूपत्व नोहे आणिक तें, अन्यथा होत नाहीं.

थिजावें कीं विघरावें । हें अप्रयोजक आघवें ।
घृतपण नव्हे । अनारिसें ॥२४२॥

जैसें थिजणें विघरणें तुपाचें दिसलें तरि तें अप्रयोजक, व्यर्थ होय, परंतु घृतपण अनारिसें, अन्यथा होत नाहीं. तैसें प्रकृतीचें साकारत्व आणि निराकारत्व हे दोनीही व्यर्थ होत, परंतु घृतासारिखें तीचें सारभूत ब्रम्हरूप जें तें अन्यथा होत नाहीं. आतां माया आणि ईश्वर या उभयाचें एकत्वेंकरून ब्रम्हरूपत्व जें तें वर्णितात.

ज्वाला आणि वन्हि । न लेखिजेति दोन्ही ॥
वन्हिमात्र ह्मणौनि । आन नाहीं ॥ २४३ ॥

ज्वाला, तल्लक्षण माया, आणि वन्हि तल्लक्षण ईश्वर दोन्ही भिन्न न लेखिजेति. कारण जे वन्हिमात्र, प्रकाशमात्र, केवल ब्रह्मचि आहे ह्मणून. माया आणि ईश्वर हे अन्य नाहींत. आतां दृश्य आणि द्रष्टा जे यांसहि ब्रह्मत्व सांगतात,

तैसें दृश्य कां द्रष्टा । इया दोन्ही दशा वांजटा ॥
पाहतां एकटा । स्फूर्तिमात्रातें ॥ २४४ ॥

तैसें, त्याचि प्रकारें दृश्य आणि द्रष्टा या प्रकृतिपुरुषाच्या दोन्ही दशा, अवस्था ज्या त्या वांजटा, व्यर्थ होत. कारण जे एक स्फूर्तिमात्र ह्म० एक अद्वितीय ब्रह्म जें त्यातें पाहिलें असतां अन्य कांहीं नाहींच ह्मणून. आतां चिच्छक्तिपासून संपूर्ण जगतास बाधासामानाधिकरण्येंकरून ब्रह्मरूपत्व सांगतात,

इये स्फूर्तीचियाकडौनि । नाहीं स्फूर्तिमात्र वांचौनि ॥
तरि कवण काय देखौनि । देखतसे ॥ २४५ ॥

परमात्मियाची स्फूर्ति, चिच्छक्तिरूपा दृष्टि जे, इजकडून, ह्म० मूळापासून दृश्यपर्यंत विचारून पाहिलें असतां स्फूर्तिमात्र, केवळ ब्रह्म जें त्याजवाचून कांहीं एक नाहीं ह्म० स्फूर्ति आदिकरून जगत् नाहीं, ब्रह्मचि आहे. अस्तु, ऐसें आहे तेव्हां कोण जें तें कशातें पाहून देखतें होईल? कोण्ही कोण्हातें देखोनि देखतें होत नाहीं. आतां परमात्मा जो तो तत्वज्ञानियाचे मिषेंकरून केवल ब्रह्मस्वरूपीं कांहीं जालें नाहीं ऐसें पाहतो, तें वर्णितात,

पुढें फरकेना दीसतें । ना मागें डोकावि देखतें ॥
पाहतां एणें एयातें । स्फुरद्रूपचि ॥ २४६ ॥

परमात्मा जो येणें तत्ववेत्याचे रूपेंकरून आपण आपणातें पाहिलें असतां दिसतें ह्म० दृश्य पुढले बाजूला फरकत नाहीं, पुढें येऊन विस्तारातें पावत नाहीं; आणि देखतें ह्म० द्रष्टा जो तो मागून डोकावित नाहीं, पाहत नाहीं. कारण जे सर्वोपाधिविवर्जित केवल ब्रह्म जें तेंचि स्फुरद्रूप आहे ह्मणून. आतां संपूर्ण रूपें परमात्माचि आहे, या हेतूस्तव कोण्हांत कोण्हाचा प्रवेश नाहीं ऐसें सांगतात,

कल्लोलें जळिं घातलें । सोनें सोनें पांघुरलें ॥
दिठीचे पावो गूंतले । दिठीसीचि ॥ २४७ ॥

जळाचे कल्लोळ जे त्यांनीं जळांत घालून घेतलें आहे काय? जळांत घालून घेतलें नाहीं. तैसें विवर्तरूप जगत् जें तें परमात्मियाचें शुद्ध स्वरूप ब्रह्म जें त्याचे ठायीं प्रविष्ट जालें नाहीं. जैसें सुवर्ण जें तें सोनें पांघरलें काय? सोनें पांघरलें नाहीं. तैसें परमात्मचैतन्य जें ते प्रत्यक्त्व पावलें काय? प्रत्यक्त्व पावलें नाहीं. कारण जे अखंड एक परमात्माचि आहे ह्मणून. आणि संपूर्ण रूपें परमात्मदृष्टी जे तीचे पाय प्रतिशरीरीं द्रष्ट्याच्या दृष्टि ज्या त्यांत गुंतले आहेत काय? गुंतले नाहींत. कारण जे संपूर्ण द्रष्ट्याच्या दृष्टि ज्या त्या परमात्मदृष्टिरूपाचि आहेत ह्मणून.

श्रुतीसि मेळविली श्रुती । दृतीसि मेळविली दृती ।
कां तृप्तीसि तृप्ती । वोगरिली ! ॥ २४८ ॥

श्रुति-दृति तल्लक्षण माया आणि प्रकृति ज्या त्यांसि बुद्धि आणि चिदाभासाची जागीव या दोन्ही मेळविल्या आहेत काय? मेळविल्या नाहींत. आणि परमात्मियाची नित्यतृप्तिरूपा चिच्छक्ति जे तीस तत्ववेत्याची निरंकुशा नामक तृप्ति जे ती वोगरिली, वाढली आहे काय? वाढली नाहीं हा भाव.

गुळें गूळ परवडिला । मेरु सुवर्णें मढिला ।
ज्वाला गुंडाळिला । अनल जैसा ॥ २४९ ॥

गूळ जो तो गुळानें परवडिला, सारविला, आहे काय? सारविला नाहीं जैसा; तैसा व्यष्टीचे ठायीं चिदाभास जीव जो तो समष्टि अविद्योपाधि एक जीव जो एणें

परवाडिला नाहीं ह्म० व्यापिला नाहीं. आणि जैसा भूतळाचे मध्यभागीं मेरू आहे, तैसा संपूर्ण जगतास नाभिभूत अंतर्यामी पुरुष जो तो सुवर्ण तल्लक्षण परमात्मा जो तेणें मढिला नाहीं, व्यापिला नाहीं. अथवा ज्वाला तल्लक्षण त्रिगुणात्मिका माया जे तिणें अनळ तल्लक्षण ईश्वर जो तो गुंडाळिला काय, आच्छादिला काय? आच्छादिला नाहीं. कारण जे ईश्वर आणि माया हे भिन्न नाहींत ह्मणून.

हें बहु काइ बोलिजे । नभ नभाचिये ये सेजे ।
तेथें कवणें निदिजे । कां जागा कवणु? ॥ २५० ॥

आतां हें फार काय सांगावें? चिन्नभ भूमाख्य ब्रह्म जें तें व्यष्टिगत दहराकाश जें त्याचे ठायीं सेजे, निजावयास आलें आहे काय? चिदाकाश जें तें दहराकाशाचे, हृदयाकाशाचे ठायीं निजावयांसि आलें नाहीं. कां जे केवल अद्वितीय वस्तु जे तेथें निजिजे कोण्हें आणि निजावयाचा जागा, स्थळ, कोण्हें व्हावें? कारण जे आंत बाहेर ब्रह्मवस्तु एक आहे ह्मणून. आतां हें पूर्वी वर्णिजेलें अखिलोपाधि-विवर्जित शुद्ध ब्रह्म जें त्यातें परमात्मा जो तो तत्ववेत्याचे रूपेंकरून आणि स्वयें आपण या प्रकारेंकरून पाहतो ऐसें वर्णितात,

हा एणें पाहिला ऐसा । कांहीं न पाहिला जैसा ।
आणि न पाहाताहि तैसा । पाहाताचि हा ॥ २५१ ॥

हा परमात्मा जो तो तत्ववेत्याचे रूपेंकरून पूर्वी व्यतिरेकअन्वयत्वें वर्णिजेला त्याप्रमाणें आपले शुद्ध स्वरूप ब्रह्मातें ऐसें पाहता जाला कीं जैसा कोण्ही कोण्हातें पाहतचि नाहीं, आणि तैसा, तत्ववेत्यासारिखा, स्वयें आपणहि स्वरूपनिद्राकाळीं अथवा उत्थानकाळीं ऐसें पाहतो जे कोण्ही कांहीं पाहतचि नाहीं. कारण जेथें अन्यातें पाहत नाहीं, अन्यातें ऐकत नाहीं, अन्यातें जाणत नाहीं, तें भूमास्वरूप होय ऐसें श्रुतीनें वर्णिजेलें; त्याप्रमाणें परमात्मा स्वयें आपण आणि तत्ववेत्याचे रूपेंकरून ऐसें पाहतो जे कांहीं जाणत नाहीं, ते वस्तु आपण होय म्हणून.

एथें बोलणें न साहे । जाणणें न समाये ।
अनुभव न लाहे । अंग मिरवों ॥ २५२ ॥

परमात्मियाचें आणि तत्ववेत्याचें शुद्ध भूमास्वरूप जें येथें श्रुतीचें बोलणें साहत नाहीं, आणि मनाचें जाणणें समावत नाहीं, वाणी आणि मन माघारीं

फिरतात, येथें अनुभव घेणाराच राहत नाहीं, मग अनुभव अंग मिरवून कैचा राहणार ?

म्हणौनि एयातें एणें । इयापरिचें पाहणें ॥
पाहतां कांहीं कवणें । पाहिलें नाहीं ॥ २५३ ॥

शुद्ध ब्रह्मीं पाहणें नाहीं म्हणोनि परमात्मा जो तो ज्ञान्याच्या रूपेंकरून आपण आपणातें पाहत नाहीं ऐसें पाहतो, जाणतो. अस्तु, या प्रकारें कोण्हीही विचारवान् जो तेणें पाहिलें असतां कांहींच पाहिलें नाहीं ऐसें सिद्ध होतें.

किंबहुना ऐसैसें । आत्मेनि आत्मा न प्रकाशे ।
ना चेतचि चेववों बैसे । इयास्तव ॥२५४॥

किंबहुना, आतां फार काय सांगावें ? ऐसैसें, याप्रकारचें आहे जे परमात्मा जो तो तत्वविदासारिखा आपण आपणातें प्रकाशित करीत नाहीं, जाणत नाहीं. कारण जे चेत म्ह० स्वस्वरूपविषयीं नित्य जागाचि आहे यास्तव आपण आपणातें चेववों, जागऊं बसत नाहीं.

स्वयें दर्शनाचिया सवा । अवघियाचि जात फावा ।
परि निजात्मभावा । न मोडतां ॥२५५॥

परमात्मा स्वयें आपण आपणातें दर्शनाचिया सवा, स्वदृष्टीच्या सन्मुख अवघियाचि फावा जात असे, अवघेंचि दृश्य ग्रहण करितो; परंतु निजात्मभावा न मोडतां, स्वस्वरूपविस्मृति न पाडतां सर्व दृश्यातें पाहतो हा भाव. आतां पूर्ण ज्ञानी जो त्याचा प्रकार सांगतात,

न पाहतां ऐसें पाहे । तर्‍हि तेंचि पाहणें होये ॥
आणि न पाहणें न तरि जाये । न पाहाणें पाहाणें ॥ २५६॥

अन्यत् पाहत नाहीं, अन्यत् ऐकत नाहीं, अन्यत् जाणत नाहीं, ऐसा श्रुतीनें बोलिजेला जो भूमाख्य आत्मा तो मी न पाहाता होय ऐसें विचारदृष्टीकरून ज्ञानी पाहील, तरि तेचि पाहणें, तत्वज्ञान होय. आणि न पाहणेन, कांहीं पहात नाहीं ऐसें जें ब्रह्मस्वरूप तेणेंकरून तरि न पाहणें म्ह० तूल अज्ञान आणि मूल अज्ञान आणि पाहणें म्ह० सामान्यविशेष ज्ञान, ऐसें हें पाहणें न पाहणें दोन्हीही जातात. ऐसा ज्ञानी

जो त्यासि आणि परमात्मियासि ज्ञानाविषयीं आणि स्वरूपाविषयीं कांहीं भेद राहिला नाहीं हा अभिप्राय. आतां परमात्मवर्णन करितात.

भलेतैसा फांके । परि एकपणा न मुके ॥
संकोचे तन्हि असिकें । हाचि आथी ॥ २५७ ॥

हा परमात्मा नामरूपत्वें करून भलतैसा फांकला, विस्तारातें पावला, अथवा उपसंहारकाळीं संकोचातें पावला तरि हा आपले एकपणास मुकत नाहीं. कारण जे असका ह्म० संपूर्ण हाचि आहे म्हणून. अहो, संपूर्णरूपें परमात्माच वर्णिला तेव्हां ज्ञान-अज्ञानरूप त्यासचि होणें आलें कीं ? यासि उत्तर देतात,

सूर्याचेया हाता । अंधार नये सर्वथा ॥
मा प्रकाशाची कथा । ऐकता कां ? ॥ २५८ ॥

सूर्याचे हस्तभूत किरणें जे त्यांसही अंधार आढळत नाहीं, मग सूर्याचे ठायीं अंधार तो कोठून ? जेव्हां सूर्यास अंधार ठाऊक नाहीं, तेव्हां प्रकाशाची कथा तरी कां ऐकता होईल ? तैसा चित्सूर्य परमात्मा जो त्याचे अंशभूत तत्ववित् जे त्यांसही अज्ञानतम आढळत नाहीं, मग चित्सूर्य परमात्मा जो त्याचे ठायीं अज्ञानतम कोठून असणार ? जेव्हां चित्सूर्य परमात्मियास अज्ञानरूप अंधार ठाऊक नाहीं, तेव्हां प्रकाशाची कथा, तत्वज्ञानाची कथा तरि कां ऐकता होईल, हें कैमुतिकन्यायें सिद्धचि आहे. सारांश, परमात्मियाचे ठायीं ज्ञानाज्ञानें दोनीही नाहींत हा अभिप्राय. आतां ज्ञानाज्ञानें हे परमात्मसंबंधीच होत ऐसें वर्णितात.

अंधार कां उजियेडु । सकला एक अखंडु ।
जैसा कां मार्तंडु । भलतेथें ॥ २५९ ॥

तैसा आवडे तिये भूमिके । आरूढलिया कवतुकें ॥
परि एयातें हा न चुके । हाचि ह्मणौनि ॥ २६० ॥

जैसा दोनप्रहरींचा सूर्य सर्वांचे नेत्रास प्रकाशित करित असतां जो कोण्ही सूर्यासि सन्मुख होतो त्यासि विशेष प्रकाशरूपता होती, आणि जो सूर्यासि पाठ देऊन माजघरांत जातो त्याचे नेत्रास अंधार वाटतो; परंतु सकळांस भलतेथें, कोणतेही स्थळीं, अंधारास कां उजेडास हेतुभूत एक मार्तंडचि होय, तैसा एक अखंड सर्वप्रकाशक परमात्मा जो तो कवतुकें कोणतिये भूमिके आरूढला असतां, लीलामात्रें अज्ञ-तज्ञाचे

ठायीं व्यापून असतां जो पुरुष याचे शुध्द स्वरूपाकडे अनुभववृत्तीनें सन्मुख होतो, त्यासि निरतिशय पूर्वसिध्द स्वप्रकाश ब्रह्मरूपत्व प्राप्त होतें; आणि जो कोण्ही अज्ञ हृद्गुहेंत शिरून देहासीच मी ह्मणणारा तो पुरुष द्रष्टृत्वेंकरून डोळस असतांही नास्ति न भाति ऐशा तमातें पाहातो. अस्तु, त्या त्या अज्ञ-तज्ञाचे बुद्धीनें तसा तसा विचार जाला, परंतु परमात्मा जो तो आपण आपणातें चुकत नाहीं; कारण जें संपूर्ण-रूपें आपणाचि आहे ह्मणोनि. अहो, या विलासाच्या योगेंकरून परमात्मियाला विकारित्व येणार नाहीं काय? यासि उत्तर त्याची निर्विकारता ढळत नाहीं ऐसें सांगतात,

सिंधूची सीमा न मोडे। पाणीपणा सलु न पडे॥
वरि मोडोत कां गाडे। तरंगांचे॥ २६१॥

जैसी सिंधूची सीमा, मर्यादा, न उल्लंघितां वरील भागावरी गाड्यासारिखे धांवधाड तरंग जरि मोडले तरी पाणीपणांत सळ, भेदाची रेषा, पडत नाहीं, तैसे परमात्मस्वरूपाहून बाहेर न जातां वरचेवरी जगद्रूप तरंग होउहोउ जरि मोडले तरि ब्रह्मरूपतेंत भेद पडत नाहीं. कारण जे अधिष्ठानरूप परमात्मियाचे ठायीं विवर्तरूप संपूर्ण जगत् आहे ह्मणून. अहो, ज्ञानी जो यास परमात्मियाची उपमा तुह्मी ठायीं ठायीं दिल्ही, परंतु चिच्छक्तिप्रकृति-माया ज्या यांची उपमा कां दिल्ही नाहीं? यासि उत्तर,

रश्मि सूर्यचि आथी। परि बिंबाबाहेर जाती।
ह्मणौनि बोधसंपत्ती। उपमा नोहे॥ २६२

रश्मि ज्या त्या सूर्यरूपचि आहेत, परंतु त्या बिंबातें सोडुनि बाहेर जातात जैशा; तैशा चिच्छक्ति-प्रकृति-माया ज्या त्या परमात्मस्वरूपचि आहेत, परंतु परमात्मस्वभावास सोडून अन्यथात्व पावतात, असज्जडदुःखरूपत्व पावतात. ह्मणोनि या शक्ति ज्या त्या बोधसंपत्तिवान् ज्ञानी जो त्यास उपमा आह्मी मानीत नाहींत, उपमेस घेत नाहींत. अहो, परमात्मियास द्रष्ट्याची उपमा तुह्मी कां देत नाहींत? यासि उत्तर,

सोनियाचा रवा। रवेपणाचा ठेवा॥
अवघेया अवेवां। लेणें नोहे॥ २६३॥

पुष्कळ सोनियाचा रवा, गुंजभर सोनें, त्याची ठेव रवेपणें म्ह० सुंदर वर्तु-

ळत्वें होय; परंतु तो अवघे हस्तपादादि अवयव जे त्यांस लेणें होऊन शोभवीत नाहीं; तैसा परमात्मियाचा अंश पुरुष, आणि त्या पुरुषाचा अंश वर्तुळ हृत्कमळाचे ठायीं राहणारा द्रष्टा जो तो एक्या व्याष्टिगत अंतःकरण इंद्रियास मात्र संपूर्णत्वें प्रकाशितो आणि जाणतो, परंतु भूम्यादिक अष्ट आहेत अवयव जे ते जीस ऐसी जे प्रकृति तीचे अवघ्या अवयवांस प्रकाशीत करीत नाहीं आणि जाणतीह नाहीं. सारांश द्रष्टा अल्प होय, ह्मणून त्याची उपमा परमात्मियास देतां येत नाहीं. आतां केवल ब्रह्मीं जगत् ह्मणून कधींही जालेंचि नाहीं ऐसा ज्ञानियाचा निर्धार सांगतात,

आणि पल्हेचा दोडा । न पडतां तढा ॥
जग तंव कापडा । भरेना कीं ॥ २६४ ॥

कापसाचे पळ्यांतील वोल्या दोड्यास, बोंडास, तढा पडलाचि नाहीं, मग त्यांतून सूत निघून कापडानें बाजार भरणार नाहींच कीं. तैसा अफूट ब्रह्मीं विकार जालाचि नाहीं, मग संपूर्ण जगत्प्राणसूत्रात्मा तो कोठून होणार, आणि स्थावर-जंगमात्मक जगताचा बाजार तो कोठून भरणार ? सारांश ब्रह्मीं कांहीं एक जालें नाहीं, ऐसा हा अज्यात सिद्धांत होय. आतां केवल ब्रह्मास व्यतिरेक उपमा देऊन उपमा निषेधितात,

न फोडितां आड वावो । दिगंतौनि दिगंता जावों ॥
न ये मा पावों । उपमा काई ? ॥ २६५ ॥

नील कटाहासारिखें काळें आकाश जें तें ग्रामांतरास जाणारास आडवावो ह्म० आड़वें आल्यासारिखें वाटतें; त्यातें न फोडितां, न काढितां; दिगंतास, या देशाहून त्या देशास जाणें होतें, ऐसें जें नीलवर्ण पोकळ आकाश तेंहि केवल ब्रह्मास उपमा पावों सकत नाहीं. कारण जे केवल ब्रह्म एकरस भरीव आहे ह्मणून. आतां परमा-त्मियासहि अन्य उपमा नाहीं ऐसें वर्णितात,

ह्मणौनि इये आत्मलीले । नाहीं आन कांटाळें ।
आतां एयाचिये तुले । हाचि होये ॥ २६६ ॥

एक अद्वितीय परमात्माचि आपले ठायीं आपण खेळतो, ह्मणोनि या आत्म-लीलेस या परमात्मियावांचून दुसरें कांटाळें नाहीं, ताजवा नाहीं. आतां या परमा-त्मयाची तुळणा करावयासि हा परमात्माचि होय, दुसरें कोण्ही नाहीं.

स्वप्रकाशाचिया घासीं । जेवितां बहु वेगेसीं ॥
वेंचेना परि कुसीं । वा खोपा न पडे ॥ २६७ ॥

परमात्मा जो याचा स्वप्रकाश हें संपूर्ण जगत् जें त्याचा स्वरूपनिद्राकाळीं बहु वेगें ग्रास करून परमात्मा जेविला असतां, वारंवार उपसंहार केला असतां, जगत् वेंचत नाहीं; आणि ईक्षणमात्रें जगताचा उपक्रम केला असतां कुसीं वा ह्म० कुसीस खोपा, खोलगा पडत नाहीं. कारण जे उपक्रम उपसंहाररूपें आपला आपणाचि आहे ह्मणून. आतां या सप्तम प्रकरणाचा उपसंहार करितात.

ऐसा निरुपमापरि । आपुलिये विलासावरी ।
आत्मा राणीव करी । आपुला ठायीं ॥ २६८ ॥

ऐसा पूर्वी वर्णिजेला या प्रकारें आपले विलासाचे योगेंकरून परमात्मा जो तो आपले शबलब्रह्मस्वरूपाचे ठायीं आपण राणीव, राज्य करितो.

॥ इतिश्रीमदनुभवामृते अज्ञानखंडनं अद्वितीयपरमात्म-प्रतिपादनं नाम सप्तमप्रकरणम् ॥

रघुनाथ अद्वैत सच्चिदानंद । त्याचे चरणकमळांचा मकरंद ।
सेवोनि निरंजन हा मिलिंद । गुंजारव करीतसे ॥ १ ॥
अनुभवामृत-पदबोधिनी । निरंजनाची साबडी वाणी ॥
श्रीरघुनाथप्रसादें करूनि । ज्ञानेश्वरपदां अर्पिली ॥ २ ॥

श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

# अनुभवामृत–पद–बोधिनी.

## प्रकरण ८ वें.



श्रीगुरुदत्तात्रेयायनमः । श्रीज्ञानेश्वरायनमः । श्रीरघुवीरचरणारविंदपरागसेवन-भ्रमरीभूत, श्रीदत्तात्रेयलब्धप्रसाद, श्रीज्ञानेश्वरप्रेरित निरंजनाख्य जो तो जीवन्मुक्त श्रोत्यांप्रत प्रार्थना करितो जे तुह्मी श्रवण करावें. सप्तम प्रकरणीं अज्ञानवादी ऐसें बोलिला जे ' प्रत्यक्षादि प्रमाणीं । कीजे जेयाची घेणी । तें अज्ञानकार्य ह्मणौनि । अज्ञान नोहे ॥ १ ॥ ; ' त्यासि उत्तर ज्ञानस्वरूप परमात्माच आपण आपले ठायीं राणीव करितो, ऐसें सप्तम प्रकरणाचे सेवटपर्यंत सांगिजेलें. आतां त्या अज्ञानवादि-याचे बोलण्याचा विस्मय करितात,

तेयातें ह्मणिपे अज्ञान । तन्हिं न्याया भरलें रान ।
आतां ह्मणों तेयाचें ज्ञान । उपसाहों आह्मी ॥ १ ॥

ऐसा ज्ञानस्वरूप परमात्मा जो त्यातें अज्ञान ह्मणतोस तरि न्याय जो तो रान-भरी जाला कीं! असो, आतां त्या अविवेकियाचें ज्ञान आह्मी उपसाहूं, सहन करून अर्थी लाऊन घेऊं. आतां त्याचे अज्ञान शद्बाचा अर्थ ज्ञान करितात.

तन्हि प्रकाशितें तें अज्ञान । ऐसें ह्मणणें हान ॥
निधि दावितेया अंजन । म्हणिजे जैसें ॥ २ ॥

संपूर्ण दृश्यातें प्रकाशितें हान ह्म० आणखी ब्रह्मवस्तूतें दाखवितें जें ज्ञान त्यातें अज्ञान ह्मणणें तें ऐसें, जैसें निधि दाखवितयातें अंजन ह्मणिजेतें. आतां अज्ञान शद्बाचा अर्थ संपूर्णशक्तियुक्त परमात्मपर योजितात,

सुवर्ण गौरी अंबिका । न ह्मणिजे काई कालिका ।
तैसा आत्मप्रकाशका । अज्ञानवादु ॥ ३ ॥

जैसें सोनें जें आहे तेंचि गौरी आणि अंबिका आणि काळिका या नामेंकरून लोकाचे ठायीं न ह्मणिजे काय? ह्मणिजेतें. ऐसे सोन्याला अनेक नामेंकरून ह्मणतात, तैसा आत्मप्रकाशक ह्म० चिच्छक्ति-प्रकृति-माया ह्या संपूर्ण आपणाचि होउनि

प्रकाशित केल्याऐसा जो परमात्मा त्याजला अज्ञानवादु ह्म० अज्ञान ऐसें ह्मणतो जो तो किती शाहाणा ह्मणावा?

यऱ्हवीं शिवौनि पृथ्वीवरी। तत्वाचिया वाणीपरी।
जेयाचे रश्मिकरीं। उजाला येती॥ ४॥

यऱ्हवीं, सहज रीतीनें पाहिलें असतां ज्या ज्ञानसूर्य परमात्मियाचे रश्मिकरीं ह्म० प्रकृतीच्या योगेंकरून शिव ह्म० ईश्वर जो त्यापासूनि पृथ्वीपर्यंत तत्वाचिया वाणीपरि ह्म० चतुर्विंशति तत्वाचे वेगळाले प्रकार उजाळा येति ह्म० उदयाप्रत येतात.

जेणें ज्ञान सज्ञान होए॥ दृङ्मात्र दृष्टितें विये॥
प्रकाशाचा दिवो पाहे। प्रकाशासि॥ ५॥

द्रष्ट्याचे ठायीं ज्ञान जें आहे तें ज्ञानस्वरूप परमात्मप्रसादें करून सज्ञान, तत्वज्ञानरूप होतें: आणि तत्वज्ञान जें तें दृङ्मात्र दृष्टितें वीतें ह्म० केवल ब्रम्हदृष्टीतें प्रसवतें. ऐसा प्रकाशाचा दिवस जो तो प्रकाशमान अंतरात्मा जो त्यातें पाहे, उगवतो.

तेयातें कवणें निकृष्टें। दाविलें अज्ञान बोटें॥
ना सूर्य तम मोटें। बांधिता होए॥ ६॥

तया ज्ञानरूप परमात्मयातें कोणत्या निकृष्टानें अज्ञान बोटें ह्म० अज्ञान तल्लक्षण अंगुलिनें दाखविलें कीं. मजला ऐसें वाटतें जे तो चित्सूर्य आत्मयातें अज्ञानतमाची मोट हा देह जो त्यांत बाधणारा होय. तो देहात्मवादीच असेल हा भाव.

अपूर्व ज्ञानाक्षरीं। वसतां ज्ञानाची थोरी॥
अज्ञान शब्दार्थाची उजरी। अपूर्व नोहे॥ ७॥

ज्या वस्तूचे ठायीं ज्ञान ऐसीं अक्षरें उच्चारणें आणि ज्ञानाची थोरी, थोरपण वसणें हेंचि आगोधर अपूर्व, आश्चर्य. मग अज्ञानशब्दार्थाची उजरी ह्म० प्रसिद्धी करणें हें अपूर्व नव्हे काय? हें मोठें आश्चर्य होय. आतां ज्ञानाची थोरी ब्रह्मीं कैसी वसत नाहीं तें सांगतात.

लाखेचिये मांदुसे। आगिचे ठेवणें जैसें॥
आंत बाहेर सरिसें। करोनि घाली॥ ८॥

लाखेची मांदूस ह्म० मूस, तिजमधीं अग्नि ठेविला असतां तो अग्नि जो तो मुसीचें लाखपण नाहींसें करून अग्निरूप करितो जैसें, तैसें ब्रम्हविषयीं निवृत्तीचे ठायीं ब्रह्म तल्लक्षण अग्नि ठेविला असतां त्या चरमवृत्तीतें सबाह्यत्वें ब्रम्हरूपाचि करून टाकितो. सारांश ब्रह्मवस्तु जे ते तत्वज्ञानातेंचि टिकूं देत नाहीं मग अज्ञान तें कैसें टिकणार ?

म्हणौनि जग ज्ञानें स्फुरतें । आणि बोलतां अज्ञानवादातें ॥
विखुरलीं होती आंते । वाचेचिए ॥ ९ ॥

ऐसी ब्रह्मनिष्ठाची वृत्ति जे ती ब्रह्मरूप जाली ह्मणोनि संपूर्ण जग त्यातें ज्ञानें-करूनचि स्फुरतें ह्म० ब्रम्हरूपचि वाटतें. आणि ऐशा ब्रम्हनिष्ठाप्रत अज्ञानवादातें बोलतां ह्म० हा अज्ञानीच आहे म्हणून त्याजवरि आरोप करून बोलिलें असतां त्या वाचेचीं आंतें ह्म० आंतडीं विखुरले ऐसें होतील ह्म० तत्ववेत्याला अज्ञानी ऐसें जो ह्मणेल त्याची जिव्हा झडेल हा भाव. अहो हा तत्ववेत्ता जो यास ज्ञान होण्याचे पूर्वीं शास्त्र जें तें अज्ञानी ऐसें ह्मणत होतें कीं ? यासि उत्तर तत्वविचार जाल्यावरि त्यातें शास्त्र जें तें अज्ञानी ह्मणत नाहीं ऐसें सांगतात.

आखरीं तंव गोवधु । पुढारा अनृतबाधु ॥
मा कैसा अज्ञानवादु । ज्ञानीं कीजे ॥ १० ॥

कोण्ही एकावरी अक्षरीं ह्म० शब्दानेंच गोवधकर्तेपणाचा अनृतवाद आला होता. पुढें त्याचा विचार केला तंव खराखुरा त्यानें गोवध केला नाहीं ऐसें सिद्ध जालें. तेव्हां त्याजवरि अनृत ह्म० मिथ्यावाद आला होता तो बाधित ह्म० मिथ्या जाला. तैसा विचारवान् जो याजवरि शब्दानें ह्म० शास्त्रानें अज्ञानीपणाचा अपवाद केला होता. पुढें त्या विचारवानानें शास्त्रानुसारें आणि स्वानुभवेंकरून ब्रम्हपर्यवसायी मुळापर्यंत आपला शोध केला तंव अज्ञानचि खरें नाहीं ऐसें सिद्ध जालें. मग ज्ञानियाचे ठायीं हा अज्ञानी होय ऐसें बोलणें कैसें करिजेल ? अस्तु, शास्त्र त्यातें अज्ञानी म्हणत नाहीं हा भाव. आतां अज्ञान शब्दाचा अर्थ ज्ञानपर लाऊन घेतात,

आणि अज्ञान ह्मणणें । हें स्फुरतसें अर्थपणें ॥
आतां हेंचि ज्ञान कवणें । मानिजेना ॥ ११ ॥

ऐसा तत्वविचार जो त्यातें श्रुति ज्ञान ऐसें म्हणती आणि अज्ञानवादियाचें त्यातें अज्ञान ऐसें म्हणणें आहे, तरि असो हें. अज्ञानवादियाचें बोलणें जें तें अर्थपणें स्फुरतसे म्ह० परमार्थपणें आम्हांस वाटत असे. आतां हेंचि तत्वज्ञान म्हणोनि कोण्ही विचारवान् मानून घेणार नाहीं काय? मानून घेईलचि. आतां आग्रहास्तव वादी विपरीत नांव ठेवतो तें असेना कां? आतां तत्वज्ञानाला अज्ञान म्हणणारा जो त्याची उपेक्षा करून पूर्ण ज्ञानियाची प्रशंसा करितात,

असो हें आत्मराजें । आपणापें जेणें तेजें ॥
आपणचि देखिजे । बहुवेपरि ॥ १२ ॥

अज्ञानवादियाचें बोलणें असो, आतां पुरे. जेणें तेजें, ज्या ब्रम्हवस्तूचे ज्ञानें करून आपले ठायीं शोभणारा तत्ववित् आत्मराज जो येणें बहुवेपरि हें जगत् आपले ठायीं आपणचि देखिजेतें. अहो, एतादृश तत्वविद् वर्णिला, तोहि शास्त्रप्रमाणानेंचि पूर्ण ज्ञानी जाला, आणि अज्ञानवादी जो तोही शास्त्रप्रमाणानेंचि बोलितो कीं? यासि उत्तर,

निर्वचितां जें झावळें । तेंचि किं लाहती डोळे ॥
डोळेयांपुढेंही मिळे । तेंचि तेया ॥ १३ ॥

जैसें झावळें ह्म० मंद अंधकाराचे ठायीं भूमिगत रेषेला सर्पमूत्रधारादिक जें जें कांहीं निर्वचावें ह्म० निर्धारावे तेंच कीं लाहती, पावती, तयाचे डोळे; आणि वारंवार तो भयभीत होऊन पाहूं लागला तरि त्याचे डोळयापुढेंहि मिळे तेंचि तया, ह्म० जें ऐकिलें सर्पमूत्रधारादिक तेंचि पाहणारास दिसूं लागतें; तैसे अल्पविचारवान् पुरुष जे यांजला शास्त्रानें निर्वचिलें ह्म० सांगितलें जे आत्म्याचे ठायीं अज्ञान राहत असे, तेंचि अल्पविचारवानास खरेंसें वाटतें आणि त्याचे डोळयास संपूर्ण जगतही अज्ञानरूपचि दिसतें. ऐसें आपले ठायीं मूढत्व आलें हें ऐकून आतां अज्ञानवादी बोलतो,

ऐसें ज्ञान जें आहे । ते अज्ञान म्हणे मी वियें ॥
एणें अनुमानें हो पाहे । आर्थी ऐसें ॥ १४ ॥

अहो ज्ञानोबा, ऐसें तत्वविदाचें तुह्मी ज्ञान जें वर्णिलें आहे, त्या ज्ञानातें मी ह्मणतों जे अज्ञानरूप अंतःकरण वितें, प्रसवतें, तेव्हां या तत्वज्ञानावरून अनुमान

केलें असतां आमचें अज्ञान आथी ह्म० आहे ऐसें होऊं पाहतें कीं? आतां सिद्धांती बोलतात,

तंव अज्ञान त्रिशुद्धी नाहीं । हें जग ठेविलें ठायीं ॥
जें धर्माधर्मित्व नाहीं । ज्ञानाज्ञानाचे ॥ १५ ॥

अरे अज्ञानाभिमानी अज्ञानिया, तुझें अज्ञान जें तें त्रिशुद्धि ह्म० तीन वेळा शोधून पाहिलें परंतु हें जगत् ठायींचे ठायीं ठेविलें असतां अज्ञान नाहींच, आणि तूं ह्मणतोस जे अज्ञान ज्ञानातें वीतें, तरि ऐसें नाहीं. आणि ज्ञानाज्ञानाचें धर्मधर्मित्वही नाहींच. आतां व्यंगोक्तीनें अज्ञानवादियासि बोलतात,

काजळ मोतीं वियें । राखोंडिया दीपु जियें ॥
तर्‍हि ज्ञान धर्म होये । अज्ञानाचा ॥ १६ ॥

अरे अज्ञानवादि अज्ञानिया ऐकून घे, अज्ञानाचा धर्म हें तत्वज्ञान होय ऐसें ह्मणावयासि तुझी योग्यता नाहीं. जरि गुरुकृपा होउनि काजळ तल्लक्षण मन जें तें मोतीं ह्म० मुक्ततेसि जरि वियें ह्म० प्रसवेल तरि ज्ञान जें तें अज्ञानाचा धर्म होईल आणि तत्वज्ञानानें अहंकाराची राखोंडी होऊन त्यायोगें दीप तल्लक्षण चिदाभास जरि जिये, वांचेल, तरि तत्वज्ञान जें तें जीवाचा आणि अंतःकरणरूप अज्ञानाचा धर्म होईल.

चंद्रमा निघति ज्वाला । आकाश आते शिला ॥
तर्‍हि अज्ञान उजला । ज्ञानातें वमी ॥ १७ ॥

बोध तल्लक्षण चंद्रमा जो त्याजपासून ज्ञानाग्नीच्या ज्वाळा निघतील जरि, आणि स्फटिकाशिळा जैसी निघोट असती तैसें आकाश जें तें शिळापणा आते ह्म० भरीवपणातें पावेल, तरि अंतःकरणरूप अज्ञान जें तें उजळ, शुद्ध, ज्ञान जें त्यातें वियें, प्रसवेल. अरे अज्ञानवादी, तुजला हें घडत नाहीं तरि अज्ञानाचें कार्य हें तत्वज्ञान होय ऐसें ह्मणावयाची तुजला योग्यता नाहीं हा भाव.

क्षीराब्धि कालकूट । हे एके परी विकट ॥
परि कालकूटीं चोखट । अमृत नाहीं ॥ १८ ॥

जैसें क्षीराब्धिपासून कालकूट, विष, जालें तैसें परमात्मियापासून अज्ञान जालें ह्मणणें हेंही एका परीचे विकट ह्म० वांकडेंच्चि होय. परंतु तें असो, अचिंत्यशक्ति

परमात्मा आहे तेव्हां हें घडेल, परंतु कालकूटासारिखें गडद अज्ञान जें त्याचे ठायीं अमृत, मोक्षदायक चोखट ज्ञान नाहीं. आतां अज्ञानवादियाचे मनांतील उत्प्रेक्षा घेऊन बोलतात,

ना अज्ञानिं ज्ञान जालें । तें होतांचि अज्ञान गेलें ॥
पूढतीं ज्ञान एकलें । अज्ञान नाहीं ॥ १९ ॥

अथवा तूं ह्मणसील कीं अंतःकरणरूप अज्ञान जें त्यापासून तत्वज्ञान जालें आणि तें तत्वज्ञान होतांचि मी आपणातें जाणत नाही ऐसें अज्ञान जें होतें तें गेलें; ऐसा तुझे मनांतील अभिप्राय आहे. तसेंच कां होईना? परंतु तत्वज्ञान जाल्यावरि पुढती तरि ज्ञान एकलेंच राहतें कीं? अज्ञान नाहीं तें नाहींच ऐसें होतें. आतां तत्ववेत्याची आणि परमात्मियाची समानता वर्णितात,

ह्मणौनि सूर्य सूर्याएव्हडा । चंद्र चंद्रासि सांगडा ॥
दीपाचिया पडिपाडा । ऐसा दीपु ॥ २० ॥

अरे तत्ववित् अज्ञानवादी, या शास्त्रानें जे ज्ञानाज्ञानें वर्णिलीं त्यांचीच तूं खटपट करीत बसलास, परंतु तत्ववित् जो तो परमात्मियासारिखा ज्ञानाज्ञानातीत शुद्धब्रम्हत्वेंकरून आपणातें जाणतो. ह्मणोनि जैसा सूर्य जो तो सूर्याएव्हढा मानावा, तैसा तत्ववेत्ता जो तो प्रत्यगात्मत्वेंकरून परमात्मियाएव्हढा होय. जैसा चंद्र जो तो चंद्रासि सांगडा, तुल्य मानावा, तैसा परमपुरुषासि आणि तत्ववेत्याचे द्रष्टेपणासि सांगड होय. जैसा दीपाचे पडिपाडासी, समतेसि दीप होय, तैसा सर्वप्रकाशक ईश्वर जो त्याचेसारिखें तत्ववेत्याचें चिदाभासरूपत्व होय. अहो, परमात्मियासि आणि तत्ववेत्यासि समानता तुम्ही वर्णिली, परंतु त्याची आणि याची तुलना कैसी घडेल? परमात्मा जो तो स्वयें सर्वाधिष्ठान आणि पुरुषरूपें सर्वद्रष्टा आणि ईश्वररूपें सर्वकर्ता सर्वज्ञ होय; आणि तत्ववेत्ता तरि स्वयें प्रत्यगात्मत्वें परिच्छिन्न आणि व्यष्टिगत बुद्धि–इंद्रिय–द्रष्टा आणि चिदाभासजीवत्वें किंचिज्ञ आणि भोक्ता होय. ऐसीं विरुद्ध लक्षणें आहेत म्हणून या उभयांची चुकी पडती कीं? यासि उत्तर, तत्ववेत्यासि आणि परमात्मियासि भेद नाहीं ऐसें सांगतात,

प्रकाश तो प्रकाशकीं । हें न वचे एया चुकी ।
ह्मणौनि जग असकी । वस्तुप्रभा ॥ २१ ॥

स्वप्रकाश जें ब्रह्म तेंचि स्वरूप तत्ववेत्याचें होय, आणि परमात्मियाचें ही तेंचि शुद्ध स्वरूप होय. तेव्हां तत्ववेत्ताही प्रकाशरूप आणि परमात्माहि प्रकाशरूप आहे ह्मणोनि सर्वज्ञत्व किंचिज्ञत्वादिकांची तत्ववेत्यास गरज नाहीं. अस्तु, प्रकाशतेविषयीं तरि यया उभयाचें एकत्व तेचि चुकी ह्म० अंतर नाहींच कीं? आतां परमात्मियाचें वर्णन करितात. चित्सूर्य परमात्माचि एक आहे ह्मणोनि संपूर्ण जगत् परमात्म वस्तूची प्रभा होय ऐसें आमचे स्वानुभवेंकरून सिद्ध जालें.

आणि 'विभाति यस्य भासा। सर्वमिदं' हा ऐसा।
श्रुति काइ वायसा। ढेंकर देती? ॥ २२ ॥

आणखी आमचे अनुभवानुसार श्रुतिही बोलत आहे. अरे अज्ञानवादी, तुझें अज्ञानचि सर्वांसि कारण आहे ह्मणतोसि तरि ज्या परमात्मियाच्या भासा, प्रकाशेंकरून इदं, हें संपूर्ण जगत् जें तें विभाति, भासमान आहे,· ऐसा श्रुति जे ते ढेकर काय वायसा, व्यर्थ, देती काय? व्यर्थ नाहीं, परमात्मस्वरूप जैसें आहे तैसें श्रुति वर्णिती. आतां परमात्मा जो तो तत्ववेत्याच्या मिषेंकरून आपण आपणातें पाहतो ऐसें सांगतात,

यालागीं वस्तुप्रभा। वस्तुचिया पावे शोभा॥
जात असे लाभा। वस्तूसीचि ॥ २३ ॥

संपूर्ण अवघी एक परमात्मवस्तूचि आहे, यालागीं परमात्मवस्तुप्रभारूप हें जगत् जें त्यायोगें परमात्मवस्तूच शोभा पावती. आणि तत्ववेत्याचे रूपें परमात्मवस्तूसीच लाभा जात असे ह्म० तत्वज्ञानेंकरून सर्व ब्रह्म होय ऐसें प्राप्त होत असे.

वांचौनि वस्तु एया। आपणा प्रकाशावया॥
अज्ञान हेतु वाया। बोलणें अवघें ॥ २४ ॥

या परमात्मवस्तुवांचून आपण आपणातें प्रकाशावयासि अन्य हेतु नाहींच. आतां जगत् प्रकाशावयासि अज्ञान हेतु होय ऐसें अज्ञानवादियाचें बोलणें तें अवघें वाया, व्यर्थ होय.

एवं अज्ञानसद्भावो। कवणेपरी न लाहों॥
अज्ञानविषयीं पावों। पाहों ठेलिया ॥ २५ ॥

एवं, श्रुतियुक्त अनुभवेंकरून अज्ञानविषयीं पाहों ठेलिया, पाहों बसलें असतां कोणेही प्रकारें अज्ञानसद्भाव असून अज्ञानातें न लाहों, अज्ञानदशेप्रत न पावों.

तमाचा उजिरा । न जोडेचि दिनकरा ॥
रातीचिया घरा । गेला जऱ्हि ॥ २६ ॥

तत्वज्ञानाचा दिवस उदयातें पावविणारा आत्मा दिनकर जो तो अविद्यारात्रीचें घर हृदयगुहा जी तीचे ठायीं गेला, व्यापला, जरि, तरि अज्ञानतमाचा उजिरा न जोडे, अज्ञानाचा सांचलही ऐकूं येत नाहीं, मग अज्ञान दिसणार तें कोठून ?

कां नींद खोले भरितां । जागणें हि नये हाता ।
येकलें टलटलिता । ठाकिजे जेविं ॥ २७ ॥

योगी जो येणें समाधिरूप खोळेंत निद्रा भरली असतां जागणेंही हातास येत नाहीं आणि योगी येकला टळटळीत, स्पष्ट, अद्वितीय जें ब्रह्म तद्रूपेंचि होऊन टाकतो, ब्रह्मचि होऊन असतो.

तैसें आमुचेनि नांवें । अज्ञान-ज्ञान दोनी नव्हे ।
आम्हांलागी गुरुदेवें । आह्मीच केलों ॥ २८ ॥

परमात्मा जो तो वेदरूप वहीवरुतें आपले शुद्ध स्वरूपाचे नांवें ज्ञानाज्ञानें दोन्हीही लिहीत नाहीं. तैसे आह्मी केवळ ब्रह्मरूप जे त्या आमच्या नांवें ज्ञान अज्ञान हें दोन्हीही नव्हेत, नाहींत. आतां आह्मी शद्बेंकरून केवल ब्रह्म ऐसें श्रीज्ञानेश्वर आपलें अनुभवरूपत्व सांगतात. आह्मी पूर्वसिद्ध ब्रह्मरूप जे त्या आह्मांलागि गुरूदेवें आह्मीच केलों ह्म० पूर्वसिद्ध ब्रह्मरूप जे आह्मी त्या आह्मांप्रत ब्रह्मरूप केलें.

हा ठाववरि गुरुरायें । नांदविलें उवायें ।
जे आम्ही न समाये । आह्मांमाजि ॥ २९ ॥

श्रीगुरुराय यांनीं हा ठाववरि, येथपर्यंत उवायें नांदविलें, उदयत्वें करून नांदविलें जे आह्मी न समाये आह्मांमाजि ह्म० आह्मी आमचे ठायीं मात नाहींत; कारण जे आमचें ब्रह्मरूप भरीव आहे ह्मणून.

आम्ही आम्हीपणें न सटों । अंगिं लागलें न फूटों ।
स्वसंविति न घसवटों । कैवल्येंही ॥ ३० ॥

आह्मी जे ते आह्मीपणें न सटों, आपलें ब्रह्मपण कधींही टाकींत नाहींत आणि आह्मी आपलें ब्रह्मरूप अंगासि जडलों आहोंत ते फुटत नाहींत, भेदातें पावत नाहींत आणि विदेहकैवल्य जरि जालें तरि हे स्वसंविति, स्वप्रकाश ब्रम्हरूपता आमची घसवटत नाहीं, मळकट होत नाहीं.

परि आम्हीं आम्हीं आहों । तें कैसें पाहों जावें ।
तंव काय कीजे ठावो । लाजिजे ऐसा ॥ ३१ ॥

ब्रह्मरूप आह्मी आहोंत, परि तें आह्मी कैसें पाहों जावें ? द्रष्ट्यानें कदाचित् पाहों जावें, तरि द्रष्टा जो त्यास तो ठावो, ठिकाणा, लाजिजे ऐसा आहे, कारण जे कैवल्यब्रह्मवस्तु दृश्य होत नाहीं ह्मणून.

आमची करावया गोठी । जन्मलीच नाहीं वाक्सृष्टि ।
आमुतें देखे दिठी । ते दिठीच नोहे ॥ ३२ ॥

वेदांची वाणी जे ते ब्रह्मावांचून अन्य वर्णन करावयाविषयीं प्रवृत्त होती, परंतु आमची गोष्टी करावया, सांगावया, वेदांची वाक्सृष्टी, वाणी जे ते जन्मलीच नाहीं. परमपुरुषाची आणि द्रष्ट्याची दृष्टि जे ते आह्मां अतिरिक्त, ब्रह्माअतिरिक्त पदार्थातें देखोनि देखणी होती, परंतु आह्मांतें पाहूं गेली असतां दृष्टि जे ते दृष्टिपणातेंच मुकती.

आमुतें करोनि विखो । भोगहीं न सके चाखों ।
आमुतें आह्मी न देखों । आम्हीपणें ॥ ३३ ॥

ब्रह्मचि जे आह्मी त्या आमुतें विषय करून आणि आपण विषयी होऊन कोण्हीही भोगून चाखों शकत नाहीं. आणि आह्मी ब्रह्म जे त्यातें आह्मीपणेंकरून, ब्रह्मरूपेंकरून आह्मी न देखों, पहात नाहींत.

प्रकटों लपों न लाहों । येथें नाहीं नवलावो ।
परि कैसा नेणों विपावो । असणियावा ॥ ३४ ॥

आह्मी प्रकटहि होत नाहींत आणि लपालोंही नाहींत, याविषयीं तरि नवल नाहीं; परंतु विपावो ह्म० कदाचित् तत्ववेत्त्यास आमचे असणियाचा प्रत्यय होतो, ते आह्मी ब्रह्मरूपेंकरून कैसें आहोंत हें कांहीं नेणों, जाणत नाहींत. आतां आपलें स्वरूप वाणीचा विषय होत नाहीं ऐसें सांगतात,

किंबहुना श्रीनिवृत्ती । ठेविले असों जये स्थिती ।
ते काय देऊं हातीं । वाचेचिए ॥ ३५ ॥

परमात्मा शिव जो तो उपक्रमकाळीं तत्ववेत्ते आदिकरून संपूर्ण जगत् आपण होऊन सर्वांतें जाणतो आणि स्वरूपनिद्राकाळीं कोण्हातें जाणत नाहीं. आपलें केवळ ब्रह्मरूप जें तेंचि होऊन असतो. आणि स्वरूपनिद्रा विसर्जन जाली ह्मणजे पुनरपि जगत् पहावयासि लागतो. अस्तु, आह्मी तैसेही असून किंबहुना परमात्म शिवापेक्षाही श्रीगुरुप्रसादें अधिक आहोंत हें द्वितीय प्रकरणीं ' सामर्थ्याचेनि बिकें। शिवाचेंही गुरुत्व जिंके ' या सहावें वोवीनें वर्णिजेलेंचि आहे तें आतां वारंवार वाचेचे हातीं काय देऊं; वारंवार काय बोलावें ? श्रीनिवृत्तिगुरूनें ज्या स्थितिनें ठेविलें आहे तैसे आह्मीं असों. आतां श्रीनिवृत्तिगुरूचे प्रसादें आपले ठायीं सामर्थ्य आलें तें सांगतात,

तेथें समोर होआवया । अज्ञानाचा पाडु एया ।
केउतें मेलिया माया । होवों पाहे ? ॥ ३६ ॥

स्वस्वरूपब्रह्मावबोधें मूळ अविद्यारूप माया जे ती नाशातें पावल्यावरि अज्ञान कैसें होऊं पाहेल ? अज्ञान कधींही होऊं पावणार नाहीं. अहो, अज्ञान गेलियावरि ज्ञान तरि राहीलचि कीं ? यासि उत्तर,

आणि अज्ञानाचा प्रवर्तु । नाहीं जेया गांवाआंतु ।
तेथ ज्ञानाची तन्हि मातु । कवण जाणे ? ॥ ३७ ॥

ज्या आमचे गांवीं, आमचे केवल स्वरूपीं अज्ञानाची प्रवृत्तीच नाहीं, मग तेथें ज्ञानाची तरि मात कोण जाणेल ? आतां ज्ञानाभिमानी बोलतो,

राति ह्मणौनि दिवे । पडती किं लावावे ।
वांचौनि सूर्यासवें । ठाणदिवी असे ? ॥ ३८ ॥

अहो ज्ञानोबा, रात्रिसंबंधी तम आहे ह्मणून मनुष्य जे यांहीं वरचेवरि दिवे लावणें, दीप सरसावणें पडतात. तैसे अज्ञान–अस्मिता–राग–द्वेष–अभिनिवेशरूपा अविद्यारात्री दुर्लंघ्य आहे इणें मोठे मोठे ज्ञानी भ्रमाविले आहेत. याजकरितां ब्रह्मविद्येचे ठाणदिवीत ज्ञानरक्षा जे ते ग्रंथकारांनीं सांगिजेली आहे, तेणें करून तत्वज्ञानदीप वरचेवरि अभ्यासेंक न सर्वांनीं राक्षिले पाहिजेत कीं? आणि तुह्मी तरी

ज्ञानाची मात कोण जाणे हें कैसें ह्मणतां ?. आतां सिद्धांती बोलतात. अरे ज्ञानाभिमानी, आह्मांस त्या ज्ञानरक्षेची कांहीं गरज नाहीं. जैसा सूर्य जो तो अस्ताचलाप्रत पावला असतां त्याचे प्रकाशावांचून सूर्यासवें दीप लावावयासाठीं ठाणदिवी असे काय ? सूर्यासि ठाणदिवीची आणि दीपाची अपेक्षा नाहीं. तैसे स्वप्रकाश चित्सूर्य आह्मी जे ते आपले अचल भूमास्वरूपीं विश्रामातें पावलों, त्या आह्मांतें ब्रह्मविद्येची आणि ज्ञानरक्षणाची अपेक्षा नाहीं हा सिद्धांत.

ह्मणौनि अज्ञान नाहीं । तेथेंचि गेलें ज्ञानही ।
आतां निमिषोन्मेषा दोहीं । ठेली वाट ।। ३९. ।।

आह्मी आपले निजधामीं स्थिरावलों ह्मणोनि मूल अज्ञान नाहींसें जालें, आणि ज्ञानहि तेथेंचि विलयाप्रत गेलें. आतां द्रष्टेपणेंकरून दृष्टीचे निमिषोन्मेष म्ह० जगतातें पाहणें आणि न पाहणें या दोहींची वाट ठेली म्ह० वाट वाहत होती ते बंद होऊनि राहिली. आतां सप्तम प्रकरणाचे प्रारंभीं सातवी वोंवी ' परि असो हा प्रस्तावो । आधीं अज्ञानशुद्धि घेवों । मग तेयाचे लागीं लाहों । ज्ञानही लटिके ।। ' ऐसी जे प्रतिज्ञा केली होती, ते येथें स्मरण करून देतात.

एवं ज्ञानाज्ञानें । इया दोहींचीं अभिधानें ।।
अर्थाचेनि अनानें । उपलविलीं ।। ४० ।।

एवं, सप्तम प्रकरणापासून येथपर्यंत ज्ञान आणखी अज्ञान या दोन्हींचीं अभिधानें, नामें, आणखी अर्थ म्ह० स्वरूपें अनानें उपलविलीं म्ह० विस्तारपूर्वक वेगळालीं उपपादिलीं. आतां सातवें प्रकरण परमात्मविलासपर वर्णन केलें तें या प्रकारचें जाणावें ऐसें सांगतात,

जैसीं दंपत्यें परस्परें । तोडौनि पालटिलीं शिरें ।।
तेथ पालट नाहीं परि सरे । दोहींचें जिणें ।। ४१ ।।

जैसीं परस्परें दंपत्यें, नवरानवरी, या उभयांचीं शिरें पालटिलीं, तंव तेथें पालट तरि नाहीं, परंतु त्या दोहींचें जिणें, जीवित, मात्र सरतें; तैसीं परस्परें एकीभावातें पावलीं ह्मणून प्रथम प्रकरणीं वर्णिलीं ऐसीं जे प्रकृतिपुरुषें वधूवरें या उभयांचीं शिरें, अग्रें, महदादिक चेतन-अचेतनात्मक संपूर्ण जगत् जें त्यातें पालटिलें, फेरून परमात्मस्वरूपीं आणिलें; तंव तेथें परमात्मस्वरूपीं प्रकृतिपुरुषांचा पालट म्ह० प्रथम प्रकरणीं वर्णिला तैसा हेरफेर तंव नाहीं, परंतु प्रकृतिपुरुष या दोघांचें जीवित

मात्र सरलें, प्रकृतिपुरुषें नाहींसे जालीं. कारण जे अवघा एकचि परमात्मा होय ह्मणून. आतां सातवे प्रकरणीं परमात्मविलासांत द्रष्टा आणि दृष्टि यांचें वर्णन जे केलें तें ऐसें जाणावें ह्मणून सांगतात,

कां पाठिं दाविला होय । तो दीपुचि वाया जाय ।
आणि दिठीं अंधारें पाहे । ते दिठीचि वृथा ॥ ४२ ॥

संपूर्ण दृश्यातें प्रकाशन करणारा दीप तल्लक्षण द्रष्टा जो त्याचे पृष्ठभागीं जो केवल आत्मा आहे तो त्यातें दाखविला असतां द्रष्टाचि वाया जातो. कारण जे आत्मा दृश्य होत नाहीं म्हणून. आणि त्या द्रष्टयाची दृष्टी जे तेही अंधाररूप अज्ञानातें पाहती ह्मणून वृथा, व्यर्थ होय. कारण जे अज्ञानचि नाहीं ह्मणून. सारांश द्रष्टा आणि दृष्टि हे उभयही वृथा होत ऐसें जाणावें. आतां ज्ञाता ज्ञान जें त्यातें मिथ्यात्व सांगतात,

ऐसें ज्ञान अज्ञाना आलें । अज्ञान ज्ञाना गेलें ।
तेथ फळेंविण वांझोलें । दोनी जालीं ॥ ४३ ॥

संपूर्ण ज्ञेय पदार्थातें जाणणारें ऐसें जें ज्ञात्याचें ज्ञान तें ब्रह्मवस्तुतें जाणावयासि गेलें तंव ब्रह्मवस्तु ऐसी कीं तैसी आहे हें न कळे. ह्मणून ज्ञान जें तें अज्ञानदशेप्रत आलें ह्म० ज्ञात्यानें मूढासारिखा ज्ञानाभिमान सांडिला हा भाव. आणि अज्ञान ज्ञाना गेलें ह्म० ज्ञानाज्ञानविलासरूप ज्ञानस्वरूप परमात्मा जो त्याचे ठायीं अज्ञान जें तें अंतर्भावातें पावलें. आणि तेथें ह्म० अतर्क्य अप्रमेय ब्रह्मवस्तुचे ठायीं फळेंवीण ह्म० म्यां ब्रह्म जाणिलें ऐशा फलव्यामीवांचून ज्ञाता आणि ज्ञान हे दोन्हीही वांझोलें ह्म० बाधरूपत्वें मृषा जालें हा तत्वज्ञानाचा कळस होय. आतां ज्ञानाभिमानी बोलतो,

तैसें निपटौनि नेणिजे । तें अज्ञानशब्दें बोलिजे ॥
आणि सर्व जेणें सुजे । तें ज्ञान ऐसें ॥ ४४ ॥

अहो ज्ञानोबा, तैसें नव्हे, निपटोनि ह्म० सर्वथैव जें जाणत नाहीं तें अज्ञानशब्दें बोलिजेतें ऐसें आह्मी जाणतों. आतां सिद्धांती उत्तर देतात, श्रुति बोलती जे ज्या पुरुषास कांहीं कळत नाहीं तो ब्रह्मवस्तूला जाणतो आणि ज्याजला ब्रह्म कळतें तो पुरुष ब्रह्मवस्तूला जाणत नाहीं, ऐशा श्रुति अभिप्रायें बोलतात.

येथें जाणे तो नेणे । नेणे तोचि जाणे ॥
आतां कें असणें । ज्ञानाज्ञाना ? ॥ ४५ ॥

अरे ज्ञानाभिमानी, तूं व्यर्थ बडबड करितोस. येथ, या ब्रह्मानुभवप्रसंगीं परमात्मवाणी आहे जे निजस्वरूप ब्रह्म जें त्यातें विषय करून आणि आपण त्याचा ग्रहणकर्ता विषयी होऊन जो जाणतो तो पुरुष ब्रह्मातें जाणत नाहीं. कारण जे जाणीव वेगळी राहती ह्मणून. आणि केवलब्रह्मानुभवप्रसंगीं जाणीव गळाली ह्मणोनि ब्रह्मीं विषय-विषयित्वेंकरून नेणे तो ब्रह्मविद्वरिष्ठ ब्रह्मवस्तु उत्तमप्रकारें जाणतो हा आमचा सिद्धांत. आतां तुझीं ज्ञान अज्ञानें कोठें आहेत हें सांग. ज्ञान अज्ञानें ब्रह्मींहि नाहींत आणि ब्रह्मानुभवप्रसंगींहि नाहींत हा अभिप्राय. आतां पुढील नवमप्रकरणीं तत्ववेत्याची जीवन्मुक्ति आणि सहजस्थिती वर्णावयाची आहे ह्मणून ज्ञानियाचा विलास वर्णितात,

एवं ज्ञानाज्ञान दोन्हीं । पोटीं सुवोनि आहनीं ।
उदेला चिद्गगनीं । चिदादित्य हा ॥४६ ॥

एवं या प्रकारें, ज्ञानाज्ञानें जे हेचि कोण्ही एक आहनी ह्म० दिवसरात्रि जे ते पोटीं सुवोनि, पोटीं घेउनी चिद्गगन केवल ब्रह्म जें त्याचे ठायीं स्वप्रकाशमान चिदादित्य हा ज्ञानी जो तो उदयातें पावला आहे.

॥ इतिश्रीमदनुभवामृते ज्ञानाज्ञानातीतवस्तुप्रतिपादनं नाम अष्टम-प्रकरणम्

रघुनाथ अद्वैत सच्चिदानंद । त्याचे चरणकमळांचा मकरंद ।
सेवोनि निरंजन हा मिलिंद । गुंजारव करीतसे ॥ १ ॥
अनुभवामृत-पदबोधिनी । निरंजनाची साबडी वाणी ॥
श्रीरघुनाथप्रसादें करूनि । ज्ञानेश्वरपदां अर्पिली ॥ २ ॥

श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

# अनुभवामृत–पद–बोधिनी.

## प्रकरण ९ वें.



श्रीगुरुदत्तदिगंबरायनमः । श्रीज्ञानेश्वराय नमः । श्रीरघुवीर-चरणारविंद पराग-सेवन-भ्रमरीभूत, श्रीदत्तात्रेयलब्धप्रसाद, श्रीज्ञानेश्वरप्रेरित निरंजनाख्य जो तो जीवन्मुक्त श्रोत्यांप्रत प्रार्थना करितो जे तुह्मी श्रवण करावें. मागील अष्टम प्रकरणीं वोवी ' यऱ्हवीं शिवोनि पृथ्वीवरि । तत्वाचिया वाणीपरी । जेयाचिया रश्मिकरीं । उजाला येती ॥ ' ऐसें अनुष्टुप सांगिजेलें तेंचि वर्णन विस्तारपूर्वक जीवन्मुक्ति आणि सहजस्थिति सांगावयाकरितां आतां सृष्टीचे उपक्रमकाळींचा प्रसंग वर्णितात,

आतां आमोद सुनास जालें । श्रुतीस श्रवण रिघालें ॥
आरिसे उठिले । लोचनचि ॥ १ ॥

अद्वितीय परमात्मा जो तो मायावी ईश्वररूप आपण होऊन अपंचीकृत पंचमहाभूतांपासून लिंगदेहादि ब्रह्मांडपर्यंत जगत् निर्माण केलें. त्यांतील आमोद ह्म० गंध जो त्यापासून सुनास, उत्तम प्रकारचें नासिका इंद्रिय जालें, आणि श्रुति ह्म० शद्बापासून श्रवणेंद्रिय होऊन श्रवण करावयासि रिघालें ह्म० प्रवृत्त झालें. आणि रूपापासून नेत्रेंद्रियाची उत्पत्ति ह्मणोनि लोचनचि रूपवान् आरसे पहावयासि उठिले. दुसरीं इंद्रियें रूपवान् पदार्थास पाहून उठलीं नाहींत, कारण जे जातीला जातीचेंच ग्रहण करितें ह्मणून.

जीभ वोळली रसें । कमल सूर्यपणें प्रकाशे ॥
चकोर कां जैसे । चंद्रमा जाला ॥ २ ॥

जिव्हेंद्रियाचि उत्पत्ति पुढें पांचवे वोवीनें सांगिजेल, आतां रसात्मक जिव्हा ह्मणून जीभ जे ते रसाप्रत वोळली, रस घेऊं लागली. आणि नेत्रकमळ जे तीं सूर्यपणें, सूर्यप्रकाशानुग्रहास्तव प्रकाशित जालीं. जैसा चकोरपक्षी चंद्रातें पाहून आल्हादातें पावतो तैसा मानसचकोर जो तो चंद्रातें पाहून चंद्रमा जाला, चंद्रासारिखा शीतळ जाला. कारण जे परमेश्वराचें चंद्र जो तो मन होय ह्मणून. अस्तु जीवाचें मन जें तें सजातीला सजातीय भेटतें आणि आल्हादातें पावतें हा भाव. आतां गुणाची आणि जीवाची उत्पत्ति सांगतात,

फुलें जालीं भ्रमर । तरुणिया जाहले नर ॥
जाला आपुला सेजार । निद्रालुचि ॥ ३ ॥

तरुणी ह्म० नित्यनूतन माया जे तिच्या योगेंकरून सत्व-रज-तम हे तिन्ही गुण होते जाले. निद्राळू जो एक जीव तोचि स्वप्नासारिखा आपला सेजार आपणचि नाना जीवत्वें होता जाला. आणि ते नाना जीव जे ते वेदवाणींनें पुष्पित कर्मफळें जीं त्यातें पुष्पास भ्रमर जैसे लुब्ध होतात तैसे जीव जे ते लुब्ध होते जाले. आतां प्राणाची उत्पत्ति आणि पंचमहाभूतांची उत्पत्ति सांगतात,

आपुलेनि समीरपणें । वेल्हावती विंझणें ॥
माथेचि चापेपणें । बहकताती ॥ ४ ॥

जगत्प्राणसूत्रात्मा जो तोचि आपले समीरपणेंकरून प्रतिशरीरीं प्राणरूप जाला. ह्मणून विंजण्यासारिखे प्राणापानादि वेल्हावती, आंतबाहेर संचार करितात. माथे म्ह० पहिले अपंचीकृत पंचमहाभूतें जे तेचि चांपेपणें बहकताति, पंचमहाभूतत्वें शोभताती. आतां वागिंद्रिय रसनेंद्रिय या दोन्हींची आणि स्थूळ देहाची उत्पत्ति सांगतात,

चूतांकुर जाले कोकिल । अंगवले मलयानिल ।
रस जाला रसाल । रसनावंत ॥ ५ ॥

चूत ह्म० चंचल जो वायु त्याचा अंकुर, कार्यरूप जो अग्नि तो कोकिळ तल्लक्षण चत्वारि वाणी ते वदणार वागिंद्रियरूप होता जाला. आणि अपंचीकृत रस जो तो रसाळ, रसास्वादन करणारी, रसना जी तद्वत् होता जाला. मलयानिळ तल्लक्षण गंधवती पृथ्वीसहित पंचमहाभूतें जे ते अंगवले, स्थूळदेहरूप होते जाले. आतां परमात्मदृष्टींनें कोरीव कांतीव घडलें जें ब्रह्मांड त्याचें वर्णन करितात,

दिठिवियाचा रवा । नागरियेचा ठेवा ।
घडिला कोरिवा- । परि जैसा ॥ ६ ॥

जैसा सुवर्णाचे सुताचा रवा कोरीव कातिवाचे परी वर्तुळ घडला जातो, तैसे परमात्म दृष्टीनें वर्तुळब्रह्मांडरूप रवा कोरीव कातिवाचे परि घडिला आहे. त्याजमध्यें चतुर्दशभुवनें आहेत आणि नागरिक जनाचा ठेवा, रहावयाचें स्थान जैसें नगर असतें

तैसे देव–तिर्यङ्–मनुष्यादिकांचें वसावयाचें स्थान हें ब्रम्हांड होय. आतां हें संपूर्ण जगत् जें तें परमात्मदृष्टीनेंचि घडलें ऐसें सांगतात,

**तैसें भोग्य-भोग-भोक्ता । दृश्य-दिसणें देखता ।**
**हें सरलें अद्वैता । अफूटामाजि ॥ ७ ॥**

हें ब्रह्मांडादि जगत् वार्णिलें आणि तैसेंचि भोग्य ह्म० विषय आणि त्यांचा इंद्रियद्वारा उपभोग घेणें तें भोगणें होय, आणि भोक्ता जीव आणि दृश्य आणि दिसणें ह्म० दृष्टि आणि देखणारा द्रष्टा हे संपूर्ण अफूट ह्म० भेदातें पावला नाहीं ऐसा जो अद्वैतपरमात्मा त्याचे ठायीं होऊं सरले ह्म० होते जाले. अहो, हें संपूर्ण वर्णिलेलें जगत् जें त्याहून त्याचा कर्ता वेगळा राहून संपूर्णाला विस्तारातें पाववीत असेल कीं, ? यासि उत्तर,

**सेवंतेपणा बाहेरी । न निघतांचि परि ।**
**पातीं सहस्रवरी । उपलविलीं ॥ ८ ॥**

जैसें सेवंतीचें झाड जें तें सेवंतेपणाबाहेरी तरि निघालें नाहीं, परंतु पातीं, पत्रें, सहस्रावधि उपलविलीं, विस्तारातें पावविलीं, तैसा पुरुषसूक्ताचे ठायीं प्रतिपादित पुरुष जो तो तो संपूर्ण जगताबाहेर तरि निघाला नाहीं, परंतु सहस्रावधि जगत्सृष्टि विस्तारातें पावविली. सहस्र शब्द अनंताचा वाचक होय ऐसें जाणावें. आतां वेद जो तो एक अद्वितीय परमात्मियावांचून दुसरें वर्णन करीत नाहीं ऐसें सांगतात,

**नवनवा अनुभवीं । वाजतां वाधावी ।**
**परि अन्योक्ति चांगावी । न निघे ते ॥ ९ ॥**

पुष्कळ वाध्या असतात ज्यास ऐसा जो वाधावी ह्म. मृदंग तो नव्या अनुभवें करून उभयतोमुख वाजतो. परंतु तो अन्योक्तीचे गांवीं न निघे, ह्मणजे एक ध्वन्यात्मक शब्दाचे बाहेर निघून बोलत नाहीं; तैसा व्याकरणादि अनेक अंगें आहेत ज्यास ऐसा जो प्रवृत्ति-निवृत्ति-उभयपर वेद जो तो उक्ति, शब्दातें बोलतो, परंतु तो एक अद्वितीय परमात्मस्वरूपाहून बाहेर निघून बोलत नाहीं. सारांश अद्वितीय वस्तुचे ठायीं तात्पर्य ठेऊनच अनेक प्रकारें वेद बोलतो हा भाव. आतां जीवन्मुक्त स्थितिचा प्रकार वर्णितात,

विषयाचेनि नांवें । सुखें इंद्रियांचे थवे ।
सैरा घेती धावे । समोरही ॥ १० ॥

परि आरिसा शिवों शिवे । तव दिठी दिठींतें फावे ।
तैसे झाले भवे । वृत्तिचे या ॥ ११ ॥

इंद्रियांचे थवे, समुदाय जे ते समोर विषयांचे नांवें सुखें सैराटपणें करूनहि धांवे घेती, परंतु जैसी दृष्टि जे ती आरशातें शिवली कीं नाहीं तंव दृष्टीला प्रथम दृष्टीच फावती, दिसती; तैसें यया वृत्तीस जालें. ते दृश्य पाहण्याचे पूर्वीच ब्रह्मवस्तूची प्रतीती घेती. अहो, दृष्टीसी तरी नामरूपात्मक जगत् ज्ञानियासि दिसत असेल कीं? यासि उत्तर,

नाग मुदी कांकण । त्रिलिंगी भेदली खूण ।
येतां तर्‍हिं सुवर्ण । घेइजे कीं ॥ १२ ॥

स्त्रीपुरुषनपुंसक त्रिलिंगी अलंकारनामें नाग-मुदी-कांकण ह्मणून सुवर्णाची खूण जरि भेदातें पावली, तरि सुवर्ण घेता जो तेणें सुवर्णत्वेंच घेइजेत कीं. तैसे स्त्रीपुरुषनपुंसक या तीन्ही लिंगेंकरून सच्चिदानंदवस्तूची खूण जरि भेदातें पाऊन नेत्रास दिसली तरि सकळ जगदाधिष्ठान परमात्माच बुद्धीनें ग्रहण करिजेतो. आतां जगत् दिसत असतां केवल ब्रह्मानुभवाचा प्रकार सांगतात,

कां वेंचूनि आणूं कल्लोल । ह्मणौनि घापे करतल ।
तेथें तर्‍हिं निखल । पाणीच फावे ॥ १३ ॥

अथवा पाण्यावरील कल्लोळ वेंचून आणूं ह्मणोनि खालीं करतल घातलें तरि तेथें निखळ पाणीच फावे, सांपडे; तैसें दृश्यातें वेगळें ग्रहण करून घेऊं ह्मणून त्याचे तळीं वृत्ति घातली तंव तेथें तरि निखळ केवल ब्रह्मचि प्राप्त होतें. आतां इंद्रियें करून परमात्मयाचें ग्रहण होतें ऐसें सांगतात,

हातापासीं स्पर्शु । डोळेयापुढें रूपसु ।
जिभे गमे मिष्टांशु । कोणी एकु ॥ १४ ॥

परिमळापरौतें । असणें नाहीं कापुरातें ।
तैसें बहुतापरि स्फुरतें । तेंचि स्फुरे ॥ १५ ॥

हस्तानें स्पर्शत्वें ग्रहण केला, अथवा डोळ्यानें रूपत्वें दिसला, अथवा जिव्हेनें कोणीएक मिष्टांश गमला, परंतु कापूर जो तो परिमळापरता नाहीं ह्म० कापूर जो तो परिमळरूपाचि होय. तैसा परमपुरुष जो तो हस्तेंद्रियानें स्पर्शत्वें ग्रहण केला, अथवा डोळ्यानें रूपवान् दिसला, अथवा जिव्हेनें कोण्हीएक प्रकारें गोडकडूपणें वाटला, परंतु पुरुषसूक्तेंकरून वर्णिला जो पुरुष तो सर्वाधिष्ठान परमात्म चैतन्यावांचून नाहीं. तस्मात् बहुता प्रकारें जें स्फुरतें तें परमात्म चैतन्यचि स्फुरताहे, दुसरें कोणी नाहीं हा भाव.

ह्मणौनि शब्दादि पदार्थ । श्रोत्रादींचे संघात ।
घेयावया जेथें हात । उजू होति ॥ १६ ॥

तेथ संबंध होये न होये । तंव दिठीचें काइ आहे ।
मग असताचि नोहे । संबंधु ना ॥ १७ ॥

ज्ञानियाच्या इंद्रियसमुदायाचे हात ह्म० इंद्रियवृत्ति ज्या त्या शब्दादि पदार्थातें घ्यावें ह्मणून उजू होती, प्रवृत्त होतात. तेथें इंद्रियांचा आणि शब्दादि पदार्थांचा संबंध जाला कीं नाहीं, तंव इतुकियांत द्रष्टा जो याचे दृष्टिचें तेथें काय आहे ह्म० दृष्टीनें घ्यावयाजोगें पदार्थ कांहीं नाहींत; कारण जे अवघे माईक मृषा पदार्थ आहेत ह्मणून. अस्तु, ते दृष्टी ब्रह्मपरायण जाली, तेव्हां मग इंद्रियाचा आणि इंद्रिय अर्थाचा परस्परें संबंध असताचि नोहे ना ह्म० इंद्रियें जे ते दृश्याचें ग्रहण करीत नाहींत हा भाव. अहो, ज्ञानी जो येणें अंतर्मुख दृष्टी केली असतां देहत्रयासि तरि पहात असेल कीं ? यासि उत्तर.

जियें पेरीं दीसती उसीं । तियें लाभती रसीं ।
कां कला निवडे शशी । पुनवेचिया ? ॥ १८ ॥

जैसीं उसाचीं पेरीं, कांडीं, ऊस गाळल्याचे पूर्वीं दिसतात तितकीं पेरीं गाळल्यावरि रसाचे ठायीं लाभति ह्म० दिसतात काय? रसाचे ठायीं उसाचीं पेरीं दिसत नाहींत, तैसे देहत्रयरूप पंचकोश जे त्यांतें द्रष्ट्याची दृष्टि जे ती दृश्यत्वें पाहत होती, त्यातें गाळून, सोडून, प्रत्यङ्मुखत्वें द्रष्टा जो तो ब्रह्मीं एकरस जाला, तेव्हां पंचकोश दिसत नाहींत, मग संबंध तो कैचा? अहो, द्रष्ट्याची दृष्टि जे ते पंचकोशांतें पाहून वेगळी राहत होती, तैसी ब्रह्मानुभवप्रसंगीं वेगळी राहत असेल कीं? यासि

उत्तर. पूर्णिमेच्या चंद्राची कळा वेगळी निवडत असती काय? कळा चंद्राहून वेगळी निवडत नाहीं जैसी, तैसा पूर्ण वस्तूच्या बोधेंकरून पूर्णतेप्रत पावला जो द्रष्टा त्याची संविद्रूपा कळा जे ते वेगळी निवडत नाहीं. कारण जे द्रष्टा जो तो पूर्णतेप्रत पावला म्हणून. अहो, तुह्मी बोलिले होते जे इंद्रियेंकरूनहि परमात्मयाची भेटी होती ते कैसी? यासि उत्तर,

पडिलें चांदावरि चांदिणें। समुद्रीं जालें वरिखणें।
विषय-विषयीं करणें। भेटती तैसीं ॥ १९ ॥

चंद्राचें चांदणें जें तें चंद्रावरि ह्म० आपलें प्रतिबिंबावरि पडून प्रकाशाची वृष्टी समुद्रावरि करिते जाले जैसे, तैसें परिपूर्ण वस्तुज्ञानवान् द्रष्टयाचें ज्ञान जें तें विषयी ह्म० प्रमाता चिदाभास जो त्याचे ठायीं प्राप्त होऊन बुद्धींद्रियद्वारां विषयातें भेटतें. सारांश, सर्वरूपेंकरून ज्ञानियाचीं इंद्रियें जे तीं सच्चिदानंद परमात्मा जो त्याजप्रत भेटतात. आतां जैसा परमात्मियाचा आत्मविलास होत असतां त्याची केवलब्रह्मरूपता मोडत नाहीं, ऐसाच प्रकार ज्ञानियाचा वर्णितात,

ह्मणौनि तोंडा आड पडे। तेचि वाचा वावडे।
परि समाधि न मोडे। मौनमुद्रेचा ॥ २० ॥

ज्ञानी जो तो ब्रह्मचि ह्मणोनि त्याचे तोंडा आड पडे ते वाचा वावडे ह्म० तोंडास येईल तें वाचा वावरती. परंतु मैानमुद्रेचा समाधि मोडत नाहीं; कारण जे त्याचे स्वरूपीं वाग्व्यापार नाहीं ह्मणून.

व्यापाराचे गाडे। मोडतांहि अपाडें।
परि अक्रियेचें न मोडे। पाउल कहीं ॥ २१ ॥

ज्ञानियाचे मनोव्यापाराचे गाडे जे ते अपाडें, सीमेपरते, होऊन होऊन जरि मोडले, परि त्याचे अक्रियतेचें पाऊल कधींही मोडत नाहीं, ढळत नाहीं.

पसरौनि वृत्तिचीं वावें। दिठी रूपातें दे खेंवें।
परि दृश्याचेनि नांवें। कांहींच न देखे ॥ २२ ॥

ज्ञानियाची दृष्टि जे ते वृत्तीचीं वावें पसरूनि ह्म० नेत्रेंद्रिय वृत्ति प्रशस्त करून रूपातें खेंव ह्म० भेटी देती. परंतु दृश्याचे नामेंकरून कांहींच पहात नाहीं. अहो, अज्ञानातें तरि दृश्यत्वें करून ज्ञानी जा तो पाहत असेल कीं? यासि उत्तर,

तमातें घ्यावया । उचलिल्या सहस्र बाहिया ।
परि सेवटीं रवि एया । हाचि जैसा ॥ २३ ॥

जैसा तमातें ग्रहण करावयासाठीं सहस्र किरणें ह्याचि कोण्ही एक बाह्या उचलिल्या जरि, परंतु सेवटीं रवि जो तो आपण आपणातेंच जैसा, तैसें अज्ञानातें ग्रहण करावयासाठीं ज्ञानी जो एणें सहस्रावधि वृत्तीच्या बाह्या उचलिल्या जरि तरी सेवटीं विचारपरिपाकांतीं स्वप्रकाशरूपत्वें ज्ञानी जो तो आपण आपणातेंचि आहे.

कां स्वप्नींचिया विलासा । भेटेन इया आशा ।
उठिला तंव जैसा । तोचि तो कीं ॥ २४ ॥

अथवा जैसा कोण्ही एक जो तो स्वप्नांतील विलासातें भेटेन या आशेनें जागा होऊन उठिला तंव तोचि तो कीं, तैसा ज्ञानी जो तो संसारस्वप्नविलासातें भेटेन, अनुभवीन, या आशेनें स्वरूपीं जागा होऊन संसारस्वप्नविलासातें भेटावयासि उठला, प्रवृत्त जाला, तंव तो ज्ञानी आपला आपणाचि कीं ! दुसरें कोण्ही नाहींच.

तैसा उदेलेनि विषयें । ज्ञानी विषयी होऊं जाये ।
तंव दोन्ही नहोनि होये । काई नेणों ! ॥ २५ ॥

तैसा, त्याचिप्रकारें, ज्ञानी जो त्यास तत्वज्ञानेंकरून उदयाप्रत पावला जो पूर्णात्मा विषय तेथें ज्ञानी जो तो विषयी होऊं जाय, तंव विषयी म्ह० प्रमाता आणि प्रमाणरूपा चरमवृत्ति हे दोन्हीही न होनि म्ह० नाहींसे होऊन काय होय तें आह्मी जाणत नाहींत. कारण जे तेथें जाणावयासि कोण्ही राहत नाहीं ह्मणून. अहो ज्ञानियासि ऐसें जाल्यानंतर दृश्याचें पाहणें घडत नसेल कीं ? यासि उत्तर,

चंद्र वेंचों गेला चांदिणें । तंव वेंचिलें काइ कवणें ।
विऊनि वांझे स्मरणें । होती जैसीं ॥ २६ ॥

चंद्र जो तो आपले प्रभेचें चांदणें वेंचून घेऊं गेला असतां तेथें कोण्ही काय वेंचलें जातें ? तैसा द्रष्टा जो येणें आपले दृष्टीचें चांदणें हें दृश्यमान जगत् यातें पाहिलें आणि ग्रहण केलें तरि काय जालें ? दृश्याचे दृष्टिहून जगत् वेगळें नाहीं हा भाव. अहो ज्ञानियास दृश्याचें स्मरणहि होत नाहीं कीं काय ? यासि उत्तर, जैसी वंध्या जे इजला पुत्रइच्छा अध्यासयोगें स्वप्नाचे ठायीं ऐसें वाटलें जें मी वियालें आणि मजला पुत्र जाला. ते जाग्रत्काळीं स्मरती जाली, तथापि उभयकाळींही वंध्येस

पुत्र नाहीं तैसा स्वप्नतुल्य व्यवहार जो त्याचें स्मरण ज्ञानियासि जालें तरि तें मिथ्या होय, कारण जे व्यवहार मिथ्या आहे ह्मणून. आणि ब्रह्मविषयक बोधाचें स्मरण जालें तरि तेंहि मिथ्या होय, कारण जे ज्ञानियाचें शुद्ध स्वरूप ब्रह्म जें त्याचे ठायीं बोध नाहीं ह्मणून. आतां ज्ञानियापेक्षा योगी जे ते निकृष्ट होत ऐसें सांगतात,

प्रत्याहारादि अंगीं । अंग टेंकिलें योगी ।
ते जाले एया मार्गीं । दिहाचे चांदु ॥ २७ ॥

प्रत्यादारादि अष्टांग योगाचे ठांई योगी जे यांहीं अंग टेंकिलें ह्म० यावत् आयुष्यपर्यंत देह समर्पण केला. परंतु ते ज्ञानियाचे सहजास्थितीचे राजमार्गाविषयीं दिहाचे चांद जाले, दिवसाचे ठायीं निस्तेज चंद्र असतो तैसे जाले. कारण जे योगियासि प्रवृत्तिकाळीं जगत् सत्य आणि त्याचा बोधहि सत्य आहे, जागृब्दोध दुःख देतो ह्मणून स्वस्थतेसाठीं निर्विकल्प समाधि करावा लागतो, आणि पुनरपि जागृतीवर येते वेळीं स्वस्थता स्मरती जे एतावत्काल मी सुखी होतों; ऐसें ज्ञानियाचे सहज स्थितींत होणें नाहीं म्हणून ज्ञानियाचे समतेसी योगी येत नाहीं हा भाव. आतां पूर्णज्ञानियाची सहजस्थिती वर्णितात,

येथें प्रवृत्ति बहुडे जिणें । आणि निवृत्तीसि बाधणें ।
आतां प्रत्यङ्मुखपणें । प्रचारु दिसे ॥ २८ ॥

येथें, ज्ञानियाचे सहज स्थितीचे ठायीं दृश्य द्रष्ट्रत्वरूपा प्रवृत्ति जे ते जीवेनसी बहुडली ह्म० ब्रम्हवस्तूचि सत्य आहे, त्यावांचून दुसरें सत्य नाहीं या अनुभूतियोगें प्रवृत्ति गेली; आणि निवृत्ति ह्म० ज्ञानियाचे संबंधें वर्तणारी निषेधरूपा अनुभूति जे ते अनुभवित्यासहित बाधित, मिथ्या जाली. अस्तु, आतां पूर्णज्ञानी जो याचा प्रचार, गति, प्रत्यङ्मुखपणेंच अन्य पूर्णज्ञानियातें दिसती. अज्ञास ज्ञानियाची गति कळत नाहीं हा अभिप्राय. आतां सहज स्थितीचा महिमा वर्णितात,

द्वैतदशेचें अंगण । अद्वैत वोलगे आपण ॥
भेद तंव तंव दूण । अभेदासि ॥ २९ ॥

ज्ञानियाचें अंतःकरण जें तें पूर्वील द्वैतदशा अनुभवायाचें अंगण म्ह० स्थान होय. त्याचे ठायीं अद्वैत परमात्मतत्व जें तें आपलें आपण वोळगतें, येऊन राहतें. आणि दृश्य-द्रष्ट्रत्वेंकरून जंव जंव भेदप्रतीति होती, तंव तंव अभेदासि

दुणी होती म्ह० द्रष्टा जो तोहि परमात्मस्वरूपचि ऐसीं दोन्हीही प्रकारें परमात्मरूपाची अभेदप्रतीती होती. आतां ज्ञानियाची सहज स्थिती जे तीच परमभक्तित्वें वर्णितात,

कैवल्याही चढावा । करीत विषयसेवा ॥
जाला भक्त-भज्य-कालवा । भक्तिच्या घरीं ॥ ३० ॥

शब्दस्पर्शादिसंपूर्णविषयरूप अद्वितीय परमात्मा जो त्याचें सेवन जें तें ज्ञानियाचें विदेहकैवल्य जें त्याचाही चढावा करितें, अधिकत्वें वर्ततें. कारण जे ज्ञानियाचा देह पडल्यावरी सुखस्वरूप परमात्मसेवन नाहीं ह्मणून. अस्तु, या सहजस्थितिरूपा अभेदभक्तीचे घरीं भक्त-भज्य म्ह० जीवेश्वर जे यांचा कालवा, एकीभाव, जाला.

घरामाजि पाये । चालतां मार्गु होये ॥
ना बैसे तरि आहे । पावणेंचि ॥ ३१ ॥

विस्तीर्ण गृहामध्यें शतपावली करावयासाठीं चालिलें तरी मार्ग चालिल्यासारखें होतें काय ? चालिल्यासारिखें होत नाहीं. कारण जे तो घरांतचि आहे ह्मणून. अथवा घरांत बसला तरि गृहातें पावणेंचि आहे. तैसा परमात्मयाचा स्थूळ देह ब्रह्मांड जें त्याचे ठायीं ज्ञानी जो तो प्रयागादि तीर्थातें गेला तरि नूतन गेल्यासारिखा होत नाहीं; कारण जे तेथें पूर्वी व्यापकत्वेंचि आहे म्हणून, अथवा प्रयागादि तीर्थातें व्यापकत्वें करून त्याचें पावणेंचि आहे. सारांश ज्ञानियातें कोठें जाणें न जाणें नाहीं हा भाव.

तैसें भलतेंही करितां । येथें कांहीं पाहिजे आतां ।
तैसें कांहीं न करितां । ठाकिजेना ॥ ३२ ॥

तैसें, त्याचि प्रकारें, भलतेंहि यज्ञादि कर्में करितां, येथें ज्ञानियाचे ठायीं श्रेयप्राप्ति अथवा फलप्राप्ति आतां पाहिजे ती काय ? पाहिजेत नाहीं. त्याचि प्रकारें यज्ञादि कर्में कांहीं ज्ञानियानें न करितां त्याचें मोक्षाख्य फळ जें तें ठाकिजेना काय ? ह्म० पाविजेना काय ? पावलेंचि आहे.

आठव आणि विसरू । तेयातें घेवों नेदी पसरु ।
दशेचा व्यवहारु । असाधारणु ॥ ३३ ॥

स्वस्वरूपाचा आठव आणि विसर यातें पसर घेऊं देत नाहीं ऐसी जे दशा ह्म० ज्ञानियाची सहज स्थिती जे तीचा व्यवहार असाधारण होय, साधारण नव्हे हा भाव.

जाली स्वेच्छाचि विधि । स्वैर जाली समाधी ।
दशा या मोक्षसिद्धि । बैसों घापें ॥ ३४ ॥

स्वस्वरूपीं रमावें ही इच्छा जे तेचि ज्याची विधि जाली आणि जिकडे जिकडे ज्ञानियाचें चित्त जें तें स्वैर म्ह० स्वच्छंदानें जाईल तिकडे तिकडे ब्रह्मचि आहे ह्मणून ते ज्ञानियाची समाधीच जाली. आतां फार काय सांगावें, या ज्ञानियाचे दशेला म्ह० सहजस्थितीला मोक्षसिद्धि म्ह० जीवन्मुक्ति जे ते बसों घालावी. सारांश, जीवन्मुक्तीच्या वरती हे सहजस्थिती होय हा भाव. आतां परमात्मा देव जो तोचि ज्ञानी होय ऐसें वर्णितात,

देवचि जाला भक्तु । ठावोचि जाला पंथु ॥
होऊनि ठेला एकांतु । विश्वचि हें ॥ ३५ ॥

नित्यद्योतमान परमात्मा देव जो तोचि ज्ञानी भक्त होता जाला, आणि मोक्षाचा ठाव ज्ञानी जो तो अन्यास मोक्षास पाठविण्याविषयीं पंथु, मार्ग जाला. अस्तु, फार काय सांगावें, ज्ञानी जो याजला हें संपूर्ण विश्वचि एकांत होउनि ठेला, एकांतचि होउनि राहिला, म्ह० एक अद्वितीय परमात्मियावांचून दुसरें कोण्ही नाहीं हा भाव. आतां ज्ञानी जो तो अन्याप्रतही देव करितो ऐसें वर्णितात,

भलतेउतेंनि देवें । भलतेंनि भक्त होआवें ।
बैसला तेथें राणीवें । अकर्म हा ॥ ३६ ॥

जैसा सार्वभौम चक्रवर्ती सम्राट् राजा जो तो जेथें बैसला तेथें त्याची राणीव असती, आणि तेणें ज्याजला राजा केलें तो राजा होतो आणि ज्याजला सेवक केलें तो सेवक होतो; तैसा हा इंद्रादिकांस पूज्य आणि त्रैलोक्यावरि ज्याची सत्ता ह्मणून सार्वभौम चक्रवर्ती स्वराट् ज्ञानी जो तो जेथें बसला तेथें पारमार्थिक सत्तेंकरून याचीच राणीव, राज्य आहे. आणि येणें उगेच पाहिलें असतां धातु-जळ-काष्ठ-पाषाण यांतील भलत्यानें देवत्वेंकरून व्हावें आणि मनुष्य-देव तिर्यक् यांतून भलत्यानें भक्त व्हावें, पूर्णज्ञानसंपन्न व्हावें, ऐसा हा ज्ञानियाचे दृष्टीचा महिमा होय. अस्तु, राजाचा दृष्टांत दिल्हा तो गौण होय, कारण जे राजा जो तो सकर्मक होय, आणि हा ज्ञानी अकर्मक होय ह्मणून. आतां ज्ञानी जो येणें पूजा करावयाचा देव कैसा आहे तो सांगतात,

देवाचिया दाटणीं । देउळां जाली आटणी ॥
देशकालादि वांटणी । होईचिना ॥ ३७ ॥

नित्य प्रकाशमान देव ब्रह्म जें त्याची सर्व दाटणी जाली, तेणेंकरून पिंडब्रह्मांडें हे अनेक देउळें जीं त्यांची आटणी होऊन नाहींसीं जालीं, तेव्हां ब्रह्मीं देशकाळादि वांटणी होईचिना. कारण जे देश-काल-वस्तु-परिच्छेदरहित देव आहे ह्मणून. अहो, हें जगत् देवाचे ठायीं कैसें जालें? यासि उत्तर,

देविं देवचि न माये । मा दैविकें असों पाहे ॥
तेथें परिचारबहुवें । अघटता कीं! ॥ ३८ ॥

परिपूर्ण चिदाकाश देव जो तोचि भरीव आहे ह्मणून आपण आपल्या ठायीं मात नाहीं. तेव्हां दैवी मूळमाया जे इणें कोंठे असों पहावें? मग त्या परिपूर्ण देवाचे ठायीं स्थावरजंगमात्मक जगत् हा मायेचा परिवार तरि अघटता कीं ह्म० कधींही जालाचि नाहीं कीं!

ऐसिया स्वामि-भृत्य-संबंधा । लागिं ऊठली जन्हि श्रद्धा ।
तन्हि देवचि नुसधा । मविजे कीं ! ॥ ३९ ॥

ऐसिया ज्ञानियाचे ठायीं स्वामिभृत्यसंबंध ह्म० सेव्यसेवकसंबंध घडावयालागी श्रद्धा जरि उठली तरि नुसधा, केवळ, देवाचि मविजे ह्म० देवभक्तपणें एक परमात्माचि मोजिजेतो कीं!

अवघिया उपचारा । जपध्यान-निर्धारा ।
नाहीं आन दुसरा । देवावांचुनी ॥ ४० ॥

गंध-पुष्प-धूप-दीप-नैवेद्यादि अवघ्या उपचारांस द्रव्य आणि जप करण्यास वाणी आणि ध्यानानिर्धारास मनबुद्धिदेहादि पदार्थ जे ते देवावांचुनी, परमात्मियावांचुनी, अन्य दुसरा प्रकार नाहीं.

आतां देवातेंचि देवें । देवोवरि भजावें ।
आपणाचेनि नांवें । भलतेया ॥ ४१ ॥

आतां ज्ञानी जो तो आपणाचि सर्व आहे ह्मणून भलतें कांहीं असेल त्यातें देववरि, देवाचे परी भजावें. अहो एक्या देवाचे अनेक पदार्थ कैसे घडतात? यासि उत्तर,

देव देऊळ परिवारु । कीजे कोरौनि डोंगरु ।
तैसा भक्तीचा व्यवहारु । कां न करावा ॥ ४२ ॥

जैसा डोंगर कोरोनि त्याचे ठायीं देव आणि देऊळ आणि परिवार करिजेतो तैसे परमात्मस्वरूपाचे ठायीं आपला देह आणि देही आणि इंद्रियपरिवार हे आहेत; तेव्हां भक्तीचा व्यवहार कां करूं नये? करावाचि हा भाव. अहो, ज्ञानी जो त्याजला भक्ति करावी वाटली तरि देवभक्ताचा भेद होतो कीं?

अहो मुगीं मूग जैसे । घेतां नेघतां आन नसे ।
केलें देवपण तैसें । दोहींपरी ॥ ४३ ॥

अभूत उपमा. अहो, जैसें मुगानें मुगाला मेळऊन घेतलें तरि मूगपण अन्य होत नाहीं, अथवा मुगानें मुगाला मेळऊन न घेतलें तरी मूगपण अन्य होत नाहीं; तैसें ज्ञानी जो तेणें देवदर्शन घेतलें तरी देवपण नवें केलें जात नाहीं—देवपण मूळचेंच आहे; अथवा देवदर्शन न घेतलें तरि ज्ञानी जो तो देवपणाहून अन्य होत नाहीं. ऐसें दोहींपरी देवपण केलें ह्मणून अनन्य भक्ती घडती, भेदभक्ती घडत नाहीं हा भाव. आतां प्रकृति—प्रधानवादी बोलतो, अहो, ज्ञनोबा, आमची प्रकृतीच सर्वदेवतारूपें विस्तारली असे, आणि तुह्मी तिचें नाम घेतलेंच नाहीं कीं? यासि उत्तर,

पाहे पां आघवेया । रुखीं रुखाची छाया ।
परि दूसरा नोहे तेया । विस्तारु जेविं ॥ ४४ ॥

पहा, रे प्रधानसांख्यवादी, जेंवि विस्तारपूर्वक वटाचा रुख, वृक्ष, असतो, त्या अवघ्या वृक्षावरि त्याची छाया असती; परंतु त्या छायेचा विस्तार आणखी दुसरा नसतो; तेविं संपूर्ण देवतारूपत्वें विस्तारपूर्वक एक परमपुरुषचि आहे, त्याची छायारूपा प्रकृति जे ते तयाचे ठायींच आहे, परंतु तिचा विस्तार पुरुषाचे विस्ताराहून दुसरा नाहीं; मग जगत्कारणत्वें प्रकृति ह्मणावयाचें कशास पाहिजे? आतां मायावादी बोलतो. अहो, आमची माया जे ती विद्या—अविद्या उभयरूपिणी आहे, तिजला ज्ञानियानें पुजावें कीं? यासि उत्तर,

आखताचि देवता । आखता न पूजितां ।
मा आखतीं काइ आतां । पूजों जावें ॥ ४५ ॥

धुवट तांदळाची अक्षता जे तीची देवता केली, ती न पूजितां अक्षतारूपाचि असे. मग अक्षतेनें आतां पुजूं जावें काय? पुजूं नये. तैसा परम पुरुष जो त्याचे प्रकृतीचाच अंश माया देवी ती वेगळी न पूजितां प्रकृतिरूपचि आहे, तेव्हां मग ज्ञानियाची बुद्धि जे तीणें मायेतें आतां पुजूं जावें काय? मायेचा नामोच्चार देखील करूं नये, मग पूजन तें कैचें? अहो, ब्रह्म-विद्यारूपा माया जे तिणें ज्ञान्याचे बुद्धीस प्रकाशित केल्यावांचून तत्वज्ञान कैसें होईल? यासि उत्तर,

दीप्तीचीं लुगडीं। दीपकलिके! तूं वेढी।
हें न ह्मणतां ते ऊघडी। ठाके काई?॥ ४६॥

अगे दीपकळिके, दीप्तीचीं, प्रकाशतेचीं लुगडीं तूं वेढून घेई, ऐसें कोण्ही ह्मटलें तरी ते दीपकळिका प्रकाशाचीं लुगडीं नेसतो; नाहीं तर उघडी ठाकती काय? उघडी ठाकत नाहीं. तैसी चिदाभास तल्लक्षण दीपाची कलिका बुद्धि जे तीतें प्रकाशमान विद्येनें केलें तरि प्रकाशित होती, नाहीं तरि बुद्धि जे ती प्रकाशित होत नाहीं काय? प्रकाशित आहेचि आहे. आतां प्रकृति प्रधानवादी बोलतो,

कां चद्रांतें चंद्रिका। न ह्मणिजे पां लोका॥
तर्‍हि तो असिका। तोचि तो कीं॥ ४७॥

अहो ज्ञानोबा, लोकांचे ठायीं चंद्रातें चंद्रिका ऐसें न ह्मणिजे काय? ह्मणिजे तेच. तैसे आह्मी प्रधानवादी जे ते पुरुषातेंच प्रधान प्रकृति ऐसें ह्मणतों. आतां सिद्धांती उत्तर देतात. अरे प्रधानवादी सांख्य, तुवां पुरुषालाच प्रकृति ऐसें जरि ह्मटलें तरि प्रकृतिसहित असे तोचि तो कीं, ह्म० अवघा पुरुपचि आहे कीं? हें पूर्वी वटवृक्षाचे दृष्टांतें सांगितलेंचि आहे. आतां मायावादी वेदांती बोलतो,

आगीपण आगी। असतचि असे अंगीं।
मा कासयालागीं। दीपन देणें?॥ ४८॥

अहो ज्ञानोबा, अग्नीचे अंगीं आगीपणा, दाहकशक्ति जे ती असताचि असे. तैसी परमेश्वराचे ठायीं सर्व प्रपंचाचें दहन करण्याविषयीं विद्याशक्ति आहेच कीं? आतां सिद्धांती उत्तर देतात. अरे मायावादी वेदांती, या ईश्वराचे ठायीं विद्याशक्ति असली तरि असेना कां? आह्मीं नाहीं ह्मणतों काय? परंतु पूर्वी तुझें बोलणें पडलें जे ज्ञान्याचे बुद्धीस विद्यारूपिणी माया प्रकाशित करती, त्यास ऐसें नाहीं. ज्ञानियाची

बुद्धि जे तीतें अंतरात्माचि प्रकाशित करतो. मग जैसें भांड्यास लखलखी येण्या-साठीं दीपण देतात तैसें बुद्धीला प्रकाशित करण्यासाठीं विद्यारूपिणी मायेनें दीपन देणें, प्रकाशित करणें कशास पाहिजे ?

ह्मणौनि भजतां भजावें । मा न भजतां काय चेवे ॥
ऐसें नाहीं स्वभावें । श्रीशिउचि असे ॥ ४९ ॥

अरे प्रधानवादी मायावादी हो, परमपुरुषाहूनि आणि परमेश्वराहून प्रकृति आणि माया या ज्या त्या काय वेगळ्या आहेत ह्मणून भजता ज्ञानी जो येणें भजावें ह्मणतोस ? तरि ऐसें नव्हेः पुरुष आणि ईश्वर ज त्यांहून प्रकृति माया ह्या वेगळ्या नाहींत. मा ह्म० अथवा प्रकृति आणि मायेतें ज्ञानीं जो तो न भजतां तो सहजस्थितीतें काय चेवे ह्म० चळण पावतो काय ? चळण पावतो ऐसें नाहीं. प्रकृतिपु ष आणि मायाईश्वर या संपूर्णाच्या रूपेंकरून स्वभावें ह्म० सहज-स्थितीनें श्रीशिउचि असे ह्म० एक अद्वितीय परमात्माचि आहे, दुसरें कांहीं नाहीं.

आतां भक्ति अभक्ति । जालें ताट येके पांती ॥
कर्माकर्माचिया वाती । मालवौनिया ॥ ५० ॥

ज्ञानियासि आणि परमात्मियासि भेद उरला नाहीं, ह्मणोनि आतां कर्मा-कर्माच्या वाती मालवोनि ह्म० पापपुण्याच्या वासना नाहींशा करून भक्ति-अभक्ति विरुद्धधर्मवान् असतांहि या उभयहि ज्ञानियाचे सहजस्थितीचे घरीं एका पंक्तीस बसून जेवल्या. सारांश भक्ति-अभक्ति समान झाल्या हा भाव.

ह्मणौनि उपनिषदें । अथातादेशादि निंदे ॥
ते निंदाचि विशदें । स्तोत्रें होतीं ॥ ५१ ॥

ज्ञानी जो तो ब्रह्मरूपचि होय ह्मणोनि ‘ अथात, ’ ‘ आदेशोन ’ इति या प्रकारें द्विवार निर्देश करून श्रुति सांगती जे ब्रह्मीं कांहीं एक नाहीं ऐसी निंदा, निषेध, करिती; परंतु ते श्रुतिनें निंदा जे केली तींचि ज्ञानियाचे हिशोबीं स्तोत्रें होतीं ह्म० आपली स्तुति होय.

नातरि निंदा स्तुति । दोन्ही मौनासाठीं जाती ॥
मौना मौन आथी । न बोलतांही ॥ ५२ ॥

नातरि, अथवा, कोण्ही कोण्हाची निंदास्तुति करूं लागलें ह्मणजे ऐकल्यानें मौनाचा अवलंब केला असतां अन्यानें केलेली निंदास्तुति ह्या दोन्हीही मौनासाठीं जातात, निवृत्त होतात. तैशा श्रुति ज्या यांहीं ज्ञानियाची स्तुति निंदा केली ह्म० विधिनिषेधवाक्यांतें बोलिल्या. तेव्हां ज्ञानी जो येणें मौनाचा ह्म० अशद्व मौनस्वरूप ब्रह्म जें त्याचा स्वीकार केला, तेव्हां श्रुति ज्या त्यांनींही मौन धारण केलें ह्म० ब्रह्मीं पर्यवसित जाल्या हा भाव. कोण्ही एक पूर्वी बोलत असतो आणि मग मौन धारण करितो तैसें ज्ञानियाचें स्वरूप नव्हे. श्रुति ज्याचें वर्णन करिती जे अशद्व, अस्पर्श आहे ह्मणून. असो, त्या मौनस्वरूपास न बोलतां हि मौन असें आतां ब्रह्मरूपें आणि अज्ञानियाचे रूपत्वेंकरून ज्ञानियाचें वर्णन करितात,

घालितां अव्हासवा पाये । शिवयात्रा होत जाये ।
शिवा गेलिया नोहे । केंही जाणें ।। ५३ ।।

ज्ञानी जो तो आव्हासवा ह्म० कोणतेही दिशेस पाउलें घालीत गेला तरि त्याजला पदापदाचे ठायीं शिवयात्राचि होत जाती. कारण जे शिवपरमात्मियाचें ब्रह्मांडरूप शरीरामध्येंच ज्ञानी परिभ्रमण करितो ह्मणून. आणि काशीप्रत अथवा अन्य कोठें शिवदर्शनास ज्ञानी गेला असतां केंही ह्म० कोठेंही त्याचें जाणें होत नाहीं. कारण जे ब्रह्मरूपें ज्ञानी सर्वव्यापक आहे, त्यास जाणें येणें नाहीं ह्मणून. आतां परोक्षज्ञानी जो तो आशंका घेऊन बोलतो,

चालणें आणि बैसक । दोन्ही मिळौनि एक ।
नोहे ऐसें कवतूक । एया ठायीं ।। ५४ ।।

अहो ज्ञानोबा, चालणें, गति, आणि बैसक, स्थिति, या विरुद्ध धर्म असतां दोन्ही मिळून ज्ञानियाचे ठायीं एकत्र कैशा राहतील ? आतां सिद्धांती उत्तर देतात, ब्रह्म अपरोक्ष ज्ञानियाचे ठायीं तूं ह्मणतोस हें कवतूक ह्म० आश्चर्य नव्हे. स्थितिगति या दोन्हीही ज्ञानियास उभयरूपें करून एकसमयावच्छेदें घडतात त्या ऐशा. ब्रह्मरूपेंकरून ज्ञानी जो तो निश्चल बसल्यासारिखाही आहे आणि दूर गेल्यासारिखाही आहे.

यऱ्हवीं अडळलिया डोळा । शिवदर्शनाचा सोहळा ।
भोगिजे भलतिये वेळा । भलतेनही ।। ५५ ।।

यऱ्हवीं, सहज रीतीनें पाहिलें असतां, सर्वरूपेंकरून परमात्मा शिव जो त्याचे दर्शनाचा सोहाळा जो तो भलते वेळेस ह्म० ज्ञान-अज्ञानकाळीं, भलतेनें ह्म० ज्ञानी-अज्ञानी जे यांहीं भोगिजेतो. परंतु अज्ञानी शिवदर्शनाचें सुख न जाणून भोगितो आणि ज्ञानी जो तो जाणून भोगितो हा अभिप्राय. आतां परमात्मयाची आणि ज्ञानियाची समानता होय ऐसें सांगतात,

कां समोर असे शिवही । परि देखिलें कांहींच नाहीं ।
जे देवाभक्तां दोहीं । सरिसा पाडु ॥ ५६ ॥

अथवा ज्ञानी जो यासि सर्वरूपेंकरून परमात्मा शिवही जरि दिसला, परंतु ज्ञानी जो येणें कांहींच देखिलें नाहीं. कारण जे शुद्ध भूमास्वरूपीं हें कांहीं नाहीं ह्मणून. आतां शुद्ध भूमास्वरूप देवाचें आणि शुद्ध भूमाख्य ब्रम्हस्वरूप भक्ताचें म्हणून देव आणि भक्त या दोघां सरिसा पाडु म्ह० समान योग्यता होय. आतां परोक्ष ज्ञानवान् असतां मुक्तपणाचा अभिमान वाहणार जे त्यांस सांगतात,

आपणचि चेंडू सुटे । मग आपणया उपटे ॥
तेणें उदललां दाटे । आपणपांचि ॥ ५७ ॥

ऐसी जऱ्हि चेंडूफळी । देखिजे कां येकि वेळीं ।
तऱ्हि बोली सरली । प्रबोधाची ॥ ५८ ॥

परमात्मा जो तो सृष्टि उपक्रम काळीं चेंडूसारिखा आहे, वर्तुळ आकार जो तो ज्याचा ऐसें जें ब्रह्मांड तद्रूपें साकार आपणाचि होत सुटतो. मग उपसंहार काळीं आपला आपणचि उपटे, प्रत्यङ्मुख होतो. तेणें उदळला, उल्हासला, होत्सांता आपणपांचि दाटे ह्म० आपले पूर्वब्रह्म भूमा स्वरूपीं एकीभाव पावतो. ऐसी हे पूर्ण शंभूची चेंडू फळी, कंदुक क्रीडा जैसी होती, तैसी ज्ञानी जो येणें आपले पूर्ण स्वरूपीं सकृत् एक वेळ जरि जाऊन पाहिली तरि बोली सरली प्रबोधाचा ह्म० श्रुति सर्वांस सांगती जे स्वरूपीं जागे व्हा ह्मणून, ते बोली जे ते या पूर्ण ज्ञानियाविषयीं सरली ऐसें जाणावें. अस्तु, ऐसा प्रबोधन जाला असतां तेणें पूर्णवस्तुविषयीं जागें व्हावें हें अर्थात् सिद्ध जालें. आतां ज्ञानी जो तो आपलीच उपासना आपण करितो ऐसें सांगतात,

कर्माचा हात न लागे । ज्ञानाचें कांहीं न रिगे ।
ऐसीच होत अंगें । उपास्ति हे ॥ ५९ ॥

ज्या पूर्ण स्वरूपीं कर्माचा हस्तस्पर्शही होत नाहीं आणखी तत्वज्ञानाचीं श्रवण-मननादि अंगें आहेत त्यांतील कांहींच न रिघे, ऐसें जें भूमा अनंत ब्रह्म तेंच मी ऐसाच हे उपास्ति ज्ञानियाची निजांगें होत असे. आतां तो ज्ञानी जो तो आपलेंचि सुख ग्राह्यग्राहकत्व न होतां सेवितो ऐसें सांगतात,

निफजे ना निमे । आपेंआप घुमे ।
सुखासुख उपमे । देवलसिया ॥ ६० ॥

देवलसी ह्म० कोण्ही एक देव ज्याचे अंगांत संचरला आहे तो देवलसी जो तो आपोआप घुमे, आपले ठायीं आपण घुमत असतो, आणि त्याचें सुख निफजे ना निमे ह्म० उत्पन्न होत नाहीं आणि नाहींसेंहि होत नाहीं, त्याचें सुख त्याचे अंगींच असतें. तें देवलसियाचें सुख आहे उपमा ज्ञानियाचे सुखास, ऐसा ज्ञानी जो तो आपले स्वस्वरूप ब्रह्मींच रममाण असतो. त्याचे सुख विषयसुखासारिखें उत्पन्न होत नाहीं आणि नाशातें पावत नाहीं. कारण जे ज्ञानी जो तो सुखस्वरूपाचे आहे ह्मणून. आतां ज्ञानियाचे सुखस्वरूप ब्रह्म जें त्याचा महिमा सर्वत्रांस सांगतात,

कोण्ही एक अकृत्रिम । भक्तीचें हें वर्म ।
योग-ज्ञान-विश्राम- । भूमिका हे ॥ ६१ ॥

हें ज्ञानियाचें सुखमात्रस्वरूप जें तें कोण्हीएक ह्म० ज्याजला नाम नाहीं ऐसें जें तें अकृत्रिम भक्तीचें वर्म होय. ह्म० परमात्मयाची कृत्रिम नवी केलेली एकात्मता ऐसी नव्हे. अनादिसिद्ध ज्ञानियाची आणि परमात्मियाची अकृत्रिम एकात्मता आहे ऐसें येणेंकरून सिद्ध होतें. आणखी ज्ञानियाचें सुखस्वरूप कैसें ह्मणाल तरि संपूर्ण योगाची आणि तत्वज्ञानाची विश्रांति पावावयाची हे भूमिका, स्थान होय. आतां वैष्णव आणि शैव ह्मणतात, अहो, सेव्यसेवकत्वें भक्ति असतां तुह्मी हें कैसें सांगतां? यासि उत्तर,

अंगें कीर एक जाले । नामरूपाचे मासले ।
होते तेहि आटले । हरिहर येथें ॥ ६२ ॥

ऐकतां रे भेदवादी हो, जैसे सुवर्णाचे अळंकार मोडते वेळेस मासलेही आटावे लागतात, तैसा सुवर्णस्थानीं परमात्मयाचे ठायीं संपूर्ण जगद्रूप अळंकार घडले, परंतु पुढें नास्तिक निरीश्वर-वादी होतील ह्मणून परमात्मा जो येणें हरिहर-रूपें आपले मासले ठेविले होते. आतां ज्ञानियाचे रूपेंकरून परमात्मा जो तो

आपलीच पूर्ण स्वरूपीं आटणी करून घेऊं लागला, तेव्हां या ज्ञानियाचे सुखस्वरूपाचे ठायीं नामरूपाचे भासले हरिहर अंगें ह्म० साकाररूपेंकरून जे होते तेही आटले, नाहींसें केले हा भाव. आतां सेश्वरसांख्य बोलतो,

अहो अर्धनारीनटेश्वरें । गिळीत परस्परें ॥
ग्रहण जालें एकसरें । सर्वग्रासें ॥ ६३ ॥

अहो ज्ञानोबा, प्रथम प्रकरणीं तुह्मी वर्णिलें जें परस्परातें गिळितात आणि उगळितात ऐसे जे अर्धनारीनटेश्वरें ह्म० प्रकृतिपुरुषें ते तरि ज्ञानियानें पूजावयासि आहेत कीं? यासि सिद्धांती उत्तर देतात. अरे सेश्वरवादी सांख्य, ऐकतोसि? प्रथम अध्यारोपप्रकरणीं आह्मी वर्णिलें जे प्रकृतिपुरुषें ते जिज्ञासूचे तत्वज्ञानसिद्धीसाठीं शबलब्रह्मीं अध्यारोप करून वर्णिलीं होतीं. आतां जैसें ग्रहण जें तें सूर्यासि पोटीं घेऊन पलीकडील आकाशाचें ग्रहण करितें, तैसें परमात्मचित्सूर्यातें पोटीं घेऊन ज्ञानियास चिदाकाश ब्रह्माचे स्वत्वेंकरून ग्रहण जालें. तेव्हां प्रकृतिपुरुषेंचि कायसीं पुसतोस? सर्वरूपी परमात्मा जो त्याचाच ग्रास केला, तेव्हां एकसरें सर्वांचेंच ग्रहण, ग्रसन अर्थात् जालें. आतां ते अर्धनारीनटेश्वरें प्रकृतिपुरुषें कोठें आहेत, जे ज्ञानियानें पुजावीं ह्मणतोस? आतां वैदिक ह्मणतो, अहो, आमचे श्रुतीच्या योगेंकरून ज्ञानी जो तो कृतकार्य जाला, तेव्हां तेणें श्रुतीतें पुजावें कीं? यासि उत्तर,

वाच्यजात खाऊनि । वाचकत्व पिऊनी ॥
टाकिली निदेजौनि । परा एथें ॥ ६४ ॥

अरे वैदिका, ऐकतोस? श्रुतीतें श्रेष्ठत्वेंकरून पूजणें तें कैसें? परंतु ज्ञानी जो येणें वाच्यजात, वेदानें उपपादन केलेल्या पदार्थमात्रातें खाऊन, नाहींसें करून आणि पदार्थमात्राचे निषेधत्वें वाचकत्व करणाऱ्या ज्या श्रुति त्यांतें पिऊन, प्राशन करून, येथें, ब्रह्मस्वरूपाचे ठायीं, स्मरणरूपा पराख्य वाणी जे तीतें निदेजउन टाकिलें, नाहींसें केलें हा भाव. आतां ग्रंथाचे आरंभीं मंगलप्रद गुरूचें वंदन केलें आणि द्वितीय प्रकरणीं वंदन केलें आणि मध्यम भागींही वंदन केलें. आतां ग्रंथसमाप्तिप्रसंगीं पराकाष्ठेचें गुरुस्तवन करितात,

शिवशिव समर्था स्वामी । एवढिये आनंदभूमी ॥
घेपे दीजे एकीं आम्ही । ऐसें केलें ! ॥ ६५ ॥

हे परशिव शुद्ध ब्रह्म, हे शिव परमात्मन्, हे निग्रहानुग्रहसमर्था निवृत्तिस्वामी, निरातिशय आनंदाचीं एव्हडी मोठी भूमी, स्थान, जे सहजस्थिती, तीतें एकें आह्मी घ्यावें आणि अन्यास द्यावें ऐसें तुवां केलें.

चेतचि चेवविलें । निदेलें निजविलें ॥
आह्मां आह्मीं आणिलें । नवल जी तुजें ॥ ६६ ॥

या शरीराचे ठायीं चेत ह्म० अवस्थात्रयातें जाणणारा जो द्रष्टा त्या आह्मांप्रत निजवाक्योपदेश करून चेवविलें, ब्रह्मस्वरूपीं जागें केलें; आणि हृद्गुहेचे ठायीं गाढ मूढ निजलें होतें जें चित्प्रतिबिंब त्यातें तुवां निजविलें, जीवेंचि मारून नाहींसें केलें. हे गुरु, आणखी एक तुझें मोठें नवल जी, आह्मी अंतरात्मरूपें असतां आमचें पूर्णात्मस्वरूप ब्रह्म जें त्याप्रत आह्मांतें आणलें, पूर्ण वस्तूचे ठायीं आमचें स्वत्व स्थिर केलें हा अभिप्राय.

आम्ही निखल जी तुजे । वरी लोभें ह्मणसी माजे ।
हें पुनरुक्त साजे । तूं ह्मणौनि ! ॥ ६७ ॥

हे गुरु, तूं परमात्मस्वरूपें सर्व आहेस, तेव्हां संपूर्ण प्राणी तुझेचि आहेत, परंतु आम्ही निखळ तुझेच होत ऐसा आमचा दृढ निश्चय आहे. त्याजवरि हे गुरु, तूंही लोभेंकरून आह्मांतें माझे ऐसें ह्मणतोस; अस्तु, हें पुनरुक्त ह्म० सामान्यविशेषें द्विवार माझें ह्मणणें तूं परमात्माचि आहेस ह्मणून तुजला साजे, शोभतें.

कवणाचें कांहीं न घेसी । आपलें कवणातें नेदसी ।
कवण जाणे भोगिसी । गौरव कैसा ॥ ६८ ॥

हे गुरु, तूं केवल ब्रह्मरूपें मोठा तुसडा आहेस. कोण्हाचें कांहीं घेत नाहींस, कारण जे तूं अपाणिपाद आहेसि, आणि सर्व मृषा पदार्थ आहेत ह्मणून; आणि आपलें केवल ब्रह्मस्वरूप कोण्हातें देत नाहींस, कारण जे जो तूतें घ्यावयासि जातो तोचि नाहींसा होतो ह्मणून. हे गुरू, तूं कैसा गौरव ह्म० गुरुशिष्यसमारंभ जो तो कोण जाणे कैसा भोगितोसि कीं! आह्मी जाणत नाहींत हा भाव.

गुरुत्वें जव्हडा चांगु । तेव्हडाचि तारुनि लघु ।
लघु-गुरु जाणे तो पांगु । तूजा करी ! ॥ ६९ ॥

हे गुरु, तूं गुरुत्वें, महान् ब्रह्मरूपत्वें करून, जेव्हडा चांगला आहेस तेव्हडाचि लघु ह्म० शिष्य जो त्यातें भवसमुद्रांतून तारून आपल्यासारिखें महान् रूपत्वें करितोस. आणि जो शिष्य लघुगुरु ह्म० मी लहान आणि गुरु थोर ऐसें जाणतो, तो शिष्य अतत्ववित् ह्मणून तुझा पांग करितो ह्म० तुझे स्वरूपाचा दुष्काळ आपण आपणातें करून घेतो. सारांश गुरुपेक्षां आपले ठायीं कांहीं उणेपणा राहिला आहे ऐसें शिष्यातें वाटूं नये हा भाव. आतां वृक्ष जैसा उभय शाखीं सम असतो तैसा गुरु होय, ऐसें रूपक मनांत आणून व्यतिरेकें स्तुति करितात,

शिष्या देतां वाटे । अद्वैताचा समो न फूटे ॥
तर्‍हि कांह्या होति भाटें । शास्त्रें तुजीं? ॥ ७० ॥

हे गुरू, तुझ्या अद्वैतपणाचा समान भाव न फुटून सहज स्थिति शिष्यास मी देतों ऐसें तुला वाटतें तरि शास्त्रें तुझीं भाटें कांह्या, कशास होतीं? जैसा एक वृक्ष उभय शाखीं फुटतो, तैसा तूं अद्वैतपरमात्मरूपें एक जो त्याचाच समानरूपत्वें गुरु शिष्य हा भेद होय. या हेतूस्तव हे सहज स्थिति मी शिष्यातें देत नाहीं, शिष्यरूपें माझी सहज स्थिति मीच भोगितों ऐसा तुझा निर्धार आहे. ह्मणून संपूर्ण शास्त्रें भाट-बंदिजनांसारिखीं तुझी स्तुति करितात.

किंबहुना दातारा । मी-तूंपणाचा संसारा ।
वेंचौनि होसी सोइरा । तेणेंचि तोखें! ॥ ७१ ॥

किंबहुना, आतां फार काय सांगावें? कदाचित् शिष्याचे ठायीं मी-तूंपणाचा संसार, व्यवहार, असला तरि तो वेंचून ह्म० नाहींसा करून टाकतोस. मग तुझे ठायीं मीतूंपणाचा व्यवहार तो कोठून असणार? अस्तु, शिष्य जो तो भेदरहित जाला असतां, त्या संतोषानेंचि तूं सोइरा होसि ह्म० निजभक्तसखा होतोसि हा भाव.

॥ इतिश्रीमदनुभवामृते जीवन्मुक्ति-अभेदभक्ति-सहजस्थिति-वर्णनं नाम नवम प्रकरणम ।

रघुनाथ अद्वैत सच्चिदानंद । त्याचे चरणकमळांचा मकरंद ।
सेवोनि निरंजन हा मिलिंद । गुंजारव करीतसे ॥ १ ॥
अनुभवामृत-पदबोधिनी । निरंजनाची साबडी वाणी ॥
श्रीरघुनाथप्रसादें करूनि । ज्ञानेश्वरपदां अर्पिली ॥ २ ॥

## प्रकरण १० वें.

श्रीगुरुदत्तदिगंबरायनमः । श्रीज्ञानेश्वरायनमः । श्रीरघुवीरचरणारविंदाय नमोनमः । श्रीदत्तात्रेयगुरुर्जयतु । श्रीज्ञानेश्वरो जयतु । श्रीरघुवीरचरणारविंदपरागसेवनभ्रमरीभूत, श्रीदत्तात्रेय-लब्ध-प्रसाद, श्रीज्ञानेश्वरप्रेरित, निरंजनाख्य जो तो जीवन्मुक्त श्रोत्यांप्रत प्रार्थना करितो जे तुह्मी श्रवण करावें. आतां श्रीगुरुसी संवाद करितात,

परि गा श्रीनिवृत्तिराया । हातातळिं निवविलें स्वामिया ॥
तर्‍हि तें निवांतचि मिया । भोगावें कीं ? ॥ १ ॥

हे स्वामिराया श्रीनिवृत्ति, तुह्मी कृपादृष्टी करून मजला हातातळीं निवविलें. तरि तें सुखें मिया निवांतपणें भोगावें कीं नाहीं ? परंतु ग्रंथरचना करिता जालों.

परि महेशें सूर्याहातीं । दीन्हली जे तेजसूति ॥
तिये प्रभे अंतर्गति । जगचि केलें ॥ २ ॥

मजला ऐसें वाटतें, जैसें महेश जो येणें सूर्याचे हातीं तेजसूति ह्म० तेजाची वाती जे दीधली, त्या सूर्यानें प्रभे अंतर्गति संपूर्ण जगत् केलें. तैसें तुह्मी माझे हातीं तत्वज्ञानाची वाती दिधली, ह्मणोनि मिया ज्ञानेंकरून अंतर्मुख जग केलें.

चंद्रासि अमृत घातलें । तें काइ तेयाचि एतुलें ॥
कां सिंधुमेघां दीधलें । तो मेघाचि भागु ? ॥ ३ ॥

आणखी मजला वाटतें जे महेशानें चंद्रासि अमृत जें घातलें तें त्याचेच पुरतें घातलें ऐसें नाहीं, संपूर्ण विबुधांचीही तृप्ति व्हावी ऐसें घातलें आहे. तैसे संपूर्ण जगताचे महेश्वर जे तुह्मी माझे ठायीं हें बोधामृत ठेविलें तें माझ्यापुरतेंच आहे ऐसें नाहीं, विबुध ज्ञानी जे त्यांचीही तृप्ति व्हावी ऐसें ठेविलें आहे. अथवा सिंधुनें मेघास उदक जें दीधलें तो भाग मेघाचाच काय ? मेघाचाच भाग होय ऐसें नाहीं. तें उदक सर्वांचे भाग्येंकरून मेघांस दिधलें आहे. तैसें या सहज स्थितीचें देणें मज दीधलें तें माझ्यासाठींच दिधलें ऐसें नाहीं, सर्वांच्याच भाग्यानें दिधलें.

दिवा जो उजियेडु । तो घराचा सुरवाडु ।
गगनीं आथी पवाडु । तो जगाचा कीं ! ॥ ४ ॥

घरांत जो दीप लाविला तो घराचेचि सुखाड ह्म० प्रशस्त प्रकाशन करितो घराबाहेर प्रकाश करीत नाहीं. तैसें कोण्हास स्वदेहांतील चैतन्याचें ज्ञान जालें असतां आपले ठायीं कृतार्थता मानितो, परंतु दुसऱ्याचा उपयोग नाहीं, तैसें तुझें करणें नाहीं. हे गुरु! परमेश्वरप्रसादें गगनाचे ठायीं प्रशस्तपण प्राप्त जालें तें संपूर्ण जगाचे उपयोगीं पडतें कीं! तैसें तुमचे प्रसादें माझे ठायीं चिद्गगनरूप प्रशस्तपण आर्थी, आहे, तें संपूर्ण जगाचे उपयोगी जालें कीं? आतां श्रीगुरुनिवृत्तिनाथ बोलतात,

अगाधें उचंबलती । ते चंद्रींचि ना शक्ति ।
वसंतु करी तैं होतीं । झाड पानें ॥ ५ ॥

अगा ज्ञानोबा, जैसें समुद्राचें पाणी अगाधपणें निश्चळ असतांही उचंबळून आणखी वाढतें ते चंद्राची शक्ति होय, समुद्राची शक्ति नव्हे. तैसें आम्ही शुद्धब्रह्मरूपें निश्चळ असतांही तुझे ग्रंथरचनेच्या योगें आल्हादातें पावलों, हे तुझी अचिंत्य शक्ति होय. आमचें करणें नव्हे. आतां ज्ञानोबा बोलतात. आपल्यास पानें आणावीं हें झाडांचे स्वाधीन नाहीं. जेव्हां वसंत कृपा करितो तेव्हां विस्तारपूर्वक पर्णें होतात.

ह्मणौनि हें ऐश्वर्य । दैविकचें औदार्य ॥
वांचौनि स्वातंत्र्य । माझें नाहीं ॥ ६ ॥

तैसा, त्या झाडांसारिखा मी मूढ होय. आणि तुह्मी वसंतकाळासारिखी कृपा केली ह्मणोनि विस्तारपूर्वक ग्रंथरचनेचें ऐश्वर्य प्राप्त झालें. अस्तु, हें दैविकेचें औदार्य होय. हे गुरुदेव, तुमचे कृपेवांचून ग्रंथ करण्याचें माझें स्वातंत्र्य नाहीं हा माझा निर्धार.

आणि हा एव्हडा ऐसा । परिहार देवों काइसा ॥
प्रभु-प्रभाव-विन्यासा । आड ठावोनि ॥ ७ ॥

हे जगत्प्रभु गुरुमहाराज, हा ग्रंथ तुमचे प्रभावाचा विन्यास ह्म० तुमचे प्रतापाचा विस्तार आणि मीही सर्वस्वें तुमचाच केलेला ऐसा असतां उगाच आड ठावोनि ह्म० आडवा राहून हा एवढा परिहार तरी कशास देऊन सांगूं? जे हा ग्रंथ माझा नव्हे, तुमचाचि आहे ह्मणून. आतां कोण्ही एक स्तुति करितो जे अहो ज्ञानोबा, या ग्रंथांत तुह्मी परमात्मवर्णन फार चांगलें केलें. यासि उत्तर,

आह्मी बोलिलों जें कांहीं । तें प्रकटचि असे ठायीं ॥
स्वयंप्रकाशा काइ । प्रकाशावें? ॥ ८ ॥

आह्मी जें या ग्रंथमिषें बोललोंत तें परमात्मस्वरूप आपले ठायीं आपण प्रकटचि आहे. आणि तो परमात्मा स्वयंप्रकाश आहे, त्यातें माझ्या बोलानें काय प्रकाशावें? बोल प्रकाशित करीत नाहीं हा भाव.

विपार्यें आह्मी हान । कीजे तें पां मौन ॥
तर्‍हि कां जनीं जन । दीसते ना? ॥ ९ ॥

विपार्यें, कदाचित्, जरि आह्मी मौनही धारण केलें असतें, तरि कां जनास जन दिसतेना काय? आह्मी ग्रंथेंकरून बोलल्याचे पूर्वीच जनाला जन पाहत आहोचि.

जनातें जनें देखतां । द्रष्टेंचि दृश्य तत्वता ॥
कवणा नहोनि आइता । सिद्धांतचि असे ॥ १० ॥

जन ह्म० स्थावरजंगमात्मक जगत् जें त्यातें जन ह्म० आबाल गोपाळपर्यंत मनुष्यें जे त्यांनीं देखत असतां संपूर्ण दृश्य जें तें द्रष्टृरूपाचि होय. तें कैसें ह्मणाल तरि अद्वितीय सच्चिदानंदलक्षण परमात्मा जो तोचि पुरुषरूपेंकरून जाला आणि निजशक्ति योगें प्रकृति होऊन नामरूपात्मक दृश्यही जाला. ह्मणून तत्वता विचार करून पाहिलें असतां दृश्य जें तें द्रष्टृरूपचि होय. हें कोण्ही कोण्हास सांगितलें पाहिजे ऐसें नाहीं, आइता सिद्धांताचि असे. कारण जे अवघा एकचि परमात्मा आहे ह्मणून. अहो ज्ञानोबा, हा ग्रंथ दहा प्रकरणेंकरून सांगितला, परंतु यापरतें परमात्मरहस्य कांहीं सांगणें राहिलें आहे काय? यासि उत्तर,

एयापरौतें कांहीं । सच्चिद्रहस्य नाहीं ।
एया आधींही । असतचि असे ॥ ११ ॥

सच्चिदानंदलक्षण परमात्मा जो त्याचें रहस्य ह्म० एकांतीं ठेविलेले ठेवणें यापरतें कांहीं राहिलें नाहीं ऐसें जाणावें. आतां वेदांत-ग्रंथाभिमानी बोलतो,

अहो ज्ञानोबा, तुह्मी काय यांत अधिक सांगितलें? तुमचे ग्रंथाचे आधींही आचार्यादि भाष्यकारांनीं ऐसें सांगितलें आहेचि आहे. तुह्मी उगाचि हा कंठशोष कशास केला? आतां ज्ञानोबा बोलतात.

म्हणौनि ग्रंथ प्रस्तावो । न घडे हें म्हणों पावें ।
परि सिद्धानुवाद लाहो । आवडी करूं ॥ १२ ॥

अहो भाष्यकाराचे वेदांत प्रकरणीं ग्रंथ आहेत ह्मणोनि ग्रंथ-प्रस्तावो न घडे ऐसें तुह्मी ह्मणतां हें ठीकाचि आहे. आह्मीहि तैसोंचि ह्मणों पावों, परंतु लोकांचे ठायीं ऐसी रीति असे जे आवडीकरून सिद्धवस्तूचा अनुवाद करूं लाहावा ह्म० करूं पावावा ऐसें आहे.

पढियंतें सदा तेंचि । परि भोगिजे नवी नवी रुचि ।
म्हणौनि हा उचितुचि । अनुवाद सिद्ध ॥ १३ ॥

अहो पढियंतें ह्म० आवडती वस्तू आपल्यापासीं असती ते केव्हांहि पाहिली तरि सदा तेचि आहे, परंतु वारंवार पाहिली असतां नवी नवी रुचि भोगिजेली जाती, तैसी आत्मवस्तु परम आवडती होय ह्मणोनि पूर्व सिद्धांचा अनुवाद ह्म० बोलिलेंचि बोलावें हें उचिताचि आहे. अहो ज्ञानोबा, वरकडांनीं परमात्मतत्व वर्णिलें परंतु तें गुप्त करून वर्णिलें आणि तुह्मी फार प्रगट करून बोलिलांत. यासि उत्तर.

एया कारणें मिया । गोप्य दाविलें बोलौनिया ।
ऐसें नाहीं आपसया । प्रकाशुचि ॥ १४ ॥

हें परमात्मतत्व कोणास ठाऊक नाहीं ह्मणून सर्वांस कळवावें यया कारणें मिया गौप्य बोलोनि दाखविलें ऐसें नाहीं. तें परमात्म स्वरूप सर्वांतें प्रकाशमानचि आहे.

आणि पूर्ण अहंता वेठलों । सैत्र आह्मीच दाटलों ।
मा लोपलों ना प्रगटलों । कोणाहूनि ॥ १५ ॥

अणखीहि प्रगट करून बोलावयाचा एक हेतू आहे, जे पूर्ण वस्तूचे ठाईं आमचें अहंत्व स्थिर होऊनि वेटलें ह्म० सिद्ध जालों यास्तव आपला अनुभव प्रगट करून बोलावें लागलें, आणि पूर्ण स्वरूपें करून सैघ ह्म० सर्वत्र आह्मीच दाटलों आहोंत, आह्मी आह्मांतें लपालोंहि नाहींत ना प्रगटलोंहि नाहींत. आतां आह्मांहून दुसरें कोण आहे कीं, ज्याजहून आह्मी लपावें अथवा प्रगट व्हावें? आतां कोणीएक वेदांतैकदेशी बोलतो,

आपण आपणापें । निरूपण काइ वोपे ।
कीं उगेपणें हारपे । ऐसें आहे ? ॥ १६ ॥

अहो ज्ञानोबा, आपलें निरूपण करणें आपणास वोपतें ह्म० शोभतें काय? आपण आपणासि बोलणें शोभत नाहीं कीं ? यासि उत्तर,

निरूपण केलें तरीच बोलणें होतें आणि उगें राहिलें असतां बोलणें हारपतें ह्म० नाहींसें होतें ऐसें तरि आहे काय ? बोलणें नाहींसें होत नाहीं. एकच प्रकाराची वाणी त्यांतील वैखरीची बंदी केली तरि वरकड तीन वाणी आहेताचि.

ह्मणौनि माझी वैखरी । मौनातें ह्मणे मौन धरी ।
हे पाणियावरि मकरी । रेखिली पां ! ॥ १७ ॥

ब्रह्मरूपेंकरून आह्मांस सर्वदा मौनच्चि आहे आणि वेद जो त्याचेंही अशब्द मौन स्वरूप आहे, ऐसें असतां तो वेद स्ववाणीनें कर्तव्य पुष्कळ बोलता झाला, ह्मणोनि माझी वैखरीवाणी त्यातें मौन धरावयाचें सांगती, कारण जे ब्रह्मीं या शब्दाचा उपयोग नाहीं आणि लागलाही नाहीं ह्मणून. अहो ज्ञानोबा, तुमचें तरि बोलणें ब्रह्मीं स्थिरावतें काय ? यासि उत्तर,

जैसी पाणियावरि अंगुलीनें मकरि म्ह० मच्छिनी रेखाटावी तिचा रेखाटते वेळीं उगाच अनुकार मात्र दिसावा, परंतु ती मकरी पाण्यावरि रहात नाहीं, तैसी आमची वैखरी ब्रम्हविषयीं उच्चारिली परंतु ब्रम्हीं स्थिरावत नाहीं, कारण जे ब्रह्म-वस्तु वाणीचा विषय नाहीं म्हणून.

एवं दशोपनिषदें । पुढारीं न ढालिति पदें ॥
देखौनि बुडी बोधें । दीधली येथें ॥ १८ ॥

एवं या प्रकारें आह्मी वर्णिलें याच्या पुढारी दश उपनिषदें जे तीं न ढाळिति पदें ह्म० पुढें एक पाऊलहि ठेवीत नाहींत. आणखी या ग्रंथाचें एक आधिक्य आहे जे बोध जो येणें येथील वर्णनाचा समारंभ पाहून बुडी देउन राहिला आहे. आतां या अनुभवामृत ग्रंथाची फळश्रुति आणि थोरी वर्णितात.

ज्ञानदेव ह्मणे श्रीमंत । हें अनुभवामृत ।
सेवौनि जीवन्मुक्त । होवोत ऐसे ॥ १९ ॥

आतां ज्ञानदेव ह्मणताहेत जैसा सर्व देवांमध्यें श्रीमान् विष्णु तैसा सर्व ग्रंथांमध्यें हा श्रीमान् अनुभवामृत ग्रंथराज होय. आणखी आपले ठांई कृत-कृत्यता मानून आहेत जे ज्ञानी जीवन्मुक्त ते या ग्रंथातें सेवून येथें वर्णिले जे जे प्रकार त्या ऐसे होवोत. सारांश परमात्मस्वरूपीं अव्यभिचारिणी भक्ति आणि सहज-स्थितिसंपन्न होवोत हा अभिप्राय.

मुक्ति कीर वेल्हाल । ते हे अनुभवामृत निखल ।
अमृतही घोटी लाल । अमृतें एणें ॥ २० ॥

आतां श्रोत्यांतें फार काय सांगावें? या ग्रंथाचें नाम काय आणखी स्वरूप ह्मणाल तरि साक्षात् वेल्हाळ ह्म० विस्तारातें पावलेली जे निखळ मुक्ति ते या अनुभवामृतरूपेंकरून होय. आणखी या अनुभवामृताची थोरीव कैसी जे स्वर्गी राहून प्रतिकल्पीं मरण पावणारें अमृत जें तेंहि येथें लाळ घोटितें जे येणें अनुभवामृतें मी अमर होईन ह्मणून. आतां या ग्रंथराजाची थोरीव पराकाष्ठेची वर्णितात.

निशी-निशीचाही चांद होए । परि पुनवेचा आनचि आहे ।
हें कां मी ह्मणों लाहे । सूर्यदिठी ॥ २१ ॥

प्रतिपदेपासून चतुर्दशीपर्यंत मागें पुढें तमातें ठेऊन प्रतिनिशीप्रत उदय होतो तोहि चंद्राचि होय परंतु पूर्णिमेचा पूर्ण चंद्र जो तो आनूचि आहे ह्म० तद्विलक्षण होय. तैसे साधनचतुष्टयापासून तत्वज्ञानपर्यंत जिज्ञासूचें अज्ञान मागें पुढें ठेऊन प्रतिग्रंथकर्त्याचे ठांई ग्रंथ उदय होतो, परंतु पूर्ण वस्तुप्रतिपादन आहे ज्यामध्यें आणि जिज्ञासूतें अज्ञानाचा गंधही न लागूं देतां पूर्ण वस्तूचें बोधन करणारा आणि जीवन्मुक्तासि सहज स्थितीतें प्रकाशन करणारा वरकड ग्रंथांहून विलक्षण हा अनुभवामृत ग्रंथ होय. असो, हे अति उक्ति आह्मी सूर्यदिठी ह्म० सर्वत्र समान दृष्टि परमात्मस्वरूप होत, तेव्हां ऐसें ह्मणों लाहों काय? ऐसें ह्मणूं न सकों हा भाव. अहो तुह्मी स्वानुभव आंगिचे अंगीं न जिरवितां इतुकी अतिशय उक्ति कशास वदलेत? यासि उत्तर.

प्रिया सावाइली होए । तैं अंगिचा आंगीं न समाये ॥
यऱ्हवीं तेथेंचि आहे । तारुण्य कीं! ॥ २२ ॥

स्व प्रिया कुब्जा जे ती सुरूपत्वें पाहावयासाठीं भगवान् श्रीकृष्ण जो येणें सावाइली होय ह्म० सांवरून नीट केली होय, तेव्हां तीचें तारुण्य जें तें अंगींचें अंगीं न समाये ऐसें जालें. यन्हवीं तिचें तारुण्य तेथें तिचे ठायींच होतें कीं. तैसें माझें अनुभूतिचें ऐश्वर्य पाहावयासाठीं माझी वाणी वक्र असतां भगवान् श्रीगुरुतें प्रिय जाली ह्मणोनि अनुभवामृतें सावरून नीट केली. यन्हवीं माझे अनुभूतिचें तारुण्य माझे ठायींच होतें कीं. आतां अतिशय उक्ति बोलण्यास हेतु मांगतात.

वसंताच्या आल्या । फुलीं फलीं आपुल्या ॥
गगनिं पेलती ढाल्या । फैलति झाडें ॥ २३ ॥

या लागि हें बोलणें । अनुभवामृतपणें ॥
स्वानुभूति परगुणें । वोगरिलीं ॥ २४ ॥

जैसा वसंतकाळ आला असतां झाडें जे तीं आपल्या पुष्पफळानें युक्त होऊन आकाशाचे ठायीं फांद्या पेलीत होत्सातीं फैलति ह्म० विस्तारातें पावतात, तैसा मी जड मूढ असतां श्रीगुरु निवृत्तिप्रसादें सुमनत्वें सुफळतेप्रत पाऊन चिदाकाशाचे ठायीं निजवृत्तीतें पेलीत होत्साता विस्तीर्ण परमानंदातें पावलों, या लागीं अनुभवामृतपणें हें अति उत्कट बोलणें बोलिलों, ते संतांनीं क्षमा करावी. आतां ज्ञानोबा साधुसंतांतें मेजवानी करितात.

तुह्मी ह्मणाल कीं वरकड ग्रंथांसारिखा हाही ग्रंथचि असेल, तरि ऐसें नाहीं. स्वअनुभूतिरसाचीं परगुणें वोगरिलीं ह्म० अनुभव रसभरित सुवर्णमय पात्रेंच वाढलीं आहेत. अहो ज्ञानोबा, स्वानुभूतिरसाची तुह्मी मेजवानी करितात परंतु जीवन्मुक्त ज्ञानी जे त्यांसचि येथें योग्यता आहे, अन्य मुमुक्षु आणि बद्ध जे आहेत त्यांगीं येथें काय करावें? यासि उत्तर,

आणि मुक्त मुमुक्षु बद्ध । तवंचि योग्यता-भेद ।
अनुभवामृतस्वाद । विरुद्ध जंव ॥ २५ ॥

या अनुभवामृताचा स्वाद ह्म० अनुभव घेणें जो पावतो विषयसुखासक्ती-मुळें विरुद्ध मानितो तो पावतोचि. मुक्त आणि मुमुक्षु आणि बद्ध यांच्या न्यूनाधिक योग्यतेचा भेद आहे ऐसें अज्ञजनास वाटतें. परंतु अनुभवामृत सेवन केल्यावरि

त्रिविध योग्यता भेद वाटणार नाहीं हा भाव. अहो जीवन्मुक्त जे आहेत ते या अनुभवामृत-सेवनें करून सहज स्थितीतें पावतील हें ठीकचि आहे. परंतु मुमुक्षु आणि बद्ध जे आहेत त्यांस या अनुभवामृत ग्रंथानें काय जालें ? यासि उत्तर,

गंगावगाहना आलीं । पाणियें गंगाचि जालीं ।
कां तिमिरें भेटलीं । सूर्या जैसीं ॥ २६ ॥

अल्पोदकें जें तीं गंगावगाहना ह्म० गंगास्नानास आलीं ते पाणियें गंगारूपचि जालीं जैसीं, तैसें दृश्य-द्रष्टत्वें करून अल्पदृष्टीनें वाहणारीं ऐसीं मुमुक्षु जनाचीं ज्ञानें जे तीं या अनुभवामृतातें पाहूं आलीं ते ब्रह्मानुभव होतो जीच्या योगें ऐसी जे शुद्ध ब्रह्मविद्या तद्रूप जालीं आणि तिमिरें जे तीं दिवसाच्या योगें प्रकाशरूप होऊन सूर्यासि भेटलीं जैसीं तैसीं आपणातें बद्धत्वें मानणारीं अज्ञानी जीव चैतन्यें जे तीं या अनुभवामृताच्या योगें द्रष्ट्यासि एकात्मता पाऊन चित्सूर्य-परमात्मयासि भेटलीं. अहो, सांख्यकाणादादि मताचीं जे जे शास्त्रें त्यांची या अनुभवामृतानें खंडणा करून काय केलें? यासि उत्तर, शास्त्रें जे तीं वेदार्थ सोडून इतस्तता जात होतीं त्यांतें वेदपरायण केलें ऐसें सांगतात.

जैसे अकारादि आखरां । भेटती पन्नास मात्रा ॥
कां वोघ जैसे सागरा । आंत आले ॥ २७ ॥

आदि अक्षर अकार जो त्याजप्रत पन्नास मात्रा भेटतात जैशा तैसा सर्व शास्त्रांस जो आदि असून आपण अनादि-अक्षर-रूप जो वेद-राशी त्यातें सोडून संपूर्ण मताभिमानी यांचे मतिनें केलेलीं सांख्यतर्कादिक शास्त्रें जे तीं वेदासि भेटऊनि षड्लिंगें करून श्रुतिचें तात्पर्य जेथें आहे तेथें शास्त्राचा समन्वय जो तो या अनुभवामृतें करून दिल्हा.

आणखी वोढे, नद्या नद हे संपूर्ण जळाचे वोघ जे पूर्वपश्चिम जाणारे ते सागराचे आंत आले जैसे, तैसे या अनुभवामृतानें नानाविध देवांचे उपासक जे यांचे भजनाचे वोघ जे ते परमात्मस्वरूपा आंत आणिले, कारण जे सर्वरूपें परमात्माचि आहे ह्मणून. अहो ज्ञानोबा, भेदबुद्धीनें उपासना केली असतां निवृत्ति न होतां न्यूनाधिक भाव जात नाहीं आणि जीवदशाहि जात नाहीं कीं? यासि उत्तर,

नाहीं पारिसाचि कसवटी । तवंचि वानियाच्या गोठी ॥
मग पंधराविंयाच्या पाटिं । बैसावें कीं ॥ २८ ॥

तैसी तये ईश्वरीं । अंगुलि नुमवेचि दूसरी ।
किंबहुना सरोभरी । शिवेंसि तेया ॥ २९ ॥

लोखंड जें येणें परिसाचे कसवटीस गांठ घातली नाहीं म्हणोनि वाणियाच्या म्ह० सोनियाच्या गोष्टी सांगतें आणि आपणातें निकृष्ट ऐसें मानितें. तेंचि लोखंड आपण काळें कीं गोरें आहों ऐसें परिसास लागून पाहूं गेलें असतां मग पंधरावियाचे पाटीं म्ह० सोनियाचे पंक्तीस बसावें कीं. तैसे शिव विष्णु आदिकरून कोण्ही एका देवाचे उपासक जीव जे त्यांणीं परेश म्ह० संपूर्ण ईशांचाहि ईश श्रीसद्गुरु ज्ञानदाता जो त्याचे चरणारविंदीं मस्तक घांसिला नाहीं म्हणोनि स्वउपास्यदेवाचे उत्कृष्टपणाच्या गोष्टी सांगतात, आणि आपणांतें उपासकत्वें निकृष्ट ऐसें मानितात. तेचि उपासक श्रीगुरुचरणस्पर्शें ज्ञानसंपन्न होऊन जीवन्मुक्ति-सुख भोगून आपली जीव दशेची काळिमा घालऊनि उत्कृष्ट निकृष्ट आणि उपास्य उपासकत्वें भेदभक्तीतें दवडोनि अभेदभक्तियुक्त होत्साते सहज स्थितितें गुरुप्रसादें पावतात. मग कोण्ही श्रुतीतें पुसलें कीं ईश्वर तो कोणता? तरि ते श्रुति यया ज्ञानियातेंचि ईश्वरत्वें दाखवील. दुसरीकडे ईश्वरत्व दाखविण्याविषयीं अंगुलि उभविणार नाहीं. कारण जे सर्व रूपेंकरून आहे जें ब्रह्म तेंचि स्वत्वेंकरून जाणिलें आहे. या हेतूस्तव श्रुति ज्ञानियातें सर्वज्ञ ऐसें म्हणती. किंबहुना आतां फार काय सांगावें? शिवापरमात्मियासि आणि तया ज्ञानियासि सरोभरी म्ह० समान ऐश्वर्यें करून बरोबरी होय. आतां ग्रंथ-परिसमाप्तीस ब्रह्मविद्वरीयान् सम्राट् ज्ञानी जो येणें आपण अनुभवामृत सेवन करून दिपवाळीचा सण भोगावा ऐसें सांगतात.

म्हणौनि ज्ञानदेवो म्हणे। अनुभवामृतें एणें ॥
सणु भोगिजे सणें । विश्वाचेनि ॥ ३० ॥

जैसा, परमात्मा जो तो सर्वाधिष्ठानत्वें संपूर्ण विश्व पोटीं घेऊन आपले भूमास्वरूपीं आनंदाची दिपवाळी भोगितो, त्याचि प्रकारीं हा पूर्ण ज्ञानी होय म्हणून. स्वयें ज्ञानदेव मी म्हणतों, जे सर्वाधिष्ठानत्वें संपूर्ण विश्व पोटीं घेऊन आपले शुद्धभूमास्वरूपीं आत्मरति आत्मक्रीडा आत्ममिथुन करणारे स्वस्वराट् ज्ञानी जे यांहीं या अनुभवामृताचे सेवनें करून विश्वाचें सणें सण भोगिजे म्ह० संपूर्ण विश्वातें आनंदाचा दिवाळसण देऊन आपण आनंदाचा दिवाळसण भोगिजे, हें माझें निश्चित सांगणें, सुनिश्चित सांगणें होय. ऐसें प्रसाद-वाक्य श्रवण करून

संपूर्ण शिष्यकोटिनिविष्ट ज्ञानी जे ते बोलतात, तथास्तु, तथास्तु, तथास्तु! ऐसें त्रिवार ह्मणून निरतिशयानंदातें पाऊन जयजयकारें गर्जना करिते जाले. आतां सर्वांचे पाठीमागून निरंजन जो तो त्रिवार तथास्तु ह्मणून जयजयकारें गर्जना करितो, हे श्रीगुरु ज्ञानोबा, तुह्मी कृपा केली ह्मणोनि हे टीका जाली, नाहींतरी खुंटली होती मति माझी. आतां श्रोतियांलागीं प्रार्थना जे मूळचा ग्रंथ परम दुर्बोध, त्याचें व्याख्यान करावयाचें माझें सामर्थ्य नाहीं, परंतु मनांत फार हौस जे या अनुभवामृताचा अर्थ आपणांस कळावा. याजकरितां श्रीअळंकापुरीं जाऊन लेकरासारिखें रडून प्रार्थना श्रीज्ञानेश्वरपदीं केली, त्याजवरून या ग्रंथावरि टीका करण्याविषयीं स्वप्नांत प्रसाद जाला. अस्तु, आपण आपणास अर्थ कळावयासाठीं लिहिता जालों. तुह्मी श्रोते जीवन्मुक्त सहज-स्थितिपन्न आहांत तुह्मांस माझ्या सांगण्याची अपेक्षा नाहीं. परंतु यांत न्यून काय असेल तें पूर्ण करून वाचावें, आणि ग्रंथाशिवाय अधिक पडलें असेल त्याची उपेक्षा करावी.

इतिश्री अनुभवामृते श्रीगुरुप्रतापग्रंथ-प्रशंसा-वर्णनंनाम दशमप्रकरणम् ॥

रघुनाथ अद्वैत सच्चिदानंद । त्याचे चरणकमळांचा मकरंद ।
सेवोनि निरंजन हा मिलिंद । गुंजारव करीतसे ॥ १ ॥
अनुभवामृत-पदबोधिनी । निरंजनाची साबडी वाणी ॥
श्रीरघुनाथप्रसादें करूनि । ज्ञानेश्वरपदां अर्पिली ॥ २ ॥

श्रीदत्तमहाराज, मिरज.



कै. थोरले बाळासाहेब पटवर्धन, मिरज, यांनीं श्रीनिरंजन स्वामींच्या हस्तें मिरजेच्या किल्ल्यांत स्थापन केलेली मूर्ति.

## निरंजन कृत

# स्वात्मप्रचीती.

### अध्याय पहिला.

ॐ नमोजी मंगळमूर्ति । सर्वां आदी तूं गणपती ॥
ग्रंथ वदावया स्फूर्ति । देई मातें सत्वरीं ॥ १ ॥
आतां नमो सरस्वती । जे कां आदिमाया भगवती ॥
आदि अनादि चिच्छक्ति । देई मती बाळकां ॥ २ ॥
आतां वंदूं संतसाधु । जे करिती जडमूढासि बोधू ॥
स्वयंप्रकाश ब्रह्मानंदु । कलियुगामाजी अवतरले ॥ ३ ॥
साष्टांग नमूं तो दिगंबर । जो तिही देवांचा अवतार ॥
भवसिंधूचा पैलपार । उतरवी जो सर्वांतें ॥ ४ ॥
दत्तात्रया पूर्ण अवतारा । ब्रह्मानंदा निराकारा ॥
सत्यस्वरूप दातारा । तूं वदविता ग्रंथातें ॥ ५ ॥
तूं प्रत्यक्ष गा अवधूत । सर्वां असूनि सर्वातीत ॥
देहीं असूनि देहातीत । विदेहत्वें वर्तसी ॥ ६ ॥
सहज करितां तुझें स्मरण । गुरुरूपें येसी धावून ॥
किं तेथेंची होसी अवतीर्ण । क्षणमात्र न लागतां ॥ ७ ॥
तूंचि या ग्रंथीं अवतरलासी । तूंचि माझे मुखें वदसी ॥
तूंच एथें येउनि लिहिसि । दुजे कोणी नसे कां ॥ ८ ॥
ॐ नमो सद्गुरू रघुनाथश्रेष्ठ । जो ब्रह्मज्ञानी अति सुभट ॥
जो आनंदकंदाचा मूळपीठ । कलिमाजी प्रगटला ॥ ९ ॥
ऐके वो श्रोतिया समर्था । माझे शरिरीं घडिली व्यवस्था ॥
पूर्वी पासुनि झाली कथा । ते मी तुज सांगतों ॥ १० ॥
दक्षिणदेशीं पुण्यनगरीं । नष्टकनाम हुंडेकरी ॥
वेतन घेउनि त्याचे पदरीं । कारभारी होतों मी ॥ ११ ॥
तों कोणी एके अवसरीं । पेठेमाजी त्याचि नगरी ॥
ठाकूरदास विष्णुद्वारीं । कीर्तन करी सप्रेम ॥ १२ ॥

प्रेमानंदीं बहु डुलत । वेदशास्त्रीं जो पारंगत ॥
ब्रह्मज्ञान मूर्तिमंत । ज्याचे ठायीं राहिलें ॥ १३ ॥
निस्पृहत्वें कीर्तन करी । हें ऐकिलें लोकाचारीं ॥
आलस्य निद्रा करूनि दूरि । कीर्तनासि पै गेलों ॥ १४ ॥
श्रवणीं ऐकुनि हरिगुण । वेधुनि गेलें तन्मन ॥
सर्वेचि तेणें कथिलें ज्ञान । जें कां शरीरीं प्रत्यक्ष ॥ १५ ॥
अनेक प्रकारचें मतांतर । सांगूनि भेदीतसे अंतर ॥
म्हणे 'तुम्हीच रे ! ईश्वर । नरदेहीं अवतरला ॥ १६ ॥
तुम्ही तिन्ही अवस्था जाणतां । जागृती स्वप्न सुषुप्ति व्यथा ॥
या तिहींचा जो पहाता । तेंचि तुमचें स्वरूप ॥ १७ ॥
सर्वाभूतीं ईश्वर असे । असोनिया प्रगट नसे ॥
जैं काष्ठामाजी अग्नी वसे । परि न दिसे कवणासी ॥ १८ ॥
विप्रें घेतल्या श्रौताग्नी । त्याचीच करिती मंथारणी ॥
काष्ठ-काष्ठाचे संघट्टणीं । निघे अग्नी भडभडा ॥ १९ ॥
होतांचि तेथ अग्नीउदय । क्षणक्षणीं काष्ठता सरूनि जाय ॥
कठिणता कांहीं न राहे । अग्नीच होय सर्वांगीं ॥ २० ॥
तैसाच तुमचे हृदयीं ईश्वर । प्रत्यक्ष नांदतो सर्वेश्वर ॥
परि तुम्हां न दिसे साचार । सद्गुरू परिकर दाखविला ॥ २१ ॥
किती रे ! सांगावें तुम्हांला । मानव असुनि पशु कां झालां ! ॥
जागृती असुनि निजालां ॥ भूलूनि गेला विषयांतें ॥ २२ ॥
दोष आचरूनि करितां बंड । यम करील खंडविखंड ॥
हिशोब द्याल कवणें तोंडें । नाहीं केलें म्हणवूनि ॥ २३ ॥
आहा रे ! सर्वस्व चुकला । आपआपणाशींच वैरी झालां ॥
येतां काळजीचा घाला । श्वास टाकूं न देचि ॥ २४ ॥
आतां व्हा रे ! सावधान । वाया कां दवडितां निधान ॥
मेळविली बहु श्रमानें । व्यर्थ दवडूं नका रे ! " ॥ २५ ॥
ऐसें ऐकुनी कीर्तन । माझें दचकलें अंतःकरण ॥
नेत्रीं पातलें जीवन । कंठ दाटून तो आला ॥ २६ ॥
पाठीं उभे राहिले कांटे । शरीर कांपे थरथराटें ॥
बोलूं जातां कंठ दाटे । शब्द होटीं न निघती ॥ २७ ॥

वाटे आतांचि येईल मरण । म्यां कांहीं न केलें साधन ॥
व्यर्थ गमाविलें जिणें । विषयमदें करूनी ॥ २८ ॥
आहा रे दुर्दैव! कटकटा । वस्तु लाभली रे चोखटा ॥
झुगारिसी बारा वाटा । विषयांध होऊनि ॥ २९ ॥
ऐसा होतांचि पश्चात्ताप । हृदयीं उदेला संताप ॥
वाटे बहुत केलें पाप । कांहींएक नुमजोनी ॥ ३० ॥
सर्वेचि विसर्जिलें कीर्तन । लोक गेले सर्व उठून ॥
मी तेथेंचि राहिलों बैसून । सात घटिकांपर्यंत ॥ ३१ ॥
वाटे पोटांत झाली आगी । झाली सर्वांगीं तगमगी ॥
बाळक मरतां मातेलागीं । दुःख जेंवि होतसे ॥ ३२ ॥
तैसा मी भयभीत झालों । ठाकुरदासाजवळीं गेलों ॥
हात जोडोनि विनम्र झालों । स्तुती वदलों विशेष ॥ ३३ ॥
धन्यधन्य तुमचें कीर्तन । एकोनि झालें समाधान ॥
आतां उद्विग्न झालें मन । सर्व त्यागुनि जातसें ॥ ३४ ॥
साधू वदला प्रसन्नवदन । 'तूं होशील रे! नारायण' ॥
मला तोच शकुन मानून । तेथूनिया निघालों ॥ ३५ ॥
एका वाणियाचे घरीं । जागर केला सर्व रात्रीं ॥
दिन उगवलियावरी । तेथूनिया निघालों ॥ ३६ ॥
मग तुळशीबागेंत जाऊन । घेतलें साधूचें दर्शन ॥
तोही बोले कृपावचन । 'गुरुकृपा लाहसी, ॥ ३७ ॥
ते बांधोनि शकुनगांठी । तेथुनि निघालों उटाउठी ॥
ग्रामाबाहेर एकवेळां । तपस्वी थोर देखिला ॥ ३८ ॥
करित होता पात्रमज्जन । कपाळीं विभूतीचें भूषण ॥
जटामंडित शोभायमान । देदीप्यमान देखिला ॥ ३९ ॥
तयाप्रती केलें नमन । तांब्या तयाप्रती देऊन ॥
मागुती त्यातें वंदून । मार्गाप्रती चालिलों ॥ ४० ॥
उत्तरेसि चिंचवाड नगरी । गणपती वसे देवाघरीं ॥
जाउनि त्या ग्रामाभीतरीं । एक वैरागी देखिला ॥ ४१ ॥
जवळला दुपाटा काढुनी । तो वैरागियातें देउनि ॥
करूनि तयासि नमन । पुढील मार्गीं लागलों ॥ ४२ ॥

तव दिठीं देहुग्राम देखिला । जेथें तुकया संत जहाला ॥
वैकुंठासि निघोनि गेला । शरिरासहित आपुले ॥ ४३ ॥
धन्य धन्य ते देहू नगरी । साधूअवतार जीभीतरि ॥
तुच्छ वाटे अमरपुरी । देव जेथें राहती ॥ ४४ ॥
मग घेतलें पांडुरंगदर्शन । तुका जातां वैकुंठालागून ॥
जियें वाकुडी केली मान । ते म्यां दृष्टी देखिले ॥ ४५ ॥
ते साक्ष अद्यापिवरी । पहावें तेथें जाऊनि चतुरीं ॥
दुसरी वैकुंठ पंढरी । विष्णू तेथें नांदतसे ॥ ४६ ॥
अस्तु तया स्थळीं जाऊन । उदासीन झालें मन ॥
वाटे मी नरतनूस येऊन । कांहीं सार्थक न केलें ॥ ४७ ॥
ऐसा होऊनि उदासीन । वस्त्रें वांटिलीं साधूलागून ॥
एक धोत्र पांघरूण । रात्रौ जागर पै केला ॥ ४८ ॥
क्षणक्षण। अश्रु येती नयनीं । बहु संताप उठे मनी ॥
वाटे म्यां जन्मासि येऊनि । कांहींच केलें नाहीं कीं ॥ ४९ ॥
ऐसा अहोरात्र खेद करितां । भानुउदय जाला अवचिता ॥
मग स्नानासी घाटावरुता । इंद्रायणीच्या पातलों ॥ ५० ॥
पूर्व दिशा अवलोकून । केलें तुकारामाचें स्तवन ॥
समर्था ! तूं धन्यधन्य । मजवर कृपा करी कां ॥ ५१ ॥
ऐसें करितां स्तवन । तों दृष्टी पडली कौपीन ॥
दुसरें कटिसूत्रालागून । देखता झालों ते ठायीं ॥ ५२ ॥
तेंचि प्रसादवस्त्र घेऊन । तेथें कौपीन केली धारण ॥
सर्वांगीं भस्म लावून । केलें ध्यान दत्ताचें ॥ ५३ ॥
मग करसंपुटीं जळ घेऊन । सांडिलें संकल्पा लागून ॥
जीवभाव मनःप्राण । गुरु अर्पण केलासे ॥ ५४ ॥
हृदयीं ठेविला नेम करून । आजपासून द्वादश महिने ॥
उपरी सात दिन जाण । देहधारण करणें हा ॥ ५५ ॥
मजला दत्तात्रयदर्शन । झालिया ठेवीन हा प्राण ॥
नाहीं तरी देह अर्पण । केला असे गुरुपायीं ॥ ५६ ॥
ऐसा करुनि निश्चय अंतरीं । साक्षी तुकोबा बाहेरी ॥
वाचे करूनि दीर्घस्वरें । तेथें वदता जाहलों ॥ ५७ ॥

काढिली लज्जेची गवसणी । निर्लज्जशस्त्र हातीं घेउनी ॥
त्याचि ग्रामांत जाउनी । भिक्षाटण पैं केलें ॥ ५८ ॥
भक्षुनि इंद्रायणीचे तीरीं । प्रयाण केलें अति सत्वरीं ॥
अंतरीं प्रेमाश्रुचिया लहरी । जळ तुंबळ दाटलें ॥ ५९ ॥
मार्गी चालतां नाहीं भान । ध्यानीं वेधुनी गेलें मन ॥
उत्तर दिशा अवलोकून । मार्ग क्रमण बहु केला ॥ ६० ॥
अखंड वाचेसी नामस्मरण । दत्त अवधूत हेंचि भजन ॥
त्रैलोक्यीं जयांचें गमन । जग उद्धारा अवतरले ॥ ६१ ॥
करुनि त्याचें नामस्मरण ॥ पाउल ठेवी भूमीलागुन ॥
ऐसें अखंड लागलें ध्यान ॥ वेधलें मन निजरूपीं ॥ ६२ ॥
ऐशी स्थिती अवलोकून । मार्गी पाहतां हासती जन ॥
" वेडा आला रे! " ह्मणवून ॥ दाविती दुरून एकमेकां ॥ ६३ ॥
त्यांतील एक जवळ येऊन । पुसता होय मजलागून ॥
त्यासी सांगू कवणें गुणें ! । हेंही भान नसेची ॥ ६४ ॥
असो कांहीं न जातां ग्रामाभीतरीं ॥ तैसेंच जावें वरचेवरी ॥
मार्गी अरण्याभीतरीं । बहु उल्हासें पळावें ॥ ६५ ॥
पोटीं पश्चात्तापाचा व्याळ । तेणें पळाली क्षुधा सकळ ॥
तृषा उदेली अळुमाळ । उदकप्राशन बहु केलें ॥ ६६ ॥
मार्गी ब्राह्मण आढळती । ते भोजनासी चला ह्मणती ॥
क्षुधा न आणोनि चित्तीं । कोठें भोजन न केलें ॥ ६७ ॥
ऐसे झाले तीन दिन । मार्गी चालतां देश कठिण ॥
नद्या पर्वत उल्लंघून । देहे क्षीण पैं झालें ॥ ६८ ॥
चतुर्थ दिन उगवलियावरी । दिन आला दीडप्रहरीं ॥
दिठीं देखिली घोडनगरी । जे कां पुरी सिद्धाची ॥ ६९ ॥
अनेक प्रकारचीं गुह्यस्थानें । ऋषींनीं केलें अनुष्ठान ॥
हरिश्चंद्र राजा सत्वनिधान । त्याची तेथें समाधी ॥७० ॥
जातां तया ग्रामाभीतरीं । जन पाहती बहुतापरी ॥
आश्चर्य करिती अंतरीं ॥ ह्मणती " वेडा आला हो! " ॥ ७१ ॥
त्याचिये बोलाचें भूषण । अंतरीं प्रेम चढे द्विगुण ॥
वाटे माझें शहाणपण । केव्हां जळूनि जाईल हें ॥ ७२ ॥

असो समय पाहुनी माध्यान्ह । नदीतीराप्रती जाऊन ॥
फाटक्या चिंध्या वेचून । बहु कंटकें जोडिल्या ॥ ७३ ॥
जाउनी तया ग्रामाभीतरीं । हिंडता झालों घरोघरीं ॥
मागोनिया माधुकरी । हरिश्चंद्रतीर्थी भक्षिली ॥ ७४ ॥
तेथें भिकोबाबावा संत । असे वस्तीसि नांदत ॥
उदासीन पाहुनि मातें । घरासि नेलें आपुल्या ॥ ७५ ॥
तेथें राहिलों तीन रात्र । त्यानें दिधलीं वस्त्रपात्रें ॥
सहस्त्रथिगळी कंथा विचित्र । एक नरोटी दोधली ॥ ७६ ॥
तेथें एकादशीव्रत आलें । आहारार्थ अन्यत्र झाडपाले ॥
शिजवून त्यांचे पिळे केले । तेचि भक्षिले दोघांनीं ॥ ७७ ॥
द्वादशीस केलें गमन । ब्राह्मणवाड्यास येऊन ॥
कानफाट्याचे मठीं जाऊन । एकरात्रीं राहिलों ॥ ७८ ॥
करितां दिगंबरस्मरण । कानफाटिया बोले वचन ॥
तुझा दिसतो निश्चय पूर्ण । तरि त्वां जावें गिरनारा ॥ ७९ ॥
तेथें दत्तात्रयाचें स्थान । योगी करिती अनुष्ठान ॥
तुजलागीं प्रत्यक्ष दर्शन । तेथें जातांचि होईल पैं ॥ ८० ॥
तोंचि ऐकोनि आर्तभूत । पश्चिमे जावया झालों उदित ॥
दृष्टीं पाहूं गिरनारपर्वत । ऐसा निश्चय दृढ केला ॥ ८१ ॥
तेथोनि केलें प्रयाण । जुन्नर ग्रामासि आलों जाण ॥
ठाकूरमंदिर शुद्ध पाहून । तेथें जाउनी राहिलों ॥ ८२ ॥
तेथें वैरागियाचे वृंद । मातें पाहोनि करिती विनोद ॥
वल्कलवसनी मतिमंद । अमगी कोण सांग पां ॥ ८३ ॥
त्यांसि म्यां केला नमस्कार । जोडोनिया दोन्ही कर ॥
मी तुमचा दासांकिंकर । कृपा मजवर असों द्या ॥ ८४ ॥
मातें पुसतां कवण वर्ण । तरि मी जातीचा ब्राह्मण ॥
ठाऊकें नाहीं ब्रह्मज्ञान । व्यर्थ जन्मोनि कष्टलो ॥ ८५ ॥
तुह्मी उत्तम दिसतां संत । मजवरी व्हावें कृपावंत ॥
दत्तात्रय मूर्तिमंत । भेटे ऐसें सांगावें ॥ ८६ ॥
ऐसें ऐकुनि माझें वचन । सर्वही ह्मणती ' बुद्धीहीन ॥
ब्राह्मण असतां मलिन । भ्रांतिरूप दीसतो ' ॥ ८७ ॥

एक ह्मणती झाला वेडा । एक ह्मणती निःसंग उघडा ।
एक ह्मणती बुद्धि प्रौढा । वेडा कैसा ह्मणावा ? ॥ ८८ ॥
एक ह्मणती मंत्र चळला । एक ह्मणती भांग प्याला ॥
एक ह्मणतीं कासया आला । जाई ग्रामाभीतरीं ॥ ८९ ॥
एक ह्मणती असों द्या परता । एक ह्मणती सत्य ह्मणतां ॥
परि कांहींच होईल कांहीं करतां । वस्त्रपात्र संरक्षा ! ॥ ९० ॥
ऐसे वदले बहुप्रकार । ऐकुनि आश्चर्य वाटलें फार ।
निस्पृही असुनि लोभाकार । यांची वृत्ति दीसते ॥ ९१ ॥
अस्तु बहु प्रकारचे जन । तयांसी करावें साष्टांग नमन ॥
आपुले आंगीं अनुभव घेऊन । शुद्धवृत्ती करावी ॥ ९२ ॥
त्याचि ग्रामीं कुशावा संत । कौपीनधारी पिशाचवत् ।
वेडिया सारिखा असे फिरत । शुद्ध नाहीं देहाची ॥ ९३ ॥
मुद्रा लावूनि खेचरी ॥ अलक्ष पाहे दिगंतरीं ।
श्वासोश्वास वाहती अंतरीं । सुषुम्ना-मार्गी चालतु ॥ ९४ ॥
ऐसी तयाची धारणा । दृष्टी पाहिला योगिराणा ॥
तयासी केलें साष्टांगनमना । हात जोडोनि विनविलें ॥ ९५ ॥
लोक ह्मणती वेड्यासी वेडा । भेटी का जैशी दगडदगडा ॥
यांच्या शब्दाचा उघाडा । काय लोकीं समजावा ॥ ९६ ॥
ऐसें बोलुनिया जन । गेले आपुलाले घरा उठून ॥
मग तया संतासी विनीत होऊन । गुजगोष्टी बोलिलों ॥ ९७ ॥
मग तो झाला प्रसन्नवदन । देहस्थितीं आला जाण ।
बोलता झाला मातें वचन । ‘ कंथा जतन करी कां ! ’ ॥ ९८ ॥
तेव्हां वृत्तीस आनंद होऊन । म्यां तयासी केलें नमन ।
आज्ञा मागून त्यालागून । पुढील ग्रामा चालिलों ॥ ९९ ॥
मार्गी बहुतचि आनंद झाला । वाटे मज अवधूत भेटला ॥
कंथा जतन कर ह्मणाला । हाचि शकुन पै मातें ॥ १०० ॥
कृतनिश्चयता दृढ अंतरीं । गु दर्शनाचा प्रेमा भारी ॥
आनंदसिंधूच्या भीतरीं । भावार्थ नद्या मिसळल्या ॥ १०१ ॥
पुढील कथेचें अनुसंधान । विचित्र आहे रसाळ गहन ॥
करूनि सर्वांगाचे कान । श्रोतेजनीं परिसावें ॥ १०२ ॥

इतिश्री स्वात्मप्रचीतीग्रंथ । संमत दत्तात्रय अवधूत ॥
निरंजनीं आत्मप्रचीत । गुरुकृपें जहाली ॥ १०३ ॥
॥ श्रीगुरुदत्तात्रयार्पणमस्तु ॥

---

## अध्याय दुसरा

उदारधीरा गुणगंभीरा! । प्रसन्नवरदा कृपासागरा ॥
श्रीदत्तात्रया पूर्णावतारा । मज निजमंदिरा नेई कां ॥ १ ॥
तुझें गृह तें चिदाकाश । मी तेथेंचि राहीन सावकाश ।
निशिदिनीं हेंचि मानस । इच्छितसे गुरुराया ! ॥ २ ॥
प्रथम अध्यायीं निरूपण । पुण्यग्रामीं पश्चात्ताप होऊन ।
जुन्नराप्रती झालें येणें । तें निरूपण कथियेलें ॥ ३ ॥
पुढें चालिलें अनुसंधान । कोतुळ ग्रामासि झालें येणें ।
समय पाहुनी माध्यान्ह । भिक्षाटन पै केलें ॥ ४ ॥
जन मुखाकडे पाहती । येउनि पायासी लागती ।
कित्येक स्तुतीतें करिती । तुह्मीच देव ह्मणवूनि ॥ ५ ॥
हे पाहुनी जनाची करणी । आश्चर्य वाटलें माझे मनीं ।
देवाधिदेवा ! काय करणी । विचित्र तुवां केलीसी ? ॥ ६ ॥
मजला दिधलें नाहीं दर्शन । जगासि कैसें दाविसी चिन्ह ।
सद्गुरु नाटकी तूं पूर्ण । मजलागून दिससी ॥ ७ ॥
ऐसें करितां अंतरीं स्तवन । धडाडिलें अंतकरण ।
देवा ! भेटसी मज लागून । किंवा नाहीं कळेना ॥ ८ ॥
मग आरंभिलें स्तवना । प्रेमाश्रु पातले नयना ॥
दीर्घस्वरें करूनि रुदना । टाहो मोटा फोडिला ॥ ९ ॥
लोक ह्मणती ' काय झालें । कोण निष्ठुरत्वें बोलिलें ।
किंवा कोणीं ताडण केलें । सांगा वहिलें आमुतें !' ॥ १० ॥
एक म्हणती ' पिसा दिसतो !' । एक ह्मणती ' असा कां करितो !
एक म्हणती ' उगाचि रडतो । व्यर्थ वेड्यासारिखा ! ॥ ११ ॥

एक म्हणती ' धन्य ! धन्य !। दृष्टी दिसतो परिपूर्ण ।
ईश्वरप्राप्ति आनंदघन । पुरुष दृष्टी दीसतो ॥ १२ ॥
कित्येक करिती साष्टांगनमना । कित्येक करिती प्रदक्षिणा ।
कित्येक करिती स्तवना । कोणी भोजना चला ह्मणती ॥ १३ ॥
अस्तु भक्तिमान तेथींचे जन । नेत्रीं प्रेमाश्रु पाहोन ।
कित्येक करिते झाले रुदन । देहाभिमान सांडूनि ॥ १४ ॥
दुसरे दिवशीं तेथून । न पुसतांच केलें गमन ।
दृष्टीसी पाहिलें जाऊन । अंकुल ग्राम योग्य जें ॥ १५ ॥
तेथें चंडीदास बोवा समर्थ । गीर्वाण वदे जो स्पष्टार्थ ।
सर्वकाळ करी परमार्थ । दुजा अर्थ नेणेची ॥ १६ ॥
तयाचे घराप्रती गेलों । नमन करूनि उभा ठाकलों ।
हात जोडोनी विनीत झालो । मग वदलो स्तुतीतें ॥ १७ ॥
चंडीदास बोवा सज्ञान । बोलता झाला गीर्वाण ।
स्वामी ! कोठुनि केलें येणें । योगीश्वर दीसतां ॥ १८ ॥
कवण सांप्रदाय कवण ठिकाण । येथें किमर्थ झालें येणें ॥
माध्यान्हिक भोजन । झालें किंवा नाहीं हो ? ' ॥ १९ ॥
ऐसें पुसतां स्वागत । मी वदता झालों त्यातें ॥
दत्तसांप्रदाय घाटीं वसत । भेटीलागी पातलों ॥ २० ॥
ते पुसती वस्त्रें काय झालीं । जेथें असतील ठेविलीं ॥
तीं कोणी नेईल वहिलीं । जाउनि त्यांत पहावें ॥ २१ ॥
तयांसी म्यां केलें उत्तर । मी तों इतुकाचि दिगंबर ॥
सहस्रांथिगळी कंथा परिकर । शिवालयीं ठेविली ॥ २२ ॥
तयाचें ऐका हो वर्णन । विंचा सर्पाचें जें स्थान ॥
लोक पळती तयासी भिऊन । ऐसी कंथा योग्य जे ॥ २३ ॥
ती ठेविली शिवाचे शेजारीं । तीतें पाहुनी अभिलाष करी ॥
ऐसा कवण हो दरिद्री । तुमचे गांवीं जन्मला ? ॥ २४ ॥
ऐसें कंथेचें करितां स्तवन । तयांनीं केलें हास्यवदन ॥
ह्मणती याचें हो घेऊन । दर्शन घेऊं तयेचें ॥ २५ ॥
तुह्मी एथेंचि येऊनि रहावें । पुराणश्रवणातें करावें ॥
दत्तात्रयानें गुरु अनुभवें । यदूप्रती कथियेले ॥ २६ ॥

तेंचि आजि अनुसंधान । तुह्मी गुरुभक्त दिसतां जाण ॥
अत्यादरें करावें श्रवण । येऊनिया सत्वरीं ॥ २७ ॥
ऐसें करितां भाषण । तों सवेंचि पुराणिक येऊन ॥
आदौ संहिता करुनि पठण । अर्थांतर सांगतसे ॥ २८ ॥
ह्मणे ऐका हो! सावधपण । दत्तात्रयें चोवीस गुरु करून ॥
एक एकाचा घेतला गुण । थोर सान न ह्मणतां ॥ २९ ॥
एकादश स्कंद पुराण । नित्य करावें तेथें श्रवण ॥
गांवांत करुनि भिक्षाटण । स्वस्थ तेथें राहिलों ॥ ३० ॥
बाप होणार बलवत्तर । दत्तात्रययदूचें उत्तर ॥
हृदयकमळीं धरितां परिकर । मन मधुकर वेधला ॥ ३१ ॥
श्रवण करितां तीन दिन । सर्वांचि उद्विग्न झालें मन ॥
वाटे दत्तात्रयरूप सगुण । केव्हां दृष्टी पाहीन मी ॥ ३२ ॥
ऐसें करितां तीव्र ध्यान । सर्वरात्र केलें स्तवन ॥
आलस्य निद्रा गेली पळून । सद्गुरुगुण आठवितां ॥ ३३ ॥
मग प्रातःकाळीं उठोन । प्रवरे जाउनी केलें स्नान ॥
सवेंचि बिराडा आलों परतोन । तो दिन कोण परियेसा ॥ ३४ ॥
शके सत्राशें तेहत्तीस । प्रजापति संवत्सरास ॥
शुद्धपक्ष कार्तिकमास । नवमी दिवस पैं होता ॥ ३५ ॥
दिनमणी आला एकप्रहर । जऊनि एकांतीं माडीवर ॥
ध्यानस्थ बैसलों क्षणभर । मूर्ति चिंतन पैं केली ॥ ३६ ॥
नाभिकमळ अधोवदन । तें ऊर्ध्व केलें मनेंकरून ॥
त्यावरि षोडशदळ सूर्य नेमून । द्वादशपत्र चंद्र तो ॥ ३७ ॥
तया चंद्राचिया वरी । अग्नी योजिला दशचक्रीं ॥
मग तया अग्नीवरी । दिव्य पादुका योजिल्या ॥ ३८ ॥
मनोरम्य रत्नखचित । देदीप्यमान शोभायुक्त ॥
वरती पाउलें मंडित । तळवे आरक्त योजिले ॥ ३९ ॥
घोटिया सुरेख मवाळ । पायीं वाळे रत्नप्रवाळ ॥
त्यावरी पैंजणाचा खळाळ । मनोरम्य योजिला ॥ ४० ॥
गुडघे मांडिया जानुस्थळ । कौपीनधारी बहु सुशीळ ॥
माजेस कटिसूत्र देतसे ढाळ । तेज अळुमाळ फांकलें ॥ ४१ ॥

कटि बारीक सिंहवत । हृदय विस्तीर्ण सुशोभित ॥
नाभीपासूनि कंठपर्यंत । रोमलतिका साजिरी ॥ ४२ ॥
षड्भुजमूर्ति सुलक्षण । उच्चग्रीव सुहास्यवदन ॥
सरळ नासिक लंबायमान । कर्णयुग्म साजिरें ॥ ४३ ॥
नेत्रकमळद्वयाकर्ण । भ्रुकुटि बारिक बहु संगीन ॥
ललाटस्थान अति विस्तीर्ण । जटामुकुट साजिरे ॥ ४४ ॥
मूर्ति प्रादेशमात्र सगुण । कंबुकंठ गौरवर्ण ॥
सुप्रसन्न विभूतिभूषण । सर्वांगा जी साजिरी ॥ ४५ ॥
मस्तकीं मुकुट शोभायमान । अत्यद्भुत प्रभा गहन ॥
चंद्रसूर्य जयाचे किरण । शोभायमान साजिरा ॥ ४६ ॥
मैलागिरि चंदन सुगंध बहुत । केशरादि अष्टगंधयुक्त ॥
त्रिपुंड्र आडवे अक्षतासंयुक्त । कस्तुरिच्या साजिऱ्या ॥ ४७ ॥
श्रीकृष्ण चतुर्भुजमूर्तिध्यान । दत्तात्रयाचें घेउनि दर्शन ॥
भाळीं लावुनि चंदन । वैकुंठासी पैं गेला ॥ ४८ ॥
दत्तात्रयमूर्तीचें ध्यान । पहातां वेधलें माझें मन ॥
जैसा आमिषालागीं मीन । न सोडीच सर्वथा ॥ ४९ ॥
कर्णद्वय कुंडलें युक्त । शोभायमान झळाळित ॥
क्षणक्षणा विद्युल्लता तळपत । तैसे कर्ण चमकती ॥ ५० ॥
कंठीं मेखळा शुभ्रवर्ण । जानुपर्यंत लंबायमान ॥
जैसें ग्रीष्मऋतूचें चांदण । तैसी शोभा दाटली ॥ ५१ ॥
कंठीं अनेक रत्नमाळा । बोरमाळा जवमाळा ।
बहुत पुतळियांच्या माळा । जांबूनद सुवर्णी ॥ ५२ ॥
त्यावरी मौक्तिकांच्या माळा । रुद्राक्षमिश्रित सुढाळा ॥
नाभीपर्यंत लांब सरळ । मनोरम्य योजिल्या ॥ ५३ ॥
अनेक रत्नमाळा सुरंग । शुभ्रवर्णादि सहा रंग ॥
बहुतेजस्वी हेमलग । माळा कंठीं घातल्या ॥ ५४ ॥
त्यावरी पुंगीचें भूषण । खड्गपात्रीं शुभ्रवर्ण ।
चतुरांगुली सुलक्षण । गळयामाजी साजिरी ॥ ५५ ॥
सर्व हस्तकीं रत्नकंकण । पृथक् पृथक् शोभायमान ॥
मुद्रिका सर्वांगुळयांलागून । बहु सुंदर योजिल्या ॥ ५६ ॥

षड्हस्तकीं षड्भूषण । ऊर्ध्वहस्तकीं शोभायमान ॥
शंखचक्र चिमणें ध्यान । दैदीप्यमान साजिरें ॥ ५७ ॥
मध्यपाणी त्रिशूळ डमरू । रत्नखचित अतिसुंदर ॥
मौक्तिक झालरी परिकर । चिमणी चिमणी योजिली ॥ ५८ ॥
अधोपाणी कमलाकृती । सव्यपाणी माला फिरती ॥
कमंडलू धारण वामहस्तीं । रत्नखचित साजिरा ॥ ५९ ॥
ऐसें हृदयांतरीं ध्यान । मूर्ती चिंतली सुलक्षण ॥
मग रत्नखचित आलय निर्मून । कर्पूरदीप लाविले ॥ ६० ॥
सभोंवतीं केळी तोरण । बकुळ मैलागिरी चंदन ।
घमघमित सुगंध पूर्ण । हृदयांतरीं दाटला ॥ ६१ ॥
पुष्पवाटिका अनेक जाती । जाई मोगरा आणि मालती ।
गुलाब चापा आणि सेवंती । मनोमय निर्मिल्या ॥ ६२ ॥
देवालयाचे सन्मुख । सभामंडप अतिसुरेख ।
माजी हंस मयोरें उचलूनि पांख । बहु आनंदें नाचती ॥ ६३ ॥
कोकिळा सुस्वरें गर्जती । शुक उंच स्वरें गाती ।
बदक पाणियामाजीं फिरती । हौदकारंजे निर्मिले ॥ ६४ ॥
तेथें सूर्यप्रभा निर्मून । कमळिणी विकसित झाल्या तेणें ।
हेमरौप्य चूर्ण करून । उपरीवरूनि झोकती ॥ ६५ ॥
नारदतुंबर घेऊनि वीणा । सुस्वर गाती गंधर्वगायना ।
आलाप आळविती राग नाना । यशकीर्ति वर्णिती ॥ ६६ ॥
तेथें मनाची मूर्ति निर्मून । पायीं घागऱ्या बांधून ।
नामघोष आनंदें करून । देवापुढें नाचतो ॥ ६७ ॥
कीर्तन करी प्रेमयुक्त । क्षणक्षणा देवातें न्याहाळित ॥
नखापासुनि शिखापर्यंत । ध्यान दृष्टी विलोकीं ॥ ६८ ॥
याप्रकारें करितां ध्यान । चित्त स्वरूपा गेलें वेधून ॥
आसनीं बैसलों असतां जाण । नाहीं भान देहाचें ॥ ६९ ॥
हृदयांतरीं करितों ध्यान । हें देही गेलों विसरून ॥
तेथिंचा आनंद पाहून । वृत्ति शून्य पैं झाली ॥ ७० ॥
ऐसें एक घटिकापर्यंत । वाटे पाहतों स्वप्नांत ॥
जे कां रचना मूर्तिमंत । मनोमय योजिली ॥ ७१ ॥

ऐसें पाहतां तेचि वेळीं । कर्मरेषा विचित्र बळी ॥
दत्तात्रयमूर्ति हृत्कमळीं । मातें जाली बोलती ॥ ७२ ॥
तेथें मनाची मूर्ति सान । ते श्रीगुरूंनीं हृदयीं आलिंगून ।
मुखासि लावूनि माझा कान । मंत्र झाले बोलते ॥ ७३ ॥
अष्टाक्षरमंत्र संपूर्ण । अर्थ जयाचा गूढज्ञान ।
तयेवेळीं मातें सांगून । हास्यवदन जहाले ॥ ७४ ॥
तयेवेळीं आनंद समरस । एकचि जाला उल्लास ।
ब्रह्मपुरीं विष्णुस्थानास । सुख नसेल ऐसें पैं ॥ ७५ ॥
सर्वेचि देहावरी येऊन । पहाता झालों नेत्र उघडून ।
तों आंतबाहेरी तें ध्यान । तेजयुक्त देखिलें ॥ ७६ ॥
मग ध्यानासि विसर्जिलें । आपुले मनांत झटिलें ।
देवा ! त्वां इतुकें केलें । परि मी न समजेची ॥ ७७ ॥
तुजला मज कायसी चोरी । जाणोनी आलासी हृदयांतरीं ।
मंत्र सांगणें वरचेवरी । स्वप्न पडल्या सारिखा ॥ ७८ ॥
असो त्वां आपुली केली थोरी । परि म्यां नेमिली जे अंतरीं ।
तया निश्चयातें कोण वारी । कृतसंकल्पा माझिया ॥ ७९ ॥
आतां गिरनारासी जाईन । एक संवत्सर सात दिन ।
भरतां करूनि निर्वाण । प्राण त्यागीन आपुला ॥ ८० ॥
ऐसा निश्चय करून । खालें उतरलों माडीवरून ।
हृदयीं करूनि तोंचि ध्यान । नामस्मरण करीतसें ॥ ८१ ॥
एकादश दिन पर्यंत । तेथें राहिलों आनंदयुक्त ।
श्रवण करूनि भागवत । सुखसंतुष्ट राहिलों ॥ ८२ ॥
तेथें एक ब्राह्मणाची कुमरी । वय तारुण्य अति सुंदरी ।
तयेचा भ्रतार देशावरी । टाकुनी बहुदिन पैं गेला ॥ ८३ ॥
ती ब्राह्मणी आपुले माहेरीं । राहिली बहुत काळवरी ।
चिंता करितसे अंतरीं । भ्रताराच्या वियोगें ॥ ८४ ॥
तयेनें मजलागीं पाहोन । मातेसी जाऊनि सांगे खूण ।
म्हणे दृष्टी पाहिला ब्राह्मण । आपुले भ्रतारासारिखा ॥ ८५ ॥
म्हातारी तैशीच उठूनी । आली पुराण-श्रवणा लागूनी ।
दृष्टी मातें अवलोकुनी । गेली सदनीं आपुल्या ॥ ८६ ॥

आप्तवर्गासी मेळवून । तयासी बोलती झाली वचन ।
माझा जामात गेला उठून । तो म्यां दृष्टी देखिला ॥ ८७ ॥
ते सर्व मजला पाहूं येती । आश्चर्य करिती आपुलें चित्तीं ।
जवळ येऊनि पुसती । कवण ग्राम तुमचें ॥ ८८ ॥
कवण कुळ कवण गोत्र । गृहस्थाश्रमी किंवा स्वतंत्र ।
त्यागुनीया वस्त्रपात्र । ब्रह्मचारी दीसतां ॥ ८९ ॥
तुह्मी तों आच्छादिलें स्वरूप । परि आह्मी ओळखिलें तुमचें रूप ।
सोडोनिया सर्व संताप । सत्य आह्मांसी वदावें ॥ ९० ॥
मग त्यासी बोलतां झालों उत्तर । बालाघाटीं कळंबनगर ।
तेथील मी वतनदार । कुलकर्णवृत्ति आमुची ॥ ९१ ॥
आश्वलायन गोत्र कौशिक । स्त्रियाबंधु आप्तमित्र ।
गृह सानकूळ आणि स्वातंत्र्य । नाहीं कोणीं गांजिलें ॥ ९२ ॥
हृदयीं उठला अति संताप । वाटे बहुत झालें पाप ।
आतां पहावें आत्मस्वरूप । गुरुकृपें करूनी ॥ ९३ ॥
नको नको हा संसार । याचें करितां हित फार ।
वय वेंचुनि गेलें फार । नाहीं आधार कोठें ही ॥ ९४ ॥
प्रपंचीं धरूनि अभिमान । करावें नीचाचें सेवन ।
बहु करावें दोषाचरण । द्रव्यालागीं ॥ ९५ ॥
प्रपंचालागीं सर्व त्यजावें । सांडोनि परदेशी व्हावें ।
एकलेंचि निघोनिया जावें । मरण आल्यासारिखें ॥ ९६ ॥
घरचे ह्मणती सत्वर जावें । मुहूर्त आहे आजची बरवें ।
बाहिर प्रस्थान ठेवावें । मग यावें घरासी ॥ ९७ ॥
तंव प्रस्थानासि ठेविलें । निघावयाचें खचित झालें ।
सर्व घरचीं आनंदले । ह्मणती केलें उत्तम ॥ ९८ ॥
घरचे पापड दंठवे काढून । केलीं गोड गोड मिष्टान्नें ।
मुरड कानवले करून । मातोश्रीनें घातले ॥ ९९ ॥
ह्मणे हे कानवले खादल्यानें । फिरूनि लवकर होतसे येणें ।
आणिक दहीभात कालवून । तोहि सर्वेचि घातला ॥ १०० ॥
जैसा चोरटा धरावा । सुळी घालावयासीं न्यावा ।
दहींभात त्यासि भक्षवावा । तैसें केलें मजलागीं ॥ १०१ ॥

ऐसें करूनि बाहेर घातलें । वस्त्रपात्रही नाहीं दिलें ।
ह्मणती जातां वाट चाले । ओझें होईल तुह्मांतें ॥ १०२ ॥
बंधु मातोश्री आप्त सोयरीं । घालवीत आले बाहेरीं ।
गळा पडती मैंदापरी । आक्रंदोनि रडताती ॥ १०३ ॥
मित्र ह्मणे हा बरा होता । आमचे कामास पडत होता ।
सोइरे ह्मणती तुह्मी जातां । घरचे कैसें करोनि ? ॥ १०४ ॥
बहिण ह्मणे ' वो बंधुराया ! । मज लुगडें नेसावया ।
छीट चांगलें रे सखया ! । मजलागीं पाठवीं ' ॥ १०५ ॥
बंधु हात जोडोनिया पुढा । ह्मणे ' मज चांगला धोतरजोडा ।
पैका वेंचोनिया रोकडा । घेउनिया पाठवा ' ॥ १०६ ॥
माता सांगे बहू परवडी । मज धाबळी आणि घोंगडी ।
बारिक चांगली खडखडी । आसनालागीं पाठवी ॥ १०७ ॥
स्त्रिया बोले मृदुवचनीं । ' वस्ता पाठवा मजलागुन ।
बाळ्या बुगड्या आणि नथनी । घडोनिया पाठवा ॥ १०८ ॥
ऐसें सांगुनी सर्वांनीं । माझ्या वरुतें सोडिलें पाणी ।
ह्मणती आला जरी वांचुनी । तरी आपुला ह्मणावा ॥ १०९ ॥
ऐसें ह्मणती वरचेवरी । परि कोणी न ह्मणे ' राहें घरीं ।
कासया जातोसि दुरीं । श्रम होतील तुज लागीं ' ॥ ११० ॥
असो कोणी न ह्मणतां भलें । सर्वांनीं मज बाहेर घातलें ।
मार्गीं चालतां रुदन आलें । सर्व राहिले ह्मणवूनी ॥ १११ ॥
द्रव्याकारितां आप्त सोइरे । द्रव्याकरितां मुलें लेंकुरें ।
द्रव्य नसतां घालिति बाहेर । कोणी माया न करिती ॥ ११२ ॥
कोठेंही नाहीं विश्रांती । संसारसागरीं आदि अंतीं ।
सद्गुरुपाय धरितां चित्तीं । सर्व सुख आतुडे ॥ ११३ ॥
इतिश्री आत्मप्रचीति ग्रंथ । संमत दत्तात्रय अवधूत ।
निरंजनीं आत्मप्रचीत । गुरुकृपें जाहली ॥ ११४ ॥

॥ श्रीगुरुदत्तात्रयार्पणमस्तु ॥

---

## अध्याय तिसरा.

श्रीगुरुराया दत्तात्रया । कृपासिंधु करुणालया ।
मजवरी कृपा करी सत्रया । योगिराया ! स्वामी तूं ॥ १ ॥
तूं जो निरंजन निर्विकार । मजसाठीं जालासी साकार ।
मस्तकीं ठेवुनी अभयकर । अनुभव साचार वदवीसी ॥ २ ॥
मागील कथेचें अनुसंधान । बाहेर घातलें आप्तवर्गानें ।
मग दूर देशाप्रती जाऊन । केली सेवा यवनाची ॥ ३ ॥
तेथें राहोनि दोन संवत्सर । श्रम केले अतिनिष्ठुर ।
द्रव्य मिळविलें फार । पापाचरण करूनी ॥ ४ ॥
सर्वेंचि घरची ऐकिली मात । स्त्री जाली ऋतुस्नात ।
हुंडी करूनी द्रव्यातें । घराप्रती पातलों ॥ ५ ॥
आणिल्या द्रव्यातें खर्चून । स्त्रियेचें केलें ओटभरण ।
उरलें तें देणें वारून । स्वस्थ घरीं बैसलों ॥ ६ ॥
बहु आनंदें विषय भोगिला । जैसा रेडा चिखलीं पडला ।
कीं डुकर नरकीं भरला । प्रेमानंदें डुल्लत ॥ ७ ॥
ऐसे झाले षण्मास । आणखी ओढवला प्रवास ।
घरचीं ह्मणती रोजगारास । जाई आतां सत्वरीं ॥ ८ ॥
मग दूरदेशीं जाऊन ! बहुतांचें आर्जव करून ।
पैशाची नामक लिपी लिहून । रोजगार पैं केला ॥ ९ ॥
तेथें बहुत दिवस राहूनी । फार केलें श्रमालागूनी ।
देहीं लागलें तेथिंचें पाणी । ह्मणुनि गेलों घरासी ॥ १० ॥
द्रव्य मातेचे स्वाधीन केलें । तेव्हां ह्मणती भलें भलें ।
मागुती कुसमुसूं लागले । घरीं कासया राहिला ॥ ११ ॥
आणखी निघालों प्रवासाकारणें । घरचीं सांगति निरोपालागून ।
कोणी ह्मणती आणा पांघरुणें । कोणी सोनें मागती ॥ १२ ॥
स्त्री ह्मणे ' वो प्राणपती । मजला घेऊनि यावें मोतीं ।
ऐसें आपुले हितासी रडती । परि न जाणती श्रमातें ॥ १३ ॥

प्रवासामाजी जाऊन । श्रम होती हें कोणीच नेणें ।
सर्व इच्छिती धनाकारणें । बहु लोभिष्ट होउनी ॥ १४ ॥
नको नको रे! संग त्यांचा । आप्त मित्र सोइरीयांचा ।
श्रम नेणती गरीबाचा । काय करितो ह्मणूनी ॥ १५ ॥
अनेक प्रकारच्या पापराशी । करून मेळवावें द्रव्याशीं ।
घरा जातां देहासी । सुख नाहीं क्षणभरी ॥ १६ ॥
एका विषयसुखा कारण । धरावा सर्वांचा अभिमान ।
पापद्रव्य मेळवूनी । सर्वांसी पोसावें ॥ १७ ॥
तया विषयाचें काय सुख । केवळ नरकाचेंचि मुख ।
देवासी होउनि विन्मुख । भवचक्रांत पडावें ॥ १८ ॥
स्त्रीरूप केवळ अविद्या । शरीरीं विटाळाच्या नद्या ।
रक्त वाहे सांदो सांधा । योनिद्वारें कढूनी ॥ १९ ॥
अंतरीं अस्थींचा पंजर । मांसें करूनि लिंपिलें वर ।
शिराचें बांधण देउनि बरवें । चर्मयुक्त मढियेली ॥ २० ॥
मस्तकीं केसाचें वेटाळें । हृदयीं मांसाचिये गोळे ।
मुख नासिकाचिये बिळें । बहु दुर्गंधी वाहती ॥ २१ ॥
अंतरीं भरला मळमूत्र । पोटीं नरकाडी अपवित्र ।
दुर्गंधी जैशी मेलें कुत्रें । तैसें अपवित्र सर्वही ॥ २२ ॥
स्त्रीरूप केवळ मोहिनी । भवदोषाची निबिड खाणी ॥
पाठवीतसे नरकालागूनी । संग करी तयातें ॥ २३ ॥
नको नको स्त्रियाची संगती । इणें बहुतांची केली माती ।
जन्ममृत्यू खापर हातीं ॥ देऊनि बहुद्वार फिराविली ॥ २४ ॥
असो स्त्रियांचा सोडावा संग । प्रपंचीं व्हावें निःसंग ।
तरी होईल भवभंग । जन्ममृत्यू चुकेल ॥ २५ ॥
नाहीं तरी भवसागरीं । बुडणें लागेल वरचेवरी ॥
शेवटीं यमाचिये घरीं । बहु जाचणी पैं होती ॥ २६ ॥
ऐसें समजूनी म्यां अंतरीं । वीट मानिली या संसारीं ।
तुह्मी सर्व मिळोनि घोरीं । घालूं पहातां मजलागीं ॥ २७ ॥
एर्थीची नीत ऐशी काई । सर्व करिती एकाचि आवई ।
लटकेंच ह्मणूनी जावाई । गळां पडतां माझिया ॥ २८ ॥

एका स्त्रियेचे भयेंकरून । सर्व सोडून घेतलें येणें ।
पुढें विघ्न सद्गुरूनें । कैसें मज पाठविलें ॥ २९ ॥
सर्वांचि त्या मुलीचे गावींचा । एक आला ओळखीचा ।
तोही ह्मणे हाची साचा । जावाई तुमचा होय कीं ॥ ३० ॥
ऐसें ऐकुनी तयाचें वचन । चंडीदास बावा सत्वनिधान ।
ह्मणे ' तूं आहेसी कवण । खरें सांग अवधूता ! ' ॥ ३१ ॥
ऐसें ऐकूनि तयाच्या बोला । अंतरीं खेद बहुत वाटला ।
वाटे सत्पुरुषही क्षोभला । मजलागीं कैसा हो ! ॥ ३२ ॥
मग मोठियानें गळा काढून । करिता झालों बहु रुदन ।
सर्वांचि उद्विग्न जालें मन । वाटलें प्रयाण करावें ॥ ३३ ॥
चंडीदास बावाशीं पुसतां । ह्मणे ' रे नको जाऊं अवधूता ! ।
हे नसली जरी तुझी कांता । तरी भय काइसें ? ' ॥ ३४ ॥
चंडीदासानें कृपा केली । मजलागीं वस्त्रपात्रें दिल्हीं ।
कौपीन दोन धोत्रें चांगलीं । नरोटी दिली पाचवी ॥ ३५ ॥
असो तयाप्रती पुसून । सर्वांसी करिता झालों नमन ।
मग तेथुनिया केलें गमन । सिन्नरासी पै आलों ॥ ३६ ॥
नागेश्वराचें शिवालय प्रचंड । तेथेंचि असे नागकुंड ।
तयावरी ब्राह्मणांची झुंड । स्नानालागीं पै आली ॥ ३७ ॥
मीहि तेथें स्नानासी । सहज गेलों अनायासीं ।
त्यांनीं वेडा मानुनी मजसी । संकल्पासी बोलिले ॥ ३८ ॥
एकसमयावच्छेदें करून । बोलते झाले चौघेजण ।
ह्मणती ' तुमचें पापदहन । समूळ आजी जहालें ' ॥ ३९ ॥
ऐसें ऐकतां त्यांचें वचन । हर्षयुक्त झालें मन ।
मग वस्त्रें सर्व गोळा करून । चोघांप्रती दिधलीं ॥ ४० ॥
एकाकी कौपीनधारी । तेथूनी निघालों झडकरी ।
ग्रामांत करूनि माधुकरी । देपुराप्रती पै गेलों ॥ ४१ ॥
तेथें बाबाजी भागवत । गृहस्थाश्रमी बहु समर्थ ।
अतिथियाचें मनोरथ । पूर्ण करीत सर्वदा ॥ ४२ ॥
घेतलें तयाचें दर्शन । पाहूनि धालें मन ।
भागवत ह्मणे ' आलां कोठून । पश्चात्तापी दिसतां ' ॥ ४३ ॥

सत्वरीं गृहाप्रती चलावें । माझे मनोरथ पुरवावे ।
दोनचार दिवस रहावें । कोठें न जावें सत्वरीं ॥ ४४ ॥
बहुत आदरता तार्तम्य घेऊन । घेतलें आठ दिवस ठेवून ।
पांघरावया कामळ घेऊन । मजलागीं दीधलें ॥ ४५ ॥
दुसरें आंगवस्त्र घेऊन । ह्मणे याजलागीं पांघरण ।
म्यां तयाचें मोडिलें वचन । अंगवस्त्र नाहीं घेतलें ॥ ४६ ॥
तंव तेच रात्रीं स्वप्न झाले । ब्राह्मणाचें रूपें दत्तात्रय आले ।
येउनि उभे जवळ ठेले । बोलते जाले सक्रोधें ॥ ४७ ॥
'कां रे ! अंगवस्त्र न घेसी । इतका त्याग कासया करिसी ।
कोणा दुखावूं नये मानसीं । सुखें देतां घ्यावें पैं ' ॥ ४८ ॥
ऐसें बोलोनियां वहिला । दत्तात्रय अदृश्य झाला ।
भानू प्रकाशला । रविरश्मी दाटल्या ॥ ४९ ॥
मग जाउनी भागवतासी शरण । अंगवस्त्र घेतलें मागून ।
सांगितलें वर्तमान । जें कां रात्रीं जहालें ॥ ५० ॥
बाबाचें घेतलें आशीर्वचन । तेथें आठ दिन राहून ।
सर्वांचि निरोपातें मागून । सिंदरासी पै आलों ॥ ५१ ॥
येथें बाळकरामबाबा आनंदघन । त्याचें घेतलें दर्शन ।
जयासी मारुती प्रसन्न । साक्षात्कार जाहलासे ॥ ५२ ॥
तेथें राहुनी पांच दिवस । आज्ञा मागुनी तयास ।
सर्वेचि केलें प्रयाणास । सिन्नाप्रती पातलों ॥ ५३ ॥
तेथोनि प्रात:काळीं उठोन । सत्वरची केलें गमन ।
द्वादश घटका दिनमान । तंव क्षेत्राप्रती पातलों ॥ ५४ ॥
जें कां सर्व देशाचें नासिक । योगवृंदाचें येतसे पिक ।
तें हें सुक्षेत्र नाशिक । दृष्टीलागीं पाहिलें ॥ ५५ ॥
लोक ह्मणती या नाशिक । परि म्यां देखिले बहुशिक ।
दुरला येऊनि नाशिक । शिकूनिया जातसे ॥ ५६ ॥
क्षेत्रासि नाम नाशिक । परि योगी रहाती बहुसम्यक ।
न देखों नाशिक । मनुष्यमात्र करूनिया ॥ ५७ ॥
सर्वांचि दिठीं देखिली गंगा । जे त्रितापशमनी भवभंगा ।
वसे सांबाचे अर्धांगा । जे श्रीरंगा आवडती ॥ ५८ ॥

जियेचें सामर्थ्य अतिगहन । दोषी असतां शतयोजन ।
तयाचें करीत उद्धरण । क्षणमात्र न लागतां ॥ ५९ ॥
जियें विष्णूचे अंगुष्ठावरून । ब्रह्मगिरीस केलें येणें ।
शिवजटा मिळणीं मिळून । मृत्यलोका पातली ॥ ६० ॥
तयेचें लावण्य पाहून । मदनारी झाला तल्लीन ।
मस्तकावरी केलें धारण । जटाजूटीं राहिली ॥ ६१ ॥
शिवें केलें विषप्राशन । सर्वांग झालें तपन ।
करितां गंगा जटीं धारण । शीतल सर्वांगीं झाला पैं ॥ ६२ ॥
ते हे गंगा पापहारिणी । कलियुगीं जडमूढउद्धरणी ।
भागीरथीची ज्येष्ठ भगिनी । नाशिकालागी पातली ॥ ६३ ॥
प्राणी बहुश्रमें जाती काशी । कावडी नेती रामेश्वरासी ।
दृष्टी पाहतां गंगेसी । भागीरथी उसळतसे ॥ ६४ ॥
तो चमत्कार अद्यापिवरी । दृष्टीनें पहावा चतुरीं ।
मग सत्य वाटेल अंतरीं । एरवीं खरेंचि आहे वो ॥ ६५ ॥
ऐसें गंगेचें करूनि स्तवन । दृष्टी पाहिलें सुहास्यवदन ।
जें ब्रह्मानंदाचें सुखसदन । सांडणीं मदन करावा ॥ ६६ ॥
जीची स्वरूपाची पाहुनी सीमा । लज्जित झाल्या उमारमा ।
ते म्यां पाहिली सुखधामा । भीष्ममाता साजिरी ॥ ६७ ॥
जीचे पुत्राचें सामर्थ्य गहन । विष्णूसि केलें रणकंदन ।
शस्त्रप्रतिज्ञा केली खंडण । चक्र हस्तकीं धरविलें ॥ ६९ ॥
जियेचें दुग्धप्राशन-बळ । भीष्म कृष्णालागीं सबळ ।
होउनि युद्ध केलें तुंबळ । एकादश दिनवरी ॥ ६९ ॥
ते हे गंगा सुप्रसन्नवदना । आवडती जे भालनयना ।
प्रगटली जे विष्णुचरणा । ते म्यां दिठी देखिली ॥ ७० ॥
अरुणा तयेचें कंठस्थान । वरुणा हनुवटी गहन ।
रामकुंड तें मुख जाण । लक्ष्मणकुंड नासिका पैं ॥ ७१ ॥
सूर्यकुंड ब्रह्मतीर्थ विचित्र । हेचि गंगेचे दोन्ही नेत्र ।
पंचवटी नाशिक दोन्ही क्षेत्र । कर्ण-युगुल जियेचें ॥ ७२ ॥
द्वैपायन गंगापुत्र । तपश्चर्या केली स्वतंत्र ॥
तें बदरीतीर्थ अतिपवित्र । भांठा खुरेख साजिरा ॥ ७३ ॥

त्र्यंबका पर्यंत स्वप्रवाहिनी । तेचि तयेची सुंदर वेणी ॥
आतां वर्णिजेल सर्वभूषणीं । दैवतांचा समुदावो ॥ ७४ ॥
रेणुका लक्ष्मी भद्रकाळी । हेचि गळ्यांतील गरसोळी ॥
मंगळसूत्र तयातळीं । मारुति तपोवनींचा ॥ ७५ ॥
नीळकंठ तारकेश्वर रामेश्वर । मुरडेश्वर पंचरत्नेश्वर ॥
बाणेश्वरादि चिंचपेट्या समग्र । गळ्यामाजी घातल्या ॥ ७६ ॥
चित्रघंटा पदकमाळा । रोकडामारुति तेजआगळा ॥
खालीं लोलक सुढाळा । लाविलासे सुंदर ॥ ७७ ॥
जगप्रसिद्ध तिळभांडेश्वर । तोचि कंठीं चंद्रहार ॥
श्रीव्यंकटेश पदक सुंदर । तयालागीं शोभतसे ॥ ७८ ॥
सिद्धिविनायक गणपती सुंदर । उभय कर्णीं कुंडलाकार ॥
बाळिया दत्तपादुका परिकर । पंचवटी माजींतल्या ॥ ७९ ॥
कपालेश्वर उमामहेश्वर । ही कर्णफुलें अतिविचित्र ॥
तेणें सुशोभित दिसती श्रोत्र । तया गंगेमातेचे ॥ ८० ॥
गोरे रामलक्ष्मण । तेचि नासिकीं मोतीं सुपान ॥
द्विमुखी मारुती अधोवदन । मदननायक जोडला ॥ ८१ ॥
पंचमुखी मारुती आणि विठ्ठल । तोचि विजवरा देतसे ढाळ ॥
पाताळेश्वर हिरा तेजाळ । देतसे ढाळ तयासी ॥ ८२ ॥
श्री दत्तात्रय दिगंबर । तोचि मस्तकीं मुगुट सुंदर ॥
कोटि उगवले प्रभाकर । तेज अमूप जयाचें ॥ ८३ ॥
ब्रह्माविष्णुमहेश्वर । या तिहींचा जो अवतार ॥
तो साक्षात् दिगंबर । मस्तकावरी शोभतो ॥ ८४ ॥
जो निष्कळंक निरंजन । निष्काम सदैव परिपूर्ण ।
सच्चित्स्वरूप आनंदघन । मुगुट शिरीं साजिरा ॥ ८५ ॥
जो परात्पर अवधूत । सर्वीं असुनी सर्वातीत ।
सर्व विषयांसी अलिप्त । मुगुटाकृती शोभतो ॥ ८६ ॥
अश्वत्थवन मौक्तिकें बरीं । हरिहरेश्वरादि पोंवळीं अंतरीं ।
तेचि तयालागीं झालरी । मुगुटाखालें शोभती ॥ ८७ ॥
तया सान्निध्या सुंदरनारायण । तो मस्तकीं सिसफूल जाण ।
ब्रह्मतीर्थ तया संलग्न । कुंभम भाळीं शोभतसे ॥ ८८ ॥

सर्वांमाजी गुणसमुद्र । पंचवटी श्रीरामचंद्र ।
तोचि भाळीं शोभला चंद्र । प्रभा अपार जयाची ॥ ८९ ॥
रावणें सीता केली हरण । मग लक्ष्मणें ताटिकेचें घ्राण ।
स्वहस्तें केलें छेदन । त्रिशिरखरदूषण मारिले ॥ ९० ॥
श्रीरामें पाषाणसेतु बांधून । मारिले रावणकुंभकर्ण ।
सीतालक्ष्मणसह आपण । फिरूनि आले पंचवटीं ॥ ९१ ॥
पाहून सुंदर तपोवन । चिरकाळ राहिले आपण ।
तें स्वरूप इंदुवदन । गंगाभाळीं शोभतसे ॥ ९२ ॥
सव्यभागीं तपस्वी थोर । रघुनाथ गुरुजी योगीश्वर ।
जो साक्षात् भृगु अवतार । कलियुगामाजी अवतरला ॥ ९३ ॥
ह्मणाल भृगु असें संबोधन । तरि ते मिथ्या नवदे जाण ।
मजलागीं श्रीदत्तात्रयानें । स्वप्नीं येऊनि कथियेलें ॥ ९४ ॥
जो तपस्वियांमाजी वीरभद्र । अनुष्ठानियांमाजि दुजा रुद्र ।
कां योगियामाजी योगींद्र । शीतळ चंद्र दूसरा ॥ ९५ ॥
सत्वधीर अति उदार । ज्ञानियांमाजी रत्नाकर ।
तपोतेजप्रभाकर । गंगाभाळीं शोभतो ॥ ९६ ॥
ऐसी गंगा माता सुंदर । रत्नभूषणेंयुक्त परिकर ।
हास्यवदन उदार । दृष्टीसी म्यां देखिली ॥ ९७ ॥
मग तयेप्रती करूनि नमन । केलें तीर्थातें वंदन ।
पंचवटीमाजी जाऊन । श्रीरामदर्शन घेतलें ॥ ९८ ॥
दिनमणी पाहुनि माध्यान्ह । क्षेत्रांत केलें भिक्षाटण ।
गौतमीतटाकीं जाऊन । भोजनातें सारिलें ॥ ९९ ॥
मग यतीसी केलें विचारण । साधकांमाजी अग्रगण्य ।
रघुनाथ गुरुजींचें स्थान । कोठें तें मज दाखवा ॥ १०० ॥
स्वामी बोलते झाले उत्तर । दिनमणी राहतां घटकाभर ।
दर्शन होईल साचार । एरवीं जातां न घडेची ॥ १०१ ॥
तयाप्रती मी वदलों वचन । माझें शुद्ध अंतःकरण ।
असेल तरिच हो दर्शन । तिसरे प्रहरीं होईल ॥ १०२ ॥
मग मी निघालों तेथोनी । उतरलों स्वर्धुनीचें पाणी ।
निरंजन स्थानाखालुनी । घाटावरुतें चढिन्नलों ॥ १०३ ॥

तों दृष्टी पाहिला विप्रसमुदावो । त्यांमाजी योगियांचा रावो ।
पाहुनी नमनाचा भावो । मम अंतरीं उदेला ॥ १०४ ॥
तयासी ऐलिकडे टाकून । घाटावरी सुंदरनारायण ।
तयाचें घेतलें दर्शन । सर्वेंचि मागें परतलों ॥ १०५ ॥
तंव गुरुराज तेथोनि गेला । जैं दरिद्रिया परीस सांपडला ।
धोंडा ह्मणवूनि झुगारिला ! अक्षोभा उदका माझारी ॥ १०६ ॥
कीं मार्गे चालतां श्रांतला । निकट कल्पातरु देखता झाला ।
त्यागुनी हिवराखालें गेला । अभागिया जैसा पैं ॥ १०७ ॥
कां गुराखिया हिरा सांपडला । गार ह्मणुनि विस्तो पाडूं गेला ।
न पडतां झुगारोनि दिला । उपेगी नाहीं ह्मणवूनी ॥ १०८ ॥
कां अकस्मात् दैव उदेलें । रोगिया अमृत आंतुडलें ।
कांजी ह्मणुनी त्यागिलें । अभागिया पुरुषांनीं ॥ १०९ ॥
कां धनगर हिंडतां वनीं । आढळती जाहली पद्मिनी ।
चेष्टा समजूनि मनीं । अरण्यामाजी पळतसे ॥ ११० ॥
असो पुढें होईल गुरुदर्शन । सर्व मनोरथ होतील पूर्ण ।
माझें तुटेल भवबंधन । श्रोते जनीं परिसावें ॥ १११ ॥
इतिश्री आत्मप्रचीतिग्रंथ । संमत दत्तात्रय अवधूत ।
निरंजनीं आत्मप्रचीत । गुरुकृपें जहाली ॥ ११२ ॥

॥ श्रीगुरुदत्तात्रयार्पणमस्तु ॥

---

## अध्याय चवथा.

ॐ नमोजी श्री दिगंबरा ! । विवेकबुद्धीचिया दातारा !
करुणालया ! दयासागरा ! । पूर्ण अवतारा ! धन्य तूं ॥ १ ॥
पूर्वाध्यायीं कथानुसंधान । करुनि प्रपंचविटंबन ।
जालें नासिकाप्रती येणें । गंगादर्शन घेतलें ॥ २ ॥
गुरुरायाचे भेटीलागून । आलों घाटावरी फिरून ।
जेथें उभे ठेले ब्राह्मण । तया ठाया पातलों ॥ ३ ॥

तयांमाजी अच्युतरावजी । तेजःपुंज सर्वांमाजी ।
जयालागीं उपमा दुजी । दृष्टीलागीं दिसेना ॥ ४ ॥
जो कवीश्वरांमाजी श्रेष्ठ । बृहस्पतीसम वक्ता स्पष्ट ।
वसिष्ठासम कर्मनिष्ठ । इष्ट अनिष्ट जाणता ॥ ५ ॥
जयाची प्रज्ञा विशाळ गहन । कर्मकांडीं अतिविचक्षण ।
प्रतिसृष्टि करितां निर्माण । विश्वामित्र दूसरा ॥ ६ ॥
ऐसा विप्रमंडळीमाजी । दृष्टीसी देखिला रावजी ।
तयासी विचारिलें सहजीं । सद्‌गुरु कोठें रहाती वो? ॥ ७ ॥
तयांनीं मजवरी कृपा करून । दाखविले गुरुचरण ।
मग समर्थासी अवलोकून । साष्टांगनमन पैं केलें ॥ ८ ॥
सद्‌गुरु बोलती कृपावचन । कोठून जालें तुमचें येणें ।
माध्यान्हकाळ भोजन । जालें किंवा न जालें ॥ ९ ॥
तंव म्यां द्वय कर जोडून । बोलता जालों नम्रवचन ।
ग्रामांत माधोकरी मागून । भोजनातें सारिलें ॥ १० ॥
आपुले दर्शनाची इच्छा मानसीं । बहुत होती आम्हांसी ।
ते येतांचि पायापाशीं । बहु तृप्ती जहाली ॥ ११ ॥
बालेघाट माझें स्थान । पुणियाहून जाहलें येणें ।
गिरनाराप्रती आहे जाणें । दत्तदर्शन घ्यावया ॥ १२ ॥
ऐसें बोलतां वचन । सद्‌गुरु जाहले हास्यवदन ।
ह्मणती दत्तात्रयाचें स्थान । एथेंच दृष्टी पहावें ॥ १३ ॥
मग मजलागीं देवालयीं नेऊन । दाखविलें रूप सगुण ।
दत्तात्रय अवतार पूर्ण । सावळी मूर्ति साजिरी ॥ १४ ॥
षड्‌भुजमूर्ति प्रसन्नवदन । शंखचक्रमालाकमंडलूधारण ।
मध्यपाणी त्रिशूळ डमरु जाण । नयन आकर्ण साजिरे ॥ १५ ॥
भाळ रुंद अति विशाळ । मध्यकटी बारीक चिवळ ।
कर्णनाशिक अति सोज्वळ । समपद उभी ठाकली ॥ १६ ॥
पाहून रूप अति सुंदर । वेधून गेलें मनभ्रमर ।
पदपंकजीं गंध परिकर । सेवून तृप्त जहालों ॥ १७ ॥
मग गुरुप्रती वदलों वचन । हर्षयुक्त जाहलें माझें मन ।
दत्तात्रयरूप आनंदघन । आपुलें दर्शन घेऊन ॥ १८ ॥

सद्गुरु ह्मणती अहंविशेष । एथें वसावें चार दिवस ।
दत्तजयंती अनायास । आली तेही करावी ॥ १९ ॥
तयांप्रती वदलों उत्तर । आजींचा दिन आहे स्थिर ।
रात्रीं देवासि पुसोन विचार । आपणालागीं सांगेन पैं ॥ २० ॥
ऐसें होऊन भाषण । गुरूंनीं अरण्यांत केलें गमन ।
मी पंचवटीचें बिऱ्हाड घेऊन । दिगंबरापाशीं पैं आलों ॥ २१ ॥
कार्तिकवद्य चतुर्दशी । शके सत्राशें तेहतीसीं ।
प्रजापती नाम संवत्सरासी । ते दिनीं एथें पातलों ॥ २२ ॥
रात्रौ पंचपदी करून । देवालयीं केलें शयन ।
मध्यरात्रीं ब्राह्मण होऊन । दत्तात्रय स्वप्नीं पैं आले ॥ २३ ॥
ह्मणती ऐक रे ! सावधपण । एथें रहावें पंधरा दिन ।
जें जें होईल तें तें पाहणें । स्थिर मन करोनिया ॥ २४ ॥
सवेंच जालें दुजें स्वप्न । अकस्मात् गंगोदकीं पडलों जाण ।
तंव जान्हवीजळ वरी येऊन । मजलागून तारिलें ॥ २५ ॥
त्वरितचि प्रातः समय जाला । तमारी प्रकाशातें प्रसवला ।
मग मी गेलों स्नानाला । स्वर्धुनीचे तटाकीं ॥ २६ ॥
करोनि यथोक्त संध्यास्नान । देवालयाप्रती येऊन ।
श्री दत्तात्रयाचें पूजन । यथाविधी पैं केलें ॥ २७ ॥
माध्यान्हीं पचवटीस जाऊन । होऊनी आनंदयुक्त मन ।
माधोकरीतें मागून । गंगातीरीं भक्षिली ॥ २८ ॥
सांयकाळीं संध्या करुनी । सहज गेलों गुरुदर्शनीं ।
मग द्वय करपुटें जोडुनी । नमन गुरुतें पैं केलें ॥ २९ ॥
तंव सद्गुरु कृपाळुपण । मज वामभागीं दिधलें स्थान ।
उठुनी गेले सर्वजण । निशी बहुत जाहली ॥ ३० ॥
समर्थ पुसती मजप्रती । सांप्रदाय कवण गुरुमूर्ती ।
कृपा संपादिली कवणें रीती । ते मजप्रती सांगावी ॥ ३१ ॥
कवण मुद्रा कवण ध्यान । ध्यातां निराकार कीं सगुण ।
कवण धारणा धरुनी मनीं । उदासीन पै केलें? ॥ ३२ ॥
ऐसें पुसतां मजप्रती । मग मी निष्कपट होउनी चित्तीं ।
बोलता जालों वचनोक्ति । सत्य शरीरीं होत्या ज्या ॥ ३३ ॥

ऐकें वो सद्गुरु समर्था! । माझी पश्चातापी कथा ।
अग्निज्वाला नखादि शिखा । व्यापुनिया राहिल्या ॥ ३४ ॥
ह्मणूनि भ्रमिष्टाकृती होऊन । फिरत आलों देशाटन ।
परि स्थिर नव्हे अंतःकरण । उदासीन सर्वदा ॥ ३५ ॥
गुरुकृपा नाहीं संपादिली । धारणा अद्यापि नाहीं धरिली ।
संतमुखें कीर्तनीं ऐकिली । ते सगुण मूर्ती ध्यातसे ॥ ३६ ॥
मुद्रा चाचरी ना भूचरी । खेचरी ना अगोचरी ।
कवण नामीं वनउरी । हे मज नाहीं टाउकें ॥ ३७ ॥
दत्तात्रय मूर्ती सगुण । द्वितीय अध्यायीं केलें कथन ।
तयाप्रकारें करून केलें ध्यान । हृदयामाजी पहातसे ॥ ३८ ॥
सद्गुरु ह्मणती बहुत बरवें । याचिप्रकारें ध्यान करावें ।
परी सर्वांतरीं पहात जावें । सच्चिदानंद स्वरूपातें ॥ ३९ ॥
मग मी बहु नम्र होऊन । पुसता लागलों गुरुलागून ।
सच्चिदानंद हें ध्यान । सर्वी कैं पहावें ॥ ४० ॥
ऐसें देतां प्रत्युत्तर । सद्गुरु चातुर्यरत्नाकर ।
मग होऊन बहु उदार । आनंदलहरी प्रसवले ॥ ४१ ॥
ह्मणे एक वो चातुर्यभरिता । सोडुनी पश्चात्तापव्यथा ।
मनइंद्रियांचा करोनि लोथा । वचन माझें परियेसी ॥ ४२ ॥
टाकोनिया शब्दविभाग । सांडूनि पोकळी दिशावलंब ।
त्यागोनि आधार प्रकाश । चिदाकाश तें घेई ॥ ४३ ॥
आकाश सर्व व्यापक आहे । बाह्य दृष्टीसी न दिसताहे ।
जेवि हृदयांतरीं पाहे । ज्ञानदृष्टी करुनिया ॥ ४४ ॥
मग मी तैसाच पाहूं गेलों । पाहतां तदाकाराचि जालों ।
देहस्फूर्तीतें विसरलों । कोठें आहे नेणवे ॥ ४५ ॥
कवण ध्याता कवण ध्यान । कोण श्रोता वक्ता करून ।
पाहतां हारपुनी गेलें मन । तीव्र ध्यान लागलें ॥ ४६ ॥
शरिरामाजी आकाश भरलें । वाटे मस्तक भेदुनी गेलें ।
ब्रह्मकटाहामाजी मीनलें । स्वरूप माझें सर्वही ॥ ४७ ॥
ऐसें चार घटिका करितां ध्यान । वाचेसी पडून गेलें मौन ।
तंव सद्गुरु ह्मणती सावधान । ध्यान विसर्जन करी कां ॥ ४८ ॥

तंव अंतरीं काढूं गेलों ध्यान । वाटे कोठें ठेवूं काढून ।
याजला ठेवितां ठिकाण । यावीण नाहीं दुसरा ॥ ४९ ॥
अंतरीं एकचि जाला गोळ । वाटे हृदयींच आहे भूगोळ ।
खालीं वरी मध्यें निर्मळ । मीच अवघा व्यापिलों ॥ ५० ॥
स्वरूपीं नाहीं देहभान । गुरुसीं न बोलवे वचन ।
ऐसे वृत्तीतें पाहून । सद्‌गुरु जाले बोलते ॥ ५१ ॥
हेंचि ब्रह्म निराकार । निरंजन निराधार ।
निःप्रपंच निर्व्यापार । हेंचि तुझें स्वरूप पैं ॥ ५२ ॥
निर्मळ निष्कळंक निर्गुण । अनादि स्वरूप चैतन्यघन ।
स्वप्रकाश आत्मा अनंदघन । तें हें स्वरूप तुझें पैं ॥ ५३ ॥
तुझें स्वरूप निराकार । तुझेंचि रूप अजरामर ।
तुज जन्ममृत्यूचा घोर । एथून आतां नसेचि ॥ ५४ ॥
आतां निर्भय होय अंतरीं । सांडी द्वैताची कर्तरी ।
नांदे एकपणाचे घरीं । स्वानंदेंसीं सर्वदा ॥ ५५ ॥
ऐसें ऐकुनि गुरुवचन । हर्षयुक्त जालें मन ।
मोठ्यानें हास्य करून । प्रेमटाळी पीटिली ॥ ५६ ॥
याप्रकारें भाषणें करितां । दोनप्रहर रात्रि झाली अवचिता।
गुरु ह्मणती खालीं जाई आतां । जाउनी नीजीं निजावें ॥ ५७ ॥
मग सद्‌गुरुतें वंदून । देवालयीं येऊन केलें शयन ।
परि देहीं नाहीं भान । कोठें निद्रा केली हें ॥ ५८ ॥
नेत्रासी बहु ताठा चढला । अंतरींचा अग्नी शीतळ जाला ।
स्वप्न-सुषुप्तीव्यापार निमाला । स्वात्मसुखें करुनी ॥ ५९ ॥
वाटे जागा ना निजलों । ठायीं नसे ना कोठें गेलों ।
देहीं आहे कां नाहीं जालों । दोन्ही भावना उडाल्या ॥ ६० ॥
मागील एकप्रहर रात्रीं । वाटे स्वप्न पडलें अंतरीं ।
सद्‌गुरु येऊन हृदयांतरीं । मजलागीं सांगती ॥ ६१ ॥
सखया ऐक सावधपण । माझें राहतें स्थान ।
मनोरम कोण कोण । तें मी तुज सांगतों ॥ ६२ ॥
माडी हेंचि निरंजनस्थान । मठ तो भृगुस्थान ।
गंगातीरीं आनंदवन । वृक्षवेली साजिरे ! ॥ ६३ ॥

ऐसें मजलागीं बोलून । अदृश्य जाले गुरु आपण ।
मग म्यां उठोनिया भजन । श्रीगुरुचें आरंभिलें ॥ ६४ ॥
सर्वेचि गंगेसी करुनि स्नान । आरंभिलें देवतार्चन ।
दत्त पाहिला दृष्टी भरून । तंव पाषाणमूर्ती हालली ॥ ६५ ॥
तो पाहुनी चमत्कार । अंतरीं आनंद जाला फार ।
तया सुखासी अंतपार । कोठें पाहतां न दिसेची ॥ ६६ ॥
ते दिवशींचिये रात्रीस । लक्ष्मी आली स्वप्नास ।
सांगती जाली आत्मप्रचीतीस । गुरु उपदेश आपला ॥ ६७ ॥
ह्मणे ' शुकभृगुपासून । म्यां संपादिलें आत्मज्ञान ।
आकाशवत् चिंतन करून । हृदयांतरीं पहावें ' ॥ ६८ ॥
ऐसें बोलुनियां वचन । अदृश्य जाली सुवासीन ।
मग प्रतःकाळीं उठून । गुरुपाशीं कथियेलें ॥ ६९ ॥
गुरु ह्मणती ' उत्तम जालें । रात्री दत्तात्रय स्वप्नीं आले ।
मजप्रतीही सांगून गेले । बीजमंत्रास सांगावें ' ॥ ७० ॥
ऐसें ह्मणतां गुरुमूर्ती । मज आठव जाला चित्तीं ।
अकोलियांत एकांतीं । मज उपदेश जो जाहला ॥ ७१ ॥
हृदयीं कथिला अत्रिपुत्र । मुखीं लावून माझा श्रोत्र ।
सांगितला अष्टाक्षरी मंत्र । तो गुरुप्रती कथियेला ॥ ७२ ॥
मग सद्गुरु जाले कृपावंत । सांगितलें मूळ बीजातें ।
ह्मणती ' जोडुनिया यातें । नव अक्षर ह्मणत जा ' ॥ ७३ ॥
अष्टाक्षरी तोचि बाण । नवम अक्षर अग्र लावून ।
मनोवेगाचें धनु ओढून । भवकुरंग विंधिला ॥ ७४ ॥
श्रीदत्तात्रय रघुनाथ एकचि जाला । नवाक्षराची नवरत्नमाला
गुरुनें माझे घातली गळां । आत्मसोहळा देऊन ॥ ७५ ॥
मग आनंदयुक्त होऊन । सद्गुरूसी केलें नमन ।
जयजयकार स्तुती करून । स्वस्थळाप्रती पैं गेलों ॥ ७६ ॥
पंचमीस एक येऊन ब्राह्मण । अभंगाची वही देऊन ।
पंचवीस पान विडा करून । सुपारीसह दिधला ॥ ७७ ॥
पाहिलें जागृत होऊन । अदृश्य जाला ब्राह्मण ।
तेचि काळीं कवित्वाचें स्फुरण । मजलागी जहालें ॥ ७८ ॥

सर्वेच स्वप्नीं विहिरींत पडलों । भोंवतें पाहोन भयभीत जालों ।
पारंब्रियातें वळंघलों । वरती आलों चढूनिया ॥ ७९ ॥
बाहेर येऊन जंव पाहे । तों ब्राह्मण एक बैसला आहे ।
जटायुक्त शोभताहे । भस्म सर्वांगीं लावितो ॥ ८० ॥
करीत बैसला देवतार्चन । एकाग्र चित्त करूनि ध्यान ।
.................. । भोवतें सैन्य बहुतसे ॥ ८१ ॥
विहिरी तोचि भवकूप होय । ब्राम्हण तोचि दत्तात्रय ।
मज काढुनिया लवलाहें । कृपादृष्टी तारिलें ॥ ८२ ॥
सर्वेचि दिनमणी जाहला प्रहर । चंपाषष्ठी दिवस युक्त ।
पंचवटीमाजी वेदांत· । श्रवणालागीं पैं गेलों ॥ ८३ ॥
तेथें गुरुशिष्यांचें भाषण । निघालें ब्रह्मनिरूपण ।
एकाग्र चित्तीं करितां श्रवण । उन्माददशा पैं जाली ॥ ८४ ॥
नेत्र भृकुटी एकचि जाली । मस्तकाप्रती कळ लागली ।
आकाशमय वृत्ति जहाली । भान नाहीं देहाचें ॥ ८५ ॥
वाटे आकाशींच उडावें । कीं समुद्रपलीकडे जावें ।
कीं ब्रह्मांडाचि गिळावें । तोंड पसरून आवघे ॥ ८६ ॥
जैं वीर निघे युद्धाप्रती । भाट सवाया बोलती ।
स्फुरण चढे वीराप्रती । बाहु उडती तटतटा ॥ ८७ ॥
तैसें झालें मजलागून । वाटे मीच ब्रह्म निर्गुण ।
शास्त्र वेद आणि पुराण । माझे गुण वर्णिती ॥ ८८ ॥
ऐकुनि ब्रह्मींचा सोहळा । हास्य येतसे वेळोवेळा ।
कंठ दाटून आला सगळा । नेत्रालागीं दिसेना ॥ ८९ ॥
पुराण न होतां समाप्त । तेथुनि निघालों त्वरित ।
जैसा मद्यपी दिसे भ्रांत । तैसी गती जहाली ॥ ९० ॥
बाहेर येतां जये वेळा । मार्ग कांहीं न दिसे डोळां ।
वाटे ब्रह्मांडाचा गोळा । एकचि अवघा जाहला ॥ ९१ ॥
आपुलें न दिसेचि शरीर । अवघें दिसे निर्विकार ।
सृष्टी जाहली धूम्राकार । नाहीं आकार कोठेंही ॥ ९२ ॥
क्षणक्षणिं नेत्र उघडुनि पाहे । तंव तें तैसेंचि दिसताहे ।
भूमीवरी पाय न राहे । वाटे उडूनि चालिलों ॥ ९३ ॥

ऐसा जाहला विचार । अंतरीं भय उदेलें फार ।
मग काढुनीया दीर्घस्वर । रुदनातें आरंभिलें ॥ ९४ ॥
मार्गीं चालतां नाहीं भान । न दिसे रहाता ठिकाण ।
क्षणक्षणा व्याकुळ होतसे प्राण । मुख घ्राण सूकलें ॥ ९५ ॥
ऐसा मार्गीं पडत झडत । येता जाहलों मठा आंत ।
तेथें येऊन रुदनातें । मोठियानें पैं केलें ॥ ९६ ॥
सद्‌गुरु बैसले भोजनीं । कैसें जावें मोकळेन चरणीं ।
हे आशंका न धरितां मनीं । कपाट उघडून पैं गेलों ॥ ९७ ॥
स्फुंद स्फुंद असे रडत । पोटांत तिडक उठती बहुत ।
वायू उर्ध्वपंथें चालत । शेंबूड येतसे बहुतसा ॥ ९८ ॥
एक घटिकापर्यंत । अंतरी होउनी भयाभीत ।
उठूनि भूमीसी पडत । उभा राहत क्षणक्षणीं ॥ ९९ ॥
तंव गुरू पहाती कृपादृष्टी । ह्मणती 'जाहली संतुष्टी ।
आतां उघडुनिया पाहे दृष्टी । देहावरी येई कां' ॥ १०० ॥
ऐकुनि ऐसें कृपावचन । सर्वोंचि केलें हास्यवदन ।
सर्वशरीर शीतळपण । होऊनिया राहिलें ॥ १०१ ॥
तंव नेत्रीं बहुत निद्रा आली । मग तेथेंचि क्षणैक शय्या केली ।
गाढ समाधि लागली । तुर्या ह्मणती जियेसी ॥ १०२ ॥
ऐसा गुरुप्रसाद जाला । राज्यीं अभागी स्थापिला ।
किं रोगिया जीवन्मुक्त केला । तैसें मजला जहालें ॥ १०३ ॥
पुढें कथेचें अनुसंधान । कथा रसाळ आहे गहन ।
कृपा करून श्रोते जन । अवधानातें देईजे ॥ १०४ ॥
इतिश्री आत्मप्रचीतिग्रंथ । संमत दत्तात्रय अवधूत ।
निरंजनीं आत्मप्रचीत । गुरुकृपें जहाली ॥ १०५ ॥

॥ श्रीगुरुदत्तात्रयार्पणमस्तु ॥

---

## अध्याय पांचवा.

श्री कृपामूर्ति.अवधूता । त्रैलोक्यामाजी तुझी सत्ता ।
माझिया बुद्धीचा तूं दाता । होई आतां गुरुराया ॥ १ ॥

मागिल्या अध्यायीं कथाभाग । निरंजनीं गुरुकृपा सांग ।
होऊनी झाला भवभंग । आत्मसंग पावला ॥ २ ॥
आतां ऐकावें श्रोतेजनीं । मुमुक्षुपंथाची सुराणी ।
मज दीनाची साबडी वाणी । गोड केली पाहिजे ॥ ३ ॥
वदविता दत्तात्रय मायबाप । तुह्मीही आहां त्याचें स्वरूप ।
श्रवणीं मनालागीं विक्षेप । सहसा येऊं न द्यावा ॥ ४ ॥
आतां ऐकावा कथारंग । द्वैतभावना झाली भंग ।
करूनिया आत्मसंग । सुखासनीं पहुडलों ॥ ५ ॥
मग सवेंचि देहावरी येऊन । सद्‌गुरुसवें केलें गमन ।
गंगातीरीं आनंदवन । तया स्थाना पैं गेलों ॥ ६ ॥
मार्गी चालतां आनंद भरित । कांहीं हसत कांहीं रडत ।
मोठियानें धुमा ठोकित । सैरावैरा अरण्यीं ॥ ७ ॥
ऐसा सायंकाळ पर्यंत । बहुत मी झालों उन्मत्त ।
मग सद्‌गुरु ह्मणती सावचित्त । होई आतां लेंकुरा ॥ ८ ॥
मग म्यां प्रेमानंद-लहरी । गिळूनि दिधली ढेकरी ।
सायंकाळ होतां माघारी । मठालागीं पातलों ॥ ९ ॥
ते दिनीं रात्रीं झालें स्वप्न । गंगेंत बंगला केला बाइन ।
तयावरी मी गेलों चढून । वरी जाऊनी बैसलों ॥ १० ॥
तों इतकियांत एक ब्राह्मण । दुसरे रघुनाथगुरु आपण ।
उभयता बोलते झाले वचन । त्याचें अपान बंद करा ॥ ११ ॥
मी सवेंचि जागा होऊन । गुरूतें केलें विचारण ।
ते ह्मणती दत्तात्रय येऊन । योगधारणा कथियेली ॥ १२ ॥
तों दुसरे दिवशीं प्रातःकाळीं । अपानवायु अंतराळीं ।
चढूनि लागली असे टाळी । खचरी मुद्रा अलक्ष ॥ १३ ॥
शुद्ध सप्तमी असे ते दिनीं । जयंती नवदिवस तेथोनी ।
उपवासमौनातें अवलंबुनी । देवापाशीं बैसलों ॥ १४ ॥
रात्रंदिवस नंदादीप । पूजाविधान जपजाप्य ।
वाद्यें वाजती अमूप । वाजंत्री आदि करूनी ॥ १५ ॥
प्रातःकाळीं देवाचें पूजन । पंचामृत उष्णोदकें करून ।
वस्त्रअलंकार भूषण । पुष्पमाळा बहुपरी ॥ १६ ॥

नैवेद्यासी शर्करादुग्ध । दक्षणा तांबूल त्रयोदश अंग ।
मंत्र पुष्पांजळी सांग । विधियुक्त मंत्रें करूनी ॥ १७ ॥
ऐसें होतां तीन दिन । चमत्कार झाला मजलागून ।
देवापाशीं होतों बैसून । रात्र मध्यान्ह पैं झाली ॥ १८ ॥
करित बैसलों होतों ध्यान । तों एक वेश्या जवळ येऊन ।
तिनें आपुल्या स्तनेंकरून । माझे हृदयीं ताडिलें ॥ १९ ॥
आणखी एक्याचे हारीनें । आठ वेश्या गृह बांधून ।
आपुलाल्या द्वारीं बैसून । मज बोलवूं लागल्या ॥ २० ॥
म्यां तयातें धिक्कारून । मग पुढारां केलें गमन ।
तंव दृष्टी देखिला ब्राह्मण । बहु स्त्रिया समवेत ॥ २१ ॥
स्त्रिया लेवोनि वस्त्र भूषण । सुस्वरें करिती गायन ।
वर्णिती श्रीगुरूचे गुण । धन्यधन्य ह्मणवोनी ॥ २२ ॥
तयांलागीं दृष्टी पाहून । निघता झालों एकीकडून ।
गंगातटीं निरंजनस्थान । त्यातळीं येऊन बैसलों ।
सहस्र चंद्राचे किरण । तैसें माझें स्वरूप होऊन ।
एकटाची राहिलों बैसून । तेज अळुमाळ फाकलें ॥ २४ ॥
तंव रघुनाथ गुरु आपण । खालीं उतरले माडीवरून ।
माझें तेज गेलें झाकून । पूर्ववत जहालों ॥ २५ ॥
सद्‍गुरूंनीं कृपा करूनी । एक अष्टदलातें निर्मूनी ।
दाखविलें मजलागुनी । अति लाघव तयाचें ॥ २६ ॥
तें अष्टदळ घेऊनी हातीं । पाहता झालों तयाप्रती ।
एकें द्वारें पाहतां व्यक्ति । अष्टद्वारांचि दिसतसे ॥ २७ ॥
सवेंचि तेथुनि गेलों उठून । स्त्रीरूप नोवरी झालों आपण ।
हिरवी पातळ चोळी नेसून । हरिद्रा सर्वांगीं लाविली ॥ २८ ॥
दुसरी स्त्री जवळी येऊन । मजशी बोलती झाली वचन ।
रघुनाथबावासी त्यागून । किमर्थ येथें आलासी ॥ २९ ॥
बोवा हे भृगूंचा अवतार । त्यांजपाशीं जाई सत्वर ।
जाऊनी दीप नीट कर । उजेड होईल अंतरा ॥ ३० ॥
ऐसें मजलागीं सांगून । स्त्री अदृश्य झाली आपण ।
सवेंचि ध्यान विसर्जन । करिता झालों अंतरींचें ॥ ३१ ॥

नेत्र उघडोनि जों पाहिलें । तंव कोणी नाहींसें झालें ।
दत्तमूर्तीतें अवलोकिलें । नमन केलें साष्टांगीं ॥ ३२ ॥
तंव अकस्मात् कर्णांतुनी । उठती झाली एकचि ध्वनी ।
वाटे वाद्यें वाजती गगनीं । शब्द अनेक प्रकारचे ॥ ३३ ॥
उठल्या वाजंत्र्याच्या ध्वनी । नगारे वाजती दणाणी ।
क्षणक्षणा वाजती किणकिणी । घड्याळादि सारिखे ॥ ३४ ॥
सवेंचि कर्णामाजी सरारी । उठे एकचि भरारी ।
गोमासी गेली कर्णाभीतरीं । ऐसें वाटूं लागलें ॥ ३५ ॥
ऐसी होतां वाद्यध्वनी । क्षणक्षणा बाहेर यावें उठूनी ।
पाहतां बहुत यामिनी । ध्वनी कोठें नसेची ॥ ३६ ॥
एकांतीं बैसतां जाऊन । वाद्यें वाजती पहिल्याप्रमाण ।
मग अंतरीं भ्रम उपजून । मठीं फिरूं लागलों ॥ ३७ ॥
सवेंचि उगवला दिनमणी । जाऊन कथिलें गुरुलागुनी ।
ते ह्मणती तुज उमजोनी । अर्थांतर सांगतों ॥ ३८ ॥
अष्ट वेश्या त्या सिद्धी जाण । तुझे हृदयीं जें केलें ताडण ।
तरि सर्व मनोरथ होतील पूर्ण । ब्रह्म तोचि दत्तात्रय ॥ ३९ ॥
भोंवता स्त्रियाचा समुदाय । तें ऋद्धिसिद्धींचें वैभव ।
त्यांसी त्यागिलें त्वां स्वभावें । हें उत्तम त्वां बहु केलें ॥ ४० ॥
तेजस्वी झालें तुझें रूप । तें पाहिलेंसि आत्मस्वरूप ।
स्वप्रकाश ब्रह्मरूप । होऊनिया ठेलासी ॥ ४१ ॥
अष्टदळ तें ब्रह्म निर्गुण । वेदशास्त्रें द्वारें करून ।
त्याजला पहावें जिकडून । तिकडून दिसे सर्वही ॥ ४२ ॥
वाद्यें वाजली कर्णांतरीं । ते दशनाद झाले अंतरीं ।
वेगळाले बहुतापरी । किंकाणि आदि करूनिया ॥ ४३ ॥
नवरी झालासी हळदी लागून । तें गुरूसी लाविलें लग्न ।
दुसरी स्त्री जवळी येऊन । वदली खुण भृगूची ॥ ४४ ॥
स्त्रीरूप घेऊनि दत्तात्रय । तुजला सांगितली सोय ।
सत्वरीं भृगूपाशीं जाय । उजेड करी ह्मणाला ॥ ४५ ॥
असो माझा अवतार कोण । याविण तुज काय कारण ।
शुद्ध करूनि अंतःकरण । ज्ञानदीप लावी कां ॥ ४६ ॥

आतां तूं आनंदघन झालासी । राज्यपदवी पावलासी ।
सच्चिदानंद विलासी । होउनि सुखें भोगी कां ॥ ४७ ॥
तुझे सुखासी नाहीं पार । पावलासी जीवन्मुक्तीचें घर ।
नको पुसूं वारंवार । सुखी राहे अंतरीं ॥ ४८ ॥
मग मी स्तब्धाचि राहिलों । स्वस्वरूपातें पहाता झालों ।
देह-स्फूर्तीसी विसरलों । दोन घटिकापर्यंत ॥ ४९ ॥
मग देहावरी येऊन । गुरुसी केलें साष्टांगनमन ।
सद्गुरु कृपावंत होऊन । आज्ञा करिते जहाले ॥ ५० ॥
तुज सांगितलें ब्रह्मज्ञान । त्वांही सेविलें भाव करून ।
पूर्वपुण्याचे बळेंकरून । प्राप्त तूतें जहालें ॥ ५१ ॥
योगधारण याच्यापुढें । सर्वस्वी दिसताहे बापुडें ।
जैसें पितळ सोन्यापुढें । तैसी वायूधारणा ॥ ५२ ॥
जरी ह्मणसी नाहीं पाहिलें । तरी मी सांगतों ऐक वहिलें ।
जें वेदोक्त वर्म बोलिलें । तें तुज हातीं करवितों ॥ ५३ ॥
मग दशमीचे दिवशीं जाण । दोनप्रहर रात्री पाहून ।
निरंजन स्थानीं बैसून । सांगते झाले मजप्रती ॥ ५४ ॥
प्रथमारंभीं योगासन । पंचदश केलें गोरक्षानें ।
तें मजहातीं करवून । पाहिलें गुरूनें सर्वही ॥ ५५ ॥
यमानियमादि अष्टांग । तेंहि निवेदन केलें सांग ।
षट्कर्म योगाचीं आंगें । तींहि मज दाखविलीं ॥ ५६ ॥
अष्टकुंभक दशमुद्रा जाण । चारी अवस्था सुलक्षण ।
तें मज केलें निवेदन । आत्मचिंतन शेवटीं ॥ ५७ ॥
सर्व एके रात्रीं सांगून । चित्त केलें परिपूर्ण ।
ह्मणती सर्व आहेत साधन । आत्मप्राप्तीलागीं पैं ॥ ५८ ॥
आतां कोठें न घाली मन । सर्वदा करी आत्मचिंतन ।
तेणेंचि होशील परिपूर्ण । अखंडत्व सर्वदा ॥ ५९ ॥
मग म्यां तथास्तु ह्मणून । वंदिता झालो गुरुचरण ।
मग सर्वेचि खालीं उतरून । देवापाशीं पैं गेलों ॥ ६० ॥
दुसरे दिवशीं रात्रीशी । मार्गशीर्षशुद्ध एकादशी ।
मंडळी आली जागरणासी । तंव गुरुपाशीं मी गेलों ॥ ६१ ॥

जाउनी साष्टांग केलें नमन । सद्गुरु वदोनि आशीर्वचन ।
वर्षते झाले कृपाघन । जो अप्राप्त देवेंद्रा ॥ ६२ ॥
मजवरी कृपादृष्टी करून । करविलें दुग्धानें प्राशन ।
नांव ठेविलें निरंजन । तेचि काळीं पै माझें ॥ ६३ ॥
ह्मणती ऐक आज्ञोत्तर । स्वमुखें प्राकृत कविता कर ।
ठेवी मस्तकीं अभयकर । येच क्षणीं वदे कां ॥ ६४ ॥
दत्तात्रय तांबूल देऊन । आज्ञा केली तुजलागून ।
तैशीच म्यांही तुजकारण । कवित्वबुद्धि दीधली ॥ ६५ ॥
ऐसें ऐकुनि गुरुचें वचन । प्रफुल्लित झालें माझें मन ।
तेव्हां दौत लेखणी घेऊन । अभंग लिहिता जहालों ॥ ६६ ॥
पंच अभंगांतें लिहून । दाखविलें गुरु लागून ।
तयांनीं होऊनि हास्यवदन । प्रेमटाळी पीटिली ॥ ६७ ॥
ह्मणती रे! तूं धन्यधन्य । होशील सर्वांमाजी मान्य ।
तुझी कविता वाचितां अन्य । तेहि धन्य होतील पैं ॥ ६८ ॥
ऐसें ऐकुनि गुरुचें उत्तर । लोळता झालों चरणावर ।
जोडोनिया दोन्ही कर । विनत झालों तयांसी ॥ ६९ ॥
सद्गुरुराया! समर्था! । तुह्मी पुरविलें माझ्या आर्ता ।
मानवी असता झालों कर्ता । ब्रह्मसृष्टी दूसरी ॥ ७० ॥
ऐसें वाटे माझिया मना । काय मी देऊं गुरुदक्षणा ।
द्रव्यसंपत्ति उपभोग नाना । मिथ्या मजप्रती दीसती ॥ ७१ ॥
पाहतां राहिलें एक शरीर । तेंहि नाशिवंत असार ।
मी अकिंचन झालों फार । काय देऊं दक्षणा ॥ ७२ ॥
आतां विनती आदि अंतीं । आज्ञा करावी मजप्रती ।
गुरुदक्षणा पायांप्रती । प्रविष्ट होय सर्वस्वी ॥ ७३ ॥
सद्गुरु ह्मणती ऐक गोष्टी । त्वां मज दिली सर्व सृष्टी ।
स्वरूपीं ठेवी अखंड दृष्टी । कवित्व मुखीं वदत जा ॥ ७४ ॥
हें चालवी माझें व्रत । दक्षणा पावली सर्व मातें ।
तुजप्रती पाहुनि माझें चित्त । आनंदयुक्त सर्वदा ॥ ७५ ॥
ऐसें ऐकुनि गुरुउत्तर । हात जोडोनि वारंवार ।
वदता झालों स्तुती उत्तर । प्रेमयुक्त होउनी ॥ ७६ ॥

जयजयाजी गुरुराया! । जयजयाजी करुणालया! ।
जयजयाजी योगिराया! । करी दया मजवरी ॥ ७७ ॥
जयजया स्वामी समर्था । जयजया गूढज्ञान अर्था! ।
जयजय भवभंग परमार्था । हारली व्यथा बहु माझी ॥ ७८ ॥
मज रंकातें राज्यपदवी । देऊनी संपत्ति आघवी ।
चिद्विलासाचिये गांवीं । नांदविलें सुखरूप ॥ ७९ ॥
ऐसें करुनिया स्तुतीतें । आज्ञा मागुनी सद्गुरूतें ।
जावोनि मठिका आंत । जागरणासी बैसलों ॥ ८० ॥
द्वादशी त्रयोदशी होऊन । दत्तजन्म चतुर्दशी लागून ।
करूनिया प्रातःस्नान । सर्व आली मंडळी ॥ ८१ ॥
देवासि घालेनिया स्नान । षोडशोपचारीं पूजा करून ।
जन्मकाळीं गुरुकीर्तन । करूनि बुका उधळीला ॥ ८२ ॥
जयंतीचे पारणालागून । कांहींच नव्हता ठिकाण ।
दत्तात्रेयें चमत्कार करून । सामुग्रीतें निर्मिलें ॥ ८३ ॥
क्षेत्रांतील गृहस्थ मिळाले । रात्रौ सद्गुरुपाशीं आले ।
कोण कोण त्यांचीं नामें वहिलें । सांगतों तें परियेसा ॥ ८४ ॥
भगवंतपंत बारामतकर । रामहारी विप्र मल्हार ।
महिपतभट बापु भोगुरकर । सज्जन ह्मणती जयांतें ॥ ८५ ॥
भगवद्भक्त तिघे जण । राघव कृष्णशर्मा ब्राह्मण ।
तिसरा राजारामबावा जाण । भटपति ह्मणती जयांतें ॥ ८६ ॥
ह्मणती आह्मी सर्वत्र मिळून । करूं दत्तजयंती लागून ।
पौर्णिमेसी करूं पारणें । संतर्पण चांगलें ॥ ८७ ॥
अपरान्हीं साहित्य करून । प्रातःकाळीं स्वयंपाक सारून ।
केलें ब्राह्मणसंतर्पण । शतसंख्या परियंत ॥ ८८ ॥
ब्रह्मण बैसले भोजनासी । चमत्कार झाला ते घटिकेसी ।
गुरूनीं सोडुनि मंडळीसी । दूर जाऊनी बैसले ॥ ८९ ॥
ते पंक्तीलागून । कोण कोण होते ब्राह्मण :
त्यांचें परिसा नामाभिधान । यथा निगुती सांगतों ॥ ९० ॥
स्वयंप्रकाश यतीश्वर । जो योगीमाजी तपेश्वर ।
सर्व त्यागी निरंतर । आत्म स्वरूपीं निमग्न ॥ ९१ ॥

शीतोष्ण-पर्जन्यधारी । व्यथा सोशी शरीरीं ।
दुःख न पवतां अंतरीं । नग्न फिरे सर्वदा ॥ ९२ ॥
द्वितीय आनंदभट दातार । जे वेदांतवक्ते अतिचतुर ।
शास्त्र-विद्येचे रत्नाकर । भांडारगृह विद्येचें ॥ ९३ ॥
केशवभट कर्मनिष्ठ । जो योगियांमाजी वरिष्ठ ।
अग्निसेवा एकनिष्ठ । अहोरात्र करितसे ॥ ९४ ॥
परम चतुर अच्युतरावजी । विज्ञान कळा जयामाजी ।
वाचे बोलतां सहजीं । जगासी बोध होतसे ॥ ९५ ॥
पांचवे वासुदेवअण्णा भिडे । ब्रह्मनिष्ठ शांत उदार फुडे ।
सर्व कुशळ चातुर्य गोडे । परोपकारीं सर्वदा ॥ ९६ ॥
ऐसी मंडळी पंक्तीस घेऊन । सद्‌गुरु बैसले आपण ।
राघवाचे मठीं जाऊन । भोजनासी बैसले ॥ ९७ ॥
मग सर्वत्र मंडळीनें । इकडे देवाचा नैवेद्य करून ।
भोजनासी पात्रें टाकून । भृगुस्थानीं बैसले ॥ ९८ ॥
तंव ते आप आपणासी वदती । भटजी येथें न दिसती ।
आह्मांसी आगांतुक भाऊन चित्तीं । तिकडे जाऊनि बैसले ॥ ९९ ॥
ऐसें वदोनि ब्राह्मण । चालिले घराप्रती उठून ।
हें ऐकिलें वर्तमान । सद्‌गुरुरायें ते काळीं ॥ १०० ॥
तेथें अघटित केली करणी । न समजतां कोणा लागुनी ।
बैसले असतां एके स्थानीं । दोन्ही ठिकाणीं दीसतां ॥ १०१ ॥
एक ह्मणती आहेत भटजी । एक ह्मणती मिथ्या वदतां जी ।
एक ह्मणती भास झाला जी । भटजी तिकडेच बैसले ॥ १०२ ॥
एक ह्मणती आमचे शेजारीं । बैसले आहेत घटका चारी ।
पहात असतां नेत्रांतरीं । धूर कांहो आलासे ? ॥ १०३ ॥
ऐसें एकमेकासी वदून । बैसले भोजनालागून ।
सद्‌गुरु नाटकी पूर्ण । उभय ठायीं जहाले ॥ १०४ ॥
सर्वांनीं करूनि भोजन । तांबूल दक्षिणा घेऊन ।
करुनि देवासी नमन । आपुले घरीं पैं गेले ॥ १०५ ॥
ऐसी दत्तजयंती करूनी । आनंद केला सर्वत्रांनीं ।
क्षेत्रांत कीर्ति गेली होउनी । निरंजनें जयंती केली हो ॥ १०६ ॥

म्यां नाहीं काडी हालविली । नाहीं देवाची सेवा केली ।
कांहीं न करितां कीर्ति झाली । सर्व जगामाझारी ॥ १०७ ॥
उभय सद्‌गुरुचें देणें । दोहोंसी होऊनी एकपण ।
मज माकडासी लेणें । लेवविलें संभ्रमें ॥ १०८ ॥
धन्यधन्य सद्‌गुरु समर्थ । मजहातीं करविला ग्रंथ ।
आत्मप्रचीति यथार्थ । ते मज हातीं वदवीली ॥ १०९ ॥
जैशी काष्ठपुतळी करूनी । हस्तकीं तबक देउनी ।
पाठविली सभेलागुनी । तैसें मजहातीं करविलें ॥ ११० ॥
श्रीकृष्णें राजसूययज्ञीं । अर्जुनासी पुढें करूनी ।
करविली अचाट करणी । तैसें मजहातीं वदविलें ॥ १११ ॥
साळुंकी पक्षी असतां मूढ । बोले मानवी भाषा गोड ।
परि शिकविता राहे एकीकडे । तैसें मजहातीं करविलें ॥ ११२ ॥
त्रिमळियाचा नंदी सजवला । मान हालवी बोलिल्या बोला ।
परि त्रिमलि शिकविता भला । तैसें केलें मजहातीं ॥ ११३ ॥
मा तों होतों मंद । लिहिलें नव्हतें बाळबोध ।
परि दत्तरघुनाथ आनंदकंद । प्रज्ञा दिधली विषेश ॥११४ ॥
आतां विनवणी मंगळमूर्ति । जयांनीं विशाळ दिधली स्फूर्ती ।
साह्य झाली सरस्वती । आदिमाता भवानी ॥ ११५ ॥
तेचि मूळपीठ-निवासिनी । निरंजनाची कुळस्वामिनी ।
मज अकिंचनासी राजधानी । कवित्वस्फूर्ति दीधली ॥ ११६ ॥
नमन तया साधुवृंदा । कृपाघन वर्षती सदा ।
कवि ह्मणविलें मतिमंदा । सुखसंपदा देऊनी ॥ ११७ ॥
आतां नमो मातापितर । ज्यांनीं दाखविला संसार ।
मज आत्मप्राप्तीचें घर । ठाऊक ज्यांचेनि जहालें ॥ ११८ ॥
वृत्तिवंत कळंबकर । बालाघाट वंजरातीर ।
माता लक्ष्मी पिता श्रीधर । श्रोत्री उपनांव आमुचें ॥ ११९ ॥
आता विनंती श्रोतियांलागुनी । जे आर्तभूत ब्रह्मज्ञानी ।
मुमुक्षुपंथाची सुराणी । पाहूं इच्छिती सर्वदा ॥ १२० ॥
त्यागुनि द्यावा भवसंसार । पहावें गुरुमायेचें घर ।
तुह्मांसी विनंति करूनि साचार । तरिच भवपार व्हाल कीं ॥ १२१ ॥

पाहिली पहावी शास्त्रप्रचीति । दुसरी घ्यावी गुरुप्रचीति ।
तिसरी ते आत्मप्रचीति । उपरी ग्रंथीं लिहलीसे ॥ १२२ ॥
जरि ऐसा पश्चात्ताप घडेल । तरिच डोळा उघडेल ।
नाहीं तरी सप्रेम बोल । येणार नाहीं अंतरीं ॥ १२३ ॥
ह्मणाल लटकें हें वचन । तरि पुसा गुरुसि जाऊन ।
तेव्हां मिळेल माझी खूण । ज्याप्रमाणें वदलों तें ॥ १२४ ॥
निरंजनाचे बोबडे बोल । हें अरण्यांतील वांकडें फूल ।
गुरु आत्मलिंगा बहुसाल । पूजा करितसे अंतरीं ॥ १२५ ॥
तें लिंग ह्मणाल जरी सान । तरि ठेवावया नाहीं ठिकाण ।
ब्रह्मांडाएवढें कल्पून । उगेंच अनुमान सांगतों ॥ १२६ ॥
तया देवाकडे पाहून । ग्रंथ लिहिला संपूर्ण ।
समाप्तीचा कवण ठिकाण । तोहि आतां परिसावा ॥ १२७ ॥
गंगातीर जनस्थान । दत्तात्रया जवळी बैसून ।
ग्रंथ संपविला जाण । तो दिन तुह्मां सांगतों ॥ १२८ ॥
संवत अठराशें अड्डसष्टार्शी । प्रजापति नाम संवत्सरासी ।
शुद्ध दशमी पौषमासीं । दो प्रहरांसी संपला ॥ १२९ ॥
सद्‌गुरूनें कृपा करून । ग्रंथावरि हात ठेवून ।
स्वात्मप्रचीति नामाभिधान । या ग्रंथासी ठेविलें ॥ १३० ॥
इतिश्री स्वात्मप्रचीति ग्रंथ । संमत दत्तात्रय अवधूत ।
निरंजनीं आत्मप्रचीत । गुरुकृपें जहाली ॥ १३१ ॥

॥ श्रीगुरुदत्तात्रयार्पणमस्तु ॥

## निरंजन कृत.

# साक्षात्कार.

## अध्याय पहिला.

श्रीमन्महागणाधिपतयेनमः । श्री सरस्वत्यैनमः ।
श्रीमद्रेवताचळनिवासि दत्तात्रयायनमः ॥

ॐनमोजी गजवदना । आदिमायेचिया नंदना ।
ग्रंथ वदावयासी स्फूर्णा । द्यावी मज मूढाप्रती ॥ १ ॥
तूं सर्वांसी आधार । तुजलागी स्तविती सुरासुर ।
गमनागमनीं वारंवार । सर्व तूतें आठविती ॥ २ ॥
आतां नमू जी सरस्वती । जे मूळमाया भगवती ।
आत्मप्रकाश चिच्छक्ति । देई मती बाळका ॥ ३ ॥
ॐनमोजी श्रीगुरुदत्ता । परात्पर स्वामी अवधूता ।
परब्रह्मा कृपावंता । येई आतां धावूनी ॥ ४ ॥
मायबाप तूं दिगंबर । तुझेनि ग्रंथासी आधार ।
तूंच एथें लिहिणार । दुजा विचार नसेचि ॥ ५ ॥
तुझिया कृपेचें लेखन । करावया उदित झालें मन ।
आतां देवोनि कृपादान । बुद्धि पूर्ण करावी ॥ ६ ॥
आतां नमू जी सद्गुरु । रघुनाथस्वामी परात्परू ।
ब्रह्मविद्येचे कल्पतरू । अकाल्पित वरू देते जे ॥ ७ ॥
जो आत्मप्राप्तीचा नादनिधी । जो भवभ्रमातें उच्छेदी
स्वप्रकाशकर्ता तेजाब्धि । द्वितीय भानु उगवला ॥ ८
जे जे उपमा देऊं जाण । ते ते स्वामिपदीं दिसे गौण
सर्वोत्कर्ष गुरुचें देणें । उपमा आन असेचिना ॥ ९ ॥
उपमेसि परिस देऊं जाण । तरी तो लोहाचें करी सुव
न देववे परिसपण । हे उणीव त्या आंगीं ॥ १० ॥

तैसा नोहे हा सद्गुरू । ज्याचे मस्तकीं ठेवीत करू ।
त्यासी करी बिंबाकारू । उणीव कांहीं न ठेवी ॥ ११ ॥
गुरुकृपा ज्यावरी झाली । त्यापासुनी बहुत प्राप्ति जाली ।
परंपरा वंशवेली । असे चालिली पुढारी ॥ १२ ॥
असो उपमेसी देऊं नारायण । तेहि उपमा दिसे गौण ।
भक्तकाजासी स्वयें आपण । धाऊनि जात निजांगें ॥ १३ ॥
गुरु समर्थ त्याचियाहून । ज्यालागीं पाहे कृपाकरून ।
ज्याचें काज तया करून । करवोनि मन निववीतसे ॥ १४ ॥
झाली उपमेसी सीमा । सर्वोत्कर्षे गुरुचा महिमा ।
कोण करी त्याची नेमा । पुरुषोत्तमा वंद्य जो ॥ १५ ॥
गुरु परब्रह्म अवतार । गुरु निर्गुण निराकार ।
गुरु निष्कळंक निराधार । गुरु सार सर्वत्रीं ॥ १६ ॥
तयासी माझें साष्टांगनमन । ग्रंथांतरीं करोनि स्तवन ।
जैं दीपकें भानुप्रती जाण । न लाजून ओवाळिजे ॥ १७ ॥
आतां नमोजी कुळदैवता । जे हैसासुरमथनी कृतांता ।
दुजी परशरामाची माता । माहुर-गडवासिनी ॥ १८ ॥
आतां नमोजी मातापितर । जें मुख्यदैवतांचें सार ।
माता लक्ष्मी पिता श्रीधर । लेखन करगार ग्रामाचे ॥ १९ ॥
दक्षिणदेश उच्च स्थान । बालाघाट नामाभिधान ।
वंजरातीर पाहून । दृढ वतन साधिलें ॥ २० ॥
कळंब ग्रामासि अभिधान । परळीवैजनाथ तेथून ।
पूर्वेप्रती चार योजन । संतीं खूण ओळखिजे ॥ २१ ॥
पूर्वनाम माझें अवधूत । असोनि संसारीं निरत ।
दैवयोगें अकस्मात् । विराग देहांत उदेला ॥ २२ ॥
सोडोनिया रोजगार वतन । त्यागोनि आप्त दारा धन ।
उत्तर दिशा अवलोकून । गंगातीरा पातलों ॥ २३ ॥
पाहुनी क्षेत्र जनस्थान । सोडोनिया मानापमान ।
गुरु रघुनाथ स्वामीचरण । दृढ येवोनी धरियेले ॥ २४ ॥
ते दयाळ कृपाघन । समदृष्टे सर्वदा पूर्ण ।
त्यांनीं होऊनी उत्तीर्ण । मजलागीं ज्ञान बोधविलें ॥ २५ ॥

मस्तकीं ठेविला प्रसादकर । कवित्वरचनीं दिधला वर ।
करावयासी परोपकार । प्राकृतपर वदविलें ॥ २६ ॥
दीडमास पर्यंत जाण । राहिलों गुरुआश्रयें करून ।
परि घ्यावया श्रीदत्तदर्शन । उद्विग्न मन होतसे ॥ २७ ॥
वाचेला दत्तात्रयस्मरण । शरिरीं रोमांच उठून ।
क्षणक्षणा करावें रुदन । बाष्प दाटून येतसे ॥ २८ ॥
वाटे जावें रेवताचळा । दिगंबर मूर्ति पहावी डोळां ।
साक्षात्दर्शन सोहळा । दृष्टीलागीं पहावा ॥ २९ ॥
ऐसें पाहुनिया चिन्ह । सद्गुरु पुसती वर्तमान ।
स्वस्थ आहे कीं तुझें मन । सांडूनी मौन सांग पां ॥ ३० ॥
ऐसा पुसतां वृत्तांत । निवेदन केलें म्यां ह्रद्गत ।
सगुण दर्शनासी चित्त । असे उदित स्वामियां ॥ ३१ ॥
जाणूनिया भविष्योत्तर । स्वामी देती प्रत्युत्तर ।
तुज भेटेल दिगंबर । भाव दृढतर पाहूनी ॥ ३२ ॥
एथोनि साता महिनिया जाण । वरती संख्या एकादश दिन ।
रेवताचळासी जाऊन । तुज दर्शन होईल ॥ ३३ ॥
जेथं दत्ताद्रयाचें स्थान । तेथें त्रयदिन बैसे जाऊन ।
करूनिया अनुष्ठान । अंतरीं ध्यान करावें ॥ ३४ ॥
चतुर्थ दिन उगवलियावरी । निश्चयता पाहुनिया बरी ।
षड्भुज मूर्ति साजिरी । साक्षात्कारीं भेटेल ॥ ३५ ॥
न मोडी निश्चयाचें आसन । उच्छिष्ट करूं नको मन ।
सिद्धीहि आलिया चालून । त्यागीं मन असूं दे ॥ ३६ ॥
सिद्धीसी इच्छित असेल मन । तरि सांगे मौनातें सांडून ।
तयासारिखें संधान । करितां येईल सत्वरीं ॥ ३७ ॥
अरे पाहे पां सिद्धींचा पाळा । झाला मजभोवता गोळा ।
लात ह्मणोनी त्यांचे कपाळा । पैलीकडे लोटितों मी ॥ ३८ ॥
ऐसी वचनोक्ति बोलून । क्षणैक रहाते झाले मौन ।
ह्मणती पाहे रे निरंजन । वामभागीं माझिया ॥ ३९ ॥
निशी झालीसे दोनप्रहर । माध्यान्ह पातला शीतकर ।
दीप उजळोनिया सत्वर । पाहता जालों निजदृष्टीं ॥ ४० ॥

तंव स्वामींचिया वामभागीं । सिद्धी चालिल्या लागवेगीं ।
शुचिष्मंतपणें सर्वांगीं । छायारूपें देखिल्या ॥ ४१ ॥
जैं स्त्रिया जाती मार्गेंकरून । छाया चालती भिंतीवरून ।
त्यापरि सिद्धी सचिन्ह । दृष्टीलागीं देखिल्या ॥ ४२ ॥
ऐसा पाहुनी चमत्कार । विस्मयें भरलेंसे अंतर ।
दुसरेन पाहे त्याचिप्रकार । तंव त्या दृष्टी न दीसती ॥ ४३ ॥
करुनि स्वामींसी नमस्कार । स्तुति करीत वारंवार ।
योगियांत श्रेष्ठ शंकर । त्याचेनि धैर्य नव्हे हें ॥ ४४ ॥
सिद्धी आलिया असतां चालून । त्यागीं उपजेल कवणाचें मन ।
पाहतां त्रैलोक्यहि शोधून । ऐसा पुरुष न देखों ॥ ४५ ॥
जे राजया एकटएकला । बहुत दिसा पुत्र झाला ।
तो जरि मुळावरी आला । तरि त्याग न करवे ॥ ४६ ॥
तैसें करितां आत्मचिंतन । जरि सिद्धी झाली प्रसन्न ।
तिचे त्यागाविषयीं मन । उदित नोहे कदापि ॥ ४७ ॥
सद्गुरु! तुमचा महिमा पूर्ण । वर्णूं न शके चतुरानन ।
तेथें मी मंदमती करून । वर्णूं शके कोठोनी ॥ ४८ ॥
ऐसें करूनि स्तवना । सर्वेचि केली विज्ञापना ।
स्वामी नावडे माझिया मना । सिद्धीलागी मागणें ॥ ४९ ॥
परि एक आहे जी विनवणी । देहू ग्रामीं येतां क्षणीं ।
इंद्रायणीचें सोडिलें पाणी । गुंतली वाणी तें ऐका ॥ ५० ॥
हा देह दत्तासी अर्पण । एक संवत्सर सप्तदिन ।
इतुकियांत झालिया दर्शन । ठेवीन प्राण आपुला ॥ ५१ ॥
नाहींतरी देह ठेवणें । वांचून प्रेताचिया समान ।
जैसें छेदलिया घ्राण । मुख दावणें जगातें ॥ ५२ ॥
आणि झालिया दत्ताचें दर्शन । वर इतुकाचि मागेन ।
देईं आद्य इत तत्वज्ञान । आणि वर्णन तव गुणां ॥ ५३ ॥
इतुकिया वरि जरि मागेन । तरि मज होवो अधःपतन ।
गुरुनिंदेचें पातक पूर्ण । मजलागून घडो कां ॥ ५४ ॥
ऐसें वदोनिया निष्टंक । त्रिवार सोडिलें मी उदक ।
मग येऊनिया नाशीक । दृष्टीलागीं पाहिलें ॥ ५५ ॥

दैवें जोडिले स्वामीचरण । संतुष्ट झालें माझें मन ।
दत्तात्रयासी वर मागेन । हें चिंतन नेटविलें ॥ ५६ ॥
आतां इतुकें असे माझे मनीं । श्रीदत्त पहावा निजनयनीं ।
चरणीं लागुनिया धणी । पुरवावी मनाची ॥ ५७ ॥
स्वामी पूर्ण कृपाकर । जाणोनी पुढील विचार ।
आज्ञा दिधली सत्वर । जावयासी गिरनारा ॥ ५८ ॥
ह्मणती ऐक रे निरंजना । पुरवोनि येई कां वासना ।
वावळूं देऊं नको मना । आणिका देशा जावया ॥ ५९ ॥
तथास्तु ऐसें वदून । स्वामींप्रती केलें नमन ।
मठिकेभीतरीं जाऊन । केलें शयन एकांतीं ॥ ६० ॥
तंव ब्राह्मणाचें रूप धरून । स्वप्नीं श्रीदत्त आले आपण ।
ह्मणती ऊठ रे निरंजन । आहे जाण तुजप्रती ॥ ६१ ॥
मजलागीं त्र्यंबका लागून । आतांचि आहे कीं रे जाण ।
तरि तूं करुनिया स्नान । सत्वर गती चाल कां ॥ ६२ ॥
जंव पाहे जागृत होऊन । तंव तो न दिसे ब्राह्मण ।
विस्मययुक्त झालें मन । मग उठोनी बैसलों ॥ ६३ ॥
सर्वेचि गंगेप्रती जाऊन । उरकूनिया संध्या स्नान ।
घेतलें सद्गुरु-दर्शन । साष्टांग नमन करोनी ॥ ६४ ॥
मस्तकीं वंदिली चरणधुळी । रोमांच उठिले तयेवेळीं ।
असुवें आलीं नेत्रकमळीं । बाष्प कंठीं दाटला ॥ ६५ ॥
स्फुंद स्फुंदोनि करी रुदन । गुरुमुखातें अवलोकून ॥
वाटे केव्हां होईल येणें । गुरुचरणा जवळिकें ॥ ६६ ॥
गुरु ह्मणती निरंजना । खेद कांहीं न मानी मना ।
मी करीन तव संरक्षणा । दुर्घट वना माझारीं ॥ ६७ ॥
परतोनिया वंदिले चरण । गुंफेचे खालीं उतरून ।
सर्वांप्रती वंदन करून । मार्गाप्रती लागलों ॥ ६८ ॥
मार्गीं चालतां गहिंवर । हृदयीं दाटे वारंवार ।
नेत्रीं वाहतसे नीर । खेद फार जाहला ॥ ६९ ॥
पश्चिमेसि केलें गमन । त्र्यंबकक्षेत्रा माजी जाऊन ।
घेतलें त्र्यंबकेश्वर दर्शन । त्याचे गुण आठवूनि ॥ ७० ॥

द्वितीय दिन उगवतां जाण । केलें कुशाव्रताचें स्नान ।
शिवालयामाजी जाऊन । केलें नमन शिवासी ॥ ७१ ॥
गिरिप्रदाक्षिणा करून । सायंकाळीं झालें येणें ।
कुशाव्रतासी जाऊन । केलें स्नान मागुती ॥ ७२ ॥
गंगाधरपंत भक्तनिधान । जयासी सदाशिव प्रसन्न ।
तयाचें घेउनिया दर्शन । भोजन केलें त्यावरी ॥ ७३ ॥
त्रैदिन पर्यंत । तया स्थानीं राहिलों निश्चित ।
तंव नाशकाहून अकस्मात । पत्र आलें स्वामींचें ॥ ७४ ॥
सद्गुरु कृपाळ दयाघन । न पडे तयासि विस्मरण ।
अज्ञान लेकरूं ह्मणून । दया उदेली अंतरीं ॥ ७५ ॥
होईल दत्ताचें दर्शन । ह्मणोनि दिधलें आशीर्वचन ।
परि न सांगितलें साधन । दत्तात्रय प्राप्तीचें ॥ ७६ ॥
ऐसें करोनिया मनन । पाचारिला एक ब्राह्मण ।
करोनिया पत्रलेखन । पाठविलें त्या हातीं ॥ ७७ ॥
आशीर्वाद रे निरंजना । परिपूर्ण हो तवकामना ।
व्हावया सगुण दर्शना । साधन लिहिलें तें ऐक ॥ ७८ ॥
षड्भुज मूर्तीचें ध्यान । साळंकृत प्रसन्नवदन ।
तेजस्वी देदीप्यमान । श्यामवर्ण सर्वांगीं ॥ ७९ ॥
रत्नभूषणं मंडित । वस्त्रें उत्तम शुचिष्मंत ।
मस्तकीं मुगुट शोभिवंत । विद्युल्लतेचियेपरी ॥ ८० ॥
कर्णीमाजी रत्नकुंडलें । भाळीं चंदन परिमळ ।
केशर-कस्तूरीचा मेळ । करोनिया लावावा ॥ ८१ ॥
भोंवया सरळ सुरेखा । आकर्ण नयन विशाल देखा ।
सरळ सुंदर नासिका । मुखशोभा त्या खालीं ॥ ८२ ॥
तयामाजी दंतपंक्ति । पहात जाव्या अपूर्वगती ।
चंद्रसूर्याची दीप्ति । तयास्थानीं योजावी ॥ ८३ ॥
आरक्त प्रवाळ बारिक अधर । हनुवटी चंद्रबिंबाकार ।
जैसा द्वितीयेचा शीतकर । सोज्वळपणें दिसतसे ॥ ८४ ॥
तैसी आतिशयिक स्थान । उंच कपोला संलग्न ।
तयाखालीं ग्रीवेचें स्थान । लंबायमान योजावें ॥ ८५ ॥

तयामाजी कंठमणि । विशाळ तेजे फाके गगनीं ।
शोभायमान एकरणीं । गळ्यामाजी योजावें ॥ ८६ ॥
तयाखालीं मुक्तमाळा । सुरेखपणीं अति सोज्वळा ।
पदकलग जाडित विशाळा । अति मृदुळ पहाव्या ॥ ८७ ॥
सुवर्ण पुतळियांच्या माळा । अनेक प्रकारीं बोरमाळा ।
त्याचिये खालीं जवमाळा । साकळ्या गळा शोभती ॥ ८८ ॥
तयावरुते पुष्पमाळा । आपाद पर्यंत अति कोमळा ।
टवटवीत बहु परिमळा । शुभ्रवर्ण चांगल्या ॥ ८९ ॥
यज्ञोपवीत त्या आंतून । सर्वांगीं चर्चिला चंदन ।
पट्टकुळ तेजायमान । तयावरी शोभतसे ॥ ९० ॥
कासे कसिला पीतांबर । सुवर्णवर्णी तेजाकार ।
रत्न खचित शोभती पदर । काठी आणि दुभागी ॥ ९१ ॥
त्यावरि कटिसूत्र सरणी । घागऱ्या वाजती किणिकिणी
अति सोज्वळा उभय जघनीं । रत्न कोंदणी शोभती ॥ ९२ ॥
षड् हस्त कीं बहु सम्यक । मुद्रिका कंकणें तेज अमूप ।
आयुधें शोभती पृथुक पृथुक । सर्वहस्तांमाझारी ॥ ९३ ॥
उर्ध्वहस्ताचिये ठायीं । शंखचक्र शोभती दोही ।
मध्यहस्तामाजी पाहीं । त्रिशूल डमरू विराजे ॥ ९४ ॥
अधो कमंडलू घेऊन । सव्यहस्तीं माळा जाण ।
फिरती जैसे ग्रहगण । एकसरे सारिखी ॥ ९५ ॥
पायीं वाळे रुणझुणती । अभिनव तयांची दीप्ति ।
पादांगुळ्या उत्तम गती । सुंदरपणें शोभल्या ॥ ९६ ॥
पादुका रत्नखचित सुंदर । चरणीं जडिल्या तेजाकार ।
तयावरुते श्रीकरधर । विराजमान शोभती ॥९७॥
भोंवतें शोभे उपवन । पूजा उपचार बहुविधपण ।
छत्रचामरें आदिकरून । पारपत्यकार करिताती ॥९८॥
यापरीची मूर्ती सगुण । उंची आपुलिया समान ।
निजमस्तकावरी ध्यान । ज्ञानदृष्टीनें पहावें ॥९९॥
प्रादेश अंतराय ठेवून । मस्तकीं रोमरंध्रांतून ।
भूचरी मुद्रेचें लक्षणें । दृष्टीलागीं पहावी ॥१००॥

चालतां अथवा बोलतां । उभे अथवा बैसले असतां ॥
षण्मास हें ध्यान करितां । श्रीगुरुदत्ता पाहसी ॥१०१॥
अंतरीं चिंतोनिया ध्यान । मुखीं कीजे नामस्मरण ।
विषयभोगावेगळें मन । व्रतस्थपणें ठेवावें ॥१०२ ॥
ऐसें आज्ञापत्र वाचून । आनंदयुक्त झालें मन ।
वाटे दत्तात्रय येऊन । आतांचि मजसी भेटला ॥१०३॥
मग शुचिष्मंत होऊन । अंतरिक्ष करी ऐसें ध्यान ।
निश्चयाकार करोनि मन । नामस्मरण करीतसे ॥१०४॥
असो यापरि करितां ध्यान । होईल श्रीगुरुदर्शन ।
श्रोते घेईंज ऐकून । पुढील कथा रसाळ जे ॥१०५॥
कविता हेचि मंगळरत्न । ग्रंथीं ओवोनी निरंजन ।
भाविक श्रोतियांचे कर्ण । सुशोभित करीतसे ॥ १०६॥
इतिश्री साक्षात्कार ग्रंथ । संमत सद्गुरु रघुनाथ ।
दत्तात्रय मूर्तिमंत । गुरुकृपें भेटले ॥१०७॥

॥ श्री दिगंबरार्पणमस्तु ॥

---

## अध्याय दुसरा.

श्रीमन्महागणाधिपतयेनमः । श्रीदिगंबरायनमः ।
जयजयार्जी सद्गुरु समर्था । ज्ञानार्णवा रघुनाथा ।
कैवल्यप्राप्तीची सत्ता । चढे हाता तुझेनी ॥ १ ॥
मज लेकुराची विनवणी । परिसुनिया निजश्रवणीं ।
दिधली जे कवित्ववाणी । प्रवाहिनी असावी ॥ २ ॥
येच विषयीं वारंवार । विनवितसे जोडिल्या कर ।
या ग्रंथींचें पैलतीर । पाविणार तूं स्वामी ॥ ३ ॥
प्रथम अध्यायीं कथा गहन । सद्गुरु आज्ञा ते घेऊन ।
त्र्यंबक क्षेत्रा झालें येण । शिवदर्शन घेतलें ॥ ४ ॥
स्वामीनीं पाठविलें पत्र । तें वाचुनिया स्वतंत्र ।
सगुणध्यान अतिविचित्र । मस्तकावरी पहातसे ॥ ५ ॥

श्रोतीं होईजे सावधान । करावें निजभावेंसि श्रवण ।
हेंचि मागतों तुह्मांसी दान । देऊनि दीन सांभाळा ॥ ६ ॥
स्वामींनीं पत्र पाठविलें । तें मी वाचुनिया वहिलें ।
शेवटीं निजमुखें भाक्षिलें । तांबूलपर्णाचिये परी ॥ ७ ॥
स्वामिप्रसादें कवित्वरचना । केलें तेथेंसि वर्णना ।
कळतां समस्त ब्राह्मणां । धावोनी येती श्रवणासी ॥ ८ ॥
एक पायां लागती येऊन । एक करिती स्तुतिस्तवन ।
धन्य जी सद्‌गुरू निधान । पावलेति ह्मणोनिया ॥ ९ ॥
एक म्हणती एथें रहावें । कदापि कोठें नच जावें ।
तुमचे शुश्रूषेसि बरवें । करूं आम्ही सर्वही ॥ १० ॥
एक ह्मणती तुमचे संगें । येऊं होवोनी निःसंग ।
करुनिया प्रपंचत्याग । परमार्थ चांग संपादू ॥ ११ ॥
एवं त्र्यंबकींचे जन । स्तुतिपर बोलती वचन ।
त्यांसी राहवोनिया जाण । कवित्व लेहून दीधलें ॥ १२ ॥
तेथें दत्तात्रयमूर्ती दर्शन । घेउनिया केलें स्तवन ।
प्रेमाश्रु नयनीं येऊन । श्रीगुरुगुण वर्णिले ॥ १३ ॥
सर्वेचि करूनिया नमन । पुढारा केलें असे गमन ।
कुशावर्ततातें वंदून । मार्गाप्रती चालिलों ॥ १४ ॥
बोळवीत आले द्विजगण । क्षेत्राबाहेर येऊनि जाण ।
तयांसि करूनिया नमन । सर्व परतोनि लाविले ॥ १५ ॥
घेऊनि श्रीदत्ताचें नाम । ध्यानहि धरिलें यथाक्रम ।
सगुण भेटीचा संभ्रम । आर्त पोटीं धरूनिया ॥ १६ ॥
महाराष्ट्र देशाप्रती सोडून । दृष्टीसी देखिलें कोंकण ।
अति भयानक वन । वृक्ष सघन लागले ॥ १७ ॥
अनेक जातीचे वृक्षगण । भेदोनि चुंबीत गेले गगन ।
भानु तेजा आच्छादून । छाया धरूनि राहिले ॥ १८ ॥
मार्गीं चालतां कितेक दिन । नाहीं सूर्याचें दर्शन ।
तम भरलासे दारुण । मार्ग गहन न लक्षे ॥ १९ ॥
पुसावया नाहीं ठिकाण । नाहीं मनुष्याचें दर्शन ।
मार्गीं तृण दाटलें पूर्ण । उगेंचि भ्रमण करावें ॥ २० ॥

वृक्षासि वस्त्र आटकोनिया । फाटोनि झाल्यासे चिंधिया ।
कंटक शरीरीं भेदूनिया । रुधिर वाहे भडभडा ॥ २१ ॥
वृकव्याघ्रांचिया जाळिया । आंतोनि देती आरोळिया ।
वाचविता तया ठाया । कोण गुरुपाया वांचूनि ॥ २२ ॥
करुनि दत्तात्रयस्मरण । पर्वतअग्रीं करावें गमन ।
ग्राम शोधितां अवलोकून । कोठें ठिकाण न लागे ॥ २३ ॥
प्रातर पासुनि मध्यान्हीं । बहुत शोधिली अवनी ।
परि मार्ग न पडे ठिकाणीं । बहु प्रयत्नें शोधितां ॥ २४ ॥
मनीं चिंता उदेली बहुत । क्षुधेनें पीडिलों अत्यंत ।
फळमूळालागीं शोधीत । तंव औदुंबर देखिला ॥ २५ ॥
तयाचें न करितां फळछेदन । जीं फळें खालीं झालीं पतन ।
तया फळांतें वेंचून । केलें भक्षण ते काळीं ॥ २६ ॥
सर्वेचि करितां मार्गशोधन । तंव पश्चिमेसि झाला अस्तमान ।
पडिला अंधार गेला दिन । वृथा शीण जहाला ॥ २७ ॥
एक्या वृक्षाचिये तळवटीं । करुनिया पाषाणओटी ।
भयानक नदीचिये काठीं । वृक्षातळीं नीजलों ॥ २८ ॥
अव्यग्र क्रमिली यामिनी । तंव उदयाचळा आला तरणी ।
प्रातःस्नानातें सारूनी । मार्ग शोधीत चाललों ॥ २९ ॥
शरीरीं श्रम जहाले बहुत । तेणें अंतर खेदयुक्त ।
स्मरोनिया श्रीदत्तातें । बहुत हाका मारिल्या ॥ ३० ॥
धाव धाव रे करुणाकरा । कां श्रमविसी मज लेकुरा ।
हे पूर्णब्रह्म परात्परा । दिगंबरा स्वामिया ॥ ३१ ॥
तूं आमुचे शिरीं असून । दासासि व्हावा इतुका शीण ।
हें असह्य दिसे बोलणें । तुझीया थोरीवपणासी ॥ ३२ ॥
कंठ होवोनि सद्गदित । वारंवार हाका मारित ।
तंव एक शबर अकस्मात । येवोनी उभा ठाकला॥ ३३ ॥
ह्मणे रे तूं अहासी कवण । हिंडसी मार्गातें सांडोन ।
पैल पर्वताचे शेजारून । मार्ग आहे पाहे पां ॥ ३४ ॥
ऐसें ऐकोनिया पुढती । मी चालिलों सत्वरगती ।
फिरोनिया पाहतां मागुती । तो शबर गुप्त जहाला ॥ ३५ ॥

असो ज्या रीतीं कथिलें त्यानें । तया संकेताचिया प्रमाणें ।
पर्वतापलीकडे जाऊन । मार्गाप्रती लागलों ॥ ३६ ॥
तंव मार्गीं चालतां चालतां । तिथे बैरागी अवचिता ।
द्वारके जावयाची वार्ता । परस्पर करिताती ॥ ३७ ॥
त्यांनीं पाहून मजप्रती । कोठें जाणें ऐसें पुसती ।
म्यां कथिलें तयांप्रती । गिरनार व्यक्ती पाहों जातों ॥३८॥
ते ह्मणती गिरनारावरून । आह्मांसी द्वारकेसि आहे जाण ।
तुमचे सांगाती होऊन । आम्ही येतों स्वामिया ॥ ३९ ॥
असो तयांचे संगतीन । बहुत मार्ग केला क्रमण ।
तंव समय पाहुनि माध्यान्ह । येता झाला तमारि ॥ ४० ॥
एक्या ग्रामामाजी जाण । प्रवेशते झालो चौघे जण ।
दृष्टीसी पाहुनी हनुमान । त्यापाशीं मी बैसलों ॥ ४१ ॥
तिघे ग्रामस्थांकडे गेले । त्यांजप्रती बोलते जाले ।
आमुचे गुरुस्वामी बैसले । त्यांचे भेटीस चलावें ॥ ४२ ॥
ते आहेत बहुसमर्थ । जातात करावयासी तीर्थ ।
त्यांचे भोजनाप्रीत्यर्थ । साहित्य दिलें पाहिजे ॥ ४३ ॥
बारीक चांगले तांदूळ । सुंदर कणिक आणि डाळ ।
बहुत द्यावें जी तूपगूळ । शाखा आदि करूनी ॥ ४४ ॥
ऐसें ग्रामस्थांसी छेडून । बहुत आणिलें शुष्क अन्न ।
जैसें बाळगिवलें श्वान । आमिप घरा आणिती ॥ ४५ ॥
असो त्याचा स्वभाव गुण । अति झालें हीनपण ।
प्राप्त झाला तमोगुण । संगतीनें तयांचे ॥ ४६ ॥
संगति भल्यानें न करावी । असो गृहस्थ वा गोसावी ।
संग करितां जिवेंभावीं । बहुत कष्टी जहाले ॥ ४७ ॥
जयविजय द्वारपाळ । तयांनीं ऋषींचा केला छळ ।
श्राप जहाला तात्काळ । मृत्युलोकीं जन्मणें ॥ ४८ ॥
तयांचे संगें करून । कष्टी झाला नारायण ।
अवतारादिक जन्म घेणें । स्वामीप्रती लागलें ॥ ४९ ॥
देवादिकांची ऐसी गती । तेथें मानवी बापुडे किती ।
नष्ट होवोनिया मती । भ्रष्ट होती क्षणार्धें ॥ ५० ॥

जैं व्याघ्रासि देती थोरपण । फकीर सेवक होती आपण ।
शृंखळा गळ्यासि बांधून । घरोघरीं फिरवीती ॥ ५१ ॥
कां गारुडिया सर्प थोरला । खांदा वाहुनिया वहिला ।
उदराकारणें तयाला । घरोघरीं फिरवीती ॥ ५२ ॥
कां साधूची ऐकुनिया कीर्ती । शिष्य उदंड गोळा होती ।
परिचर्या करूं लागती । पुढें धावती लगबगा ॥ ५३ ॥
कोणी ग्रामामाजी जाती । गांवचे जनासि छळिती ।
आह्मांसी पाठविलें महंतीं । साहित्यासी आणावया ॥ ५४ ॥
कोणी भाविकाकडे जाती । त्याज लागूनी सांगती ।
आमचे सद्‌गुरू जाणती । भूतभविष्य सर्वही ॥ ५५ ॥
तुह्मांसि नाहीं पुत्रसंतान । दीन दिसतां तेणेंकरून ।
स्वामीसी जाऊनिया शरण । पुत्रसंतान मागावें ॥ ५६ ॥
लोक आलिया दर्शनासी । कोणी लागती परिचर्यासी ।
कळवावया सर्व जनासी । शिष्य यांचे ह्मणवूनी ॥ ५७ ॥
प्रपंच करून विळभर । शेखीं परमार्थीहि सादर ।
घ्यावयालागीं उपचार । शिष्य शिष्य ह्मणवूनी ॥ ५८ ॥
एवं धूर्त शिष्याचें लक्षण । गुरुसि देऊनि थोरपण ।
आपुले प्रपंचाचें साधन । करोनि घ्यावें त्याहातीं ॥ ५९ ॥
गुरु असला जरि भाबड । शुश्रूषा लागू लागली गोड ।
तरि मग होवोनि माकड । नाचविती तैसें नाचावें ॥ ६० ॥
आपण असला ब्रह्मचारी । शिष्य मिळाला घरबारी ।
तरि मग त्याचे संसारीं । चित्त घालणें लागलें ॥ ६१ ॥
तयाचे कुटुंबा कारणें । स्त्रिया शूद्र आदिकरून ।
उपदेश देउनि घ्यावें धन । करावें पोषण तयांचे ॥ ६२ ॥
श्रीमंतांलागीं भेटून । जहागीर इनामातें मागून ।
करोनि प्रतिग्रह धारण । शिष्यालागीं पोसावें ॥ ६३ ॥
एवं उपाधीच हे सारी । परमार्थ नघडे क्षणभरी ।
बुडाला परतोनि संसारीं । जन्म फेरी चुकेना ॥ ६४ ॥
याचि प्रकारें मजलागून । होते झाले तीन दिन ।
बहु त्रासून गेलें मन । दिधला सोडून संग त्यांचा ॥ ६५ ॥

मार्गें एकलेंचि चालावें । दत्तात्रयाचें नाम घ्यावें ।
गुणानुवाद बहुसद्भावे । वर्णीत जावें दिननिशीं ॥६६॥
मार्ग दुर्घट भयंकर । उभारिलें पर्वत-शिखर ।
त्यामाजी व्याघ्र थोरथोर । मनुष्य आहारी हिंडती ॥६७॥
ऐसिया कठिण मार्गांतून । जात असावें निर्भयपण ।
भयभीत न होतां मन । एकटें गमन करावें ॥६८॥
सांडूनी दुर्घट कोंकण । गुर्जर देशीं केलें गमन ।
तों दृष्टी पाहिली राजधान । धर्मपूर नगरी पै ॥६९॥
एक्या ब्राह्मणाचे घरीं । जाऊनि राहिलों ओसरीवरी ।
तों दुसरे दिवशीं प्रथम प्रहरीं । चमत्कार एक जाहला ॥७०॥
स्वामी नारायण सांप्रदायी । आपणासी ह्मणोनि विदेही ।
तया राजियाचे गेहीं । उपभोग घेत राहिला ॥७१॥
मी एक ब्रह्मज्ञानी प्रचंड । ह्मणवोनि गावांत माजवी बंड ।
शास्त्रयुक्ति ही उदंड । मुखोद्गत तयासी ॥७२॥
तयांनीं मजलागीं येऊन । पुसता झाला वर्तमान ।
तुह्मी कोठील आहांत कोण । मजलागुनी सांगिजे ॥७३॥
तयासि केलें मी उत्तर । आह्मांसी नाहीं घरदार ।
आह्मी निःसंग निराकार । कैचा विकार आह्मांसी ॥ ७४ ॥
त्यानें हें ऐकोनि वचन । ह्मणे ऐसें ब्रह्मज्ञान ।
बहुत बोलती येऊन । बोलेोनिया न करती ॥ ७५ ॥
मग म्यां तयासी करोनि नमन । विनीत झालों कर जोडून ।
स्वामी सांगावें मजलागून । मुख्य ज्ञान आहे तें ॥ ७६ ॥
तंव ते बोलते झाले ज्ञान । केलें होतें जें कां पठण ।
पुसूं जातां अंतर खूण । ठावें नाहीं तयासी ॥ ७७ ॥
ज्ञान तो बोले बहुत । शब्दशास्त्रीं बहु पंडित ।
परि सद्गुरुचा जो गुह्यार्थ । पुसतां त्यांतें न सांगवे ॥ ७८ ॥
आणि जगामाजी प्रतिष्ठा फार । ब्रह्मज्ञानी बहुत चतुर ।
ऐसें स्तविती वारंवार । लोक येवोनी तयासी ॥ ७९ ॥
जरी ब्रह्मज्ञानी कोणी आला । तरि वाद घालावा तयाला ।
भवति न भवति करुनि वहिला । निर्भर्त्सूनि टाकावें ॥ ८० ॥

कोणाचें नायकावें वचन । आणि आपुलें मिरवावें ज्ञान ।
ठाउकी नाहीं मुख्य खूण । काय कैसी आहे ते ॥ ८१ ॥
जैसें लोकाचें उदंड लेण । घातलें अंगावरी आणून ।
जगीं दिसे शोभायमान । परि आंगीं सुख नसे तें ॥ ८२ ॥
कां दरिद्री चोहाटा बैसोन । राजियाचे सांगे गुण ।
परि राजपदवी प्रती जाण । कदा काळीं न बैसे ॥ ८३ ॥
कां साखर लिहितां कागदावरी । वाचोनि दाखवी लोकाचारीं ।
परि गोडी तयाचे जिव्हाग्रीं । न लागेचि सर्वथा ॥ ८४ ॥
एवं गुरूसी न जातां शरण । कोणीं केलें शास्त्रपठण ।
तें जगीं दिसे शोभायमान । परि जन्ममरण न चुकेची ॥ ८५ ॥
न करितां गुरूचें वंदन । शास्त्रपठणें होय ज्ञान ।
तरि मग घरोघरीं आपण । ब्रह्मज्ञानी बहु होती ॥ ८६ ॥
शास्त्रयुक्ति बहु शिकला । उलटा संशयापन्न झाला ।
जैं घर करोनि कोसला । शेवीं गुंतला आपणचि ॥ ८७ ॥
असो तो स्वामिनारायण । शास्त्रव्युत्पत्ती बोलून ।
आपणा जीवन्मुक्त ह्मणवून । हिणवीत सर्वांसी ॥ ८८ ॥
असा संवाद झालियावरी । तो उटोनि गेला आपुले घरीं ।
मी तया ग्रामाभीतरी । सात दिन राहिलों ॥ ८९ ॥
नित्य करावें कवित्व नूतन । मागील त्या द्यावें लिहून ।
पद अभंग भूपाळ्या करून । बहुता जनां दीधलें ॥ ९० ॥
तंव एक आला ब्राह्मण । तो ह्मणे मज नाशिकाप्रती जाण ।
पत्र करुनिया लेखन । देणें असेल तरी द्यावें ॥ ९१ ॥
मग मी अभंगें करून । पत्र लिहिता झालों जाण ।
आठवूनि सद्‌गुरूचे चरण । अंतरीं ध्यान आणिलें ॥ ९२ ॥
पत्र लेखनीं मांडीवरी । आसुवें चालिलीं नेत्रांतरीं ।
आक्रंदोनी दीर्घस्वरीं । खेदभरित जहालों ॥ ९३ ॥
हे हे स्वामी रघुनाथा । सद्‌गुरूराया कृपावंता ।
कधीं भेटशील आतां । मज अनाथा लागुनी ॥ ९४ ॥

अरे म्यां पूर्वी दोष केले । ते ये काळीं फळासि आले ।
ह्मणवोनिया अंतरले । गुरुचरण मजलागीं ॥ ९५ ॥
कां केली कवणाची तडातोडी । मायलेकुरा केली विघडी ।
ह्मणवूनिया ऐसी घडी । प्राप्त झाली मजलागीं ॥ ९६ ॥
अहो सद्गुरू माउली । मज कृपेची साउली ।
दूर देशासी राहिली । कैसें करूं या समयीं ॥ ९७ ॥
केव्हां होईल माझें येणें । पाहीन किंवा नाहीं चरण ।
ह्मणवुनिया अंतःकरण । वेळोवेळां कालवे ॥ ९८ ॥
आणखी मनासी निश्चय केला । सद्गुरू महाराज बोलिला ।
तुझे सांगातीं मी वहिला । आहे जाण सर्वदा ॥ ९९ ॥
या वचनाची आठवण । करूनि केलें स्थिर मन ।
पत्र दिधलें लिहून । तयासी वचन बोलिलों ॥ १०० ॥
पत्र देऊनि सत्वर । सद्गुरूसी माझा नमस्कार ।
आंग करूनी दंडाकार । तुह्मी तेथ घालिजे ॥ १०१ ॥
ऐसें सांगुनी तयाप्रती । मार्गस्थ केलें सत्वरगती ।
दत्तात्रयाचें ध्यान चित्तीं । करुनिया राहिलों ॥ १०२ ॥
सदासर्वदा नामस्मरण । स्वमुखें वर्णीत असावे गुण ।
ऐसें असतां कीर्तीसी कारण । झालें तेथें सर्वत्रीं ॥ १०३ ॥
सर्व मंडळीनें दर्शना यावें । पक्वान्न भोजना करवावें ।
ऐसें नित्यानित्य बरवें । व्हावयाप्रती लागलें ॥ १०४ ॥
सर्व मिळूनिया जन । विनंति करिती कर जोडून ।
स्वामी एथेंचि रहाणें । अक्षयीं तुह्मी सर्वदा ॥ १०५ ॥
या प्रकारीं सर्वहि मंडळी । ह्मणवोनि राहवी वेळोवेळीं ।
उठूनिया जातां तये काळीं । पायातळीं लोळती ॥ १०६ ॥
असो भाविक तेथींचे जन । तयांसी न पुसतां जाण ।
गुप्तरूपें उठून । जाता झालों पुढारीं ॥ १०७ ॥
गुर्जर देश पाटांगण । भूमि लागली समसमान ।
बहुत होतसे मार्गक्रमण । गुरुकृपें करूनी ॥ १०८ ॥

रघुनाथ पूर्णब्रह्म अवतारा । तूंचि परात्पर सोइरा ।
निरंजन-हृत्कोश-विहारा । करुणाकर गुरुमूर्ति ॥ १०९ ॥
इतिश्री साक्षात्कार ग्रंथ । संमत सद्गुरु रघुनाथ ।
दत्तात्रय मूर्तिमंत । गुरुकृपें भेटले ॥ १०७ ॥

॥ श्री दिगंबरार्पणमस्तु ॥

---

## अध्याय तिसरा.

श्री दिगंबरायनमः । श्रीमत्गोदातीरानिवासिया । स्वानंदकंदा रघुराया ।
भक्तचकोर निववावया । शीतकर तूं एक ॥ १ ॥
तूं निष्कळ निर्गुण । तूं सच्चिदानंद परिपूर्ण ।
तुझेनि प्रसादें सर्व जन । गमनागमनीं वर्तति ॥ २ ॥
तुझेनि आधारें कवित्वरचना । कल्पलतिका चढली गगना ।
ते भेदोनिया द्वैतभावना । सत्स्वरूपासी मिळावी ॥ ३ ॥
आतां ऐका श्रोतेजन । मागील कथेचें अनुसंधान ।
धर्मपुरीं राहुनी जाण । कविता बहुत पैं केली ॥ ४ ॥
तेथोनि निघालों झडकरी । पाहिली सुरत नाम नगरी ।
वास्तव्य तीन दिनवरी । करिता झालों ते ठायीं ॥ ५ ॥
तेथें शंकरनाम सन्यासी । राहिलों जाऊन तयापाशीं ।
दृष्टीसी पाहिला तपस्वी । म्हणोनि पुसता जाहलों ॥ ६ ॥
कवण मार्ग कवण सांप्रदाय । करित असतां साधन काय ।
माया मृगजळतरणोपाय । कवणे रीतीं योजिला ॥ ७ ॥
ऐसे त्याजसी विचारिलें । तव त्यांनीं आपुलें ज्ञान कथिलें ।
गुरूंनीं जें सांगितलें । गुह्य गुह्यार्थ ज्ञान तें ॥ ८ ॥
म्हणे ऐक रे लेकुरा । तुज ठाउका नाहीं ज्ञानवारा ।
भवसिंधूचे पैलतीरा । उतरावया योग्य जो ॥ ९ ॥
काढिलें ज्ञानाचें भांडार । जैसीं गारुड्यासी ब्रीदें फार ।
बांधुनि करी स्तुति फार । स्तुति अहंपणाची ॥ १० ॥

कां कोल्हाटिया मारुनि उडी । क्षणक्षणा असिलता झाडी ।
दावी युद्धाच्या कडोविकडी । परि योद्धा नव्हे तो ॥ ११ ॥
तयापरि शंकर सन्यासी । जो मूर्खग्रामींचा मिराशी ।
ब्रह्मज्ञान सांगावयासी । उदित झाला मजलागीं ॥ १२ ॥
ह्मणे ब्रह्म आहे उंच बहुत । मस्तक आकाशापरियंत ।
हातपाय स्थूळ बहुत । उदर मोठें विशाल पैं ॥ १३ ॥
ह्मणे हें ब्रह्म सर्वोत्कृष्ट । नाहीं याविण दुजें श्रेष्ठ ।
ऐसें मम गुरुनें स्पष्ट । कथिलें आहे मजप्रती ॥ १४ ॥
त्यासी पहावयाचें लक्षण । पूर्व दिशेसी मुख करून ।
करावी छाया विलोकन । मुखावरी ध्यान धरोनी ॥ १५ ॥
क्षणभरी छाया ते पहावें । सवेंचि आकाशीं न्याहाळावें ।
विराटपुरुष तो स्वभावें । दृष्टीलागीं पडतसे ॥ १६ ॥
ऐकोनि मज हासूं आलें । ब्रह्मज्ञान बरवें जी साधिलें ।
दैवेंकडोनिया वहिलें । प्राप्त झालें तुह्मांसी ॥ १७ ॥
आतां पुसतों हेंचि बरवें । कवण सांप्रदायी हें सांगावें ।
मग ते आपले जिवेभावें । उदारपणें सांगती ॥ १८ ॥
वाममार्गी आह्मां लागून । परंपरा नामाभिधान ।
अशौच क्रिया-संपादन । साधन आह्मी करितसों ॥ १९ ॥
बीजपंथ आदिकरून । चार मार्ग हे आहेत जाण ।
ते आचरतां जन्मालागून । येणें न घडे मागुती ॥ २० ॥
ऐकोनि तयाचें वचन । मजलागीं त्रास आला जाण ।
वाटे ययाचें भाषण । ऐकों नये सर्वथा ॥ २१ ॥
जैसे धन पाहुनिया मैंद । हिरोनी करिती शिरच्छेद ।
तैसे हे ज्ञानमार्ग-भेद । ठकवोनि नेती मुमुक्षा ॥ २२ ॥
जे जे याचे शिष्य झाले । तयांचें प्रारब्ध फुटलें ।
भवसागरामाजी बुडाले । तळीं बैसले जाउनी ॥ २३ ॥
कीं अंधमार्गानें चालिला । दुजा त्याचे संगें गेला ।
जरी कूपांत पडे पुढिला । मग मागील पडे सहजचि ॥ २४ ॥
असो कोणीएक मुमुक्षानें । गुरू करावा विचारून ।
मान्य ज़याचीं वचनें । वेदशास्त्रा मिळतातीं ॥ २५ ॥

असो त्या कुमार्गियाला सोडुनी । निघता झालों तये क्षणीं ।
बहुसाल मार्गातें क्रमोनी । बडोद्यासी पावलों ॥ २६ ॥
रामचंद्राचे देवालयांत । स्थल पाहूनि शुचिष्मंत ।
विलोकोनिया एकांत । जावोनी तेथें रहिलों ॥ २७ ॥
तये स्थलीं एक सन्यासी । ज्ञानसागर कैवल्यराशी ।
जावोनिया तयापाशीं । क्षणएक बैसलों ॥ २८ ॥
त्याचे दर्शनासी ब्राह्मण । येवोनि करितां संभाषण ।
आत्मानात्म विवरण । अहर्निशीं करीतसे ॥ २९ ॥
शांति जयाची बहुत वाड । दयाक्षमा अति प्रौढ ।
वाचेनें बोलोनिया गोड । सर्वांप्रती निववीतसे ॥ ३० ॥
आत्मबोधानें बोधला । द्वैत संशयो सर्व गेला ।
जैं आंबा येवोनि पाडाला । शेखीं निवाला निजआंगीं ॥ ३१ ॥
तैसा तो महाराज यतीश्वर । उपमा जयासी ईश्वर ।
कराया जडमूढ-उद्धार । कालिमाजी प्रगटले ॥ ३२ ॥
करोनि त्यासी नमस्कार । पाहुनी एकांत सुंदर ।
पुसता झालों विचार । अनुभवयुक्त सर्वही ॥ ३३ ॥
त्यांनीं मजकडे पाहून । ह्मणती दिससी तूं परिपूर्ण ।
ऐक सांगतों अंतर खूण । बहु बोलणें कासया ॥ ३४ ॥
तुझे माझे मध्यभागीं । त्यासि चैतन्य ह्मणती योगी ।
व्यापुनिया सर्व जगीं । अभेदपणें वर्ततसे ॥ ३५ ॥
तयासी कैसें पहावें । ऐसें ह्मणशील जरी स्वभावें ।
तरि तें सांगतों अनुभवें । श्रवणीं घेई ऐकोनी ॥ ३६ ॥
मनोवृत्तीने कल्पावें । पृथ्वीचे पलीकडे जावें ।
तेथें काय तें पहावें । ज्ञानदृष्टी करुनी ॥ ३७ ॥
ऐसें पाहतां पाहतां मन । तेथेंचि जाय हारपोन ।
उरलें तें चैतन्यघन । ब्रह्म परिपूर्ण त्या ह्मणती ॥ ३८ ॥
आपुले हृदयांत पहावें । चित्स्वरूपातें विलोकावें ।
सर्वेचि विश्वव्यापक व्हावें । आत्मस्वरूपें करोनि ॥ ३९ ॥
तेथें मनाचा वेगु नाहीं । ऐसें ह्मणसी जरी कांहीं ।
तरि मी सांगतों तेंही । श्रवण करी आदरें ॥ ४० ॥

जैं मेणाची पुतळी करून । मृत्तिका लावावी वरून ।
रस ओतितां ऊनऊन । मेण तेथें न राहे ॥ ४१ ॥
तैसें मनेंकडोनि कल्पितां । स्वरूपाचा पार न लागतां ।
आपैआप मनोलयता । होऊनीया जातसे ॥ ४२ ॥
ऐसें ऐकोनिया वचन । पोहोंचली खुणेप्रती खूण ।
ब्रह्मानंदीं समरसोन । स्तब्धपणें राहिलें ॥ ४३ ॥
चार घटिकापर्यंत । दोघेहि झालों समाधिस्थ ।
स्वामी होवोनि कृपावंत । आशीर्वाद पैं देती ॥ ४४ ॥
अक्षयीं असो तव कल्याण । प्रकट होवो तुझें ज्ञान ।
परंपरा तुजपासून । प्राप्त होवो आणिकां ॥ ४५ ॥
धन्य धन्य रे तुझा गुरू । जेणें उपदेशिला हा विचारु ।
आत्मज्ञानाचा दिनकरू । तुझे हृदयीं प्रगटविला ॥ ४६ ॥
ऐकूनिया तुझे प्रश्न । संतुष्ट झालें माझें मन ।
धन्य उगवला आजिचा दिन । आत्म निरूपण जहालें ॥ ४७ ॥
मग त्यांनीं कृपा करून । आंगावरील काशायवसन ।
धाबळी दिधली जाण । मजलागून तयांनीं ॥ ४८ ॥
त्रै दिन तेथें राहून । तेथोनि सर्वेंचि केलें गमन ।
ढवळके ग्रामीं शिवदर्शन । घेता झालों आदरें ॥ ४९ ॥
तया शिवाचा चमत्कार । पिंडी बहुत रुद्राक्षाकार ।
मोजून पाहतां वारंवार । गणित त्याचें न लागे ॥ ५० ॥
एकरात्र तेथें राहून । सर्वेंचि मग केलें प्रयाण ।
काठेवाड देश कठिण । तेथूनिया लागला ॥ ५१ ॥
उष्ण जैशा भाजती लाह्या । कोठें नसे वृक्ष-छाया ।
उदक शीतल प्राशावया । न मिळेचि सर्वथा ॥ ५२ ॥
चव चव कोसाचें रण । मार्गांत काटे बहु सघन ।
सर्वदा पायांत भेदून । रुधिर वाहे भडभडा ॥ ५३ ॥
असो अंतरीं करुनिया ध्यान । श्रीदत्ताचें नामस्मरण ।
निजवाचेसि उच्चारून । मार्गक्रमण करीतसे ॥ ५४ ॥
श्रीदिगंबराचें कीर्तन । करोनि वर्णीत जावे गुण ।
सद्गादित कंठ होऊन । प्रेमभरित अंतरीं ॥ ५५ ॥

आसुवें येतोनि नेत्रासी । खेद होवोनि मानसीं ।
वाटे केव्हां पायापाशीं । जाईन मी श्रीगुरूच्या ॥ ५६ ॥
चार घटिका पर्यंत । बसावें मार्गामाजी रडत ।
अंतरीं वाटतसे खंत । दिगंबर-भेटीची ॥ ५७ ॥
सर्वेंचि धरोनिया धीर । वृत्ति करुनिया स्थिर ।
मार्ग क्रमोनी सत्वर । जात असावें पुढारीं ॥ ५८ ॥
मार्गामाजी भीमनाथ । शिवमूर्ति अतिसमर्थ ।
कीर्ति जयाची विख्यात । तिन्ही लोक जाणती ॥ ५९ ॥
शाळुंका आहे बहुत सान । खणून पहातां चहूंकडून ।
त्याचे मूळाचा ठिकाण । नाहीं कोणा लागला ॥ ६० ॥
श्रीरामचंद्रें आपण । केलें तयाचें संस्थापन ।
पाहुनीया उत्तम स्थान । मूर्ति तेथें स्थापिली ॥ ६१ ॥
घेऊनि तयाचे दर्शनासी । निघता झालों वेगेसीं ।
तंव दशयोजनाहून दृष्टीसी । गिरनारातें पाहिलें ॥ ६२ ॥
तयासी पाहिलें तया क्षणीं । आनंद न माय तो गगनीं ।
वाटे आतांचि जाऊं उडोनी । तया स्थानाजवळिके ॥ ६३ ॥
जैशी कन्या सासुऱ्याहून । माहेरासी करी गमन ।
दृष्टी पहातां दुरून । वाटे उडून जाऊं कां ॥ ६४ ॥
कां दावियाचें वासरुं । गाईतें पाहोनि समोरु ।
ओढी घेऊनिया सत्वरू । जाऊ पाहे पिजाया ॥ ६५ ॥
तयापरी मजलागुनी । होतें झालें तये क्षणीं ।
श्रीदत्तात्रय ध्यानींमनीं । होऊनिया राहिला ॥ ६६ ॥
गुरुनें सांगितलें ध्यान । अंतरिक्ष पाहे मूर्ति सगुण ।
तयाप्रकारें मास तीन । ध्यान करिता जहालें ॥ ६७ ॥
तंव आश्चर्य वर्तलें एक । माझे अंतरीं वाटलें नीक ।
दत्तात्रय मूर्ति सम्यक । मीच झालों ये काळीं ॥ ६८ ॥
अंतरीं उदेला त्याग फार । वाटे व्हावें दिगंबर ।
विपिन सेवून घोरांदर । स्वेच्छानंदें क्रीडावें ॥ ६९ ॥
मी निर्विकार निःसंग । मज कासया पाहिजे संग ।
मी अक्षयी अभंग । नाहीं भंग मजप्रती ॥ ७० ॥

देह नाहीं मजलागून । मी निर्विकार निरंजन ।
ऐसें वदोनिया जाण । वस्त्रें सर्व वांटिलीं ॥ ७१ ॥
आणिक वाटे मी त्रैअवतार । षड्भुज-मूर्ति साकार ।
शंखचक्र-त्रिशूल-डमरू । माला कमंडलू शोभित जो ॥ ७२ ॥
सर्व वृत्ती झाल्या स्थिर । वाटे मीच दिगंबर ।
ब्रह्मानंद वारंवार । हृदयांतरीं उचंबळे ॥ ७३ ॥
जैसा होतां रामावतार । कौसल्या असतां गरोदर ।
वृत्ति झाली स्वरूपाकार । रामरूपीं मिळाली ॥ ७४ ॥
भूतें झडपिली ह्मणून । वसिष्ठ आणिला दशरथानें ।
तोंहि तदाकार होऊन । रामरूप जाहला ॥ ७५ ॥
कां कृष्णावतारीं देवकी माता । आठवा गर्भ उदरा येतां ।
ह्मणे मीच कंसाचा हंता । काळ कृतांता दंडीन ॥ ७६ ॥
तैसें झालें मजलागून । विसरुनि गेलें देहभान ।
चार घटिका स्तब्धपणें । मार्गीं उभा राहिलों ॥ ७७ ॥
सर्वेचि देहावरी येऊन । करिता झालों मार्गक्रमण ।
चालूनिया वायूप्रमाण । गिरिनारासी पावलों ॥ ७८ ॥
पर्वतासन्निध जाऊन । आनंदयुक्त झालें मन ।
वारंवार कर जोडून । साष्टांगनमन करीतसे ॥ ७९ ॥
वाटे दैवोदय जहाला । दरिद्रियाप्रती वहिला ।
धनाचा कूप सांपडला । अकस्मात् प्रारब्धें ॥ ८० ॥
तैसा पहातां रेवताचळ । उचंबळला प्रेमकल्लोळ ।
नेत्रीं वाहतसे जळ । अखंड धारा लागली ॥ ८१ ॥
रेवताचळाचा महिमा फार । पुराणीं लिहिलासे अपार ।
तो मी यथामति पामर । वर्णूनिया दावितों ॥ ८२ ॥
तीन योजनें लंबायमान । उंच पावणेदोन योजन ।
मध्य सप्त शिखरें जाण । कोटाप्रमाणें भोवताले ॥ ८३ ॥
सभोवते शुभ्र पाषाण । मध्यपर्वत नीळवर्ण ।
गंडिके शिळेचे समान । तेजःपुंज दिसतसे ॥ ८४ ॥
पारिजातक आणि मांदार । जाई जुई मोगरे प्रचुर ।
पुष्पवाटिका अपार । ठायीं ठायीं शोभती ॥ ८५ ॥

न्यग्रोध अश्वत्थ औदुंबर । जांबूळ वृक्ष आणि आम्र ।
चिंचा बदरी कपित्थ अपार । सफळ फळें डोलती ॥ ८६ ॥
धामनी करवंदें आणि चार । नेपती टेंभुरणें पिंपर ।
सिताफळी वृक्ष अपार । ठायीं ठायीं उगवले ॥ ८७ ॥
अनेक जातींचे वृक्ष अपार । अठरा वनस्पतींचे भार ।
साक्षात् धरुनिया अवतार । गिरनारीं राहिले ॥ ८८ ॥
तेथ मयोरें बोभावती । कोकिळा सुस्वरें गाती ।
रावे साळ्या आदि जाती । किंकाटती पक्षिगण ॥ ८९ ॥
व्याघ्र चित्ते जांबुवंत थोर । रोही चितळ आणि सांबर ।
हरण गेंडे आणि मार्जार । बहुत उग्र रहाती ॥ ९० ॥
नळनीळ जांबुवंत । सुग्रीव आणि हनुमंत ।
ह्यांचे वंशज मूर्तिमंत । वनचरें तेथ क्रीडती ॥ ९१ ॥
पर्वतामाजी उदक पुष्कळ । अक्षोभ वाहतसे जळ ।
ठायीं ठायीं नद्या तुंबळ । घडघडाट चालिल्या ॥ ९२ ॥
स्थळोस्थळीं तीर्थें पवित्र । पुराणांतरीं जयांचीं स्तोत्रें ।
स्नान करितीयां पवित्र । करिते ऐसे प्रतापी ॥ ९३ ॥
ठायीं ठायीं तापसी वृंद । नवनाथ चौऱ्यांशीं सिद्ध ।
कोणी गुप्त कोणी प्रसिद्ध । पर्वतामाजी रहाती ॥ ९४ ॥
स्थळोस्थळीं गुह्यस्थान । गुंफा ठेविल्यासे कोरून ।
तपश्चर्या उग्र साधन । बहुतीं तेथें पै केल्या ॥ ९५ ॥
पांडवांनीं तेथें वहिली । तपश्चर्या उग्र केली ।
हेडंबा तेथें पर्णिली । वृकोदरें आपण ॥ ९६ ॥
तया हेडंबाचा हिंदुळा । अद्यापि दिसताहे डोळा ।
पांडव-गुफा अति सोज्वाळ । त्याजपाशीं आहे हो ॥ ९७ ॥
मुचकुंदाची गुंफा अति थोर । बहु सखोल आहे विवर ।
तया स्थळाचा अंतपार । नाहीं कवणा लागला ॥ ९८ ॥
गौतम ऋषींनीं आपण । केली तपश्चर्या लागून ।
तयाचें सुंदर स्थान । विवर आहे चांगलें ॥ ९९ ॥
शंकराचार्य रामानंद । गोरक्ष अवघडनाथ प्रसिद्ध ।
गुप्तस्थानांतरीं निर्द्वंद्व । तपश्चर्या आचरले ॥ १०० ॥

श्रीगुरुदत्तात्रय पूर्ण । अद्यापि तपती आपण ।
तये कथेचें वर्णन । येईल पुढील अध्यायीं ॥ १०१ ॥
गिरनार हा वृक्ष थोर । शाखा विरूढली ग्रंथाकार ।
कवित्व-लतिका अति सुंदर । निरंजन चढवीतसे ॥ १०२ ॥
इतिश्री साक्षात्कार ग्रंथ । संमत सद्गुरु रघुनाथ ।
दत्तात्रय मूर्तिमंत । गुरुकृपें भेटले ॥ १०३ ॥

॥ श्री दिगंबरार्पणमस्तु ॥

---

## अध्याय चौथा.

सद्गुरुराया दिगंबरा । परब्रह्म पूर्णावतारा ।
भक्तवत्सल दीनोद्धारा । करुणाकरा निजमूर्ति ॥ १ ॥
मागील कथेचें अनुसंधान । उभय यतींचें संभाषण ।
केलें रेवताचळ-वर्णन । ऋषिस्थानें कथियेलीं ॥ २ ॥
श्रोते होईजे सादर । कवित्वसिंधूरत्नाकर ।
त्यांतील ओव्या मुक्तें सुंदर । उभयकर्णी घालावीं ॥ ३ ॥
पाहूनी गिरनाराची शोभा । अंतरीं उठिल्या प्रेमजिभा ।
भेदुनी जाऊं पाहती नभा । नेत्रद्वारा कडोनी ॥ ४ ॥
जुनेगडाप्रती जाऊन । नरसीमेहताचें दर्शन ।
सर्वेंचि हाटकेश्वरालागून । दृष्टीलागीं पाहिलें ॥ ५ ॥
पहाता झालों दामोदरकुंड । जयाचें सामर्थ्य प्रचंड ।
अस्थि पडिल्या असतां उदंड । पाणी व्हावें तयांचें ॥ ६ ॥
तयामाजी करोनि स्नान । सर्वेंचि रेवतीकुंडीं जाऊन ।
सुस्नात झालों दुसरेन । अर्घ्यप्रदान दिधलें ॥ ७ ॥
श्रीदामोदराचे चरण । भाळीं लाविले प्रेमेंकरून ।
सर्वेंचि मुचकुंददर्शन । घेता झालों आदरें ॥ ८ ॥

द्वापाराचे ठायीं जाण । रेवताचळ एकांत पाहोन ।
मुचकुंदें केलें शयन । निबिड गुंफेमाझारी ॥ ९ ॥
तंव काळयवन आणि श्रीकृष्ण । प्रवृत्त झाले युद्धालागून ।
नाटोप झाला तो यवन । मग मधुसूदन पळाला ॥ १० ॥
मार्गीं पळतांना विचार । करोनि ह्मणे हा महावीर ।
माझेनि न करवे संहार । कैसा विचार करावा ॥ ११ ॥
मानसीं आठवली युक्ति । जे मुचकुंदासि आहे वरदउक्ति ।
बहुसाल करावी सुषुप्ति । उठवितां तुजप्रती भस्म होवो ॥ १२ ॥
हे युक्ति रचोनि गोपाळ । आपुले अंगावरील पट्टकुल ॥
तेणें कडोनि आंग सकळ । झाकता झाला मुनीचें ॥ १३ ॥
आपण गुप्तरूपें करून । पहात ठेलासे दुरून ॥
तों इतक्यांत काळयवन । तया स्थानीं पातला ॥ १४ ॥
ह्मणे हा कृष्णचि निजला । घेऊनि निद्रेचे मिषाला ।
ह्मणोनि लत्ताप्रहार केला । ऋषीलागीं तयानें ॥ १५ ॥
मुनि जंव नेत्र उघडोनि पाहे । तंव जवळी उन्मत्त उभा आहे ।
मग शापुनिया लवलाहें । भस्म केला यवन तो ॥ १६ ॥
मुचकुंदासि द्यावया दर्शन । प्रकट झाला मधुसूदन ।
शापित पाहुनिया यवन । वर देते जहाले ॥ १७ ॥
कलियुगामाजी जाण । जे मियलशा पीर होऊन ।
तुझी सत्कीर्ति वाढून । पूज्य होसी सर्वत्रीं ॥ १८ ॥
मग दामोदर झाले आपण । निकट मुचकुंदाचें स्थान ।
पर्वतावरी काळयवन । पीर करोनि स्थापिला ॥ १९ ॥
तयासी पाहुनिया नेत्रीं । चालिलों पर्वतामाझारीं ।
तंव मृगीकुंड बहु विचित्री । दृष्टीलागीं देखिलें ॥ २० ॥
करोनि तयामाजी स्नान । घेतलें भवेश्वराचें दर्शन ।
सवेंचि करितां झालों गमन । भीमकुंडा जवळिकें ॥ २१ ॥
तया तीर्थातें वंदून । दृष्टी पाहिलें विवरस्थान ।
अति सूक्ष्म द्वारांतून । गेलों तया भीतरीं ॥ २२ ॥
निबिड दाटली अंधारी । कंटक पाषाण बहुत द्वारीं ।
अंत न लागे दूरवरी । शोधूनिया पहातां ॥ २३ ॥

भय सांडोनिया अंतरीं । मन केलें पर्वताकारीं ।
शोधित गेलों दूरवरी । चापचीत हातानें ॥ २४ ॥
बहुत दूरवरी आंत गेलों । नेत्रद्वय उघडिता झालों ।
तंव तेज पाहुनी दीपलों । एकाएकीं दृष्टीसी ॥ २५ ॥
पाहता झालों तपेश्वर । जैसा प्रगटला दिवाकर ।
भस्म-चर्चित जटाभार । मस्तकावरी शोभती ॥ २६ ॥
घालोनिया पद्मासन । खेचरी मुद्रा अवलंबून ।
मन करोनि उन्मन । ध्यानस्थ होऊनि बैसले ॥ २७ ॥
एक घटिका कर जोडूनी । उभा ठेलों बद्धपाणी ।
तंव कृपादृष्टीनें तयांनीं । नेत्र उघडोनि पाहिलें ॥ २८ ॥
प्रथम झाले क्रोधायमान । ह्मणती आहेस रे तूं कवण ।
कैसें झालें तुझें येण । विवराचिया माझारीं ॥ २९ ॥
द्वारीं व्याघ्र चवकीस होता । तो तुला पाहोनि भक्षिता ।
त्याजपासोनी तूं तत्वता । कैसा चुकोनि आलासी ॥ ३० ॥
मग तयाप्रती म्यां विनविलें । स्वामींचे कृपेनेंचि रक्षिलें ।
व्याघ्रासी नाहीं म्यां पाहिलें । दृष्टीलागी उघडोनी ॥ ३१ ॥
व्याघ्र खाता मजलागुनी । तरि माझी कायसी होती हानी ।
अमरत्व गुरुकृपें करूनी । प्राप्त झालें मजलागीं ॥ ३२ ॥
चर्मदेह-आशा सोडून । मायामोहो करूनि छेदन ।
चिदानंदीं सुखसंपन्न । होवोनी सुखी राहिलों ॥ ३३ ॥
मज नाहीं मृत्य-जनन । कवणापासूनि नाहीं हान ।
मी निराकार निरंजन । परिपूर्ण सर्वदा ॥ ३४ ॥
व्याघ्र जरि मज खाऊं येता । तरि त्याचे हृदयीं कोण वसता ।
मीच सर्वघटीं व्यापकता । करूनिया राहिलों ॥ ३५ ॥
जैसा इंदु राहुनी आकाशीं । बिंबत्वा दावी घटप्रदेशीं ।
एक असोनी बहुत वेषीं । घटोघटीं दिसतसे ॥ ३६ ॥
कां एक उदक सर्वांलागून । परि कांदा ऊस भिन्नभिन्न ।
रस पाहतां चाखून । एकमेका न मिळती ॥ ३७ ॥
तैसे व्याघ्र आणि मनुष्य । उभयपक्षीं एकाचि वास ।
सत्वरज आणि तमांश । व्यक्ती मात्र वेगळया ॥ ३८ ॥

व्याघ्रें हें देहे जरी खादलें । तरी वाया एथें काय गेलें ।
जैं स्वहस्तें पायासि ताडिलें । हीनत्व आलें कवणासी ॥ ३९ ॥
कां उदकावरी बुद्बुद येती । एकमेकासी झगटती ।
लय पावलिया पूर्वस्थिती । गेली नाहीं सर्वथा ॥ ४० ॥
कां पंचभूतें प्रळयकाळीं । करिती एकमेकां गिळी ।
परी उत्पन्न व्हावयाची मुळी । भंग नाहीं पावली ॥ ४१ ॥
तैसा मी अनादि अद्वय । उरला नाहीं द्वैतभाव ।
तेथें मज अपाय उपाय । होऊं शके कोठोनि ॥ ४२ ॥
ऐसें तया प्रती भाषण । करितां झालों कर जोडून ।
महाराज योगेश्वर प्रसन्न । होवोनिया बोलती ॥ ४३ ॥
पुसूनिया नामाभिधान । ह्मणती धन्य रे निरंजन ।
तव सद्गुरू ज्ञानसंपन्न । करूणाघन धन्य तो ॥ ४४ ॥
तुझे मस्तकीं कर ठेवून । दिधलें हें तुज तत्वज्ञान ।
जन्ममरणाचें खंडन । झालें जया प्रसादें ॥ ४५ ॥
आतां ध्यावया माझें दर्शन । इच्छा काय आलासि करून ।
ईप्सित असेल तुझें मन । तें परिपूर्ण करितों मी ॥ ४६ ॥
दत्तात्रय-शिखराखालीं जाण । रतनबाग आहे उपवन ।
वृक्ष लागले अति सघन । भीतरी पवन न रिघेची ॥ ४७ ॥
तये स्थानीं रतनबावडी । तिजला अडीच पायऱ्या शिडी ।
तियेच्या उदकाची प्रौढी । सुवर्ण करी लोहाचें ॥ ४८ ॥
ती आहे कवणे ठिकाणीं । हें ठावें नाहीं कोणालागुनी ।
पूर्वी मोळक्या तया स्थानीं । एक गेला होता पैं ॥४९॥
तृषेनें झालासे व्याकुळ । अरण्यामाजी शोधीत जळ ।
तों दृष्टीसी वापी सोज्वळ । निबिड स्थानीं देखिली ॥५०॥
अडीच पायरिया उतरून । उदक केलें बहु प्राशन ।
तंव दैवयोगें करून । कुराडी उदकें भीजली ॥५१॥
जावोनिया पहिला वर्ण । तिचें झालें दिव्य सुवर्ण ।
मोळक्या आनंदें करून । घरा घेऊनि पैं गेला ॥५२॥
लोह घेऊन परतून । शोधीत आला दुसरेन ।
बहुत श्रमला परि ठिकाण । नाहीं कोठें लागला ॥५३॥

तितुकियानें मात्र पाहिलें । पुन्हा त्यातें ठाऊकें न झालें ।
त्याविण दुसरियातें वहिलें । ठाऊक नाहीं तें स्थान ॥५४॥
तुज मी झालोंसे प्रसन्न । दावोनि देतों तेथींची खूण ।
इच्छील जितुकें तुझें मन । उदक नेई तितूकें ॥५५॥
ऐसें वदतां तपेश्वर । तयासी मी वदलों उत्तर ।
माझें ज्ञान निरंतर । अक्षयी राहो तव कृपें ॥५६॥
हेंचि मागतों वारंवार । जोडोनिया दोन्ही कर ।
नलगे द्रव्याचें भांडार । पीडाकार ज्ञानासी ॥५७॥
मागणें तरी एक आहे । श्रीदत्तासी दृष्टीसी पाहे ।
हा वर देऊनि लवलाहें । बोळवण करावी ॥५८॥
इतुकें ह्मणतां तया लागून । ते अंतरसाक्षी परम निपुण ।
ह्मणती गुरूचें वरदान । तुजप्रती आहे कीं ॥५९॥
तया गुरुकृपें करून । होईल दत्तांचें दर्शन ।
माझाहि आशीर्वाद जाण । तयापरी घडो कां ॥६०॥
परि एक सांगणें तुजप्रती । इच्छा कांहीं न धरी चित्तीं ।
जरि झाली तृष्णा उत्पत्ती । तरि गुरूमूर्ति न भेटे ॥ ६१ ॥
शुद्ध करोनिया मन । घेसी दिगंबरदर्शन ।
तरिच साध्य होईल जाण । नाहीं तरि न घडेचि ॥ ६२ ॥
ऐसें ऐकोनि नेमोत्तर । तथास्तु वदलों मी उत्तर ।
करोनि साष्टांग नमस्कार । उदित झालों निघावया ॥ ६३ ॥
त्यांनीं प्रसादा लागून । एक फळ दिधलें जाण ।
तें म्यां तेथेंचि भक्षून । तृप्त झालों ते काळीं ॥ ६४ ॥
तयाचे गोडीप्रती जाण । अमृतहि लाभे फिकेपण ।
सुगंधीनें भरलें गगन । तृप्त मन जहालें ॥ ६५ ॥
तया दिवसापासून । क्षुधेनें नाहीं केलें येण ।
मोजुनिया तीन दिन । पळोनी गेली दिगंता ॥ ६६ ॥
असो तया काळीं विनंती । करिता झालों त्याजप्रती ।
स्वामी तुमची एथें स्थिती । किती दिन आहे हो ॥ ६७ ॥
किती सिद्ध इये स्थानीं । बसिलेत अनुष्ठानीं ।
वातांबुपुर्णाशनी । करीत योग साधना ॥ ६८ ॥

मग ते ह्मणती नाहीं प्रमित । युगें लोटुनि गेलीं बहुत ।
आह्मां ऐसे यया स्थळांत । पुष्कळ गुप्त रहाती ॥ ६९ ॥
मग ह्मणती जाय रे सत्वर । आह्मां क्लेश होती फार ।
लावुनि जाय विवरद्वार । शिळा तोंडीं लावोनि ॥ ७० ॥
मग तयासी नमस्कारून । निघता झालों मी तेथुन ।
द्वारीं चंड शिळा लावून । दगड बहुत रचियेले ॥ ७१ ॥
सर्वेचि पर्वतावरी चढून । केलें भीमकुंडाचें दर्शन ।
गौमुखीं गंगेचें स्नान । करिता झालों आदरें ॥ ७२ ॥
रामानंद दृष्टी पाहून । घेतलें अंबेचें दर्शन ।
ववेचि गोरक्षासि भेटून । अवघडनाथ पाहिले ॥ ७३ ॥
कमंडलू उदकें सुस्नात । होउनि गेलों शिखरावरुतें ।
मार्ग कठिण अत्यंत । हातें धरूनि चढावें ॥ ७४ ॥
उच्च बहुत तें शिखर । उभागिले जैसे मेरुमांदार।
किंवा दुसरा हिमाकर । उपमे लागी जयाचे ॥ ७५ ॥
तळींहुनि वरी जातां । दिनमणीच जाय अस्ता ।
होवोनि कठिण अवस्था । मागुती खालीं उतरावें ॥ ७६ ॥
सर्व पर्वता आंतून । सर्वदा मेघांचें मंडण ।
षड्ऋतूप्रती जाण । तेथूनिया नवजाती ॥ ७७ ॥
वायु आंतून सणाणी । उडवूनि नेत वृक्ष पाषाणीं ।
शिखरीं जावयासी जननी । विरळा प्रसवेल कोणाची ॥ ७८ ॥
असो सद्गुरुकृपें करून । वरि चढोनि गेलों जाण ।
तंव वायु लागूनिया सघन । पडूं पाहे खालती ॥ ७९ ॥
मग मी पाषाण आलिंगुनी । पाहिलें नेत्रासी उघडोनि ।
तंव गुरुपादुका चिन्मय खाणी । दृष्टीलागीं देखिल्या ॥ ८० ॥
जैसे तिन्ही देह्यांवरी । महाकारण तेजाकारी ।
पादुका शोभल्या तयापरी । दैदीप्यमान साजिऱ्या ॥ ८१ ॥
सद्गदित कंठ होऊन । केल्या पादुका आलिंगन ।
नेत्रीं प्रेमाश्रु येऊन । क्षाळणपूजा जाहली ॥ ८२ ॥
करूनिया नूतन कवन । वर्णिले श्रीदत्ताचे गुण ।
मधुरोत्तर वचनें वदून । स्तुति बहुत पैं केली ॥ ८३ ॥

करोनिया नमस्कार । अंतरीं केला दृढविचार ।
एथें बैसुनि निरंतर । दिनत्रय पर्यंत ॥ ८४ ॥
राहुनिया निराहारी । दृष्टी पाहूं हा गिरनारी ।
षड्भुज मूर्ति साजिरी । षड्आयुधें मुक्त जे ॥ ८५ ॥
ऐसा निश्चय मनीं करून । प्रवर्तलों बैसायालागून ।
तंव एकाएकीं आठवण । झाली गुरुआज्ञेची ॥ ८६ ॥
सात महिने एकादश दिन । झाले नाहींत अद्यापि पूर्ण ।
मध्यंतरी करितां साधन । गुरुदर्शन नव्हेचि ॥ ८७ ॥
पूर्ण महिने भरत तंववरी । एथें बैसावें कवणेपरी ।
मग विचार केला निजअंतरीं । जे प्रदक्षिणा कराव्या ॥ ८८ ॥
पादुकांसी करोनि नमन । खालीं उतरता झालों जाण ।
माता अनुसूयेचें दर्शन । जाऊनिया घेतलें ॥ ८९
रेणुका देवीस नमस्कार । करोनि भक्ति–पुरःसर ।
काळिका देवी अत्यादर । जाऊनिया वंदिली ॥ ९० ॥
तें स्थान बहुत भयंकर । अघोरी वसती निरंतर ।
करोनि मनुष्याचा आहार । बहुकाळ वांचती ॥ ९१ ॥
मागील दशवरुषां माझारी । तेथें बहुत होते अघोरी ।
नरमांस भरोनिया उदरी । तयालागीं आचरती ॥ ९२ ॥
कोणीएक बैरागी आंधळा । हात ठेवोनि शिष्याचे गळा ।
चढोनिया पर्वतमौळा । दर्शनासी पातला ॥ ९३ ॥
तंव हारनाम नामें अघोरी । तेथ येऊनि झडकरी ।
पोर उचलुनि तये अवसरीं । घेऊनिया पळाला ॥ ९४ ॥
जाऊनी काळिकेचे देउळीं । पोर खांडुनी केली गोळी ।
पाचन करावया ते काळीं । मडक्यामाजी ठेविलें ॥ ९५ ॥
इकडे बैरागी शोकयुक्त । आरडोनिया हाका मारित ।
दोन्ही नेत्रें करुनी भित्त । मार्ग कांहीं न लक्षे ॥ ९६ ॥
मग उच्चारुनिया श्रीदत्त । मोठ्यानें हाका मारित ।
होऊनिया तृषाक्रांत । क्षुधायुक्त जहला ॥ ९७ ॥
पाहोनिया ऐसें निर्वाण । गोसावी याचे रूपें करून ।
मसळप्राय दंड घेऊन । दत्तात्रय प्रगटले ॥ ९८ ॥

जाऊनिया अघोऱ्यापाशीं । बोलते झाले तयासि ।
सत्वर सोडोनी मुलाशी । द्यारे तुह्मी सर्वही ॥ ९९ ॥
अघोरी वदते झाले वचन । मूल तों झालासे पाचन ।
सामर्थ्य असेल तरी आपण । उठवूनी नेइजे ॥ १०० ॥
तंव दिगंबरें मारितां हाक । फुटलें चुलीवरील मडक ।
पोर होऊनी सम्यक । स्वामीपाशीं पातलें ॥ १०१ ॥
ऐसा पाहोनी चमत्कार । अघोरी पळाले समग्र ।
पाठीं लागोनी दिगंबर । एकाप्रति ताडिलें ॥ १०२ ॥
वरकड अर्बुदाचळा गेले । मनुष्य-भक्षणातें सोडिलें ।
तंव लंगडा श्रीगुरुते बोले । मेलों मेलों ह्मणवूनी ॥ १०३ ॥
दिगंबरासि आली करुणा । केलें त्याचे संरक्षणा ।
तो अद्यापि तया ठिकाणा । लंगडा होवोनि आहे पां ॥ १०४ ॥
इकडे बैरागी खेदभरित । श्रीगुरुसि हाका मारित ।
तंव मूल घेऊन त्या स्थळांत । दिगंबर पातले ॥ १०५ ॥
देऊनि त्यासि दिव्यनयन । साक्षात् दिधलें दर्शन ।
पोर त्याचें स्वाधीन करून । आपण गुप्त जाहले ॥ १०६ ॥
असो ती काळिका देवी नमून । सूर्यकुंडाप्रत केलें गमन ।
सर्व गुंफा अवलोकून । जुनेगडासी पातलों ॥ १०७ ॥
श्री रघुनाथ गुरुप्रसाद । नामस्मरणीं धरूनी छंद ।
सगुण ध्यानासी निर्द्वंद्व । उर्ध्वदृष्टी पहातसे ॥ १०८ ॥
सद्गुरूचे उभय चरण । अवलोकोनी निरंजन ।
देहासहित आपुलें मन । ओवाळूनी टाकितसे ॥ १०९ ॥
इतिश्री साक्षात्कार ग्रंथ । संमत श्रीगुरुरघुनाथ ।
दत्तात्रय मूर्तिमंत । गुरुकृपें भेटले ॥ ११० ॥

॥ श्री दिगंबरार्पणमस्तु ॥

## अध्याय पांचवा.

श्री दिगंबरायनमः । परात्परा दिगंबरा । दत्तात्रया पूर्णावतारा ।
तूंचि व्यापक चराचरा । होवोनिया ठेलासी ॥ १ ॥
तुझे पोटीं हे भूगोल । उत्पन्न झालें नभमंडळ ।
हरिहरब्रह्मा तिन्ही बाळ । तुझे पोटीं जन्मलीं ॥ २ ॥
दयाघनरूपें रघुवीर । तूंचि प्रगटोनि भूमीवर ।
जडमूढासि पैलतीर । पावविसी दयाळा ॥ ३ ॥
श्रोते परिसिजे विनवणी । चव अध्यायीं कथासरणी ।
करीत आलों ज्या कारणीं । तें कारण परिसावें ॥ ४ ॥
मागील अध्यायीं कथा गहन । गुप्त तपस्वी पाहून ।
घेऊनि पादुकादर्शन । सर्व तीर्थें वंदिलीं ॥ ५ ॥
जुनेगडा माजी जातां । तंव एक ब्रह्मचारी अवचिता ।
उदासीन आणि ज्ञाता । भेटता जाला मजप्रती ॥ ६ ॥
एकांतीं दोघे जाऊन । करिते झालों आत्मविवरण ।
तो वय-कडोनी असे सान । परि पूर्ण दशा पावला ॥ ७ ॥
त्यानें आपली मुमुक्षता । सर्व सांगितली कथा ।
सांप्रतहि पूर्ण अवस्था । झाली तेहि कथियेली ॥ ८ ॥
व्यक्ति पहावयाचें लक्षण । पाहणें जातें हारपून ।
मन जेणें होतें उन्मन । तेंही कथन कथियेलें ॥ ९ ॥
त्याचें ऐकोनी उत्तर ॥ वृत्ति झाली तदाकार ।
होउनि स्वरूपीं निर्भर । आनंदरूप जहालों ॥ १० ॥
जैसी आफिमियासि आफु मिळे । गिळुनि जाय आफूचे गोळे ।
फिरोनि जाती नेत्रबुबुळें । शुद्धी नाहीं देहाची ॥ ११ ॥
ब्रह्मरस लावोनी होटीं । माईक झुगारिली वाटी ।
तैशा उभयपक्षीं गोष्टी । सांडुनि स्तब्ध राहिलों ॥ १२ ॥
असो तो ब्रह्मचारी खरा । माया कामिनीचा अंगवारा ।
नातळे जयाचिये अंतरा । व्रतधारा अखंड ॥ १३ ॥

त्यासि करोनि म्यां नमना । रेवताचळाची प्रदक्षिणा ।
करावयालागी जाणा । प्रारंभ केला तेथुनि ॥ १४ ॥
करितां एक प्रदक्षिणा । सहा योजनें होत गणना ।
तयामाजी वृक्षपाषाणा । उल्लंघूनि जावें पैं ॥ १५ ॥
चैत्र-वैशाखाचें उष्ण । त्यामाजी अनवाणी चालणें ।
बहुत कंटक मार्ग कठिण । उल्लंघूनि जातसे ॥ १६ ॥
आंगीं वैराग्य कडकडाट । टाकुनिया चांगली वाट ।
पर्वतावरी अफाट । चालुनिया पैं जावें ॥ १७ ॥
मार्गालागीं करितां क्रमण । कोणीकडे उगवला दिन ।
रात्र अंधार दारुण । हेंही ठावें न व्हावें ॥ १८ ॥
क्षुधा लागली असतां जाण । करावीं वनफळें भक्षण ।
दों चव दिवसांनंतर अन्न । मिळालें तरी भक्षावें ॥ १९ ॥
तोहि असला जरी ब्राह्मण । तेणें दिधलें स्वइच्छें करून ।
तरि मग स्वयंपाका लागून । पात्र नाहीं जवळिकें ॥ २० ॥
पीठ आणि दुसरें मिष्ट । पदरीं बांधुनि बळकट ।
पाहुनि नदीचा तटाक । शुभा वेचुनि आणाव्या ॥ २१ ॥
तयांचें जगरें चेतवून । स्नानसंध्येसि सारून ।
पाहुनि चांगला पाषाण । पिष्ट त्यावरी तिंबावें ॥ २२ ॥
तयाचे पानगे करावे । जगऱ्यावरि भाजुनि घ्यावे ।
उदार चित्त करोनि खावे । मिष्ट तोंडीं लावूनी ॥ २३ ॥
कोरडे न गिळवले जरी । मग कुस्करावी ते भास्करी ।
कालवूनि उदकामाझारी । गिळूनिया जावी पैं ॥ २४
एवं भोजनातें सारून । सर्वेंचि करावें गमन ।
उदास करोनिया मन । विश्रांति कोठें न घ्यावी ॥ २५ ॥
ऐसें एकमास पर्यंत । प्रदक्षिणा केल्या बहुत ।
तंव रात्रीं येवोनी स्वप्नांत । दत्तात्रय बोलती ॥ २६ ॥
म्हणती ऐकारे निरंजना । पुरे करी रे प्रदक्षिणा ।
जाई द्वारकापट्टणा । कृष्णदर्शन घ्यावया ॥ २७ ॥
आतां जरी तूं न जाशी । तरि पुढें दुष्काळ तये देशीं ।
पडोनि अन्न खावयासी । न मिळेचि सर्वथा ॥ २८ ॥

मी कोण ह्मणशील जरी । माझें नांव दत्तपुरी ।
वचन ऐकोनि निर्धारीं । जाय आतां त्वरेनें ॥ २९ ॥
मग मी होवोनि जागृत । विचार केला मना आंत ।
आज्ञापिलें श्रीगुरूनाथें । तथापरी करावें ॥ ३० ॥
प्रदाक्षिणा करोनी समाप्त । निघता झालों मी त्वरित ।
मिळाली बहुत सांगात । द्वारकेसि जावया ॥ ३१ ॥
तयांचे समागमें करून । पावलों द्वारकापट्टण ।
करोनि गोमतीचें स्नान । विष्णुदर्शन घेतलें ॥ ३२ ॥
तीर्थविधीतें सारून । बाह्यप्रदेशीं दैवत पूर्ण ।
घ्यावया तयाचें दर्शन । तृतीयदिनीं निघालों ॥ ३३ ॥
पंचकूपसंगम नारायण । चक्रतीर्थ चमत्कारिक पूर्ण ।
तयांत अस्थि झालिया पतन । चक्रें होतीं तयांचीं ॥ ३४ ॥
त्यामाजी करोनि स्नान । घेतलें सिद्धेश्वरदर्शन ।
रुक्मिणीदेवी रुसून । बैसली ते वंदिली ॥ ३५ ॥
भद्रकाळीतें नमोनि । आशोक वृक्षा अवलोकोनि ।
बहुता तीर्थांचिया श्रेणी । वंदिता झालों आदरें ॥ ३६ ॥
चतुर्थ दिवशीं तातडी । उतरोनि समुद्राची खाडी ।
जाउनीया पैलथडी । बेट दृष्टी देखिलें ॥ ३७ ॥
तेथें श्रीकृष्ण आपण । दुष्ट यवनाचिये भयेन ।
निघुनिया द्वारकेहून । बेटीं जावोनि राहिले ॥ ३८ ॥
तयांचें घेउनिया दर्शन । करिता झालों साष्टांगनमन ।
नूतन कविता करून । श्रीहरिगुण वर्णिले ॥ ३९ ॥
कंठ सद्गदित होऊन । प्रेमाश्रु टाकिती उभय नयन ।
यात्रेकरू सर्वहि जन । पहाती येवोनी दृष्टीसी ॥ ४० ॥
स्तुति करिति वारंवार । ह्मणती धन्य सद्गुरु उदार ।
यास दिधला कवित्व-वर । श्रीहरिगुण वर्णावया ॥ ४१ ॥
राजे मंत्री सर्वेहि जन । येवोनिया धरिती चरण ।
कोणी देती आलिंगन । निजभावें करुनी ॥ ४२ ॥
ऐसे झाले तीन दिन । मग करोनिया समुद्रस्नान ।
जावोनी शंखनारायण । दृष्टीलागीं पाहिला ॥ ४३ ॥

करोनि शंखासुरमर्दन । सर्वेचि केलें उद्धारण ।
अद्यापि चमत्कार पहाणें । शंख तेथें निघती ॥ ४४ ॥
असो करुनि प्रदाक्षिणा । तीर्थ दैवतें पाहिलीं नाना ।
सर्वोचि श्रीकृष्णदर्शना । घेता झालों आदरें ॥ ४५ ॥
देवाप्रती आज्ञा मागून । निघता झालों न लगतां क्षण ।
गोपी गळाल्या तें स्थान । दृष्टीलागीं पाहिलें ॥ ४६ ॥
रेवताचळाची आठवण । होतांचि निघालों तेथून ।
सहा दिवसां माजी जाण । गिरनारासि पाहिलें ॥ ४७ ॥
राहिलों सहा कोसावरी । तंव ते दिवशींचिये रात्रीं ।
अवधूत येवोनि स्वप्नांतरीं । मधुरोत्तरीं बोलती ॥ ४८ ॥
चाल रे ऊठि कां लवकर । मज जाणें आहे सत्वर ।
वृथा वाउगा उशीर । लाऊं नको सर्वथा ॥ ४९ ॥
तंव जागृत होवोनी बैसलों । रात्रींच मार्गासी लागलों ।
दिन उगवावया गेलों । तया पर्वता माझारी ॥ ५० ॥
उंची पावणेदोन योजन । माध्यान्हीं होतां गेलों चढोन ।
कमंडलूचें करूनि स्नान । शिखरानिकटीं पातलों ॥ ५१ ॥
तंव अंतरीं झाली आठवण । गुरुआज्ञेचियाप्रमाण ।
संख्या भरत आले दिन । राहिले तीन शेवटीं ॥ ५२ ॥
अंतरीं त्याग आयुर्भाव । उठोनि वस्त्रें वाटिलीं सर्व ।
श्रीगुरुभेटीचा उत्साव । अंतर्यामीं दाटला ॥ ५३ ॥
तेथील गोसावियापासून । व्याघ्रांबर घेतलें मागून ।
भस्म चांगलें पाहून । बहुत बांधोनी घेतलें ॥ ५४ ॥
तया गोसावियाप्रती । वदता झालों वचनोक्ति ।
श्रीदत्ताचे दर्शनाप्रती । शिखरावरुतें जातों मी ॥ ५५ ॥
तुम्हां सांगतों एक प्रमाण । झालिया दत्तात्रय-दर्शन ।
चवथे दिवशीं मी येईन । भेटीलागी तुमचे ॥ ५६ ॥
नाहीं तरी हेचि भेटी । आजचि बुडाली सर्व सृष्टी ।
असेल माझिये अदृष्टीं । तैसें घडो सुखरूप ॥ ५७ ॥
ऐसे सांगोनी तयाप्रती । निघता झालों सत्वर गती ।
जावोनिया शिखरावरुती । गुरुपादुका पाहिल्या ॥ ५८ ॥

होवोनिया प्रेमभरित। घातलें साष्टांग दंडवत ।
एकाग्र करोनिया चित्त । ध्यान दृष्टी पाहिलें ॥ ५९ ॥
आसन घालोनिया दृढ । बैसता झालों पादुका पुढें ।
घालोनि देवासी साकडें । निश्चय करोनि बैसलों ॥ ६० ॥
पूर्व दिशेसि मुख करून । केलें रघुनाथगुरुस्मरण ।
आतां करावें धावण । गुरुराया ये काळीं ॥ ६१ ॥
तुह्मी बोलिले जे वचनोक्ति । दत्तात्रय तुज भेटती ।
त्या दिवसाची भरती । पूर्ण झाली या काळीं ॥ ६२ ॥
आतां धावण्या धावून । करवावें दत्ताचें दर्शन ।
नाहींतरी माझा प्राण । जाऊं पाहे या काळीं ॥ ६३ ॥
सर्वेचि करोनि नामस्मरण । आठविले दिगंबरगुण ।
बोलता झालों करुणावचन । ऐका चित्त देउनि तें ॥ ६४ ॥
हे पतितपावन दिगंबरा । हे अवधूतरूपा सर्वेश्वरा ।
दत्तात्रया पूर्णावतारा । परब्रह्मा येईं कां ॥ ६५ ॥
कृष्णरूपा सर्वेश्वरा । हे त्रयिदेवाचिये अवतारा ।
हे भवभयतापसंहारा । करुणाकरा दे भेटी ॥ ६६ ॥
हे शंखचक्रकमंडलु-धरा । हे त्रिशूळडमरुमालाकरा ।
षड्भुज ऐश्वर्य-धरा । कृपकरा धावे कां ॥ ६७ ॥
जाहला एक संवत्सर । मार्ग पाहिला आजवर ।
आतां देह वृथा भार । ठेवूं कशासाठीं हा ॥ ६८ ॥
जैसा देवीस नवस केला । बस्त घेऊनि वाहिला ।
येतां त्याचा समय वहिला । वधोनिया टाकिती ॥ ६९ ॥
तैसा हा देह तुज वाहुनी । सोडिलें इंद्रायणीचें पाणी ।
गुंतली होती माझी वाणी । आजवरी त्या बोला ॥ ७० ॥
ते हे पूर्ण भरले दिन । शेष राहिले आहेत तीन ।
तयांची ही भरती जाण । होईल एथेंचि बैसोनी ॥ ७१ ॥
मग देह तुज वाहून । मोकळे होऊं सर्वांगुण ।
पावोनिया शुभमरण । मान्य होऊं सर्वत्रीं ॥ ७२ ॥
परि अंतरीं पूर्ण भरंवसा । अझोनी आहे जगदीशा ।
ठायीं ठायीं माझिया क्लेशा । निवारित आलासी ॥ ७३ ॥

अंकोलीयामाजी जाण । स्वप्नवत दिधलें दर्शन ।
मंत्र अष्टाक्षरीं सांगून । गुप्त झालेती ते काळीं ॥ ७४ ॥
अनेकप्रकारीचें भाषण । स्वप्नामाजी केलें जाण ।
त्याचा ग्रंथची लिहून । आत्मप्रचीती ठेविली ॥ ७५ ॥
जयापरी स्वप्नीं दर्शन । देवोनि केलें संरक्षण ।
तैसे यया काळीं आपण । साक्षात् दर्शन द्यावें जी ॥ ७६ ॥
ऐसें ह्मणोनी वारंवार । स्तविता झालों दिगंबर ।
नेत्रीं प्रेमाश्रूचे पूर । सदोदित वाहती ॥ ७७ ॥
रघुनाथ-कृपेंकरून । होईल साक्षात् दर्शन ।
संशय राहित्य होऊन । धैर्य धरिता जाहलों ॥ ७८ ॥
श्रोत्यांलागीं निरंजन । विनवीतसे कर जोडून ।
पुढील कथेसि अवधान । सावधपणें देईजे ॥ ७९ ॥
इतिश्री साक्षात्कारग्रंथ । संमत श्रीगुरुरघुनाथ ।
दत्तात्रय मूर्तिमंत । गुरुकृपें भेटले ॥ ८० ॥

॥ श्री दिगंबरार्पणमस्तु ॥

---

## अध्याय ६.

सद्गुरुस्वामिया रघुनाथा । पूर्णब्रह्म कृपावंता ।
कवणाचीहि उपमा देतां । तुझी समता नव्हेची ॥ १ ॥
ग्रंथ करावयासि लेखन । माझें सामर्थ्य नाहीं जाण ।
परि त्वां अंतरीं प्रवेशून । कवित्ववाणी वदविली ॥ २ ॥
ऐकोनि घेईजे श्रोतेजन । मागील अध्यायीं कथा गहन ।
गिरनार-प्रदक्षिणा करून । पादुकापाशीं बैसलों ॥ ३ ॥
दत्तात्रयगुणानुवाद वर्णितां । अस्तमानासी गेला सविता ।
तंव विघ्न एक अवचिता । येतें झालें ते काळीं ॥ ४ ॥
वात सुटलासे प्रचंड । पर्जन्यधारा वर्षे अखंड ।
विद्युलता खंडविखंड । करावया धावती ॥ ५ ॥

तया पर्वताचे शिखरीं । नाहीं कोठें गुहा दरी ।
त्यामाजी दडून बैसूं तरी । नाहीं कोठें ठिकाणा ॥ ६ ॥
मग तैसेंचि घालूनि आसन । बैसता झालों अक्षईपण ।
वरोनि वर्षत असे घन । नाहीं प्रमाण तयासी ॥ ७ ॥
वाटे प्रलयकाळचि पातला । कीं अंतकाळ जवळी आला ।
कां दत्तात्रय क्षोभला । ह्मणोनी ऐसें वर्तलें ॥ ८ ॥
देशांत पडलें अवर्षण । ऐथेंचि कोठें पातला घन ।
असो जावो माझा प्राण । परि मी येथोनि न ढळेंचि ॥ ९ ॥
वर्षाव होत वरचेवरी । हुडहुडी दाटलीसे अंतरीं ।
दांतखीळ तेथें अवसरी । बसती झाली अखंड ॥ १० ॥
देहीं पडोनि विस्मरण । पडता झालों अचेतन ।
नाहीं कांहीं एक भान । व्याकुळ प्राण जहाला ॥ ११ ॥
तंव एक सुवासीन । येवोनि बोलती झाली वचन ।
हा घेईरे निरंजन । प्रसाद गुरुदत्ताचा ॥ १२ ॥
पक्क खिचडी मुष्टीभरी । ठेवोनि माझे हस्तावरी ।
तेचि काळीं ते झडकरी । मूर्छेमाजी भक्षिली ॥ १३ ॥
रात्री झालीसे दोन प्रहर । अचेतन पडिलों मी तोंवर ।
मग येवोनि देहावर । पहाता झालों सभोंवता ॥ १४ ॥
तंव ते न दिसे सुवासिनी । पर्जन्यहि न दिसे नयनीं ।
वायू ठेला स्तब्धपणीं । सरली यामिनी सर्वेची ॥ १५ ॥
करूनिया स्वामिस्तवन । वर्णिता झालों कीर्तिगुण ।
अंतरीं सखेदता पावून । तीव्र भाषण करितसे ॥ १६ ॥
रे रे स्वामी दिगंबरा । दत्तात्रया पूर्णावतारा ।
कृपासिंधु करुणाकरा । निर्वाण कांरे पहासी ॥ १७ ॥
तुझें नाम स्मरत्रगामिनी । तें काय झालें इये क्षणीं ।
नामासारिखी न दिसे करणी । मजलागीं सर्वथा ॥ १८ ॥
तुझें नाम जगदुद्धार । करावया जगाचा उद्धार ।
घेउनि षड्भुज अवतार । सर्व दिशेसी भ्रमसि तूं ॥ १९ ॥
बहुतां जनांसी तारिलें । जनार्दनाशीं दर्शन झालें ।
एकनाथासी भेटले । दासोपंत तीसरा ॥ २० ॥

इतुके कलिमाजी जाणा । मागील युगाची नाहीं गणना ।
तो मज भासे लटकेपणा । यया काळीं पहातां ॥ २१ ॥
असो तुज संकट घातलें ह्मणून । काल पाठविलें विघ्नालागून ।
परि मी न भी सर्वथैवपणें । सत्य जाण स्वामिया ॥ २२ ॥
जैं शूर व्याघ्रावरी गेला । चिंतोनि आपुले मरणाला ।
परि न भी त्याचे आरोळिला । हाटकोनी बोलावी ॥ २३ ॥
तैसा देहाचा संकल्प । आदौचि केलासे निष्टंक ।
मग दर्शनाची धरोनि भूक । आलों स्वामी तुजपाशीं ॥ २४ ॥
ऐसें बहुता प्रकारें करून । बोलता झालों निष्ठुरपण ।
तंव अस्तमानाप्रति दिन । जाता झाला ते काळीं ॥ २५ ॥
गेली तीनप्रहर यामिनी । एकांत पाहुनिया स्वप्नीं ।
दत्तभट ब्राह्मण होवोनी । वचन झाले बोलते ॥ २६ ॥
एथोनी जाय रे सत्वर । ह्मणोनीं बोलती उत्तर ।
एक रुमाल एक वस्त्र । पीतवर्ण दिधलें ॥ २७ ॥
जागृत होवोनि पाहिलें । तंव जगद्गुरु गुप्त जाले ।
वस्त्रें उशासि ठेविलें । प्रसादिक आपुलीं ॥ २८ ॥
मग मी वदता झालों उत्तर । हे हे श्रीगुरु स्वामि-दिगंबर ।
स्वप्नीं येसी वारंवार । प्रत्यक्ष कां न भेटसी ॥ २९ ॥
आधीं देउनिया लळा । मग कापोनि टाकितां गळा ।
हे हे दीनबंधु कृपाळा । बरें न दिसे तुजप्रती ॥ ३० ॥
असो माझेंचि दैव खोटें । ह्मणोनि न देसि तूं भेट ।
हें कळोनि आलें स्पष्ट । मजलागीं ये क्षणीं ॥ ३१ ॥
परि थोरपणाची रीति । ऐसि नोहे हो श्रीपती ।
शरणागत आलियाप्रती । कृपादृष्टी पहावें ॥ ३२ ॥
दर्शन झालिया मजप्रती । कांहीं आशा न धरी चित्तीं ।
मी शपथ वाहतों निश्चिती । श्रवण केली पाहिजे ॥ ३३ ॥
इच्छून उपभोगप्राप्ती । जरि मागेन धनसंपत्ति ।
तरि रवरवामाजी जे पचती । ते गति होवो मजलागीं ॥ ३४ ॥
जरि सिद्धि सामर्थ्य मागेन । तरि जें गुरुवचन करी खंडन ।
तें पातक बहुदारुण । माझे माथा बैसो कां ॥ ३५ ॥

कीं गुरूनें करितां तत्वबोधन । ते शिष्य सांडी नोहे ह्मणून ।
काढूनिया विकल्प अज्ञान । करी अवमान गुरूचा ॥ ३६ ॥
तो पिशाच होवोनि बहुकाळ । होवोनि क्षुधेनें व्याकुळ ।
भक्षी आपुले मांसगोळ । ते गति होय मजप्रती ॥ ३७ ॥
एक्या दर्शना वांचून । कांहींच न बोले मी वचन ।
सर्व आशा परिपूर्ण । झाली आहे गुरुकृपें ॥ ३८ ॥
ऐसें बोलतां नेमोत्तर । दिनयामिनी गेली समग्र ।
अवघें रात्र केला जागर । डुकली आली शेवटीं ॥ ३९ ॥
तंव एक येवोनि ब्राह्मण । खडावांचा जोड देऊन ।
ह्मणे तूं जाईरे एथून । बसूं नको सर्वथा ॥ ४० ॥
जागृत होवोनिया पाहे । तंव ब्राह्मणाचा न दिसे ठाय ।
खडावांचा जोड आहे । सव्यभागीं ठेविला ॥ ४१ ॥
मग त्या खडावांसि वंदून । हृदयाप्रती लाविल्या जाण ।
मानुनिया शुभशकुन । स्वस्थ होता जहालों ॥ ४२ ॥
असो निघोनि गेले दिनत्रय । होता झाला सूर्योदय ।
होता तितका उपाय । करोनिया पाहिला ॥ ४३ ॥
आला शेवटील दिन । देह करावयाचा अर्पण ।
तंव जहाली आठवण । रघुनाथ गुरुपायांची ॥ ४४ ॥
हे सद्गुरुराया समर्था । कृपा असूं द्यावी आतां ।
तुमचे उपकार उत्तीर्णता । झालों नाहीं मी कांहीं ॥ ४५ ॥
जेव्हां आपुले चरण सुटले । तेव्हांचि माझे तीळ तुटले ।
पर्वतांतरीं मरण आलें । दैवयोगें कडेनि ॥ ४६ ॥
आतां एथोनि नमस्कार । तुम्हासि करितों साचार ।
कृपा मज दीनावर । असें द्यावी स्वामिया ॥ ४७ ॥
ऐसें मुखानें बोलून । करिता झालों मोठें रुदन ।
त्या शोकासी माझियान । न लिहवे या ग्रंथीं ॥ ४८ ॥
अंगिरा नाम संवत्सर । भाद्रपद कृष्णपक्ष साचार ।
एकादशी सोमवासर । घटिका एक दिन आला ॥ ४९ ॥
उपवासें देह झाला क्षीण । नाहीं उठावया अवसान ।
तैसाचि आवांका धरून । चंडपाषाण आणिला ॥ ५० ॥

ठेवोनि पादुकां शेजारी । जे कां ध्यान मस्तकावरी ।
लक्षीत होतों रोमरंध्रीं । ते मूर्ति खालीं उतरली ॥ ५१ ॥
योजुनि त्या पाषाणावरी । मानसपूजा केली बरी ।
सर्व साहित्य षोडशोपचारीं । यथासांग सर्वही ॥ ५२ ॥
घालोनिया मंगळस्नान । लेवविलें दिव्य वसन ।
नैवेद्य तांबूल आदिकरून । यथोक्त पूजा सारिली ॥ ५३ ॥
मग स्तुति आरंभिली बहुत । हे देवाधिदेव भगवंत ।
दयार्णव तूं कृपावंत । ह्मणोनि होतें ऐकिलें ॥ ५४ ॥
ते हे तुझी थोरी । सुखें असो तुझे घरीं ॥
आह्मां कासिया वाईटबरी । दाखविसी कृपाळा ॥ ५५ ॥
दत्तात्रय स्मरत्रगामिनी । ते आजि झाली मिथ्या वाणी ।
सत्य सांडिलें थोरांनीं । परि धाकट्यांनीं सांडू नये ॥ ५६ ॥
इंद्रायणीचें सोडोनि पाणी । देह केला तव अर्पणीं ।
ते हे सर्व भाक आजी पुरवूनि । घेई नवस आपुला ॥ ५७ ॥
ऐसें करोनिया स्तवन । सर्वेचि केलें आत्मचिंतन ।
सर्वसाक्षी मी परिपूर्ण । अजरामर असे मी ॥ ५८ ॥
एकाग्र स्वरूपीं लीन । होवोनि स्थिर केलें मन ।
हर्षशोकातें सोडून । निश्चलपण धरियेलें ॥ ५९ ॥
सवेंचि मेटाकुटी येऊन । उभय हस्तातें टेकून ।
मस्तक पाषाणीं तुकावून । उचलिलें मागुतीं ॥ ६० ॥
जैसें श्रीफळ देवाप्रती । नवस करूनि फोडिती ।
शकलें वेगळालीं होतीं । क्षण एक न लागतां ॥ ६१ ॥
तया परी मस्तक उचलून । पाषाणावरी मारिलें जाण ।
भडभडा रुधिर आंतून । यावयासी लागलें ॥ ६२ ॥
सवेंचि त्यापरी दुसऱ्यानें । ताडिता झालों बहु सत्राणें ।
तंव मस्तक होवोनि छिन्नभिन्न । अचेतन पडियेलों ॥ ६३ ॥
निघोनि गेले सर्वप्राण । नाहीं कांहीं देहभान ।
कोठें पडलों हा ठिकाण । कांहींएक स्मरेना ॥ ६४ ॥
तों इतक्यांत श्रीदत्तात्रय । षड्भुज मूर्ती सावयव ।
ध्यान केलें होतें बरवें । तयापरी प्रगटलें ॥ ६५ ॥

स्व-कमंडलूचें पाणी । घालते झाले माझे वदनीं ।
मस्तकावरि कर ठेवोनि । वरदवाणी बोलती ॥ ६६ ॥
सावध होई रे निरंजन । मज पाहे नेत्र उघडोन ।
तुज द्यावयासि दर्शन । दत्तात्रय मी आलों ॥ ६७ ॥
मग म्यां नेत्रानें उघडून । पहाता झालों सुहास्यवदन ।
षड्भुज मूर्ती सगुण । तेजायमान देखिली ॥ ६८ ॥
तंव ते स्वामी दिगंबर । बोलते झाले मधुरोत्तर ।
अरे उदार होउनी देहावर । इतुका निग्रह कां केला ॥ ६९ ॥
जें जें तुवां मनीं इच्छिलें । तें तें तुजला प्राप्त झालें ।
कवित्वहि वदता आलें । ज्ञानानुभव घेऊनि ॥ ७० ॥
आतां हि माझा घेई वर । कवित्व वदसी अतिसुंदर ।
ज्ञान हो कां वृद्धिकर । आशीर्वादें माझिया ॥ ७१ ॥
करुनिया परोपकार । करशील जनाचा उद्धार ।
हाचि माझा तूतें वर । सफळ होवो सर्वदा ॥ ७२ ॥
खडावा आणि वस्त्रे दोन्ही । त्यांसी संरक्षी जीवाहुनी ।
ते समजोनि माझे ठिकाणीं । जतन करी सर्वदा ॥ ७३ ॥
मी सर्व व्यापकपण । असे तुझे हृदयीं वसून ।
मजवेगळा ठिकाण । नाहीं कोठें रिकामा ॥ ७४ ॥
क्षणेक होतों मी सगुण । परि अक्षयीपणें निर्गुण ।
माझें सत्यस्वरूप जाण । निराकार सर्वही ॥ ७५ ॥
सगुणरूपाचा विचार । अवघा मायिक हा प्रकार ।
ओडंबरी हे साचार । ज्ञानियासि समजली ॥ ७६ ॥
एक्या ज्ञानिया वांचून । दुजासी ठाऊकी नसे खूण ।
माझ्या शुद्धस्वरूपालागून । ज्ञानी मात्र जाणती ॥ ७७ ॥
अरे तुज मज नाहीं भेद । स्वरूपीं पाहे रे निर्द्वंद्व ।
सांडोनिया द्वैतभेद । देव-मानवीपणाचा ॥ ७८ ॥
कोणीं कोणासि रे भेटावें । दिसतें तें मायिक सर्व ।
तुज ज्ञान आहे बरवें । त्या दृष्टीनें पाहे पां ॥ ७९ ॥
जें कां माझें गूढज्ञान । तें तुज कथिलें रघुनाथानें ।
दुसरें नाहीं तयाविण । सत्य सत्य त्रिवाचा ॥ ८० ॥

मानवी न ह्मणे तो रघुनाथ । जांणें देवादिकांचा गुह्यार्थ ।
हें जाणोनियां म्यां तूतें । पूर्वी दावोनि दीधलें ॥ ८१ ॥
आतां पाहे ज्ञानदृष्टीकरून । सर्वव्यापक मी परिपूर्ण ।
हें ब्रह्मांड पोटीं घेऊन । विसाळरूप धरी कां ॥ ८२ ॥
ऐसें स्वामींचें उत्तर । ऐकोनिया बहु सुंदर ।
वृत्ति केली तदाकार । ज्ञानदृष्टी करोनि ॥ ८३ ॥
तंव पाहतां पहाणें हारपलें । वस्तुपण मजचि आलें ।
देहभान सर्वहि गेलें । मुद्रा उन्मनी लागली ॥ ८४ ॥
ऐसें होतांचि सत्वर । गुप्त झाले दिगंबर ।
मग मी येवोनि देहावर । नेत्र उघडोनि पाहिलें ॥ ८५ ॥
असो अनुभवावृत्ति कडोनि । वियोग कांहीं न वाटे मनीं ॥
आनंदसिंधु उचंबळोनि । तृप्त होता जहालों ॥ ८६ ॥
अनेक जन्मांचें सुकृत । ह्मणोनि भेटले श्रीगुरुदत्त ।
दर्शन झालेंसे साक्षात । तया जगद्गुरूचें ॥ ८७ ॥
असो ज्या शिळेवरी मस्तक ताडिलें । तिचे दोन तुकडे झाले ।
मग उचलोनि टाकिले । पादुकांहूनि दूरवरी ॥ ८८ ॥
झालीं होतीं दोन शकलें । कपाळ पहिल्यासारिखें झालें ।
तीं जडोनिया गेलीं । जोडफळा सारिखीं ॥ ८९ ॥
कपाळ फुटलियाची खूण । कपाळीं शोभे सुलक्षण ।
केशापर्यंत भोवयाहून । असे वण सूक्ष्मत्वें ॥ ९० ॥
असो रुधिर जेथें झालें पतन । तो कोरडा झाला ठिकाण ।
आरक्तता गेली निघून । पूर्ववत स्थळ झालें ॥ ९१ ॥
मग तया ठायीं बैसून । बोलता झालों प्रेमळवचन ।
दत्तात्रयातें आठवून । स्तुति करिता जहालों ॥९२ ॥
हे हे स्वामिदिगंबरा । दत्तात्रया पूर्णावतारा ।
दीनबंधु करुणाकरा । धन्य धन्य तूं एक ॥ ९३ ॥
हे सर्वेश्वरा सर्वातीता । सर्वव्यापका सर्वगता ।
हे दीनबंधू अवधूता । कृपा आतां करावी ॥ ९४ ॥
आपुला नेणोनि अधिकार । मी बोललों जें जें उत्तर ।
ते क्षमा करोनि दासावर । कृपा कीजे स्वामिया ॥ ९५ ॥

दर्शनाची आशा धरून । बोलिलों मी कठिणवचन ।
जैसें वत्स क्षुधित होऊन । गोस्तनासी करांडी ॥९६ ॥
तयापरि जी स्वामीराया । बोलिलों मी कुशब्द वायां ।
ते कृपा करोनिया सखया । क्षमा केली पाहिजे ॥ ९७ ॥
अधमाचीं वचनें ऐकतां । थोर क्रोध न आणिती चित्ता ।
कां अंतर्यामीं सदयता । बहुत असती ह्मणोनी ॥ ९८ ॥
तैसे स्वामी दयाळ पूर्ण । अंतरीं न आणावें माझें वचन ।
करोनि कृपेचें पोषण । सर्व पोटीं घालावें ॥ ९९ ॥
ऐसें करोनिया स्तवन । बैसता झालों निवांतपण ।
तंव झालीसे आठवण । रघुनाथ गुरुचरणाची ॥ १०० ॥
धन्य धन्य हो रघुराव । पुरविली माझी सर्व हांव ।
न भेटता सगुण देव । तरी आशा पोटीं रहाती ॥ १०१ ॥
होवोनिया ब्रह्मज्ञान । हा हेतु पोटीं रहाता जाण ।
तरि मग जन्मासि कारण । होतें मज पुनरपि ॥ १०२ ॥
चांग सद्गुरु समर्थ मिळाले । ह्मणवुनिया बरवें जालें ।
सगुण निर्गुण दावुनि वहिलें । अद्वैत केलें निजरूपीं ॥ १०३ ॥
ह्मणवोनी निश्चयेंसि बरवा । आश्रयो थोरांचाचि करावा ।
तयायोगें कैवल्यठेवा । निजहातासि चढतसे ॥ १०४ ॥
सद्गुरु असलिया समर्थ । शेष अंतरीचे मनोरथ ।
पुरवोनिया सन्मार्गपथ । लावोनिया देतसे ॥ १०५ ॥
जैशी श्रीमंताची सुंदरी । प्रथम झाली गरोदरी ।
सहजीं डोहाळे अंतरीं । होते झाले तियेच्या ॥ १०६ ॥
उंची मोतियांचा चुना । लावोनि खावा उदंड पर्णा ।
श्रीमंतें ऐकोनी घेतां श्रवणा । मनोरथ पूर्ण करितसे ॥ १०७ ॥
तैसा गुरु समर्थ मिळाला । ह्मणोनि मनोरथ पूर्ण झाला ।
द्वैतभावा झाडा केला । देव दाविला निजदेहीं ॥ १०८ ॥
जो अलक्ष लक्षातें दाविता । त्या सगुण दावितां कायसी चिंता ।
मानवासि जो देव कर्ता । त्या देव दावितां श्रम कैचे ॥ १०९ ॥
जैसें राजियानें आपुले । दरिद्रियासी राज्यीं स्थापिलें ।
त्या भिकारपणाचे डोहीळे झाले । चणे खावे ह्मणोनिया ॥ ११० ॥

त्याचे मनोरथ पुरवावयासी । दुर्घट काय त्या राजियासी ।
तैसें सगुण दाखवावयासी । गुरुंत श्रम न पडती ॥ १११ ॥
जरि गुरु मिळता असमर्थ । तरी न पुरते मनींचे मनोरथ ।
सगुण निर्गुण न होतें प्राप्त । नरदेह व्यर्थ जाता हा ॥ ११२ ॥
जैसी दरिद्रियाची अंगना । डोहोळा इच्छी मौक्तिकचुना ।
तो पुरवावयासि जाणा । पति समर्थ नसेचि ॥ ११३ ॥
तैसा जयाचा गुरु काबाडी । त्याची दैना कोण फेडी ।
जन्ममृत्यूची हे बेडी । न तुटेची सर्वथा ॥ ११४ ॥
तैसा नोहे माझा गुरू । जो इच्छा पुरविता कल्पतरू ।
सगुण रूप दिगंबरु । दाउनि रूपीं स्थिर केलें ॥११५॥
झालें श्रीदत्तदर्शन । आनंदयुक्त झालें मन ।
पूर्णपदप्राप्ती जाण । गुरुकृपें जहाली ॥ ११६ ॥
रघुनाथ-चरण-कमळावर । निरंजन होवोनी भ्रमर ।
सदा चित्स्वरूपीं निर्भर । रुंझी करी पूर्णत्वें ॥११७॥
श्रोते ऐकिजे माझें वचन । रघुनाथ गुरूचें महिमान ।
पुढील अध्यायीं रसाळ गहन । तें निजभावें परिसिजे ॥११८॥
इतिश्री साक्षात्कार ग्रंथ । संमत सद्गुरु रघुनाथ ।
दत्तात्रय मूर्तिमंत । गुरुकृपें भेटले ॥११९॥

॥ श्री दिगंबरार्पणमस्तु ॥

---

## अध्याय सातवा.

श्रीमन्माहुरगडनिवासायनमः । जयजयाजी गुरुराया । रघुनाथस्वामी प्रतापवीर्या ।
कृपासिंधु करुणालया । धन्यधन्य तूं एक ॥१॥
तुझेनि देवासि देवपण । तुझेनि मायेसि चळणवळण ।
स्थावर जंगम आदि करून । तुझे रूपीं रहाती ॥२॥
तुझिये रूपाचा अंतपार । पाहतां शिणला चतुर्वक्त्र ।
तवगुण वर्णितां फणिवर । सहस्रमुखें शिणला ॥३॥

चारी वदती नेति नेति । साहींस न पवे तुझी स्थिती ।
कुंठित जाहलीसे मती । अठरांची वर्णितां ॥४॥
तूं अक्षयी आणि निर्विकार । क्षणेक होसी तूं साकार ।
दत्तात्रयादि चोवीस वार । घेसी अवतार स्वइच्छे ॥५॥
क्षणेक मानवी वेष धरून । जडमूढां करिसी उद्धरण ।
तोडोनिया मायाबंधन । मुक्त करिसी संसारीं ॥६॥
आतां श्रोतें होइजे सादर । चित्त करोनिया उदार ।
मागें बोलिलों कथासार । दत्तात्रय भेटले ती ॥७॥
एकाकार वृत्ति होऊन । खालीं उतरलों पर्वताहून ।
गोसावी यासी वर्तमान । झालें तितकें कथियेलें ॥ ८ ॥
ते म्हणती आम्ही एथ बसून । बहुत केलें तपालागून ।
आम्हांसी न झालें दर्शन । तुज कैचें होयासि ॥ ९ ॥
यद्यपि तुज झालें दर्शन । तरि काय सिद्धी घेतली मागून ।
त्याची दाखवावी खूण । आम्हांलागीं ये काळीं ॥ १० ॥
तयासी वदलों मी उत्तर । निरामय तो दिगंबर ।
त्याजसी मायिक व्यवहार । बोलूं नये सर्वथा ॥ ११ ॥
सिद्धि सामर्थ्य आणि धन । आयुष्यातें बहु मागण ।
हें तों अवघें मायिक जाण । मागूं नये सर्वथा ॥ १२ ॥
श्रीहरिगुणाचें वर्णन । सर्वांभूतीं एक पाहण ।
हेंचि मागोनी मागण । घेतलें म्या देवासी ॥ १३ ॥
सद्गुरुनें कृपा करून । कवित्ववाणी दिधली जाण ।
आत्मज्ञानहि पूर्णपणें । पूर्वींच मज दीधलें ॥ १४ ॥
आतां दत्तात्रय भेटून । आणखी दिधलें वरदान ।
कवित्ववाणी ब्रह्मज्ञान । वृद्धिकर होऊं का ॥ १५ ॥
इतुकेंचि पुरे मजलागून । बहुत कासयासी मागण ।
वरकड प्राप्त दैवें करून । होईल तें तें होवो सुखें ॥ १६ ॥
दत्तात्रयाचें प्रसादवसन । पादुका द्वयातें काढून ।
दाखविता झालों जाण । तया तपेश्वरासी ॥ १७ ॥
तयांनीं ते खूण पाहून । ह्मणतां रे तूं धन्य धन्य ।
श्रीगुरुप्रसाद पावून । कृपापात्र जाहलासी ॥ १८ ॥

असो तयासी नमून । निघता झालों मी तेथून ।
कमंडलू तीर्थ करुनि स्नान । फळें भक्षण पैं केलीं ॥ १९ ॥
रघुनाथगुरुचरण-स्मरण । करुनि केलेंसे प्रयाण ।
वाटे जाऊं काय उडून । पर लावुनि ये काळीं ॥ २० ॥
केव्हां पाहीन त्यांचे चरण । जो आनंदसिंधु करुणाघन ।
सर्वभूतीं कृपा समान । करित असे सर्वदा ॥ २१ ॥
जो सर्वयोगी यांचा राव । जगद्गुरु श्रीदत्तात्रय ।
तोहि जयाचे गुण गाय । धन्य धन्य ह्मणवोनि ॥ २२ ॥
तेथें मानवीं बापुडीं । शरण रिघती तातडी ।
स्तुति करिती लवडसवडी । नवल काय तयाचें ॥ २३ ॥
जो ब्रह्माचा आजा झाला । सर्वांतरीसे व्यापला ।
इंद्रहि जरि त्या शरण आला । नवल काय तयाचें ॥ २४ ॥
ऐसा माझा गुरुराय । केव्हां पाहीन त्याचे पाय ।
मग अंतरीं सुचला उपाय । त्वरित जाणें होईसा ॥ २५ ॥
तेथूनि उत्तम स्थळ पवित्र । अष्ट योजनें प्रभासक्षेत्र ।
समुद्रतटाकीं स्वतंत्र । ऐलतीरीं आहे पां ॥ २६ ॥
तेथवरी पायीं चालून । बैसावें वाहनीं जाऊन ।
होईल तिसरे दिनीं जाण । आपुलिया देशासी ॥ २७ ॥
सवेंचि सद्गुरुचे चरण । दृष्टीसी पडतील जाण ।
ऐसा निश्चय ठरावून । निघता झालों तेथुनी ॥ २८ ॥
घेतलें तुळशीशाम-दर्शन । जे कां द्वारका पुरातन ।
वृंदेचे वियोगें करून । भगवान तेथ लोळले ॥ २९ ॥
हें रुक्मिणीनें पाहून । बहुत झाली क्रोधायमान ।
मग तेथूनिया रुसून । पर्वतावरी बैसली ॥ ३० ॥
न्हात असतां गेली उठून । ह्मणवोनिया पाणी ऊन ऊन ।
सात कुंडें उदक भरोन । अद्यापि असती ते स्थानीं ॥ ३१ ॥
वृंदेच्या स्मशानीं वहिली । तुळशी तेथें निर्माण झाली ।
तुळशी-शाम ऐसी बोली । तैंपासुनी बोलती ॥ ३२ ॥
घेऊनि विष्णूचें दर्शन । तप्तकुंडीं केलें स्नान ।
रखुमादेवीसी वंदून । निघता झालों सत्वरीं ॥ ३३ ॥

सौराष्ट्रदेश अवलोकून । झालें प्रभासासी येण ।
सोमनाथलिंग प्राचीन । दृष्टीलागीं पाहिलें ॥ ३४ ॥
त्रिवेणीचें केलें स्नान । श्रीकृष्ण झाले जेथ निधन ।
देह ठेविला तो ठिकाण । दृष्टीलागीं पाहिला ॥ ३५ ॥
सरस्वतीनें आपण । वडवाग्नी मुखीं धरून ।
सागरीं दिधला सोडून । तें अग्निकुंड पाहिलें ॥ ३६ ॥
यादव समग्र मिळून । पाळीचें शस्त्र करून ।
परस्परें पावलें निधन । तेंहि ठिकाण पाहिलें ॥ ३७ ॥
सर्वेचि सोमनाथ-दर्शन । घेऊनि सारिलें भोजन ।
जहाजीं बैसता झालों जाण । समुद्रामाजी जाऊनी ॥ ३८ ॥
तंव त्या जहाजवाल्यांनीं । माल भरला तिये ठिकाणीं ।
मनुष्य पुष्कळ बैसवोनि । वोझें बहुत पैं केलें ॥ ३९ ॥
वारे हळुचसे सुटले । ह्मणोनि जहाजातें लोटिलें ।
बंदरापासुनिया गेलें । योजन तेरा पर्यंत ॥ ४० ॥
वायू नाहीं ऐसा झाला । जहाजास भार बहुत केला ।
प्रळयकाळ उभा ठेला । अकस्मात ते काळीं ॥ ४१ ॥
जहाज डगमगुनि वहिलें । सर्व बुडावयासि लागलें ।
शंखध्वनि करिती आवले । बुडालें बुडालें ह्मणवूनि ॥ ४२ ॥
रात्र झाली दोनप्रहर । निबिड पडलासे अंधार ।
झाला एकचि हाहाःकार । रांडा पोर आरडती ॥ ४३ ॥
मी उभा ठाकोनि तये वेळीं । दिधली मोठियानें आरोळी ।
धावे धावे हो या काळीं । गुरूरघुनाथ स्वामीया ॥ ४४ ॥
तुवां भवसिंधूमाजी तारिलें । एथें दुसरें विघ्न आलें ।
तुज वाचुनिया वहिलें । कोणा आतां आठवूं ॥ ४५ ॥
सर्व दैवतें सोडून । जोडिले गुरु तुमचे चरण ।
आतां तुह्मांविण धावण । कोणासी धावा ह्मणावें ॥ ४६ ॥
मी भीत नाहीं आपुल्या मरणा । परि इच्छा राहिली आहे जाण।
एकवेळा स्वामीचरणा । येवोनिया पहावें ॥ ४७ ॥
आतां लाविसी उशीर । तरी बुडालों आह्मीं समग्र ।
धावे धावे हो सत्वर । वायुरूपें करोनि ॥ ४८ ॥

ऐसें ह्मणोनि आक्रंदत । तंव एकाएकी अकस्मात ।
सुटला झुंजात मारुत । जहाज चाली लागलें ॥ ४९ ॥
तेव्हां बहुत आनंद झाला । सर्वांलागीं प्राण आला ।
गजेंद्राच्या आकांताला । श्रीहरी जेवि पावले ॥ ५० ॥
तयापरी रघुनाथ गुरू । धावण्या धावले सत्वरू ।
तारुनिया पैलतीरु । पाववीलें सत्वरीं ॥ ५१ ॥
धन्य धन्य हो गुरुराय । उतराई मी होऊं काय ।
मजसि तारक तुझे पाय । सर्वांपरी जहाले ॥ ५२ ॥
असो एक्या प्रहरामाझारी । जहाज लागलें येवोनि तीरीं ।
मुंबादेवीचिये क्षेत्रीं । येवोनिया राहिलों ॥ ५३ ॥
तेथुनि तिसरिये दिवशीं । येता झालों नाशकासी ।
येवोनिया मठापाशीं । सद्‌गुरुचरण पाहिले ॥ ५४ ॥
करोनिया साष्टांगनमन । उभा ठेलों हात जोडून ।
सप्रेमे भरोनिया नयन । कंठ दाटोनि पैं आला ॥ ५५ ॥
झाला बहुतचि आनंद । उचंबळला ब्रह्मानंद ।
सांडोनिया सर्व खेद । सुखरूप जहालों ॥ ५६ ॥
वाटे आजि उगवला सुदिन । पाहिले सद्‌गुरुचे चरण ।
आंगींचा सर्व गेला शीण । पायीं लीन होतांची ॥ ५७ ॥
सद्‌गुरु देउनि आशीर्वचन । बोलते झाले हास्यवदन ।
कार्य तुमचें परिपूर्ण । झालें काय सर्वही ॥ ५८ ॥
सांगितलें त्याप्रमाण । केलें होतें कीं साधन ।
श्रीदत्ताचें दर्शन । प्रत्यक्षपणें झालें कीं ॥ ५९ ॥
ऐसें बोलतां गुरुमूर्ती । मी वदता झालों तयाप्रती ।
स्वामीप्रसादाचीं ख्याती । सर्व झाली सफळता ॥ ६० ॥
मग श्रीदत्ताचें प्रसादवसन । दुजा पादुकांचा जोड जाण ।
जो गिरनारीं दिधला दिगंबरान । तो स्वामीपाशीं ठेविला ॥६१॥
मग मी बोलता झालों वचन । स्वामी आशीर्वादाचें देण ।
त्याचें मुखानें महिमान । न सांगवे मजप्रती ॥६२॥
आज्ञा होईल तरी जाण । करोनी ग्रंथाचें लखन ।
पायाप्रती निवेदन । वर्तमान करीन मी ॥६३॥

सद्गुरु तथास्तु म्हणून । आज्ञा देती मजलागून ।
करावें ग्रंथाचें लेखन । साक्षात्कार या नामें ॥६४॥
तो हा ग्रंथ वरदी जाण । केले सात अध्याय लेखन ।
जैसे सप्त समुद्र परिपूर्ण । ब्रह्मरसें भरियेले ॥ ६५ ॥
किंवा हे सप्तद्वीपें विशाळ । त्यावरि गुरुपादुका सुढाळ ।
कथाभाग अतिसोज्वळ । विराजमान शोभले ॥ ६६ ॥
किंवा ह्या सप्तपुऱ्या संपूर्ण । तेथें सद्गुरु दैवत आपण ।
कथाभाग हे तीर्थाटन । श्रवणद्वारें करावी ॥ ६७ ॥
श्रोते होऊनि सावधान । करावें ययाचें मनन ।
जयासि आवडेल त्यानें । साधन ऐसें करावें ॥ ६८ ॥
सर्व प्राप्तीसी कारण । मुख्य सद्गुरुचे चरण ।
सगुण अथवा निर्गुण । रूप प्राप्ती व्हावया ॥ ६९ ॥
असो जो असेल अंतर्भूत । त्यानें पाहुनि गुरुसमर्थ ।
तयासी जावें शरणागत । आपुलें काज साधावया ॥ ७० ॥
शके सत्राशें चवतिशीं । अंगिरा नाम संवत्सरासी ।
कार्तिक शुद्ध एकादशी । भानुवासर ते दिनीं ॥ ७१ ॥
गंगेचे तटाकीं जाण । सद्गुरु सांनिध्य बैसून ।
करूनिया आत्मचिंतन । ग्रंथ समाप्ति पैं केली ॥ ७२ ॥
दाखवोनि रूप सगुण । केला संशय निरसन ।
सर्वांभूतीं एकपण । अनुभवासी आणिलें ॥ ७३ ॥
ह्मणोनिया ग्रंथालागून । साक्षात्कार नामाभिधान ।
गुरूनें उपवनीं बैसून । स्वइच्छेनें ठेविलें ॥ ७४ ॥
आउट हाताचें रम्यस्थान । तेचिं सुंदर आनंदवन ।
षड् चक्राचे बहु सघन । वृक्ष तेथें लागले ॥ ७५ ॥
घंटारवादि समग्र । दशनाद उठती वारंवार ।
तेचि कोकिळा सुस्वर । गायन करिती स्वच्छंदें ॥ ७६ ॥
हंसपक्षी तेजाकार । उंची बैसोनि वृक्षावर ।
सोहंभावाचा हुंकार । देवोनि सुखें डोलती ॥ ७७॥
सत्रावीचिये सरोवरीं । रघुनाथ पदकमळें साजिरीं ।
सुंदरसहस्त्र पत्राकारीं । स्वयंप्रकाश विकसलीं ॥ ७८ ॥

तेथें निरंजनरूपें भ्रमर । अनुभवआमोद वारंवार ।
सेवोनिया निरंतर । रुंझी करी पूर्णत्वें ॥ ७९ ॥
रघुनाथ आदि अंतीं जाण । रघुनाथ ग्रंथासी कारण ।
मृदंगरूपी निरंजन । वाजविला तयांनीं ॥ ८० ॥

॥ श्री दिगंबरार्पणमस्तु ॥

श्रीराम

# निरंजन स्वामीकृत श्रीरघुनाथ चरित्र.



## ओव्या.



श्रीमत् गोदातीर निवासिया । आनंद कंदा श्रीरघुराया ।
कृपासिंधु करुणालया । सद्गुरुराया करुणाब्धि ॥ १ ॥
तूं सर्वांचा आदिपुरुष । तूं सर्व जीवांचा ईश ।
नटनाट्य मायावेश । धरोनिया खेळसी ॥ २ ॥
श्रोते होइजे सावधान । ऐकिजे ब्रह्मनिष्ठाचे गुण ।
कलिमाजी रघुनंदन । स्वामी माझा अवतरला ॥ ३ ॥
पूर्वी कृतायुगीं जाण । रेवातीर रम्यस्थान ।
पाहुनि भृगुऋषि आपण । अनुष्ठाना बैसले ॥ ४ ॥
लावुनि मुद्रा खेचरी । समाधि केली बहुकाळ वरी ।
तिन्ही युगें गेलीं परी । ठाउकें नाहीं जयातें ॥ ५ ॥
कलियुगहि जालें प्राप्त । संवत्सर लोटले बहुत ।
तंव मुनी वृत्तीवरी अकस्मात । येवोनि मुद्रा उतरली ॥ ६ ॥
शिष्यालागीं हाक मारून । पुसते झाले वर्तमान ।
हें युग चालले कवण । मजलागीं सांगावें ॥ ७ ॥
तंव शिष्य करिती विनवणी । स्वामीराया ! ऐकिजे श्रवणीं ॥
कृतत्रेतद्वापार जाउनी । कलियुग प्राप्त जहालें ॥ ८ ॥
जाहला श्रीरामावतार । दुसरा गेला कृष्णावतार ।
सांप्रत बौद्ध अवतार । कलिमाजी अवतरला ॥ ९
रेवा तीरीं मुनीश्वर । रहात होते थोर थोर ।
गोदामहात्म्य ऐकोनि शुभकर । गंगातीरासीं पैं गेले ॥ १० ॥
मातेच्या वचनातें ऐकून । श्रीराम दशरथी आपण ।
चतुर्दश वर्षेपर्यंत जाण । गंगातटीं राहिले ॥ ११ ॥

रावण कुंभकर्णातें वधून । सोडविले त्रिदशगण ।
मुनिवृंदातें गौरवून । अयोध्येसी पैं मेळे ॥ १२ ॥
मुनिवृंद बहुकाळ वरि । वास करोनी सहपरिवारीं ।
कलीचिया प्रथम प्रहरीं । जाते झाले हिमनगा ॥ १३ ॥
ऐसें भृगुऋषी लागून । शिष्य सांगती वर्तमान ।
व्यासें गोदेचें महिमान । वर्णिलें तेंहि कथियेलें ॥ १४ ॥
सर्व तीर्थामाजी श्रेष्ठ । गोदामाहात्म्य अतिवरिष्ठ ।
हे बादरायणवाणी स्पष्ट । वदती जाली भारती ॥ १५ ॥
तंव बोलता जाला मुनिराणा । आपणही जाऊं गंगास्नाना ।
वास करूं तया स्थाना । कांहीं काळ पर्यंत ॥ १६ ॥
परि कलिराजा अतिदुष्ट । त्याची प्रजाही तैशीच नष्ट ।
आह्मांसी पाहुनि बहुकष्ट । देतील येऊनी सर्वदा ॥ १७ ॥
आतां एक करूं या उपाय । जेणें कवणासी ठाऊकें न होय ।
वेष पालटोनिया लवलाहे । दक्षिण देशीं जन्मावें ॥ १८ ॥
जन्मउनिया मातापितर । ह्मणती आमचे हे कुमर ।
लोक ह्मणती हे आमुचे मित्र । आह्मां सारिखे दिसती ॥ १९ ॥
कोणी ब्रह्मचर्यत्वें असावें । कोणी गृहस्थाश्रम आचरावे ।
संसार करोनिया बरवे । जग भुलवावें सर्वही ॥ २० ॥
ब्राह्मण कुळीं अतिउत्तम । तुह्मालागीं होतील जन्म ।
कृष्ण गंगेचिये मध्यम । स्थळामाजी सर्वस्वी ॥ २१ ॥
पूर्व जन्मांतरीचें स्मरण । राहाणार नाहीं जाण ।
विषयभोगीं भुलून । जाल तुह्मी सर्वही ॥ २२ ॥
लोक ह्मणतील तुह्मांसी पापी । तुह्मी तयावरी भराल कोपी ।
द्वेषनिंदेची खटाटोपी । बळेंचि आंगीं आणाल ॥ २३ ॥
ऐसे परि श्रीगुरुवचन । ऐकोनि शिष्य खेदसंपन्न ।
देते झाले प्रतिवचन । मुनिलागीं तेधवा ॥ २४ ॥
नलगे आह्मांतें गंगास्नान । नलगे गर्भवासा जाण ।
नलगे कलिमाजी अवतरण । आह्मालागीं सर्वथा ॥ २५ ॥
नलगे स्वरूपाचें विस्मरण । नलगे जगा सारिखें आचरण ।
तुमचे चरणकमळ सोडून । जाणें नलगे सर्वथा ॥ २६ ॥

नलगे हर्षशोकाचें वेष्टन । नको मोहाचें बंधन ।
पुत्र मित्र दारा धन । दुःखप्रद नको ते ॥ २७ ॥
एकदा मुक्त जालियावरि । मागती कां पडावें बंधारीं ।
गर्भवास निबिड अंधारीं । कासिया लागीं सोसावी ॥ २८ ॥
ऐसे शिष्याचे वचना । ऐकूनि बोले गुरुराणा ।
ह्मणती संपादुनिया ज्ञाना । विचार नाहीं तुम्हांसी ॥ २९ ॥
अरे तुह्मी सर्वदा मुक्त । देही असोनी देहातीत ।
अखंडैकरसभरित । तुह्मी असां सर्वही ॥ ३० ॥
कुलाळें मृद्घट केलें । तयामाजी नभ संचलें ।
परि तें नाहीं गुंतलें । कदाकाळीं सर्वथा ॥ ३१ ॥
आणि कुलाळें घट अपरिमित । घडियले जरी अनेकजात ।
तयामाजी आकाश भीत । नाहीं कदा पुत्र हो ॥ ३२ ॥
गंगेचा प्रवाह चालिला । तया वरुते बुद्बुद उठला ।
गंगा आधारभूत त्याजला । होवोनिया जातसे ॥ ३३ ॥
दुसरीयानें जरी बुद्बुद निघे । तयासी ते काय ह्मणे नेघे ।
जेव्हां तेव्हां तयासंगें । आधाररूपें जातसें ॥ ३४ ॥
परि तियेसी होणें जाणें । कदापि नाहीं वेगळेपण ।
तैसे तुह्मांसी जन्ममरणं । नाहीं नाहीं निजरूपें ॥ ३५ ॥
ऐसें ऐकोनि स्वामीवचन । शिष्य डोलविती मान ।
ह्मणती गुरु–आज्ञा प्रमाण । आह्मालागीं सर्वदा ॥ ३६ ॥
परी स्वामीप्रति एक विनवणी । आह्मी जन्मूं जये स्थानीं ।
तेथें मोहपाश येवोनि । आह्मालागी कर्षतील ॥ ३७ ॥
तेथें पश्चात्ताप होऊन । व्हावें स्वामीचरणदर्शन ।
निजस्वरूपाची आठवण । देवोनि मुक्त करावें ॥ ३८ ॥
तंव स्वामी देती आशीर्वचन । तुमच्या सद्बुद्धी होऊन ।
गंगातटीं ममस्थान । शोधित तुह्मी याल पैं ॥ ३९ ॥
मग मी निजतत्वातें बोधून । करीन तुमचा शोक हरण ।
मग सुखस्वानंदें करून । विदेहपणें वसाल तुह्मी ॥ ४० ॥
कराल जगाचे उद्धार । कीर्ती विख्यात होईल फार ।
कोणी वसवोनी गंगातीर । योगसमाधी कराल पैं ॥ ४१ ॥

कोणी वेदांत व्याख्यान । सांगोनि जग कराल पावन ।
कोणी कवित्व रचून । नूतन ग्रंथ कराल पैं ॥ ४२ ॥
कोणी वैराग्य कडकडाट । कोणी ज्ञानचर्चा घडघडाट ।
कोणी धर्मदानादि विख्यात । कीर्ती प्रगट कराल पैं ॥ ४३ ॥
नवविध भक्तिलक्षण । कोणी जप तप साधन ।
गुप्त आणि प्रगटपण । करोनिया रहाल पैं ॥४४॥
ऐसें ऐकोनि आशीर्वचन । शिष्य जयजयकारें गर्जून ॥
करिते झाले साष्टांग नमन । तया भृगूऋषींसी ॥४५॥
सर्व शिष्यांनीं मिळून । रेवातीरीं उत्तम स्थान ।
पाहूनिया रम्य उपवन । मठिका करिते जाहले ॥४६॥
मध्यभागीं भृगुमुनी । प्रगट राहिले तये स्थानीं ।
त्या स्थानातें त्या दिवसापासोनी । भृगुक्षेत्र ऐसें बोलती ॥४७॥
असो तया स्थानीं राहून । करिते झाले यजनयाजन ।
बहुताप्रकारीं अनुष्ठान । करिते जाले सर्वदा ॥४८॥
पंच पंच उषःकाळीं । उठोनि ऋषींची मंडळी ।
गुरुवेष्टित मध्यमेळीं । स्नानाप्रती पै जावें ॥४९॥
नर्मदा मिळाली सिंधूजीवनीं । उभय संगम मध्यस्थानीं ।
स्नानसंध्या तये स्थानीं । प्रतिदिनीं जावोनि करावी ॥५०॥
लोटतां बहुत संवत्सर । तंव होता झाला चमत्कार ।
भृगुक्षेत्रींचा एक विप्र । ज्ञानवर्धन नाम त्याचें ॥५१॥
अमंदा नामें त्याची पत्नी । पतिव्रता आणि लावण्यखाणीं ।
उभयता स्त्री-पुरुषें मिळोनि । विचार करिते जाहले ॥५२॥
आपणांतें पुत्र संतान नाहीं । संपत्ती असोनि करावें काई ।
जयाचेनि पुत्र प्राप्ती व्हावी । तोची उपाव करावा ॥ ५३
मग तया द्विजवर्यानें । क्षेत्रांतिल ब्राह्मण मेळवून ।
सर्व संपत्ती लुटवून । दिधली तये अवसरीं ॥ ५४ ॥
नर्मदा संगमीं जाऊन । उभयतांनीं स्नानें करून ।
सोडिलें संकल्पालागून । आपुलाले देहाचा ॥ ५५ ॥
मग सर्वेचि पार्थिवलिंगें । मृत्तिकेचीं करोनि वेगें ।
मानसपूजा यथसांग । विध्युक्तेसी पै केली ॥ ५६ ॥

शेवटीं करोनि नमस्कार । वदते झाले स्पष्ट उत्तर ।
हे शिव हर कर्पूरगौर । विनंती आमुची परियेसा ॥ ५७ ॥
हे देह तुह्मांसी अर्पून । मागणें इतुकेंची वरदान ।
भृगुऋषी ऐसा नंदन । जन्मो आमुचे कुळीसी ॥ ५८ ॥
कीर्तिमंत व्हावा फार । करावा जगाचा उद्धार ।
हेंचि मागणें वारंवार । मृडानीवरा तुजप्रती ॥ ५९ ॥
ऐसे बोलोनि उभयतांनीं । एकमेकाचा हस्त धरूनी ।
धर्मडोहींत तत्क्षणीं । उडी घातली सत्वाणें ॥ ६० ॥
तळीं बैसले जाधोन । सोडिते झाले प्राणोत्क्रमण ।
तंव अकस्मात शिवगण । तये स्थानीं पातला ॥ ६१ ॥
हा पाहोनि चमत्कार । तो कैलासातें जावोनि सत्वर ।
शिवापाशीं वृत्तांत समग्र । जाला होता कथियेला ॥ ६२ ॥
तये क्षणीं शिवदर्शनासी । मिळोनि गेले होते ऋषी ।
त्यांची नामें अनुक्रमेंसि । श्रवण केलीं पाहिजे ॥ ६३ ॥
दत्तात्रय याज्ञवल्कि वसिष्ठ । व्यास आणि अत्री वरिष्ठ ।
शुक्र कपिलार्य श्रेष्ठ । वामदेव आठवा ॥ ६४ ॥
इतुके बैसले असतां जाण । शिवगण सांगे वर्तमान ।
हे शिवसांब त्रिलोचन । विनंती माझी परियेसा ॥ ६५ ॥
गुर्जर देशाचिये माझारी । समुद्र संगमीं रेवातीरीं ।
भृगुऋषी शिष्यसहपरिवारीं । अनुष्ठानीं बैसले ॥ ६६ ॥
मी तया स्थानीं जाऊन । घेतलें ऋषींचें दर्शन ।
करित त्यासीं संभाषण । सन्मुख उभा राहिलो ॥ ६७ ॥
तंव द्विज आणि त्याची पत्नी । उभयतांनीं संकल्प करूनी ।
शिव कर्पूर ऐसें स्मरोनि । देहालागीं त्यागिलें ॥ ६८ ॥
त्या उभयतांचे मनोरथ । पुरविणें असे तुह्मांस प्राप्त ।
ह्मणोनि सांगावयासी त्वरित । स्वामीपाशीं पातलों ॥ ६९ ॥
तुह्मी तव अंतरसाक्षी जाण । ठाउकें सर्व वर्तमान ।
परि करावया त्यांचे मनोरथ पूर्ण । विलंब होईल सर्वथा ॥ ७०
ह्मणवुनिया लवडसवडीं । धांवत आलो मी तांतडी ।
विलंब न करावा याची घडी । तेथें गेली पाहिजे ॥ ७१ ॥

ऐसे ऐकोनि गणाचें भाषण । सदाशिव निघे त्वरें करून ।
तंव ऋषी पुसती वर्तमान । कोठें जातां ह्मणवूनी ॥ ७२ ॥
तंव ऋषींप्रती जाण । सांगतां जाला पंचवदन ।
नर्मदातीरा लागून । आह्मांते जाणें त्वरेसी ॥ ७३ ॥
मग ऋषी बोलती तये वेळीं । हे नागभूषण चंद्रमौळी ।
तुह्मांसवें ऋषी मंडळी । आह्मी सर्व येतों पैं ॥ ७४ ॥
रेवा संगमीं करूं स्नान । घेऊं भृगुऋषींचें दर्शन ।
मनोगत करूं निवेदन । तया मुनिश्रेष्ठासी ॥ ७५ ॥
शंकर ह्मणे अहं विशेष । पाचारिला नंदिकेश ।
आरूढोनिया उमा महेश । निघते जाले त्वरेनें ॥ ७६ ॥
न लागतां पातियासी पाती । ऋषींसहित उमापती ।
येवोनिया समीर गती । रेवातटा पावले ॥ ७७ ॥
भृगुमुनी आदि ऋषिगण । नेत्रीं पाहोनिया त्रिनयन ।
देवोनिया अभ्युत्थान । तृणासनीं बैसविले ॥ ७८ ॥
सांब ह्मणवो मुनिसत्तमा । धन्य आजीचा दिवसमहिमा ।
तुमच्या दर्शनाचा आह्मां । लाभ जाला ह्मणवूनी ॥ ७९ ॥
परस्परें हाची लाभ । भृगु ह्मणे वो शिवसांब ।
तूं भक्तरक्षक उमावल्लभ । करुणाकर सर्वांसी ॥ ८० ॥
द्विजपत्नी आणि द्विजवर । करोनि तव नामाचा उच्चार ।
हात धरोनि परस्परें । देहालागीं त्यागिले ॥ ८१ ॥
मग बोलता जाला पंचवदन । ठाऊकें जालें वर्तमान ।
तयाचे उदराप्रती जाणें । लागेल तुह्मां आह्मांसी ॥ ८२ ॥
स्त्रीपुरुषांनीं निश्चयो केला । उभयतांनीं संकल्प सोडिला ॥
ह्मणवुनि तयांचे उदराला । जाणें लागे निश्चित ॥ ८३ ॥
ऐसा ऐकोनि विचार । बोले हिमनगाची कुमार ।
हे शिवसांब नागेंद्र-हार । नीलकंठ पिनाकी ॥ ८४ ॥
तुह्मी आह्मी उभयतां । तिसरे भृगुमुनि तत्वतां ।
द्विज करोनि मातापिता । जन्म घेऊं त्याउदरीं ॥ ८५ ॥
ऐसें भवानीचें उत्तर । ऐकोनि वदती मुनी समग्र ।
दत्तात्रयादि थोर थोर । संगें आले होते जे ॥ ८६ ॥

ह्मणती ऐके हो भृगुराजश्रेष्ठा । तूं सर्वार्थ साक्षीद्रष्टा ।
तुझीये ठायीं आमुची निष्ठा । एकभावें लागावी ॥ ८७ ॥
असावा तुमचा समागम । गंगावासहि अति उत्तम ।
स्नानसंध्या यथाक्रमे । सारूं आह्मी सर्वही ॥ ८८ ॥
भृगु ह्मणे तुह्मांलागून । जन्म घ्यावयाचें कारण ।
सहसाही नाहीं जाण । सर्व मुनिश्रेष्ठहो ॥ ८९ ॥
तंव मुनि बोलते जाले वचन । आह्मांसी कैचें जन्ममरण ।
अंशतः लीलामात्रें करून । कलीमाजी अवतरूं ॥ ९० ॥
आह्मी देही असोनि देहातीत । विदेहपणें अविन्मुक्त ।
विचरुनिया निजध्यानातें । सोडित नाहींत कदापि ॥ ९१ ॥
तेथ कलियुगाचें भय । वृथा भ्रमरूप संदेह ।
अंतरीं धरावो काय । एक देशीचे परी ॥ ९२ ॥
भृगु ह्मणे वो बहुत बरें । परि कलिचे मानव अनिवार ।
पीडतील नानाप्रकारें । कीर्ती प्रगट जालीया ॥ ९३ ॥
तरी तुह्मी इतुकें करावें । शिष्यांतें सांगीतलें बरवें ।
तैसें तुह्मी आचरावें । ठायीं ठायीं जन्मूनी ॥ ९४ ॥
पूर्व देहाचें विस्मरण । तुह्मां सर्वांसी पडेल जाण ।
मग तत्वविद्येतें बोधून । मोहपाश छेदीन मी ॥ ९५ ॥
बरें ह्मणूनी मुनीश्वर । त्रिरिते जाले जयजयकार ।
प्रेमानंदें अतिनिर्भर । होवोनिया मानसीं ॥ ९६ ॥
ऐसें सर्वांसीं सांगून । एक निश्चय केला जाण ।
कलियुगामाजी अवतरण । व्हावयालागीं सर्वांनीं ॥ ९७ ॥
कांहीं काळ तप आचरून । अनुक्रमें होतील अवतीर्ण ।
श्रोते होवोनि सावधान । पूर्वानुसंधान परिसिजे ॥ ९८ ॥
अधिक मासाचियें माझारीं । उभयतांनीं अपुले करी ।
पार्थिवें पूजोनिया साजिरीं । देह त्यागिले होते पै ॥ ९९ ॥
तो चमत्कार अद्यापिवरी । अठ्ठाविसावे संवत्सरीं ।
अधिक मासाचिये माझारी । लिंगें अनेक निघती पै ॥ १०० ॥
असो भृगु आणि मृडानीवर । करोनी ऐसा विचार ।
द्विजपत्नी आणि द्विजवर । मातापितरें नेमिलीं ॥ १०१ ॥

कर्नाटक देशामाझारीं । मल्लप्रहरेचिये तीरीं ।
अशोक क्षेत्रामाझारी । जन्म घेतला द्विजवरें ॥ १०२ ॥
विश्वनाथभट अळवणीकर । तयाची पत्नी गरोदर ।
तियेचे उदरीं तो विप्र । जन्मालागीं पै आला ॥ १०३ ॥
तयाचे जन्म तिये दिनीं । मल्लप्रभेचे जीवनीं ॥
भागीरथी स्वयें येऊनी । रहाती जाली दिनत्रय ॥ १०४ ॥
प्रति वर्षी ते दिनीं यावें । ती साक्ष अद्यापी आहे ।
भागीरथीचें पुण्य लाहे । स्नान करितां ते स्थळीं ॥ १०५ ॥
लेकुरा जाले त्रयोदशादिन । ते दिवशींचे रात्रीं जाण ।
तयाचे तीर्थरूपालागून । स्वप्न होतें जहालें ॥ १०६ ॥
रात्रीं येवोनि गजवदन । बोलते जाले स्पष्ट वचन ।
जाहला जो कां तव नंदन । तपस्वी पूर्ण आहे तो ॥ १०७ ॥
तरि तुह्मी इतुकें करावें । माझें नाम यातें ठेवावें ।
गणपति ह्मणोनि बरवें । पाचारावें सर्वदा ॥ १०८ ॥
याचे उदरीं तिघेजण । अवतार घेतील सामर्थ्यवान ।
भृगुऋषी आणि पंचवदन । तिसरो जाण पार्वती ॥ १०९ ॥
त्रिवर्ग एथें प्रगटून । करितील जगाचें उद्धरण ।
तरि तुह्मांतें हेंचि सांगणें । असे माझें निश्चित ॥ ११० ॥
याजप्रती अहर्निशी । सांभाळावें जिवीं मानसीं ।
ऐसें सांगोनिया निशीं । वक्रतुंड पै गेला ॥ १११ ॥
सूर्योदय झालियावरी । विश्वनाथ भटजींनीं सत्वरीं ।
जावोनि गृहामाझारी । कांतेप्रती कथियेलें ॥ ११२ ॥
उत्साह करोनि अति प्रीतीं । मेळविल्या बहुत युवती ।
नाम ठेविलें गणपती । जो जो शब्दें करोनी ॥ ११३ ॥
तयाचें लालनपालन करितां । अष्टवर्षे झालीं तत्वता ।
व्रतबंध करोनिया चिंता । विवाहाची लागली ॥ ११४ ॥
असो तया क्षेत्रामाझारी । काशीनाथ भटजी श्रोत्री ।
तयालागी जाली पुत्री । चिमाबाई या नामें ॥ ११५ ॥
तया श्रोत्रीयाचे स्वप्नीं । जाता झाला अंकुशपाणी ।
वदोनिया मधुर वाणी । तयाप्रती सांगत ॥ ११६ ॥

विश्वनाथ भट अळावणी चतुर । गणपती नामें तयाचा कुमर ।
तयासी तुमची कुमार । सत्वर नेवोनि देईजे ॥ ११७ ॥
पूर्वी या उभयतांचा जोडा । शंकरें नेमिला असे फुडा ।
करोनिया जिवाचा धडा । नर्मदेमाजी हे गेलीं ॥ ११८ ॥
तोचि हे दों ठायीं जन्मून । वधुवरें शोभतील जाण ।
यांचे उदरीं अवतार होऊन । उद्धार होईल जगाचा ॥ ११९ ॥
ऐसें दाखवोनिया स्वप्न । जाता झाला गजवदन ।
तोंचि समई श्रोत्री उठून । विचार करिते जहाले ॥ १२० ॥
कांतेप्रती बोलावून । सांगते झाले वर्तमान ।
स्वप्नीं येवोनि गजवदन । बोलिला होता ज्या रीतीं ॥ १२१ ॥
उदयासी पावतां दिनकर । उभयतांनीं करूनि विचार ।
विश्वनाथ भटजीसी कर । जोडोनि विनंती करीतसे ॥ १२२ ॥
दीन जाणोनि सर्वापरी । तुम्ही आह्मांसी घ्यावें पदरीं ।
नेमा आमुची कुमारी । तुमचे पुत्रा देतसों ॥ १२३ ॥
ऐसें वचन बोलतां वहिलें । विश्वनाथ भटजीस मानलें ।
मुहूर्त पाहूनि निश्चय केले । उभयतांनीं तेधवा ॥ १२४ ॥
यथासांग लग्न सोहळा । चार दिवस अति सोज्वळा ।
बहुत संभ्रमें तये वेळा । करिते जाले दोघेही ॥ १२५ ॥
असो लग्न जालियावरी । चमत्कार जाला ते अवसरीं ।
सावध होऊनिया चतुरीं । श्रवण केलें पाहिजे ॥ १२६ ॥
गणपती धाकुटे वय असून । त्रिकाल स्नान संध्या सारून ।
करित असावें शिव-पूजन । यथाविधी करूनी ॥ १२७ ॥
शिवरात्र्यादि सोमवार । एकादश्यादी व्रतें समग्र ।
करोनिया पूजा उपचार । निराहारी असावें ॥ १२८ ॥
तंवं माघ वद्य एकादशी । सोमवासर तये दिवशीं ।
येते जाले अनायासीं । पर्वकाळ सर्वही ॥ १२९ ॥
माध्यान्हीं पातला दिनकर । भूमिका तापली समग्र ।
नंव स्नानासी विश्वनाथभटापुत्र । जाता जाला त्वरेनें ॥ १३० ॥
मल्लप्रहरे माझारी । स्नाना लागी अती सत्वरीं ।
जावोनिया डोहा माझारीं । बुडी दिधली तयानें ॥ १३१ ॥

तये स्थानीं जळ देवता । क्रीडा करावयासी तत्वता ।
पातल्या होत्या समस्ता । तया डोहा माझारीं ॥ १३२ ॥
त्यांनीं पाहुनी तो किशोर । रूप लावण्य अति सुंदर ।
त्यासी घेऊनी अति सत्वर । जात्या जाल्या जळांत ॥ १३३ ॥
नेवोनिया आपुलें सदनीं । ठेवित्या जाल्या त्यागोनि ।
तंव मल्लप्रभेचे जीवनीं । स्नानासी लोक पातले ॥ १३४ ॥
ते म्हणती हा किशोर । बुडोनि जाला बहु उशीर ।
शोध करावा सत्वर । अझूनि वरुता कां नये ॥ १३५ ॥
पहाती जळांत शोधुनी । तंव तो न पडेची ठिकाणीं ।
सर्वत्रीं जावोनि ते क्षणीं । ग्रामा माजी कथियेलें ॥ १३६ ॥
पाहोनि तयाची मातापितरां । सांगते झाले समग्र ।
गणपती तूमचा कुमर । जळामाजी बुडाला ॥ १३७ ॥
ऐकुनि ऐसें वर्तमान । उभयतां शोकार्णवीं निमग्न ।
धरणीवरी शरीर टाकून । रुदन करिती आक्रोशें ॥ १३८ ॥
नदीतटाका जाऊनी । हाक मारिती दीनवाणी ।
रे रे गणपती आम्हालागुनि । टाकुनि कैसा गेलासी ॥ १३९ ॥
आम्हां आंधळियांची काठी । नेवोनि टाकिली गिरिकपाटीं ।
काय आमुचिये ललाटीं । विधातियानें लिहीलें ॥ १४० ॥
रे रे शिवसांब कर्पूरगौरा । हे कैलास पति मृडानीवरा ।
हे सर्पभूषण चंद्रशेखरा । दीनोद्धारा धांवे हो ॥ १४१ ॥
स्वप्नी येवोनि गजवदन । सांगोनि गेला वर्तमान ।
जयाचे उदराप्रती जाण । पंचवदन येईल पैं ॥ १४२ ॥
भृगुऋषी आणि पार्वती । येतिल याचे उदराप्रती ।
ते कांहींच न येतां प्रतीती । अनृत कैसें जहालें ॥ १४३ ॥
आतां धावरे मृडानीवरा । दाखवि आमुचिये पुत्रा ।
नाहीं तरि यया अवसारा । देह आम्ही त्यागितों ॥ १४४ ॥
ऐसें वदोनि मातापितर । जाले देहावरि उदार ।
तों इतुकियामाजी चमत्कार । होता जाला ते थळीं ॥ १४५ ॥
अनेक शोकें अनुवादितां । तीन दिवस गेले तत्वता ।
तों शिवरात्री दिन येतां । जाला तये अवसरीं ॥ १४६ ॥

करुणा परिसोनि सत्वरीं । शिव जाहला साह्यकारी
धावण्या धावोनि सत्वरीं । भक्तकैवारी पावला । १४७ ॥
जळदेवतांसी दंडून । सोडविला द्विजनंदन ।
स्वहस्तीं धरुनि आपण । वरुते घवोनि त्या आले ॥ १४८ ॥
उभयतांनीं पुत्र पाहिला । मग बहुतचि आनंद झाला ।
म्हणे कैवारी धावला । मृडानीवर ये काळीं ॥ १४९ ॥
जैसा अवर्षणीं पर्जन्य पडे । की मरतीयासी अमृत जोडे ।
कीं दरिद्रियासी सापडे । द्रव्यकुंभ ज्या रीती ॥ १५० ॥
तैशापरि मातापितयांसी । आनंद जालासे मनासीं ।
कैवारी हा कैलासवासी । जाला असे म्हणवूनी ॥ १५१ ॥
येवोनि अंतरीं कळवळा । आरडोनि पुत्राच्या पडिले गळां ।
आमच्या तान्हुलिया बाळा । अंतरला तूं होतासी ॥ १५२ ॥
असो शिवरात्र उत्तम दिवस । पूजोनि स्वयंभू लिंगास ।
नाम रामेश्वर तयास । ठेविते जाले ते काळीं ॥ १५३ ॥
अनेक प्रकारीं पूजन । करोनि ब्राम्हण-संतर्पण ।
उत्साह करोनिया जाण । स्थापन केलें शिवाचें ॥ १५४ ॥
तया नदीचिये माझारी । स्वयंभूलिंग अद्यापीवरी ।
जावोनि पहावें चतुरीं । पुण्य गांठीं असलिया ॥ १५५ ॥
असो तो गणपति किशोर । उभयतांही वधुवरें ।
वयें कडोनि झाले थोर । स्वेच्छा आनंदें क्रीडती ॥ १५६ ॥
इकडे नर्मदेचे तीरीं । भृगूसी त्रिनेत्र विचारी ।
करनाट देशामाझारीं । जाणें आह्मां लागलें ॥ १५७ ॥
भृगुक्षेत्रींचे ब्राह्मण । अमंदा आणि ज्ञानवर्धन ।
उभयतांनीं संकल्प सोडून । देह एथें त्यागिले ॥ १५८ ॥
तयांनीं घेतले अवतार । पाहुनि मल्लप्रभातीर ।
घेते जाले परिकर । लीलामात्रें करोनी ॥ १५९ ॥
तयांचे मनोरथ पूर्ण । करावयासी आह्मां जाणें ।
तरि आपणहि त्वरें करून । तेथें आलें पाहिजे ॥ १६० ॥
ऐसें वदोनि पंचवदन । तये स्थानीं अदृश्य होऊन ।
मल्लप्रभातीरा येणें । करिते झाले सत्वरीं ॥ १६१ ॥
गणेशभटजींची पत्नी । चिमाबाई लावण्यखाणी ।
पतिव्रतेची स्वामिनी । गजगामिनी शुभांगी ॥ १६२ ॥

पाहोनि एकांत सुंदर । जाऊनि तयाचे कर्णद्वारे ।
शिवसांबकर्पूर गौर । उदरामाजी प्रवशले ॥ १६३ ॥
नवविधा भक्तीचे नवमास । गर्भी भरले पूर्ण दिवस ।
डोहळे आदि बहू विलास । करिते जाले सर्वही ॥ १६४ ॥
असतां उत्तम मुहूर्त । चिमाबाई जाली प्रसूत ।
मृडानीवरा ऐसा सुत । तये वेळीं जन्मला ॥ १६५ ॥
उभयता मातापितरें । जाले आनंदें निर्भर ।
द्विज पाचारूनि सत्वर । बहु दक्षणा दीधली ॥ १६६ ॥
असो अनुक्रमें करून । प्रभु जोडलासे नंदन ।
नाम ठेविलें नारायण । आवडी करोनी सर्वांनीं ॥ १६७ ॥
द्वितीय संवत्सरीं । उमा हिमनगाची कुमारी ।
चिमाबाईचिये उदरीं । येती जाली स्वच्छंदें ॥ १६८ ॥
जीऊबाई अभिधान । ठेविते जाले आवडी करून ।
यथाविधि लालन पालन । करिते जाले उभयतांचें ॥ १६९ ॥
इकडे भृगुऋषी आपण । रेवातीरवासी ऋषिगण ।
शिष्यमंडळी आदिकरून । पाचारिते जाहाले ॥ १७० ॥
सांगति सर्वांशीं विचार । वसवोनिया रेवातीर ।
तुम्हीं असावें सुस्थिर । स्नान संध्या करूनी ॥ १७१ ॥
द्विजपत्नी आणि द्विजवर । उभयांचे मनोगत समग्र ।
पुरवावया अत्यादरें । जातों आम्हीं सत्वरीं ॥ १७२ ॥
तुम्हीही स्वइच्छें करून । करावें कलिमाजी अवतरण ।
पुढें गंगातीरीं सर्वां लागून । एकत्र वास होईल पै ॥ १७३ ॥
ऐसें सांगोनि सर्वांसी । गुहेत गेले भृगुऋषी ।
प्रगटोनिया करनाटदेशी । अवतार घेते जहाले ॥ १७४ ॥
गणेश भटजीची सुंदरी । व्याप्त झाली निद्राभरीं ।
तया समयीं नेत्रद्वारीं । प्रवेश करिते जाहले ॥ १७५ ॥
लीला-मात्रें करून । नवमास भरले संपूर्ण ।
प्रसूत जाल्याचें वर्तमान । सांगतों तें परियेसा ॥ १७६ ॥
तीन तालांचे माडीवरी । निद्रिस्त जाली मातोश्री ।
स्वप्नामाजी तये अवसरीं । पाहती जाली पुत्रातें ॥ १७७ ॥
नवा महिनियांचा पुत्र । रांगता देखिला सुंदर ।
म्हणोनि जाग्रत जाली सत्वर । तवं किशोर पाहिला ॥ १७८ ॥

सुप्रसन्न हास्यवदन । स्वरूपें करोनि जैसा मदन ।
विशाळभाळ विशालनयन । गौरवर्ण शोभत ॥ १७९ ॥
ऐसा पाहतां निजनंदन । मातेसि आनंद जाला पूर्ण ।
ब्रम्हानंदसुखीं निमग्न । होवोनिया पैं गेली ॥ १८० ॥
जैसा तत्वदर्शनी तत्ववेत्ता । समाधिस्थ होय तत्वता ।
स्थूळसूक्ष्मकारणवार्ता । विसरोनि जाय सर्वही ॥ १८१ ॥
तैशी होवोनि स्वरूपीं निमग्न । मन जालेंसे उन्मन ।
नाहीं आपपर किंवा भान । चिद्रूप होवोनि पै गेली ॥ १८२ ॥
तंव तीर्थरूप अकस्मात । घ्यावया आले समाचारातें ।
पाहोनिया निज पुत्रातें । आनंदयुक्त जहाले ॥ १८३ ॥
जैसा योगी प्रवर्ततां हाटीं । साध्य वस्तु देखे दिठी ।
मग सद्वस्तूची मिठी । न सुटेचि सर्वथा ॥ १८४ ॥
तैसें पाहोनि पुत्रवदन । पिता स्वरूपीं निमग्न ।
पावोनिया तत्वानुसंधान । तद्रूप होऊनि पै गेला ॥ १८५ ॥
ऐसी हे उन्मनी अवस्था । उभयांतें लागली तत्वता ।
हें पाहोनि घरचियांसी चिंता । उत्पन्न होती जहाली ॥ १८६ ॥
एक म्हणती भूतें झडपिलीं । एक म्हणती आनंदें ग्रासिलीं ।
एक म्हणती स्वरूपीं वेधलीं । बाळ दृष्टी पाहूनि ॥ १८७ ॥
असो सात दिनवरी । उभयांसी मुद्रा खेचरी ।
लागोनि आनंदसिंधू माझारी । निमग्न होवोनि राहिले ॥ १८८ ॥
तंववरी लेकराचिया साभाळा । घरचीं करिती वेळोवेळा ।
अष्टम दिनीं प्रातर्वेळा । होती जाली निश्चित ॥ १८९ ॥
मग उभयतांची समाधी । उतरोनि आले देहबुद्धी ।
तवं तें म्हणती आह्मीं सुखाब्धि । माजी होतों पहुडलों ॥ १९० ॥
आमुचे सुखालागी विघ्न । येवानिया केलें कोणें ।
करोनि समाधि उत्थापन । उठविलें आह्मांसी ॥ १९१ ॥
असो गणेश भटजींनीं तये वेळीं । पाचारुनि द्विजमंडळी ।
वस्त्रभूषणें वेळोवेळीं । द्रव्य देऊनि तोषविलें ॥ १९२ ॥
ग्रामांतील स्त्रिया मिळून । घेऊनि येती अक्षईवाण ।
द्वादश दिनां-अंतीं जाण । नामाभिधान ठेविलें ॥ १९३ ॥
रघुनाथ ऐसें नामाभिधान । ठेविलें सुमुहूर्त पाहून ।
चिन्मय पालखी घालून । हालविती सुवासिनी ॥ १९४ ॥

ऐसा नित्यानित्य सोहळा । पिता करित वेळोवेळा ।
शुद्ध पक्षाची सोमकळा । तैसा वाढे नंदन ॥ १९५ ॥
कोणी एकें दिवशीं । माता पहुडली सेजेशीं ।
तीन प्रहर गेली निशी । बाळ पाठीशीं घेऊनि ॥ १९६ ॥
तंव लेकरूं रांगत रांगत । जावोनिया देवघरांत ।
सुखासन घालोनि ध्यानस्थ । एकाग्र मनें बैसलें ॥ १९७ ॥
उठोनि माता जंव पाहत । तंव लेकरूं गेलें देवगृहांत ।
हालवोनिया जागें करीत । तंव शुद्धि नाहीं देहाची ॥ १९८ ॥
बहुतकाल जालियावरी । लेकरूं आलें देहावरी ।
नित्य नित्य ऐशियापरी । व्हावयासीं लागलें ॥ १९९ ॥
मग गणेश भटजीप्रती । भार्या सांगतसे एकांतीं ।
रघुनाथाची लहान व्यक्ती । परि योगिराज दिसतो ॥ २०० ॥
निद्रा नाहीं अवघी रात्र । बसतो एकांतीं स्वतंत्र ।
याचें सामर्थ्य अति विचित्र । दीसताहे मजलागीं ॥ २०१ ॥
पिता म्हणे वो सुंदरी । तीर्थरूपांचे स्वप्नांतरीं ।
आला होता सिंदुरारी । गणपति नामें विख्यात ॥ २०२ ॥
त्यानें कथिलें स्वप्नांतरीं । त्रै अवतार आमुचे उदरीं ।
उत्पन्न होतील कलि माझारीं । कीर्ति प्रगट करावया ॥ २०३ ॥
भृगुपार्वतीपंचवदन । तेहि दीसती तिघेजण ।
तपश्चर्या पूर्वपुण्य । फळासि आली आमुचे ॥ २०४ ॥
हे उभयताहि लेंकुरें । सांभाळावें निरंतर ।
निघोनि जातिल नाहींतर । आमुचिया हातींचें ॥ २०५ ॥
जैसा कार्तिकस्वामी उठोन । गेला मातापितरें सांडून ।
किंवा व्यासाचा नंदन । शुक उठोनि पैं गेला ॥ २०६ ॥
तैसे हे जातिल निघून । आम्हांसी दुःख होईल दारुण ।
वारंवार माझें मन । याचि परी चिंतीतसे ॥ २०७ ॥
मागिल सहा घटिका रात्रीं । उठोनिया उभय पुत्रीं ।
जावें अरण्यामाझारी । अनुष्ठाना लागुनी ॥ २०८ ॥
माध्यान्हींसी घरीं यावें । सवेंचि मागति आणिक जावें ।
ऐसें नित्यानित्य बरवें । व्हावयासि लागलें ॥ २०९ ॥
सुमुहूर्त तिथी पाहून । उभयतांचें चौलोपनयन ।
उत्तम द्विज मेळवून । यथाविधी पैं केलें ॥ २१० ॥

भर्ता पाहुनी सुलक्षण । जीऊबाईचें केलें लग्न ।
देवोनिया वस्त्रें भूषणें । गौरविलें कन्येसी ॥ २११ ॥
तंव तया क्षेत्रामाझारी । कन्या होत्या ज्यांचे घरीं ।
ते द्विज पुसावया सत्वरीं । येते जाले स्व अंगें ॥ २१२ ॥
म्हणती तुमच्या उभयनंदनां । देतों आम्ही आपुल्या ललना ।
अलंकार भूषणें नाना । देवोनिया गौरवूं ॥ २१३ ॥
गणेश भट जीसीं मानलें । ब्राह्मणांसी अभय दिधलें ।
तिथिनिश्चयातें नेमिलें । साहित्यातें करोनी ॥ २१४ ॥
प्रथम तिथीप्रति जाण । नारायणाचें लाविलें लग्न ।
जोडा नेटका सुलक्षण । वधुवरें शोभलीं ॥ २१५ ॥
तंव दुसरे तिथीचें संधान । नेम ठरवून करिती जाण ।
हें साद्यंत वर्तमान । रघुपतीसीं कळालें ॥ २१६ ॥
निशी जाली दोन प्रहर । एकांत पाहुनि पारिकर ।
सोडोनिया माता पितर । निघते जाले एकाकी ॥ २१७ ॥
सोडिलें ग्रामा आणि देशा । लंघित चालिले उत्तरदिशा ।
सरोनि गेली समग्रनिशा । मार्गीलागी चालतां ॥ २१८ ॥
उदयाचळासी तमारि । प्रकट जालासे भास्करी ।
मग एक्या उपवनामाझारीं । जाऊनिया राहिले ॥ २१९ ॥
लोकांसी पुसती वर्तमान । ग्राम किती राहिला एथून ।
ते ह्मणती पंचयोजन । ग्राम एथून राहिला ॥ २२० ॥
ऐसें पुसोनि तयालागून । निघते जाले तेथून ।
दिननिशी प्रती जाण । मार्गाप्रती चालावें ॥ २२१ ॥
भंयकर गिरि-कंदर । मार्गी श्वापदें आढळती फार ।
वृक व्याघ्रादि अति उग्र । मनुष्य आहारीं सर्वही ॥ २२२ ॥
तयाचें भय अंतरीं । न धरितां जावें वनांतरीं ।
तीव्रकंटक पाया माझारीं । वेळोवेळा रूतती ॥ २२३ ॥
उपानहावीण पादचारी । एक धोत्र अंगावरी ।
लहान लोटी हस्ता माझारी । समाग्रमें इतुकें ॥ २२४ ॥
पंचादिन पर्यंत जाण । नाहीं केलें जलप्राशन ।
सहावे दिवशीं सेवन । वनफळाचें पैं केलें ॥ २२५ ॥
मार्गानें चालतां । सांगाती भेटले अवचिता ।
नाशिकासी जावयाची वार्ता । एकमेकांसी बोलती ॥ २२६ ॥

तयांनीं याजप्रति पाहून । एकमेकांसी करिती भाषण ।
दिसतो वय करूनी लहान । परि योगीश्वर आहे हा ॥ २२७ ॥
वय द्वादश वरुषें असतां । लंघित चालिला गिरिपर्वता ।
हा मानवी नव्हे तत्वतां । महा पुरुष दीसतो ॥ २२८ ॥
ब्रम्हयाचे नंदन । सनत्कुमारादि चौघे जण ।
त्यांतीऌ एक हा नंदन । आम्हांलागीं दीसतो ॥ २२९ ॥
तरी याजप्रती पुसावें । आपुले सेवे घेवोनि जावें ।
कदापि न सोडावें । समागमें याचिया ॥ २३० ॥
ते पुसति अजि स्वामी । कवण्या देशा जातां तुम्ही ।
मार्गक्रमणीं बहुतगामी । दिसतसां बहुतची ॥ २३१ ॥
तरी तुम्ही आहांत कवण । हें सांगावें आम्हांलागुन ।
ध्रुव-प्रल्हादा समान । वैराग्यशीळ दिसतसां ॥ २३२ ॥
धाकुटें वय वामन । किं ब्रम्हकुमर अहाती जाण ।
काय तुमचें अभिधान । आम्हां लागीं सांगावें ॥ २३३ ॥
रघुनाथ माझें अभिधान । जातों गंगातीरालागून ।
ऐसें तयांप्रति सांगून । निघते जाले त्वरेनें ॥ २३४ ॥
ऐशी पाहून उदासीनता । चमत्कार वाटला द्विजांचे चित्ता ।
मग त्याचे पृष्ठ भागीं तत्वता । निघते जाले सत्वरीं ॥ २३५ ॥
माध्यान्हीं पातला दिनकर । क्षुधित जाले ते द्विजवर ।
स्वामीप्रती जोडोनि कर । विनंति करिते जहाले ॥ २३६ ॥
आम्हांसी पंक्तीस घेऊन । करावें दीनाचें उद्धरण ।
प्रसादसमयो दैवें करून । प्राप्त आजी जहाला ॥ २३७ ॥
स्वामी म्हणती मी निराहारी । भोजन न करी मार्गांतरीं ।
जाउनिया गंगातीरीं । पारणियातें करूं पैं ॥ २३८ ॥
ऐसें ऐकोनि द्विजवर । करिते जाले नमस्कार ।
सर्वहि जोडोनिया कर । वारंवार विनविती ॥ २३९ ॥
आग्रहाचा अति गौरव । पाहोनि त्यांचा दृढ भाव ।
भोजन सारिलें बरवें । सहा दिनां शेवटीं ॥ २४० ॥
मागें अशोक क्षेत्रा आंत । काय जालासे वृत्तांत ।
तो श्रोते जनीं सावचित्त । श्रवण केला पाहिजे ॥ २४१ ॥
प्रातःकाळीं माता उठून । पाहूं गेली निज नंदन ।
रघुनाथ रघुनाथ म्हणून । हाका मारूं लागली ॥ २४२ ॥

तंव न दिसे कोठें सांचल । होवोनि पाहे उतावेळ ।
घरदार शोधिलें सकळ । परि वेल्हाळ दिसेना ॥ २४३ ॥
नित्य जातो वनांतरीं । म्हणवुनि अरण्या माझारीं ।
शोध केला बहुता परी । ग्रामांतील लोकांनीं ॥ २४४ ॥
लग्न परवाचें नेमिलें । लेंकरूं उठोनि कोठें गेलें ।
न कळे तयासि काय झालें । कोणें ठायीं जाऊनी ॥ २४५ ॥
पाहोनि तयाचे मातापितर । त्यातें वृत्तांत सांगती समग्र ।
बहुत शोधिलीं वनान्तरें । परि किशोर कोठें न दिसेचि ॥ २४६ ॥
ऐसें ऐकतां वर्तमान । पिता धरणीसी करि शयन ।
उभे असताचि मातेनें । अंग धरणी टाकिलें ॥ २४७ ॥
शोक करितसे फार । हाका मारित वारंवार ।
अहा अहारे रघुवीर । गेलासि आह्मां टाकुनी ॥ २४८ ॥
माझ्या तान्हुल्या पाडसा । गेलासि तूं कवणिया देशा ।
तुजविण शून्य दाही दिशा । मजलागी दीसती ॥ २४९ ॥
रघुवीरा तुला पाहिल्यावीण । जाऊं पाहे माझा प्राण ।
ऐसें वारंवार म्हणून । शोक करीत बहुतसा ॥ २५० ॥
ऐकिजे वो श्रोतेजन । तया शोकाचें वर्णन ।
करितां मज आलें रुदन । तें माझियानें न वर्णवे ॥ २५१ ॥
असो ती माता शोकभरित । वाराणाशीस जावोनि त्वरित ।
देह ठेवोनि भागीरथींत । समाधिस्थ जहाली ॥ २५२ ॥
इकडे द्विजांबरोबर । स्वामी माझे रघुवीर ।
शोधित शोधित गंगातीर । जनस्थाना पातले ॥ २५३ ॥
करोनिया नमस्कारा । द्विज गेले आपुल्या घरा ।
आपण गंगेचिया तीरा । निकट भागीं बैसले ॥ २५४ ॥
गंगास्नानातें करून । आहारालागीं जळप्राशन ।
याचिपरी सप्तदिन । निघोनिया पैं गेले ॥ २५५ ॥
क्षेत्रामाजील द्विजवर । घ्यावया येती समाचार ।
पुसती समग्र प्रकार । कोण कोठील ह्मणोनि ॥ २५६ ॥
तयांसी न देतां उत्तर । मौन रहावें सुस्थिर ।
क्वचित बोलावें मृदु उत्तर । कोणी एका द्विजासी ॥ २५७ ॥
तंव बाजीराव बळवंत । फडके उपनांव विख्यात ।
त्यांनीं आग्रह करोनिया बहुत । घेवोनिया पैं गेले ॥ २५८ ॥

स्नान संध्या सारोन । नित्य करावें तेथें भोजन॥
जगीं लीलामात्रें करून । अध्ययन पैं करिती ॥ २५९ ॥
रघुनाथ दीक्षित जोगळेकर । त्यांपाशीं दशग्रंथ समग्र ।
थोडके दिवसांत सत्वर । मुखोद्गत पैं केले ॥ २६० ॥
त्याचे एथें पढत असतां । चमत्कार दाविला समस्तां ।
मार्गानें चालत असतां । आकाशीं गमन करावें ॥ २६१ ॥
यजमानाचे गृहापर्यंत । पाउल न लागतां भूमींतें ।
सर्व विद्यार्थी आश्चर्य करित । विद्यागुरूतें सांगती ॥ २६२ ॥
तैसेंच यजमानाचे घरीं । देवपूजेसी खोलीमाझारी ।
बैसले असतां प्रथम प्रहरीं । चमत्कार वर्तला ॥ २६३ ॥
देवपूजा करीत असतां । गुप्त जाले अवचिता ।
खोलीमाजी शोध करितां । ठिकाण नाहीं लागला ॥ २६४ ॥
प्रचीति पहावया लागून । प्रयत्न करिती यजमान ।
दोन्ही कपाटें लावून । खोली माजी कोंडिलें ॥ २६५ ॥
परतोनिया अन्त पाहती । तंव गुप्त होवोनि न दिसती ।
सर्वांचि दीडा प्रहराप्रती । जैसें तैसें पाहिलें ॥ २६६ ॥
आसना वरुतें जप करित । बैसले असतां ध्यानस्थ ।
आसन उडावें दोन हस्त । एकाएकीं ते समयीं ॥ २६७ ॥
त्याचिये माडीवरी । क्रीडा करिती जार-जारी ।
आपण असतां देवघरीं । ओळखावें तेथुनी ॥ ५६८ ॥
सर्वेचि त्या उभयतांनीं । येवोनि लागावें चरणीं ।
क्षमा करावी ह्मणोनि । वारंवार विनवावें ॥ २६९ ॥
गृहीं असोनि विळभरीं । रात्रीं जावें वनांतरीं ।
तेथें दत्तात्रयाची फेरी । येती झाली अकस्मात ॥ २७० ॥
होवोनि दर्शन संभाषण । जालें पूर्व देहाचें स्मरण ।
ब्रह्मावरी समरसून । एकरूप जहालें ॥ २७१ ॥
श्रीदत्त पुसती वर्तमान ; कोठें जालें आहे राहणें ।
ध्यानस्थ बसावयाचें स्थान । दाखवावें आह्मांतें ॥ २७२ ॥
मग उभयतां हात धरूनि । येते जाले ध्यानस्थानीं ।
जेथें बैसत होते निशिदिनीं । माडीवरी एकांतीं ॥ २७३ ॥
गंगातीरीं अति निकटीं । माडीवर गुंफा नेटकी ।
प्रतिदिनाप्रति एकाकी । ध्यानस्थ तेथें बैसावें ॥ २७४ ॥

तें स्थान दत्तात्रयासी । दाखविलें अतिसायासीं ।
नित्य नित्य त्या स्थळाशीं । श्री दत्तांनीं पैं यावें ॥ २७५ ॥
ऐसें प्रतिदिनीं बरवें । येवोनि संभाषण गौरवें ।
तत्वविवरण करावें । कोणालागीं न कळतां ॥ २७६ ॥
जगामाजि कीर्ति अपार । व्हावया लागली वारंवार ।
लीलामात्रें चमत्कार । सर्वांलागीं दीसती ॥ २७७ ॥
पूर्व दिशेसि कचेश्वर । क्षेत्राहून योजनें चार ।
कोणे एके दिनीं सत्वर । दर्शनासीं पैं गेले ॥ २७८ ॥
तेथें आरंभिल्या प्रदक्षिणा । तंव चमत्कार जाला तया स्थाना ।
तो मी सांगतों श्रोतेजनां । श्रवण केला पाहिजे ॥ २७९ ॥
प्रदक्षिणा करित असतां । माध्यान्हीसी यावा सविता ।
ऐसे प्रतिदिनीं तत्वता । व्हावयासी लागलें ॥ २८० ॥
मस्तकासी लागावें उष्ण । चालती भाजती चरण ।
तंव चमत्कार वर्तला जाण । तये काळीं ते स्थानीं ॥ २८१ ॥
कचेश्वर मूर्ति आपण । फडकियांचे स्वप्नीं येऊन ।
सांगते जाले वर्तमान । अंतरींचे आपुले ॥ २८२ ॥
मजलागीं लागतें उष्ण । कष्टी होतो रे रघुनंदन ।
तरी देई छाया करून । तया ठाया येउनी ॥ २८३ ॥
मग फडकियानें सत्वर गती । छाया करोनि दिधली निगुती ।
आपण जाऊनिया प्रतीती । देवापाशीं पाहिली ॥ २८४ ॥
तेथें अनेक ब्राह्मण । करित होते अनुष्ठान ।
त्यांचे स्वप्नीं कचेश्वरानें । रात्रीं येवोनि कथियेलें ॥ २८५ ॥
रघुनाथ बावा यया स्थानीं । तपस्वियांमाजीं शिरोमणी ।
ते समजोनि माझे स्थानीं । सांगतील तें ऐका ॥ २८६ ॥
ऐसा रात्रीसी दृष्टांत । होता जाला त्या विप्रांतें ।
मग त्यांनीं जाला जो वृत्तांत । स्वामीपाशीं कथियेला ॥ २८७ ॥
वारंवार कर जोडून । द्विज करिती साष्टांग नमन ।
ह्मणती आह्मांसी आज्ञा प्रमाण । ज्या रीतीनें कराल तो ॥ २८८ ॥
तयातें सांगती महाराज ! तुमचे निश्चयीं सर्व काज ।
मनोगत असतील ते सहज । पूर्ण होतील निश्चयीं ॥ २८९ ॥
द्विजवरांनीं आज्ञा घेऊन । निघते जाले तेथून ।
गृहासी जातां कार्यसाधन । सर्व जालें तयांचें ॥ २९० ॥

असो स्वामी तये स्थानीं । काहीं काळ प्रदक्षिणा करूनी ।
जनस्थानाप्रती फिरोनी । येते जाले मागती ॥ २९१ ॥
महादेव बावा यतीश्वर । जे ब्रह्मविद्येचे रत्नाकर ।
शांति क्षमेचे मेरुमांदार । अचळपणें सर्वदा ॥ २९२ ॥
जयाची कीर्ती-मंदाकिनी । चालिली जगत्स्वर्गा वरूनी ।
भागीरथी निर्मळ पाणी । दया तेचि पैं वाहे ॥ २९३ ॥
असो तयाप्रती शरण । जावोनि वंदिले चरण ।
लोक संग्रहाकारणें । शिष्यत्वलीला दाविली ॥ २९४ ॥
असो ते स्वामी पंचवटींत । रहात होते माठिके आंत ।
प्रतिदिनीं तयाचे दर्शनातें । जात असावें एकलें ॥ २९५ ॥
तव येता आला वर्षाकाल । गंगोजळें भरूनि तुंबळ ।
चालिली असे उतावेळ । रात्रंदिवस सारखी ॥ २९६ ॥
पैलतीरा जावयासी । उतार नाहीं गंगेसी ।
मग उदकावरोनी चरणचालीसी ॥ जाते झाले परतीरा ॥ २९७
जो काळ गंगेची भरती । अक्षईपणें राहिली होती ।
तो काळ ऐसिया रीती । गुरुदर्शना पैं जावें ॥ २९८ ॥
कोणी एक्या समयांतरीं । बसले असतां आसनावरी ।
रात्र जाली प्रहरभरी । निबिड अंधारी पडिलीसे ॥ २९९ ॥
दर्शनासी विप्रमंडळी । येती जाली तयेकाळीं ।
तंव एकाएकीं नेत्रकमळीं । प्रकाश दिसे शोभायमान ॥ ३००
जैसें चंद्राचें चांदणें । प्रकाश दिसे शोभायमान ।
त्या तेजें गुंफा संपूर्ण । भरोनिया पैं गेली ॥ ३०१ ॥
द्विज स्तविती वारंवार । धन्य धन्य जी स्वामी रघुवीर ।
आमुचें प्रारब्ध आजि थोर । जे ऐसी प्रभा पाहिली ॥ ३०२ ।
तंव इतुकियांत चमत्कार । होता जाला दुसरा प्रकार ।
स्वामीप्रति शीतज्वर । प्राप्त झाला होता पै ॥ ३०३ ॥
शीत यावयाची वेळा । प्राप्त झाली तये काळा ।
मग कंथा काढोनि तात्काळा । सव्यभागीं ठेविली ॥ ३०४ ॥
तीत निज सामर्थ्यें करूनि । शीत ठेविलें काढूनी ।
कंथा तया योगें करून । उडावयासी लागली ॥ ३०५ ॥
दृष्टीसी हा चमत्कार । पहाते झाले ते द्विजवर ।
मग नमस्कार वारंवार । घालोनिया वंदिती ॥ ३०६ ॥

तयाचे दुसरिये दिनीं । यात्रा आली काशीहूनी ।
वर्तमान सर्वांहीं तयांनीं । येवोनिया कथियेला ॥ ३०७ ॥
रघुनाथ स्वामी काशी माझारी । प्रत्यक्ष पाहिले डोळेभरी ।
ते येथेंहि दिसती त्यापरी । काशींत आह्मी पाहिले ॥३०८॥
असो तया रीतीं रामेश्वर । पाहोनि आले अतिसत्वर ।
न उगवतां दिनकर । एवया रात्रींत पैं आले ॥३०९॥
दुसरे दिवसाप्रति जाण । येवोनि केलें पारण ।
तृप्त केले द्विजगण ! यात्रा सफळ पैं केली ॥३१०॥
यजमानाचे गृहीं असतां । चमत्कार जाला तत्वतां ।
यजमान पत्नि पतिव्रता । गरोदरा होती पैं ॥३११॥
पूर्ण जाले नवमास । येता जाला प्रसूतीदिवस ।
रात्रौ पोट दुखावयास । लागलें बहुदस ते काळीं ॥३१२॥
निघोनि गेली सर्वयामिनी । उगवता जाला दिनमणी ।
बहुत सूतिका बोलावुनि । यजमानें आणित्या ॥३१३॥
करितां बहुतसा प्रयत्न । प्रसूतिशुद्धी नोहेचि जाण ।
आडवें आलें ह्मणवून । प्रयत्न सर्वी साडिला ॥३१४॥
घडी अर्धघडी मार्जा प्राण । पतिव्रतेचा जावा निघून ।
तों इतुकियांत कळलें वर्तमान । रघुनाथ गुरु लागुनी ॥३१५॥
मग स्वामींनीं केला चमत्कार । सूक्ष्मरूप अतिसत्वर ।
होवोनी प्रवेश नेत्रद्वारें । करिते जाले उदरीं ॥३१६॥
नाभितळासि जाऊन । गर्भ दिला लोटून ।
सवेंचि मग नेत्राकडून । निघते जाले ते काळीं ॥३१७॥
असो कोणे एके अवसरीं । यजमानाची सावकारी ।
पंधरा सहस्त्राचा रोखा करीं । घेवोनी चरणीं अर्पिला ॥३१८॥
ह्मणे हें द्रव्य संपूर्ण । तुह्मास्तव दिलें सोडून ।
कपर्दिक न घेतां जाण । रोखा फाडून टाकिला ॥३१९॥
यजमान करी स्तुतिस्तवन । म्हणे धन्य आमुचें प्राक्तन ।
ह्मणोनि ऐसें निधान । आमुचे घरा पातलें ॥३२०॥
ऐसें जालिया उपरी । बंड झालें ग्रामा माझारीं ॥
ब्राह्मण घातलें अंधारी । बंदिशाळेमाझारी ॥३२१॥
मनुष्य मात्रासी धरावे । नासिक कर्णासी छेदावे ।
ऐसें प्रतिदिनीं बरवें । व्हावयासी लागलें ॥३२१॥

तंव आलीसे अर्धयामिनी । स्वामी येती अरण्यांतुनी ।
तों एक दूत त्यांतें पाहुनीं । पृष्ठभागीं धांवला ॥ ३२३ ॥
तो यवन महादुष्टराशी । उपसोनिया असिलतेसी ।
मारूं पातला स्वामींशीं । क्रोधयुक्त होवोनी ॥ ३२४ ॥
तंव शस्त्रासहित त्याचा हस्त । वरतेंचि राहिला निश्चित ।
बोलूं जाता वाचा कुंठित । होवोनिया गेलीसे ॥ ३२५ ॥
तटस्थपणें स्वामीतें पाहे । हस्त कदापि खालीं नये ।
याचिप्रकारें घटिकाद्वय । होती जाली ते काळीं ॥ ३२६ ॥
मग बोबडी वळूनिया जाण । पुसता जाला वर्तमान ।
स्वामी तुह्मी आहा कोण । मजलागि सांगिजे ॥ ३२७ ॥
एक असतां अनेक । मजलागीं दिसतसां देख ।
मी नेणें अतिमूर्ख । तुमाचिया स्वरूपातें ॥ ३२८ ॥
तरि माझिया अन्याया । क्षमा करोनि देवराया ।
हस्तालागुनि माझिया । आतां खालीं आणावें ॥ ३२९ ॥
स्वामि कृपावंत होऊन । पाहाते जाले त्या लागून ।
मग हस्त खालतें येऊन । पूर्ववत तो जाला ॥ ३३० ॥
मग स्तवनातें आरंभून । करिता झाला साष्टांग नमन ।
जाता झाला तो यवन । आपुलिया स्थळासी ॥ ३३१ ॥
क्षेत्रांतील विप्रमंडळी । बंडवाल्यांनीं तये काळीं ।
बंदीं घालोनिया सकळी । द्रव्य बहुत मागती ॥ ३३२ ॥
मग तया सर्व विप्रांनीं । रघुनाथ स्वामीतें स्मरूनि ।
निघते जाले तथुनि । मौनपणें सर्वही ॥ ३३३ ॥
बैसले असतां पाहरेकरी । नदिसतां तयांचिया नेत्रीं ।
निघोनिया द्विज सत्वरी । जाते जाले गृहासी ॥ ३३४ ॥
असो कोणे एके समयांतरीं । रोगी द्विज येवोनि सत्वरी ।
सप्तशृंग पर्वतावरी । देवीपाशीं बैसला ॥ ३३५ ॥
पायाप्रती पडिलें छिद्र । मांस झडोनि गेलें समग्र ।
दिसावयासि अस्थिमात्र । तयास्थळीं राहिली ॥ ३३५ ॥
औषध करितां शीणला । ह्मणूनि जिवासी त्रासला ।
देवीपाशीं निग्रहे केला । सप्तशृंगा जाउनी ॥ ३३७ ॥
कडकडाट निराहारी । राहिला सप्त दिन वरी ।
मग देवी येवोनि स्वप्नांतरीं । सांगती जाली तयातें ॥ ३३८ ॥

तूं एथोनि जाई सत्वरीं । जनस्थान क्षेत्रामाझारीं ।
रघुनाथ बावाचिये द्वारीं । जाऊनीया पडे कां ॥ ३३९ ॥
त्याचे कृपादृष्टी करून । चांगले होतील तुझे चरण ।
हें वचन मानुनि प्रमाण । निघे एथूनि सत्वरीं ॥ ३४० ॥
ऐसा होतांचि दृष्टांत । ब्राह्मण होवोनि जागृत ।
दिनमणि पावतां उदयातें । पर्वता खालीं उतरला ॥ ३४१ ॥
बहुत प्रयत्नें करून । मार्ग क्रमोनिया जाण ।
जनस्थानाप्रति येणें । केलें तया विप्रानें ॥ ३४२ ॥
स्वामीतें पाहोनि नयनीं । नमस्कारोनी जोडी पाणी ।
ह्मणे सप्तशृंगीची भवानी । स्वप्न देती जहाली ॥ ३४३ ॥
तिनें आपणाकडे वहिलें । मजलागीं पाठविलें ।
माझे पाय होती चांगले । ऐसी आज्ञा करावी ॥ ३४४ ॥
यापरि बोलोनिया वचन । गुंफेचे निकटभागीं जाण ।
रोगी पडला आपण । प्रेतासम ते काळीं ॥ ३४५ ॥
प्रतिदिनीं स्वामीदर्शन । होतसे त्या द्विजालागून ।
ऐसे लोटितां सप्तदिन । शुद्ध चरण जहाले ॥ ३४६ ॥
वरते मांस आलें भरून । त्वचा जाली समान ।
आरोग्य होवोनि ब्राह्मण । चरणाप्रति लागला ॥ ३४७ ॥
जोडोनिया उभय कर । स्तुति करीत वारंवार ।
जी जी स्वामी रघुवीर । सुखी जालों मी आतां ॥ ३४८ ॥
आरोग्य होऊनि सर्व शरीर । चरण चाली तो द्विजवर ।
निजग्रामाप्रति सत्वर । जाता जाला तेधवां ॥ ३४९ ॥
एक्या ब्राह्मणाच्या स्त्रियेसी । प्रतिबंदी होती संततीसी ।
ह्मणोनि रघुनाथ स्वामीसी । नवस करिती जहाली ॥ ३५० ॥
मजप्रति जालिया पुत्र । तयासि घेऊनि मी सत्वर ।
घालावयासी चरणावर । येईन स्वामी दयाळा ॥ ३५१ ॥
यापरि करोनिया नवस । संवत्सर लोटतां त्यास ।
पुत्र होता झाला तियेस । इच्छिलिया सारिखा ॥ ३५२ ॥
सहामास जालियावरीं । चालोनि तीस योजनवरी ।
नवस पुरवावया अत्यादरी । जनस्थाना पातली ॥ ३५३ ॥
उभयताही स्त्रीपुरुष । येऊनि लागती चरणास ।
ह्मणती स्वामी अवतंस । तुमचे कृपें लाधलों ॥ ३५४ ॥

स्वामी देती आशीर्वचन । शतायु होवो हा नंदन ।
तुमचें अक्षयीं कल्याण । असो ईश्वरप्रसादें ॥ ३५५ ॥
मग तया द्विजवरांनें । केलें ब्राह्मणसंतर्पण ।
मागती चरणाशीं लागून । जाता जाला स्वदेशा ॥ ३५६ ॥
सर्वेचि पुण्यग्रामींचा द्विजवर । ऐकोनि ऐसा चमत्कार ।
प्रतीत पहावया सत्वर । येता झाला तेधवा ॥ ३५७ ॥
माध्यान्हीं पातला दिनकर । स्वामी गेले गंगेवर ।
हें पाहोनी तो द्विजवर । जाता जाला सन्निध ॥ ३५८ ॥
पाषाणाची करोनि खूण । स्वामीसी करी संभाषण ।
अर्घ्यप्रदानापूर्वी आपण । गुंता करोनि बैसला ॥३५९ ॥
ऐसा चार घडिपर्यंत । बैसला तो द्विज बोलत ।
तंव सूर्य अर्घ्यप्रदान विरहित । न चालेचि पुढारीं ॥ ३६० ॥
न ढळे पाषाणाची छाया । आश्चर्य वाटलें बहुसाल तया ।
मग द्विज लागोनिया पायां । वारंवार स्तावितसे ॥ ३६१ ॥
स्वामी उठोनि अर्घ्य देती । तंव सूर्य चालला सत्वर गती ।
छाया धरोनिया निगुती । गेली दूर तेधवां ॥ ३६२ ॥
ऐशी वार्ता बहुता प्रकारीं । ऐकिली क्षेत्रांतील द्विजवरीं ।
मग धावती सहपरिवारीं । स्वामीप्रती विनवावया ॥ ३६३ ॥
जावोनिया धरिती चरण । ह्मणती हे स्वामी दयाघन ।
आपण क्षेत्रीं असून । आह्मी दीन जाहालों ॥ ३६४ ॥
दरिद्रें बहुत पीडिलें । महर्गतेचे दिवस आले ।
मरण समय पातले । आह्मालागीं ये समयीं ॥ ३६५ ॥
तरि ऐसी कृपा करावी । आह्मा सर्वांची विपत्ती जावी ।
सुखोत्पत्ती आघवी । प्राप्त व्हावी आह्मांतें ॥ ३६६ ॥
तयाप्रती संबोधून । दिधलें गृहासी लावून ।
आपण एकांतीं बैसून । चमत्कार पैं केला ॥ ३६७ ॥
आपले मनें करून । श्रीमंतांचे चित्तीं प्रवेशून ।
लक्षावधि द्रव्यालागून । क्षेत्राप्रति देवविलें ॥ ३६८ ॥
असो श्रोत्यालागीं माझी विनवणी । हे चमत्कार पाहिले सर्वांनीं ।
परि माझ्या प्रत्यया लागुनी । आले तें मी सांगतों ॥ ३६९ ॥
जया दिनीं या ग्रंथासी । आज्ञा केली लेखनासी ।
तेव्हां बोलत श्रीदत्तासी । बैसले होते गुंफेंत ॥ ३७० ॥

घेवोनि दत्ताचें दर्शन । स्वामीप्रती पाहिलें जाण ।
तंव द्वादश वर्षांचे आपण । मजलागी दीसले ॥ ३७१ ॥
सर्वजग निज्लियावरी । दत्तात्रयासि अवघे रात्रीं ।
निद्रा न घेता उभयत्रीं । बैसलेची असावें ॥ ३७२ ॥
जन्मलिया दिवसापासून । शेवटवरी निद्रेलागून ।
येऊं दिलें नाहीं जाण । नेत्रालागीं सर्वथा ॥ ३७३ ॥
धन्य धन्य हा रघुराव । जयाची लीला अभिनव ।
वर्णावया ब्रह्मदेव । न सकेची सर्वथा ॥ ३७४ ॥
एकाकि असावें आपण । लक्षोनिया घोर विपिन ।
निशिदिनीं एकांतस्थान । सेवोनिया असावें ॥ ३७५ ॥
फळमूळ कंदाचें सेवन । न भक्षितां उत्तम अन्न ।
सक्तुक पीठाचें सेवन । उदकासवें करावें ॥ ३७६ ॥
एक्या अंगवस्त्रानिशीं । शीत काळीं क्रमावी निशी ।
सुखोत्पत्ति देहासी । देणें नाहीं सर्वथा ॥ ३७७ ॥
ब्रह्मचर्य कडकडाट । वैराग्याचा हव्यवाट ।
पेटवोनीं इंद्रियासकट । प्राणहोमीं होमिती ॥ ३७८ ॥
स्वप्नींहि स्त्रियेचें मुख । पाहिलें नाहीं सन्मुख ।
नेत्र उघडोनी निःशंक । दृष्टी लागी सर्वथा ॥ ३७९ ॥
कोणी एक्या समयांतरीं । एक्या भाग्यवंताची कुमारी ।
लावण्य लतिका तारुण्यवरी । उन्मादता पावली ॥ ३८० ॥
वस्त्राभरणें अलंकार । लेवोनिया ती सुंदर ।
येवोनि पडली अंगावर । एकांतनिशी पाहूनी ॥ ३८१ ॥
स्वामी नेत्र उघडोनि ग्हाति । तंव कामानळें व्यापिली युवती ।
मग विस्मयो मानुनिया चित्तीं । नेत्र झाकोनि बैसलें ॥ ३८२ ॥
ऐसे चार घटिकापर्यंत । कामिनी हावभाव दावीत ।
येवोनि अंगासि कवळित । कामभरित होवोनि ॥ ३८३ ॥
परी न पाहती तिजकडे । जेसें पिशाच अंगावरी पडे ।
कां राक्षसीण घालोनिया सांकडें । भक्षावया पातली ॥ ३८४ ॥
मग ती सुंदरी कंटाळून । जाती जाली होवोनि खिन्न ।
परि स्वामींचें उतावळें मन । जालें नाही सर्वथा ॥ ३८५ ॥
तस्मात् धन्य तो रघुराव । जो वैराग्यसिंधू अभिनव ।
किंवा धैर्यमेरूचाचि ठाव । अचळपणें सर्वदा ॥ ३८६ ॥

जो तपोधनांमाजी श्रेष्ठ । भृगुऋषीचा अवतार वरिष्ठ ।
कलिमाजी प्रगटला स्पष्ट । जनोद्धार करावया ॥ ३८७ ॥
जो ब्रह्मविद्येचा रत्नाकर । अद्वैतबोधरत्नें सुंदर ।
सुमुक्ष पाहोनिया चतुर । निजकृपें लेवबी ॥ ३८८ ॥
जो आत्मतत्वातें दाविता । जो चैतन्यातें जागविता ।
अज्ञ जनांतें शक्तिपाता । करोनिया उद्धरी ॥ ३८९ ॥
आतां श्रोतें होइजे सावधान । मागील कथेचें अनुसंधान ।
रेवातीरींचे मुनिजन । गंगातीरीं अवतरले ॥३९०॥
त्यांतें तत्वविद्या उपदेशुन । दिधलें पूर्वजन्मस्मरण ।
ते जगामाजी गुप्तपण । सेवोनिया राहिले ॥ ३९१॥
श्रीरघुनाथ दयाकर । पूर्वेसि उगवला दिनकर ।
त्याचे सुप्रभें वारिकर । भक्त प्रेमळ विकसती ॥३९२॥
सद्गुरुराय हा निशाकर । आह्मी शिष्य हे चकोर ।
चिद्रस सेवोनि परिकर । ब्रह्मानंदें क्रीडतसों ॥३९३॥
जयजय स्वामी रघूत्तमा । त्रैलोक्यामाजी तुमची प्रतिमा ।
शोधोनि पाहतां सर्वोत्तमा । न दिसेची कदापि ॥३९४॥
तू अप्रतिम अगोचर। आक्रिय असंग अनावर ।
निरंजन हा वारंवार । त्या तुजप्रती नमितसे ॥३९५॥
इतिश्री ब्रह्मनिष्ठविजय । सार कथिला अभिप्राव ।
अज्ञ जनासी तरणोपाय । प्राकृत कथियेला ॥३९६॥

॥ श्री दिगंबरार्पणमस्तु ॥



॥ श्री ॥

# ॥ अथ आत्मबोध-प्रकाशिनी-प्रारंभः ॥



श्रीगुरुदत्तात्रेयायनमः॥ श्रीगुरुरघुनाथाय नमः॥ श्रीगणेशायनमः ॥ ॐनमोजि श्रीगुरुनाथा। परात्पर स्वामी अवधूता। त्रैलोक्यभारि तुझि सत्ता। वर्ते एकपणेंसि ॥१॥ तुं येकाचि आसतां अनेक। होउनि ह्मणविसी जगन्नायक। परंतु येकपणाचि तुक। तुटों न देसि सर्वथा ॥२॥ जगदाकाराचि सोंड। लांबउनि म्हणविसि वक्रतुंड। लीला दाखवोनि उदंड। आलिप्तत्वें राहासि ॥३॥ अंगींच दाखविसि माया। जैसि शरीरप्रभावें छाया। सेखिं अद्वैतपणही वाया। जावों न देसि सर्वथा ॥४॥ इच्छामात्रें जीव आणि ईश्वर। अपुणाचि होउनि द्विप्रकार। सेव्यसेवकत्व लोकाचार। वाढविसि निजशक्ति ॥५॥ तुझिया अंशमात्रें करून। जीव-कोटि-निविष्टपण। मागुं पातलों वरदान। ग्रंथ सिद्ध व्हावया ॥६॥ तुम्हि म्हणाल मी निर्गुण। कैचें मागसी तुं वरदान। निष्क्रियातें क्रियत्वपण। लाउं नये किं सर्वथा ॥७॥ तरि तुमचेंचि स्पष्टोत्तर। भगवत् गीतेमाजि परिकर। तेंचि स्मरुनी वारंवार। तया अधारें विनवितों ॥८॥ श्लोक — 'यदा यदाहि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत। अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानम् सृजाम्यहम् ॥१॥' होवोनि धर्माचि ग्लानि। जालिया अधर्माचि उभाराणि। तेव्हां मी आपणातें निर्मोनि। धर्मालागि स्थापितों ॥९॥ आत्मविद्या हा मुख्य धर्म। स्थापावया अतीसंभ्रमें। प्रगटवोनिया निजवर्म। अविद्या अधर्म नासितो ॥१०॥ यया करितां मी युगायुगिं। होवोनि सर्वज्ञ महायोगि। भक्तजन संरक्षावया लागि। नाना अवतार धरितसे ॥११॥ कृतायुगीं जाले श्रीदत्तात्रय। त्रेतायुगिं वासिष्ठ मुनिवर्य। द्वापारिं बुद्धिप्रतापवीर्य। व्यास आपण जाहाले ॥१२॥ कलयुग हा चवथा प्रहर। जाला शंकराचार्य अवतार। तया पाठिं श्रीरघुविर। जनस्थानिं प्रगटले ॥१३॥ जे शांतीचे मुख्य कोंभ। जे ब्रह्मांडीचे धैर्यस्तंभ। मूर्तिमंत ब्रह्मचि स्वयंभ। जगदोधारा प्रगटले ॥१४॥ जयाच्चिया वचनें करून। हारलें माझें जन्ममरण। दिधलें पद निरंजन। अखंडित निवासा ॥१५॥ ऐसि चतुर्युगाचे ठाइं। धर्म संस्थापना केली पाहि। ह्मणोनि स्वामीच्चिया पाइं विनंति करितों आदरें ॥१६॥ आचार्य वाणी अतीप्रासिद्ध। ग्रंथानाम आत्मबोध

प्राकृत जनासि व्हावया बोध । टीका करूं इच्छितों ॥ १७ ॥ परि जालिया आपुलें वरदान । करीन ग्रंथाचें निरोपण । करीन ह्मणतां लाजे मन । परि शक्ति स्वामी कृपेचि ॥ १८ ॥ आतां श्रोते होइजे सादर । सद्भाव धरोनि अत्यादर । आचार्यवाणि परिकर । श्रवणद्वारिं सेवावी ॥ १९ ॥ परी या आत्मबोधाचा श्रवणासि । अधिकार पाहिजे श्रोतियासि । ह्मणोनिया प्रथम श्लोकेंसि । वदते जाले आचार्य ॥ २० ॥

तपोभिः क्षीणपापानां शांतानां वीतरागिणाम् ॥
मुमुक्षूणामपेक्ष्योय मात्मबोधोविधीयते ॥ १ ॥

टीकाः—करोनि सात्वीक तप आनुष्ठान । पातकें क्षीण जालिं तिहीं करून । शांतींवैराग्य मुमुक्षुत्वपण । असेल तोचि अधिकारी ॥ २१ ॥ येरासि नोव्हे अधिकार । सांगतां वृथा जाति उत्तर । पर्वतिं जालिया अपार । मेघवृष्टि जापरि ॥ २२ ॥ या करितां अधिकारि श्रोता । उत्तमचि पाहिजे प्रमाता । जैसे सुक्षेत्रीं बीज पेरितां । तात्काळचि उगवे ॥ २३ ॥ आतां तया अधिकारियाचें लक्षण । करोनि सांगतों विशिदिकरण । अर्थान्वय जेणें करून । श्रोतियासि कळों ये ॥ २४ ॥ तप ह्मणजे स्ववर्णाश्रमें करून । नित्य नैमित्यक आनुष्ठान । नित्य संध्या वंदनादि जाण । नैमित्यक कृछ्र चांद्रायणादि ॥२५॥ काम्यकर्माचा करोनि त्याग । निसिद्धाचा मोडोनि माग । करणें जें कां कर्म सुभग । यया नामें सात्वीक तप ॥ २६ ॥ नानापरि चिंता खेद विस्मय । ऐसे जे का अंतःकरणांतील अशय । हे सर्वस्वें पावले क्षय । यया नामें शांति पै ॥ २७ ॥ येथील स्रगचंदनादि भोग । स्वर्गीं आमृतपान देवांगनासंग । ये विषइं जों करणें त्याग । या नांमें वैराग्य बोलिजे ॥ २८ ॥ येक्या मोक्षाचिया वांचून । दुजें न चिंति जयाचें मन । या नामें मुमुक्षुत्वपण । सत्य जाणा श्रोते हो ॥ २९ ॥ ऐसा जो कां सदाचारि । तोचि येथें अधिकारि । ऐसि आचार्यवाणि सुंदरि । वदति जालि स्पष्टत्वें ॥ ३० ॥ तंव सिष्य तपस्वि पुण्यसीळ । वैराग्य सेवोनिया निर्मळ । मोक्षालागि अती विव्हळ । होवोनि जाला बोलता ॥ ३१ ॥ जीजि स्वामि कृपामूर्ति । ऐसें वाटतें माझिया चित्ति । तें निवेदितों श्रीचरणाप्रति । श्रवण केलें पाहिजे ॥ ३२ ॥ मी करित आलों सत्कर्मातें । तेणेंचि मोक्ष होईल मातें । कीं आणिक उपाय मोक्षातें । असे काय स्वामिया ॥ ३३ ॥ मग कृपा-सिंधुसि येउनि भरतें । जाले स्पष्टोत्तरा देते । ऐकें सत्सिष्या हे मी तूंतें । निश्चयेसि सांगतों ॥ ३४ ॥

बोधोऽन्यसाधनेभ्योहि साक्षान्मोक्षैकसाधनम् ।
पाकस्य वन्हिवद्ज्ञानम् विनामोक्षोनसिध्यति ॥ २ ॥

केलि नित्यनैमित्यक कर्म । अथवा अष्टांगयोग संभ्रम । जरी केला सव इंद्रियांचा उपरम । परि बोधा वाचोनि मोक्ष नोव्हे ॥ ३५ ॥ ब्रह्मचर्यत्व नैष्टिकपण। अथवा ग्रहस्थाश्रम विधी करून । जरि वानप्रस्त सेविलें दारुण । परी बोधावाचोनि मोक्ष नोव्हे ॥ ३६ ॥ सोडोनि स्त्रिपुत्राचा संग । अंतरिं सेउनिया विराग । जरि केला सिखा-सुत्राचा त्याग । परि बोधावाचोनि मोक्ष कैंचा ॥ ३७ ॥ अथवा उदंड केलें दान । किंव्हा पुत्रसंतति करून । जरि सर्व तीर्थि केलें स्नान । परि बोधावाचोनि मोक्ष कैचा ॥ ३८ ॥ अथवा यज्ञयागादि कर्म केले । किं वापिकूप तडाग खणिले । जरि उदंड देवालयें बांधिले । परि बोधावाचोनि मोक्ष कैंचा ॥ ३९ ॥ येकादसि सोमवार व्रत । अथवा कृछ्र चांद्रायणादि समस्त । जरि केलीं सर्वहि पुराणोक्त । परि बोधावाचोनि मोक्ष कैंचा ॥ ४० ॥ ऐसि परिसोनि आचार्यवाणि । सिष्य करिता जाला विनवाणि । जें का सांगितलें वेदशास्त्रपुराणिं । तें काय व्यर्थ मानावें ॥४१॥ वेद सांगतसे कर्माचरण । शास्त्रें करिति आश्रम विवरण । पुराणें सांगति व्रतदान । ते काय व्यर्थ मानाविं ॥४२॥ मोक्ष नोव्हे जरि कर्में करून । तरि कां करावा वृथा सीण । कांडितां न सांपडे जरी कण । तरि कां कोंडा कांडावा ॥ ४३ ॥ ऐसें ऐकतां सिष्य वचन । सद्गुरु बोलति करुणाघन । नका घेउं तुं अडरान । ऐक वचन माझें पैं ॥४४॥ योगयागादी कर्माचरण । परंपरा मुक्तीसी कारण । जैसें जलभांड आणि इंधन । पाकालागि सामुग्रि ॥ ४५ ॥ परी अग्नि पेटल्या वीण । पाक सर्वथा नोव्होचि जाण । तैसा आत्मबोधाचिया विण । मोक्ष नोव्हेच्चि सर्वथा ॥ ४६ ॥ परि बोध व्हावया कारणें । केलिं पाहिजे सदाचरणें । जप-तप आणि अनुष्ठानें । वेदोदित सर्वही ॥४७॥ निष्काम कर्म ईश्वरार्पण । करितां होतसे पाप-हानन । शुद्ध होऊनि अंतःकरण । वैराग्य बाणे अंतरिं ॥४८॥ मग होऊनिया मुमुक्षुवंत । सद्गुरुतें जालिया शरणागत । सद्गुरु बोधितां महावाक्यार्थ । बोध-भानु उगवे ॥ ४९ ॥ मग मोक्षाचिया वाटा । अनुभवें दिसति गा चोखटा । मूळ अज्ञानासि देशवटा । देउनिया तत्क्षणिं ॥५०॥ तूं म्हणसि कार्मि सामर्थ्य विशेष । तेणेंचि करोनि अज्ञान नाश । बोधावाचोनिया मोक्षास । पावेन मी निश्चइं ॥ ५१ ॥ तरि कर्माचें अज्ञान कारण । तेणें नोव्हे अज्ञान हनन । येथें पाहिजे प्रकाशघन । बोध भानु सतेज ॥ ५२ ॥

अविरोधितया कर्म नाविद्यां विनिवर्तयेत् ।
विद्याविद्यां निहंत्येव तेजस्तिमिरसंघवत् ॥ ३ ॥

टीकाः—नवज्वर येतां रोगिया अंगिं । दुग्ध पाजिली तयालागि । रोग न जातां लागवेगिं । मृत्युगृहासि जाय तो ॥ ५३ ॥ किं कामिलागि कामशास्त्र । किं भ्रमिलियालागि मोहनास्त्र । तैसें अज्ञाननाशनि कर्मशास्त्र । उपेगा लागि नयेचि ॥ ५४ ॥ अग्नि लागला गृहासि । वरति प्रोक्षणें तैलासि । कर्मैं करुनिया आज्ञानसि । नाश तैसा नोव्हेचि ॥ ५५ ॥ कर्म सानकूळ अज्ञानासि । म्हणोनि अज्ञान न नासे तयासि । येथें पाहिजे विनाशासि । विरोधि भाव निश्चित ॥ ५६ ॥ जैसें ज्वरितासि कटु वोषध । किं भ्रमिष्टालागि पंचाक्षरि प्रसिद्ध । कीं कामिकालागि वैराग्य विषद । निश्चयेंसी पाहिजे ॥ ५७ ॥ जळ पाहिजे अग्निनाशासि । किं प्रकाश पाहिजे तमनिरासि । तैसें समूळ अज्ञान नासावयासि । विद्याचि येथें पाहिजे ॥ ५८ ॥ तंव सिष्य म्हणे वो स्वामिकृपाळा । प्रतिशरीरिं आत्मा वेगळा । अवच्छिन्न दिसे माझिया डोळा । त्यासी मुक्ति कैसि संभवे ॥ ५९ ॥ येके देहिं आत्मा मुक्त। आणि येके देहिं बद्ध निश्चित । हे मज वाटे संशययुक्त । महाराजा श्रीगुरु ॥ ६० ॥ मी सर्वस्वें शरणागत । दास स्वामींचा अंकित । कृपा करोनि माझें चित्त । संशयरहित करावें ॥ ६१ ॥ मग श्रीगुरु होउनिया प्रसन्न । करोनि सिष्यातें सु-ईक्षण । म्हणति होवोनि सावधान । वचन आतां परियेसि ॥ ६२ ॥

परिच्छिन्न इवाज्ञानात्तन्नाशे सति केवलः ।
स्वयं प्रकाशते ह्यात्मा मेघापायेंशुमानिव ॥ ४ ॥

परिपूर्ण आत्मा आनंदघन । अद्वितीय अखंड दंडायमान । तयातें अज्ञानवसें करून । परिच्छिन्न ऐसें भाविसि । ६३ ॥जैसें आकाशामाजिल चंद्रबिंब । तें पाहुं जातां घटावलंबें । येकचि असतां स्वयंभ । नानावीध दीसति ॥ ६४ ॥ चंद्र मोठेपणें लक्ष गावें ॥ तो लाहानसा दिसे घटासवें ॥ नेणतां मुख्य बिंबासि बरवें । परिच्छिन्न दिसे भ्रमद्रिष्टि ॥ ॥ ६५ ॥ कां जैसें येकचि असतां आकाश । तें उपाधि-योगें दिसे बहुवस । घटावच्छिन्न मठावच्छिन्न आकाश । पाहाणें जैसें अज्ञानें ॥ ६६ ॥ तैसा आत्मा अपरिच्छिन्न आसतां । अज्ञानें परिच्छिन्नवत् भासे तत्वता । त्या अज्ञानाचि जालिया निरासता । आत्मा स्वयें प्रकाशे ॥ ६७ ॥ जैसा अभ्राचा नाश होतां ।

भानु स्वयें प्रकटे तत्वता । मग तयातें आणि प्रकाशविता । नलगे कोण्हि दूसरा ॥ ६८ ॥

अज्ञानकलुषं जीवं ज्ञानाभ्यासाद्विनिर्मलं ।
कृत्वा ज्ञानं स्वयं नश्येज्जलं कतकरेणुवत् ॥ ५ ॥

रजोरूपें जें कां अज्ञान । जीव मळीन जाला तेणें गुण । तो तत्वज्ञान जें तेणेंकरून । विशेष निर्मळ होतसे ॥ ६९ ॥ तया अज्ञानाचि कार्य । अंतःकरण देह इंद्रिय । याचा अध्यास घेतला स्वयें । जीवें अपुल्या मस्तकिं ॥ ७० ॥ ह्मणे मी कर्ता आणि भोक्ता । सुखदुःखें सर्वहि तत्वता । जन्ममरणादीक वार्ता । मजला असे सर्वहि ॥ ७१ ॥ आपण शुद्ध चैतन्य असतां । देहाचें जडत्व घेवोनि माथा । त्याचिया योगें व्याकुळता । पावे जीव आपण ॥ ७२ ॥ घेवोनि अज्ञानाचि बुंथी । बैसलीसे चिज्जड-ग्रंथि । तेथें स्वरूपज्ञानाचि युक्ति । करितां उकले निःशेष ॥ ७३ ॥ तूं जरि ह्मणसील ऐसें । कीं ज्ञानेंकरून अज्ञान नासे । परि त्या ज्ञानासही कारण असे । अंतःकरणवृत्ति पै ॥ ७४ ॥ त्या वृत्तिचें अज्ञान कारण । तें स्वरूपिं संभवेल कवणे गुणें । ऐसें जरि चिंतील तुझें मन । तरी तें वचन ऐक पां ॥ ७५ ॥ जैसें डहूळिलिया उदकाप्रति । चतूर निवळीचें बीज घालिति । गाळ निवारितां तेही बैसति । कतकरेणु तळवटिं ॥ ७६ ॥ तैसा अज्ञानजनित जो संसार । तो ज्ञानवृत्तिनें होवोनि परिहार । सेखिं ज्ञानवृत्ति होउनि स्वरूपाकार । शुद्ध आत्मा उरतसे ॥ ७७ ॥ सिष्य ह्मणे वो कृपामूर्ति । अशंका उदेलि माझिये चित्तिं । संसाराचि प्रत्यक्ष प्रतीति । आसतां कैसा निवारे ॥ ७८ ॥ चार वाणि चार खाणि । चौऱ्यांसि लक्ष जीवयोनि । पिंडब्रह्मांडउभारणि । ज्ञानें कैसिं नासति ॥ ७९ ॥ देवयक्षचारणगंधर्व । अप्सरगुह्यक नागकूळ सर्व । नाना तीर्थें क्षेत्रें अपूर्व । ज्ञानें कैसिं नाशति ॥ ८० ॥ ऐसें ऐकूनि सिष्यवचन । सद्गुरु ह्मणति रे दे अवधान । तुझिया शंकेचें उत्थान । दृष्टांतयोगें वारितों ॥ ८१ ॥

संसारःस्वप्नतुल्योहि रागद्वेषादिसंकुलः ।
स्वकाले सत्यवद्भाति प्रबोधेऽसत्यवद्भवेत् ॥ ६ ॥

अगा अज्ञानाचियें निद्राभरें । सुटले संसारस्वप्नाचे काविरे । तयामाजि नाना प्रकारें । विश्व तुंतें भासतसे ॥ ८२ ॥ नाना विषय नाना भोग । तयाचा

उद्देशे द्वेषराग । हार्षशोकादिक प्रसंग । अनुभवासि गेताति ॥ ८३ ॥ जंवरि हे अज्ञाननिद्रा न मोडे । तंवरि संसार-स्वप्न न विघडे । रागद्वेषादीक वरपडे । सत्यत्वेंसि भासति ॥ ८४ ॥ तेचि आत्मानुभव-जाग्राति । प्राणियासि जालिया निगुति । संसारस्वप्नाची प्रतीति । नाश पावे तत्क्षणीं ॥ ८५ ॥ जैसें स्वप्निं स्वप्न पाहूं जाय । तंवरि मिथ्यात्व अनुभवासि न ये । तेचि जाग्रति जालिया काय । मिथ्या म्हणावें लागतें ॥ ८६ ॥ तैसें हें संसार-दीर्घस्वप्न । अज्ञानें वाटे खरेपणें । जेव्हा वास्तवीक होइल तत्वज्ञान । तेव्हां हें वाटेल मिथ्या पैं ॥ ८७ ॥ आणीक ऐकुनि घेइ दृष्टांत । जेणें हा संसार निभ्रांत । मिथ्या रूप तूज सप्रचीत । अनुभवासि येयील पै ॥ ८८ ॥

तावत्सत्यं जगद्भाति शुक्तिकारजतं यथा ।
यावन्न ज्ञायते ब्रम्ह सर्वाधिष्ठानमद्वयम् ॥ ७ ॥

जंवरि आत्मस्वरूपातें नेणता । तंवरिच जगाचि सत्यत्वता । देव-मानव स्थिर-चरें तत्वता । तथ्य मानि अज्ञानें ॥ ८९ ॥ तेचि जालिया शुद्धात्मज्ञान । सत्यत्वें नेघे जगद्भान । सर्वही आत्मा चिद्घन । पाहे ज्ञानद्रिष्टिनें ॥ ९० ॥ जैसि शुक्तिका पडतां उताणि । अज्ञानि तथेतें रजत मानि । नीलपृष्ठिं आणि त्रिकोणी । जंवरि डोळा न देखे ॥ ९१ ॥ पाहतां नीलपृष्ठि त्रिकोण । मग रजतबुद्धि मिथ्यापण । चाकचाक्यिसहित जाण । शुक्तिका येक पाहातसे ॥ ९२ ॥ तैसि काढाकाढि न करितां । सर्वाधिष्ठान अनुभवासि येतां । भ्रमाची होउनि निरासता । सच्चिदानंद सर्व गमे ॥ ९३ ॥ जंव कार्या कडोनि पाहूं जातां । तंव दिसे जगाचि सत्यत्वता । तोंचि कारण अनुभवें पाहातां । जगद्भान मिथ्या पै ॥ ९४ ॥

सच्चिदात्मन्यनुस्यूते नित्ये विष्णौ प्रकल्पिताः ।
व्यक्तयो विविधाः सर्वा हाटके कटकादिवत् ॥ ८ ॥

नित्य विष्णु सच्चिदानंद । जो जगदांकूर आणि कंद । स्थावर जंगमादि व्यक्ती विविध । आपुणचि आवघा व्यापला ॥ ९५ ॥ मानव देव यक्ष किन्नर । भूत पिशाच्च विद्याधर । तिर्यङ् योनि वृक्ष गिरिवर । अनस्यूत आत्मा सर्वत्रि ॥ ९६ ॥ जैसि मृत्तिका अनस्यूत घटासि । कीं अनस्यूत तंतु पटासि । किं सुवर्ण सर्व अळंकारासि । अनस्यूत असे पैं ॥ ९७ ॥ तैसा आत्मा व्यक्तीमात्रातें । अदिमध्य अवसानिं वर्ते । परंतु अज्ञानें कल्पी तया जगातें । भाविले

विविध ॥ ९८ ॥ तूं जरि ह्मणशील ऐसें । किं हें जग कोण्हि कल्पिलें असे । तरी तें सांगतों विन्यासें । ऐकोनि घेइ ॥ ९९ ॥ ईश्वरें मायावसें जग कल्पिलें । तें जीवें अविद्यावसें सत्य मानिलें । ऐसें उभयांनिं मिळोनि कल्पिलें । हें जग सर्व ॥ १०० ॥ जैसें मृत्तिकेचिया ठाई । कुलाळें घट कल्पिला पाहि । तो ग्राहिकें सत्य मानोनि लवलाहि । मोलें घेतला ॥ १०१ ॥ कां सुवर्णाचि कटक कुंडलें । सोनारें स्व बुद्धिनें कल्पिले । परी ते ग्राहिकें ग्रहण केले । अळंकार सत्य म्हणोनि ॥ १०२ ॥ किं अडवें उभे तंतु घालून । साळियें पट केला कल्पुन । तो ग्राहिकें सत्यत्वें मानुन । विकत घेतला ॥ १०३ ॥ साळि सोनार कुंभार । यातें ठावें कार्यकारणप्रकार । अज्ञानि ग्राहीक कार्यावर । द्रिष्टि ठेउनि घेती पैं ॥ १०४ ॥ तैसा इश्वर आत्मा आणि जग जाणे । त्यास्तव आत्मा सत्य जग कल्पीत म्हणे । जीव येकले जग मात्र जाणे । यास्तव म्हणे सत्य पैं ॥ १०५ ॥ ऐसे हे व्यक्तिमात्र सर्वेही । आत्म स्वरूपिं कल्पीत पाहि । जैसे मृत्तिका-तंतु-सुवर्णा ठाइं । घटपट अळंकार कल्पित पैं १०६ ॥

यथाकाशो हृषीकेशो नानोपाधिगतोविभुः ।
तद्भेदाद्भिन्नवद्भाति तन्नाशे केवलो भवेत् ॥ ९ ॥

जैसे उपाधिर्रहित आकाश । सर्वगत विभू आणि अविनाश । तया परि हा इंद्रियाचा ईश । हृषीकेश अविनाशत्वें ॥ १०७ ॥ घटमठादि उपाधी करून । येकचि आकाश भिन्नभिन्न । परि उपाधि नाश पावतां संपूर्ण । येकचि गगन सर्वहि ॥१०८॥ तैसा आत्मा एकचि असतां । उपाधियोगें अनेकता । दिसे परंतु विचारें पाहातां । अनेकत्व नसे आत्मयातें ॥ १०९ ॥ विचारद्रिष्टीनें पाहातां । अद्वय ब्रह्म अनुभवासी येतां । मग देहद्वय उपाधि तत्वता । नाश पावे तत्क्षणिं ॥ ११० ॥

नानोपाधिवशादेव जातिवर्णाश्रमादयः ।
आत्मन्यारोपितास्तोयरसवर्णादिभेदवत् ॥ १० ॥

नाना उपाधि योगेंकरून । आत्मनि आरोपित जाति अश्रमवर्ण । ब्राह्मण क्षत्रि आणि वैश्य जाण । शुद्र आदिकरोनि ॥ ११ ॥ ब्रह्मचारी आणि ग्रहस्थ । त्रितीय अश्रम वानप्रस्त । चतुर्थ अश्रम सन्यस्थ । सिखा सुत्र त्यागेसी ॥ १२ ॥ गौ मानव गज तुरंगम । नाना जाति उत्तम मध्यम । भूचरें जळचरें व्यहंगम । आदि करोनि सर्वहि ॥ १३ ॥ अपार जातींचे तरूवर । मर्गजादि पाषाण गिरिवर । ऐसा हा जातिवर्णादिक प्रकार । उपाधियोगें

जाहाला ॥ १४ ॥ येऱ्हवीं ब्रह्म निर्मळ निरामय । अनाम अवर्ण अनाश्रम होय । परी अज्ञान उपाधियोगें समुदाय । नामादिकांचा जाहाला ॥ १५ ॥ जैसें शुद्ध निर्मळ तोय । तें संगें करोनि विकारि होय । जा जा उपाधिमाजि जाय । तैसें तैसें भासतसे ॥ ११६ ॥ मिरचीसंगें होय तिखट । चिंचेसंगें होय अंबट । निंबासंगें होय कडुवट । अवळयाचेनि तुरट पैं ॥ १७ ॥ निळीसंगें होय काळें । पिवाळिसंगें होय पिवळें । हिरवें होय जंगाळें । अरक्त हिंगूळप्रभावें पै ॥ १८ ॥ ऐसें येक उदक सर्व संगति । उपाधि योगें पावे विकृति । परंतु वास्तवीक जळधर्मस्थिति । निर्मळद्रवत्व शैत्यत्व पै ॥१९॥ तंव सिष्य म्हणे जि गुरूमोर्ति । ऐकोनि घ्यावि मम विज्ञाप्ति । विचारितों जें पायाप्रति । सांगोनि द्यावें सर्व तें ॥ १२० ॥ आत्मयाचें काय लक्षण । आणि अरोप अला कोठुन । उभयतांचें स्पष्ट विवरण । मजलागि सांगावें ॥ २१ ॥ पाहिले वदलाति आत्माचि सारा । मागति सांगतां भेदपसारा । आत्मा येक अरोप दुसरा । उपाधि योगें जाहाला ॥ २२ ॥ तरी या बोलासि माझें मन । होतसे स्वामि अंदोलायमान । मी अरोप किंव्हा अधिष्ठान । हें मज कांहिं नेणवे ॥ २३ ॥ अधिष्ठान जरी मि म्हणावें । तरी तें तों मज नसे ठावें । दृश्य अरोपासी अंगिकारावें । तरि तें मिथ्या म्हणतसां ॥ २४ ॥ मी कोण हें मजासि नेणवे । या भवसिंधूसि कैसें तरावें । हें मज दासातें निरोपावें । स्वामीराया कृपाळा ॥ २५ ॥ विषय सुखावरि घालिता झडा । तेणें दुःखा होतसे वरपडा । जैसा अन्यगायीचा लघु पाडा । दुसरीस पेउं पातला ॥ २६ ॥ तेणें स्वमायेतें नोळखतां । दुसऱ्या गाइचा बैसती लाता । तैसा आत्मा नेणोनि विषय संघाता । सेवोनि दुःख पावतो ॥ २७ ॥ मागे तुम्हि निरोपिले । जैसें सुवर्णाचिं कटककुंडलें । तैसे आत्म्याहुनि जग वहिलें । वेगळे नसे सर्वथा ॥ २८ ॥ ऐसें ऐकोनि माझें चित्त । बहुत जालें अनंदयुक्त । कीं हे दृश्यचि आत्मा निश्चित । दिसे भासे सर्व जो ॥ २९ ॥ मागति म्हणतां हें दृश्य अरोपित । आणि आत्मा आहे याविरहीत । हें ऐकोनि माझें चित्त । खेदयुक्त होतसे ॥ ३० ॥ हें दृश्यचि मात्र मजला दिसे । आत्मा कधींहि ठाउक नसे । येथें माझा तरि अन्याय असे । काय स्वामिदयाळा ॥ ३१ ॥ करोनि श्रीगुरूनें हास्यवदन । मग बोलते जाले मृदूवचन । अरे हा अनादि अज्ञानप्रवाह जाण । आला असे येथवरि ॥ ३२ ॥ अतां त्याचि अज्ञानातें घेउन । करितों तूतें उपपादन । जैसें लोहशस्त्रातें घेउन । लोहश्रंखळा तोडावि ॥ ३३ ॥ तेसा स्वरूपिं अध्यारोप करुन । मग सांगेन अपवाद लक्षण । जेणें करून आत्मखुण । ठाऊकि पडे तुजलागि ॥ ३४ ॥ अध्यारोप

म्हणजे अरोप करणें । अपराधावीण अपराध लावणें । कीं वंध्यासुताचे वाखाणनें । विवाहादीक संभ्रमें ॥ ३५ ॥ अपवाद म्हणजे निवारण । आरोपाचे जे जे गुण । जैसे वंधेचे वंध्यत्वपण । कळतां नाहिं संतति ॥ ३६ ॥ तैसीया परि गा सिष्यवर्या । स्वरूपिं अरोपुनिया माया । सेखिं विचारें करूनि विलया । नेउनि तूंतं दाखवितों ॥ ३७ ॥ पहिला सांगेन आध्यारोप । मायाचि जयाचें स्वरूप । जेणें करूनि अज्ञानताप । खवळे तुझा अधिकसा ॥ ३८ ॥ जैसा वैद्य रोगियासि । कुपथ्य देउनि प्रथम दिवसिं । रोग आणोनि उद्भवासि । मग वोषधासि योजितसे ॥३९॥ किं अंगिं असतां पिशाच्च दुष्ट । पंचाक्षरी बोलवि घडघडाट । मग मारोनि मंत्राचि चपेट । दूर करि तयातें ॥४०॥ तैसें स्वरुपीं अध्यारोपालागुन । करुनि दाखवितों पहिल्यानें । सर्वेचि अपवादाचें लक्षण । सांगोनि अज्ञान नासितों ॥ ४१ ॥ पहिलें शुद्ध स्वरूप असतां । तेथें स्फुरण जालें गा तत्वता । अहं ऐसी आत्मसत्ता । स्फुरति जालि ॥ ४२ ॥ तयेचें नांव मूळ माया । चिद्विवर्त ह्मणविजे तया । जैसें गगनिं अभ्रउदया । पावतें जालें अकस्मात् ॥ ४३ ॥ किं सूर्यरस्मिचिया ठायीं । मृगजळ अकस्मात भासलें पाहि । तैसें आत्मस्वरुपिं नसतां कांहीं । माया विवर्त भासला ॥ ४४ ॥ ते माया द्विप्रकारचि जाण । विद्या अविद्या नामें करून । विद्यावच्छिन्न जें चैतन्य । ते ईश्वर रुपें जाहालें ॥ ४५ ॥ त्या ईश्वर चैतन्याचे अंशभूत । जे अविद्यावच्छिन्न जालें निश्चित । तें जीवनामें विख्यात । होते जाले । ४६ । त्या मायावच्छिन्न इश्वरातें वहिली । श्रिष्टि करावी हें इच्छा जालि । तेव्हां महत्तत्व हें नांव पावलि । तेचि माया ॥ ४७ ॥ महत्तत्वा पासोनि अहंकार । होता जाला त्रिप्रकार । सत्व रज तम परिकर । ती गूणक्षोभिणि माया पं ॥ ४८ ॥ सत्व अहंकार ते ज्ञानशक्ति । राजस अहंकार ते क्रियाशक्ति । तामस अहंकार ते द्रव्यशक्ति । होति जालि अनुक्रमें ॥ ४९ ॥ सत्व अहंकार ज्ञान शक्ति पासून । जाहालें पंचविध अंत:करण । रजो अहंकार शक्ति पासून । इंद्रिय संपुर्ण जाहाले ॥ ५० ॥ तामस अहंकार शक्ती पासून । जन्म जाला आकाशा लागून । तया आकाशा पासून पवन । होता जाला निश्चयीं ॥ ५१ ॥ वायू पासोनि जाला अग्नि । अग्निपासुन जालें पाणि । जळा पासोनि मेदिनि । होती जालि गंधरुपि ॥ ५२ ॥ ऐसें हे जाले पंचभुते । तें अतःकरण इंद्रिया समेत । पंचवीस तत्वें येकवटोनि समस्त । पंचमहाभूते जाहालि ॥ ५३ ॥

पंचीकृत महाभूतसंभवं कर्मसंचितं ।
शरीरं सुखदुःखानां भोगायतनमुच्यते ॥ ११ ॥

टीका—पंचमहाभूतें द्विधा केलें । अर्ध भागातें चतुर्धा विभागिलें । भागति स्वांश मेळवोनि वहिले । कर्दम केला भूतांचा ॥ ५४ ॥ जे ईश्वराचे देहत्रय । तें जीव देहाचें कारण होय । हा सेवटपर्यंत अन्वय । ऐश्यापरि जाण तुं ॥ ५५ ॥ या परि करोनि पंचीकरण । संचित कर्मयोगें करुन । सुखदुःख भोगावया लागुन। स्थूल-देह सदन निर्मिलें ॥ ५६ ॥ अस्ति - मांस - नाडी आदिकरुन । सप्तावितिस्थ लंबायमान । हास्तपादादि अवयेव संपुर्ण । जया लागि आसति ॥ ५७ ॥ हा पंचीकृत स्थूळ देहे । तूतें सांगितला निःसंदेहे । आतां सूक्ष्म अपंचीकृत देह । तोहि सांगतों ऐक पां ॥ ५८ ॥

पचप्राणमनोबुद्धिदशेंद्रियसमन्वितम् ।
अपंचीकृतभूतोत्थं सूक्ष्मांगं भोगसाधनं ॥ १२ ॥

हिरण्यगर्भाचे अंशभाग । तयाचा लिंगदेह केला सुभग । नोहे पंचकारणातिल अंग । म्हणोनि अपंचिकृत म्हणिजे पैं ॥ ५९ ॥ पंचप्राण आणि मन । बुद्धि दशइंद्रिय मिळून । ऐसे हे सप्तदश येकवटोन । लिंगदेह जाहाला ॥ ६० ॥ आतां त्या लिंगदेहाचा प्रकार । तुतें सांगतो सविस्तर । तो ऐकोनि धेर्यी अति अदरें । येकाग्रचित्तें करोनि ॥ ६१ ॥ प्राण अपान व्यानोदान । पांचवा जाण पां समान । अणखि पंचउपप्राण । तेहि सांगतों ऐक पां ॥ ६२ ॥ नाग कुर्म कृकल हे तीन । देवदत्त धनंजय हे दोन । ऐसे हे पंचविध उपप्राण । वेगळेपणें असति ॥ ६३ ॥ आतां दश इंद्रियें कोणतिं । तेहि तुज सांगतों यथानिगुति । ऐकोनि घेइ पा सुमति । विस्तार त्याचा सर्वही ॥ ६४ ॥ श्रोत्र त्वचा आणि चक्षु । जिव्हा घ्राणेंद्रिय प्रत्यक्षु । जे पंचविषय घ्यावया दक्षु । ते हे पंचज्ञानेंद्रिय ॥ ६५ ॥ आतां कर्मेंद्रियपंचक । तुतें सांगतों बरें ऐक । वाचा हास्त पाद गुद चतुर्थक । सिस्न हें जाण पांचवें ॥ ६६ ॥ संकल्प विकल्पात्मक मन । निश्चयात्मिका बुद्धि जाण । ऐसे हे सप्तदश मिळोन । लिंग देह जाण पा ॥ ६७ ॥ हें सत्राही जणें मिळून । सुखदुःखभोगाचें साधनें। पंच विषयाप्रति सेउन । जीवा लागिं भोगाविति ॥ ६८ ॥ आतां सांगतों तिसरा देहे। जो या द्वय देहाचा कारण होय । सर्वांपरि आज्ञानमय । सांगतों तो ऐक पा ॥ ६९ ॥

अनाद्यविद्या निर्वाच्या कारणोपाधिरुच्यते ।
उपाधित्रितयादन्य मात्मानमवधारयेत् ॥ १३ ॥

अनादि अविद्या अनिर्वचनीय । हे देहद्वयाचि कारण होय । विचारें पाहातां न सांपडे सोय । आविचारें होय भ्रमकर्त्रि ॥ ७० ॥ अविद्या कधिं जालि उत्पन्न । हें कांहींच नसे प्रमाण । म्हणोनिया अनादित्वपण । इज लागीं असे पैं ॥ ७१ ॥ तूं जरि म्हणसि कांहिं ऐसें । कीं येक्या आत्मयातेंचि अनादित्व असे । तयाविण अनादित्व नसे । आणिकातें सर्वथा ॥ ७२ ॥ जरि अविद्या अनादि म्हणावि । तरि आत्मयाबरोबरि गणावि । मग द्वैतापत्ति अघवि । होउं पाहे सेवटिवन्हि ॥ ७३ ॥ तरि तूं न म्हणे गा ऐसें । आत्मयातें आदिअंत नसे । आणि अविद्येतें अंत असे । तत्वज्ञानें करुनि ॥ ७४ ॥ मिथ्या म्हणावी तरि वेड लावि । सत्य म्हणावि तरि नासे अघवि । म्हणोनि सद् ना असद् हे देवि । अनिर्वचनीय असे पैं ॥१७५॥ या अविद्येचे लक्षणें दोन । येक विक्षेप येक अवरण । विक्षेप म्हणजे घटपटाद्यमान । दृश्य जात सर्वहि ॥ ७६ ॥ अवरण म्हणजे मी कोण । जें तूं पुससि मज लागुन । हेंचि अवरणरूपलक्षण । अविद्येचें जाण तुं ॥ ७७ ॥ अध्यारोपा । प्रकार । येथवरि जाला गा परिकर । पुढें अपवादाचाहि विस्तार । बोलेन तूतें निश्चइं ॥ ७८ ॥ परि उद्भवलें असे जें अज्ञान । त्याचें व्हावया लागि निरसन । सांगतों शुद्ध आत्मलक्षण । व्यतिरेक मात्रें करोनि ॥ ७९ ॥ व्यतिरेक म्हणजे अनात्म्याहून । आत्माचि जाणावा वेगळेपण । जैसा कोंडा सांडोनिया कण । निवडोनि घ्यावा सुयुक्ति ॥१८०॥ येथवरि श्रिष्टिचि उत्पत्ति । तूंते सांगीतालिया निगुति । ते अनात्मिका जाण निश्चिति । आत्मलक्षण तें एक आतां ॥ ८१ ॥ स्थूल सूक्ष्म आणि कारण । ऐसी हे उपाधित्रय जाण । जे सांगितलि विवंचून । सार्धद्वयश्लोकेसि ॥ ८२ ॥ तया त्रय देहाहुनि अन्य । आत्मा असे शुद्ध विलक्षण । ऐसा निश्चयेसि जाण । विचारयोगें सासिष्या ॥ ८३ ॥

पंचकोशादियोगेन तत्तन्मय इवस्थितः ।
शुद्धात्मा नीलवस्त्रादियोगेन स्फटिको यथा॥ १४ ॥

पंचकोशादिकाचे संगतीनें । आत्मा भासे पंचकोशाप्रमाणें । जैसा स्फटिक नीलवस्त्रादीयोगेंकरून । तैसा तैसा भासतसे ॥ ८४ ॥ मागें तुज केलें कथन । देहत्रय उपाधीप्रकर्णं । त्यामाजि हे पंचकोश जाण । मिश्रीत असे सर्वहि ॥ १८५ ॥ स्थूळ देह जो संपूर्ण । हा अन्नमय कोश असे जाण । लिंगदेहामाजि कोश

तीन। सांगतों ते ऐक पां ॥ ८६ ॥ प्राणमय आणि मनोमय। तिसरा जाण पां विज्ञानमय। ऐसे हे असति कोशत्रय। लिंगदेहामाझारि ॥ ८७ ॥ कारणदेहाचा माझारि। अनंदयम कोश गा निर्धारि। ऐसि हे पंच कोशाचि कुसरि। समजोनि घेइ निश्चित ॥ ८८ ॥ कोणत्या कोशाचें काय लक्षण। हें तुज नाहिं केलें निरुपण। तरि आतां त्याचें विशिदिकरण। करोनिया सांगतों ॥ ८९ ॥ अन्नापासोनि जालें रेत। त्यायोगें हा स्थूळ देह निर्मित। ह्मणोनिया अन्नमयकोश तयात। ह्मणति जाण निश्चित ॥ १९० ॥ प्राणमय ह्मणजे पंचप्राण। आणि तयाचे पंच उपप्राण। कर्मेंद्रियपंचक मिळोन। प्राणमय कोश बोलिजे ॥ ९१ ॥ मनोमय कोशाचें ऐक चिन्ह। ज्ञानेंद्रिय पंचक आणि मन। संकल्पविकल्पादि गूण। जयाचे ठाइं आसति ॥ ९२ ॥ विज्ञानमय कोश ते बुद्धि। निश्चयात्मिका जयेचि प्रसिद्धि। जीचा आश्रययोगें चिदाब्धि। जीवतरंगत्व पावला ॥ ९३ ॥ ते बुद्धि अज्ञानीं लीन होतां। सर्व इंद्रियांसि होय उपरमता। कांहीं येक संसारदुःख नसतां। अनंदमय कोश तोचि पै ॥ ९४ ॥ ऐसे हे पंचकोश आसति जाण। आत्मा तयाचा योगेंकरुन। सुखि दुःखि कर्तृत्वपणें। दिसे आज्ञानि जनातें ॥ १९५ ॥ जैसा नील पीत वस्त्रासंनिध। ठेविला आसतां स्फटिकमणि शुद्ध। तैसा तैसा भासे विविध। वस्त्राचियासारिखा ॥ १९६ ॥ तेंचि शोधोनिया पाहातां। नसे स्फटिक-वस्त्राचि ऐक्यता। तैसा आत्मा विचारें शोधितां। नसे पंचकोशत्वें ॥ ९७ ॥ ऐसें ऐकोनि श्रीगुरुचें वचन। शिष्य बोलता जाहला म्लानवदनें। म्हणे कैसा घ्यावा निवडोन। आत्मा पंचकोशांतील ॥ ९८ ॥ जैसे कर्नाट देशींचे तांदुळ। अध तांदूळ अर्धे हारळ। निवडोनि घेउं जातां निर्मळ। न होतिच सर्वथा ॥९९॥ चाळणि घेउनि चाळुं जाता। दोहिहि रिचवति तत्वता। मागति भरानिया घेतां। येति होता दोन्हि हि ॥ २०० ॥ तैसा आत्मा आणि अनात्मा मिश्रित। सांडितां घेतां होतो घात। तरि कैसे करावेंजी निश्चित। स्वामिराया या प्रति ॥ २०१ ॥ मग श्रीगुरु म्हणतिरे लेकुरा। ऐकोनि घेइ युक्तिचा उत्तरा। शुद्धआत्मा शोधोनिया बरा। घेइ विचारें करोनि ॥ २ ॥

वपुस्तुषादिभिः कोशैर्युक्तं युक्त्यावघाततः।
आत्मानमंतरं शुद्धं विविच्यात्तंडुलं यथा ॥ १५ ॥

आत्मा आसतां पंचकोशातीत । परि भासतो पंचकोशिं अवृत । तरि विचारें करोनि निश्चित । करि निरास देहाचा ॥ ३ ॥ जैसा तूं घटपटातें पाहासि । त्यापरि स्थूल देहातें जाणसि । तुजहूनि वेगळा तयासि । आत्मा कैसा म्हणावा ॥ ४ ॥ तैसाचि तूं लिंगदेहा लागुन । हे माझे इंद्रिय प्राण बुद्धिमन । जाणसि स्थूळ देहा समान । आपणांहूनि वेगळे ॥ ५ ॥ मी कांहिंच जाणत नाहिं । ऐसें अनुभविसि सुषुप्ति ठाइं । तेव्हां त्या नेणन्याहूनिया पाहि । वेगळाचि तूं आससि ॥ ६ ॥ यापरि विचारें विवंचुन । काढावा निजात्मा शोधुन । जड अनात्मिया लागुन । जाणोनिया त्यागावें ॥ ७ ॥ जैसा कांडणार युक्तिवंत । उखळांत घालेनिया साळिभात । प्रथम काढि टर्फलातें । वन्हिल मोठ्या कोंड्यातें ॥ ८ ॥ मागति घालेनिया उखळिं । काढि तयाचि तांबडि खोळि । पुन्हः पुन्हा घेवोनि चोळि । शुभ्र निर्मळ व्हावया ॥ ९ ॥ तैसा आत्मा विचारें करून । युक्तिनें पंचकोशांतील शोधुन । जाणावा स्पष्ट वेगळेपणें । सच्चिदानंदस्वरुपत्वें ॥ १० ॥

सदा सर्वगतोप्यात्मानसर्वत्रावभासते ।
बुद्धाविवावभासेत स्वच्छेषु प्रतिर्बिबवन् ॥ १६ ॥

म्हणसि सर्वगत आत्मा आसतां । मानव देहिंच कां विशेषता । तरि ये विषईचें उत्तर आतां । ऐकुनि घेइ निश्चित ॥ ११ ॥ सर्वगत आत्मा निश्चयेंसि । संदेह नाहिं या वचनासि । स्थावर जंगमादि व्यक्तिसि । व्यापोनि असे सर्वदा ॥ १२ ॥ परि अत्यंत जड स्थावर योनि । बुद्धिउदय नसे तये स्थानिं । लिंगदेहे लीन असे कारणिं । म्हणोनि मूढता ते स्थळिं ॥ १३ ॥ जंगमाचिया हृदेसिं । स्पष्टत्व असे लिंग देहासि । म्हणोनि आत्मा प्रत्ययासि । बुद्धियोगें येतसे ॥ १४ ॥ तया जंगमाचिया माझारि । योनि आसति नानापरि । त्यांमाजि मानव देहा अंतरिं । विशेष बुद्धि-प्रकाश ॥ १५ ॥ त्या मनुष्य योनिमाजि जाण । जो साधन शतुष्टय-संपन्न । तया हृदइं गुरुकृपें करुन । विशेषतर आत्मा प्रगटतो ॥ १६ ॥ जैसें मनिं घृत अदर्श तोयांत । तेल आदिकरुनि स्वच्छ द्रव्यांत । सूर्यादि प्रतिबिंबें निश्चित । दिसताति स्पष्टत्वें ॥ १७ ॥ तेचि सूर्यच्छाया पृथ्वित्वरि पडे । परी न दिसे सूर्य प्रतिबिंबरूपडें । तें स्वच्छ द्रव्याचेनि योगें रोकडें । प्रतितिलागिं येतसे ॥ १८ ॥ तैसा आत्मा सर्वगत तरि आहे । परि बुद्धिचा संग जरि लाहे । तरीच प्रतीतीस येताहे । प्राणिमात्राचा शरीरिं ॥ १९ ॥ तंव सिष्य बोले प्रस्नोत्तर । जी माझे मनिं ऐसा असे निर्धार । कीं आत्माच करितो व्यापार । बुद्धिमाजि प्रगटोनि ॥ २० ॥

हें सत्य किं मिथ्या निवडून । सांगावें जि मजलागुन । ऐसें ऐकोनीया वचन । आचार्य जाले बोलते ॥ २१ ॥

देहेंद्रियमनोबुद्धिप्रकृतिभ्यो विलक्षणम् ।
तद्वृत्तिसाक्षिणं विद्यादात्मानं राजवत्सदा ॥ १७ ॥

देहनगरिचा माझारिं । आत्मा साक्षित्वें राज्य करि । बुद्धि प्रधान मन कारभारि । इंद्रियें प्रजा सर्वहि ॥ २२२ ॥ तया राजा प्रधाना मध्यंतरिं । अज्ञानचिकाचा पडदा भीतरि । प्रजा मंत्रि राजास नेणति परि । राजा जाणे सर्वांतें ॥२२३॥ तयाचा सत्ता मात्रेंकरुन । बुद्धि मन इंद्रियें संपूर्ण । स्व-स्व विषइं प्रवर्तति जाण । परि आत्मा असे साक्षित्वें ॥ २२४ ॥ जैसा राजा असतां साक्षित्वेंसी । प्रधान चालवि सर्व राज्यासि । तैसि मनोवृत्ति करि व्यापारासि । आत्मा साक्षि वेगळा ॥ २२५ ॥ हे विचारद्रिष्टिनें पाहातां । अनुभवा येईल आत्मा अकर्ता । यन्हविं अज्ञानद्रिष्टीनें पाहातां । आत्मा कर्ता भासेल पैं ॥ २२६ ॥

व्यावृत्तेष्विंद्रियेष्वात्मा व्यापारीवाविवेकिनाम् ।
दृश्यतेऽभ्रेषु धावत्सु धावन्निव यथाशशी ॥ १८ ॥

जैसा अभ्राचा योगें करुन । चंद्र दिसे पलायमान । किं रथगमनप्रभावें करुन । भूमि चंचळ दिसतसे ॥ २२६ ॥ समुद्रजळ निश्चळ असे परि । जहाज चालतां तयावन्हि । दिसे उदकाचि अति सरारि । गंगेमम धावता ॥ २२८ ॥ चंद्र भूमि आणि समुद्र । हे तिन्हिही आसति स्थीर । परि उपाधियोगें अस्थीर । वाटति भ्रमें करुनि ॥ २९ ॥ तैसा आत्मा असोनि अकर्ता । अज्ञानयोगें भासे कर्ता । होउनि देहात्मबुध्दे विषमता । अस्ताव्यस्त वरळति ॥ २३० ॥ अज्ञानि म्हणति देहासवें । आत्मा बोले चाले धावे । आत्मा कर्ता भोक्ता सर्वभावें । विषयालागि ग्रहण करि ॥ ३१ ॥ परि आत्मा अकर्ता सर्वांपरि । असो त्रिवेकिया व्यापारिं । अथवा पश्वादि जीव नानापरि । सर्वत्रिं आत्मा निष्क्रिय ॥ ३२ ॥ इंद्रियाचा योगें करुन । आत्मात्वें दिसें कर्तृत्वपण । जेसें अभ्रादियोगें अतिधावन । दिसे चंद्रादिकांसि ॥ ३३ ॥ यापरि ऐकोनिया वचन । सिष्य करिता जाला प्रश्न । आत्मा अकर्ता म्हणउन । सांगतां तुम्हि श्रीगुरु ॥ ३४ ॥ तरि इंद्रियबुध्दि आणि मन हे जडरासि असति संपुर्ण । याचे ठाइं कर्तृत्वपण लक्षण । न संभवेचि सर्वथा ॥ २३५ ॥ तरि विषयव्यापार-प्रवृत्ति । कोण करितसे जि श्रीगुरुमुर्ति ।

हें मज सांगोनि द्यावें निगुति । जेणें प्रत्ययासि ये साक्षात ॥ ३६ ॥ ऐकोनि सिष्यवाणि परिकर । श्रीगुरु देति प्रत्योत्तर । जेणें सिष्यशंकेचा परिहार । होवोनि जाय तत्क्षणीं ॥ ३७ ॥

आत्मचैतन्यमाश्रित्य देहेंद्रियमनोधियः ।
स्वकीयार्थेषु वर्तन्ते सूर्यालोकं यथा जनः ॥ १९ ॥

आत्मा नित्यज्ञानस्वरुपचैतन्य । इंद्रिय मनबुध्दि त्या अश्रयेंकरुन । आपुलाल्या विषयाप्रति जाण । सेवन करिति निश्चइं ॥ ३८ ॥ जैसें सूर्याचा प्रकासें करुन । व्यापारिं प्रवर्तति सर्वही जन । परि सूर्य तयाहूनि असे भिन्न । अकर्तेपणें सर्वदा ॥ २३९ ॥ तैसें आत्मचैतन्य योगें करुन । देहेंद्रियबुध्दि आणि मन । प्रवर्तति स्वविषयालागुन । परि आत्मा आकर्ता निश्चइं ॥ २४० ॥ आतां आत्म्याकडेस कर्तेपण । लावावयासि काय कारण । हें तुजप्रति सांगतों जाण । सावधपणें परियेसि ॥ ४१ ॥

देहेंद्रियगुणान्कर्माण्यमले सच्चिदात्मनि ॥
अध्यस्यन्त्यविवेकेन गगने नीलिमादिवत् ॥ २० ॥

देहेंद्रियाचि गुणकर्मे सर्वहि । निर्मळ सच्चिदात्म्याचे ठाइं । लाविति अज्ञानें-करोनि पाहि । जैसि गगनातें नीलिमा ॥ २४२ ॥ कर्ता करविता सर्वहि आत्मा । ऐसें बोलति जन पापात्मा । तत्वज्ञानि जो महात्मा । तो न म्हणेचि ऐसें पैं ॥४३॥ देहाचि बाल्ययौवनजरा । इंद्रियें सेविति विषयचारा । कामक्रोधादीक पसारा । अंतःकरणधर्म पैं ॥ ४४ ॥ ऐसे वेगळे वेगळे प्रकार । असतां देहेंद्रियगुणविकार । नेणोनि अज्ञानि जन पामर । आत्मत्विं सर्व लाविति ॥ २४५ ॥ जैसें निर्मळ आसतां गगन । तयातें म्हणति नीलवर्ण । परी तें काळें नसेचि जाण । शुद्ध असे निश्चइं ॥ ४६ ॥ पाहाणाराचें बुबळ काळें । म्हणोनि त्यास नभ दिसे निळें । तैसा अज्ञान्यासि अज्ञानबळें । आत्मा दिसे कर्तांचि ॥ ४७ ॥ पीवोनि अज्ञानाचि मदिरा । उगेचि बोलति सैरावैरा । म्हणति आत्मा कर्ता खरा । सर्वांपरि निश्चित ॥ ४८ ॥ कर्णिं नायकावे त्याचे बोल । सांडावे मानोनीया फोल । विचार नेणोनि अतिसखोल । अज्ञानवसें बोलति ॥ ४९ ॥ यविषइं आणीकही दृष्टान्त । तूतें सांगतों मी निश्चित । जेणें आत्मा अकर्ता निभ्रांत । अनुभवासि ये तुझ्या ॥२५०॥

अज्ञानान्मानसोपाधेः कर्तृत्वादीनि चात्मनि ॥
कल्पन्तेंबुगते चंद्रचलनादि यथांभसः ॥२१॥

कोण्हीयेक नदीचीया तिरिं । मार्ग चालतां निसिमाझारिं । चंद्र दिसे चालल्यापरि । उदकाचिया अतुनि ॥ ५१ ॥ मार्गस्थ जाय पूर्वेप्रति । त्यास चंद्राचि दिसे तैसीच गति । होवोनि अज्ञानाचि भ्रांति । विपरीत भान जाहालें ॥ ५२ ॥ अथवा सरोवराचिया माझारिं । उदक चंचळ होतां निर्धारिं । भ्रांतासि दिसे नानापरि । चंद्रबिंब चंचळत्वें ॥ ५३॥ तैसि आत्मस्वरूपिं अज्ञानउपाधि । देहे इंद्रियमनबुद्धि । यांचिया योगें कर्तृत्वसिद्धि । आत्मयासि दिसतसे ॥ ५४ ॥ परि आत्माआसे निष्क्रिय । व्यापारशून्य निरामय । तया निर्व्यापारासि काय । व्यापार लागुं शकेल पैं ॥५५ ॥ तरि हें कर्तृत्व असे कवणाचें । हें तूज सांगोनि देतों साचें । श्रुत्या युक्त्या अनुभवाचें । बोलणें हें ऐक पां ॥ ५६ ॥

रागेच्छासुखदुःखादिबुद्धौसत्यां प्रवर्तते ।
सुषुप्तौ नास्ति तन्नाशे तस्माद्बुद्धेस्तु नात्मनः ॥२२॥

रागइच्छासुखदुःख आदिकरोन । हे बुध्दिचेचि असति गूण । सच्चिदानंद आत्मलक्षण । नोव्हेति जाण निश्चइं ॥ २५७ ॥ जागृति आणि स्वप्नावस्था । बुध्दिचा ठाइं असति तत्वता । ह्मणोनिया सर्व व्यवस्था । होय कर्मअकर्माचि ॥ ५८ ॥ बुद्धिचे ठाइं काम वसति । बुद्धिच धरि विषयाचि प्रीति । सूखइच्छा धरोनिया निगुति । इंद्रीयद्वारें प्रवर्ते पै ॥ ५९ ॥ विषयप्राप्तिनें मानि सुख । तें प्राप्त न होतां मानि दुःख । बुद्धिच होउनि सर्वतोमुख । प्रवर्त होय कर्मासि ॥ २६० ॥ तेचि बुद्धि सुषुप्तिमाझारिं । लीन होतां आज्ञानाभीतरिं । रागेच्छा सुखदुःखें सहपरिवारिं । नाशाप्रति पावति ॥ ६१ ॥ तेव्हां आत्मा तरि असताचि आसे । परी रागइच्छादी कर्म नसे । मागति बुद्धि उठतांचि ठसे । रागेच्छादिकाचे उमटति ॥ ६२ ॥ तरि जें करणें क्रियाकर्म । तें सर्वहि जाण बुद्धिचे धर्म । अविनासि आत्मा निर्धर्म । निष्क्रियत्वें असे पैं ॥ ६३ ॥ तंव सिष्य ह्मणे जि बरें कथिलें । हें माझ्या प्रत्ययालागि आलें । परि आत्मलक्षणातें सांगितलें । पाहिजे मजलागुनि ॥ ६४ ॥ मग श्रीगुरु ह्मणति भला । रे भला । येथवरि तुवां व्यतिरेक ऐकिला । तो आनात्मा जाणोनिया वहिला । ठेवि वेगळा जडभाग ॥ ६५ ॥ पुन्हा हे शंका न घेइ सर्वथा । कर्तृत्व नेमि बुद्धेंद्रियाचे माथा । सांडोनि देह अविचारगाथा । किं कर्ता आत्मा ह्मणउनि ॥६६॥

जैसें कुंकु आणि गोपीचंदन । करितां येकत्र मेळवण । नसे अरक्त ना शुभ्रपण । दोन्हिहि होति विपरित ॥ ६७ ॥ तैसें अज्ञानयोगेंकरुन । आत्मा आणि देह येकत्रपण । मेळवोनिया विपरीत भान । जालें होतें तुजलागिं ॥ ६८ ॥ तरि सांडोनि बुध्यादिकाचा संग । होइ पां आत्मस्वरूपीं निःसंग । तेणेंकरोनि भवभंग । होइल तुझा निश्चइं ॥ ६९ ॥ आतां आत्मा किंलक्षण । कैसि तयाचि वोळखण । ते तूज सांगतों निश्चयें करून । करि श्रवण ये क्षणिं ॥ ७० ॥

प्रकाशोर्कस्य तोयस्य शैत्यमग्नेर्यथोत्कता ।
स्वभावः सच्चिदानंदनित्यनिर्मलतात्मनः ॥ २३ ॥

आत्मा सच्चिदानंदस्वरुप । कर्मधर्मातीत निष्पाप । नित्यस्वभाव निर्मळरूप । आहे ऐसा जाण तुं ॥ ७१ ॥ जयासि दृश्याचा नाहीं मळ । म्हणोनि जाणिजे तो निर्मळ । दृश्य आनित्य असे चंचळ । आत्मा अढळ नित्य पैं ॥ ७२ ॥ सद त्रिकाळ बाधातीत । जगदउत्पत्ति स्थिति अंत । जाले तरि आत्मा असे निश्चित । जैसा तैसा निर्भयत्वें ॥ ७३ ॥ चिद म्हणजे ज्ञानघन । जाचे योगें अग्निसूर्यमन । होवोनिया प्रकाशमान । दृश्यालागि प्रकाशिति ॥ ७४ ॥ अनंद म्हणजे सुखरूप । जयासि नसे दुःखाचा लेप । अनंत निराकारस्वरूप । संचलें असे पूर्णत्वें ॥ २७५ ॥ ऐसे हे सच्चिदानंद त्रिप्रकार । मिळोनि येकाचि आत्मा साचार । स्वरूप नसे भिन्नभिन्नाकार । त्रिप्रकारें वेगळालें ॥ ७६ ॥ जैसि शर्करा शुभ्र मिष्ट कठीण । असति तीन अभिधान । परि नसे स्वरूप भिन्न भिन्न । वेगळालें तियेचें ॥ ७७ ॥ तैसा आत्मा त्रै अभिधानि । येकचि असे अखंडपाणिं । हे त्याचे स्वभाव तिन्हि । अक्षयत्वें विलसति ॥ जैसा सूर्य स्वप्रकाशमान । किं शैत्यस्वभाव उदकाचा जाण । आणि दाहाकत्वें हुताशन । हे स्वाभावीक गुण तयाचे ॥ ७९ ॥ तैसे आत्म्याचे स्वाभावीक गूण । नित्यसच्चिदानंदनिर्मळपण । हे नसति आगांतुक गूण । स्वभावचि असे तयाचा ॥ २८० ॥ तंव सिष्य म्हणे जि सद्गुरुराया । बुध्यादिक जड कथिलि माया । आणि सच्चिदानंद स्वभाव तया । आत्मियाचे सांगितले ॥ ८१ ॥ तरि आत्मा असे शुद्ध निर्धर्म । जाणीव नेणीव क्रिया कर्म । सुखदुःख आदिकरोनि संभ्रम । नसे आत्मस्वरुपिं ॥८२॥ आणि बुद्धि मन इंद्रियें देहे । हे तरि जडचि निःसंदेह । तरि येथें कोण तिसरा आहे । अज्ञानाचा अधिपति ॥ ८३ ॥ जया अज्ञानाचिया पोटिं । होति जन्ममरणाचिया कोटि । आणि जाणीवेनेणीवभ्रमदाटि । सुखदुःखादी सर्वहि

॥ ८४ ॥ ऐसें हें अज्ञानकाळकूट । कोण ग्रासितो जि घटघट । हें मज सांगोनि द्यावें स्पष्ट । स्वामिराया दयाळा ॥ २८५ ॥ मग श्रीगुरुवचनामृतमेघ । वर्षाव करिते जाले अमोघ । जेणें संशयकल्पनात्मक अघ । धुवोनि जाय सर्वस्वें ॥ ८६ ॥ आगा सिष्या तुं जे धर्म पुससि । ते न शोभति आत्मयासि । आणि माया तरि जडरासि । तिचे ठाइं न संभवति ॥ ८७ ॥ हे त्वां शंका विचित्र घेतलि । ते शोधोनि पाहातां बहूत खोलि । परि त्रै श्लोकेकरोनि सांगितलि । जाइल आतां ऐक पां ॥ ८८ ॥ तुझिया प्रश्नाचें उत्तर । सांगतों ऐक सविस्तर । सयुक्तिक आणि परिकर । जातें अनुभवि सत्य म्हणति ॥ ८९ ॥

आत्मनः सच्चिदंशश्च बुद्धेर्वृत्तिरितिद्वयम् ।
संयोज्य चाविविवेकेन जानामीति प्रवर्तते ॥ २४ ॥

आत्मा सच्चिदानंदस्वरूप । प्रत्यगात्मा त्याचा अंशरूप । तो बुद्धिवृत्ति करोनि समीप । बिंबता जाला त्यामाजि ॥ २९० ॥ तो अंश अपुल्या अंशीतें नेणून । बुद्धि आणि विषयवृत्ति सेउन । अज्ञान जें तेणें करून । प्रवर्त होय जाणिवेतें ॥ ९१ ॥ अपुण निर्धर्म निष्क्रिय असतां । बुध्यादीसंगे करोनि तत्वता । अहंकार सेवोनि जाणता । म्हणे मी या दृश्याचा ॥ ९२ ॥ शुद्ध आत्मत्विं जाणीव नसे । परी बुद्धिवृत्तींचेनि सहवासें । अज्ञानयोगें चिदंशें । अपुले अंगिं लाविले ॥ ९३ ॥ म्हणे या दृश्याचा मी द्रष्टा । या ज्ञेयाचा ज्ञाता मी सुभटा । सर्व कर्मा इष्टा अनिष्टा । जाणत असे मी निश्चइं ॥ २९४ ॥ शुद्ध असतां शबल जाला । संगें करोनि हीनत्व पावला । कित्तेक खंडज्ञानि याजला । शुद्ध आत्माचि मानिताति ॥ २९५ ॥ तया खंडज्ञानियांलागून । मुमुक्षु कोण्हि आलीया शरण । तयातें तो दाखवि खूण । चिदाभासापर्यंत पै ॥ ९६ ॥ सिष्यासि म्हणे अरे चतुरा । विळभरि करिसी जा व्यापारा । त्यातें तुं जाणसि कीं खरा । दृष्टेपणें निश्चइं ॥ ९७ ॥ स्वप्नीं जाग्रतीचा अध्यास । स्मरोनि पाहासी नाना विलास । तूंचि दृष्टेपणेंही तयास । जाणसि कीं निश्चित ॥ ९८ ॥ तैसीच अवस्था जे सुषुप्ति । मी सुखि निजलों ऐसि प्रतिति । हेंहि तूं जाणसि किं सुमति । आपुलीया प्रभावें ॥ ९९ ॥ तोचि तूं आत्मा असति निश्चित । ज्ञानरूप त्रैअवस्थातीत । द्रष्टा साक्षि सदोदीत । सर्वांहूनि वेगळा ॥ ३०० ॥ मग घेवोनि वेदांतग्रंथ हाति । बोलिल्यासम वाचोनि दाखविति । उकलोनि त्वंपदाचि वित्पत्ति । सिष्यालागि सांगति ॥ १ ॥ पुढें तत्पदाचें विवरण । तैसेंच

ठेविति अछादून। मग असिपदिं ऐक्य कोण । करुं जाय तयाचें ॥ २ ॥ मग सिष्य म्हणे गुरुराया । पुढें ग्रंथ सांगा वाचोनिया । त्यातें तो गुरु म्हणे रे सखया । भ्रम होइल तुजप्रति ॥ ३ ॥ अरे हा शद्वब्रम्हार्णव अपार। ब्रम्हादि नेणति याचा पार । अपुण स्वकार्यापुरतें सारसार । पाहूनि घ्यावें त्यांतुनि ॥ ४ ॥ तंव तो सिष्य म्हणे जि गुरुराया । मी जाणतों सर्व दृश्यासि या । परि माझें स्वरूप न पडे ठाया । मी कोण कैसा असे कीं ॥ ५ ॥ व्यापक अखंड अद्वय । अनंत अपारावार चिन्मय । हें माझ्या अनुभवासि नये । काय करुं गुरुराया ॥ ६ ॥ सर्व दृश्य आणि अवस्थात्रयातें । जाणत होतों मि पहिलाचि यातें । परी जाणत नव्हतों मी शुद्धब्रह्मातें । म्हणोनि तुम्हातें पुसुं आलों ॥ ७ ॥ तों तुम्हिही सांगतां तेथवरि । परि शुद्ध आत्मा राहिला दुरि । ऐसें मज वाटतसे निर्धारिं । गुरुराया दयाळा ॥ ८ ॥ दृश्य हें काय खरें आहे । तरी मग तयाचा दृष्टा खरा होय । इतुक्याच विचारें करून सोय । न सापडे त्या अविनाशाचि ॥ ९॥ ऐसें ऐकोनि तयाचें उत्तर । गुरु उगाचि बैसला चिंतातुर । मग सिष्यानें करोनि नमस्कार । गेला अन्नेत्र स्थळासी ॥ १० ॥ ऐसि हे गुरु सिष्याचि कथा । तूंतें सांगितालि गा तत्वता । तरि तुं सावध होवोनि आतां । अनुभव शोधोनि घेइ पा ॥११॥ सत्सिष्य म्हणे श्रीगुरुराया । तो साधक कां गेला उठोनिया । विश्वास ठेवोनि वचनीं त्याचिया । कां हो नाहिं राहिला ॥१२॥ मग अचार्य म्हणति रे सुमति । तूंतें सांगतों देवोनि उपपत्ति। कोण्हि येक तक्र घेवोनि हातिं । उचलोनि प्याला ढसढसा॥ विश्वास ठेवोनि त्याचियावर्‍हि । म्हणे हें अमृताचि असे निर्धारि । परी तया अमृताचि बरोबरी । काय करील कांजि ते ॥ १४ ॥ मूर्ख अमृत म्हणोनि तक्र प्याला । परंतु परिणामिं मृत्यु पावला । विश्वास ठेविला तो वाया गेला । तैसाचि हाहि जाण पा ॥ १५ ॥ तरि शुद्ध आत्मा अनुभवावा । मग विश्वास ही तेथें ठेवावा । त्याचा निजध्यास करितां बरवा । कृतकार्यता होतसे ॥ १६ ॥ तूं म्हणसि तें तक्र विजातीय । म्हणोनि तेणें नोव्हे अमृताचें कार्य । परि हा विचार सजातीय । व्यतिरेकात्वें असे पैं ॥ १७ ॥ तरी हा व्यतिरेक खरा असे । परी इतुक्यानेंचि अनुभव होत नसे । जेव्हां चवथि अवस्था प्रकाशे । तेव्हां साक्षात्कार होय पैं ॥१४॥ नाहीं तरि ह्या ऐलिकाडिलाचे गोष्टि । अवघि माया अविद्येचि श्रिष्टि । विश्व तैजस प्राज्ञ हे त्रिपुटि । जीवाचि होय येकला ॥ १९ ॥ तो जीव जागृतिमाजि विश्व होउन । जाणे जाग्रद अवस्थे लागुन । तैसाचि स्वप्नामाजि तैजसपण । सेवोनि जाणे स्वप्नातें ॥ २० ॥ सुषुप्ति अवस्था गाढ अज्ञान । तेव्हां तो जीव पावे प्राज्ञपण ।

अपुल्या स्वरूपिं मिळून । कांहिं न जाणे अज्ञानें ॥ २१ ॥ न जाणे बाहिरील दृश्यातें । न जाणे अतील मनोवृत्तीतें । तेव्हां न जाणे अपणातें । कोण कैसा असे मी ॥२२॥ मागति जागृद अवस्थेंत येतां । सांगे तेथील सुखाचि वार्ता । ऐसि तिन्ही अवस्थेंत होय गता याता । परि चवथि अवस्था न देखेचि ॥ २३ ॥ जेव्हां ज्ञानद्रिष्टिनें आत्मा पाहिल । तेव्हां तुर्यावस्थेंत तुरीय होइल । मग समूळ अज्ञान जाइल । आत्मस्वरूप विषइचें ॥ २४ ॥ असो ऐसें खंडज्ञान । पृथ्विवरि बोलति बहुतजन । परि तुं होचि वोळाखि खूण । किं जाणीव तितुकि जीवाचि ॥ २५ ॥

आत्मनो विक्रिया नास्ति बुद्धे र्बोधोन जात्विति ।
जीवःसर्वमलं ज्ञात्वा कर्ता द्रष्टेति मुह्यति ॥ २५ ॥

अगा शुद्ध आत्मा विकाररहीत । तेथें क्रिया कर्तृत्व नसे निश्चित । तैसीच बुद्धि अतिजडपणें स्थित । बोध नसे जयेतें ॥ २६ ॥ तया बुद्धिचिया ठाई । क्रिया कर्तृत्व संभव नाहीं । तस्मात् जीवाचि क्रिया कर्तृत्व सर्वहि । लावि अपणाकडे पै ॥ २७ ॥ जैसा लोहपिंडासवें अग्नि । अपणातें कठिणत्व जडत्व मानि । तैसा बुध्यादिसंगें मोह पावोनि । कर्तृत्व द्रष्टुत्व जीव भावि ॥ २८ ॥

रज्जुसर्पवदात्मानं जीवो ज्ञात्वा भयं वहेत् ।
नाहं जीवः परात्मेति ज्ञातश्चेन्निर्भयो भवेत् ॥ २६ ॥

जैसी जालि असता झांजडवेळ । मार्गीत पाहुनि दोराचें वेटाळें । कोण्हि येक म्हणे हा विशाळ । सर्पचि येथें बैसला ॥ २९ ॥ त्याच्या भयेंकरुनि पळूं जातां । तंव त्यावऱ्हीच शोक गेला तत्वता । त्या स्थळिं बाभूळ-कंटक होता । तोहि अवचिता वेधला ॥३०॥ तयाच्या योगें निघालें रक्त । चरणतळ होवोनि गेलें अरक्त । मग तो मोठ्यानें अक्रंदत । सर्प डसला म्हणउनि ॥ ३१ ॥ त्या भयेंकरोनि जाणा । आलि तयालागि मूर्छना । हाका मारोनि सांगे जना । म्हणे मज सर्पें डंखिलें ॥ ३२ ॥ तेथें एक शाहाणा भेटला दुजा । तो म्हणे मि सर्प उतरितों तुझा । तें स्थळ मज दाखवि वोजा । जेथें तूतें डंखिलें ॥ ३३॥ मग तो मूर्ख दाखवि तेंचि-स्थान । जेथें भय जालेंहो दारूण । दीप लावोनिया जाण । स्पष्टत्वेंसि पाहाति ॥३४॥ तंव तेथें पडला असे दोर । त्यासंन्निध कंटकाचे पांझर । ऐसें जाणोनीया तो चतुर । भय निवारि तयाचें ॥ ३५ ॥ अरे पाहे पा रज्जुचें वेंटाळें । आणि यासींचि त्वा मानिला होतासि व्याळ । सांडि पा विषभयाचि तळमळ । आपुलिया मनीचि

॥ ३६ ॥ मग तो रज्जु पाहातां तयानें । उडालें सर्पत्वाचें भान । भय कंपादीक जालें हारण । तया क्षणीं तयाचें ॥ ३७ ॥ तैसा सर्वहि आत्मा असतां । त्याचें वास्तव स्वरूप जीवें नेणतां । जगदाकारें जाला पाहाता । अविनाशि आत्मयालागिं पै ॥ ३८ ॥ तया विपरित ज्ञानें करून । पावता झाला भय दारून । अत्यंत खेदयुक्त होउन । दुःख पाहाता जाहाला ॥ ३९ ॥ म्हणे मी जन्मतो आणि मरतो । मी या सुखदुःखालागिं भोगितों । मी पापपुण्या लागि कारितों । देहपुरींत राहुनी ॥ ४० ॥ अनेक जन्मांतारें वाहात आलों । या भवनदीचा प्रवाहिं पडिलों । कामक्रोधखल्लाळिं अथडलों । बहु-सत्राणें करोनि ॥ ४१॥ तेथें चिंता–मुसर पायातें वोडि । खेदमच्छ मांसातें तोडि । आशा–सर्पिणि घालोनि अडी । पायालागि गुंडाळे ॥ ४२ ॥ मृत्यु-नांगा उभवोनि खेकडा । अति भयानक पातला पुढा । अतांचि करील मस्तकाचा खुडा । ऐसें वाटे निश्चइं ॥ ४३ ॥ असो ऐसें नानाप्रकारिं भय । मानितसे देहपुरिचा राय । जरि अकस्मात होवोनि पुण्योदय । सद्गुरु दयाळ भेटला ॥ ४४ ॥ तरी तो अद्वैत शास्त्र उपदेशून । सांगोनि आत्मस्वरुपाची खुण । करील अज्ञानतमनाशन । ज्ञानदीपें करोनि ॥ ४५ ॥ मग जावोनि जगद्विवर्तभ्रांति । होय सर्व ब्रह्म ऐसि प्रतीति । तेव्हां अनेक भयाचि सांडोनि खंति । जीव निर्भय होतसे ॥ ४६ ॥ म्हणे मी परब्रह्म चिन्मय । निर्धर्म निष्क्रिय निरामय । जन्ममरणादिकाचें भय । नसेचि मजला कदापि ॥ ४७ ॥ अवघा एकचि आत्मा आसतां । म्या द्वैत कल्पना भाविलि वृथा । तया द्वैत योगें भय आणि चिंता । वाहात होतों अज्ञानें ॥ ४८ ॥ असो जो जीव अज्ञानें भय पावला । तोचि आत्मज्ञानें निर्भय जाला । मग जीवत्व सांडोनि आत्मत्व पावला । पहिलें अपुलें होतें जें ॥ ४९ ॥ तव सिष्य ह्मणे जी गुरुराया । मन-बुद्धि-चित्त-अहंकारासि या । अति सामिप्यता असोनिया । आत्म्यासि कां हो नेणति ॥ ५० ॥ मग श्रीगुरुराय दयाघन । तयातें सांगति दृष्टांतेंकरुन । जेणेंकरोनि समाधान । होय तया सिष्याचें ॥ ५१ ॥

आत्मावभासयत्येको बुध्यादीनींद्रियाणिहि ॥
दीपो घटादिवत्स्वात्मा जडैस्तैर्नावभास्यते ॥ २७ ॥

अगा येकला आत्मा बुद्ध्यादिकासि । अपुलिया प्रकाशानें प्रकासि । परि बुद्धि आदि करोनि जडरासि । आत्म्यासि प्रकाशु न सकति ॥ ५२ ॥ मन-बुद्धि-चित्त-अहंकार-देहे । हे सर्वहि असति अज्ञान कार्ये । जडत्त्वाचा स्वयंभ

ठाय । हे तुं जाण निश्चइं ॥ ५३ ॥ याचें सर्वही परतंत्र वैभव । मग याणि आत्मयातें काय पाहावें । जैसे गर्भाधासि नसे ठावे । अन्यत्राचे रूपडें ॥ ५४ ॥ अंध अपुलियातें न पाहाती । माझि गौर वा शाम अहे कांति । ते दुसरीयातें काय पाहुं सकति । अपुलीया नेत्रानें ॥ ५५ ॥ किंव्हा अनेक घट असति । ते दीपातें प्रकाशउं न सकति । परी एकला दीप सर्व घटाप्रति । प्रकाशवि अपुल्या प्रकाशें ॥५६॥ तैसे बुद्धी आदिकरूनि सर्वहि । आत्म्यासि प्रकाशु न सकति पाहि । परि येक आत्मा बुद्धयादीक सर्वहि । प्रकाशी अपुल्या प्रकाशें ॥५७॥ तूं जरि म्हणसि ऐसें काहीं । किं आत्माचि प्रकाशी सर्वांहि । परि त्या आत्म्याचें ज्ञान व्हावया पाहि । द्वितीय अपेक्षा पाहिजे ॥ ५८ ॥ तरी ये विषइंचा प्रकार । तूंते सांगतों गा सविस्तर जेणें द्वितीय अपेक्षेचा परिहार । होय ज्ञानविषइंचा ॥ ५९ ॥

स्वबोधे नान्यबोधेच्छा बोधरूपतयात्मनः ।
न दीपस्यान्यदीपेच्छा यथा स्वात्मप्रकाशने ॥ २८ ॥

आत्मा स्वतःसिद्ध बोधरूप आसे । त्यातें अन्यत्र बोध अपेक्षा नसे । स्वसंवेद्यपणें विलसे । अखंडीत चिदात्मा ॥ ६० ॥ जैसे दीपासि पाहावयासाठिं । नलगे दुसऱ्या दीपाचि अटाटि । त्याच्याचि प्रभेनें त्याची भेटि । घ्यावि जावोनि जापरि ॥ ६१ ॥ तयापरि प्रत्यगात्मियाणें । पाहावें परमात्मिया लागुन । अनादि ऐक्य अखंडितपणें । आहे तें जाणावें स्पष्टत्वें ॥ ६२ ॥ तुं म्हणसि कीं तो अखंड आणि अद्वय । चिदात्मा सत्यस्वरूप होय । तेथें आत्मा प्रत्यगात्मा हें द्वय । कैशापरि योजावें ॥ ६३ ॥ तरी हें द्वैत कधि नव्हतें बा रे । परी तुवाचि अज्ञानें कल्पिलें किं रे । म्हणोनि द्वैत उपपादन हें सारें । करणें अलें तुजसाठिं ॥ ६४ ॥ परि हे द्वैत म्हणू नयेगा सर्वथा । हे द्वैत निरसनाचिच कथा । जैसि रोगिये मुखाते अलिया कटुता । कटु वोषधें निवारे ॥ ६५ ॥ कां अपुलीया मुखा लागुन । पाहू इच्छितें जालें मन । तरी घेवोनिया स्वच्छ दर्पण । तया योगें पाहावें ॥ ६६ ॥ ये विषईं श्री भगवान् । अर्जुनाप्रति वदले जाण । त्रितीय अध्याइं गीतावचन । ते मी तूंतें सांगतो ॥ ६७ ॥

संमतगीता ॥ श्लोक ॥—एवंबुत्धेः परंबुध्वा संस्तभ्यात्मान मात्मना इति ॥ तंव सिष्य म्हणे जि श्री गुरुमुर्ति । अशंका वाटति माजिया चित्तिं । तुम्हि माते काथिलि कीं आत्मास्थिति । बुत्धिस न कळे ह्मणउनि ॥ ६८ ॥ आतां ह्मणतां बुद्धीनें पाहावें । या उभयांतूनि कोणतें घ्यावें । हें मजप्रति सांगोनि द्यावें । श्रीगुरुराया

दयाळा ॥ ६९ ॥ मग स्वामि ह्मणाति रे ऐक सुमति । बुत्धीस अग्राह्य आत्मस्थिति । आणि बुत्धीस ग्राह्य हेहि उक्ति । बोलताति उपनिषदें ॥ ७० ॥ आतां बुत्धीनें आत्मा कैसा दिसे । आणि बुद्धीसि आत्मा कैसा न दिसे । हें तूज दृष्टांतें करोनि विन्यासें । सांगतों तें ऐक पा ॥ ७१ ॥ जैसे उपनेत्र लावोनि नेत्रासि । मंदचक्षु पाहाति अक्षरासि । तैसें परमात्म स्वरूप जीवात्मियासि । शुद्ध बुत्धीनें लक्षावें पै ॥७२ तया उपनेत्रा लागुन । न दिसे नेत्राचिया वाचुन । त्या परि बुत्धीसि स्वतंत्रपणें । न दिसे आत्मस्वरूप पै ॥ ७३ ॥ तूं जरि ह्मणसील ऐसे काहिं । किं आत्मयावीण बुत्धी स्वतंत्र नाहिं । आणि बुत्धीवीण आत्मयास सर्वथाहि । न दिसे परमात्म स्वरूप तें ॥ ७४ ॥ तरि येतावता काय झालें । उभयाचेंही समानत्व आलें । तेव्हां अन्य अपेक्षा करणें लागले । आत्मयासि प्रसिद्ध ॥ ७५ ॥ तरी तूं ऐसें न ह्मणे कांहिं । बुद्धी आत्म्यावीण स्वतंत्र नाहिं । तें आत्मस्वरूपाचि प्रभा पाहि । नसे भिन्न त्याहुनि ॥ ७६ ॥ जैसा अग्नि निर्धूम सोज्वळा । त्या माजि वसे त्याचि ज्वाळा । उठतां बैसतां भाव वेगळा । नसे तया ज्वाळेचा ॥ ७७ ॥ असो हा तूज सांगितला प्रकार । तो पूर्ण अनुभवि जाणति चतुर । जाणे ज्ञानद्रिष्टीनें परिकर । आत्मा लक्षिला असेल पै ॥ ७८ ॥ मागति घेवोनिया शंका । सिष्य पुसे गुरुकूळटिळका । ज्ञानद्रिष्टिनें जीवात्मिया येका । जाणता कार्य कां नोव्हे ॥ ७९ ॥ जीवात्मा देहिं अपरोक्ष वसे । आणि परमात्मा तो परोक्ष असे । या उभयतांचें ऐक्य कैसें । होउं सके स्वामिया ॥ ८० ॥ मग श्रीगुरु देति प्रत्योत्तर । जीवात्मा देहिं वसे निरंतर । तो येकला अनुभवावा साचार । ऐसे ह्मणसि जरी तुं ॥ ८१ ॥ तरी जिवात्मा अविद्यापासें गुंतला । सर्वस्वे तयेचा स्वाधीन जाला । यास्तव विद्याचि पाहिजे त्याला । अविद्यापाशछेदनासि ॥ ८२ ॥ ती विद्या परमात्मियाचि शक्ति । तिचेनी अनुभवासि ये परमात्मव्यक्ति । जीवात्म परमात्म ऐक्यस्थिति । पाहातां मुक्ति होतसे ॥ ८३ ॥ तूं ह्मणसि तो परोक्ष असे । जीवाचे त्याचे ऐक्य घडे कैसे । तरी येतद्विषइं मी विन्यासे । तुजलागि सांगतों ॥ ८४ ॥

निषिध्य निखिलोपाधीन्नेतिनेतीति वाक्यतः ।
विद्यादैक्यं महावाक्यैर्जीवात्म-परमात्मनोः ॥ २९ ॥

**टीपः**—करोनि सर्व उपाधीचा निरास । महावाक्ये करून जीवात्म परमात्मियास । पाहावें ऐक्य येकरस । ज्ञानद्रिष्टि करोनि ॥ ८५ ॥ करोनि त्वं पदाचा वाच्यार्थत्याग । आणि घ्यावा तयाचा लक्षार्थ सुभग । तैसाचि तत्पदाचा लक्षार्थ चांग ।

वाच्यार्थ त्यागें घ्यावा पै ॥ ८६ ॥ त्वं पदाचे वाच्यार्थ लक्षण । तें तुज सांगतों विवंचुन । करोनि तयाचे निसिधिकरण । अवसिष्ट भाग सेवि पै ॥ ८७ ॥ स्थूळ देह हा नोव्हे आत्मा । आणि लिंगदेहे हाही अनात्मा । तैसाचि कारण देहे नोव्हे आत्मा । अज्ञानरूप निश्चित ॥ ८८ ॥ महाकारण देहे चवथा । जयाचि जाणीव तुर्या अवस्था । देहलिदीपंन्याये तत्वता । तोहि अनात्मा असे पै ॥ ८९ ॥ ऐसे या चव-देहाचे निसिधिकरण । करिता राहे जें अवसिष्टपण । तयाचि गुरुमुखे वोळखोनि खुण । लक्षार्थेसि गणावि ॥ ९० ॥ तैसाचि त्वं पदाचा जो वाच्यार्थ । तयाचा स्पष्ट सांगतो अर्थ । त्याचा त्यागें जो लक्षार्थ । राहील तोचि घेइ पा ॥ ९१ ॥ इश्वराचे स्थूळ-देह तो विराट । लिंगदेह हिरण्यगर्भ स्पष्ट । तिजी माया कारण देह प्रगट । चवथा देह मूळ माया ॥ ९२ ॥ विराट ह्मणजे हें ब्रह्मांड । पंचभूताचें दळवाडें प्रचंड । हें समजोनि मायेचे बंड । अनात्मपणें त्यागावें ॥ ९३ ॥ हिरण्यगर्भ जो लिंग देह जाण । इंद्रचंद्रादीक देवगण । हे आत्मा नोव्हेत आसें जाणोन । त्याग करावा तयाचा ॥ ९४ ॥ तिजि माया कारणदेहे । जे प्रळयकाळिं शुन्यत्वपणें राहे । तोहि आपल्या निःसंदेहे । जाणोनिया त्यागावा ॥ ९५ ॥ आता चवथा देह मूळ माया । जे अहंपणें स्फुरलि मूळठाया । ते आत्मा नोव्हे हें समजोनिया । त्याग करावा तियेचा ॥ ९६ ॥ करितां चहूदेहाचा निसिद्धार्थ । तळी अवसिष्ट राहील जो अर्थ । तोचि इश्वराचा पै लक्षार्थ । जाणोनि घ्यावा गुरु-मुखें ॥ ९७ ॥ जहद आणि अजहद । तिसरे तें जहदाजहद । येणें करोनि महावाक्यार्थ विशद । तुजलागि सांगतों ॥ ९८ ॥ जहद म्हणजे सर्वस्वें त्याग । अजहद म्हणजे सर्वश्वें अत्याग । जहदाजहद म्हणजे भागत्याग । कांहीं घेणें कांहीं टाकणें । ९९ ॥ जैसा पाहिला होता जो कासींत । तोचि हा गृहस्थ येथें द्वारकेंत । ऐसे म्हणतां तत्क्षणिं देशकाल निरस्त । करोनि गृहस्थ घ्यावा पै ॥४००॥ तैसें उभयपक्षींचें अष्टदेहे । त्यागिता उभयभागिचा जो शुद्धार्थ राहे । तेणें जीवेश्वराचें ऐक्यत्व होय । ज्ञान दृष्टीनें पाहातां ॥ १ ॥ तूं म्हणसि की पहिलेंचि ऐक्य असे । तरीमग जाणावें तें काइसे । तरि त्वा न म्हणावें गा ऐसें । जाणणें नको म्हणऊनि ॥ २ ॥ तुझे चित्ती असे अज्ञान-भेद । जीव ईश्वर असतां अभेद । तया अविद्येचा करावया छेद । विद्या पाहिजे यदर्थी ॥ ३ ॥ अविद्या म्हणजे आत्मयाते नेणणें । जीवेश्वराचा भेद वाखाणणें । जीवेश्वराची ऐक्यता पाहाणें । तीतें विद्या म्हणावी ॥ ४ ॥ जीवाची किंचिज्ञत्वादि

लक्षणें । आणि ईश्वराचे सर्वज्ञत्वादी लक्षणें । ऐसें उभयपाक्षिचे त्याग करून । आत्मत्विं ऐक्य पाहावें ॥ ५ ॥ जैसि घट मठ उपाधि त्यागितां । घटाकाश मठाकाशाचि होय ऐक्यता । तयापरि वाच्चार्थ त्यागें लक्षार्थता । ऐक्य पाहावि दोहीचि ॥ ६ ॥ वाच्चार्थ म्हणजे आत्मलक्षण । लक्षार्थ म्हणजे शुद्ध आत्मा जाण । तया शुद्ध आत्मयाचेंचि ऐक्यपण । होत असे निश्चइं ॥ ७ ॥ अन्यथा जो वाच्यार्थ निशिद्ध । तो अनात्मा जाणोनिया अबद्ध । सर्वस्वें नासिवंत प्रसिद्ध । म्हणोनिया त्यागावा ॥ ८ ॥

आविद्यकं शरीरादि दृश्यं बुद्बुदवत्क्षरं ॥
एतद्विलक्षणं विद्यादहं ब्रह्मेतिनिर्मलं ॥ ३० ॥

टीपः—अविद्यारूप हें दृश्यजात । देहेमन इंद्रियादिसमस्त हे जाणोनिया नासिवंत । सुविचारें त्यागवें ॥ ९ ॥ जैसे उदकावन्हि बुद्बुद उठति । सर्वेचि नाशाप्रति पावति । परि अविनाशत्वें उदक स्थिति । असे जैसि तैसीच ॥ १० ॥ तैसें आत्मस्वरुपावन्हि । हें जग भासलेसें निर्धारि । याहूनी विलक्षण ब्रह्म मी ऐसीयापरि । निर्मलस्वरूपातें जाणावें ॥ ११ ॥

देहान्यत्वान्नमेजन्मजराकार्श्यलयादयः ॥
शब्दादिविषयैःसंगो निरिंद्रियतयानच ॥ ३१ ॥

मी या देहद्वयाहूनि असे वेगळा । शुद्धस्वरूप ब्रह्म-पुतळा । देहद्वयाचोया गळा । सर्व विकार आसति ॥ १२ ॥ जरामरण-कृशत्व-स्थूळ देहधर्म । क्षुधिपासा हें प्राणाचें कर्म । भयशोकादिक अनुक्रम । हे मनोधर्म आसति ॥ १३ ॥ तैसेचि शब्द-स्पर्श-रस-रूपगंध । या पंच विषयांचा भोग विविध । ते इंद्रियें भोगिति अबद्ध । आपुलाल्या अधिकारें ॥ १४ ॥ षडविकार षडभाव आणि पंचविषय । देहद्वय आसति याचे ठाइं । मी निर्धर्म निष्क्रिय आत्मा निरामय । निश्चयेंसि सर्वदा ॥ १५ ॥

अमनस्त्वान्न मे दुःखरागद्वेषभयादयः ।
अप्राणोह्यमनाः शुद्ध इत्यादिश्रुतिशासनात् ॥ ३२ ॥

संकल्प विकल्पात्मक जें मन । तें मी सर्वथा नोव्हेचि जाण । मग दुःख भय राग द्वेष संपूर्ण । मजला कैचे आसति ॥ १६ ॥ आत्मा अप्राण अमन इत्यादीक । श्रुति स्पष्टपणें देतसे हाक । जरा मरण मन प्राणादि समस्त । देहद्वयाचेचि आसति

॥ १७ ॥ जन्म जराकर्षत्व मरण । हे स्थूळदेहाते आसति संपूर्ण तैसेची लिंग देहाप्रति जाण । मन प्राण इंद्रियें आसति ॥ १८ ॥ संकल्प विकल्पात्मक मन । त्याचे राग द्वेष दुःख आदि करुन । क्षुत्पिपासा प्राणाचें लक्षण । विषयभोग इंद्रियाचा ॥ १९ ॥ देहद्वय मजहुनि अन्य आसति । तेव्हां उपाधि कांहींच मज नसति मी शुद्ध स्वरूप चिद्रभस्ति । निरोपाधिक असे पै ॥ २० ॥

निर्गुणो निष्क्रियो नित्यो निर्विकल्पो निरंजनः ।
निर्विकारो निराकारो नित्यमुक्तोस्मि निर्मलः ॥ ३३ ॥

मी निर्गुण निराकार । निष्क्रिय नित्य निर्विकार मज नसे माया अंजन प्रकार । म्हणोनिया मी निरंजन ॥ २१ ॥ मी कल्पनातींत निर्विकल्प । वासना बंधरहित मुक्तरूप दृश्य जडरासि मळ विरूप । नसे ह्मणोनि मी निर्मळ पै ॥२२॥

अहमाकाशवत्सर्वं बहिरंतर्गतोच्युतः ।
सदासर्वसमःशुद्धो निःसंगोनिर्मलोचलः ॥ ३४

मी आकाशा सारिखा निर्मळ । व्यापोनिया दृश्यजात सकळ बहिरंतरगत असता सर्वकाळ । निसंग असे सर्वदा ॥ २३ ॥ शमविषमा माजि मी सम । च्युती रहित मी अच्युत निःसीम । शुद्ध स्वरूप उत्तमोत्तम । चळरहित अचळ मी ॥२४॥

नित्यशुद्धविमुक्तैकमखंडानंदमद्वयं ।
सत्यंज्ञानमनंतं यत्परंब्रह्माहमेवतत् ॥ ३५ ॥

मी नित्यशुद्ध विशेषण मुक्त । अखंड आद्वय आनंद भरित । सत्य ज्ञानानंत जें निश्चित । तेंचि ब्रह्म असे मी ॥ २५ ॥

एवं निरंतरं कृत्वा ब्रह्मैवास्मीति वासना ।
हरत्यविद्या विक्षेपान् रोगानिव रसायनम् ॥ ३६ ॥

याप्रमाणें निरंतर भावना । मी ब्रह्म ऐसें स्मरत असतांना । अविद्याकृत चित्त विक्षेपवासना निःशेष नाश पावतसे ॥ २६ ॥ जैसें उत्तम रसायण । रोगियें चिरकाल करितां सेवन । निःशेष रोगकरीहाण । तैसें ब्रह्मचिंतन हें ॥ २७ ॥ तूं ह्मणसि हें शद्बज्ञान । मी ब्रह्म मी ब्रह्म ह्मणउन । तरी येताद्विषई तूं तें ध्यान । सांगतों तें ऐक पा ॥ २८ ॥ परी हा सांगितला जो प्रकार । तो साधकें स्मरावा वारंवार । तेणें अविद्या विक्षेपपरिहार । होत असे निश्चई ॥ २९ ॥ आगा हा

अनादि संसार । देहभावना होता वारंवार । जीवात्मा जाला देहाकार। अग्नि लोहोपिंडापरी ॥ ३० ॥ जीवात्मा नसता देहाकृति। परि ध्यास जाला काळ बहुति । तेणें पडोनि स्वस्वरूपभ्रांति । देहदसेसि पावला ॥ ३१ ॥ सत्यत्वे देह नसतां आपण । परि निजध्यासे पावला देहत्वगुण । तैसा स्वस्वरूप आत्मा चिद्घन । निजध्यासें का नोव्हे ॥ ३२ ॥ तव सिष्य म्हणे जि श्रीगुरूमुर्ति । ऐकोनि ध्यावि माझि विज्ञाप्ति । देह प्रत्यक्ष दिसे याज-प्रति । म्हणोनि देह मी म्हणतसे ॥ ३३ ॥ तैसा देहासारिखा अपरोक्ष । आत्मानुभव होइल प्रत्यक्ष । तंव्हा तेथें ठेवोनिया लक्ष । ब्रह्मरूप होइल पै ॥ ३४ ॥ ऐसि ऐकोनि सिष्य-वाणि । सद्गुरु ह्मणति धन्य तू ये क्षाणिं । जे मुमुक्षता उपजलि तुझे मनि । अपरोक्ष ब्रह्म स्वरूपाचि ॥ ३५ ॥ आतां ब्रह्म स्वरूप किंलक्षण । तें मी तुतें सांगतों जाण । मग तें अंतरिं करोनि मनन । निजध्यासन करीं त्याचें ॥ ३६ ॥ साधन आणीक साध्यता । या दो श्लोकिं सांगतों तत्वता । जेणें वस्तुचि चढे हाता । साधकाचा तात्काळ ॥ ३७ ॥

विविक्त देश आसीनो विरागोविजितेंद्रियः ॥
भावयेदेकमात्मानं तमनंतमनन्यधीः ॥ ३८ ॥

॥ टी० ॥ वैराग्यें इंद्रियें जिंकुन । शुद्ध एकांत स्थळिं बैसून । अनंत ब्रह्म स्वरूपा लागुन । अनन्यबुद्धि चिंतावें ॥ ३८ ॥ यास्तव बैसावें येकांतिं । जनाचा अखंड विषयाकार मति । साधकें बैसतां त्याचे निकटवर्ति । मन होतसे तैसेंचि ॥ ३९ ॥ जैसा पाणियाचा वोहट । चाले भूमि पाहोनि सपाट । पुढें लागलीया अवघड घाट । फिरे मागति उलटुनि ॥ ४० ॥ तैसि मनासि विषय-सुख गोडि । म्हणोनि धरि जन-संग-आवडि । तेथें दुःख होतां कडोविकडि । खेदालागि पावतसे ॥ ४१ ॥ ये विषइं श्री भगवंत । अर्जुनाप्रति सांगति निश्चित । किं संगें करोनि मोठा घात । होत असे साधकाचा ॥ ४२ ॥ ॥ संमत गीता ॥ श्लोक० ॥ :— ध्यायतो विषयान्पुंसः संगस्तेषूपजायते । संगात् संजायते कामः कामात्क्रोधोभि जायते ॥ १ ॥ क्रोधाद्भवति संमोहः संमोहात्स्मृतिविभ्रमः । स्मृति-भ्रंशाद्बुद्धि नाशो बुद्धिनाशात्प्रणश्यति ॥ २ ॥

यास्तव जन-संगातें सोडून । येकांत स्थळातें पाहून । घालोनि तेथें स्वस्तिकासन । मृदु आसनिं बैसावें ॥ ४३ ॥ कुट गिरि पर्वत कंदर । जेथें व्याघ्रादि पशु अति क्रूर । ऐसें अत्यंत स्थळ जें भयकंर । तेथें न राहावें साधकिं ॥ ४४ ॥

जैसा कोण्ही येक मत्कुनाच्या भयानें । निजला अरण्यामाजि जाउन । तेथें अरण्यपशूनें येऊन । विदारिला सर्वस्वें ॥ ४५ ॥ तैसा साधकें जनसंग सोडिला । पर्वतामाजि जावोनि राहिला । तेथें जरि व्याघ्रानें देहाचि नेला । मग साधनाला कोण करि ॥ ४६ ॥ आथवा प्रयासें जरि वाचला । तरी तेथें न मिळे भक्षावयाला । फळ मूळ शोधितांचि काळ गेला । मग साधन केव्हां करावें ॥४७॥ यास्तव जातें आत्मप्रयोजन । तेणें उभय भयाप्रति चुकउन । येकांत स्थळाप्रति पाहुन । वास करावा पै तेथें ॥ ४८ ॥ अराम मठिका देवालय । अथवा ग्रामासनिध स्थळ होय । येकांत आणिक निर्भय । तया स्थानिं वसावें ॥ ४९ ॥ येकांत स्थळिं बैसल्यावऱ्हि । मन विषयाचे चिंतना करि । या करितां वैराग्य अंतरिं । क्रोधरहित सेवावें ॥ ५० ॥ तें वैराग्य असे द्वि प्रकारिं । येक बाह्य येक अंतरिं । तयाचि अनुक्रमें कुसरि । तुजलागि सांगतों ॥ ५१ ॥ ऐक बाह्य वैराग्य लक्षण । कदापी न सेवावें मिष्टान्न । उत्तम वस्त्राप्रति जाण । घेउं नये सर्वथा ॥५२॥ करावें सीतोष्णाचें सहन । अश्रम परत्वें लघु वस्त्र वेष्टुन । फळ मूळ कंद आणि कदान्न । सेवित जावें स्वल्पत्वें ॥ ५३ ॥ कनक आणि कामिनिचा त्याग । सर्वस्वें करावा गा सुभग । यया नामें बाह्य वैराग्य । स्वल्प प्रकारें कथियलें ॥ ५४॥ अतां अंतर वैराग्य तें कैसें । ऐकोनि घेइ स्वस्थ मानसें । मनालागि विषयाचें पिसें । स्वाभावीक असे अनादि ॥ ५५ ॥ मन अप्राप्त विषय इच्छा करि । राज्यलक्षुमि असावि घरिं । सुपुत्र आणि पवित्र अंतुरि । स्वरूपवति असावि ॥ ५६ ॥ म्या सुखि असावें सर्वकाळ । नसावा मज दुःखाचा विटाळ । न भक्षो या शरिरासि काळ । कोटि कल्प गेलिया ॥ ५७॥ हें शरीर तेजस्वी आसावें । उत्तम पक्वान्नातें खावें । उत्तम वस्त्रालागि नेसावें । उपभोग घ्यावे सर्वहि ॥ ५८ ॥ ऐसें इह लोकिचे आसावे भोग । मेल्यावरि मज व्हावा स्वर्ग । तेथें अमृत-प्राशन देवांगणासंग । चिरकालत्वें असावे ॥ ५९ ॥ यापरि मनामाजि इच्छा वासना । अखंडितपणें असति जाणा । त्या कदापि आणुं नये मना । या नामें अंतर वैराग्य ॥६०॥ नको नको हें मज सर्व कांहिं । विषय भोगितां सौख्य नाहिं । मग मी याचि चिंतना करुं तें काइ । या नामें अंतर वैराग्य ॥६१॥ या विषयाचा संग केला । ह्मणोनि सर्वस्वें नाश जाला । अहाहा नरदेह व्यर्थ चालिला । या नामें अंतर वैराग्य ॥ ६२ ॥ यापरि वैराग्याचि रिति । तूतें कथिले यथानिगुति । आतां इंद्रिये जिनावयाचि गति । सांगतों ते ऐक पां ॥ ६३ ॥ श्रोत्र त्वग् चक्षु जिव्हा घ्राण । हे पंच ज्ञानेंद्रिय असति जाण । ते पंच कर्मेंद्रिया-

सहित आपण । विषयावन्हि धावति ॥ ६४ ॥ ते ज्ञानेंद्रियपंचक मना अधीन । तें मन वैराग्या आकळिलें जाण । इंद्रियें अनायासें करून । जिंकिलें जातें सर्वहि ॥ ६५ ॥ विषयध्यान सोडितां समस्त । मन होइल अधार-रहित तेव्हां पडुं पाहेल लया आंत । अथवा तूर्ष्णिभूत होइल पै ॥ ६६ ॥ तरि सोडोनि विक्षेपाचि फांदि । न पडतां लयाचिये संधि । तुर्ष्णि न राहातां शुत्धबुत्धि । आत्मस्वरुपिं योजावि ॥ ६७ ॥ जैसे हिमालय पर्वता-माझारि । बैसुनि जाति सिंक्यावन्हि । अति धैर्य धरोनि अंतरिं । पैल तटातें पावती ॥ ६८ ॥ ते न पडती कड्या माझारि । न राहाति उगेचि मध्यंतरिं । इकडील झोका तिकडे सत्वरि । घेउनि जाती पैलीकडे ॥ ६९ ॥ तैसें दृश्यमात्रातें सोडून । साधकें करावें आत्मचिंतन । लय विक्षेपातें सांडून । अनंत स्वरूप ब्रह्माचें ॥ ७० ॥ ब्रह्म सहस्त्र कोटि योजनें । इतुकें उंचि रुंदि लंबायमान । ऐसि गणना नसेचि जाण । ह्मणोनि अनंत ह्मणीजे पै ॥ ७१ ॥ कोण्हि एक पामर जाति । अनंत स्वरुपाचें व्याख्यान करिति । किं ब्रह्म अहे कैशा स्थिति । हें न कळे ह्मणोनि अनंत तें ॥ ७२ ॥ तरि न करावें ऐसें व्याख्यान । न कळे तरि अनुभव होइल कोठुन । ब्रह्माचा अंत न लागला जाण । तरि काय उणें साधकाचें ॥ ७३ ॥ जैसें समुद्र-तटा-किचें जळ । कोण्हि येकानें पाहिले प्रांजळ । आणि न पाहिला पैलतीर केवळ । तरि का समुद्र न पाहिला ॥ ७४ ॥ तैसा व्रित्तिव्याप्ति करुन । आत्मा लक्षिला साधकानें । जरि फळ व्याप्तिवत हा इतुका म्हणून । न कळे तरि काय गेलें ॥७५॥ आसो त्या पामर जनाचा गोष्टि । नायके तुं कर्णसंपुटिं । स्वरुपिं योजोनि ज्ञानद्रिष्टि । अनंत स्वरुप चिंती पा ॥ ७६ ॥ तंव सिष्य ह्मणे वो श्रीगुरुराया । विनंति करितों लागोनि पाया । अनंत स्वरुप चिंतावया । बरोंचि कथिलें स्वामींनीं ॥ ७७ ॥ येथ-वरि जे उपाय कथिले । ते सर्व अनुभवासि आले । लय विक्षेपातेंहि बोळांडिलें । परि तुर्ष्णि ठेलें चित्त माझें ॥ ७८ ॥ जैसा माळियें पाण्याचा लोट । भूमि खणुन नेला सुभट । परि त्यातें न दाखवीतां क्षेत्रपीठ । ऐलिकडेचि सोडिला ॥ ७९ ॥ उदकें अपुल्या भरति करून । उलंघिले चडाव आणि लवण । परि पुढें मार्ग न सुचतां जाण । उदक फिरे माघारें ॥ ८० ॥ तैसें तुह्मि सांगितलें त्या प्रमाणें । सुक्ष्म जालेंसे माजें मन । लय विक्षेपातें सांडुन । तुर्ष्णिभूत होतसे ॥ ८१ ॥ ते तूर्ष्णि क्षणेक राहातसे । सवेंचि मागति दृश्यावरि येतसे । याजप्रति करावें कैसें । स्वामिराया दयाळा ॥ ८२ ॥ तरि कांहीं तरि उपायातें । स्वा-

मिनिं कथिलें पाहिजे मातें । जैसे शाखेवऱ्होनि चंद्रातें । दाखविति द्वितियेचा ॥८३॥ मग श्रीगुरु होवोनि प्रसन्न । बोलते जाले सिष्यालागुन । धन्यधन्य तुझें मुमुक्षुपण । पाहिलेंसे या काळीं ॥ ८४ ॥ सांडोनि लय-विक्षेप-कषाय । तेथोनिहि पुढें पुससि उपाय । आता तुज उतराइ होउं काय । आत्मस्वरुपावांचुनि ॥ ८५ ॥ अगा कित्तेक तूर्ष्णि करोनि मन । येकांतिं बैसति डोळे झाकुन । ब्रह्मस्वरुप जालों म्हणुन कषायातें सेविति ॥ ८६ ॥ असो तुझि शुत्ध बुत्धि पाहुन । प्रसन्न जालें माझें मन । तरि आतां शुत्ध आत्मचिंतन । दृष्टांतें करोनि सांगतों ॥ ८७ ॥

आत्मन्येवाखिलं दृश्यं प्रविलाप्य धियासुधीः ॥
भावयेदेकमात्मानं निर्मला-काशवत्सदा ॥ ३९ ॥

टी०:—अनंतस्वरूप आत्मा पूर्ण । त्यामाजि पंचभूतात्मक ब्रह्मांड जाण । माया अविद्या तिन्हि गुण । दृश्य जात सर्वहि ॥ ८८ ॥ ऐसें हें दृश्य जात संपूर्ण । लयासि नेवोनि शुत्ध बुत्धिनें । शुत्ध आकाशा समान । आत्मा चिंतावा सर्वदा ॥ ८९ ॥ स्थावर जंगम जीव समस्त । त्यांचा लय करावा पृथ्वि आंत । पृथ्वि लया न्यावि आपा आंत । आप अग्नित लया न्यावें ॥ ९० ॥ अग्नि न्यावा वायोनें झडपुन । गगनिं हरपोनि न्यावा पवन । त्रिगुणिं लया न्यावें गगन । मायेंत त्रिगुण मेळवावे ॥ ९१ ॥ मायेचें स्वरुपिं ऐक्य करावें । तें आत्मस्वरुप आकाशवत् पाहे । शुत्ध बुत्धि करोनि बरवें । साधकानें सर्वदा ॥ ९२ ॥ आता ऐके गा सिष्य-सिरोमणि । येथवरि जालि शास्त्राचि उभारणि । आत्मा दृष्टातें करुनि । आकाशवत सित्ध केला ॥ ९३ ॥ दृष्टांत बोलति श्रुति स्मृति । परि द्राष्टांताचि न करवे प्राप्ती । येथें पाहिजे सद्गुरुचि युक्ति । मग आत्मप्रतिति रोकडि ॥ ९४ ॥ जरि ते युक्ति ह्मणसील कैसि । तरि तुज सांगतों ते विन्यासि । स्वस्थ करोनिया मानसिं ऐक अता वचन तें ॥ ९५ ॥ अरे हे युक्ति अति सखोल । वाउगा बोलूं नये हा बोल । परि तूं श्रोता मिळालासि सुसिळ । ह्मणोनीया बोलतों ॥ ९६ ॥ अगा हे जीवापलिकडिल बोल । केवळ अमृतसंजिवनिचि फुल । ठेविले होते अति सखोल । स्वरुपामाजि अछादुनि ॥ ९७ ॥ जैसें कृपणें आपुलें धन । ठेवि पृथ्विचे पोटिं नेउन । परि सुपुत्र जालिया संतान । तयालागि दाखवि तें॥९८॥ तैसा तुं श्रोता अति चतुर । मिळालासि विश्वासुक वृत्तिस्थिर । मग जीवापैलिकडिल उत्तर । काय ह्मणोनि न बोलुं ॥ शुत्ध गगनासारिखें चिंतन । करावें ब्रह्म-

स्वरुपाचें जाण । ह्मणोनि मि दृष्टांतें करुन । बोलता जालों वचनातें ।। ५०० ।। परि अन्य दृष्टांतासमान । हा आकाशदृष्टांत नोव्हे जाण । जो दृष्टांत तोचि द्राष्टांतपणें । येथें जाणिला पाहिजे । ये विषइ श्रीरामाप्रति । वसिष्ठ बोलते जाले वचनोक्ति। तेचि योजोनिया संमति । बोलतों तें ऐक पा ।। २ ।। संमत वासिष्ठ ।। श्लो० ।। निरंशत्वाद्विभुत्वाच्च तथा नश्वर भावतः ।। ब्रह्मव्योम्नोर्न भेदोस्ति चैतन्यं ब्रह्मणोधिकं ।। १ ।। टी० निरवयव विभु अनश्वर । सारिखेंचि ब्रह्म आणि अंबर । परि चैतन्यता येक अधिकोत्तर । नभापेक्षा ब्रह्मिं असे ।। ३ ।। चैतन्ययुक्त म्हणजे ज्ञानाकाश । करि बुद्धिमन इंद्रियातें प्रकाश । जाणे शून्यासहित सर्वांस । चिद्रुपत्वें अपुल्या ।। ४ ।। संमत वासिष्ठ ।। श्लो० ।। सर्वमेव चिदाकाशं ब्रह्मेति घनानिश्चये । स्थिति याते शमं याति जीवोनिःस्नेहदीपवत् ।। १ ।। सत्यानंद-चिदाकाश-स्वरूपः परमेश्वरः । मृद्भाजनेषु मृदिव सर्वत्रास्य पृथक् स्थितिः ।। २ ।। तें चिदाकाश ब्रह्म परिपूर्ण । सर्व पदार्थ मात्रि असे व्यापुन । नसेचि त्या चित्स्वरूपावांचून । आणिक कांहिं दूसरें ।। ५ ।। आतां एकेठाइं दृष्टांत द्राष्टांत । कैसे संभवति पै निभ्रांत । तें श्रवण करि पा सप्रचीत । अनुभवें करोनि ।। ६ ।। आगा हें जैसें घटाकाश । तैसेंचि असे पै मठाकाश । तयासारिखें महदाकाश । अहे किं नाहिं पाहे पां ।। ७ ।। या महदाकाशासारिखें पाहि । चिदाकाश म्हणविजे ब्रह्मांडाबहि । मग त्या चिदाकाशा पैलीकडे कांहिं । नसे आणिक दुसरें ।। ८ ।। तिन्हि आकाश दृष्टांतस्थानिं । चवथें चिदाकाश द्राष्टांत मानि । परि चिदाकाश पाहातां सर्वा स्थानिं । दृष्टांत द्राष्टांत येक पै ।। ९ ।। घटाचा नाश जाला असतां । घटाकाशासि येतसे मठाकाशता । तो मठ नासालिया तत्वता । महदाकाशता येइ त्यातें ।। १० ।। तैसें हें सप्तावर्ण ब्रह्मांड नासतां । महदाकाश पावे चिदाकाशता । मग तें चिदाकाश निरोपाधिक तत्वता । तेंचि तें असे पै ।। ११ ।। आरे हें तुज सांगितलें उकलुन । जैसें लेकरांत खडें मांडुन । परि सर्वहि उपाधि मिथ्या माणुन । अवघेंचि पाहे चिदाकाश ।। १२ ।। घटाचीये स्थानिं हा तुझा देहे । मठाचिये स्थानिं हें ब्रह्मांड गाहे । घटमठत्यागें महदाकाश राहे । तैसें पिंडब्रह्मांडत्यागें चिदाकाश ।। १३ ।। व्याव्हारीक प्रतिभासिक अवाच्छिन्न । हे जीवाचि असति त्रै लक्षण । त्यांतिल हें अवच्छिन्न लक्षण । तूतें उकलून सांगितलें ।। १४ ।। जीवेश्वराचा लक्षांश भाव । तेंचि हें जाण चिदाकाश सर्व । महावाक्यें जहदाजहदलक्षणें बरव । ऐक्य होय यें स्थळिं ।। १५ ।। ऐसा पिंड ब्रह्मांडादि उपाधीचा । त्याग करोनिया निज साचा । जीवात्मा परमात्मा या उभयाचा । येक रस

पाहे चिदाकासिं ॥ १६ ॥ मग तया चिदाकाशाचे ठाइं । देशकालवस्तु परिच्छेद नाहिं । चित्स्वरुप चिद्घनादि नामें पाहि । याजलागिच आसति ॥१७॥ आतां सेवटिल सांगतों उत्तर । जेणें बोलणें नलगे वारंवार । होय आत्मस्वरुप साक्षात्कार । श्रवणमात्रें जयाचा ॥ १८ ॥ जैसि पितळेचि काळिमा उडवितां । मग तें पितळचि पावे सुवर्णता । तैसि नभाचि शद्ब आणि शून्यता । सांडितां होय ब्रह्मचि तें ॥ १९ ॥ ऐसें सद्गुरुचें ऐकोनि वचन । सिष्यासि जालि येकतान । चिदाकाशाचें करितां ध्यान । वृत्ति गेलि वितळोनि ॥ २० ॥ जीव ईश्वराचा पुरला अंत । वृत्ति स्वरुपिं जालि निवांत । जया स्वरुपाचा नलगे अंत । तेंचि अवघें कोंदाटलें ॥ २१ ॥ जैसे सप्तार्णव जाले येकवट । तैसें स्वरुप देखिलें घनदाट । जिकडे तिकडे ब्रह्माचे अफाट । पाहूनि वृत्ति निमालि ॥ २२ ॥ नाठवति स्वर्ग मृत्यु पाताळ । नाठवे दशादिशा धृवमंडळ । नाठवे मेरु आणि सर्व भुगोळ । पंचभूतें नाठवति ॥ २३ ॥ नाठवति देव यक्ष किन्नर । नाठवति चारण उरग विद्याधर । नाठवति गंधर्व आणि अप्सर । दानव असुर नाठवति ॥ २४ ॥ नाठवति चंद्रसूर्य तारांगणें । नाठवति मेघपडळ गंधर्व-भुवनें । नाठवति अष्टदिग्पाळांचि स्थानें । अर्यमादि पितर नाठवति ॥२५॥ नाठवति ऋषि दश अवतार । नाठवति हारिहाराचीं चरित्रें । नाठवति तिर्थ आणि क्षेत्रें । देश पवित्र नाठवति ॥ २६ ॥ नाठवति नर आणि नारि । नाठवति पशु-पक्षि-गण खेचरी । नाठवति वृक्षनद्या-विहिरि । जळचरें नाना नाठवति ॥ २७ ॥ नाठवे विषयजात संपूर्ण । गुरु आणि सिष्यपण । नाठवे मी माझेपणाचें भान । भयसुखदुःखें नाठवति ॥ २८ ॥ ऐसें जें जे दृश्यमात्र संपुर्ण । तें तें कांहींच नाठवति जाण । येक वस्तुमात्र सच्चित् घन । परिपुर्णत्वें आठवे ॥ २९ ॥ संकल्प-विकल्पात्मकमन । तें स्वरुपिं गेलें वितळुन । निश्चयात्मिका बुद्धि जाण । तेही स्वरुपीं निमालि ॥३०॥ जागृती ना स्वप्नसुषुप्ती । तुरीया परतली देवोनि प्रतीति । प्राप्त जाहली उन्मनी स्थिती । स्वरुपालागि अभिन्न जे ॥ ३१ ॥ काढोनि अज्ञानाचि बुंथि ॥ सुटलि हृदइंचि चिज्जड ग्रंथि । प्राप्त होउनि अद्वय स्थिति । गाढ समाधि लागलि ॥ ३२ ॥ ऐसा लोटतां बहुत काळ । सद्गुरु बोलते जाले दयाळ । सावध होइरे लडिवाळ । येइ पूर्व स्थितिवारि ॥ ३३ ॥ ऐश्या मारिल्या बहुत हाका । तंव सिष्यें उकलिलि नेत्र-रेखा । अवलोकुनिया सद्गुरुमुखा । मागति नेत्र झाकिले ॥ ३४ ॥ वृत्ति लागुनि उठउं जाय । तंव ति स्वरुपिं घेतसे थाय । जैसे उठवण करि गुरुपाय । नधारि प्रयासें उठवितां ॥ ३५ ॥

मग श्रीगुरुरायें हास्य केलें । स्वकरें तयासि थापटिलें । बळेंचि वृत्तिवरि आणिलें । तया शिष्यवर्यातें ॥ ३६ ॥ मग तेणें उठोनिया प्रणिपात । घातला साष्टांग दंडवत । कर जोडोनिया करित । स्तुतिलागि ते काळी ॥ ३७ ॥ जि जि सद्गुरु स्वामि दयाघना ॥ ब्रह्मविद्यादायक निधाना । उद्धरिलेंहो मज दीन जना । अनाथालागि श्रीगुरु ॥ ३८ ॥ धन्य धन्य आजि उगवला दिन । जे बोधामृताचा वर्षला घन । मी कृतार्थ जालो असे जाण । स्वामि-चरण-प्रसादें ॥ ३९ ॥ आजि भाग्याचि जालि सिमा । जे पावलों अपुल्या निजधामा । काय सांगावा जि महिमा । तया आत्मसुखाचा ॥ ४० ॥ बरा होतों मि स्वरुपिं निमग्न । कासिया चेवविलें मज लागुन । अतां तेंचि सुख सर्वदा संपूर्ण । असो स्वामि-प्रसादें ॥४१॥ मग श्रीगुरु ह्मणति रे बुद्धिमंता । बरवि अनुभविलि आत्मसत्ता । परि हें बोलु नये गा तत्वता । नास्तिक जनापासि पै ॥ ४२ ॥ कोण्हि असेल पूर्ण अनुभवि । तोचि येथें मान तुकावि । येरा पाशांडियासि गाथागोवी । असे हे जाण निश्चित ॥ ४३ ॥ आतां आसो हे सर्वही देख । तू ह्मणसि किं आत्मसुख । अखंडित असावे निःशंख । अविनाशत्वें सर्वदा ॥ ४४ ॥ तरि ये विषइंचि युक्ति । तूतें सांगतों यथा निगुति । जेणें सर्वकाळ आत्मस्थिति । न भंगेचि निश्चित ॥ ४५ ॥

नामरूपादिकंसर्वं विहाय परमार्थवित् ।
परिपूर्णचिदानंदस्वरूपेणावतिष्ठते ॥ ४० ॥

शुद्ध परब्रह्म जें निश्चित । तो ह्मणविजे पै परमार्थ । त्यातें जाणति ते परमार्थवित । ब्रह्मवेत्ते तेचि पै ॥ ४६ ॥ ते परमार्थदर्शी नामरूपासि । टाकोनिया निश्चयेसि । परिपूर्ण चिदानंद जें तेणेंसि । अभेदत्वें तिष्ठति ॥ ४७ ॥ नामरूप ह्मणसि जरि कैसें । तरि तुज सांगतों विन्यासें । तें ऐकोनि घेइ स्वस्थ मानसें । बुद्धिमंता सुपुत्रा ॥ ४८ ॥ गौ मानव गज तुरंगम । वनचरें कीटक विहंगम । नाना योनि अधम आणि उत्तम । नामें त्यांचिं वेगळालिं ॥ ४९ ॥ तैसेचि वृक्ष आणि पाषाण । आसति वेगळालि नामें करुन । रुपेंहि आसती भिन्नभिन्न । सर्व दृश्यमात्राचे ॥५०॥ कोणि चतुष्पदे आणि शृंगधारि । द्विपदे करचरण युक्त पक्षधारि । अतिशयें स्थूळ शुंडाधारि । नानापरि जीवजंतु ॥ ५१ ॥ कोण्ही स्थूळ कोण्ही र्‍हस्व । कोणी दीर्घ कोणी कृश । कोण्ही देह वर्तुळ बहुवस । त्रिकोण चतुष्कोणादि ॥५२॥ कोण्ही श्वेत कोण्ही पीत । कोण्ही सावळें कोण्ही हरित । कोण्ही मीश्रीत - रंग कोण्ही रक्त । कोण्ही चित्रविचित्र पै ॥ ५२ ॥ तैशा वेगळाल्या जाती ।

बहुता प्रकारिच्या आवृती । चौऱ्यांशि लक्ष योनिचि ख्याती । जगामाजि असे पै ॥ ५४ ॥ हें नामरूप जातिवर्ण । सर्वैहि दृश्य मिथ्या मानुन । अविनाश सच्चिदानंद-घन । तद्रूप होवोनि राहे तू ॥ ५५ ॥ सद ह्मणिजे त्रिकाळ बाधातीत । चिद ज्ञानरूप प्रकाशवंत । अनंद ह्मणीजे सुखभरित । सुख:खातीत जें. ॥ ५६ ॥ तुज सांगितलें चिद-अधिष्ठान । तयाचे ठाइं हें त्रैलक्षणें । जाणोनिया तयाचें चिंतन । तद्रूपत्वें करि पां ॥ ५७॥ तूं ह्मणसील जरि ऐसें । ध्यान करुं जातां त्रिपुटि भासे । तरि ऐकुनि घेइ पा स्वस्थ मानसें । प्रकार त्याचा सांगतो ॥ ५८ ॥

ज्ञातृ-ज्ञान-ज्ञेय-भेदः परे नात्मनि विद्यते ।
परानंदैकरूपत्वा-द्दीप्यति स्वयमेवतत् ॥ ४१ ॥

टी०—अगा ज्ञेय ज्ञाता आणि ज्ञान । हे त्रिपुटि स्वरुपि नसे दुजेपण । परानंदैकरूपापासुन । प्रकाशित असे निश्चइ ॥ ५९ ॥ जैसें सूर्यापासोनि जालें उदक । त्यामाजि सूर्य प्रातिबिंबला देख । हे त्रैप्रकार जाले परि येक । प्रकार सर्वा ठिकाणिं॥६०॥ तो सुर्य उष्णकाळि जळ शोसिता । प्रतिबिंब बिंबिं पावे ऐक्यता । सेखि वर्षावकाळिं जळ प्रसवता । प्रतिबिंब दिसे त्यामाजि ॥६१॥ तैसि आत्म्या पासोनि शुत्ध बुत्धि । अत्माचि बिंबला तयेमधिं । ते त्रिपुटि भासतसे निरवधि । ज्ञेय ज्ञाता ज्ञातृत्वें ।६२। या त्रयस्थळिं आत्मा अनश्युत । तो भेद न म्हणावा गा निश्चित । ज्ञाता ज्ञानस्वरुपि लया जात । सेखि प्रकाशत आत्मसत्ते ॥ ६३ ॥ हे त्रिपुटि आसतां वा लया जातां । आत्मा येकचि गा तत्वता । ह्मणोनि भेद न ह्मणे तु सर्वथा । आत्मानुसंधान करी पा ॥ ६४ ॥

एवमात्मारणौध्यानमथने सततं कृते ।
उदिता-वगतिर्ज्वाला सर्वाज्ञानेंधनं दहेत् ॥ ४२ ॥

टीपः—आत्मा प्रत्यगात्मा अरणि । तेथें सद्बुत्धिचा मंथा योजुनि । निजध्यास दोर वोडिते क्षणि । शुत्ध ज्ञानाग्नि प्रगटे पै ॥ ६५ ॥ तेथें मूळ अज्ञानाचें इंधन । जळोनि जाय न लगता क्षण । मग संशय विपर्याय धूम्राते सांडुन । प्रज्वलित विलसे ज्ञानाग्नि ॥ ६६ ॥ त्या ज्ञानाग्नीचि अत्यंत ज्वाळा । तेहि उपशम पावे तया वेळा । मग सामान्य प्रकाश सोज्वळा । ज्ञप्तिरूप असतसे ॥ ६७ ॥ तव सिष्य ह्मणे जि गुरुमुर्ति । येकवेळ ज्ञान जालिया निगुति । मग निजध्यासनाचि प्रवर्ति । कासयासाठिं पाहिजे ॥ ६८ ॥ जैसा येकवेळ जाला ब्राह्मण ।

त्याजला नको ब्राह्मणत्वाचें चिंतन । तैसें सकृत जालिया तत्व दर्शन । निजध्यास न लगे सर्वथा ॥ ६९ ॥ ऐसें ऐकोन तयाचें उत्तर । सद्गुरु देति प्रत्योत्तर । आरे त्वा ह्मणतिले हे साचार । परंतु निजध्यसन पाहिजे ॥ ७० ॥ मुलाचा व्रतबंध जालियावरि । विसरोनि कर्मे पडति पहिल्यापरि । तोचि ब्राह्मणत्व स्मरता कर्मे करि । ब्राह्मणाचा सारिखे ॥७१॥ तैसा जन्मोजन्मिचा संसार । अज्ञान प्रवाहा बलोत्तर । त्यायोगे स्व-स्वरुप विसर । पडु पाहे मागति ॥ ७२ ॥ तूं ह्मणसि तया मुलाचिं कर्मे। विपरीत पडोत पूर्व धर्मे। परी ब्राह्मणपणाचीये नामें । न मुकेचि तो सर्वथा ॥७३॥ तरि तो ब्राह्मणत्वातें विसरतां । जाला शूद्रासमान आचरतां । मग ब्राह्मणपणाचि अक्षता । न लागे त्याचा कपाळीं ॥ ७४ ॥ तैसी असंभावना विपरीत भावना । उठतां त्या ब्रह्मवित् ब्राह्मणा । मग देह्याभिमान शूद्रपणा । आला त्याचा मस्तकिं ॥ ७५ ॥ तस्मात् पाहिजे निजध्यासन । तेणें होतसे अढळ विज्ञान । मग दृढतर जालियावरि जाण । विसर नाहि ना आठव ॥ ७६ ॥

अरुणेनैव बोधेन पूर्वं संतमसेहृते ॥
तत आविर्भवेदात्मा स्वयमेवांशुमानिव ॥ ४३ ॥

प्रथमबोध अरुणोदये करुन । होतसे अज्ञानतमहानन । सवेचि आत्मा प्रकाशघन । भानुवत् अयुर्भवे ॥ ७७ ॥ तव सिष्य ह्मणे जि गुरुराया । आत्मा पहिलाचि होता ठाइचा ठाया । मग बोधे करोनि कोठोनिया । अधिक अणिला सांगा जि ॥ ७८ ॥ मग श्रीगुरु ह्मणे रे तान्हया । हे सत्यचि ह्मणसि गा मम प्रिया । परिभ्रमला होतासि तू वाया । अविद्यायोगें करुनि ॥ ७९ ॥

आत्मा तु सततं प्राप्तोऽप्यप्राप्तवदविद्यया ॥
तन्नाशे प्राप्तवद्भाति स्वकंठाभरणं यथा ॥ ४४ ॥

आत्मा तरि सतत प्राप्त असे । परि अविद्यायोगें अप्राप्तवत् भासे । तें अज्ञान जेव्हा सर्वस्वें नासे । तेव्हा वाटे प्राप्तवत् ॥ ८० ॥ जैसि कोण्हियेक स्त्री उतावळि । मुख प्रक्षालना बैसे उपःकाळि । नाशिकींचे मोति तयेवेळि । काढोनि खोविले गळसुत्रि ॥ ८१ ॥ सवेचि ग्रहकार्याप्रति करितां । बहुत काळ जाला लोटतां । मग मोति नाकि पाहु जातां । न लागेचि हास्तातें ॥ ८२ ॥ तेव्हां जावोनिया माजघरिं । पाहु लागलि चौफेरि । सवोचि उतरंडि खालि वन्हि । उतरोनिया पाहातसे ॥ ८३ । मग अंग टाकोनि भूमिवन्हि ।

अक्रंदोनि खेद करि । सर्वोचि झाडोनिया खोलि वोसरि । केराप्रति पाखाडि ॥८४॥ तव येक पिचाकि सेजारिण । तयेचा ग्रहाप्रति येउन । पुसति जालि वर्तमान । काय जाले ह्मणउनि ॥ ८५ ॥ ति म्हणे वो सखे साजाणि । मोति हारपले वो माय बहिणि । विळभरि पाहिले धुंडाळुनि । परि मोति न सापडे सर्वथा ॥८६॥ ऐसे ऐकोनि तयेचें वचन । सेजारिण बोले अभय देउन । मोति येथेंचि असेल जाण । शोक न करि सर्वथा ॥ ८७ ॥ असो तया बाइचा सखा । पिताचि ग्रहासि अला देखा । तो म्हणे अतिशये सेवोनि शोका । काय बाइ पाहासि ॥ ८८ ॥ तिणें सांगताचि वृत्तांत । तेणें हास्य करोनिया त्वरित । म्हणे पाहे पा स्वकंठांत । शुद्ध हास्ते करोनि ॥ ८९ ॥ तिणे स्वकंठि चापचु जातां । चामकिर लागले तिचे हाता । मग शोक सांडोनिया तत्वता । अनंदयुक्त ज्महलि ॥९०॥ मग प्रातःकाळिंचा मुख प्रक्षाळणा । स्मरति जालि ते हास्यवदना । म्हणे मोति मजपासि असताना । उगिच भ्रमले होते मि ॥९१॥ तैसि गा सिष्य सुमति । आत्मा विसरोनि तुझि मति । चान्हि वेद ग्रह धुंडाळिति झालि होति चिरकाल ॥ ९२ ॥ सर्वेचि शास्त्राचिया अंगणिं । आत्मा पाहिला हुडकोनि । मागति योगबळे देह शोधोनि । केर काढिला अमंगळ ॥ ९३ ॥ करोनि नासा पुटाचे सुप । वायो बळे केंर काढिला अमुप । परि निज डोळा चिद्रत्न स्वरुप देखिले नाहि कदापि ॥ षड्चक्र उतार्डे खालि वन्हि । शुशुम्ना भानवसिते पाहिले परि । आत्म मोति अनुभवाचे करि । लागलेचि नाहि ॥ ९५ ॥ शमदमाचिये वोसरिवन्हि । शरीर अपटिलें नानापरि । परंतु चिद्रत्नाचि कांति बरि । स्वप्नींही न पाहिलि ॥ जैसि पिचाकि सेजारिण । तैसे परोक्ष ज्ञानि शास्त्रि निपुण । अंधाचि ते ज्ञानचक्षुविण । आत्म्यासि काय जाणति ॥ ९७ ॥ त्याणि कथिले तु आत्मा अहेस । परि जाला नाहि अज्ञान ध्वंश । ऐसे वेदांत प्रकर्णहि बहुवस । त्याचे मुखे ऐकिले ॥ ९८ ॥ असो तू श्रोता अससि चतुर । माते वाटलासि प्रियकर । ह्मणोनि सांगताचि आत्मविचार । अपरोक्ष आत्मा जाणिलासि ॥ ९९ ॥ तो आत्मा तरि तु पहिलाचि आससि । परि अज्ञान योगे भ्रमला होतासि । तें अज्ञान नासतां तुझे तुजपासि । अनादि अहेसे कळु अलें ॥ ६०० ॥ असो या व्यतिरेकाचा अगोधर । अध्यारोप कथिला सविस्तर । तुझेंचि अज्ञान घेवोनि परिकर । तेंचि तूतें उपपादिले ॥ १ ॥ किं ब्रह्म स्वरूपि माया जालि । तें स्थावर जंगमादिक प्रसवालि । परि ते उगीच अरोपिलि । शुद्ध स्वरूपावरोति ॥ २ ॥ जैसा वाधिचा साप करुन । गारोडि

दाखविति खरेंपण सिवटिं वाधि स्पष्ट दाखउन । सर्पालागि निवारि ॥ ३ ॥ आदि अवसानि मध्यंतरि । ती वाधिचि वाधीच होति खरि । परितेणे करोनि बाजिगीरि । द्रिष्टिबंधन केलें होतें ॥ ४ ॥ त्या गारोडियाचे बाजिगीरि । कोण्हीयेक सिकला जरि । त्याते वाधि दिसे सर्वापरि । सर्प द्रिष्टि न दिसता ॥ ५ ॥ असो तैसें ईश्वर माये करून । पडलेसें जगातें अज्ञान अवरण । आत्मस्वरूपातें नेणुन । जगदाकारें भासलं ॥ ६ ॥ संमत गीता श्लोक:— "दैवीह्येषा गुणमयी मममाया दुरत्यया । मामेव ये प्रपद्यन्ते मायामेतां तरंति ते ॥ १ ॥"

ऐसि ईश्वर माया दुरत्यय । जीवासि दाखवि नानापरि भय । तिचा जरि व्हावा वाटला जय । तरि जीवेश्वरि ऐक्य घ्यावे ॥ ५ ॥ त्या जीवेश्वर ऐक्य विद्ये करुन । जावोनि मायेचे अज्ञान अवरण । सच्चिदानंद आत्मा परिपूर्ण । सर्वीह गमे निश्चित ॥ ८ ॥ मग तथा ज्ञानिया लागुन । मिथ्यत्वें वाटे जगद्भान । ते कैसे ह्मणासि तरि अपवाद लक्षण । तुजलागि सांगतो ॥ ९ ॥

स्थाणौ पुरुषवद्भ्रांत्या कृता ब्रह्मणि जीविता ।
जीवस्य तात्त्विके रूपे तास्मिन्दृष्टे निवर्तते ॥ ४५ ॥

जैसा कोण्ही येक उदमाप्रति । प्राथःकाळिं उठोनि निगुति । मार्गी स्थाणु पाहुनि चित्ति । अतिशयेंसि बिहाला ॥ १० ॥ तो स्थाणु कृशिवळाचे क्षेत्रांत । अदौ बाभुळ वृक्ष होता निश्चित । तो कृशिवळे तोडोनि स्वहस्ते । खुंटमात्र उभा ठेविला ॥ ११ ॥ काढोनि तया वऱ्हील साल । खुंट दिसु लागला सोज्वळ । वऱ्ही तिपट खालि सरळ । ऐसा असे तो खुंट ॥ १२ ॥ तथा व्यवसायाने अकस्मात । तो स्थाणु देखिला चांदण्यांत । ह्मणे हा तस्करचि अति उन्मत्त । माते मारु पातला ॥ १३ ॥ मध्यंतरीच माझि वाट । धरोनि उभा राहिला धीट । मग आपुण स्तब्द राहिला नीट । त्या पासोनि दूरसा ॥ १४ ॥ ह्मणेरे ग्रहस्था न मारि माते । मी तुज घालितो दंडवताते । ऐसे बोलोनिया स्वहास्ते । वस्त्रालागी काढिले ॥ १५ ॥ वस्त्र ठेउनि मार्गात । माघारि निघोनिया त्वरित । ग्रामापासि येउनि रडत । हाका मारि मोठ्यानें ॥ १६ ॥ लोकासि धावा धावा ह्मणे । मार्गी मज लुटिले चोरानें । वस्त्रें पात्रे आणि नाणे । हिरोनि त्याणें घेतले ॥ १७ ॥ ऐसे ऐकेनि ग्रामस्थ जन । निघाले शस्त्राप्रति घेउन । ह्मणति कोठेंरे अहे कोण । तस्कर दाखवि आम्हाते

॥ १८ ॥ उदमि तयाते दाखउ जाय । तव यामिनिहि सरति होय । जावोनि पावले तो ठाय । जेथे वस्त्र ठेविलि ॥ १९ ॥ ते वस्त्र पाहोउनिया नेत्रासि । ह्मणति तस्कर गेला कवणे देसि । उदमि दाखवि पूर्व दिसेसि । तव स्थाणु द्रिष्टिसि पाहिला ॥ २० ॥ मग ह्मणे नेणोनि स्थाणु साचार । म्या यातेचि भाविले तस्कर । आणि उगाचि व्यर्थ शोकातुर । जालो हा काळ पावतो ॥ २१ ॥ असो त्या वेव्हारिया-सारिखे । आत्मयाते मानिले पारुखे । तयायोगे अनेक दुःखे । सेवित होतासि हा काळ वन्हि ॥ २२ ॥ वसवोनि अनात्मत्वाचा गाव । तेथे वस्ति करि कल्पोनि जीव । भोगित होतासि दुःख वैभव । आत्म अज्ञाने करोनि ॥ २३ ॥ तया आत्मयाचे वास्तवीकपण । समजता जावोनिया अज्ञान । मी जीव ऐसे जे होते भान । ते नाशा-प्रति पावले ॥ २४ ॥

तत्वस्वरूपानुभवादुत्पन्नं ज्ञानमंजसा ॥
अहं ममेति चाज्ञानं बाधते दिग्भ्रमादिवत् ॥

कोण्ही येक पुरुष निसि माझारि । उठोनि मार्गक्रमणाकारि । पुर्वेस जाणियाचा हेतु अंतरि । धरोनिया चालिला ॥ २५ ॥ अंधार पडला असता बहुत । तव मार्ग चुकला अकस्मात । तया योगे तो असे भ्रमत । अष्ट दिसेप्रति पै ॥ २६ ॥ नकळे कोणति दिशा कोण । पश्चिम उत्तम पूर्व दक्षण । हे काहि नणोनिया आपण । पश्चमेसि चालिला ॥ २७ ॥ बहुत क्रमिले मार्गाप्रति । तव अकस्मात उगवला गभस्ति । मग तो विचारोनि पाहे चित्ति । तव मार्ग दिसे पश्चमेचा ॥ २८ ॥ या परि तो चित्ति समजोन । येक योजन मागति फिरून । पुर्व दिशा वास्तविक समजोन । तया मार्गे गेला ॥ २९ ॥ तयापरि गा तुजला-गुन । अज्ञान काळुखे अति दारुण । त्या योगे माझे मिपण । उत्पन्न जाले सत्पुत्रा ॥ ३० ॥ मी देहे आणि हा माझा पुत्र । माझे ग्रह आणि माझे कलत्र । हे आप्त सोइरे माझे मित्र । वस्त्रपात्रादि देह माझे ॥ ३१ ॥ स्वस्वरूप अज्ञाने करुन । मी माझे जाले दिशाभ्रमण । तव अकस्मात गुरु कृपेकरुन । ज्ञानरूप भानु उदेला ॥३२॥ तेणे मी माझेपणाचे दिशाभ्रमण । जावोनिया समूळ अज्ञान । स्वस्वरूप चिदानंदघन । होवोनिया ठेलासि ॥ ३३ ॥ अगा भ्रमेकरून सर्वहि । आत्माचि जगद्रुपे मानिला पाहि । परि हे जग जालेचि नाहि । आत्माचि असे सर्वस्वे ॥ ३४ ॥ जैसा रज्जुचिया ठाइ । सर्प कधींच जाला नाहि । परंतु अज्ञाने करोनिया पाहि । भाविला वृथा ॥ ३५ ॥ असो हे अपवादाचे लक्षण ।

तुजलागि कथिले जाण । आता अन्वयाचेही प्रकर्ण । तुजलागि सांगतो ॥ ३६ ॥ तू म्हणसि कि सर्प भान। कोठे जाले रज्जु वाचुन । तैसा आत्मा सांडोनि जगद्भान। कोठे जाले सर्वहि ॥ ३७ ॥ ते मज सांगा विवंचुन । ऐसे जरि इच्छिल तुझें मन। तरि ये विषइचे तुजलागुण । उत्तर सांगतो ऐक पा ॥ ३८ ॥

सम्यग्विज्ञानवान् योगी स्वात्मन्येवाखिलं स्थितं ।
एकंचसर्वमात्मानमीक्षते ज्ञानचक्षुषा ॥ ४७ ॥

टीका ॥ असंभवना विपरीत भावना सांडुन । जयाचे मन स्वरुपि जाले उन्मन । सोचि सम्यक विज्ञानवान। योगि होय निश्चित ॥३९॥ ऐसा जो योगीयाचा राणा । ज्ञानद्रिष्टिकरोनि जाणा । पाहि आपुलिया स्वरुप स्थाना । जगद्विवर्त सर्वहि ॥ ४० ॥ जैसे उदकावन्हि दिसति तरंग । परि उदकचि असे तयाचे अंग । तैसे माझ्या स्वरुपि भासले जग । परि आत्माचि असे मी सर्वहि ॥ ४१ ॥

आत्मैवेदं जगत्सर्वं मात्मनोन्यन्नकिंचन ।
मृदोयद्वद्घटादीनि स्वात्मानं सर्वमीक्षते ॥ ४८ ॥

॥ टीका ॥ जो जो दिसे जगदाभास । तो तो योगि पाहे चिद्विलास । आत्मयावाचोनि सर्वत्रास । न लेखि च सर्वथा ॥ ४८ ॥ घटाचा आदिमध्य । अवसानि । मृत्तिकाचि असे येकले पाणि । तैसे सर्व दृश्यमात्राचिया स्थानि । आत्माचि पाहे येकला ॥ ४३ ॥ ऐसे ऐकोनि सद्गुरुच वचन । सिष्य बोलता जाला आपण । जि जि स्वामि करुणाघन । विनंति माझी परिसावि ॥ ४४ ॥ मृत्तिका घटासि कारण । परि घट कुल्लाळ केला निर्माण । तैसा आत्मा या जगासि कारण । परि जग निर्मिलें कोणिह हे ॥ ४५ ॥ ऐसें ऐकोनिया श्रवणि । स्वामि बोलति मधुरा वचनि । बरवे पुसिले त्वा ये क्षणि । तेचि आतां सांगतो ॥ ४६ ॥ मृत्तिका असे उपादान कारण । कुल्लाळ तो निमित्य कारण । ऐसा उभय योगे करुन । घट निर्माण होतसे ॥ ४७ ॥ किव्हा मृगजळ भासावया लागुन । सुर्य होय उपादान कारण । माध्यान्ह तो निमित्य कारण । ऐसे उभय कारणे आसति ॥ ४८ ॥ तु ह्मणसि मृत्तिका घट दोन्हि येक । परि कुल्लाळ द्वितिय होतो आणिक । तैसा आत्मा जग मिळोनि येक । परि काळ गमे द्वितियत्वें ॥ ४९ ॥ तारि ऐसे न ह्मणे गा अलुमाळ ।

जैसे प्रातर्माध्यान्ह सायंकाळ । वेगळाले गणावे परि सवित्रमंडळ । येकचि असे निश्चित ॥ ५० ॥ तया सूर्य मंडळावरुन । त्रिकाळाचे होतसे प्रमाण । परि ते काळ नसतीच भिन्न । तयाहुनि वेगळे ॥ ५१ ॥ तैसि आत्मयासि आणि काळासि । वेगळीक नसे निश्चयेसि । आत्माचि काळ जगद्रुपेसि । विजृंभित असे पै ॥ ५२ ॥ संमत् वासिष्ट ॥ श्लो०—न जायते म्रियते क्वचित् किंचित्कदाचन । जगद्विवर्तरूपेण केवलं ब्रह्मजृंभते ॥ १ ॥

॥टीका॥ असो योगियांचा राणा । आत्मत्वोचि पाहे सर्वहि जना । आत्मया वाचोनि ठिकाणा । नसेचि त्याते कोठेहि ॥ ५३ ॥

जीवन्मुक्तस्तुतद्विद्वान्पूर्वोपाधिगुणांस्त्यजेत् ।
सच्चिदानंदरूपत्वाद्भवेद् भ्रमरकीटवत् ॥ ४९ ॥

॥ टीका ॥ ऐसा जयाचा दृढनिश्चय । तोचि जिवन्मुक्तिदशापन्न होय । पुर्वउपाधि जे देह द्वय । टाकि तयाचा गुणाते ॥ ५४ ॥ पूर्वि म्हणत होता मी देहेदेही । तेणे पडोनि त्रिगुणाचा प्रवाहि । रागद्वेषाचिया डोहि । बुडत होता निश्चित ॥ ५५ ॥ ऐसे जे का देह संबंधि गुण । ते सर्वस्वे सांडिले आपति जेण । करिता सच्चिदानंद चिंतन । होता जाला तद्रुप ॥५६॥ जैसि कीटिका भ्रमरिगृहात । भयेकरोनि भ्रमरिते चिंतित । तव कीटिकाचि स्वये भ्रमरी होत । तीव्र चिंतने करोनि ॥ ५७ ॥ तैसे करोनि महावाक्य श्रवण । त्याचे करोनि अंतरि मनन । अभेदत्वे करिता निजध्यासन । साक्षात्कारता पावला जो ॥ ५८ ॥ तो मागति न म्हणे मी देह देही । सर्वापरि होउनि निःसंदेहि । म्हणे मी सच्चिदानंद अक्षइं । अजरामर होय पै ॥ ५९ ॥ किंबहुना देहद्वया समेत । जो आत्माचि जाला निभ्रांत । नाहिं जया स्वरूपासि अंत । तेचि होवोनि राहिला ॥ ६० ॥

तीर्त्वा मोहार्णवं हत्वा रागद्वेषादिराक्षसान् ।
योगी शांतिसमायुक्त आत्मारामो विराजते ॥ ५० ॥

॥ टी० ॥ पदार्थ आपणाहूनि असावे भिन्न । ह्मणोनि प्रीति व्हावि उत्पन्न । ते तव सर्वथा नसेचि जाण । यास्तव राग केला तयाचा ॥ ६१ ॥ अथवा तयाचा स्वरूपा वेगळा । पदार्थ कोण्हि असावा निराळा । ह्मणोनि यावा कंटाळा । हेंही नसे जापासि ॥ ६२ ॥ बांधोनि ज्ञानाचा स्वेतु परिकर । आणि अज्ञान-मोहार्णव दुस्तर । न स्पर्शिता पैलपार सत्वर । पावला तो योगीराज

॥ ६३ ॥ रावणकुंभकर्ण रागद्वेष । जे साधकाते भक्षिते राक्षस । ते जिवेंची मारोनिया निःशेष । टकिले जेणें ॥ ६४ ॥ मग शांति सीता निज अंतुरि । घेवोनि स्वसुखाचे मांडिवरि । आत्माराम योगि रावणारि । निज सिंव्हासनि विराजे ॥६५॥

बाह्यानित्यसुखासक्तिंहित्वामसुखनिर्वृतः ।
घटस्थदीपवच्छश्वदंतरेव प्रकाशते ॥ ५१ ॥

टी०—शद्वस्पर्श रूप रस गंध । हे बाह्य विषय असति पंचविध । जे इंद्रिय योगें जग अबध । क्षणैक सुख सेवितातिं ॥ ६६ ॥ ते अनित्य जाणोनि निश्चित । जो आत्मसुखीच असे रत । जैसा दीप ठेविला असता घटांत । तो घटा अंतरि विलसतसे ॥ ६७ ॥ तैसा निजात्मसुखें करुन । जो अखंडित असे निमग्न । तो मग बाह्य विषयाचि जाण । इच्छा न करि सर्वथा ॥ ६८ ॥ तुं ह्मणसि तो काइ येक न करि । कर्मि वर्ते अन्यत्राचीये परि । अन्नवस्त्रादि करोनि सर्वत्रि । सेविता दिसे मुनिवर्य ॥ ६७ ॥ तरि येविषइं एकवचन । तो सेविता दिसे दुजालागुन । परि तो कांहींच न करि जाण । आपुलिया अनुभवें ॥ ७० ॥

उपाधिस्थोपितद्धर्मैर्नलिप्तो व्योमवन्मुनिः ।
सर्वत्रिन्मूढवत्तिष्ठेदसक्तो वायुवच्चरेत् ॥ ५२ ॥

टी०—तो देहाचिया संगि असता । तयाचा धर्म न लिंपे तत्वता । मी कर्ता आणि मी भोक्ता । न ह्मणेचि तो कदापि ॥ ७१ ॥ मी सुखि दुःखि आणि दुर्बळ । मी पापि आणि पुण्यसीळ । मी सदय निर्दय आणि खळ । न म्हणोचि तो सर्वथा ॥७२॥ जरा मरण क्षुत्पिपासा । भयशोकादिकाचा वळसा । हे साहि विकार तो सहसा । अपुल्याकडे न घेचि ॥ ७३ ॥ जरा मरण देहधर्म । क्षुत्पिपासा हे प्राणाचे कर्म । भय शोकादिक संभ्रम । मनाचाचि असे पै ॥७४॥ ऐसें जाणोनिया अंतरि । तो प्रारब्धाचा क्षय करि । साक्षित्वे नभाचिया परि । अलिप्त सर्वा अचरणि ॥ ७५ ॥ असोनि सर्ववित् सर्वज्ञ । लोकासि दिसे जैसा मूढ अज्ञ । कोण्हीच जयाते न म्हणे तज्ञ । ऐसा राहे साधारण ॥ ७६ ॥ यथासांग कर्मेंही करि । परि तो करोनि अकर्ता निजनिर्धारि । ब्रम्हचर्यादि अश्रम चारि । लिलामात्रें वर्ततसे ॥७७॥ आतां फार सांगु काइ । तो सर्व करोनि अकर्ता पाहि । लिप्त नसे कोण्हेहि ठाइ । वायुपरि तो मुनिवर्य ॥ ७८ ॥ तंव सिष्य ह्मणे जि गुरुराजा । आपण जे सांगितले वोजा । परि यथेष्टाचरणियाचे काजा । येउ पाहाति हे वचनें ॥७९॥ यथेष्टाचरणि ह्मणे मी अकर्ता । काहि भय नसे मज पाप कर्ता । ऐसे वदोनि

दुष्ट कर्मे अचरता । होय अत्यादरेसि ॥ ८० ॥ तो पेउ नये तेचि करि पान । खाउ नये तेचि करि भक्षण । अचरु नये तेंचि अचरण । करी अत्यादरेसि ॥८१॥ ह्मणवोनि आपणाप्रति मुक्त । स्नान संध्यादि कर्मे समस्त । टाकोनि उगाचि क्रिडे स्वस्थ । पशुचीया सारिखा ॥ ८२ ॥ दुष्ट कर्मा लागि करिता । ह्मणे मी याचा साक्षि अकर्ता । कर्तृत्व सर्व देहाचा माथा । नसे मजकडे काहिही ॥ ८३ ॥ ऐसा जो का यथेष्टाचरणि । तो हे वचन साह्य करोनि । उगेचि पाषांड वाढवील जनि । स्वामिराया मज वाटे ॥ ८४ ॥ सद्गुरू ह्मणति तू ऐसा न ह्मणे । तो ज्ञानीच नोव्हे ऐसा जाणे । आरे ज्ञानियाप्रति यथेष्टाचरणें । कैसी संभवति सांग पा ॥ ८५ ॥ जन्मजन्मांतरि सदाचरण । करिता जाले तत्वज्ञान मग कैचे करील यथेष्टाचरण । पुर्वाभ्यासा वाचोनि ॥ ८६ ॥ जैसा रणकंदना माझारि । योद्धा असीलता घेवोनि करि । तो युद्ध करिता भूमीवऱ्हि । मस्तक पडिले परशस्त्रे ॥ ८७ ॥ अंगि होता वीरश्रिचा वारा । तेणे कबंध धावे सैरावैरा । मग काय तेंव्हां सांडोनि प्रथम शस्त्रा । घेइल नुतन शस्त्राते ॥८८॥ किंव्हा कुलाळाचे घरिचें चक्र । फिरत होते सव्याकार । ते मडके उतरिलिया वऱ्हि न फिरे । अपसव्ये करोनि ॥८९॥ किंव्हा इतचा पाहुनि सुटला बाण । तो पुर्वेचे वेधोनि विंदान । जैसा पुर्वेसीच करि गमन । पश्चमेसि न फिरता ॥ ९० ॥ तैसा तो मननसीळ मुनि । सत्कर्मे जाला ब्रम्हज्ञानि । मग तैसाचि वोघ सदाचरणि । चाले त्याचा सेवटवऱ्हि ॥ ९१ ॥ पहिले सांडावें सदासरण । नवे करावे असदाचरण । इतुका तरि खटाटोप कोण । करि तया योगियाचां ॥९२॥ तस्मात् जाते वास्तवीक नाहि ज्ञान । तोचि करि यथेष्टाचरण । होचि त्याचि वोळखण । निश्चयेसि जाण पा ॥ ९३ ॥ संमत् वासिष्ठ ॥ श्लो० ॥— सांसारिकसुखासक्तो ब्रह्मास्मीतिच वादिनः । कर्म ब्रह्मोभयं भ्रष्टं तंत्यजेदंत्यजं यथा ॥१॥ संसार सुखाचे ठाइ रत । आणि मी ब्रह्म ऐसे उचारित । कर्म ब्रह्म उभइ अंचवत । तो अंतेजवत त्यजावा ॥९४॥ संमत्गीता ॥श्लो०॥— येहिसंस्पर्शजाभोगा दुःखयोनय एवते । आद्यंतवंतः कौंतेय न तेषु रमते बुधः ॥ १ ॥ ऐसि भगवद्वाणि निश्चित । ज्ञानि विषयाचे ठाइ नसे रमत । दुःखरूप जाणोनि अंतवंत । सांडि विषया लागुनि ॥ ९५ ॥

उपाधिविलये विष्णौ निर्विशेषं विशेन्मुनिः ।

जलेजलं वियद्व्योम्नि तेजस्तेजसि वायथा ॥ ५३ ॥

टी० :—सुखदुःखात्मक प्रारब्ध सरता । देहद्वय उपाधि विलया जाता । मग व्यापक विष्णुचि निर्विशेषता । तदैक्य होय तो मुनि ॥ ९६ ॥ निर्विशेष म्हणजे निर्विकार । मायातीत जो चित्सागर । तदैक्यता पावे तो मुनिवर । निर्विशेषत्वे करोनि ॥ ९७ ॥ जैसा जळावान्हि आला बुद्बुद । त्यातील जळ अधी होते अभेद । मग तया बुद्बुदाचा होता भेद । विशेष ऐक्यता होतसे ॥ ९८ ॥ कि गगनि उठले अभ्रपडळ । तदवछिन्न जाले जे अंतराळ । विलयासि जाता ते अभाळ । मग विशेष ऐक्यता नभाचि ॥ ९९ ॥ सुर्यरस्मिवान्हि मृगजळ पाहि । त्या मृगजळावछिन्न रस्मि जः काहि । ते मृगजळ निशेष जालिया नाहिं । विशेष ऐक्यत रस्मिची ॥ ७०० ॥ तैसा अखंड आत्मा अद्वय । तेथे अज्ञानकल्पीत देहद्वय । त्याचा प्रारब्धक्षइं होता लय । जीवात्मा निर्विशेष होय पै ॥ ७०१ ॥ यन्हवि त्याचे देहद्वय पडावे । आणि मग तयाचे ऐक्य व्हावे । हे काहीच नलगे म्हणावे । पहिलेचि ऐक्य असे त्याचे ॥ २ ॥ परि प्रारब्ध सरण्याचि होति अवधि । त्यास्तव राहिलि होति देहद्वयउपाधि । तेहि लया जाता निरवाधि । ऐक्य विशेषतर होत पै ॥ ३ ॥

यल्लाभान्नापरोलाभो यत्सुखान्नापरंसुखम् ।
यद्ज्ञानान्नापरंज्ञानं तद्ब्रह्मेत्यवधारयेत् ॥ ५४ ॥

या लाभापेक्षां द्वितीयलाभ । आणीक नसेचि गा सुभग । यासुखापेक्षां सुखाचा कोंभ । दुसरा नाहिं जाण पा ॥ ४ जेंजें कांहिं सुख होतसे । तेंतें आत्मस्वरुपाचोंचि असे । जैसें भूमंडळी जें तोय असे । ते समुद्राचें सर्वही ॥ ५ ॥ जालिया येक ब्रह्मज्ञान । दुजें आणीक नसे ज्ञान । जें सर्व ज्ञानाचे सिरोभागरत्न । तें हें ब्रह्म जाण पां ॥ ६ ॥

यद्दृष्ट्वा नापरं दृश्यं यद्भूत्वा न पुनर्भवः ।
यज्ज्ञात्वा नापरं ज्ञेयं तद्ब्रह्मेत्यवधारयेत् ॥ ५५ ॥

हें चिदानंद ब्रह्म परिपूर्ण । लक्षिलें असतां ज्ञानद्रिष्टिकरून । मग उरे आणिक जाणने । तें हें ब्रह्म जाण पा ॥ ७ ॥ महावाक्य विचारें करुन । ब्रह्मि जालें असतां ऐक्यत्त्वपण । पुन्हा मागति आणिक होणें । नाहि देहधारित्त्वें ॥ ८ ॥ हें येक जाणलें आसतां । आणीक जाणने नुरे तत्त्वतां । जे सर्वाधिष्ठान सर्वसत्ता । तें हें ब्रह्म जाण पां ॥ ९ ॥ ऐसि ऐकोनि उदारवाणि । सिष्य विनवि करुणावचनिं । जें अज्ञापिलें असे स्वामिनिं । किं येक कळतां सर्व कळे ॥ १० ॥ तरि ज्ञानि

असतां गोदातिरिं । त्यातें काय वर्तलें कासिमाझारि । हें नकळे कि निजनिर्धारि । स्वामिराया दयाळा ॥ ११ ॥ अचार्य म्हणति रे लडिवाळा । हे नोव्हे ब्रह्मज्ञानाचि कळा । जो तपें करोनि असेल अगळा । त्यासि ह्या सिद्धि वोळगति ॥ १२ त्या सिद्धिहि असति येकदेसि । कासि चिंतोनिया मानसि । वर्तले सांगेल तये देसि । परि द्वारकेचे नकळे पै ॥ १३ ॥ जेव्हां द्वारकेचे करील ध्यान । तेव्हां तेथील सांगेल वर्तमान । असो ऐसे येकदेसीपण । तया तपोबळाचे ॥१४॥ तैसा नोव्हे ह्या आत्मज्ञानि । कारणरूप आत्मा आनुभवोनि । त्याचिच कार्यात व्यासि पाहोनि । आत्मस्थितिनें वर्ते पै ॥ १५ ॥ येविषइं येक इतिहास । तूतें सांगतों पा अतिसुरस । जो कार्यकारणत्त्वें दृष्टांतास । उपेगासि ये या काळि ॥ १६ ॥ कोण्ही येक सद्ब्राह्मणाचा पुत्र । कासींत पढोनिया दोन शास्त्र । गृहाप्रति येवोनि तो पवित्र । वंदिता जाला पितियातें ॥ १७ ॥ केलें होतें जे अध्ययन । तें तिर्थरूपासि केलें निवेदन । ते काळि तयाचा पिता वचन । बोलता जाला चमत्कारे ॥ १८ ॥ पुत्रा तुं ऐसें पढलासि कांहिं । जे येक कळतां कळे सर्वांहि । तो ह्मणे ऐसे पढलो नाहि । आणिक अध्यन राहिलेसे ॥ १९ ॥ मागति जावोनि कासिप्रति । संपादिलि चार शास्त्रें विस्पत्ति । ते निवेदावया जनकाप्रति । गृहालागि पातला ॥ २० ॥ तेणें चार शास्त्र अध्ययन । दाखविता पिता बोले वचन । और तैसे नोव्हे अध्ययन । जे येक कळतां सर्व कळे ॥ २१ ॥ आसो तो मागति जावोन । आला साहि शास्त्रे पढोन । परि तयायोगे पित्याचें मन । संतुष्ट नोव्हे सर्वथा ॥ २२ ॥ मग तो पुत्र बोले तये वेळा। ऐसि कोणति आहे हो ज्ञानकळा । येक कळतां सर्व दृश्यमेळा । समजोनि येइल निश्चइं ॥२३॥ मग पिता बोलता होय त्यातें । तुं जावोनिया कुल्लाळगृहाते । घटशरावादिक पदार्थाते । घेवोनि येइ सर्वश्रें ॥ २४ ॥ तेणें धन देवोनि कुल्लाळासि । सर्वस्वे आवाचि आणिला गृहासि । तो ठेवोनियां पित्यापासी । अग्रभागि स्थित जाला ॥ २५ ॥ मग पिता त्यातें बोले वचन । हे बहु प्रकारिचे पदार्थ जाण । याचि वेगळालि नामाभिधान । घटशरावादि करोनि ॥ २६ ॥ याचि नामरुपें असति अनेक । परि सार्वि मृत्तिका असे येक । सर्वांचे आदि अंतिं मध्यें निष्टंक । मृत्तिकाचि असे निश्चइं ॥ २७ ॥ तैसा आत्मा सच्चिदानंदघन । सर्व दृश्यमात्रि असे व्यापुन । कांहीं येक पदार्थ तयावीण । नसे आदि अंतिं मध्येहि ॥ २८ ॥ असो तया ब्रह्मनिष्ठ पितियानें । पुत्राते ब्रह्म-साक्षात्कार करून । पदार्थमात्रिं अद्वैतज्ञान । केलें अखंड अविनाशि ॥ २९ ॥ तैसे सिष्या येक ब्रह्म जाणतां । आणिक जाणने

नुरेचि तत्वतां । जैसे येक कनक अनुभवासि येतां । अळंकार आले सर्वहि ॥ ३० ॥ नामरूपमात्र घडे मोडे । परि ब्रह्म तैसेचि लोणकडे । आसो अणीक तुतें उघडें । सांगतो तें ऐक पा ॥ ३१ ॥

॥ तिर्यगूर्ध्वमधःपूर्णं सच्चिदानंदमद्वयं ।
अनंतं नित्यमेकं यत्तद्ब्रह्मेत्यव धारयेत् ॥ ५६ ॥

अडवि उभि वऱ्हि खालि । सच्चिदानंद वस्तु येकालि । अनंत अपारावारत्त्वें ठेलि । अद्वैत पुर्णपणत्त्वें ॥ ३२ ॥ जेथें नाहिं अनेकता । न संभवे अनित्यता । ऐसि जे येक वस्तु तत्त्वता । तें हें ब्रह्म जाण पा ॥ ३३ ॥

अतद्व्यावृत्तिरूपेण वेदांतैर्लक्ष्यतेऽव्ययं ।
अखंडानंदमेकं यत्तद्ब्रह्मेत्यवधारयेत् ॥ ५७ ॥

ते नोव्हे तें नोव्हे म्हणउन । उपनिषदें करिति दृश्यनिरसन । जाचा निरास नोव्हे जाण । त ब्रह्म ऐसें सुचविति ॥ ३४ ॥ ऐसें जे का वेदांत सुरस । तिहीं करुन येतसे लक्षार्थास । जें अद्वय अखंडानंद येकरस । तें हें ब्रह्म जाण पां ॥ ३५ ॥

अखंडानंदरूपस्य तस्यानंदलवाश्रिताः ।
ब्रह्माद्यास्तारतम्येन भवंत्यानंदिनोजनाः ॥ ५८ ॥

अखंडानंद ब्रह्मस्वरुपाचा । लेशमात्र अश्रयोनि साचा । ब्रह्मा आदिकरुन आनंदाचा । लवमात्र अनुभव घेती ॥ ३६ ॥ सर्वांहूनि देशाधिपतीसि अनंद । त्याजपेक्षां पृथ्वियपतीसि आनंद । तयापेक्षांहि असे अनंद । तया गंधर्वालागि पैं ॥ ३७ ॥ त्या गंधर्वांहूनि इंद्रासि । अनंद असे अतिशयेसि । तया इंद्राहुनिया ब्रम्हयासि । अनंद असे फारसा ॥ ३८ ॥ पिप्पिलिकाहूनि ब्रह्मयापर्यंत । ऐसे सर्वहि आसाते अनंदभरित । परि तया अखंडानंदाचा लव आश्रित । होय अनंद सर्वांचा ॥ ३९ ॥ तेहि आपुलाले मानें करुन । लवभरि अनंदी असति जाण । नित्य अखंडदंडायमान । नोव्हे अनंद सर्वांचा ॥ ४० ॥ तो जरि तं म्हणसिल कैसा । तरी तुज सांगतो गा पाडसा । जणें तुझे मानि सहसा । संशय न राहे अनुमात्र ॥ ४१ ॥ अगा विषयाकार वृत्ति उठे । तेव्हां दुःखाचे बैसति झपाटे । ते विषय प्राप्त जालिया उलटे । वृत्ति मागति अधिष्टानि ॥ ४२ ॥ येक लवमात्र वृत्ति स्थीर राहे । तंवरि अनंदसिंधुचा लेश लाहे । मागति विषय चिंतिता पाहे । दुःख जैसे तैसेंचि ॥ ४३ ॥ तूं ऐसा जरि काढिशि उल्लेख । किं विषय भोगितां विषयसुख । तेथें कैचें ब्रम्हानंदसुख ।

यावत् प्राणिमात्रातें ॥ ४४ ॥ तरि तूं ऐसें न म्हणे सर्वथा । विषयांत नसे सुख· वार्ता । ब्रम्हसुखाचि विषय भोगिता । निश्चयेंसि जाण तुं ॥ ४५ ॥ जैसें श्वान अस्तिप्रति घेउन । दाढेखालि चाविता जाण । ते शुष्क अस्थि हिरडीस लागुन । रक्त निघे तेथिचें ॥ ४६ ॥ तें स्वकीय रक्त प्राशन करुन । अस्तींतिल रक्त मानि श्वान । तैसें अज्ञानि पामरजन । सुख विषयाचेंचि मानिताति ॥ ४७ ॥ असो जें जें सुख कांहिं । तें ब्रम्हावाचोनि सर्वथा नाहि । ऐसें जाण पा निश्चइं । विचार युक्ति करोनि ॥ ४८ ॥

तदुक्तमखिलं वस्तु व्यवहारस्तदन्वितः
तस्मात्सर्वगतं ब्रह्म क्षीरे सर्पिरिवाखिले ॥ ॥५९ ॥

विषयांत आत्मा असे व्यापुन । तोचि प्रत्यगात्मरूपें वृत्तितें व्यापुन । आत्मसत्तेनें विषय करि ग्रहण । एवं आत्माचि संपुर्ण असे पै ॥ ४९ ॥ सर्व पदार्थमात्रिं ब्रह्म असे । म्हणोनि प्रियत्व सार्वि वसे । दुग्धामाजि घृत जैसे । मिष्टतेसि कारण ॥ ५० ॥ तस्मात् आत्म्यावाचोनि प्रियकरासि । दुसरें नाहिंच निश्चयेंसि । प्रियतेसि कारण सर्वत्रासि । आत्माचि येक जाण तुं ॥५१ ॥ आणिक हि येक आत्मलक्षण । ऐकोनि घेइ पां सुलक्षण । जेणें अतिशयें होय दृढीकरण । सुशिया आत्मानुभवाचें ॥ ५२ ॥

अनण्वस्थूलमह्रस्वमदीर्घमजमव्ययम् ।
अरूपगुणवर्णाख्यं तद्ब्रह्मेत्यवधारयेत् ॥ ६० ॥

ब्राह्मिं नसे स्थूळता आणि कृशता । नसे उच्चता आणि ऱ्हस्वता । नसे जन्ममरणाचि वार्ता । अज अव्यय असे जें ॥ ५३ ॥ गुणवर्ग अभिधानादि लक्षण । हे सर्वथा जेथें नसति जाण । ऐसि जे वस्तु शुद्ध चिद्घन । तेंचि हें ब्रह्म जाण पा ॥ ५४ ॥

यद्भासाद्भास्यतेऽर्कादि भास्यैर्यत्तु न भास्यते ।
येन सर्वमिदं भाति तद्ब्रह्मेत्यवधारयेत्॥ ६१ ॥

जाचा प्रकाश मात्रें करुन । सुर्यादिक होति प्रकाशमान । परि सूर्यादिक आत्मया लागुन । प्रकाशुं न सकति सर्वथा ॥ ५५ ॥ जेणें करोनि हें सर्व भासे । तें स्वतंत्र स्वप्रकाश असे । जयातें पर अपेक्षा नसे । तें हें ब्रह्म जाण पा ॥ ५६ ॥

स्वयमंतर्गतंव्याप्य भासयन्नखिलं जगत् ।
ब्रह्म प्रकाशते वन्हिः प्रतप्तायसपिंडवत् ॥ ६२ ॥

सर्वहि जगाचा अंतरगत । ब्रह्मचि स्वयें होवोनि व्याप्त । आणि ब्रह्मचि स्वयें प्रकासीत । आपुलिया प्रकाशें ॥ ५७ ॥ जैसा लोहोपिंडा माझारि अग्नि व्यापोनि सर्वांपरि । आणि अग्निच प्रकाशित करि। तया लोहोपिंडाते ॥५८॥ किं जैसा नट आणिता होय सोंग । तेव्हां तो नटचि हो सोंगाचें अंग । आणि नटचि दाखविता होय अव्यंग । सभेमाजि त्या सांगातें ॥ ५९ ॥ मग सिष्य म्हणे महाराजा । जगचि ब्रह्म कां न म्हणावें वोजा । जरि ब्रह्मावाचोनि पदार्थ दुजा । नसे या जगता माझारि ॥ ६० ॥ मग श्रीगुरु म्हणति ऐक वचन । सांगतों अन्वय व्यतिरेके करुन । जेणें कदापि नोव्हे जगद्भान । तुजलागि निश्चित ॥ ६१ ॥

जगद्विलक्षणं ब्रह्म ब्रह्मणोन्यन्नकिंचन ।
ब्रह्मान्यद्भाति चेन्मिथ्या यथामरुमरीचिका ॥ ६३ ॥

जगताहुनी ब्रह्म असे वेगळे । परि ब्रह्माहूनि जग नसे निराळे । ब्रह्मावीण भासति ते मृगजळे । मारवाड देसि जापरि ॥ ६२ ॥ सिष्या येथें बरवेपण । सूक्ष्म करोनिया मन । हें अन्वयव्यातिरेकाचें वचन । समजोनि घेइ चांगले ॥ ६३ ॥ आगा व्यतिरेक जालिया वाचुन । वास्तवीक नोव्हे आत्मज्ञान । अन्वयव्यतिरेक दोन्हिविण । जिवन्मुक्तिपण न संभवे ॥ ६४ ॥ शुद्ध-ब्रह्म दृश्यातीत नेणे । वेदांत ऐकोनि सर्व ब्रह्म ह्मणे । व्यर्थ जाणावें त्याचें जिणे । किं नेणोनि समजले ह्मणतसे ॥ ६५ ॥ तयाचा अन्वय ना व्यतिरेक । तो सर्वस्वे जाणावा बहिर्मुख । किं दृश्यातेचि आत्मा निःशेख । न समजोनि ह्मणतसे ॥ ६६ ॥ कोण्हि येक गुरुमुखे करुन । शुद्धात्मा व्यतिरेकें समजुन । साधोनि हाटयोग साधन । मस्तक भेदोनि जाति पै ॥ ६७ ॥ ते ब्रह्म लोकाप्रति जाति । तेथें चिरकालत्वें राहाति । जेव्हां विराट विलया पावे निश्चिति । तेव्हां ब्रह्मयासह मुक्ति त्यातें ॥ ६८ ॥ कारण किं दृशयतीत आत्मा कळला । परि दृश्याभास नाहिं निमाला । अद्वैत भाव नाहीं जाला । ह्मणोनि परंपरामुक्ति तया ॥ ६९ ॥ आतां जयाचा व्यतिरेक जाला । तेणें हाटयोग नाहिं संपादिला । आणि अन्वयहि नाहिं कळला । तो मागाति जन्मा येतसे ॥ ७० ॥ ये विषइं भगवान् सांगति गीतेत । योगभ्रष्ट ह्मणोनि त्या पुरुषाते । तो योगि अथवा श्रीमान् ग्रहाते । जन्माप्रति येतसे ॥७१॥ तेथें त्यातें पूर्व बुद्धिकरुन । अन्वयरूप आत्मा समजोन । मग अद्वैतबुद्धि

पुर्णपणें । सेवोनि मुक्त होतसे ॥ ७२ ॥ त्यातें जन्म ध्यावयाचें कारण । हेंहि तूंतें सांगतो जाण । ध्येय ध्याता ध्यान हे त्रिपुटि क्षीण । जाली नाहिं तयाचि ॥ ७३ ॥ आत्मयाचें करितो ध्यान । ध्याता मी असे तयाहूनि भिन्न । ऐसे करित असतां देहपतन । जाला तया पुरुषाचा ॥ ७४ ॥ बैसलि होति चिज्जडग्रंथि । तो लिंगदेह-भेदें सुटालि नव्हति । म्हणोनि तयालागि मागति । जन्मासि यणे पडे पै ॥ ७५ ॥ आसो जो अन्वय-व्यतिरेकेसि । समजता जाला आत्मयासि । तो तेव्हांचि मुक्त निश्चयेसि । जाला येथील येथाचि ॥ ७६ ॥ तोचि ज्ञानिया जगताहून । ब्रम्ह पाहातसे वेगळेपण । आणि जग ब्रह्माचा याचुन । न पाहोचो सर्वथा ॥ ७७॥ हा शद्बचक्रविभु अतिकठीण । परि अद्वैतवेत्ता करि हा भेदन । येर अनुमाने येथें गुंतुन । मरमरु जाति फिरफिरु ॥ ७८ ॥ जैसा डोळस जाय झाडि लंघुन । आणि अंध पडे तेथेंचि गुंतुन । परोक्ष अपरोक्ष ज्ञानिया लागुन । तैसे येथ होतसे ॥ ७९ ॥ असो हा कैसा असे प्रकार । तो तुज सांगतों सविस्तर । होवोनि येकाग्र-बुद्धि सादर । ऐकोनि घेइ सत्सिष्या ॥ ८० ॥ अगा हें नामरूपात्मक जग दिसतें । त्याहूनि वेगळेंचि ब्रह्म असे तें । तुजप्रति जें सांगितलें होतें । आकाशदृष्टांते करोनि ॥ ८१ ॥ ते या जगाहूनि असे कि नसे वेगळें । हे शोधोनि पाहे या इये वेळे । सांडोनिया चर्माचे डोळे । ज्ञान द्रिष्टि विलोकि ॥ ८२ ॥ आतां त्या सच्चिदानंद वस्तुविण । हे जग कांहींच नसे जाण । जैसा वोतप्रोत तंतु पटालागुन । तैसेंचि ब्रह्म या जगातें ॥ ८३ ॥ आतां नामरूपें जे दिसति कांहि । ते मिथ्याचि भासति वस्तुचे ठाइं । वेगळेपणें पाहातां नाहिं । ठाव तयातें दूसरा ॥ ८४ ॥ जैसें रविरस्मीच्यिये स्थानि । मिथ्याचि दिसु लागे पाणि । परि तें मृगजळ पाहातां शोधोनि । रश्मिच अवघ्या आसति ॥ ८५ ॥ तैसें नामरूपातें ठिकाण । नसे सच्चिदानंद वस्तुविण । जेथें भासतसे अज्ञानें करुन । तेथेंचि ज्ञाने लय पावे ॥ ८६ ॥ संमत स्वात्मानंदप्रकाश आर्या—दंतिनि दारुविकारे दारु तिरोभवतिसोपितत्रैव । जगति तथा परमात्मा परमात्मन्यपि जगत्तिरोधत्ते ॥१॥ काष्ठाचा कोरोनि हस्ति केला । मुले काष्ट नेणोनि गज मानिला । विचारे करोनि पाहाता काष्ठाला । गजहि तेथेंचि उपरमे ॥ ८७ ॥ तैसा अज्ञानियाते आत्मा संपूर्ण । दिसे जगद्रूपें करून । परि ज्ञानि तया जगतातें व्यापुन । आत्माचि पाहे सर्वहि ॥ ८८ ॥

दृश्यते श्रूयतेयद्यद् ब्रह्मणोन्यन्नकिंचन ।
तत्वज्ञानाच्चतद्ब्रह्म सच्चिदानंदमद्वयं ॥ ६४ ॥

ऐकणे पाहाणें जे जे कांहि । ते ते ब्रह्मावाचोनि सर्वथा नाहि । परि तत्वज्ञान जालिया पाहि । अद्वय ब्रम्ह सच्चिदानंद ॥ ८९ ॥ नाहि तरि अज्ञानिया नरासि । दृश्याचि दिसे सर्वहि देसि । जैसे धन अभाग्यियासि । दिसे विंचुसर्पत्वें ॥ ९० ॥ न होता सत्यत्वें रज्जुज्ञान । सर्पबाधा होतसे दारुन । तैसे सर्व ब्रह्मचि परि अज्ञाना लागुन । होत असे बाधक पै ॥ ९१ ॥ जैसि कोणिह येकाचि स्त्री प्रचंड । तीते दुसरा ह्मणु गेला रांड । ती म्हणे मी अपल्या नवऱ्याचि रांड । परि तुझा धगडाचि असे मेल्या ॥ ९२ ॥ तैसि माया मिथ्या खरि । परि इतें जो ब्रम्हरुपत्वें वरि । तयाचीच हे अर्धांग नोवरि । वर्ते अभेद-रुपत्वें ॥ ९३ ॥ नाहिं तरि अज्ञानिया नरा । करोनि देह-द्वयाचा पिंजरा । देतसे जन्ममरणाचा घेरा । लिलामात्रे अपुल्या ॥ ९४ ॥ तीते न वरितां ब्रम्हत्वें करुन । उगेचि जरि ह्मटले मिथ्या ह्मणुन । तरि कां चुकति जन्ममरण । तत्वज्ञाना-वाचोनि ॥ ९५ ॥ सर्व ब्रह्म दिसावया लागुन । येक तत्वज्ञानचि होय कारण । जैसें स्थळोस्थळिं दिसावया धन । अंजन पाहिजे नेत्रासि ॥ ९६ ॥

सर्वगं सच्चिदात्मानं ज्ञानचक्षुर्निरीक्षते ।
अज्ञानचक्षुर्नेक्षेत भास्वंतं भानुमंघवत् ॥ ६५ ॥

टी०:–भानु तरि प्रकाशमान विलसे । पीरे चक्षुहीनातें अंधःकार भासे । तैसा अज्ञान चक्षुने न दिसे । आत्मा सर्वत्र असताहि ॥ ९७ ॥ जयाचें सद्गुरुकृपे-करुन । जावोनि अज्ञान तिरोधान । उजळले असति ज्ञान नयन । त्यातेंचि दिसे सर्व आत्मा ॥ ९८ ॥ जैसा डोळसालागि भानु । दिसे सर्वत्र प्रकाशमानु तिळभरि तमाचा ठिकाणु । न पाहेचि कोठेहि ॥ ९९ ॥ तु ह्मणसि ज्ञानियाते । चर्म चक्षु नसतील निरुते । तरि ये विगहचा प्रकार तूते । सांगतो तो ऐक पा ॥ ८०० ॥ जैसा अज्ञानिया लागुन । अकार दिसे चर्म चक्षु करुन । तैसाचि ज्ञानियातेही जाण । अकार दिसे चर्मनेत्रें ॥ १ ॥ परि तया अज्ञान्यापेक्षया । विशेष ज्ञानद्रिष्टि असे ज्ञातया । तेणे करूनि अकाराचा ठाया । निराकार ब्रह्म पाहातसे ॥ २ ॥ जैसा मृग-जळाहूनि वेगळेपणे । रश्मि पाहिल्या असति जेणे । तो मृगजळातहि रस्मीच जाणे । कारणरूपें करोनिया ॥ ३ ॥ मृगजळ डोळियाते दिसे । उदका सारिखे स्पष्ट भासे । परि बुद्धिप्रति रस्मीच असे । प्रबुद्धाचा जापरि ॥ ४ ॥ तैसे दृश्याहूनि वेगळेपणे । ज्याते गुरुमुखे समजालि आत्मखुण । तोचि तया कारणरुपेंकरुन । जगत्कार्यहि पाहातसे ॥ ८०५ ॥ त्याचा चर्मचक्षुनें जग दिसे । परि शुद्ध बुद्धिते आत्माचि

असे । त्या सच्चिदानंद स्वरूपि गिवसे । दृश्यमात्र सर्वीहि ॥ ६ ॥ ऐसा जो आपणांते । स्मरला । तोचि प्राणि कृतार्थ जाला । जेणे अज्ञानबंध मुक्त केला । स्वस्वरुप-ज्ञानेसि ॥ ७ ॥

श्रवणादिभिरुद्दीप्तो ज्ञानाग्निपरितापितः ।
जीवः सर्वमलान्मुक्तः स्वर्णवद्द्योतते स्वयं ॥ ६६ ॥

अनादि संसार प्रवाहि पडिला । जीव देहासंगें देहत्व पावला । कामक्रोधादि मळे व्यापिला । होता जो का बहुकाळवन्हि ॥ ८ ॥ पडोनिया आपुला विसर । जीव मळीण जाला होता फार । तंव स्मरणें करुन ज्ञानाग्नि परिकर । प्रदिप्त केला सुविचारें ॥ ९ ॥ तयामाजि जीवाचे शोधन । केलें असतां निजध्यासे करुन । काम-क्रोधादि मळ संपूर्ण । दग्ध होति क्षणमात्रें ॥ १० ॥ मग शुद्ध स्वप्रकाशमान । जीव होतसे सच्चिदानंदघन । जैसे तावेनि काढिता सुवर्ण । हीनत्व सांडोनि उजळे होय ॥ ११ ॥

हृदाकाशोदितोह्यात्मा बोधभानुस्तमोपहृत् ।
सर्वव्यापी सर्वधारी भाति भासयतेऽखिलम् ॥ ६७ ॥

टी०—हृदय आकाशाचिये ठाइ । अज्ञान तम दाटले होते पाहि । ते बोध भानु प्रगटोनि लवलाहि । हारण केलें सर्वस्वें ॥ १२ ॥ जो गुरुकृपे हृदइं प्रगटला । तोचि आत्मा सर्वि व्यापला । सर्वाधार होवोनि ठेला । सर्व प्रकाश-रूपत्वें ॥ १३ ॥ जैसे माध्यान्हि सुर्यप्रकाशि । मृगजळें लागति वाहावयासि । आणि सुर्याचे तयांत प्रकाशि । अपुलीया प्रकाशें ॥ १४॥ तेसे आत्म शक्तिचे ठाइं । हें सर्व जग भासले पाहि । आणि आत्मप्रकाशें प्रकाशितही । होत असे दृश्यजात ॥ ८१५ ॥ एवं जगाचे आदिमध्यावसानि । आत्माचि असे येकले पणि । ऐसि जयाचि अनुभव खाणि । घडली तो धन्य पै ॥ १६ ॥

दिग्देशकालाद्यनपेक्ष्यसर्वगं शीतादिहृन्नित्यसुखं निरंजनं ।
यः स्वात्मतीर्थं भजते विनिष्क्रियः स सर्ववित् सर्वगतोमृतोभवेत् ॥६८॥

टीपः—दिग्देश कालादि अपेक्षा रहित । पातकादि-द्वंद्वहारक सुख भरित । ऐसा आत्मा नित्य निरंजन सर्वगत । हेचि तिर्थ सेविले जेणें ॥ १७ ॥ तो सर्व-वेत्ता आणि सर्वगत । तो अमर जन्म मरणा रहित । तू ऐसे जाण पा निश्चित । विनि-ष्क्रिय पुरुष तो ॥१८॥ जाते काहीयेक कर्तृत्व नसे । त्याते म्हणावे विनिष्क्रिय ऐसें ।

तो ब्रह्मवेत्ता ब्रह्मि बसे । ब्रह्मरूपाचि होउनि ॥ १९ ॥ संमत श्लो० — स्नातं तेन समस्त तीर्थ-सलिले दत्तापि सर्वावनिः । सर्वास्तेन कृता मखाश्च निखिला देवाश्च संपूजिताः । संसाराच्च समुद्धृताश्च पितरस्त्रैलोक्य-पूज्योप्यसौ । यस्य ब्रह्म-विचारणे क्षणमपि स्थैर्यं मनः प्राप्नुयात् ॥ १ ॥ तेणे सर्व तीर्थि स्नान केले । सर्व पृथ्विचे दान दिधले । समस्त यज्ञ यागाप्रति केले । देव पूजिले सर्वहि ॥८२०॥ संसार-दुःखा पासोनि पितर । उद्धरिले समस्त सपरिवार । तो पुज्य जाला त्रैलोक्यभर । जाचे मन क्षणभर स्थिर विचारि ॥ २१ ॥ येक क्षण विचाराचा यव्हडा महिमा । मग ब्रह्मचि जाला त्याचि कोण करि सिमा । तया योगींद्रवर्याचि प्रतिमा । नसेचि कोणिह त्रैलोकि ॥ २२ ॥ ऐसे ऐकोनि अचार्य वचन । सत्सिष्य करि शतावधि नमन । म्हणे स्वामि मी जालो धन्य धन्य । तूमचा चरण प्रसादे ॥२३॥ आता गुरु-दक्षणा द्यावयासि । काहीच नसे मजविण मजपासि । म्या जरि द्यावे आपणासि। तरि स्वामिसी मजसि भेद नसे ॥ यास्तव उगेचि राहाता भले।म्हणोनि धरिले दृढ पाउले। चिरकाळवन्हि मस्तक ठेविले । चरणकमाळि गुरुचा ॥ २५ ॥ मी कृतार्थ कृतार्थ ऐसे वदुन । वारुंवार करि साष्टांग नमन । तैसाचि श्रीगुरुचरणिं निरंजन । वंदन करि सद्भावें ॥ २६ ॥ जि जि सद्गुरुस्वामि रघुराया । गोदातीर-जनस्थान-विला-सिया । साष्टांग प्रणाम तुमचा पाया । असोत माझे बहुकाळवन्हि ॥ २७ ॥ स्वामिनि अज्ञा केलि होति । जे आत्मबोधावरि टीका करि निगुति । तें म्या तुमचे चरण–प्रसादे यथामति । वर्णन केलि श्रीगुरु ॥ २८ ॥ या ग्रंथावरि टीका करावयासि । काहीच शक्ति नव्हति मजसि । परि श्रीगुरुच वसोनि जिव्हाग्रासि । वर्णविलि ही टीका ॥ २९ ॥ आतां वंदु श्री शंकराचार्य । जे समस्त विश्वजनाचे आचार्य । जे ब्रह्मविद्या प्रकाशक सुर्य । कलयुगामाजि प्रगटले ॥ ३० ॥ जे प्रत्यक्ष ईश्वरि अवतार । अनेक मताचा करोनि परिहार । जांणिं केला आत्मनिर्धार । इये ग्रंथि ॥ ३१ ॥ ऐसिया सुरस ग्रंथावरुति । टीका केलि म्या पामरजाति । जैसें चिंधुकात रत्नाप्रति । ग्रंथन केलें मूर्खत्वें ॥३२॥ काहि न कळतां ग्रंथाचा अर्थ । उगीच वाचाळता केलि व्यर्थ । परि तुम्हि दयालु परम समर्थ । क्षमा कराल मजवन्हि ॥ ३३ ॥ वडुथ ग्रामि कृष्णा तिरि । शके सत्रासे अडतीस धात्र संवत्सरि । श्रावण वद्य येकादसि इंदुवारि । टीका सिद्धिसि नेलि पै ॥ ३४ ॥ इति श्री आत्मबोध-प्रकाशनि । निरंजनाची साबडि वाणि । श्रीशंकराचार्य रघुविरगुरुचरणि । आर्पण असो सद्भावें ॥ ३५ ॥ इतिश्रीपरमहंस

परिव्राजकाचार्य गोविंदभगवत्पूज्यपादशिष्य श्रीमच्छंकराचार्य-विरचितात्मबोध प्रकरणं सटीकं संपूर्णमस्तु ॥ दत्त ॥ श्रीगुरु दत्तात्रयार्पणमस्तु ॥ रघुनाथगुरवे नमः ॥

॥ श्रीदिगंबरार्पणमस्तु ॥

॥ श्री ॥

## श्रीनिरंजन रघुनाथ स्वामीकृत

# केनोपनिषत्-टीका.

श्रीगुरुदत्त ॥ श्रीशिवौ ॥ नमःश्रीरघुनाथात्मगुरुपद्मनखकान्तये ॥ मोहध्वान्तपुनर्भानहीनानुष्ठितशान्तये ॥ १ ॥ संपूर्ण वेदांत, उपनिषद्भाग त्यांतील कांहि कांहि अंश घेउन सांख्यकाणादादि शास्त्रमत्ताभिमानि जे याणि श्रुत्यर्थ अन्यथा अन्यथा वर्णिजेले. त्यायोगे संपूर्ण श्रुतिचे तात्पर्य कोठे आहे, हें ब्रह्मजिज्ञासु जे त्यांस न कळून व्यामोह होउ लागला. याजकरितां भगवान् श्रीमच्छंकराचार्य जे याणि संपूर्ण श्रुति ज्या त्या षड्लिंगेकरून अद्वितीय ब्रह्मि तात्पर्यत्वे वर्णुन प्रस्थानत्रयाचे भाष्य करिजेले. त्यायोगे सुरेश्वराचार्यादि चवघे शिष्य आणि त्यांचे परंपरेकरून विद्यारण्यमधुसूदनसरस्वतिपर्यंत आपण कृतार्थ होउन अद्वितीयब्रह्मि तात्पर्य ठेउन जगदुद्धारासाठी श्रीशंकराचार्यभाष्यास अनुसरून ग्रंथ करून ठेविले. परंतु अलिकडेस बुद्धिमांद्यास्तव कोण्हिएक जे ते नेत्राने तेज दिसते त्यासचि ब्रह्म ऐसे मानिते जाहाले आणि शिष्यपरंपराही तैसिच चालविली. अस्तु; नेत्रेकरून जे तेज पाहातात आणि त्याजलाच ब्रह्म ऐसे मानितात त्याचे खंडण श्रीमच्छंकराचार्य जे ते करितात:—भगवद्गीतेतील अठरावा अध्याय—त्याचा पन्नासावा श्लोक '**सिद्धिं प्राप्तो यथा ब्रह्म ...**' त्याजवरील भाष्य:—**ननु 'आदित्यवर्णं भारूपः स्वयंज्योतिः' इत्याकारवत्त्वमात्मनः श्रूयते, न तमोरूपत्वप्रतिषेधार्थत्वात्तेषां वाक्यानाम्। द्रव्यगुणाद्याकारप्रतिषेध आत्मनस्तमोरूपत्वे प्राप्ते तत्प्रतिषेधार्थान्यादित्यवर्णमित्यादिवाक्यानि, अरूपमिति च विशेषतो रूपप्रतिषेधात्। अविषयत्वाच्च 'न संदृशे तिष्ठति रूपमस्य न चक्षुषा पश्यति कश्चनैनम्' इति श्रुतेः।** टीका—आहो 'आदित्यवर्णं' आणि 'भारूपमात्र' ह्मणजे प्रकाशरूप मात्र आणि जोतीरूप ऐसि आत्म्याचि विशेषणे श्रुतिस्मृतिचे ठाई श्रवण करिजेलि जातात. यासि उत्तर:—या वाक्यास तमोरूपनिषेधार्थत्व आहे; या हेतूस्तव आत्मा जो तो आदित्यवर्ण, स्वयंजोति आणि प्रकाशरूप नव्हे. अन्यमत्ताभिमाने जे याणि द्रव्यगुणादि आकारनिषेधपरही वाक्ये योजिली. तेव्हा आत्मा जो त्यास

तमोरूपत्व प्राप्त जाले असता त्याचे प्रतिषेधार्थ '**आदित्यवर्णं तमसः परस्ता-दित्यादि**' हे वाक्ये जाणावी. आहो, आत्म्यास काहीतरी रूप असेल कि? यासि उत्तरः—आत्मा अरूप ह्मणून विशेषेकरून श्रुतीने निषेध केला आहे. यास्तव, आत्म्यास रूप नाहीं. आहो, आत्मा रूपवान् असून विषयासारिखा नेत्रेंद्रियास दिसत असेल कीं? यासि उत्तरः—'**अविषयत्वात्**'—आत्मा विषय नव्हे. यास्तव नेत्रेंद्रियास विषय होउन दिसत नाहीं; आणि केवल ब्रह्मस्वरूप आत्मा जो तो कोण्हाचा प्रतिद्वंद्वि नव्हे ह्मणून कोण्हाचे निवारन करीत नाही. प्रकाश जो तो तमाचा प्रतिद्वंद्वि होउन तमनिवृत्ति करीतो ह्मणून सर्वात्मा नव्हे. अस्तु; आदित्यवर्ण, प्रकाशज्योतिस आत्मा ह्मणतात्, ते मूढबुद्धि होत. ह्मणून नेत्रेंद्रियानें पूर्णतमस्वरूप दिसते ह्मणतात. '**न चक्षुषा पश्यति कश्चिदेनं**' इति श्रुतेः । चक्षूने कोण्हीही ब्रह्म पाहु सकत नाहींत; कारण कीं, चक्षूला रुपावाचुन दिसावयाची योग्यता नाहीं आणि ब्रह्मास तरि रूप नाही, ऐसे परस्परे विरुद्ध स्वभावत्व आहे. याजकरिता या केनोपनिषदि प्रथम खंडाचे ठाइं निषेधवाक्ये बोलिजेतात्. '**न तत्र चक्षुर्गच्छति न वाग्गच्छति नो मनः**', '**यच्चक्षुषा न पश्यति येन चक्षूंषि पश्यति**'. अणखिही अन्य उपनिषदींचि श्रुति आहेः—'**अशब्दमस्पर्शमरूपमव्ययम्**'. अस्तु, तेजालाच ब्रह्म मानून नेत्रेंद्रियाने जे पाहातात त्याचे आज्ञाननिवृत्ति होत नाहि आणि जन्ममरणेही चुकत नाहीत. येविषई या केनोपनिषदाचे द्वितीय खंडाचे अंति श्रुति आहेः– '**इह चेदवेदीदथ सत्यमस्ति न चेदिहावेदीन्महती विनष्टिः**'. आता, त्वंपदार्थज्ञानि जे ते तत्पदार्थाचा शोध पुरतेपणे न करिता तत्पदलक्ष्य शुद्धभूमास्वरूप ब्रह्म जे त्याते चर्मवृत्तिने न अनुभउन आपले ठाई कृतार्थता मानितात् आणि शिष्यपरंपराही तैसीच चाल-वितात. परंतु त्यांची जन्ममरणनिवृत्ति होत नाही. कारण की, जा ब्रह्माविषईक मूल अज्ञानास्तव संसृतिबंध प्राप्त जाला, त्याची निवृत्ति जालि नाहि म्हणून. अस्तु; त्याजला मोक्षपरिअवसाई विचार कर्तव्य आहे, ऐसे जाणावे. आता, कोण्हिएक वेदांतशास्त्राभिमानि जो तो बोलतो, "अम्हि न्याय, व्याकरण, पूर्वोत्तरमीमांसा आणि उभय सांख्य ऐसि शास्त्रे म्हणून हाचि निर्धार केला जे, आत्मा जो तो नित्य आहे, त्याजला जन्ममरणादिक नाहीत, आणि नामरूपात्मक सर्वही आनात्मवर्ग मिथ्या आनित्य होय, ऐसे जे समजणे, हेचि आमचे तत्वज्ञान होय." यासि उत्तर–**परोक्षं शास्त्रजं ज्ञानं विज्ञानं चात्मदर्शनम् । आत्मनो ब्रह्मणः सम्यगुपाधि-**

द्वयवर्जितम् ॥ १ ॥ शास्त्राध्ययनेकरून जे ज्ञान होते, ते परोक्ष ज्ञान होय; आणि अपरोक्ष ज्ञान कोणते म्हणाल — तरि जीवात्मा आणि शबल ब्रह्म परमात्मा यांचे उपाधिद्वय म्हणजे बुद्धि आणि मूळ माया जा त्या वर्जन करून राहील जे शुद्धात्म-स्वरूप त्याचे दर्शन होणे जे ते विज्ञान होय. ते जाल्यावाचून संसारबंध निवृत्ति होत नाहीं, हा भाव. आतां, कोण्हियेक वेदांति बोलतो–" देहरूप क्षेत्राते जाणतो जो तो क्षेत्रज्ञ आमचे स्वरूप होय." यासि उत्तर—क्षेत्रक्षेत्रज्ञयोर्ज्ञानं तज्ज्ञानं ज्ञानमुच्यते ॥ विज्ञानं चोभयोरैक्यं क्षेत्रज्ञपरमात्मनोः ॥ १ ॥ संघात आत्मा क्षेत्रज्ञ जो तो मी होय, ऐसे समजणे ते ज्ञान होय; परंतु हे तत्वज्ञान नव्हे. क्षेत्रज्ञाचे आणि परमात्मियाचे बाधा-सामानाधिकरण्येकरून ऐक्य समजणे जे ते विज्ञान म्ह० ब्रह्मानुभवपुरःसर अबाधित तत्वज्ञान होय. आता, कोण्हियेक वेदांति जो तो बोलतो–' अवस्थात्रय आणि देहत्रय याचे साक्षि आह्मि आहोत; संपूर्ण साक्ष्य पदार्थ जे ते मिथ्या होत.' यासि उत्तर—साक्षितत्वापरिज्ञानात्त-द्विरुद्धार्थकल्पनम् ॥ साक्षिसाक्ष्यादिमिथ्याधीस्तत्वज्ञानाभिवर्तते ॥ १ ॥ साक्षिचे तत्व म्ह. केवल ब्रह्मस्वरूप जे ते तुह्मास अवगत नाहीं ह्मणून साक्षिलाच तुह्मि ब्रह्म ऐसे मानितात्; परंतु तत्पदलक्ष्य शुद्धब्रह्म जे तद्विरुद्धार्थ ही कल्पना होय. ती साक्षिसाक्ष्यादि मिथ्याधी म्ह. बुद्धि जे ते कशाने निवृत्त होति ह्मणाल–तरि साक्षीचे तत्व म्ह. केवल ब्रह्मस्वरूप जे त्याचा ज्ञानेकरून निवृत्त होति. हा साक्षी-लक्षण-बोध जो यासि ग्रंथकार काय ह्मणतात, ते श्रवण करावे. वाक्यवृत्तिचे ठाई 'यः साक्षिलक्षणो बोधस्त्वंपदार्थः स उच्यते.' भाष्यकार जे ते या साक्षि-लक्षण बोधाते त्वंपदार्थबोध ऐसे ह्मणतात. हा तत्पदार्थबोध नव्हे. मग तत्पदलक्ष्य ब्रह्मावबोध तरि कोठून असणार? आता, कोण्हियेक वेदांति बोलतो, "आत्मा जो तो सच्चिदानंदलक्षण बोलिजेला, तेचि लक्षण अस्तिभातिप्रियत्वेकरून, आमचे ठाई वर्तते. तेव्हा आत्मस्वरूप आह्मीच आहोत. द्रष्टा, साक्षि कूटस्थब्रह्म हे आमचिच नामे आहेत, ऐसा आमचा निर्धार." यासि उत्तर—तुम्ही पुरता विचार करीत नाहींत ह्मणून ऐसे ह्मणता; परंतु प्राचीन ग्रंथकार ऐसे ह्मणत नाहींत. द्रष्टृत्व आणि साक्षित्व याचा निषेध करितात्. श्लोक—द्रष्टा नाहं दृश्यमिथ्या-त्वहेतोर्नाहं साक्षी साक्ष्यमिथ्यात्वहेतोः। प्रत्यक्सिध्द्यै दृश्यतोन्यत्वसिद्ध्यै द्रष्टा साक्षी चेति बोधो गुरुभ्यः ॥ १ ॥ मी द्रष्टा नव्हे; कारण की, दृश्य मिथ्या आहे ह्मणून. आणि मी साक्षिही नव्हे; कारण की, साक्ष्य पदार्थ स्वप्नतुल्य मिथ्या आहेत म्हणून. आस्तु; गुरु म्ह. श्रेष्ठ पूर्वाचार्य जे यांहि द्रष्टा, साक्षी

हे विशेषणे कशासाठि बोलिजेलि म्हणाल—तरि देहेंद्रियाचे ठायीं आमत्व मानणारे आणि ब्रह्मजिज्ञासु जे त्यास ब्रह्मैक्य पावण्यास योग्यता कळवावयास, नामरूपदृश्याहुन आपण अन्य आणि देहेंद्रियाहून प्रत्यक् आहां, ऐसे सिद्ध व्हावयाकारणें द्रष्टा, साक्षी, ऐसा बोध जो तो योजिजेला. आस्तु; आणाखि तुह्मास विचार कर्तव्य आहे, ऐसे जाणावे. आता, कोण्हिएक शाक्त आसून वेदांति जो तो बोलतो, 'शक्ति शक्तिमतोरभेद: ' ऐसे वचन आहे. तेव्हा सकळशक्तिमान् परमात्मा सर्वांतरयामि जो तो कूटस्थ रूपेकरून आमचे हृदयाचे ठाई आहे, त्याते आह्मि स्पष्टत्वे जाणतो. यासि उत्तर—कूटस्थ जो तो किंस्वरूप आहे, हे तुह्मास कळण्यास शक्य नाहीं. श्लोक—" आत्मच्छायं पयोऽशेषं यथा मरकतो मणि: ॥ परीक्षणाय प्राक्षिप्त: कुर्यादात्मा तथैव हि ॥ १ ॥ ज्योतिरात्मा चितिच्छायं प्रथमं कुरुते तम: । तमोयोगेन धीस्तद्बद्धीयोगांदिंद्रियं तथा ॥ २ ॥ अक्षयोगात्तथा देहमेवमेते चिदात्मवत् । भासन्ते तेष्वत: पुंसां प्रत्यगात्मत्वविभ्रम: ॥ ३ ॥ " (विद्यारण्यकृत अनुभूतिप्रकाश) जैसा मरकतमणि ह्म. उंचा हिरवा पाच जो तो परिक्षेसाठीं शुभ्र चांदीचे प्याल्यात गोदुग्ध घालून त्यात ठेविला असता तो मणि सर्वाचे शुभ्रत्व नाहीसे करून आत्मच्छाय ह्मणजे आपल्यासारिखे हरितवर्ण करितो, तैसा ज्ञानस्वरुप आत्मा जो तो देहेंद्रियअंत:करणादिकाचे जडत्व नाहीसे करून चेतनत्वे आणि ज्ञानरुपत्वे भासवितो. आस्तु; आत्म्याचे स्वरुप हे ऐसे होय; हे कोण्हासाचि निवडिता येत नाहि. आता, कोण्हियेक वेदांति बोलतो, 'अंत:कर्णवृत्तिस प्रकाशीत करून संपूर्ण वृत्तिच्या भावअभावाते जाणतो जो आत्मा ते आमचे साक्षीस्वरूप होय.' यासि उत्तर, नैष्कर्म्यसिद्धींतील श्लोक—न प्रकाशक्रिया काचिदस्य स्वात्मनि विद्यते । उपचारात्क्रिया सास्य य: प्रकाश्यस्य संनिधि: ॥ १ ॥ या स्वात्मस्वरुपाचे ठाई अंत:कर्णवृत्तिची प्रकाशानाक्रिया जे ति काहींयेक नाही. तरि जड अंत:करण जे ते कशाने प्रकाशित होते ह्मणाल—तरि आत्मप्रकाश ह्म. ज्ञानमात्र आत्मा जो त्याचे संनिधीमात्रे करून प्रकाशित होते. ऐसे आसता तुह्मासारिखे अतत्ववित् जे त्याही उपचार करिजेला जातो जे, आत्माच अंत:करणवृत्तिचा प्रकाशक होय ह्मणून. आता, कोण्हियेक वेदांति जो तो बोलतो, श्रीशंकराचार्य जे ते सदाचारप्रकरणि म्हणतात्—श्लोक—ज्ञानमेकं सदा भाति सर्वावस्थासु निर्मलम् ॥ सर्व अवस्थेचे ठाई एक ज्ञान जे आहे ते आमचे स्वरूप होय. यासि उत्तर—सदाचारप्रकरणी याचि श्लोकाचा उत्तरार्ध मंदभाग्या

न जानन्ति स्वरूपं केवलं बृहत् ॥ १ ॥ सतवीतिस्थ काय जो तदंतरगतिं अवस्था ज्या त्यातील सोपाधिक ज्ञान जे त्यातेच जाणतात्, ते मंदभाग्य होत. कारण कीं, त्या ज्ञानाचे स्वरूप केवल बृहतब्रह्मी, भूमा अनंत आहे, हे जाणत नाहींत ह्मणून. आता कोण्हिएक वेदांति बोलतो. श्लोकः—अहमास्मि सदा भामि कदाचिन्नाहमप्रियः॥ सर्वकाल आह्मी आहो; आह्मि आह्माते भासमान आहो; आणि आह्मि आह्मांते प्रीय आहो; कधीहि अप्रीय नाहीत, ऐसा आमचा दृढ निश्चय अहे. आतां आह्मास काहि कर्तव्य नाहीं. यासि उत्तर—ऐशा विचाराने आसत्वापादक आवरणाचि निवृत्ति जाहालि; परंतु आभानापादक आवरणाची निवृत्ति होत नाहीं. जा आज्ञानास्तव वारंवार जन्मास येणं पडले, ते ब्रह्मविषइक मूळ आज्ञान तैसेच राहिले ह्मणून. आस्तु; या केनोपनिषत् - द्वितीयखंडाचे ठाईं श्रीमच्छंकराचार्य भाष्यकार जे ते, तुह्मासारिखे अमंम्यक्दर्शी जे त्याजला गुरुशिष्यसंवादमिषेकरून, श्रुति बोलिलि ते सांगतात. 'दभ्रमेवापि नूनं त्वं वेत्थ ब्रह्मणो रूपम्' या श्रुतिवरील भाष्याचे ठाई आल्प चैतन्याचा अनुभव घेणें निषेधिला आहे. तो विस्तारपूर्वक तेथे पहावा. आता, कोण्हिएक वेदांति बोलतो-" आह्मि स्वदेहव्यष्टितीलच चैतन्य जाणतो ऐसे नाहीं; समष्टीगत चैतन्यही जाणतो. जैसा हांडाभर भातातील एक सिजले ऐसे समजले असता, हांडाभर भात सिजला ऐसे कळते, तैसे स्वदेहातील अस्तिभातिप्रियत्वे करून चैतन्य समजले असता, संपूर्ण देवाचे ठाईचे सच्चिदानंदलक्षण ब्रह्म कळले, ऐसा आमचा निर्धार." यासि उत्तर-'यदस्य देवेष्वथ नु मीमांस्यमेव ते मन्ये विदितम्' या श्रुतीचे ठाई अध्यात्मोपाधि आणि आधिदैवतोपाधि ह्म० व्यष्टिसमष्टिउपाधीगत चैतन्य जाणिले, तरि ब्रम्हाचे रूप अल्प जाणिले; ते चैतन्य परिच्छिन्नत्वापासून आणि आल्पत्वापासून निवृत्त होत नाहीं म्हणून. श्रीगुरु ह्मणतात, रे शिष्या! तुजला आद्यापि ब्रह्म 'मीमांस्यमेव' ह्म० विचारणीयच आहे, ऐसे मजला वाटते. आता, कोण्हिएक वेदांति बोलतो—स्वानुभव व्हावयावीषई गुरु कशास पाहिजे? आह्मी प्रत्यगात्मरूपेकरून नित्य अपरोक्षचि आहोत; कधीही परोक्ष नाहींत. हा स्वानुभव जो तो दुसऱ्यास सांगता येत नाहीं. यासि उत्तरः—— शिष्य जो तो, श्रीगुरुने बोलिजेला आगमसंप्रदाय त्या बळेकरून आणि अनुभवानुमानाभ्यां संयोज्य निश्चितं उपपत्ति म्ह. युक्तीकरून आणि अनुभवबल जे तेणेकरून ब्रह्मविद्याविषई आपलि दृढनिश्चयता जे ते 'यो नस्तद्वेद तद्वेद' या वाक्येकरून स्वकीय ब्रह्मचार्यामध्ये जाउन गर्जना केलि आहे, ते वर्णन पुढे येईल. आता, कोण्हिएक वेदांति बोलतोः—

" देहेंद्रिय, मन, बुद्धि हा संपूर्ण अनात्मवर्ग आणि यांचे ठाई चैतन्य जे तो आत्मा ऐसा विचार करणे हेचि आत्मदर्शन." यासि उत्तरः— 'यस्यामतं तस्य मतं' या श्रुतीवरिल भाष्य विस्तारपूर्वक आहे ते साद्यंत पाहावें. इंद्रिय, मन, बुद्धीचे ठाई चैतन्य जे तेच आत्मदर्शन मानणारे जे त्याजला वाटते आम्हास ब्रह्म कळले; परंतु त्याजला श्रुति म्हणति, 'न वेद सः' तो ब्रह्माते जाणत नाही. येथे भाष्यकार म्हणतात, ऐसि जासि मति उत्पन्न होति, ते भ्रांति होय. आता, कोण्हीएक वेदांति बोलतोः— 'त्वंपदार्थ प्रत्यगात्मा जो तो आम्हास नित्य अपरोक्ष आहे, त्या प्रकारे तत्पदार्थही अपरोक्ष आहे. तो कैसा म्हणाल, तरि जैसा सुवर्ण मेरु जो तो आम्हास आज्ञातत्वेकरून ज्ञात आहे, तैसा तत्पदार्थ जो तो अपरोक्ष असता, आम्हास आज्ञातत्वे म्ह. न जाणणेपणेकरूनच ज्ञात आहे, हा आमचा बोध." यासि उत्तरः— 'प्रतिबोधविदितं मतं' या श्रुतिवरील भाष्य :—

प्रत्यगात्मया विदितं ब्रह्म तदा तन्मतं तदा तत्सम्यग्दर्शनम् ॥

अखंडैकरस ब्रह्म जे ते प्रत्यगात्मरूपत्वेकरून जेव्हा विदित होते, तेव्हा तो बोध श्रुतीसामान्य होय. आता, कोण्हीयेक वेदांति बोलतो, 'अवस्थात्रयाचे ठाई एकसंवित जे तेचि ज्ञान; तोचि आत्मा होय; आणि अमृतत्वही होय'. यासि उत्तर- 'आत्मना विन्दते वीर्यं विद्यया विन्दतेमृतम्' या श्रुतीवरील भाष्यः आत्मना स्वेन स्वरूपेण विंदते लभते वीर्यम्। आत्म्याचे सन्मात्र स्वकीय ब्रह्मस्वरूप जे तेणेंकरून आत्मविद्येला सामर्थ्य येते. मग चरमावृत्तिरूप विद्येच्या योगेकरून जिज्ञासूते अमृतत्व म्ह. ब्रह्मरूपत्व प्राप्त होते. अन्यथा प्राप्त होत नाहीं. आहो ! जैसा दशम आपण आपणाते नित्य प्राप्त आहे, तैसा आहंप्रत्ययालंबन प्रत्यगात्मा जो तो नित्य प्राप्तची आहे; कधीही अप्राप्त नाही. यासि उत्तरः-मुंडकोपनिषदींच श्रुति प्रमाणास भाष्यकार लिहितात, 'नायमात्मा बलहीनेन लभ्यः' प्रत्यगात्मा सर्वांस नित्य-प्राप्त आहेच; परंतु अनादि अविद्येस्तव अप्राप्ताचेपरी जाहाला आहे. तो बलहीन म्ह. आत्मविद्याकृतसामर्थ्यहीन पुरुष जे त्यास प्राप्त होत नाहीं; आता, कोण्ही तेजाते ब्रह्म मानणारे आणि कोण्ही स्वदेहातील अल्प चैतन्य जाणणारे आणि उपासक आणि कर्मी या संपूर्णांते श्रुति सांगति- 'इह चेदवेदीदथ सत्यमस्ति न चेदिहावेदीन्महती विनष्टिः।' या मनुष्यदेहाचे ठाई वेदाधिकारि असून, श्रुतीनें सांगितलि ब्रह्मवस्तु ऐसी ते जाणेल तरि सत्य म्ह. बरे आहे; नाहीतरि जीचा अंत नाहीं ऐसी जन्ममरणसंसृति चुकणार नाहीं. ऐसे विस्तारपूर्वक भाष्य आहे ते पाहावे. आता, संपूर्ण वेदांति मिळून

प्रश्न करितात जे, ' आमचे सिद्धांतास तुम्हि प्रमाणसिद्ध शब्द ठेविले, ते युक्त आहे; परंतु तुमचा सिद्धांत तो कोणता हे आम्हास कळले पाहिजे. ' यासि उत्तर—भूतेषु भूतेषु विचित्य धीराः प्रेत्यास्माल्लोकादमृता भवन्ति । ' धीमान् जे ते स्थावरजंगमाचे ठाई एक आत्मतत्व ब्रह्म जे ते साक्षात्करून, देहबुद्धीते टाकून अमृत म्ह. ब्रह्मरूप होतात, तैसा श्रीदत्तात्रेयलब्धप्रसाद मी निरंजन जो तो जनस्थाननिवासि अखिल ब्रह्मविद्मंडलचक्रवर्ती संम्राट् श्रीरघुनाथसद्गुरुप्रसादवाक्यबोधनेकरून, जीवेश्वराचे ऐक्यस्थान आणि विदिता· विदिताहून अन्य आणि संपूर्ण महावाक्याचा अर्थ केवल भूमास्वरूप ब्रह्म जे तदाकर वृत्तीते पाउन, ममाहंभावनिवृत्तिपुरःसर अमृतत्वाते पावलो. म्हणून या केनोपनिषद्–भाष्याचा अर्थ सांगावयास पात्र जालो. आता, कोण्हीयेक श्रेष्ठ ब्रह्मनिष्ठ म्हणतात, ' जे तुम्हास इतका अटहास्य करण्याचे कारण काय ? ' त्यासि प्रार्थना जे ' यो नस्तद्वेदतद्वेद ' या प्रकारे द्वितीयखंडि शिष्य जो तो गर्जना करिता जाला, तैसा मी आपले ब्रह्मविद्येची दृढनिश्चयता करावयासाठी आणि जिज्ञासु जे यासि तत्वज्ञान या प्रकारे संपादावे याजसाठी केनोपनिषदाचे-भाष्य प्रथम खंडावरील संक्षेपेकरून आणि द्वितीय खंडावरील विस्तारपूर्वक आणि तृतीय–चतुर्थ खंडावरील संक्षेपेकरून वर्णितो, ते क्षमा करून श्रवण करावे. ॥ श्रीशिवो ॥ अथ केनोपनिषत्–प्रथमखण्डः ॥ कोण्हीएक शिष्य जो तो ब्रह्मनिष्ठ गुरूप्रत यथाविधी शरण जाउन प्रश्न करिता जाला. आहो श्रीगुरु ! केनेषितं पतति प्रेषितं मनः । कोण्हाचे इच्छेकरून कोण्हे प्रेरिले होत्साते मन जे ते वारंवार स्वविषयाप्रत जाउन संबंध पावते ? केन प्राणः प्रथमः प्रैति युक्तः । सर्वेंद्रियास प्रवृत्ति व्हावयासि प्रथम ऐसा जो प्राण तो कोण्हे नियमन करून प्रेरिला होत्साता स्वव्यापाराप्रत गमन करितो ? केनेषितां वाचमिमां वदन्ति । कोण्हाचे इच्छेस्तव ही शब्दलक्षणा वाणी जे तीते लोक बोलतात ? चक्षुः श्रोत्रं क उ देवो युनक्ति । चक्षु आणि श्रोत्र जे त्याते स्वस्वविषयाचे ठाई कोणता देव जो तो प्रेरितो ? या प्रकारे पुसणारा योग्य शिष्य जो त्याकारणे ब्रह्मनिष्ठ श्रीगुरु ह्मणतात. रे शिष्या ! मनआदि करणसमुदायास स्वस्वविषयाप्रत कोणता द्योतनवान् जो तो प्रेरिता असून कैसि प्रेरणा करितो, ऐसे तुवा विचारिले. त्याचे उत्तर सांगतो, ते ऐकः—' श्रोत्रस्य श्रोत्रं ' शब्द श्रवण करिजेला जातो जेणें ते श्रोत्र होय. त्या श्रोत्राचेही जे श्रोत्र ह्मणजे श्रोत्राधिष्ठान असून, श्रोत्राचे स्वविषई प्रवर्तन

करणारे जे अंतर्यामि चैतन्य; 'मनसो मनः' तसेच मनेचेही जे मन ह्म. चैतन्य जे तीवाचून मन जे ते संकल्प आणि निश्चयादि व्यापार करण्यास समर्थ होत नाही म्हणून मनाचे मन जे ते अंतरयामि चैतन्य होय; 'यद्वाचो ह वाचम्' तसेच वाचेची जे वाणि म्ह. वार्गींद्रियास अधिष्ठान असून वाणींस प्रवंर्त करणारे आंतर्यामि चैतन्य 'प्राणस्य प्राणः' तसेच अंतरयामि चैतन्य जे ते प्राणाचेही प्राण होय; अचेतन प्राण जे याचि प्राणनक्रिया म्ह. गमनागमन जे ते अधिष्ठान—चैतन्यावाचून न घडे म्हणून; 'चक्षुषश्चक्षुः' तसाच चक्षुचाही चक्षु जो तो अंतर्याम्यात्माचि होय; नीलपीतादिरूप ग्रहण करण्यास सामर्थ्य जे ते अधिष्ठानचैतन्यावाचून नेत्रेंद्रियास यावयाचे नाही ह्मणून. आतां, भाष्यकार ह्मणतात, या ज्ञानेकरून काय होते ह्मणाल, तरि अमृतत्व प्राप्त होते. 'अतिमुच्य धीराः प्रेत्यास्माल्लोकादमृता भवन्ति' धीराः ह्म. बुद्धिमान् विवेकी जे ते श्रोत्रादिकाचे ठाईंचा आत्मभाव टाकून, श्रोत्रादिइंद्रियाधिष्ठान ब्रह्म जे ते आत्मा ह्म. आपले स्वरूप होय, ऐसे जाणून, 'प्रेत्य व्यावृत्यास्माल्लोकात्' ह्म. पुत्रमित्रकलत्रबांधवादिकाचे ठाइंचा ममाहंभावरूप संव्यवहारापासून व्यावृत्य ह्म. ईषणात्रय टाकून, ज्ञानसामर्थ्यप्रभावेकरून, 'अमृता भवन्ति' ह्म. अमरणधर्मवान् होतात. अथवा प्रेत्य ह्मणजे देहपातानंतर जेथे चक्षुरादि इंद्रियाचे गमन नाही, त्या निर्विशेष स्वात्मभावाते पावतात. न तत्र चक्षुर्गच्छति न वाग्गच्छति नो मनः' अधिष्ठित श्रोत्रादि इंद्रिये जी त्याचे स्वरूप ब्रह्म होय; ह्मणून चक्षु, वाणी आणि मन जे ती स्वाधिष्ठान ब्रह्माचे ठाई गमन करित नाहींत. जैसा अग्नि जो तो दाहक प्रकाशक असताही आपणाते दहन अथवा प्रकाशन करीत नाही, तैसे चक्षु जे ते ब्रह्माचे ठाई गमन करीत नाही. 'स्वात्मनि गमनासंभवात्' चक्षुचे अधिष्ठान ब्रह्म होय, यास्तव गमनाचा असंभव आहे; तसीच वाग् जे ति शब्द उच्चार्यमान् अभिधेय ह्म. पदार्थ जे त्याते प्रकाशिते. तेव्हा त्या पदार्थाप्रत वाणी गमन करिते ऐसे बोलिजेते. वाणीचे अधिष्ठानस्वरूप ब्रह्म होय. यास्तव गमनाचा असंभव आहे. 'नो मनः' मन जे ते अन्यास संकल्पिते आणि अध्यवसाय ह्म. निश्चय करिते. अथवा आपणाते संकल्पिते आणि निश्चइते. परंतु आपले स्वस्वरूप अधिष्ठान ब्रह्म जे त्याचे ठाई गमन करीत नाही. 'न विद्मो न विजानीमो यथैतदनुशिष्यात्' इंद्रिय-मनादिकास तरि दृश्य वस्तु विज्ञात होते त्यास ब्रम्ह तरी अगोचर आहे. या हेतूस्तव श्रीगुरु म्हणतात,' न विद्मः' ते ब्रम्ह एतादृश आहे ऐसे आम्हि जाणत नाहीत आणि याचि हेतूस्तव

'न विजानीमः' ज्या प्रकारेकरून ते ब्रम्ह शिष्याकारणे उपदेशावे, हे जाणत नाही, हा अभिप्राय. जे वस्तु इंद्रियास गोचर होती ते अन्यास उपदेशावयास शक्य होती. तरि ते ब्रम्ह कैसे म्हणाल तरि 'अन्यदेव तद्विदितादथो अविदितादधि' विदित म्ह. व्याकृत महदादि देहपर्यंत कार्यवर्गाहून जे अन्य आणि अव्याकृत म्ह. अविद्यालक्षणकारण जे त्याहून उर्ध्व म्ह. अन्य ते ब्रम्हवस्तू होय. 'इति शुश्रुम पूर्वेषां ये नस्तद् व्याचचक्षिरे' ब्रम्हप्रतिपादक वाक्यार्थास आचार्य-उपदेशपरंपरेकरूनच प्राप्तत्व आहे; तर्केकरून अथवा अध्ययनेकरून अथवा मेधा म्ह. बुद्धिमतेकरून अथवा बहुश्रुततेकरून अथवा यज्ञादिकेकरून ब्रम्हप्राप्ति होत नाही. पूर्वपूर्वाचार्यांचे वचन ऐसे जे ते आमचे आचार्यांनि ब्रम्ह जे ते विस्पष्ट कथन केले, ते आम्ही या प्रकारे श्रवण केले की, कार्य कारणाहून अन्यत् ब्रम्ह जे ते आत्मा म्ह. आपले स्वरूप होय. आता कोण्हीएक श्रोता जो त्यास ऐसि आकांक्षा जालि, जे आत्मा म्ह. आपण जो तो कर्म आणि उपासना करण्याचा अधिकारी त्यास कर्मउपासनेकरून ब्रम्हादि-देवत्व अथवा स्वर्गादिलोक प्राप्ति व्हावी, ऐसे कोण्हि कोण्हि इच्छितात. तस्मात् आपल्याहून अन्य उपास्य विष्णु आणि ईश्वर, चंद्र अथवा प्राण हे ब्रम्ह असावयासि योग्य होत, त्याहून आपण उपासक जो जो तो अन्य होय, या प्रकारचीच शंका स्वशिष्यास होईल, ऐसे त्याचे चिन्हावरून जाणून श्रीगुरु बोलतात, अरे शिष्या! ऐसी शंका धरू नको. 'यद्वाचानभ्युदितं येन वागभ्युद्यते ॥ तदेव ब्रह्म त्वं विद्धि नेदं यदिदमुपासते ॥' जे वाणीने प्रकाशित करिजेले जात नाही, आणि जेणेकरून वाणी प्रकाशित होउन वर्णोचार करिते, त्या वाचेते टाकून जे निरतिशय भूमाख्य ब्रह्म ते आपले स्वरूप होय, ऐसे तू जाण. जे इदंत्वेकरून विष्ण्वादिक लोकानि उपासिले जातात, ते आपले स्वरूप नव्हे; ते उपाधिस्तव अनात्मे होत. 'यन्मनसा न मनुते येनाहुर्मनोमतम् ॥ तदेव ब्रह्म त्वं विद्धि नेदं यदिदमुपासते ॥' जे मनाने संकल्पिले निश्चइले जात नाही आणि मन ज्याच्या योगे संकल्पनिश्चय करण्यास समर्थ होते, ऐसे ब्रह्मविद जे ते कथन करितात, त्या मनाते टाकून जे निर्विशेष भूमाख्य ब्रह्म ते आपले स्वरूप होय, ऐसे तू जाण. जे इदंत्वेकरून विष्ण्वादिक लोकानि उपासिले जातात, ते आपले स्वरूप नव्हे; ते उपाधीस्तव अनात्मे होत. 'यच्चक्षुषा न पश्यति येन चक्षूंषि पश्यति ॥ तदेव ब्रह्म त्वं विद्धि नेदं यदिदमुपासते ॥' जे चक्षूने पाहिले जात नाही आणि ज्याचे योगे लोक जे ते अंतःकरणवृत्तिसंयुक्त चक्षुने पाहातात, त्या चक्षूते टाकून जे

निर्विशेष भूमाख्य ब्रह्म ते आपले स्वरूप होय, ऐसे तू जाण; जे इदंत्वेकरून विष्णवादिक लोकानी उपासिले जातात ते आपले स्वरूप नव्हे. ते उपाधीस्तव अनात्मे होत. ‘ यच्छ्रोत्रेण न शृणोति येन श्रोत्रमिदं श्रुतम् । तदेव ब्रह्म त्वं विद्धि नेदं यदिदमुपासते । जे श्रोत्रेंद्रियेकरून श्रवण केले जात नाही आणि ज्याचे योगेकरून लोक जे ते श्रवण करितात, त्या श्रोत्रेंद्रियाते टाकून निर्विशेष भूमाख्य ब्रह्म ते आपले स्वरूप होय ऐसे तू जाण; जे इदंत्वेकरून विष्णवादिक लोकांनि उपासिले जातात ते आपले स्वरूप नव्हे. ते उपाधीस्तव अनात्मे होत. ‘ यत्प्राणेन न प्राणिति येन प्राणः प्रणीयते ॥ तदेव ब्रह्मत्वं विद्धिनेदं यदिदमुपासते ॥ ’ प्राणेकरून प्राणवृत्तिविशेष घ्राणेंद्रिय ग्रहण करिजेते. जे प्राणेकरून ह्म० घ्राणेंद्रियेकरून न प्राणियते ह्म० गंधासारिखे ग्रहण केले जात नाही आणि ज्याचे योगेकरून लोक जे त्यांहि प्राणियते ह्म० घ्राणेंद्रिय गंधाचे ग्रहण करणारे ऐसे जाणिजेते, त्या प्राणघ्राणाते टाकून, जे निर्विशेष भूमाख्य ब्रह्म ते आपले स्वरूप होय ऐसे तू जाण; जे इदंत्वेकरून विष्णवादिक लोकांनि उपासिले जातात ते आपले स्वरूप नव्हे. ते उपाधीस्तव अनात्मे होत. इतिप्रथमखण्डः ॥ १ ॥ अथ द्वितीयखण्डः ॥ २ ॥ ‘ यदि मन्यसे सुवेदेति ’ आता श्रीमच्छंकराचार्य ह्मणतात—भाष्यः—‘ एवं हेयोपादेयविपरीतस्त्वमात्मा ब्रह्मेति ’ “ हेय ह्म० त्याग करणे आणि उपादेय ह्म० ग्रहण करणें या उभय क्रिया वर्ततात ज्याचे ठाई, तद्विपरीत ह्म० त्याग करणें आणि ग्रहण करणे या उभय क्रिया नाहीत ज्याचे ठाई ऐसा कूटस्थ आत्मा तू जो तो ब्रह्म आहेस, ” ऐसा पूर्व खंडाचे ठाई प्रत्यायितः ह्म० बोधिजेला शिष्य जो तो ‘अहमेव ब्रह्मेति सुष्ठु वेदाहं मामिति गृण्हीयात्’ ‘मी ब्रह्म होय ऐसे सुष्ठु ह्म. चांगले जाणतो’ ऐसे ग्रहण करील, ही शंका मानून श्रीगुरु जे ते शिष्यबुद्धिच्यालनार्थ ‘ यदि मन्यसे ’ ऐसे बोलते जाले. आता, कोण्हीएक शंका करितो, आहो भाष्यकार ! म्या ब्रह्म बरे जाणिले ही निश्चित प्रतिपत्ति ह्म. बोध जो तो इष्टचि की ? यासि भाष्यकार अर्धा अंगिकार करून उत्तर देतात, अरे ! ब्रह्मविषई निश्चित प्रतिपत्ति ह्म. बोध जो तो इष्ट होय; परंतु आपण ब्रह्माचा ग्रहण—कर्ता होउन, म्या ब्रह्म बरे जाणिले हा बोध इष्ट नव्हे. जे इतर नामरूपात्मक वेद्य वस्तु, इदंत्वेकरून विषय होति, ती वस्तु जाणावयास शक्य होती. जैसा काष्ठाते अग्नि जाळितो त्या प्रकारे आपणाते जाळीत नाही. कां ? जे आपले स्वरूपचि होय ह्मणून. तैसा संपूर्ण वेद्य पदार्थाचा वेत्ता प्रत्यगात्मा जो त्याचे स्वस्वरूप केवल ब्रह्म होय. ते त्याजला वेद्य पदार्था-

सारिखे अन्यत्वे जाणता येत नाही; सर्वास जाणता जो त्याचा स्वात्मा म्ह. स्वस्वरूप ब्रह्म होय ऐसा सर्व वेदांचा निश्चितार्थ आहे. आणि या केनोपनिषदाचे ठाइ प्रश्नप्रतिवचनेकरून तेचि प्रतिपादिले आहे. 'श्रोत्रस्य श्रोत्रमित्याद्यया' आणि 'यद्वाचाऽनभ्युदितमिति' ऐसे विशेषेकरून निर्धारिले आणि ब्रह्मविद संप्रदायाचा निश्चय बोलिजेला. 'अन्यदेव तद्विदितादथो अविदितादधीति, अविज्ञातं विजानतां विज्ञातमविजानतामिति' या प्रकारे श्रुति जे ती उपंन्यास करून उपसंहार करील. तस्मात् 'सुवेदेति' याप्रकरे शिष्यबुद्धि जे ति निराकरण करणे, आचार्य जे त्यास युक्तचि होय. जैसा सर्वास दग्ध करणारा दाहक अग्नि जो तो आपण आपणाते दग्ध करावयास समर्थ नाहीं, तैसा संपूर्णाते जाणणारा प्रत्यग् आत्मा जो तो आपण आपणाते जाणावयास समर्थ नाहीं. आणि एक अद्वितीय ब्रह्म जे त्यास अन्यवेदिता म्ह. जाणता नाहींच की ज्यास अन्यत्वेकरून ब्रह्म वेद्य होईल. 'नान्यदतोऽस्ति विज्ञातृ' या प्रकारे श्रुती जे ती ब्रह्मास आपल्याहून अन्यत्वे जाणणार याचा निषेध करिते. यास्तव 'म्या ब्रह्म चांगले जाणिले' ही प्रतिपत्ति म्ह. बोध जो तो मिथ्याच होय. तस्मात् 'यदि मन्यसे सुवेदेति' या प्रकारे श्रीगुरु बोलिले ते युक्तचि होय. कदाचित् तू मानसील की, ब्रह्मवस्तु जाणावयास सुलभ असेल, तरि ते ब्रह्मवस्तु दुर्विज्ञेय आहे. यथाश्रुत म्ह. सांगितल्यासारिखे श्रवण केले, तथापि, कदाचित् क्षीण जाले आहेत दोष जे ते ज्याचे आणि सुमेधा म्ह. सुबुद्धिमान् जे त्यातीलही कश्चित् म्ह. एखादा ब्रह्मवस्तूते पावतो; आणि एखादा पावतही नाही. ऐसे कोठे पाहिले म्हणाल तरि छांदोग्य–अष्टमाध्यायाचे ठाई इतिहास आहे. श्रुतिः—'य एषोऽक्षिणि पुरुषो दृश्यते एष आत्मेति होवाचैतदमृतमभयमेतद्ब्रह्मेति।' ऐसे सत्यलोकी ब्रह्मदेव जो येणे उभयतास एकसमयावच्छेदे ब्रह्मोपदेश केला. त्यातील स्वकुलोत्पन्न आणि पंडित असुराचा राजा विरोचन जो तो, यथावत तत्वज्ञान उपदेशिले असता, विपरितार्थ देहातेच आत्मा मानून जाता जाला. आणि देवाचा राजा इंद्र जो तो, तीन वेळ फिरफिरून ब्रह्मदेवाप्रत जाउन, वारंवार तपप्रभावे स्वभावदोष क्षयाते पाउन, प्रथमोक्तच चतुर्थपर्यायि ब्रह्मवस्तु पावता जाला. लोकेऽपि म्ह. प्रत्यक्षादिव्यवहारप्रसंगि एकाच गुरूपासून श्रवण करणारामध्ये कोण्हि यथावत् ज्ञान पावतो, कोण्हि अयथावत्, कोण्हि विपरीत आणि कोण्हि ज्ञान पावतहि नाहीं. अस्तु; इंद्रियमनबुद्धिकरून प्रत्यक्ष व्हावयास योग्य वस्तुचे ठाइ ऐसे होते, मग आत्मतत्व तरि अंतीद्रियचि आहे, येथे ऐसे होइल यात काय

आश्चर्य आहे ! येथेचि सत्यअसत्यत्वें आत्मतत्वाचा निर्णय करणारे संपूर्ण तार्कीक जे ते, विप्रतिपन्न म्ह. विवादग्रस्त आहेत. तस्मात् ब्रह्म जाणिले ऐसे शिष्यानें सुनिश्चित सांगितले तरि, विषम प्रतिपत्तित्वात् म्ह. ब्रह्मवस्तूचे ज्ञान दुर्घट आहे. या हेतूस्तव, 'यदि मन्यसे सुवेदेति' ऐसे साशंक वचन जे ते श्रीगुरुचें युक्तचि होय. संमताविद्यारण्यकृत अनुभूतिप्रकाशः- ' त्वत्कारुण्यात्सुष्ठु वेद ब्रह्माहमिति वक्षि चेत् ॥ अल्पं वेत्सि न संपूर्णं ज्ञातृज्ञेयाविभेदतः ॥ ५७ ॥ अखंडैकरसे तत्वे ज्ञातृत्वं प्रत्यगात्मनः देवस्य ब्रह्मतेत्येवं खंडनादल्पवेदनम् ॥ ५८ ॥ अध्याय ॥ १९ ॥ दभ्रमेवापि नूनं त्वं वेत्थ ब्रह्मणो रूपं यदस्य । अरे शिष्या ! तू ब्रह्माचे रूप अल्पचि जाणतोस, ऐसे वाटते. आता शिष्य ह्मणतो, आहो श्रीगुरु ! ब्रम्हाची रूपें जे ती लाहानथोर ऐसि अनेक प्रकाराचि आहेत काय, ज्या हेतूस्तव मी जो येणे दहर म्ह. अल्प जाणिलें म्हणता? आता श्रीगुरु म्हणतात, बरे तुवा विचारिलेस . नामरूपउपाधकृित लाहानथोर जीवश्वरादिभेदे ब्रम्हाचि अनेक रूपें आहेत. परंतु स्वतः ब्रम्हास अनेकरूपता नाहीं. स्वतः ब्रम्ह कसे आहे म्हणसील तरि, ' अशब्दमस्पर्शमरूपमव्ययं तथाऽरसं नित्यमगन्धवच्च यत् ।' ही श्रुति जे ती शब्दादि सहरूपाते प्रतिषेधिते म्ह. ब्रम्हास रूपादिक नाहींत, ऐसे सांगते. ऐसे ऐकून कोणीएक जो तो अक्षेप करून बोलतो ' ननु येनेव धर्मेण यद्रूप्यते तदेव तस्य स्वरूपमिति, आहो भाष्यकार ! तुम्हि ब्रह्मास रूप नाही म्हणता, हे काय ? ज्या धर्माने म्ह. विशेषणानें जे विशेषित तेच त्याचे रूप होय, ऐसा न्याय आहे. तैसे कोणत्या विशेषणाने ब्रह्माचे रूप म्हणाल तरि, युक्तीने सांगतो. समस्त पृथिव्यादि पंच मूते अथवा वेगळालि भूते देहाकार परिणामाते पावलि, त्याचा चैतन्य धर्म नव्हे. हे कशावरून म्हणाल तरी – चैतन्य जे ते देहाबाहेर प्रतीतीस येत नाही म्हणून. तसे श्रोत्रादि दशेंद्रिये, पंच प्राण आणि द्विविध अंतःकरण हे भौत्तीकविशेष; यास्तव चैतन्य त्याचा धर्म नव्हे. ' परिशेष्यात् ' भूतभौत्तिक व्यावृत्तिकरून पाहिले असता, अवशिष्ट स्वतंत्र राहिले चैतन्य ते ब्रह्माचे रूप होय. ब्रह्म जे ते चैतन्येकरून निरोपिले जाते, ये विषई श्रुतिसंमतिः—' विज्ञानमानन्दंब्रह्म, ' ' विज्ञानघनएव, ' ' सत्यं-ज्ञानं प्रज्ञानं ब्रह्म ' ऐसे ब्रह्माचे स्वरूप श्रुतिचे ठाई निर्देशिले आहे. आता भाष्यकार जे ते अर्ध आंगिकार करून बोलतात, अरे तर्कवादिया ! श्रुतिचे ठाई चैतन्येकरून ब्रह्माचे रूप सांगितले खरे ! तथापि, ते अंतःकरण देहेंद्रिय-

**उपाधीद्वारेकरून** विज्ञानादि म्ह. प्रमाता, द्रष्टा साक्षि आणि अस्तिभातिप्रीय-स्फुरणरूप ऐसा निर्देश करिजेला, परंतु हा स्वतः ब्रह्माचा निर्देश नव्हे. अहो! असंग जे चैतन्य त्यास देहादि उपाधिउपहित संबंध होतो काय? यासि भाष्यकार ह्मणतात, '**तदनुकरित्वात्**' अरे वादि! भ्रांतिस्तव संबंध झाल्यासरिखे वाटते. जैसे जळ जे ते कंपायमान आणि भेदाते पावले असता, सविता जो तो कंपायमान आणि भिन्न भिन्न जाल्याचेपरि जळउपाधिस्तव वाटतो, परंतु आकाशस्थ सविता कंपायमान आणि भिन्न भिन्न होत नाही, तैसा देह आला गेला असता, आत्मा गेलाआल्याचेपरि वाटतो आणि अंतःकरणभेदास्तव आत्मा भिन्न भिन्न ऐसा वाटतो हे भ्रांतिचे लक्षण. जैसा दूरस्थ सविता असता, जळउपाधिस्तव मिथ्या आभासरूपे संबंध दिसतो, तैसा असंग कूटस्थात्मा जो त्यास देहादि अंतःकरणउपाधिउपहित आभासरूपसंबंध, अज्ञानकृतभ्रांतीस्तव वाटतो. परंतु देहादिकासि आणि कूटस्थासि कालत्रयि संबंध नाही. देहादिकास वृद्धिसंकोचछेददाहादिकेकरून नाश जाला असता, हे विकार कूटस्थास होत नाहीत म्हणून. या चैतन्यास देहेंद्रिय-अंतःकरण आभास भ्रमाधिष्ठानभूतत्व आहे; म्हणून यासि कूटस्थ ऐसि संज्ञा. आता, स्वतः ब्रम्ह कैसे म्हणसील तरी- —देहेंद्रिय-अंतःकरण उपाधि-उपहित-संबंध-रहित भूमा अनंत, निर्विशेष निरंजन, केवलस्वरूप जे ते- '**अविज्ञातं विजानतां विज्ञातमविजानताम्**' ऐसे स्वतः ब्रम्हाचे वर्णन पुढे स्थित होइल. आता, आधिदैविक ज्ञानही अल्पचि होय, ऐसे म्हणतात. '**त्वं यदस्य देवेष्वथ नु मीमांस्यमेव ते मन्ये विदितम्**' श्रीगुरु म्हणतात, अरे शिष्या! तुवा केवल अध्यात्मोपाधीतील म्ह. अंतःकरणउपहितपणे परिच्छिन्नत्वे ब्रम्हाचे रूप अल्प जाणिलेस ऐसे नाही. यदपि, जे ही आधिदैवतोपाधि म्ह. ब्रम्हांडातील संपूर्ण विष्णु-चंद्र सूर्य इंद्रादि देवाचे ठाईही ब्रह्माचे रूप जाणिले, तरि तेहि अल्पचि तुवा जाणिले, ऐसे निश्चयेकरून मी मानितो. ऐसे का म्हणसील तरि, जे अध्यात्म आणि आधिदैवत हे उभयही उपाधिपरिच्छिन्नत्वापासून आणि अल्पत्वापासून निवृत्त होत नाही म्हणून. जे निर्विशेष ब्रह्म कैसे आहे, ते ऐका: —अविद्याकल्पित संपूर्ण उपाधिविशेष नाशाते पावले जातात ज्याच्या बोधेकरून ऐसे, जे शांत, अनंत, एक, अद्वैत, भूमाख्य नित्यब्रह्म जे ते घटपटादि वेद्यासारिखे विषयविषइत्वेंकरून सुवेद्य नाही, हा अभिप्राय ऐसे आहे. या हेतूस्तव, आता निश्चयेकरून मी ऐसे मानितो कीं, तुजला अद्यापि ब्रह्मवस्तु जे ते मीमांस्यं विचार्यमेव ह्म० विचारणीयच आहे. या प्रकारे श्रीगुरुचे

वचन श्रवण करून, शिष्य जो तो एकांति जाउन बसला होत्साता, प्रथमखंडाचे ठाई— **'यन्मसा न मनुते येनाऽऽहुर्मनो मतम्। तदेव ब्रह्म त्वं विद्धि नेदं यदिदमुपासते ।१।'** ऐसा श्रीगुरुनें बोलिजेला आगम, तैसा अर्थतः विचार करून, तर्क करु लागला की, सुवेद म्हटले असतां, जो वेद्यवस्तु ते जाणता तो मी होउन ब्रह्माला जाणणारा ज्ञाता होयीन. त्यास ऐसे नव्हे. ब्रह्म माझे स्वस्वरूप होय. तेथे मी वेगळा राहून वेदनाक्रिया राहात नाहीं. ऐशा तर्केकरून निर्धार केला आणि स्वानुभवे विचार करु लागला जे मी ब्रह्माचा अन्यत्वेकरून ग्रहणकर्ता नव्हे. जे विदित--अविदिताहून अन्य ते ब्रह्म मी पूर्वसिद्धचि आहे. त्या स्वरूपेंकरून मी आपणाते या अन्याते जाणत नाहीं, ऐसा दृढ स्वानुभव करून, श्रीगुरुसमीप जाउन, बोलता जाला. हे श्रीगुरु ! आता बरीक मजला ब्रह्म विदित जाले, ऐसे मी मानितो. ते कैसे ह्मणाल तरि सांगतो, '**नाऽहं मन्ये सुवेदेति**' ब्रह्म सुवेद नाही, ऐसे मी मानितो. ऐसे ऐकून श्रीगुरु ह्मणतात, म्या जाणिले नाही ऐसा तुझा निर्धार आहे तरि तुवा ब्रह्म जाणिले नाहीस. एसे ऐकून आता शिष्य बोलतो, '**नो न वेदेति वेद च**' हे श्रीगुरु ! म्या ब्रह्म न जाणिले ऐसे नाही, जाणिलेच आणि जाणिलेही नाही. येथे शंका घेउन श्रीगुरु जे ते बोलतात, अरे शिष्या ! हे तुझे बोलणे विप्रतिषिद्ध ह्म. विरुद्ध होय. जरि चांगले जाणिले नाही ऐसे मानितोस तरि पुनः कैसे जाणिले ह्मणतोस ? आणि जाणिले ऐसे मानितोस तरि चांगले जाणिले नाही ऐसे कसे ह्मणतोस ? अरे ! एक वस्तु ज्याने जाणिली जाति त्यागेचि जात नाही, हे बोलणे संशयविपर्ययावाचुन न घडे. या प्रकारे तुझे बोलणे विप्रतिषिद्ध ह्म. विरुद्ध होय आणि ब्रह्म तरि संशयविपर्ययत्वेकरून जाणावे ऐसें नियमन करावयासि योग्य नव्हे, संशय-विपर्यय तरि सर्वत्र अनर्थकरत्वेकरून प्रसिद्ध आहेत. '**संशयात्मा विनश्यति**' ऐसे भगवद्वचन आहे. एवं या प्रकारे श्रीगुरुनि संशयविपर्यय घालविण्यासाठि चलन पावविले असताही शिष्य जो तो केवल भूमा स्वरूप ब्रह्म ते मी होय, ऐशा दृढनिश्चयापासून चलन पावला नाही. श्लोकः— **स्वप्रकाशं तमात्मानं तथात्वेनैव वेद्म्यहम् ॥ नान्यथातो यथाशास्त्रं बुद्धं ब्रह्मेति निश्चयः ॥ ६१ ॥ सुवेदेत्यक्षाविषये न वेदेत्यपभाषिते ॥ वक्तुं युक्तं स्वयं भाते कथं तद्युज्यते द्वयम् ॥ ६२ ॥ इत्यनुभूतिप्रकाशे अध्याय १९ ॥** आणि **अन्यदेव तद्विदितादथो अविदितादधि ॥** जे कार्यकारणाहुनि अन्य होय, या प्रकारे श्रीगुरुनि बोलिजेला आगमसंप्रदाय त्या बलेकरून आणि उपपत्ति ह्म. युक्ति-

करून आणि अनुभवबल जे तेणेकरून ब्रह्मविद्येविषइ आपलि दृढनिश्चयता दाखवीत होत्साता गर्जनाही करून बोलता जाला. '**यो नस्त द्वेद तद्वेद**' जो कोणिह आम्हा ब्रह्मचाऱ्यामध्ये '**नो न वेदेति वेद च**' ऐसे म्या बोलिजेले वचन जे त्याते तत्वता जाणतो तोचि त्या ब्रह्माते जाणतो. "**मध्येऽस्माकं हे सखायो ज्ञाता ज्ञातत्ववर्जितम् ॥ ब्रह्मेति वेत्ति योऽसौ हि यथाशास्त्रं विबुध्यवान् ॥ ६३ ॥" अनुभूतिप्रकाश.** आता गुरूचे वचनातील अभिप्राय एके प्रकारचा आणि शिष्याचे वचनातील अभिप्राय एके प्रकारचा असता, शिष्याने गर्जना केली ते अनुपपन्न म्ह. अयुक्त होय, ऐसि आशंका कोणी करील त्यास भाष्यकार समाधान करितात की, '**अन्यदेव तद्विदितादथो अविदितादधि**' या वाक्यकरून जे वस्तु बोलिले तेच अनुभव-अनुमानाने निश्चित करून, '**नो न वेदेति वेद च**' या वाक्योत्तरेकरून आचार्य बुद्धिसंवादार्थ म्ह. ब्रह्म जे ते स्वत्वेकरून जाणावे आणि घटवत विषयविषइत्वेकरून जाणू नये. हा श्रीगुरुचे मनातील अभिप्राय मी समजलो, ऐसे श्रीगुरूस कळवावयाकरिता आणि मंदबुद्धिग्रहण दूरीकरणार्थ तोच वस्तु शिष्य बोलता जाला, '**तस्मात् यो नस्तद्वेद तद्वेद**' या वाक्येकरून गर्जना केली ती युक्तचि होय. आता श्रुति जे ते शिष्याचार्यसंवादापासून निवृत्त होउन, स्वेन रूपेण म्ह. आपल्या रूपेकरून, समस्तसंवादनिर्वृत म्ह. सिद्ध अर्थातेच बोधन करिते. श्लोकः—**यल्लौकिकं वस्तु यत्र ब्रह्म तद्धि विलक्षणं ॥ यस्यामतं तस्य मतं मतं यस्य न वेद सः ॥ ६४ ॥ लोके घटो मतो येन स घटज्ञ इतीर्यते ॥ येन मन्त्रा मतं ब्रह्म न त्वसौ ब्रह्मविद्भवेत् ॥ ६५ ॥ मन्तृमन्तव्यरूपेण विविधत्वं विजानताम् ॥ अविज्ञातं ब्रह्मतत्वमखण्डैकरसात्मकम् ॥ ६६ ॥ अनुभूतिप्रकाशे.** स्वानुभवेकरून ज्या ब्रह्मविदास अमतं, अविज्ञातं, अविदित ऐसे ब्रह्म होय. या प्रकारे मतमभिप्रायः म्ह. निश्चय आहे ज्याचा त्यालाच ब्रह्म सम्यकत्वे कळले. ऐसे हे तत्वज्ञान जे ते श्रुतिसंमत होय, हा अभिप्राय. पुनः आणखि ज्यास मतं ज्ञातं मी जो येणे ब्रह्म विदितं म्ह. जाणिले ऐसा निश्चय आहे ज्याचा त्याजला श्रुति म्हणति, '**न वेद सः**' तो ब्रह्माते जाणतचि नाही. आता, '**अविज्ञातं विजानतां विज्ञातमविजानताम्**' हे श्रुति जे ते सम्यक् आणि असम्यक् दर्शि जे याचे. यथोक्तपक्षे म्ह. ज्ञान्यास ब्रह्म अविषय आणि अज्ञान्यास विषय ऐसे जे पूर्वोक्त पक्ष त्याचे अवधारण म्ह. निर्धारण करिते. विजानतां ह्य. सम्यकत्वे जाणणार ज्ञानि जे त्यास अविज्ञातममतमविदितमेव ब्रह्म म्ह. अविषयचि ब्रह्म होय आणि अविजानतां म्ह. सर्वोपाधिविनिर्मुक्त, शुद्ध, शांत, भूमा,

अनंतस्वरूप ब्रह्माने स्वत्वेकरून न जाणणारे, असम्यक्दर्शी ह्म. सकल श्रुतिचे मुख्य तात्पर्य कोठे आहे हे न पाहाणारे आणि इंद्रिय, मन, बुद्धिचे ठाईच स्थित असून बुद्धीत प्रतिफलित जालेले जे चैतन्य तेच आत्मदर्शन मानणारे ऐसे जे त्यास ब्रह्म जे ते विदित म्ह. विषयाचि होय, म्हणून तो असम्यक्दर्शी, हा श्रुतिचा इत्यर्थ. केवल अज्ञानी जनास लक्षुन श्रुति बोलति, ऐसे हे नव्हे. अत्यंत मूढ अवित्पन्नबुद्धि म्ह. अविचारवान् आज्ञानि जन जे त्यास आम्हि ब्रह्म जाणिले ऐसि मति उत्पन्न होतांचि नाही. अस्तु; इंद्रियमनबुद्धिउपाधीचे ठाई आत्मदर्शन मानणारे जे त्यास तरि मायोपाधि येतो. सर्वज्ञत्व, सर्वसाक्षित्व ब्रह्मास प्राप्त होते ऐशा विवेकाचा अनुपलंभ म्ह. अनुभव नाही म्हणूनच बुद्धि उपाधिस्थ असून, बुद्धीत प्रतिफलित जाले जे चैतन्य त्यास जाणिल्यास्तव, आम्ही ब्रह्म जाणिले ऐसि मति उत्पन्न होति ते तत्व-ज्ञान तरी नव्हेच परंतु भ्रांती होय. याजकरिता असम्यक्दर्शनह्म. अल्पज्ञान जे ते पूर्वपक्षत्वेकरून '**विज्ञातमविजानताम्**' ऐसे श्रुति जे ते उपन्यस्यते म्ह. उपपादन करिते. अहो! जरि 'अविज्ञातं विजानताम् म्ह. सम्यक् जाणणारे ज्ञानी जे त्यास ब्रह्म जे ते अविज्ञात होय, ऐसे अवधृतं म्ह. निर्धारिजेले, तरि ब्रह्म जे ते अत्यंत अविज्ञात जाले. मग लौकिक अज्ञानि जनास आणि ब्रह्मविदास अविशेष म्ह. समानत्व प्राप्त होईल आणि 'अविज्ञातं विजानतां' या वाक्यास 'वदतो-व्याघातरूप' दोष येईल. त्यास कोणत्या प्रकारे ब्रह्म जे ते सम्यक् विदित होते? याचि आकांक्षेच्या समाधानार्थ श्रुति बोलते, **प्रतिबोधविदितं बोधं बोधं प्रति विदितम्।**' जे जे उदयाते पावतात बोध, त्या त्या बोधाप्रत जाणणे जे ते प्रतिबोध म्हणावे. बोधशब्देकरून काय ह्मटले असता, बुद्धिस जे जे प्रत्यय होतात, ते बोधशब्देकरून बोलिजेले जातात आणि बुद्धिगत संपूर्ण प्रत्यय विषय होतात ज्यास तो प्रत्यगात्मा. तोचि सर्व बोधाते जाणतो आणि सर्वप्रत्ययदर्शी होय. ह्म. बुद्धिनिष्ठ सर्व प्रत्ययाते साक्षित्वेकरून पाहाणारा आणि 'चिच्छक्तिभारूपमात्रः' ह्म. चिच्छक्तिचा अंशसाक्षिता जे ती ऐसियुक्त स्वये ज्ञानस्वरूपमात्र जो प्रत्यगात्मा होय, तो कैसा लक्षिला जातो ह्मणाल तरि—आत्मा जो तो संपूर्ण प्रत्ययाचे ठाई अनुगतरूपेकरून आहे ह्मणून त्या प्रत्ययानेच आत्मा लक्षिला जातो. प्रत्ययावाचून 'आत्मनो विज्ञानाय' ह्म. आत्मानुभव व्हावयाकारणे अन्यद्द्वारांतर नाहि. अतः या हेतुस्तत्र प्रत्यय-- 'प्रत्यगात्मतया विदितं ब्रह्म,' 'अयमात्मा ब्रह्मतत्वमसि' इत्यादि, गुरुपदिष्ट महावाक्यजनितवृत्तिने अखंडैकरस भूमास्वरूप ब्रह्म जे त्याते प्रत्यगात्मयासि

अभेदत्वेकरून जाणिले जाते. 'तदा तन्मतं' म्ह. तेव्हा ते तत्वज्ञान श्रुतिसंमत होय. 'तदा तत्सम्यग्दर्शन मित्यर्थः' म्ह. तेव्हा ते सम्यग्दर्शन होय, हा इत्यर्थ. श्लोः—"**विविधत्वमविज्ञाय यदखण्डत्ववेदनम् ॥ तद्धवेद् ब्रह्मविज्ञानं धीमद्भिर्बुध्यतां तथा ॥ ६७ ॥ दृशः प्रतिबोधो यस्तेन चेद्विदितं तदा मतं ब्रह्म भवेद्विद्वानमृतत्वं हि विन्दते ॥ ६८ ॥ इत्यनुभूतिप्र. ॥**" ऐसा सम्यग्दर्शी ब्रह्मवित् जो त्याजला सर्वप्रत्ययदर्शित्व असता उत्पत्तिविनाशवर्जित दृग्रूपत्व आणि नित्यत्व, विशुद्धस्वरूपत्व अनंत्यत्व, निर्विशेषत्व एकत्व सर्वभूताचे ठाई सिद्ध होईल. जैसे व्योम जे ते घटगिरिगुहादिकाचे ठाई अभेदत्वेकरून व्याप्त आहे, तैसे ब्रह्म जे ते ब्रह्मादि स्थावरांत संपूर्ण भूताचे ठाई अभेदत्वेकरून व्याप्त ऐसे होईल. ते कोणत्या हेतूस्तव म्हणाल तरि—'लक्षण-भेदाभावात्' सत्यज्ञानानंदानंत लक्षणभेदाचा अभाव आहे, या हेतूस्तव. अस्तु; याप्रकारे 'विदिताविदिताभ्यामन्यत्' म्ह. कार्यकारणाहून अन्यत् ब्रह्म ऐसा आगमवाक्याचा अर्थ परिशुद्ध सिद्ध होतो. या विषई श्रुत्यंतराचे प्रमाण :— **दृष्टेर्द्रष्टा श्रुतेः श्रोता मतेर्मन्ता विज्ञातेर्विज्ञाता**' या श्रुतीचा अर्थ समष्टि अभिप्रायेकरून जाणावा. सम्यग्ज्ञानी जो तो अंतर्यामित्वेकरून सर्वदृष्टिचा द्रष्टा आणि सर्व श्रुतिचा श्रोता आणि सर्व मतिचा मंता आणि सर्व विज्ञातिचा विज्ञाता होतो. किंबहुना, तो परमात्मरूपेकरून सर्व दृष्टयादिकांचा प्रकाशक होय, हा श्रुत्यर्थ. आता, 'प्रतिबोधाविदितम्' या पदाचे व्याख्यान केचिद्दिएक ऐसे करितात, आत्मा जो तो पुनः बोधक्रिया करितो, तेव्हां बोधाक्रियालक्षणेकरून आपण बोधाचा कर्ता ऐसे जाणतो. बोधलक्षणेकरून जे विदित होते, ते प्रतिबोधाविदित होय. आणखि जसे जो वृक्ष शाखेला चलन पाववितो, तो वायु होय. तद्वत् आत्मबोधक्रियाशक्तिमान् द्रव्य होय; बोधस्वरूप नव्हे. बोध तरी उत्पन्न होतो आणि नाशाते पावतो. जेव्हां बोध उत्पन्न होतो, तेव्हा त्या बोधाक्रियेकरून आत्मा सविशेष होतो; आणि जेव्हा बोध नाशाते पावतो, तेव्हा नष्टबोध म्ह. बोधरहित आत्मा जो तो द्रव्यमात्र निर्विशेष असतो. आता याजला भाष्यकार ह्मणतात, अरे ! ऐसा स्विकार करसील, तरी आत्म्याचे ठायीं विक्रियात्मकत्व आणि सावयवत्व अनित्यत्व, अशुद्धत्व इत्यादिक दोष जे ते परिहार करण्यास शक्य न होतील. आणखि काणादाचा सिद्धांत की आत्मा आणि मन याचा संयोगास्तव बोध उत्पन्न होतो. तो बोध आत्म्याचे ठायीं समवायसंबंधानें म्ह. नित्यसंबंधानें राहाता, यास्तव आत्म्याचे ठाई बोधृत्व होते. आत्मा विक्रियात्मक नव्हे, द्रव्यमात्र होय.

आत्मा आणि मन याचा संयोगाने बोध कैसा उत्पन्न होतो ह्मणाल तरि—अग्निसंयोगानें घटाचे ठाई लौहित्य येते त्याचेपरि. आता भाष्यकार ह्मणतात, या काणादपक्षाचे ठाई अचेतनद्रव्यमात्र ब्रह्मातें मानितात, ते विरुद्ध होय. '**विज्ञानमानन्दं ब्रह्म**' इत्यादि श्रुति ज्या त्या बाधित होतील. आत्म्यास निरवयवत्वेकरून प्रदेश ह्म. अंतर नाहीं, तेव्हां मनाचा संयोग तरी कैसा होईल? आणि नित्यसंयुक्तत्व स्वीकारिले, तरि मनास स्मृति-उत्पत्ति-नियमाचि अनुपपत्ति येइल, ती अपरिहार्य होय. आत्म्यास संसर्गधर्मित्व जे मानणे ते श्रुतिस्मृतिन्यायविरुद्ध कल्पीत होय. तस्मात, '**असङ्गो न हि सज्जते**' ऐसि श्रुति; '**असक्तं सर्वभृत्**' ऐसि स्मृति; आणि न्यायही ऐसा आहे ज गुणवान् जे ते गुणवानाशी संसृज्यते म्ह. संबंध पावते; अतुल्यजातीसि संबंध पावत नाहीं. या हेतूस्तव, निर्गुण, निर्विशष, सर्वविलक्षण ब्रह्म जे ते कोण्हासिही तुल्यजातीय नसतां संबंध पावते, ऐसे बोलणे ते न्यायाविरुद्ध होय. तस्मात् नित्यअलुप्तविज्ञानरूप ज्योति आत्मा ब्रह्म, या प्रकारे हा श्रुत्यर्थ होय. सर्वबोधबोधृत्व जे ते आत्म्यास्तव सिद्ध होते अन्यथा सिद्ध होत नाहीं. तस्मात् '**प्रतिबोधविदितम्**' या वाक्याचा अर्थ जसा आह्मि वर्णिजला तो असाच होय. आता, 'प्रतिबोधविदितं मतम्' या वाक्याचा अर्थ कोणिएक वेदांतैकदेशी जो तो स्वसंवेद्यत्वेकरून वर्णन करितो—त्याचे पक्षीं सोपाधिक आत्म्याचे ठाई घडेत ते कैसे ह्मणाल तर—आत्मा जो तो त्यास बुद्धि-उपाधि-स्वरूपत्वेकरून, भेदाते कल्पून, आपण आपणाते जाणतो, ऐसा व्यवहार होतो. या विषईः—'**आत्मनैवात्मानं पश्यति**' '**स्वयमेवात्मनाऽऽत्मानं वेत्थ त्वं पुरुषोत्तम**' **इति** या प्रकारेंकरून श्रुतिस्मृतिप्रमाणही दाखवितात. येथे सिद्धांति दूषण बोलतात, जे वेद्य असते ते जाणत्याहून आणि जाणणे जे त्याहुनि भिन्न असते. जैसे घटादिक पदार्थ याप्रकारे व्याप्तिविरोधास्तव निरुपाधिक आत्मा जो त्यास एकत्व आणि ज्ञानरूपत्व आहे ह्मणून स्वसंवेद्यता ह्म. आपण आपणाते जाणणें अथवा परसंवेद्यता ह्म. परकीयाणे जाणणे हे उभयही वास्तव संभवत नाहीं. जैसे प्रकाशास प्रकाशांतराचि ह्म. दुसऱ्या प्रकाशाचि अपेक्षा नाहीं तैसा निरुपाधिक आत्मा जो ता संवेदन स्वरूप—ह्म० क्रियाकारकरहीत नुस्ता ज्ञानमात्र आहे; ह्मणून संवेदनांतराची अपेक्षा नाही. आता बौद्धपक्षि स्वसंवेद्यता मानितात, तेथे विज्ञानास क्षणभंगुरत्व आणि निरात्मत्व इत्यादिक दोष येतात; आणि '**नहि विज्ञातुर्विज्ञातेर्विपरिलोपो विद्यतेऽविनाशित्वात्।**,' '**नित्यं विभुं सर्वमतम्**,' **सवा एष महानज आत्माऽजरोऽमरोऽमृतोऽभयः**' इत्यादि ज्या श्रुति त्या बाधीत ह्म० मिथ्या

होतील. हे असो; आणखि कोणिएक ह्मणतो, सुषुप्तकाळीचा आनंदानुभव जैसा निर्निमित्त होतो, तैसा असंप्रज्ञात समाधिकाळी निर्निमित्त परमानंदाचा अनुभव तोच प्रतिबोध होय. आणि दुसरा ह्मणतो, सद्योमुक्तीकारणे सकृद्विज्ञान ह्म० एकवार जे विज्ञान ह्म० अनुभव होणे तो प्रतिबोध होय. ऐशा या दोनिहि पक्षावर अरुची मानून भाष्यकार ह्मणतात, अरे ! निर्निमित्त अथवा सनिमित्त अथवा एकवार अथवा बहुवार जाला, तरी जो पूर्वी आह्मी वर्णिजेला, तोच प्रतिबोध शब्दाचा अर्थ होय. '**अमृतत्वं हि विन्दते**' आता सम्यकज्ञानि जो तो बोधास्तव अमृतत्व ह्म० अमरणभावाते आणि ब्रह्मरूप जो स्वात्मा त्याचे ठाई अवस्थानरूप मोक्षाते विन्दते ह्म० पावतो. आहो ! आह्मास घटपटादि सर्व पदार्थाचा बोध ह्म० ज्ञान होते, तेणेकरून का मोक्ष होत नाहीं ? यासि उत्तरः— श्रुतीने बोलिजेला तैशा प्रतिबोधेकरून मोक्ष प्राप्त होतो, तो प्रतिबोध कैसा ह्मणाल तरि—'**प्रतिबोधविदितात्मकात्**' प्रतिबोधेकरून विदित जाला आहे आत्मा जो तो ज्यास त्याजला त्या बोधास्तव मोक्ष प्राप्त होतो. तस्मात् या हेतूस्तव, प्रतिबोधेकरून आत्मतत्व विदित होणे हे श्रुतिसंमत ह्म० मान्य, हा अभिप्राय. आहो ! ज्या बोधेकरून अमृतत्व प्राप्त होते तो बोध तरि कैसा व्हावा ? यासि उत्तरः—प्रत्यगात्मा जो तो आत्मविषय ह्म० आपले स्वरूप केवल ब्रह्म जे त्याते शोधित बुद्धिवृत्तिने विषय करितो, तेव्हा तो बोध अमृतत्वास हेतू होतो. श्लोकः—'**अविविक्तस्तु देहाद्यैरात्मा भवति वेदिता ॥ विविक्तात्मा वेदितव्यो धीवृत्तिर्वेदनं भवेत् ॥ १ ॥**' **अनुभूतिप्रकाश** ॥ आहो ! बुद्धिकार्य अनात्मरूप जो बोध, तेणेकरून सानिमित्तक अमृतत्व प्राप्त होते की ? यासि उत्तर—प्रत्यगात्मा जो त्यास अनात्मरूप बोधाचा निमित्तेकरून अमृतत्व प्राप्त होत नाही. तरि कैसे ह्मणाल तर—प्रत्यगात्म्याचे पूर्वसिद्ध ब्रह्मस्वरूप आहे, यास्तव निर्निमित्त ह्म० स्वतः सिद्धत्वेकरूनच त्यास अमृतत्व ह्म० अमरणभावत्व आहे. अहो ! अनादि अविद्येस्तव आत्म्यास मर्त्यत्व प्राप्त जाले, ऐसे असता श्रुतिने बोलिजेलि तैशा आत्मविद्येकरून, आत्मा जो तो कैसा अमृतत्वाचे पावतो ? यासि उत्तरः— '**आत्मना विन्दते वीर्यम्**' आत्म्याचे स्वकीय ब्रह्मरूप जे तेणेकरून प्रत्यगात्म्यास आत्मविद्याकृत वीर्य ह्म० सामर्थ्य येते. धनाचे योगेकरून अथवा कोण्हाचे साह्यतेकरून अथवा मंत्रजपेकरून अथवा वोषधीकरून अथवा अष्टांगादि योगेकरून संपादिले वीर्य ह्म० सामर्थ्य जे ते मृत्युचा पराभव करण्यास शक्य होते नाही. हे धनादि संपूर्ण पदार्थ देहेंद्रियादि अनित्यवस्तुकृत आहेत. ह्मणून

आत्मविद्याकृत वीर्य तरि आत्म्यास्तवाचि प्राप्त होते; अन्यसाधनास्तव नाही. या हेतूस्तव पुरुष जो तो मृत्युचा पराभव करण्यास शक्य होतो. आहो! धनादिक साधनेकरून मत्युचा पराभव न होता, आत्मविद्येनेच काय ह्मणून होतो? यासि उत्तर–आत्मविद्येला अन्यसाधनत्व नसता आत्मप्राप्ति करून देणे हेच अन्यसाधनत्व आहे ह्मणून. आहो! वरकड विद्येसही सामर्थ्ये आहेत, त्याजपेक्षा आत्मविद्येचेचि सामर्थ्य विशेष ते काय? यासि उत्तरः–आत्मविद्यावीर्याचे हेचि वीर्य ह्म. सामर्थ्य की, मृत्युचा पराभव करण्यास शक्य ह्म. समर्थ होते. आहो! वेदविद्या, शास्त्रविद्या, पुराणविद्या ऐशा अनेक विद्या आहेत, त्यास कोणते विद्येकरून अमृतत्व प्राप्त होते? यासि उत्तरः—आत्म्याचे शुद्ध स्वरूप ब्रह्म जे ते चरमवृत्तीरूप विद्येने विषय केले असता, त्या विद्येकरून अमृतत्व ह्म. अखिल–उपाधिविनिर्मुक्त, शुद्ध, शांत ब्रह्मरूपत्व जे ते ब्रह्मजिज्ञासूला प्राप्त होते. आता, असम्यक्दर्शी जो त्याचा प्रकार अन्य श्रुतीप्रमाणेकरून भाष्यकार सांगतात. **'नायमात्मा बलहीनेन लभ्यः'** या प्रकारेकरून अथर्वणवेदमुंडकोपनिषदीचि श्रुति आहे. अतः या हेतूस्तव आत्मविद्याकृत बल ह्म. सामर्थ्यहीन पुरुष जे त्यास प्रत्यक् चैतन्य जे ते नित्य अपरोक्ष आहे, ऐसे वाटते. तथापि, शुद्धात्म ब्रह्मस्वरूपाचा लाभ होत नाही. आहो! सम्यक्दर्शि ज्ञानि जो त्यास तरि ब्रह्मप्राप्ति होति यासि काय प्रमाण आहे? यासि उत्तरः—अरे! हा केव्हडा समर्थ हेतु आहे! **'अमृतत्वं हि विन्दत इति'** पूर्वी वर्णिजेला सम्यकदर्शी ज्ञानि जो तो निश्चयेकरून अमृतत्वाते ह्म. अमरणभाव **मोक्षरूप ब्रह्माते विन्दते ह्म. निश्चयेकरून पावतो. आता,** श्रुति जे ति तत्वज्ञान प्राप्त–अप्राप्तवान् जे त्याजला लाभहानि सांगते. **'इह चेदवेदीदथ सत्यमस्ति'** आहो! हे किति कष्ट सांगावे? नरतिर्यकप्रेतादिसंसारदुःखबाहुल्यप्राणधारणवान् देहसमुदायाचे ठाई जन्मजरामरणरोगाचीच प्राप्ति जा अज्ञानास्तव होति, या हेतूस्तव इहैव चेत् ह्म. येथील–येथेचि या मृत्युलोकाचे ठाई मनुष्य जो तो वेदाधिकारि आणि इंद्रियपाटव्येकरून समर्थ होत्साता, जरि श्रुतिने बोलिले लक्षण ऐशा आत्म्याते, पूर्वी वर्णिजेला प्रतिबोध त्या प्रकारेकरून जाणणारा होईल, तरि ते सत्य आहे ह्म. बरे आहे. या मनुष्यजन्माचे ठाई येउन त्याचा विनाश नाही ह्म. व्यर्थता नाही आणि त्याची अर्थवत्ता त्य. विद्यादीकधनवानता अथवा सद्भाव ह्म. साधूभाव अथवा परमार्थता ह्म. ब्रह्मस्थिति अथवा चिरकाळजीवन, हे सर्वही सत्य आहे. **'न चेदिहावेदीन्महती विनष्टिः'** नाहीतरी या मृत्युलोकाचे ठाई सर्वप्रकारे अधिकारि असून निजात्म ब्रह्म जे त्याते अविदितवान् ह्म. न जाणणारा होईल, तेव्हा महान् दीर्घ जिचा अंत नाही ऐशि विनष्टिः ह्म. विनाशिता ती

कोणती ह्मणाल तरि—जन्मजरामरणादि प्रतिबंध अविच्छेद ह्म. सततलक्षणा संसारगति जे ते प्राप्त आहेच आणि पुढेही होईल. तस्मात्—या हेतस्तव तत्वज्ञानाचे ठाई ऐसा गुण आहे आणि तत्वज्ञान न संपादिले असता महान् दोष आहे, ऐसे गुणदोष जाणणारे ब्राह्मण जे ते **'भूतेषु भूतेषु विचित्य धीराः प्रेत्यास्माल्लोकादमृता भवन्ति'** भूतेषु भूतेषु स्थावरेषु ह्म. वृक्षपाषाणाचे ठाई आणि चरेषु ह्म. मनुष्यगवादि कीटकांत जंगमाचे ठाई एक आत्मतत्व ब्रम्ह जे ते विचित्य म्ह. जाणून साक्षात्करून धीराः धीमन्तः म्ह. बुद्धिमान् जे ते प्रेत्य व्यावृत्य म्ह. देह चेष्टमान असता ममाहंभावलक्षण अविद्यारूप देहाभिमान हाचि कोण्हिएक लोक जो त्यापासून उपरमाते पाउन सर्वात्मएकभाव अद्वैताते पावले होत्साते अमृता भवन्ति ह्म. ब्रह्मचि होतात, हा इत्यर्थ. ये विषई श्रुतिः— **"स यो ह वै तत्परमं ब्रह्म वेद ब्रह्मैव भवति"** इति द्वितीयखण्डः ॥ २ ॥ अथ तृतीयखण्डः ॥ पूर्वी द्वितीयखंडाचे ठाई उत्तम अधिकारी जो त्यास गोचरविषय न होता प्रत्यगात्मा जो तो ब्रह्म होय, ऐसे ज्ञान सांगितले. आता तृतीय खंडाचे ठाई मंदाधिकारीगोचरविषय सगुणब्रह्मउपासना सांगतात. **'अविज्ञातं विजानतां विज्ञातमविजानताम्'** या वाक्यश्रवणेकरून मंदाधिकारि जो त्यास ऐसा व्यामोह होइल की, जे वस्तु आहे ते प्रमाणेकरून जाणता येती आणि जे वस्तु शशविषाणा सारिखी नाही ते जाणण्यात येत नाही; हे लोकाचे ठाई पाहिले आहे. तैसेचि ब्रह्म जे ते जाणण्यात येत नाही, म्हणून ते अत्यंत असत् होय. ऐसा व्यामोह मंदबुद्धिमानास होउ नये एतदर्थ ही आख्याइका श्रुति आरंभिते. आणखि तेच ब्रह्म मायोपाधिक होउन सर्वप्रकारेकरून सर्वास शासन करणारे होय. आणि ते संपूर्ण देवाचेही परदेव आणि ईश्वराचेही ईश्वर आणि दुर्विज्ञेय होय आणि देवास जयहेतु आणि असुरास पराजयहेतु ऐसे ब्रह्म आहे ते नाही कैसे होईल म्हणून याचि अर्थास अनकूल उत्तरवाक्ये दिसतात. अथवा ब्रह्मविद्येचे स्तुत्यर्थ ही आख्यायिका. ती स्तुति कैसि ह्मणाल तरि—ब्रह्मदर्शनेकरूनच अग्न्यादि देव जे ते महत्व पावले आणि इंद्रही त्याजपेक्षा महत्व पावला. अथवा ब्रह्म दुर्विज्ञेय आहे, ते कैसे ह्मणाल तरि -- अग्न्यादि देव जे ते तेजस्वी असताही महान्कष्टेकरून ब्रह्म जाणते जाले. तैसाच इंद्र सर्व देवाचा ईश्वर असता महान् कष्टेकरून जाणता जाला. या प्रकारचे दुर्विज्ञयत्व सुचवावयाकरिता ही कथा श्रुति आरंभिते. अथवा ब्रह्मविद्येवाचून जैसा देवास जयादिकाचा अभिमान मिथ्या, तैसा संपूर्ण जीवास कर्तृत्व – भोक्तृत्वादिकाचा अभिमान मिथ्या होय. याजकरिता

**अवश्य ब्रह्म जाणलेच पाहिजे, हे सुचवावयाकारितां ही आख्यायिका. याजकरिता चहू विकल्पामध्ये मंदाधिकारि – विषइक सगुणब्रह्मउपासन जे प्रथम वर्णिले हाचि विकल्प मुख्य आणि तीन विकल्पाचा संभव आहे म्हणून भाष्यकार लिहितात. असो** आता मू. श्रुः—" **ब्रह्म ह देवेभ्यो विजिग्ये तस्य ह ब्रह्मणो विजये देवा अम हीयन्त । त ऐक्षन्तामस्माकमेवायं विजयोऽस्माकमेवायं महिमेति** " ॥ १४ ॥ **टीका**ः– या श्रुतिचा अर्थ वर्णिजेतोः पूर्वी वर्णिजेले ब्रह्म तेचि देवाचे संरक्षणार्थ जय पावले म्हणजे देव आणि असुर या दोघाचे संग्राम प्राप्त जाले असता, ईश्वर-आज्ञाभूत वर्णाश्रमधर्मरूप मर्यादा हाचि कोण्हिएक सेतु याचे भेदन करणारे आणि साधुजनास संकटासारिखे दुःख देणारे ऐसे जे असुर त्याजला जिंकून जगाचे स्थैर्यार्थ देवाकारणे जय स्वर्गप्राप्तिरूप फळही देते जाले. असो; हा ब्रह्मनिमित्तक जय असता आणि सर्वांतरयामि प्रत्यगात्मरूपे एक अद्वितीय परमात्मा जो त्याते न जाणून; आपणाते परिच्छिन्नत्वे मानून आपले देहद्वयबलेकरूनच म्या जिंकिले म्या जिंकिले ऐसे अग्न्यादि देव जे ते मानिते जाले. मू. श्रु. :..." **तद्धैषां विजज्ञौ तेभ्यो ह प्रादुर्बभूव** " **टीका**— तेव्हा देवावर अनुग्रह करावयासाठि आणि त्याजला असुरासारिखा देहाभिमान जाला तो घालवावयासाठि, ब्रह्म जे ते देवाचे दृष्टीस दिसावयाजोगे अकस्मात विस्मयरूपे प्रगट होते जाले. मू. श्रुः—**तन्न व्यजानत किमिदं यक्षमिति** ॥१५॥ ॥ २ ॥ **तेऽग्निमब्रुवञ्जातवेद एतद्विजानीहि किमेतद्यक्षमिति** ॥ १६ ॥ ३ ॥ **टीका**...त्या स्वरूपाते न जाणून, संपूर्ण देव जे ते आश्चर्याते पाउन, त्या स्वरूपाते जाणावयाकरिता आपणामध्यें अग्नीते तेजस्वी जाणून, त्याते संपूर्ण देव बोलते जाले की, हा आमचे अग्रभागी कोण यक्ष ह्म० पूज्य आहे, त्याचा शोध कर. मू. श्रु. :— " **तदभ्यद्रवत्तमभ्यवदत्कोऽसीत्यग्निर्वा अहमस्मीत्यब्रवीज्जातवेदा वा अहमस्मीति** ॥ १७ ॥ ४ ॥ **तस्मिंस्त्वयि किं वीर्यमित्यपीदं सर्वं दहेयं यदिदं पृथिव्यामिति** ॥ १८ ॥ ५ ॥ " **टीका**ः...मग अग्नि जो तो 'तथास्तु' ह्मणोन यक्षाप्रत पुसावयाकरिता जाऊन, त्याचे तेजप्रभावे भयाते पावून, न बोलता स्तब्धपणे उभा राहिला. त्या काळी यक्षरूपी ब्रह्म जे ते त्या अग्नीप्रति बोलते जाले की, 'तू कोण आहेस ?' मग तो अग्नि बोलतो, 'मी अग्नि आणि जातवेद ऐसा या उभयनामे प्रसिद्ध आहे.' या प्रकारे आपली श्लाघा करून बोलणारा अग्नि जो त्याप्रत ते ब्रह्म पुन्हा बोलते जे, "तुझे ठाई वीर्य ह्म० सामर्थ्य ते काय आहे ?" ऐसे ऐकून अग्नि बोलतो, "पृथिव्यादि

संपूर्ण जग त्याते मी जाळीन" मू. श्रु....“ **तस्मै तृणं निदधावेतद्दहेति तदुपप्रेयाय सर्वजवेन तन्न शशाक दग्धुं स तत एव निववृते नैतदशकं विज्ञातुं यदेतद्यक्षमिति ॥ १९ ॥ ६ ॥ " स्वदत्तां शक्तिमादृत्य दहेदं तृणमित्यमुमुवाचेशःसोऽपि दग्धुं न शशाकैव तत्तृणम् ॥ ८३ ॥** टीका...ऐसा अभिमानपूर्वक बोलणारा अग्नि जो त्यापुढे यक्षरूपि ब्रम्ह जे ते एक तृण ठेउन, बोलते जाले कीं 'तू या तृणाते जाळ, नाहीतर पृथिव्यादिकाला मी जाळणारा, हा अभिमान सोड." ऐसे ऐकून मग तो अग्नि संपूर्ण सामर्थ्य खर्चून मोठ्या वेगाने त्या तृणाते जाळू गेला, तव ते तृण जळालेनाही. मग परम लज्जित होउन, माघारि देवाप्रत जाऊन, बोलता जाला की, "तो यक्ष कोण आहे, हे मला समजत नाही." मू. श्रु. :- “ **अथ वायुमब्रुवन्वायवेतद्विजानीहि किमेतद्यक्षमिति तथेति ॥ २० ॥ ७ ॥ तदभ्यद्रवत्तमभ्यवदत्को ऽ सीति वायुर्वा अहमस्मीत्यब्रवीन्मातरिश्वावा अहमस्मीति ॥ २१ ॥ ८ ॥ तस्मिंस्त्वयि किं वीर्यमित्यपीदं सर्वमाददीय यदिदं पृथिव्यामिति ॥ २२ ॥ ९ ॥ तस्मै तृणं निदधावेतदादत्स्वेति तदुपप्रेयाय सर्वजवेन तन्न शशाकाऽऽदातुं सतत निववृते नैतदशकं विज्ञातुं यदेतद्यक्षमिति ॥ २३ ॥ १० ॥** " टीका :— अनंतर संपूर्ण देव वायुप्रत बोलते जाले की, " तू जाउन त्या यक्षाचा शोध कर." मग तो वायु जो तो त्या यक्षापासि जाउन, अग्निसारिखि उत्तरे प्रति-उत्तरे होउन, त्या तृणाते आपले सामर्थ्य खर्चून उडउ गेला; तव ते तृण जाग्याहून ईषतही हालले नाही. मग उडउन जाणार ते कोठुन ! मग तो मातारिश्वानामक प्रसिद्ध वायु जो तो परमलाज्जित होउन माघारि देवाप्रत जाऊन बोलता जाला की, ' तो यक्ष कोण आहे ते मजला समजत नाहीं. ' मू. श्रु. **अथेन्द्रमब्रुवन्मघवन्नेतद्विजानीहि किमेतद्यक्षमिति तथेति तदभ्यद्रवत्त स्मात्तिरोदधे ॥ २४॥ ११॥ सतस्मिन्नेवाऽऽकाशे स्त्रियमाजगाम बहुशोभमानामुमां हैमवतीं तां होवाच किमेतद्यक्षमिति ॥ २५ ॥ १२ ॥** " टीका...अनंतर संपूर्ण देव जे ते इंद्राते बोलते जाले की, ' तू आह्मा संपूर्णात बलवान आहेस, ह्मणून तुजला मघवान् ऐसे म्हणतात. तू जो तो आमचा परमेश्वर आहेस. याजकरिता हा यक्ष म्ह. परमपूज्यरूपि कोण आहे, याचा शोध कर." ऐसे ऐकून इंद्र जो तो 'तथास्तु' म्हणून त्या यक्षाप्रत जाता जाला. तव ते ब्रह्म जे ते हा इंद्र आला ऐशाते पाहून त्याचा इंद्रत्वअभिमान अतिशय सोडवावयासाठि तिरोधान म्ह. गुप्त होते जाले. इंद्राचा अभिमान कैसा सोडविला म्हणाल तरि—अग्नि आणि वायुसि ब्रह्मसांनिध्य होउन संवाद तरी जाला होता आणि

इंद्रासि संवादही जाला नाही. मग ब्रह्मसांनिध्य तरि कैचे ? तेव्हा त्या आकाशाचे ठाई ब्रह्म जेथे अंतर्धान पावले त्याच आकाशप्रदेशाचे ठाइ राहुन इंद्र जो तो यक्षरूपी ब्रह्माचे ध्यान करून राहिला. अग्न्यादिकासारिखा माघारा परतला नाही. तेव्हा ब्रह्माचे ठाई इंद्राचि परमभक्ति जाणून, मूर्तिमती ब्रह्मविद्या उमानामक स्त्री प्रगट होती जालि. ती कैसी म्हणाल तरि— हेमअळंकारवती अथवा हिमाचलाची कन्याच की काय ऐसी प्रगटति जाली. ती नित्य ईश्वरासह वर्तणारी ऐसीते जाणून इंद्र जो तो समीप जाऊन तीजप्रत बोलता जाला की, “ यक्षरूप पूज्यरूपे आह्मास दर्शन देऊन तिरोधान पावले, हे कोण आहे ? ” ऐसे विचारिता जाला. ॥ इति तृतीयः खण्डः ॥ अथ चतुर्थखण्डप्रारंभः ॥आता, मू. श्रु.:—**सा ब्रह्मेति होवाच ब्रह्मणो वा एतद्विजये महीयध्वमिति ततो हैव विदांचकार ब्रह्मेति ॥ २६ ॥ १॥** टीका:—ब्रह्मविद्यारुपिणि मूर्तिमंत उमा जे ते इंद्राप्रत उत्तर देते की, “ ते ब्रह्म होय; तेंचि ईश्वररूपे प्रगट जाले होते; संपूर्ण त्याचा विजय आणि महिमा ह्म. महत्व असता तुह्मी निमित्तमात्र असून, अज्ञानास्तव आपला जय आणि महत्व मानिते जालेत.” हे श्रवण करून इंद्र जो तो गलित-अभिमान होत्साता, अवघा जय आणि महिमा ईश्वराचाचि होय ऐसे मानून, ब्रह्मस्वरूपाते जाणता जाला. मू. श्रु.:—“**तस्माद्वा एते देवा अतिरामिवान्यान्देवान्यदग्निर्वायुरिन्द्रस्ते ह्येनन्नेदिष्ठं पस्पृशुस्ते ह्येनत्प्रथमो विदांचकार ब्रह्मेति ॥ २७ ॥ २ ॥** ” **टीका**:—अग्नि, वायु आणि इंद्र या तिघासि सगुण ब्रह्माचे दर्शनसंभाषणध्यान होते जाले; म्हणून वरकड देवापेक्षा पराक्रमादि महान्गुणभाग्येकरून श्रेष्ठत्वाते पावते जाले. मू. श्रुः—“ **तस्माद्वा इंद्रोऽतितरामिवान्यान्देवान्सह्येनन्नेदिष्ठं पस्पर्श न ह्येनत्प्रथमो विदांचकार ब्रह्मेति २८ ॥ ३ ॥** ” **टीका**:—आणि या तिघातील इंद्र जो त्यास ब्रह्मविद्यारुपिणि उमा जे तिजपासून साक्षात उपदेश जाला. ह्मणून अग्नि आणि वायु या उभयाहून तो श्रेष्ठ होय. मू. श्रु.:—“ **तस्यैष आदेशो यदेतद्विद्युतो व्यद्युतदा ३ इती न्यमीषदा ३ इत्यधिदैवतम् ॥ २९ ॥ ४ ॥** ” **टीका**:—आता पूर्वी वर्णिजेले सगुण ब्रह्म त्यास तरी उपमा नाहीच; परंतु श्रुती जे ते उपमा देउन आदेशः ह्म० उपदेश करिते की, विद्युल्लतेचे तेजापरि ते सगुण ब्रह्म होय अथवा विद्युल्लतेसही तेजस्वित्व जास्त आहे. आणि दुसरा उपदेश जो न्यमीमिषत् ह्म० चक्षुला विषयाप्रति निमिषोन्मेषेकरून प्रकाशतिरोभवाचेपरि सगुण ब्रह्म जे ते इंद्रादि देवाप्रत दिसून न दिसते जाले. येणेकरून एके क्षणांत संपूर्ण जगताचे उत्पत्तिस्थितिलय करणे

हे सामर्थ्य परमेश्वरास आहे, हे सुचविले. येथपर्यंत अधिदैवज्ञान संपले. मू. श्रु.- "अथाध्यात्मं यदेतद्गच्छतीव च मनोनेन चैतदुपस्मरत्यभीक्ष्णं संकल्पः ।३०।५।" टीकाः—आता, अध्यात्म ह्म०देहद्वयउपाधिविशिष्ट प्रत्यगात्मविषय श्रुती जे ते आदेश ह्म० उपदेश करिती की, पूर्वी ज्योतिरूप सांगितले सगुणब्रह्म त्याजप्रत माझे मन गमन करिते, ऐसे चिंतन करावे आणि मनाचे वारंवार जे संकल्प होतात, ते सगुण ब्रह्माचे समीप जाउन, साधकजन जो तो मनाने स्मरतो ते काय ह्मणून ह्मटले असता, मनोपाधि आहे म्हणून आणि प्रत्ययेकरून ब्रह्म विषयी कल्याचे परि आहे ह्मणून. या प्रकारे जो ध्यान करितो त्याजला प्रत्यगात्मा अभिव्यक्त होतो ह्म० प्रगट होतो. म्हणून याजला अध्यात्म उपदेश म्हणतात. या प्रकारचे अधिदैवोपाधि आणि अध्यात्मोपाधिविशिष्टाचे ब्रह्म मंदाधिकारि यास गम्य आहे. निरुपाधिक ब्रह्म मंदाधिकारि यास गम्य नव्हे. मू. श्रु. तद्ध तद्वनं नाम तद्वनमित्युपासितव्यं स य एतदेवं वेदाभिहैनं सर्वाणि भूतानि संवाञ्छन्ति ॥ ३१ ॥ ६ ॥ टीकाः—आणि ते सगुण ब्रम्ह प्रत्यगात्मत्वेकरून वननीयं ह्म० सम्यक् भजनीय आहे ह्मणून त्याजला 'वन' ऐसे नाम प्रसिद्ध आहे. या सगुणब्रह्माचे तेजत्वेकरून रूप आणि वन ऐसे नामेकरून विशिष्ट उपासन निरंतर जो करितो, त्याजला संपूर्ण प्राणिमात्र जे ते संवाञ्छन्ति ह्मणजे ईश्वरासारिखे प्रार्थितात ह्म० मानितात- मू. श्रु.:-उपनिषदं भो ब्रूहीत्युक्ता त उपनिषद् ब्राह्मीं वावत उपनिषदमब्रूमेति ॥३२॥ ७ ॥' टीकाः-ऐसे सगुण ब्रह्म उपासनेचे फळ ऐकून या फळाविषयी विरक्त आणि उत्तमाधिकारि जो तो श्रीगुरुप्रति पुसतो भो भगवान्! आहो गुरु! मुख्य उपनिषद्रहस्य चिंतनीय ते मजप्रत सांगावे. ऐसा प्रश्न अयकून आता श्रीगुरु बोलतात, रे शिष्या! प्रथमद्वितीय खंडाचे ठाई उपनिषद्रहस्य तुजला सांगितले आहे, ते कोणते ह्मणशील तरि निर्गुण, निर्विशेष, अखंडैकरस, अनंत, ब्रह्मीभूमाख्य स्वरूपवस्तु हे उपनिषद्रहस्य होय. यापरते आता काही सांगणे राहिले नाहीं. मू० श्रु०:—'तस्मै तपोदमः कर्मेति प्रतिष्ठा वेदाः सर्वाङ्गानि सत्यमायतनम् ॥ ३३ ॥ ८ ॥' टीकाः—आता ब्रह्मविद्याप्राप्तीचे उपायभूत साधने श्रुति सांगते. 'तप' ह्मणजे काय, इंद्रियमनाचे समाधान. 'दम' ह्म० सर्वव्यापार उपरम अथवा संन्यास. 'कर्म' ह्म० अग्निहोत्रादि. हे तिही साधने 'प्रतिष्ठा' ह्म० ब्रह्मविद्येच्या पायासारिखे होत. आणि शिक्षाकल्पादि षडंगसहित जे चारि वेद ते ब्रह्मविद्येच्या इतर अंगासारिखे होत. आणि 'सत्य' ह्म० कायावाचामनेकरून कपटरहित असणे जे ते ब्रह्मविद्येचे अयतन ह्म० स्थीर

राहावयाचे स्थानासारिखे होय. अर्थात् कपटी पुरुषाचे ठाई ब्रह्मविद्या राहतच नाही. ऐसे साधन निरुपिले. आता, पूर्वी निर्गुण ब्रह्मविद्येचे फळ—' **अमृतत्वं हि विन्दत इति** ' या वाक्येंकरून सांगितले तरी या खंडचतुष्टयात्मक केनोपनिषदाचे ठाई प्रतिपाद्य निर्गुणसगुणब्रह्मस्वरूप जाणणाराला फळ काय येते ते निर्धारण करून सांगतात. मू० श्रु०:—'**यो वा एतामेवं वेदापहत्य पाप्मानमनन्ते स्वर्गे लोके ज्येये प्रतितिष्ठति प्रतितिष्ठति ॥ ३४ ॥** ९ ॥ ' टीका:—ही महाभाग्यवती ब्रह्मविद्या जे तीते श्रीगुरुचरणप्रसादेंकरून जो जाणतो, तो पुरुष जन्ममरणप्रवाहरूप संसाराप्रत बीजभूत अविद्याकामकर्मलक्षण जे पाप त्याचा नाश करून अनंतपद-सूचित स्वर्ग ह्म० त्रिविष्टपाहून व्यतिरिक्त जे अपारावार सुखस्वरूप ब्रह्माचे ठाई ब्रह्मरूपेंकरून 'प्रतितिष्ठति' प्रतितिष्ठति ह्म० देहपाताचे पूर्वि जीवन्मुक्तीकाळी सम्यक्दर्शी ज्ञानी जो तो केवळब्रह्मी ब्रह्मरूपेंकरून आहेच आणखिही विदेहकैवल्यकाळी, निर्गुण, निर्विशेष, निरंजनस्वरूप ब्रह्मरूपेच राहातो, हा भाव. पुनः, संसारास येत नाही. यास प्रमाण अन्योपनिषदीचि श्रुतिः—' **न स पुनरावर्तते न स पुनरावर्तते इति** ' आणि ' **यद्गत्वा न निवर्न्तते** ' ऐसे भगवद्वाक्य स्मृति आहे ॥ इति चतुर्थखण्डः समाप्तः इति केनोपनिषदीयश्रीमच्छंकरपदभाष्यानुसारव्याख्यानं वेदान्तवज्रनामकं श्रीमद्गोदातीरजनस्थाननिवास्यखिलब्रह्मनिष्ठचक्रवर्तीसम्राट्श्रीरघुनाथसद्गुरोः शिष्येण निरंजनाख्येन स्वानुभवदृढीकरणाय च परं ब्रह्मजिज्ञासोस्तत्वनिर्धारणाय प्रारंभितं। तत् श्रीदत्तात्रेयप्रसादेन समाप्तिं गतम् ॥ श्रीसद्गुरुनाथार्पणमस्तु ॥ श्रीदत्तात्रेयरघुनाथनिरंजनार्पणमस्तु शके १७८० कालयुक्तनामसंवत्सरे श्रावणमासे इदं पुस्तकं समाप्तम् ॥ श्रीगुरुदत्त ॥ श्रावणकृष्ण ॥ ८ ॥

॥ श्रीदिगंबरार्पणमस्तु ॥

॥ श्रीराम ॥

## निरंजनशिष्य जगन्नाथकृत

# महावाक्य-टीका.



श्रीगणेशाय नमः । ॐ नमो जी ऋषिश्वरा । आत्मविवेकदातारा । अपारकृपाजळधरा । बोलविसी ते बोलेन ॥ १ ॥ श्लोकः—**नत्वा श्रीभारतीतीर्थविद्यारण्यमुनीश्वरौ। महावाक्यविवेकस्य कुर्वे व्याख्यां समासतः ॥१॥** भारतीतीर्थ विद्यारण्यस्वामीस नमस्कार करून महावाक्यविवेकाची व्याख्या संक्षेपे करीजेते. मुमुक्षु पुरुषाकारणे मोक्षास कारण जे ब्रह्म, तोचि आत्मा होय हे जाणावे. या जाणावयासाठी प्रसिद्ध जी चार महावाक्ये त्याचा अर्थ क्रमेकरून निरोपित होत्साते, परमकृपाळु विद्यारण्ययतीश्वर जे ते प्रथमारंभी ऐतरेय आरण्यक उपनिषद जे त्या उपनिषदि 'प्रज्ञानं ब्रह्म' ऐसे महावाक्य जे त्याचा अर्थ सांगताहेत. श्लोकः—**येनेक्षते शृणोतीदं जिघ्रति व्याकरोति च । स्वाद्वस्वादु विजानाति तत्प्रज्ञानमुदीरितम् ॥ १ ॥'** टीकाः—नेत्रावाटे निघाली जे अंतःकरण वृत्ति ते वृत्ति चैतन्यसहित असता, त्या चैतन्येकरून सकळ रूपादीक पदार्थ दिसतात; त्या रूपाते पाहाणार जे त्यास प्रज्ञान ह्मणावे. तैसेच कानावाटे निघते जे अंतःकरण-वृत्तिचैतन्यसहित ते शब्दमात्राते ऐकते ते प्रज्ञान ह्मणावे. त्या प्रकारेच नाकावाटे निघती जे अंतःकरणाचि वृत्ति चैतन्यसहित सर्व गंधाचे ग्रहण करिते जे ते प्रज्ञान ह्मणावे. यारितीच वागींद्रियावाटे शब्दजात बोलते आणि रसनेंद्रिय द्वारा निर्गत अंतःकरण–वृत्ति चैतन्यसहित जे गोडकडूखारटादीक जाणते ते प्रज्ञान ह्मणावे. तसीच जे अन्य इंद्रिये बोलिजेली आणि बोलता राहिली, त्या सर्वेंद्रिय अंतःकरणवृत्तिउपाधीयोगे जे चैतन्य सकळेंद्रियव्यापार प्रवर्तिते, जाणते, ते प्रज्ञान म्हणावे ॥ १ ॥ आता ब्रम्ह शब्दाचा अर्थ बोलताहेत. श्लोकः–'**चतुर्मुखेंद्रदेवेषु मनुष्याश्वगवादिषु ॥ चैतन्यमेकं ब्रह्मातः प्रज्ञानं ब्रह्ममय्यपि ॥ २ ॥** टीकाः—चतुर्मुख, विष्णु, शंकर, प्रजापति, मनु, सनत्कुमारादिक ऋषि आणि इंद्रादिक संपूर्ण देव जे ऐसे उत्तम देहधारी आणि अश्व, गाई, व्याघ्र, हस्ति, पक्षी आदिकरून अधमजन्मे जे या सर्वांचे ठाई आणि मनुष्य, राजे, रंक, ब्राह्मणादिक वर्ण अंत्यजपर्यंत ऐसे मध्यम-

देहधारी जे त्याचे ठाई आणि आकाश, वायु, अग्नि, आप, पृथिवी याचे ठाई जे चैतन्य आहे आणि संपूर्ण जगाचा जन्मास हेतूभूत जे चैतन्य आणि सर्वाठाई भरून पुष्कळ भूमा, अनंतस्वरूपें उरले असे जे त्यास ब्रह्म ह्मणावे. तीच वस्तु उत्तम देवादिकाचे ठाई आणि अश्वगवादिकाचे ठाई आणि मनुष्यमात्राचे ठाई आणि पंच महाभूताचे ठाई आणि जगज्जन्मास हेतूभूत ईश्वर जो याचे ठाई भरून पुष्कळपणें जे उरले आहे ते ब्रह्म होय. ऐसा ब्रह्मपदाचा अर्थ सांगितला. आता वाक्यार्थ सांगतात. पहिले श्लोकि प्रज्ञान शद्वाचा अर्थ सांगितला. दुसरिया श्लोकि ब्रम्ह शद्वाचा अर्थ आणि प्रज्ञान जे ते ब्रम्ह होय ऐसे सांगितले. ऐसे ब्रम्ह जे ते प्रज्ञानपणे करून सर्व प्राणिमात्राचे ठाई आहे. तरि सर्वामध्यें मीही आहे. तेव्हा ब्रम्हवस्तु जे ते प्रज्ञानरूपत्वे माझे ठाईहि आहे म्हणोन मीहि ब्रम्हच होय. याप्रकारे ऋग्वेदीचे महावाक्य जे त्याचा अर्थ निरूपिला. आता, यजुर्वेदीचे महावाक्य बृहदारण्यउपानीषदि ' अहंब्रह्मास्मि ' आहे त्याचा अर्थ सांगतात. त्यात ' अहं शद्वाचा अर्थ आधि सांगताहेत. श्लोकः— "परिपूर्णः परमात्मास्मिन् देहे विद्याधिकारिणि ॥ बुधैःसाक्षितया स्थित्वा स्फुरन्नहमितीर्यते ॥ ३ ॥" टीकाः—परिपूर्ण ब्रह्म जे देशेकरून, कालेकरून, वस्तुभेदेकरून खंडले नाही त्यास पूर्ण परमात्मा म्हणावे. तो परमात्मा जो त्याचे मायेकरून काल्पित जे हे जग, या जगामध्ये ज्ञानाचे अधिकारि ऐसे जे नरशरीर याचे ठाई अधिकारि शरीर म्हणजे शम--दम- तितिक्षा--उपरति -श्रद्धा--आस्तिक्य-- आदिकरून साधने जी, त्या साधनेकरून संपन्न होत्साते आत्मविद्या संपादनास योग्य जे देह, या देही श्रवण–मनन–निदिध्यासन घडेल, ऐशा शरीरास अधिकारी शरीर म्हणावे. या अधिकारि शरीरि बुद्धिसहित सत्रा कळाचे लिंगशरीर जे, त्या सूक्ष्म शरीराचे साक्षित्वेकरून शरीरि राहुन प्रकाशतो जो त्यास 'अहं' ऐसे बोलिजे. आता 'ब्रह्म' शब्दाचा अर्थ दाखविताहेत. श्लोकः— "स्वतःपूर्णः परात्मात्र ब्रह्मशब्देन वर्णितः अस्मीत्यैक्यपरामर्शस्तेन ब्रह्म भवाम्यहम् ॥ ४ ॥" टीकाः— स्वभाविकरून जो परिपूर्ण, देश--काल--वस्तू--करून जास्त परिच्छेद नाही, ऐसा जो परमात्मा, जो मागिले श्लोकि वार्णिला, तोचि हा, या महावाक्याचे ठाई 'ब्रह्म' शब्देकरून बोलिजेला. आता लक्षणेकरुन ब्रह्म जे त्यासि आणि अहंकारासि 'अस्मि' या पदेकरून ऐक्य करताहेत. अहं प्रत्यय आलंबनेकरून वार्णिला जो पारमार्थिक जीव तणे अखिलशक्तीसंबंधरहित शुद्ध ब्रह्म जे त्याचा ऐक्यानुभव घेउन मी ब्रह्म होय, ऐसे जाणावे. आता, छांदोग्योपनिषदीचे "तत्त्वमसि"

महावाक्य जे त्याचा अर्थ सांगावयासाठि प्रथम तत्पद जे त्याचा लक्षार्थ बोलताहेत. श्लोकः— "**एकमेवाद्वितीयं सन्नामरूपविवर्जितम् ॥ सृष्टेः पुराधुनाप्यस्य तादृक्त्वं तदितीर्यते** ॥ ५ ॥" टीकाः— तत्पदलक्ष जे ते येरिती जाणावे :— येकचि अद्वितीय ऐसे नामरूपेकरून रहित केवलस्वरूप जे, जाचे ठाई सजातीयविजातीय स्वगतभेद नाहीत म्हणोन श्रुति बोलत्ये— "**सदेव सोम्येदमग्र आसीदेकमेवाद्वितीयमिति**" सृष्टि जाहलि नव्हति तेव्हां स्वगतादि भेदरहित आणि नामरूपविवर्जित ऐशि जे वस्तु, तीच वस्तु आता सृष्टीउत्तरकाळीही तैसीच नामरूपरहित अद्वितीयरूपे करूनच आहे; त्यास तत्पदलक्ष ऐसे म्हणावे. ॥ ५ ॥ आता 'त्वं' पदाचा अर्थ सांगतात, श्लोकः— "**श्रोतुर्देहेंद्रियातीतं वस्त्वत्र त्वंपदेरितम् ॥ एकता ग्राह्यतेसीति तदैक्यमनुभूयते** ॥ ६ ॥" टीकाः—जो श्रोता श्रवण-मनन-निदिध्यासन ऐसे अनुष्ठान कर्ता आणि वाक्यार्थाचा संपादनकर्ता जो पुरुष, याचे देहेंद्रियातीत आणि देहेंद्रियेकरून उपलक्षित आणि स्थुळादि देहत्रयसाक्षित्वेकरून वर्तणारे आणि त्या देहत्रयाहून विलक्षण सद्वस्तुरूपे अचल राहाणारे देहाचे गमन जाहाले असता, देहाबरोबर जात नाहि ये विषयि अमृतबिंदुउपनिषदीचे वाक्य— "**घटसंवृत्तमाकाशं नीयमाने घटे यथा ॥ घटो नीयेतमाकाशं तद्वज्जीवो नभोपमः** ॥श्रु.॥" जैसा घट नेला असता, घटातील आकाश जात नाही; तैसे देहत्रय गेले असता त्याजबरोबर अंतरात्मा जात येत नाही. तो सदंश सद्वस्तुरूपेच अचलकूटस्थत्वेच राहातो, हे त्वंपदलक्ष ऐसे जाणावे. आता, या वाक्याचे ठाई 'असि' पद जे बोलिले ते तत्पद आणि त्वंपद या दोहीचे ऐक्य जाणावे म्हणजे 'तत् त्वं असि' या पदत्रयाचा अर्थ सिद्ध जाहाला. ॥ ६ ॥ आता अथर्वणवेदी "**अयमात्मा ब्रह्म**" ऐसे महावाक्य जे त्याचा अर्थ बोलताहेत. या वाक्यांत 'अयं' आणि 'आत्मा' या दोपदेकरून बोलिला जो त्वंपदलक्षार्थ याचि व्याख्या करिजेते. श्लोकः—'**स्वप्रकाशापरोक्षत्वमयामित्युक्तितो मतम् । अहंकारादिदेहान्तात्प्रत्यगात्मेति गीयते** ॥ ७ ॥ टीकाः—'स्वप्रकाश' आणि 'अपरोक्ष' या दोपदाचा अर्थ करिजेतो. प्रत्यगात्मा जो तो स्वप्रकाशेकरून नित्य अपरोक्ष आहे हे संपूर्णास अभिमत आहे. जे न दिसे आदृष्टासारिखे त्यास परोक्ष म्हणावे. ऐसा प्रत्यगात्मा नव्हे, का जो नित्य अपरोक्ष आहे म्हणून. आणि घटादिक पदार्थ हे चक्षुरादिक इंद्रियेकरून प्रत्यक्ष दिसतात; परंतु ते घटादिकाचे प्रत्यक्ष होणें दृश्य होय. तैसा प्रत्यगात्मा दृश्यासारिखा नव्हे का जो अदृश्य आणि

नित्य अपरोक्ष आहे म्हणोन. अंतःकरणादिक आत्मप्रकाशेकरून प्रकाशित होतात; तैसा आत्मा परप्रकाश नव्हे, स्वप्रकाश होय. आणखी अहंकार, प्राण, मन, इंद्रिये, देह याचा अभ्यंतरि अधिष्ठानत्वेकरून आहे ह्मणोन त्यास प्रत्यगात्मा ह्मणावे. आता 'ब्रह्म' शद्वाचा अर्थ सांगतात. श्लोकः—'**दृश्यमानस्य सर्वस्य जगतस्तत्वमीर्यते । ब्रह्मशब्देन तद् ब्रह्म स्वप्रकाशात्मरूपकम्** ॥ ८ ॥' टीकाः—रज्जूसर्पाचेपरि लटकेच माइक आकाशादि संपूर्ण हे जगत्, याचे तत्व म्हणजे वास्तविक अधिष्ठानभूत भूमा अनंतस्वरूप जे ब्रम्ह, तेच या महावाक्याचे ठाई ब्रम्हशब्देकरून बोलिजेते. अन्यत्र वेदादिकाचे ठाई ब्रम्ह शब्दाचा प्रयोग आहे; परंतु ते वेदादीक येथे गृहीत नाहीत. कारण जे, ब्रम्ह प्रकाशेकरून ते वेद आणि विष्णु विरंच्यादि आणि चंद्रसूर्य अग्नि आदि देहे संपूर्ण ब्रम्हवस्तुयोगे प्रकाशीत होतात; परंतु ते वेदादीक ब्रम्हवस्तुते प्रकाशीत करीत नाहींत. सचिन्मात्र ब्रम्हवस्तु जे ते स्वप्रकाश आहे. तेच स्वप्रकाश प्रत्यगात्मरूप होय, ऐसे बाधासामानाधिकरण्ये करून ऐक्य जाणावे. ह्मणजे संपूर्ण शक्त्यादि स्थावरजंगमांत जगताचा बाध करून सचिन्मात्र ब्रह्मचि सत्य होय ऐसे जाणावे. ॥ ८ ॥ आता चहुवेदाचि महावाक्य जे ती जीवब्रह्मऐक्याते सांगतात. आणि सद्गुरु जो तेणेहि या महावाक्यानुसारे जिज्ञासु शिष्य जो त्यास युक्तिने बोधन करून केवल ब्रह्मवस्तु जे ते चर्मवृत्तिने त्याच्या प्रत्ययास आणून द्यावी म्हणजे तो शिष्यहि मी ब्रह्म होय ऐसे अनुभउन निरतिशयानंदाते पावतो आणि जिवंत असताचि आपणाते जिवन्मुक्तत्वे आणि विदेहिमुक्तत्वेकरून पाहातो. आता, चहुवेदाचि चार महावाक्ये जी त्याचि एकवाक्यता ती ऐशिः– प्रथम– ऋग्वेदीचे महावाक्य, "**प्रज्ञानं ब्रह्म**" 'प्रज्ञान' शब्देकरून जीवात्मा आणि 'ब्रह्म' शब्देकरून परमात्मा या उभयाचे ऐक्य सांगितले. यजुर्वेदचिे महावाक्य, '**अहं ब्रह्मास्मि.**' 'अहं' या शब्देकरून जीवात्मा आणि 'ब्रह्म' या शब्देकरून परमात्मा या उभयाचे ऐक्य सांगितले. सामवेदीचे महावाक्य, '**तत्वमसि.**' 'त्वं' शब्देकरून जीवात्मा आणि 'तत् शब्देकरून परमात्मा या उभयाचे ऐक्य सांगितले. अथर्वण वेदीचे महावाक्य, '**अयमात्मा ब्रह्म**'. 'अयमात्मा' या शब्देकरून जीवात्मा आणि 'ब्रह्म' या शब्दे करून परमात्मा या उभयाचे ऐक्य सांगितले. सारांश, या चहुवेदीचा महावाक्याचा अर्थ की, 'मी ब्रह्म होय' हें या महावाक्याप्रकर्णि विशद करून बोलिजेले.

ओवीः– ऋषीश्वरपदसरोजी ॥ महावाक्याचा समाजी ॥ रिघोनि बोलिलि माझि ॥ वाणि ते म्या अर्पिली ॥ १ ॥ ऋषिअज्ञा अनुमोदे ॥ महावाक्यवर्णनछंदे ॥ जगन्नाथाचि निमालि द्वंद्वे ॥ परमानंदे राहिला ॥२॥ रघुनाथ सद्गुरु जनस्थानवासि ॥ तयाचा अनुग्रह निरंजनासि ॥ तेणे प्रकर्ण शोधिले स्वानुभवेसि ॥ मुमुक्षु जना पाहावया ॥ ३ ॥ जैसे द्रव्येकरून जोसपूर ॥ तेणे शिवालयाचा जीर्णोधार ॥ करिजे तैसे प्रकर्णपरिकर ॥ शोधोनि नीट केले हे ॥ ४ ॥ इति श्रीमद्विद्यारण्यविरचितं पंचदशीमहावाक्यप्रकर्णं संपूर्णमस्तु ॥ श्रीदत्तात्रेय रघुनाथ निरंजनार्पणमस्तु ॥ शके १७८० कालयुक्तनाम संवत्सरे ॥

॥ श्रीदिगंबरार्पणमस्तु ॥

---

# पूर्वीं प्रसिद्ध जाहलेलीं प्रकरणें.

॥ श्री ॥

## निरंजनरघुनाथकृत

# केशवचैतन्यकथातरु.

### अध्याय पहिला.

जयजया जी मंगलमूर्ति । त्रैलोक्यपावन जयाची कीर्ति । देवासुरमानव वर्णिती । विघ्नसमाप्ती व्हावया. ॥ १ ॥ परमात्मा जो प्रकृतिपर । तो विनायकरूपें धरिला अवतार । तयाचें नाम विघ्नहर । देव यास्तव ठेविती. ॥ २ ॥ ब्रह्मयानें सिंदुरासुरासी । वर दिधला अविनाशी । आलिंगन देशील जयासी । तो नाशासि पावेल पैं. ॥ ३ ॥ ऐसें होतांचि वरदान । तेणें ब्रह्मयावरि केलें प्रस्थान । पुढें ब्रह्मा मागें आपण । सिंदुरासुर लागला. ॥ ४ ॥ तेव्हां संपूर्ण देवें तुज प्रार्थिलें । सिंदुरासुरासि वधावया वहिलें । गजाननरूप धारण केलें । पार्वतीचे उदरासीं. ॥ ५ ॥ चतुर्भुजव्यक्ति गौरवर्ण । शुंडादंड लंबायमान । शूर्पाकृति शोभति कर्ण । भाळ विशाळ नेटकें. ॥ ६ ॥ नेत्र आरक्त जैसे हिरे । वक्र-तुंड अति साजिरें । मुगुटावरि खोंविले तुरे । दूर्वांकुरांचे लसलसित. ॥ ७ ॥ एकदंत करी झळाळा । गळां नवरत्नांच्या माळा । पीतांबर वेष्टिला पिंवळा । भाळीं कस्तूरीतिलक. ॥ ८ ॥ सर्वांगीं चर्चिला सेंदूर । कटीतटीं मेखळा फणीवर । रत्नखचित कटकें केयूर । रक्तांबर विलसतसे. ॥ ९ ॥ फरश पाशांकुश रदन । हस्तीं आयुधें शोभायमान । विशाळ दोंद मूषक वहन । गौरिनंदन शोभतसे ॥ १० ॥ ऐसा गणपति देवें वंदिला । जेणें सिंदुरासुर वधिला । तो म्यां आरंभीं स्तवियेला । ग्रंथसिद्धि

पावावया. ॥ ११ ॥ मूळमाया जे चिच्छक्ति । ती हे शारदा सरस्वती । हंसवाहन पुस्तक हातीं । वीणावादन करितसे. ॥ १२ ॥ चवदा विद्या चौसष्टि कळा । जिचे ठायीं वसती सकळा । वागेश्वरी ब्रह्मबाळा । ग्रंथारंभीं वंदिली. ॥ १३ ॥ आतां वंदू श्रीसद्गुरु । जो या भवसागरिंचा तारुं । मोक्षदाता कल्पतरु । अति उदारु सर्वार्थी. ॥ १४ ॥ जनस्थान गोदातीरनिवासी । रघुनाथ नामें आनंदरासी । जेणें विज्ञान बोधोनि मजसी । निरंजन नाम ठेवियेलें. ॥ १५ ॥ जो योगींद्रचक्रवर्ति । लोकत्रयीं जयाची कीर्ति । शांतिक्षमेची केवळ मूर्ति । लोकोद्धारा प्रगटली. ॥ १६ ॥ श्रीदत्तात्रयसाक्षात्कार । व्हावया मजसीं जयाचा वर । तयासी माझा नमस्कार । ग्रंथारंभीं असो हा. ॥ १७ ॥ आतां वंदूं संत सज्जन । जे सच्चिदानंद स्वयें आपण । असोनि उद्धरिती जन । कृपानिधान दयाळ. ॥ १८ ॥ श्रीपरमात्मा जगद्गुरु । जगदाधिष्ठान परात्परु । तया करूनि नमस्कारू । ग्रंथारंभ करितसे. ॥ १९ ॥ जो ब्रम्हरूपें जग अवतारी । विष्णुरूपें पालन करी । रुद्ररूपें सकळ हारी । पुनरपि तें रचावया. ॥ २० ॥ श्रीविष्णू जो वैकुंठवासी । तो चतुश्लोके ब्रह्मयासी । भागवतमिसें उपदेशी । आत्मतत्वालागीं पैं. ॥ २१ ॥ ब्रह्मयानें नारदा कथिलें । नारदें व्यासासि बोधिलें । पुढें कलियुग प्राप्त जालें । तंव शिष्य न मिळे अधिकारी. ॥ २२ ॥ व्यास चिंतिती मानसीं, । 'जें सर्वसुखाची राशी । तें आत्मतत्त्व कोणासी । सांगू आतां या काळीं ?' ॥ २३ ॥ तंव राघव नामें द्विजसत्तम । जो उत्तमामाजी उत्तम । अनुष्ठानांतीं अति निःसीम । व्रतालागीं आचरे. ॥ २४ ॥ उत्तमनाम नगरी । मांडवी पुष्पावतीचे तीरीं । राहोनियां बहुकाळवरी । तप आचरता जाहला. ॥ २५ ॥ व्हावें व्यासांचें दर्शन । होचि इच्छा धरुनी पूर्ण । वातांबु पर्णाशन । करुनि देह शुष्क केला. ॥ २६ ॥ जाल्या नखांच्या चुंबळी । आंगावरी वाढली धुळी । जटा लोंबती भूतळीं । देह शुष्क जाहला. ॥ २७ ॥ तंव सत्यवतीहृदयनंदन । श्रीव्यास येऊनि आपण । देऊनियां अभयदान । मस्तकीं हस्त ठेविला. ॥ २८ ॥ जो तत्त्वज्ञानाचा उपाय । **'नमो भगवते वासुदेवाय'** । प्रणवयुक्त हा मंत्रराय । कर्णामाजीं सांगितला. ॥ २९ ॥ परमहंसदीक्षा देऊन । बोधिते जाले तत्त्वज्ञान । तेणें मूळ अविद्या निरसुन । परमानंद जाहला. ॥ ३० ॥ उठले अष्ट सात्त्विक भाव । चंचळ मनाची मोडली धांव ।

कल्पनेनें सांडिली हांव । ब्रह्मवस्तु अनुभवितां. ॥ ३१ ॥ अष्टांगयोगाच्या कळा । द्वैपायनें कथिल्या सकळा । अगोचरी मुद्रा डोळां । आखंडित बाणली. ॥ ३२ ॥ मावळोनि गेली बुद्धि । जाली निर्विकल्प समाधि । गेल्या सर्वही आधिव्याधी । सुखसमृद्धि जालिया. ॥ ३३ ॥ मग जयजयकार बोलुन । केलें श्रीगुरूचें स्तवन । करूनियां साष्टांग वंदन । चरणीं मस्तक ठेविला. ॥ ३४ ॥ शिष्य पाहुनी परम धन्य । नाम ठेविलें राघवचैतन्य । संपूर्ण जगीं होशिल ( मान्य ) । ऐसा वर दिधला. ॥ ३५ ॥ व्यास निजाश्रमीं गेल्यावरी । राघवचैतन्य त्या वनामाझारी । व्याघ्रादिक नाना वनचरीं । वसते जाले निर्भयें. ॥ ३६ ॥ तें स्थान अति गहन । अनेक जातींचे पक्षीगण । नानावृक्षांचें निबिड वन । चिंचिनी आम्र असती. ॥३७॥ स्वस्तिकादि नाना आसनें । नित्य करावीं निश्चळपणें । पूरक कुंभक रेचन । प्राणायाम करावा. ॥ ३८ ॥ जालंदर आणि उडयान । तिसरा मूलबंध जाण । अपानातें ऊर्ध्व करून । अधोगमन प्राणाचे. ॥३९॥ करूनि कुंडलनीप्रबोध. । सुषुम्नेचा शोधिला मार्ग । कर्णी अनुहाताचा शब्द । श्रवण करित असावा. ॥ ४० ॥ नासिकांतरीं वाहे श्वास । नित्य सहस्रदळीं सहवास । ज्ञानी पद अविनाश । जया ह्मणती. ॥ ४१ ॥ सर्वदां असावे निवृत्ति । भूतमात्रीं समान स्थिति । आंगावरी सर्प पक्षी बैसती । निर्भयत्वें येऊनि ॥ ४२ ॥ अष्ट महासिद्धींचा पाळा । भोंवता होऊनि गोळा । आज्ञा मागती वेळो वेळां । स्वामीलागीं प्रार्थुनी. ॥ ४३ ॥ धैर्याचा मेरू अचळ । अंगीं वैराग्याचें बळ । कदाचित् प्राशन करावें जळ । अन्न न खावें सर्वथा. ॥ ४४ ॥ एकमासपर्यंत एका वृक्षीं । द्वितीयमासीं दुसरे वृक्षीं । उडोनि जातो जैसा पक्षी । तैसें जावें निजांगें. ॥ ४५ ॥ नग्नवृत्ति दिगंबर । शयन करावें वृक्षांवर । एका वृक्षीं ठेवूनि शिर । दुज्या वृक्षीं चरण पैं. ॥४६॥ कदाचित् सिद्धासन घालुन । वृक्षाग्रीं बैसावें जाउन । करावें शीतोष्णाचें सहन । ऐसा काळ बहु गेला. ॥ ४७ ॥ राघवचैतन्य यापरी । एकाकी वसतां वनामाझारी । पुढें कथा वर्तली ते चतुरीं । श्रवण केली पाहिजे. ॥ ४८ ॥ राघवचैतन्यालागून । केशव चैतन्य गेले शरण । त्याची विस्तारें करून । पूर्णकथा वर्णिली. ॥ ४९ ॥ पूर्वकथेचें अनुसंधान । श्रोते विचारीत भाविक जन । नृसिंहभट परम सुजन । पूर्वकथा त्याची परिसावी ॥ ५० ॥ कर्नाटक देशाचे अंतरी । तृणमल्ल नामें नगरी । देशपांडे

तेथील अधिकारी । असते झाले निर्धारें. ॥ ५१ ॥ तेथें शिवगंगा महान सरोवर । त्याचे अग्नेयकोनास त्रिंबकेश्वर । नित्य पूजा उपचार । करीत होते बहु जन. ॥ ५२ ॥ ब्राह्मणीं करावें पूजन । नित्य रुद्रावर्तनें करून । त्रिंबकेश्वरापासीं जाऊन । करिते जाले सर्वही ॥ ५३ ॥ कांहीं दिवस जाल्यावर । शिवालय पाहुनियां थोर । यवनें त्रास मानूनि क्रूर । होता झाला तये वेळीं ॥ ५४ ॥ मनीं आणिलें सत्वर । ब्राह्मणाचा मोडावा थार । अवघे मिळोनि करिती विचार । त्रास द्यावा निश्चयेसीं. ॥ ५५ ॥ ऐसें आणोनि मनांत । शिवालयावरी घुमट बांधूं लागत । सर्व ब्राह्मण नृसिंहभट । गेले बोलावया तेथें ॥ ५६ ॥ यवनाप्रति बोलते जाले जाण, । 'आह्मीं येथील अधिकारी पूर्ण । शिवालय मोडूं जाणतोसी पण । होईल मोठा घात पैं येथें.' ॥ ५७ ॥ इकडे यवनानें काय केलें । गवंडी पाथरवट बोलाविले । 'खणा रे ! खणा, वहिलें । बोलता झाला निष्ठुरत्वें. ॥ ५८ ॥ कामगार लागती खणावयासी । ब्राह्मण स्त्री पुरुष योगराशी । अवघे मिळाले उपवासी शिवालयासंनिध. ॥ ५९ ॥ सर्व ब्राह्मण देवावर । पडते जाले सत्वर । 'या दुःखाचा परिहार । निवारण करीं देवराया !' ॥ ६० ॥ पायीं धरूनियां ब्राह्मणां । ओढूनि टाकिती ते क्षणां । ब्राह्मण म्हणती, 'नारायणा ! । काय संकट आम्हां पैं केलें ?' ॥ ६१ ॥ यवनास दुर्धर क्रोध येऊन । ब्राम्हणांच्या स्त्रिया आणून । त्यांचे शिरावरी पाषाण देऊन । ताडिता झाला निजांगें. ॥ ६२ ॥ कित्येक स्त्रियांचें गर्भपतन । लहान बाळकें भूमीं आपटून । स्त्रियांचे स्तनीं सांडस लावून । हाहाकार पैं केला. ॥ ६३ ॥ ब्राम्हणांच्या कंठास दोर बांधून । कूपांत घालूं लागला जाण, । 'आतां आठवा शिवालागून' । ऐसें बोले सक्रोधें. ॥ ६४ ॥ तेव्हां स्त्रिया म्हणती, 'न हे आमचे पती । आम्हां देऊनि यवनाचे हातीं'. । महान सरोवराच्या भोंवतीं । हाहाकार पैं जाहला. ॥ ६५ ॥ ब्राम्हणांस संकट पडलें गाढें । शिवासी प्रार्थिती निजकोडें, । 'धांव रे ! धांव आम्हांकडे' । उच्चस्वरें रुदन करिती. ॥ ६६ ॥ असो. ब्राम्हणास त्रास देऊन । त्यांचें हिरूनि घेतलें धनधान्य, । वतनेंही हस्तगत करून । घालवूनि दिधले तेथूनियां. ॥ ६७ ॥ वृद्ध ब्राह्मण नृसिंहभट । तेथुनी निघाले अवचट । नारायणगिरीवरी चोखट । तप करिते जाहले. ॥ ६८ ॥

येरीकडे काय वृत्तांत । यवन शिवालय खणीत । रक्ताचा स्राव भडभडत । निघता जाला तेधवां. ॥ ६९ ॥ यवनें आश्चर्य मानूनि थोर । बंद केले सकळ कामगार । पूजाउपचार करून थोर । भजनगजर पैं केला. ॥ ७० ॥ 'शिव कोपला आह्मांवर । जाळून टाकिल सकळ नगर' । ऐसीं भीति मानूनि सत्वर । स्तब्ध होता जाहला. ॥ ७१ ॥ यवनीं करुनी विचार, । 'येथुनि ब्राह्मण गेले गिरीवर । आतां त्यांसीं घेऊनि येऊं सत्वर' । असा निश्चय मनीं केला. ॥ ७२ ॥ आपण दूत पाठवुनि सत्वर । घेऊनियां पूजाउपचार । दंडवत नानाप्रकार । करिता झाला तयेवेळीं. ॥ ७३ ॥ दूत सांगे वर्तमान, । 'राज्य देतों तुम्हांलागुन । द्रव्य घरें वतनें आपण । देऊं निश्चयार्थी ब्राम्हणां.' ॥ ७४ ॥ ब्राम्हणीं संतोष मानुन । नगराप्रति आले जाण । शिवगंगाभोंवतीं संपूर्ण । बोलते जाले आनंदें. ॥ ७५ ॥ त्यावरी जाऊनियां देवालयांत । शिवस्तव करिते जाले अद्भुत, । प्रेमाश्रूपूर लोटत । स्वानंदसुख अनुभवितां. ॥ ७६ ॥ ब्राम्हणांस देऊनि धनधान्य । त्यांचें संतोषलें मन, । 'आम्हांवरी शिव त्रिनयन । प्रसन्न जाला वाटतसे.' ॥ ७७ ॥ वाजत गाजत आणिले गृहासी । सर्व जन येती भेटावयासी । ब्राम्हणीं संतोष मानुनी चित्तासीं । परमानंद पैं केला. ॥ ७८ ॥ सर्व ब्राम्हण गिरिवरून । आले तेथें आसें करून । तेथें नृसिंहभट राहून । तप करिते जाहले. ॥ ७९ ॥ वृत्ती जाली उदासीन । अष्टांगयोगसाधन । करूनियां पूर्णपणें । देह शुष्क पैं केला. ॥ ८० ॥ प्रथममासीं निराहार । दुसरे मासीं प्यावें नीर । ऐसें तप करूनियां थोर । शुकयोगींद्रासारखें ॥ ८१ ॥ करूनि पंचाग्नीसाधन । धूम्रपानीं होऊनि निमग्न । जटा पादपरियंत लांबुन । नारायणीं बुद्धि ठेली. ॥ ८२ ॥ घालोनियां सिद्धासन । नित्य करावें भस्मधारण । अक्षयीं नारायणाचें ध्यान । आदरेंसीं करावें. ॥ ८३ ॥ 'देवा ! देह करवतीं घालीन । कीं जीव पर्वतीं देईन । किंवा फेनीं जाईन बुडोन । देवराया ! श्रवण करीं. ॥ ८४ ॥ नलगे मज पुत्र धन । तुझे नलगे मज धनधान्य । आतां हा किंकर जाण । पाया-तळीं ठेवावा.' ॥ ८५ ॥ देवास संकट पडलें गाढें, । 'याचें निवा-रावें कोडें । याहीं घातलें आम्हां सांकडें । प्राणनाश करिल हा.' ॥ ८६ ॥ ऐसा करूनि विचार जाण । नृसिंहभट्ट निद्रासंपन्न । होतांच

स्वप्नीं येऊन । बोलता जाला निर्धारें. ॥ ८७ ॥ ब्राह्मणाचा वेष धरून । स्वप्नीं येऊनि नारायण । भक्ताचें वाढवावया महिमान । करुणावचनें बोलत. ॥ ८८ ॥ 'अगा माझ्या बाळका ! । तुजलागीं शिणविलें फुका, । तुझ्या निवारावया शोका । होइन पुत्र तुझा मी. ॥ ८९ ॥ तुझिया तपें करून । बहु संतोषलें मन, । आतां तुवां येथुन । जावें' ऐसें अज्ञापिलें. ॥ ९० ॥ ऐसें बोलोनि नारायण । स्वप्न पाहूनि संतोषलें मन । नारायणगिरीवरी जाण । ब्राह्मणभोजन बहु केलें. ॥ ९१ ॥ कांहीं दिवस जाल्यावर । प्रस्थान करिते जाले सत्वर, । नृसिंहभट पूजा उपचार । घेऊनि गेले देवालयीं. ॥ ९२ ॥ पूजा करूनि त्वरित । साष्टांग केला प्रणिपात, । 'आतां देवराया ! त्वरित । येतों' पुसोनी ॥ ९३ ॥ मार्गी चालतां सत्वर । तों अकस्मात् पाहिलें गंगातीर, । मध्यान्हासी आला दिनकर । क्षुधा बहुत लागली. ॥ ९४ ॥ नृसिंहें मनामाजी आणिलें । आतां गंगास्नान करावें वहिलें । ऐसें बोलुनि सिध्द जाले । स्नानालागीं करितसें. ॥ ९५ ॥ गंगेमाजीं उभे राहुन । करीत होते अघमर्षण । नृसिंहमूर्ति हातां लागुन । परम संतोष पावले. ॥ ९६ ॥ नृसिंह हातामाजीं घेऊन । षोडशोपचारें पूजा करून । चरणीं मस्तक ठेवून । परमानंदें डुल्लतसे. ॥ ९७ ॥ नृसिंहभट गमन करित । स्त्री आनंदीबाईसहित । आले पुणेवाडीस निश्चित । परमानंदें करोनियां. ॥ ९८ ॥ कांहीं दिवस जाल्यावर । आनंदीबाईस जाला कुमर । शंख चक्र आयुधें सुंदर । पीतांबर वनमाळा. ॥ ९९ ॥ रम्य मूर्ति पीतवर्ण । कटीतटीं मेखळा दिव्य जाण । 'सोडोनियां वैकुंठभुवन । आलों येथें तुजलागीं.' ॥ १०० ॥ ऐसें बोलोनियां वचन । हृदयीं आनंदी आनदली जाण । गर्भा नाहीं आली वेण । प्रत्यक्ष नारायण उभे ठेले. ॥ १०१ ॥ 'तुझे उदरास आलों आतां । तुवां न करावी सर्वथा चिंता' । ऐसें बोलोनि तत्वतां । अदृश्य होता जाहला. ॥ १०२ ॥ आनंदी देहावरी येऊन । पाहे तंव जाला नंदन । अति हर्ष करोनि पूर्ण । मुखचुंबन करितसे. ॥ १०३ ॥ तेरावा दिन होतां पूर्ण । नाम ठेविलें विश्वनाथ जाण; । स्नान घालोनी निंबलोण । करिती आली आवडें. ॥ १०४ ॥ नारायण प्रत्यक्ष येऊन । आपलें नाम विश्वनाथ

ठेवून । ज्येष्ठ बंधु त्रिंबक पूर्ण । तृतीय पुत्र बापु जाला. ॥ १०५ ॥ त्रिंबकबापुनें करावा संसार । विश्वनाथ बाबा पुजेसी तत्पर । संसार न करोनी उद्वार । ऐसे असते जाहले. ॥ १०६ ॥ त्यावरी लोटले दिवस कांहीं । नृसिंहभट कैलासवासी जाले पाहीं । त्रिवर्ग बंधु एके ठायीं । राहते जाले सर्वदां. १०७ ॥ कांहीं काळ राहोनि तेथें । पुढें गमन होईल ओतूरातें । ते कथा ऐकिजे स्वस्थचित्तें । द्वितीयाध्यायीं सज्जनीं. ॥ १०८ ॥ निरंजन रघुनाथ जनस्थानवासी । कथा वर्णिली पुण्यराशी । श्रवणमात्रें गुरु भक्तांसीं । आल्हाददायक निश्चयीं. ॥ १०९ ॥ श्रीचैतन्यविजयकल्पतरू । संपूर्ण फलदायनी उद्धारू । श्रवण पठणें दुःखपरिहारू । होईल श्रोत्यावक्त्यांचा. ॥ ११० ॥

॥ श्रीराघव चैतन्य केशव चैतन्यार्पणमस्तु. ॥

---

## अध्याय दुसरा

श्रीगणेशाय नमः ॥ ऐसें गुरुभक्तांचें महिमान । ऐकतां संतोष पावे मन । त्रिवर्ग बंधू एके ठायीं जाण । असतां अद्भुत वर्तलें. ॥ १ ॥ बंधु त्रिंबकभटजीसहित । विश्वनाथभट बाबा तेथ । राहते जाले निवांत । तंव पुढें कलह वर्तला. ॥ २ ॥ बाबांची वृत्ती उदासीन । त्रिकाळ करावें संध्यास्नान । धर्मालागीं उदार पूर्ण । गृहकृत्य कांहीं करूं नये. ॥ ३ ॥ बंधूनें करूनि अनादर । भाषण केलें बहु कठोर । हस्त धरूनि गृहाबाहेर । विश्वनाथभटजीस घातलें. ॥ ४ ॥ त्याची पत्नी गिरिजाबाई । समागमें निघाली ते समयीं । बरोबर कांहीं घेतलें नाहीं । एका वस्त्रें निघाली. ॥ ५ ॥ करुनी तिर्थयात्रेचा उद्देश । निघते जाले त्रिंबकेश्वरास । येऊनि राहिले ओतूरास । वस्तीलागीं उभयतां. ॥ ६ ॥ वस्त्र नाहीं नेसावयासी । अन्नहीं न मिळे खावयासी । ऐशा विपत्तीनें त्रासासीं । स्त्रीनें बहुत दिधलें. ॥ ७ ॥ म्हणोन घोर वनामाझारीं । बाबाजी निघाले सत्वरीं । मांडवी पुष्पावतीचे तिरीं । स्नानसंध्येसी बैसले. ॥ ८ ॥ वस्त्रप्राय

स्त्रियेचें वचन । स्मरोनियां अंतःकरण । होऊनियां अतिदैन्यवाणें । रुदन करूं आरंभिलें. ॥ ९ ॥ तंव नारद भेटतां ध्रुवाला ! बहुतां परि संतोष जाला । तैसें पूर्व पुण्य आलें उदयाला । विश्वनाथ-भटजींचें. ॥ १० ॥ जैसा व्यासपुत्र शुकयोगींद्र । तपोनिधि ज्ञान समुद्र । तैसा राघवचैतन्य यतींद्र । पाठीं उभा राहिला. ॥ ११ ॥ ह्मणती, 'तूं कोण आलासी येथें ? । किमर्थ करितोसी शोकातें ? । खेद सोडुनि स्वस्थ चित्तें । वृत्तांत सांगें सर्वही.' ॥ १२ ॥ करुनि साष्टांग नमस्कार । बाबाजी सांगती दुःखाचा प्रकार । म्हणती, 'महाराज ! हा संसार । घोरांदर मज जाहला. ॥ १३ ॥ मी रुगु-शाखाध्यायी ब्राह्मण । विश्वनाथ • माझें अभिधान । पुण्यग्रामीं वस्तीलागुन । बंधूसहित राहिलों. ॥ १४ ॥ तेथें कांहीं काळ असतां । बंधूनें करुनि अतिनिर्दयता । आह्मां स्त्रीपुरुषां उभयतां । गृहाबाहेर घातलें. ॥ १५ ॥ तेथूनि ओतूरासी आलों । एका ब्राह्मणाचें गृहीं राहिलों । तेथेंही स्त्रीभाषणें पीडिलों । तें काय किती सांगावें ? ॥ १६ ॥ भार्या ह्मणे, 'अहा रे दैवा ! । दुःख जालें माझिया जिवा । पती मिळाला नाहीं बरवा । कैसें आतां करावें ? ॥ १७ ॥ पोटीं नाहीं पुत्रसंतान । पदरीं नाहीं कांहीं धन । वस्त्र फाटूनि जालें जीर्ण । पोटभरी अन्न मिळेना. ॥ १८ ॥ कानीं नाहीं बाळीबुगडी । मिळाली नाहीं चांगली लुगडीं । सुख नाहींच अर्धघडी । जालें याचें संगतीनें. ॥ १९ ॥ आपण मिळविना अधेला । मिळालें दे ब्राह्मणांला । ह्मणुनि बंधूनें घालविला । हात धरुनि बाहेरीं. ॥ २० ॥ हा कोणाचें आर्जव न करी । नाक धरुनि बसतो घरीं । जाईना कां गिरिगव्हरीं । स्नानसंध्यालागीं पैं. ॥ २१ ॥ ऐसीं स्त्रियेचीं दुर्भाषणें । समक्ष ऐकूनियां कर्णें । त्रास घेतला माझिया मनें । ह्मणोनि आलों या स्थळीं. ॥ २२ ॥ कोणाची स्त्री ? कोणाचा बंधू ? । हा अवघाचि दुःखसंबंदु । तुह्मां ऐसा दयासिंधु । भेटतां सुख होतसे. ॥ २३ ॥ या त्रैलोक्याचे ठायीं । स्वामी ! मजला कोणी नाहीं । पुढें संततीही कांहीं । जाली नाहीं सर्वया.' ॥ २४ ॥ ऐसें ऐकुनि दीन वचन । श्रीराघवचैतन्य आपण । त्या दुःखासी विभागी होऊन । बोलते जाले आदरें. ॥ २५ ॥ 'विश्वनाथा ! ऐकोनि घेई । मजलाहि पुत्र नाहीं । याचें लवलाहीं । सांगें

मजलागीं तूं. ॥ २६ ॥ तूं ह्मणसी मज कोणी नाहीं । तरी तुज मी आहें सर्वस्वही ' । ऐसें ह्मणोनि लवलाहीं । पूर्णकृपा पैं केली. ॥ २७ ॥ विश्वनाथासी आपुले । स्वामींनीं मांडीवरी बैसविलें । मुखालागीं कुरवाळिलें । निजहस्तें करुनियां. ॥ २८ ॥ कृपादृष्टि अवलोकिलें । बहुतांपरी संबोखिलें । परी चित्त बाबाचें उबगलें । स्त्रियेविषयीं सर्वथा. ॥ २९ ॥ ह्मणती, 'पुरे हा संसार । माझी भार्या क्रोधी फार । जैसी तरवारीची धार । तैसी तीव्र बोलती. ॥ ३० ॥ मज नाहीं प्रपंचाचें ज्ञान । मिळवितां न ये धन । न सोसवे स्त्रियेचें बोलणें । ह्मणोनि आलों सोडोनियां.' ॥ ३१ ॥ स्वामी बोलती कृपानिधी, । 'तुजसी स्त्रीत्यागासी आहे अवधी । मी सांगतों शास्त्र-विधी । एकोनियां घेई पां. ॥ ३२ ॥ पाणिग्रहित स्त्रियेसी । नेम केला विवाहदिवसीं । तुजसह धर्मार्थकामासी । सेवन करिन ह्मण-ऊनी. ॥ ३३ ॥ मोक्षइच्छा होतां जेव्हां । स्त्रियेसी सोडोनि जावें तेव्हां । नाहीं तरी पितरां देवां । दूष होईल सर्वथा. ॥ ३४ ॥ पंचविसावें वर्ष तुजलागून । नाहीं फिटलें स्त्रियेचें ऋण । जालिया एक पुत्रसंतान । त्याग करीं तियेचा. ॥ ३५ ॥ माझिया आशी-र्वादेंकरून । पुत्र होईल तुजलागुन । मज करा अन्नप्रदान । क्षुधा फार लागलीसे.' ॥ ३६ ॥ मग आज्ञा मागुनी स्वामिसी । विश्व-नाथभट आले ग्रामासी । सर्वत वृत्तांत स्वस्त्रियेसी । कथन केला ते काळीं. ॥ ३७ ॥ 'राघवचैतन्य प्रसन्न जाले । पुत्र होईल ऐसें वदले । परि नेऊनियां घातलें । पाहिजे त्यांना भोजन.' ॥ ३८ ॥ गिरिजाबाई संतोषली । उत्तम प्रकारचीं अन्नें केलीं । ते विश्वनाथें घेऊनि वहिली । स्वामीसन्निध पातले. ॥ ३९ ॥ नखांच्या चुवळी जाल्या ह्मणुन । घातलें विश्वनाथें भोजन । स्वामी होउनि अति प्रसन्न । अक्षयी वर दिधला. ॥ ४० ॥ 'तुज होईल उत्तम पुत्र । पुढें वंशवृद्धी करील पवित्र । तुज मोक्ष होउनि चरित्र । प्रगट होईल भूमंडळीं.' ॥ ४१ ॥ 'तथास्तु' ह्मणोन वंदन केलें । विश्व-नाथभट गृहासीं आले । उभयतां स्त्रीपुरुषें सेवन केलें । शेष अन्न उरलें तें. ॥ ४२ ॥ गिरिजाबाई जाली गर्भिणी । नव मास भरतां क्रमें करुनि । जाली पुत्राची जननी । उत्तम नगरीं द्विज-गृहीं. ॥ ४३ ॥ कांहीं साहित्य पडतां उणें । सर्वदा संतापुनियां

तियेतें वेडी ठरवून । नायकती तियेचें वचन, । मग एके दिवशीं जालें स्वप्न । तेंहि सांगे आमाबाई. ॥ १३ ॥ 'देव माझे स्वप्नीं येऊन । बोलता जाला मजलागुन । तुझे पुत्र पावतील मरण । शत्रुहस्तें करुनि.' ॥ १४ ॥ तें पुत्रांतें सत्य न वाटून । पुत्र बैसले होते जाण । तंव राजाचें आलें पाचारण । परशत्रूवरी जावया. ॥ १५ ॥ मातेसी करुनि नमस्कार । हरि मुकुंद निघाले सत्वर । होऊनि घोड्यांवरी स्वार । रणांगणीं पातले. ॥ १६ ॥ परशत्रूचा होऊनि चढ । यांचे सैन्याचा जाहला मोड । हरिमुकुंदांचे सोडवूनि धड । मस्तकें नेलीं कापोनी. ॥ १७ ॥ ऐसा प्रकार जालियावरी । उभय सुना घेऊनि बरोबरी । आमाबाई गेली श्रीपंढरी । देवदर्शन घेतलें ॥ १८ ॥ आमाबाई ह्मणे देवासी, । 'तूं कां लागलासी पाठिसी ? । बुडवूनि आमचे वंशासीं । दिवेलावण मोडली.' ॥ १९ ॥ देव ह्मणे, तुझें कुळीस । भक्तराज होईल ऐसा पुरुष । भक्तिमान करिल भूमंडळास । कीर्तनघोषें करुनि.' ॥ २० ॥ ऐसें ऐकुनी अमाबाई । बिऱ्हाडीं आली लवलाहीं । स्नुषा गर्भिणी होती हेंही । ठाउकें होतें तियेसी. ॥ २१ ॥ नवमास भरतां सायासीं । सून प्रसूत जाली पंढरिसी । हर्ष न माये मानसीं । आमाबाईचे ते काळीं. ॥ २२ ॥ मुलास तेरा दिवस जाले । विठोबा ऐसें नाम ठेविलें । पुढें कांहीं दिवसां आले । देहुलागीं सर्वही. ॥ २३ ॥ देवाचे पूजानैवेद्यालागुन । विठोबा करिता जाला आपण । तयालागीं संतान । पदाजी होता जाहला. ॥ २४ ॥ त्या पदाजीचे पोटीं । शंकर जाला भक्तकिरिटी । तयाचिये उदरसंपुटीं । कान्हया होता जाहला. ॥ २५ ॥ त्या कान्हयासी पुत्र । बोल्होबा जाला जगन्मित्र । त्याची पत्नी परम पवित्र । कणकाबाई या नामें. ॥ २६ ॥ ते उभयतां बहुत भलीं । देवाची सेवा बहुत केली । दैवयोगें संपत्ती वाढली । उदीम व्यापारें करूनि. । ॥ २७ ॥ तयांसीं आले तिघे पुत्र । होते जाले परम पवित्र । वडिल सांवजी वैराग्यस्वतंत्र । सेवूनि गेला तीर्थयात्रे. ॥ २८ ॥ त्याचे पाठिचा तुकाराम । जो विठ्ठलभक्त अतिनिःसीम । कान्हया ठेविलें जयाचें नाम । तो कनिष्ठ असता जाहला. ॥ २९ ॥ त्यांत तुकारामाचें चरित्र । जें परम पावन आणि पवित्र । श्रवण करिती

त्यांचे श्रोत्र । पुनीत होती निश्चयीं. ॥ ३० ॥ जन्मल्या दिवसा-पासून । विठ्ठलचरणीं जयाचें मन । महान सिद्धाचें लक्षण । जयाचे ठायीं वर्ततसे. ॥ ३१ ॥ तयानें केल्या दोन स्त्रिया । रखमाई आवली नामें जयां । सावध संसार करावया । दोघीही असत्या जाहल्या. ॥ ३२ ॥ बोल्होबा निवर्तल्यावरी । संसारओझें तुकयाचे शिरीं । अत्यंत पडतें जालें. परि । विठ्ठलचरणीं लक्ष त्याचें. । ॥ ३३ ॥ देऊळामाजीं जाऊन । नित्य करावें भजन । श्रीज्ञानेश्वरीचें पठण । परम आदरें करावें. ॥ ३४ ॥ 'अमानित्वा'दि लक्षण । जयाचे ठायीं आलें संपूर्ण । तीं लक्षणें कैसीं हें श्रवण । श्रोतेजनीं करावीं. ॥ ३५ ॥ प्रथम लक्षण अमानित्व असे । तें तुकयाचे ठायीं वर्ते कैसें । हें ऐकूनि घेईजे स्वस्थ मानसें । साधकांनीं निजप्रीतीं. ॥ ३६ ॥ नामस्मरणीं अति आदर । त्यावरी विठ्ठल-साक्षात्कार । कवितेचा जाला प्रसार । लोक मानूं लागले ॥ ३७ तेव्हां नित्य प्रातःकाळीं उठावें । ब्राह्मणाचे गृहीं जावें । सडासंमार्जन करावें । नदीचें पाणी आणुनी. ॥ ३८ ॥ मनुष्यमात्रें भेटतां वाटेंत । तयांसी करावा प्रणिपात । अवमानिती स्वजन आप्त । तैशापरि वर्तावें. ॥ ३९ ॥ वाटसरासी ओझें होतां भारी । तें ओझें घेऊनि आपले शिरीं । प्रविष्ट करावें त्याचे घरीं । सेवकाचे प्रकारें. ॥ ४० ॥ कोणीकरितां स्तुतिस्तवन । त्रास पावे जयाचें मन । वारंवार करितां अपमान । संतोष बहु वाटतसे ॥ ४१ ॥ सन्मान करितां सर्व जनीं । होय साधकाची पुण्यहानी । हें मर्म तुकारामालागुनी । विदित असे पुरतें. ॥ ४२ ॥ आतां अदंभित्व कैशापरी । तें श्रवण करावें साधकचतुरीं । संग्रह होता जो तुक-याचें घरीं । तोलून दिधला स्वहस्तें. ॥ ४३ ॥ मग माध्यान्ह समय जाल्यावरी भिक्षा मागावी घरोघरीं । केव्हां करावी मजुरी । उदरनिर्वाहाकरणें. ॥ ४४ ॥ वक्तृत्व असतां बृहस्पतीपाडें । परि लोकीं आपणास ह्मणावें वेडें । यास्तव नाचे वेडें वाकुडें । मुखा-लागीं करूनी. ॥ ४५ ॥ करितां कीर्तनसमारंभ । लोकीं वाढेल आपला दंभ । जैसा वेडा असतो स्वयंभ । तैसा विचुक चावळे. ॥ ४६ ॥ अहिंसा तरी सर्वांपरि । येऊनि राहिली तुकयाचे घरीं । प्राणिमात्रांसीं पीडा न करी । सर्व परमात्मा म्हणऊनि. ॥ ४७ ॥

भजन करितां एकांत स्थानीं । शेतकरी म्हणे तुकयालागुनी, । 'शेत खाती पांखरें येऊनि ।' त्याची राखणी करीं तूं. ॥ ४८ ॥ मी जातों ग्रामासीं । एक महिना लागेल मजसीं । तोंपावेतों पाखरें राखिसी । तरि आदमण धान्य देईन मी.' ॥ ४९ ॥ मग तुकया माळयावरी बैसुन । पक्ष्यांचें न करितां निवारण । उलटें पक्ष्यासि बोलावून । शेत चारित असावें. ॥ ५० ॥ शेतकरी ग्रामाहूनि आला । तंव जोंधळा पांखरांनीं खाल्ला । कृषिवळ शिव्या देऊं लागला । तुकारामासी वेळोवेळीं. ॥ ५१ ॥ तुकया ह्मणे कुणब्या-लागुन, । 'तुवां सांगितली पांखरांची राखण । तैसें केलें आदरेंकरूनि । पांखरें संतुष्ट जाहलीं.' ॥ ५२ ॥ सर्वांघटीं वासुदेव । ऐसा जयाचा दृढ भाव । जिवासी पिडा करण्याचें नांव । ठाऊक नाहीं जयासी. । ५३ ॥ ऐसेंच कोणे एके अवसरीं । पित्याचें श्राद्ध आल्यावरि । तुकयाची कनिष्ठ अंतुरी । सांगती जाली तयातें. ॥ ५४ ॥ 'आजी पितृतिथी आहे ह्मणुनि । गहुं आणिले पाहिजेत कोठुनि । तेणें कृषिवळासि मागुनि । गव्हाच्या पेंढ्या आणिल्या. ॥ ५५ ॥ मार्गीं येतां वृक्षाचे ठायीं । मोहोळ लागलें होतें पाहीं । त्यासी ढका लागतां कांहीं । मक्षिका तोडूं लागल्या. ॥ ५६ ॥ मग आंगावरिल वस्त्र टाकुन । तेथें उभा राहिला आपण । म्हणे, 'माझ्या विठोबालागुन । दुःख जालें मजयोगें.' ॥ ५७ ॥ नखशिखांत माशा बैसून । तोडित्या जाल्या तुकयालागुन । परि तितुकें केलें सहन. । हिंसा न व्हावी याकरितां. ॥ ५८ ॥ कोणाचें दुखवेल मन । म्हणून कठोर न बोले वचन । न करी तृणाचें छेदन । हिंसा होईल ह्मणवुनि. ॥ ५९ ॥ परम शांत वर्णिला वसिष्ठ । परि तयांहिपेक्षां तुकया वरिष्ठ । दुसऱ्यानें आपणांस देतां कष्ट । फिरुनि त्यासीच प्रार्थितसे. ॥ ६० ॥ देहुग्रामामाझारी । साधु बाजीबाबा वेषधारी । तयाचे शेताभीतरीं । तुकयाची म्हैस जाऊनि ॥ ६१ ॥ तिणें कांहीं धान्य खाल्लें । ह्मणून माणुस सांगत आले । बाजी बाबासी निमित्य जालें । लोकांप्रति सांगावया. ॥ ६२ ॥ तुकयासि बहुत शिव्या दिल्या । मग दहावीस काठ्या मारिल्या । आपले हातासि मुंग्या आल्या । तेव्हां गेला सोडुनि. ॥ ६३ ॥ तुका-रामाचें शरीर । काठ्यांखालीं जालें चुर । परि न बोलतां एकहि

उत्तर । विठ्ठलस्मरण करितसे. ॥ ६४ ॥ म्हणे, ‘ बाजीबाबा बहुत भले । परि तयांचे हात असती दुखवले ’ । ह्मणुन रात्रीं जाऊनि येकलें । त्यांचे हात रगडीतसे. ॥ ६५ ॥ ह्मणे, ‘ मोठ्यानें काठ्या मारितां । क्लेश जाहले तुमचे हाता । मजवरी क्षमा करावी आतां । मनांतिल राग टाकुनि. ’ ॥ ६६ ॥ ऐसें करूनि त्याचें समाधान । देवळासि आले आपण । करित बैसले नामस्मरण । विठ्ठलाचें आनंदें. ॥ ६७ ॥ आपणालागीं जो अपकारी । तयासि उलटा संतोष करी । ऐसा तुकारामापरि । नसे शांत कोणीही. ॥ ६८ ॥ आतां पांचवें आर्जवलक्षण । तें तुकयाचे ठायीं असे जाण । कोणां न करितां वक्र भाषण । सरळपणें असावें. ॥ ६९ ॥ मार्गी जातां मेंढवाड्यांत । धनगराचा कुत्रा भुंकत । आला तुकयावरी चवताळत । चावावयाकारणें. ॥ ७० ॥ त्यासी तुकया बोले उत्तर, । ‘ तुम्ही कशासी करितां गुरुगुर । ‘ येथें कांहीं नसतां गुरगुर ?’ । मग तो मुकाट्या राहिला. ॥ ७१ ॥ इतुकें सरळ अंतःकरण । जें पशुकडून धरविलें मौन्य । सर्वी वासुदेव ही विभावन । दृढ असे जयाच्या. ॥ ७२ ॥ आपणास घडावें आचार्यसेवन । यास्तव गुरु करावा कोण । हें पुसावें देवालागुन । ह्मणुनि गेला पंढरीसी. ॥ ७३ ॥ करुनि साष्टांग नमस्कार । उभा राहिला जोडुनि कर । विनंती करी वारंवार । श्रीविठ्ठलमूर्तिस. ॥ ७४ ॥ ‘ देवा ! तूंचि माझी माता । आणि तूंचि माझा पिता । तूं माझा बंधु चुलता । आप्तसोईरा तूं सर्व ॥ ७५ ॥ देवा ! तूं परम गुरु । करावा माझा अंगिकारू । मज उपदेश करुनि परिकरु । जन्म मरण चुकवावें. ’ ॥ ७६ ॥ मग बोले रुक्मिणीकांत, । माझेंच स्वरूप असे ओतुरांत । तेथें केशवचैतन्य साक्षांत । उपदेश करातिल तुजलागीं. ॥ ७७ ॥ म्या वेदवाणी करून । मर्यादा केली असे जाण । जावें महानुभावासीं शरण । माझें स्वरूप समजावया. ॥ ७८ ॥ म्या रामअवताराचे ठायीं । वसिष्ठ गुरु केला पाहीं । तैसा कृष्णअवताराचे समयीं । संदिपन गुरु केला. ॥ ७९ ॥ माझी वेदआज्ञापालन । मीं याची केली असे जाण । गुरुरूपी मीच होऊन । उद्धार करी जगताचा. ॥ ८० ॥ नामया माझा भक्त पाहीं । तयासीं मीं सांगितलें लवलाही । विसोबा खेंचरास जाई । शरण गुरुपदेशा. ’

॥ ८१ ॥ ऐसें देवें सांगितल्यावरी । तुकया येता जाला ओतुरीं । बाजारांत जानु तेल्याचे द्वारीं । बखळेमध्यें राहिला. ॥ ८२ ॥ हा वेडा आहे ह्मणून । तयासीं कोणी न देती ठिकाण । मुखें करितो नामस्मरण । अन्य भाषण न करितां. ॥ ८३ ॥ रात्रौ तेथें करितां शयन । स्वप्नीं येऊनि एक ब्राह्मण । पावशेर तूप भोजनालागुन । मागता जाला तुकयासी. ॥ ८४ ॥ मग उठोनियां प्रातःकाळीं । जाऊं लागला समाधीजवळीं । तंव मार्गीं भेटले तयेवेळीं । केशवचैतन्य आपण. ॥ ८५ ॥ जाता होते मांडवीस्नाना । तेव्हां तुकयानें केलें साष्टांगनमना । आणि करिता जाला प्रार्थना । उपदेश करावा ह्मणउनि. ॥ ८६ ॥ तुकयाचा उत्तम अधिकार । पाहुनि मस्तकीं ठेविला कर । 'राम कृष्ण हरि' हा मंत्र । तयालागीं सांगितला. ॥ ८७ ॥ त्या मंत्राचा अर्थ सांगुन । तुकयासि ठसविलें पूर्ण ज्ञान । जेथें मायेचें नसे आवर्ण । तेंचि स्वरूप दाखविलें. ॥ ८८ ॥ तुकयातें जाला परमानंद । सरला देवभक्ताचा भेद । साध्यसाधनाचा खेद । सर्वांपरि मावळला. ॥ ८९ ॥ तुकया पुसतां गुरुपरंपरेशीं । गुरुराय सांगति तयासी । 'केशवचैतन्य नाम मजसी । गुरु राघवचैतन्य. ॥ ९० ॥ व्यासप्रसाद तयावरी । व्यासातें नारद उपदेश करी । नारद ब्रह्मयातें वरी । श्रीविष्णु गुरु विधात्याचा.' ॥ ९१ ॥ ऐसी परंपरा सांगितल्यावरी । मागुति तुकया प्रार्थना करी, । 'हे गुरुपरंपरा समजलियावरी । पूर्वाश्रमींचे काय नाम ?' ॥ ९२ ॥ स्वामी म्हणती, 'तुकारामा ! । सांगू नये पूर्वाश्रमींच्या नामा । तुझ्या पाहुनि अतिप्रेमा । सांगतों तें ऐक पां ॥ ९३ ॥ काशीक्षेत्रींचा अधिपती । ज्यां विश्वनाथ ऐसें ह्मणती । तेंचि नाम होतें मजप्रति । बाबाही म्हणती पूर्वाश्रमीं.' ॥ ९४ ॥ ऐसें तुकयातें सांगुन । स्वामी अदृश्य जालें आपण । तुकया वृत्तीवरी येऊन । विस्मय करिता जाहला. ॥ ९५ ॥ 'गुरूंनीं मजवरी कृपा केली । परि सेवा कांहीं नाहीं घडली । स्वप्नीं तुपाची याचना केली । पडला विसर तयाचा.' ॥ ९६ ॥ माघ शुद्ध दशमी गुरुवासर । ते दिनीं तुकयाचा केला अंगिकार । मग विठ्ठलनामीं ठेऊनि आदर । देहूप्रति पातला. ॥ ९७ ॥ मग जे साधुसंत भेटती । तयांसीं मानुनी सद्गुरुमूर्ति । सेवा करितसे अतिप्रीति ।

पादसेवन करूनि. ॥ ९८ ॥ ऐसें आचार्यसेवन । उपासन घडतसे तुकयालागुन । अंतर्बाह्य शुचिष्मंतपण । शौच वर्ते जयासी. ॥ ९९ ॥ परमार्थ करावा जन्मवरी । विठ्ठल स्मरावा निजनिर्धारी । हेंचि धैर्य जया अंतरीं । अखंडित वर्ततसे. ॥ १०० ॥ कर्मेंद्रिय आणि ज्ञानेंद्रिय । नामीं रूपीं लावावी सोय । हा जयाचा आत्मविनिग्रह । होऊनियां राहिला. ॥ १०१ ॥ लावण्यलतिका रूपवती । परस्त्रीनें प्रार्थितां एकांतीं । तुकयानें त्यागुनि निश्चिती । मातेसमान मानिली. ॥ १०२ ॥ त्यजिलें स्रक चंदनादि भोग । स्वर्ग मानिला जैसा रोग । ऐसें वैराग्याचें भाग्य । ज्याचे ठायीं वर्ततसे. ॥ १०३ ॥ अहंकार ज्याचा जाला गलित । जन्ममरणासी त्रासलें चित्त । ह्मणे व्हावें किती फजीत । जन्मालागीं येऊनि. ॥ १०४ ॥ विषयाचे ठायीं नसे प्रीति । विठ्ठलदास्यत्व सर्वदा चित्तीं । स्वजन धन गेलियाची खंती । नाहींच जयालागुनी. ॥ १०५ ॥ इष्टानिष्ट आलिया घडुन । चित्तवृत्ति समसमान । नेणें दैवत विठ्ठलाविण । अव्यभिचारिणी भक्ति पैं. ॥ १०६ ॥ इंद्रायणीचे तिरीं जाऊन । नित्य करावें भगवद्भजन । बहु आवडे तया विजन । जनसमुदाय रुचेना. ॥ १०७ ॥ ऐसीं अष्टादश लक्षणें । गीतेमाजीं बोलिले भगवान । ते तुकारामाचे ठायीं संपूर्ण । यथासांग देखिलीं. ॥ १०८ ॥ हीं लक्षणें व्हावया सुलक्षण । एक श्रीगुरुची कृपा जाण । श्रीकेशवचैतन्य आपण । भेटले तेणें सांग जाहलीं. ॥ १०९ ॥ केशवचैतन्याची समाधी । जालियावरी शतावे अर्द्धीं । तुकारामातें ज्ञानसमृद्धी । प्रत्यक्ष येऊनि पैं केली. ॥ ११० ॥ एकादशी प्राप्त होतां । स्वामीचे दर्शनाकरितां । यावें देहूहुनि तत्वतां । भजनगजर करावा. ॥ १११ ॥ रात्रंदिवस करितां भजन । स्वामी संतोषोनियां पूर्ण । समाधींतुनी आपण । डोलत असावें निरंतर. ॥ ११२ ॥ ऐसा वृत्तांत जाल्यावरी । तया उत्तम नाम नगरीं । माझारी यादवबावा ब्रह्मचारी । रामदासी पैं होता. ॥ ११३ ॥ तो सदाचारसंपन्न । श्रीरामचरणीं जयाचें मन । परि तत्त्वज्ञान नसे म्हणुन । तळमळ होती अंतरीं. ॥ ११४ ॥ स्वामी तुकयासी प्रत्यक्ष होऊन । बोधिलें शुद्ध तत्त्वज्ञान । उपदेशालागीं देऊन । आनंदरूप पैं केलें. ॥ ११५ ॥ असें आणुन

मानसीं । जाऊनि बैसला समाधिपासीं । फळ मूळ न भक्षितां उपवासी । निग्रह करिता जाहला. ॥ ११६ ॥ पुढें कांहीं दिवस जाल्यावरी । फळ मूळ भक्षुनि हठयोग करी । 'स्वामींनीं कृपा करूनि बरी । उपदेश मजला करावा.' ॥ ११७ ॥ ऐसें चिंतुनिया मनीं । बसतां जाला अनुष्ठानीं । सर्वांगासी भस्म लावुनी । वस्त्रालागीं टाकिलें. ॥ ११८ ॥ ऐसा एक वर्षपर्यंत । राहातां जाला देउळांत । मग स्वामी येऊन स्वप्नांत । तयालागीं सांगती. ॥ ११९ ॥ 'माझा उपदेश होणार नाहीं । तूं आतां येथुनि जाई' । तरि तो तैसाचि राहिला पाही । न जाईच सर्वथा. ॥ १२० ॥ द्वितीय दिनीं भुंगे आणि मुंगळे । येते जाले तांबडे काळे । तोडिती त्याचे पादमुळें । रक्त वाहूं लागलें. ॥ १२१ ॥ तैसेच आवघे पाय फोडून । अस्थि-पर्यंत गेले भेदून । खाते जाले मांसालागुन । दुःख तेणें जाहालें. ॥ १२२ ॥ परि तेणें आवघेंच केलें सहन । न उठतां जाला तेथुन । देऊळामार्जी राहिला पडुन । न जायेचि सर्वथा. ॥ १२३ ॥ मग रात्रींचिये अवसरीं । 'उचलुन टाकिला नदीमाझारीं' । सर्वांग भिजल्यावरी । सावध होता जाहला. ॥ १२४ ॥ ह्मणे 'मी येथें कोठुनि आलों ? । नदीमाजी येऊन पडलों । स्वामिसी न आवडता जालों । ह्मणोनि टाकिलें मज येथें.' ॥ १२५ ॥ पुनरपि खरडत खरडत । येऊन बैसला देवालयांत । मोठा आक्रोश करूनि रडत । स्वामीप्रति बोलतसे ॥ १२६ ॥ 'चैतन्यस्वामी देवाधिदेवा ! । एक वर्ष केली तुमची सेवा । त्याचें फळ माझ्या जिवा । दुःख दिलें हें काय ?' ॥ १२७ ॥ मग चैतन्यमूर्ति प्रगट होऊन । तयालागीं दिधलें दर्शन । ह्मणती, 'पाहिलें तुझें मन । धैर्य असे कीं नाहीं हें.' ॥ १२८ ॥ मग तयाचे मस्तकीं ठेवितां कर । वृत्ती होती जाली स्थीर । करूनि उपदेश परिकर । ब्रह्मसाक्षात्कार पैं केला. ॥ १२९ ॥ स्वामी तयासी आशीर्वाद देती, । 'पृथ्वीभरी होईल तुझी कीर्ति' । मग लावितां स्वामी तीर्थाप्रति । शरीर दिव्य जाहाले. ॥ १३० ॥ करूनि स्वामीसी वंदन । यादोबा आले गृहालागुन । दर्शना येती संपूर्ण जन । अति महिमान वाढलें. ॥ १३१ ॥ श्रीराघवचैतन्य केशवचैतन्य । तया स्तवितां ग्रंथेंकरून । तेव्हां ते स्वप्नीं येऊन । बोलते जालें मजलागीं. ॥ १३२ ॥ 'तुवां हा जो ग्रंथ केला । तो आम्हांसी मान्य जाला । आतां वर देतों या

ग्रंथाला । पठणकर्त्यांसीं फळेल तो.' ॥ १३३ ॥ 'माझे समाधी-पाशीं बैसुन । जो शतवार करिल ग्रंथपठण । तो होईल द्रव्य-संपन्न । दरिद्र जाईल तयाचें. ॥ १३४ ॥ जो सहस्रवेळ पाठ करील । तयातें पुत्रसंतान होईल, । अयुत्संख्या जो वाचील । रोग जातील तयाचे. ॥ १३५ ॥ जो करिल नित्य पठण । दशसहस्र अवर्तनें करून । त्यासीं रूपवती कांता जाण । प्राप्त होईल निश्चयीं. ॥ १३६ ॥ जें ज्यास संकट पडेल कोणतेंही । त्याचें निवारिन मी आंगें पाही, । जो ग्रंथातें संग्रहाहोनि पाही । पिशाचभय त्या नाहीं. ॥ १३७ ॥ 'जें जयासी इच्छित काम । जो पाठ करिल नेमें करून । त्याचे पूर्ण होती मनोधर्म । निश्चयीं वाक्य अव-धारीं. ॥ १३८ ॥ 'समाधिपासीं न होतां ग्रंथपठण । त्याणें असावें कोणत्या रीतिकरून । शुचिष्मंत होऊनियां पूर्ण । आदरें पठण करावें. ॥ १३९ ॥ लक्ष वेळ ग्रंथ वाचितां । चैतन्यप्रसाद होईल निश्चितां । दश लक्ष वेळ जपतां । राज्यप्राप्ती होय त्यासी. ॥ १४० ॥ असंख्य करितां ग्रंथपठण । तयांसि होईल तत्वज्ञान, । ऐसा श्रीकेशवचैतन्य । आशिर्वाद देते झाले.' ॥ १४१ ॥ कृष्णदासबैरागी परमभक्त । तेणें वर्णिला हा वृत्तांत । शके पंधराशें शहाण्णवांत । ग्रंथ पूर्ण पैं जाला. ॥ १४२ ॥ त्या ग्रंथाचेनि आधारें । बोलिलों वेडींवांकुडीं उत्तरें । परिसोत भावीक भोळे । कृपा करूनि मजलागीं. ॥ १४३ ॥ शके सत्राशें नव । प्लवंगनाम संवत्सराचें नांव । ते कार्तिक शुद्ध येकादशी पर्व । ते दिनीं ग्रंथ पूर्ण जाला. ॥ १४४ ॥ श्रीरघुनाथगुरुप्रसादेंकरून । गिरिनार पर्वतावरी जाऊन । जालें श्रीदत्तात्रयदर्शन । तो निरंजन विनवितसे ॥ १४५ ॥ 'ऐकोनि घ्यावें श्रोतेजनीं । केशवचैतन्य याचा अभिमानी । जैसें वदविलें तयांनीं । तैसें लिहिता जाहलों.' ॥ १४६ ॥ निरंजन रघुनाथ जन-स्थानवासी । कथा वर्णिली पुण्यराशी । श्रवणमात्रें गुरुभक्तांसी । आल्हाददायक निश्चयीं. ॥ १४७ ॥ श्रीचैतन्यविजयकल्पतरु । संपूर्ण फलदायनी उदारु । श्रवणपठणें दुःखपरिहारु । होईल श्रोत्यांवक्त्यांचा. ॥ १४८ ॥ श्रीराघवचैतन्य केशवचैतन्यार्पणमस्तु. ॥ श्रीगुरवेनमः ॥ श्रीराम जय राम जय जय राम ॥ ॥ ॥

॥ समाप्त ॥

## निरंजन रघुनाथकृत

# पतिव्रताआख्यान.

### ( ओव्या. )

वेद सर्वांसी आधार । वेद सर्वांचें माहेर । वेदाचेनि पैलपार । पावले सर्व ॥ १ ॥ तेथें बुद्धि पतिव्रता । दुबळी होवोनि दुश्चिता । गेली सांगावया हिता । आपुलें गुज. ॥ २ ॥ वंदोनि श्रुतिमायेसी । सांगे दुःखाचिया राशी, । 'ऐकमाते ! स्त्री देहासी । निर्मिलें कोणें ? ॥ ३ ॥ स्त्रियेच देह अमंगळ, । स्त्रीदेह पापासी मूळ, । स्त्रीदेहाचा विटाळ । मानिती ज्ञानी. । ॥ ४ ॥ स्त्रीदेह हें कोडें धन । स्त्रीचा देह पराधीन । स्त्रीदेह उघडें वान । झांकितां नये.' ॥ ५ ॥ मग ह्मणे श्रुती आई, । 'ऐकलें कीं बुद्धिबाई ! । स्त्रीदेहाची नवाई । सांगतें तुज. ॥ ६ ॥ स्त्रीदेह रामाची सीता । रुक्मिणी श्रीकृष्णकांता । स्त्री द्रुपदाची दुहिता । अहिल्या तारा ॥ ७ ॥ वसिष्ठाची अरुंधती । अत्रीची अनुसूयासती । ऐशा स्त्रिया धन्य किती । जाल्या त्या सांगूं.' ॥ ८ ॥ बुद्धि ह्मणे, 'ऐक माते ! । धन्य होते त्यांचे भर्ते । जोडा माझिया दैवातें । मिळाला कैसा ? ॥ ९ ॥ होतें पायें लंगडा लुळा । नाहीं नाक कान डोळा । रूपाचा सोहळा । काय वो सांगूं ? ॥ १० ॥ असो जैसा तैसा तरी । ऐक स्वभावाची परी । अविद्या दुराचारी । ठेविली तेणें. ॥ ११ ॥ करितां तयेसी संसार । शतावधि जालीं पोरें । मन आणि अहंकार । थोरले पुत्र. ॥ १२ ॥ त्यांनीं पापाचे पर्वत । उभारिले असंख्यात । विषयभोगें उन्मत्त । होवुनी ठेले. ॥ १३ ॥ आशा तृष्णा कल्पना । लेकी जाल्या या तुफाना । न ह्मणती थोरसाना । भोगिती सर्व. ॥ १४ ॥ कामक्रोधादि लेंकुरें । खोडकर अनिवार । त्यांनीं हाणोनिया घर नासिलें सर्व ॥ १५ ॥ हृदयाच्या माजघरीं । पति निजतो विळभरी । बरळतो नानापरी । अविद्यायोगें. ॥ १६ ॥ ह्मणे जन्मतो मरतो । पापपुण्यादि भोगितो । स्वर्गनरकासि जातो । वारंवार. ॥ १७ ॥ माझें घर, माझें दार, । माझी संपत्ति, हें पोर । माझा अवघा संसार । असावा सदा. ॥ १८ ॥ असो. आतां मायाबाई ! । करूं उपवासी काई ? । व्रत आचरोनि पाहीं । जाळीन देह.' ॥ १९ ॥ श्रुति ह्मणे, 'पतिव्रते ! । ऐक लेकी गुणवंते । माझें वचन निरुतें । सांगतें तुज. ॥ २० ॥

पतिवांचोनि वृथा ( व्रता? ) स्त्रियेनें करूं नये सर्वथा । पतियोगें पतिव्रता । धन्य पैं जाल्या. ॥ २१ ॥ स्त्रियांचा तो पति देव । व्रतदान पुण्यें सर्वे । पति स्त्रियेचा तीर्थराव । वंदावा सदा. ॥ २२ ॥ पति जाणावा निर्दोष । पाहूं नये त्याचा दोष । सदा सर्वदा संतोषें । सेवावा पति. ॥ २३ ॥ पति मानावा गणगोत । पति स्त्रीचा परम आप्त । पति स्त्रियेचा परमार्थ । जाणावा सर्व. ॥ २४ ॥ करितां नित्य पतिसेवा । संतोष वाटतो देवा । लक्ष्मी पार्वती हेवा । करिती तिचा. ॥ २५ ॥ बुद्धि लेकी ! धरी धीर । माघारी घरासी फीर । भर्ताराची निरंतर । करावी सेवा. ॥ २६ ॥ वडिल बंधु तुझा सखा । विवेक नेई पाठिराखा । करिल अविद्येचा वाखा । देईल घालवूनि. ॥ २७ ॥ मन आणि अहंकार । अविद्येचा जो विस्तार । करिल तयाचा संहार । विवेक हा. ॥ २८ ॥ घेउनि विवेकाचा फाटा । झाडुनि काढीं चारी वाटा । शमदमादि चोखटा । घाली गे ! सडा. ॥ २९ ॥ मुमुक्षता घेउनी फणी । घाली त्रिगुणाची वेणी । शुद्धसत्वजीवनीं । सुस्नात होई. ॥ ३० ॥ गुरुभक्ति पातळ चोळी । नेसुनि होई सोवळी । निश्चयाचें कुंकूं भाळीं । अक्षयीं लावीं. ॥ ३१ ॥ अमानित्वादि भांडार । उघडुनि घाली अलंकार । रत्नजडित परिकर । प्रकाशमय.॥ ३२॥ सर्व शृंगारा करोनि । जाई पतिसन्निधानीं । स्तुतिस्तवना करूनी । उठवी पति.' ॥ ३३ ॥ श्रुतिमायेनें कथिलें । सद्बुद्धीनें तैसें केलें । स्तवनासि आरंभिलें । वेदांतें करूनि. ॥ ३४ ॥ 'उठा उठा पतिराया! । कैसे भ्रमलाति वायां ? । जाणा ईश्वराची माया । मिथ्या ही सारी ॥ ३५ ॥ तुम्हां नाहीं देह गेह । कैंचा पापपुण्या ठाय ? । स्वर्गनरकाची त्राय । फिटली सहजीं. ॥ ३६ ॥ तुह्मी निर्गुण निराकार । निर्मळ निश्चळ निराधार । अनंत पारावार- । रहित तुह्मी. ॥ ३७ ॥ तुह्मी ज्ञानघनानंद । परिपूर्ण असिपद । कैंचा वायां करितां खेद ! जागे व्हा स्वामी ! ' ॥३८॥ ऐसें करितां स्तवन । सांडोनियां जीवपण । प्रत्यगात्मा सावधान । होता पैं झाला. ॥ ३९ ॥ सद्बुद्धीसी आलिंगुन । पावला तो समाधान । जालें पूर्वील स्मरण । त्यालागीं सर्व. ॥ ४० ॥ बुद्धीसहवर्तमान । गेला सद्गुरूसि शरण । त्याच्यायोगें पूर्णपण । पावता झाला. ॥४१॥ तेथें बुद्धि पतिव्रता । विरूनि गेली सर्वथा । करूनि आपुल्या स्वहिता । पावली कीर्ति ॥ ४२ ॥ पतिव्रताआख्यान । जे कां करिती स्मरण । तेहि होतीं निरंजन । रघुवीरकृपें ॥ ४३ ॥

# निरंजनरघुनाथकृत

# निरंजनपर ओव्या.



वंदोनिया सद्गुरूसी । शुद्ध विवेकाची राशी । सांगतों मी श्रोतियांसी । ऐकोनि घ्यावी ॥ १ ॥ निजवर्णाश्रमधर्म । आचरोनि क्रियाकर्म । भगवंतीं सदा प्रेम । असूं द्यावें. ॥ २ ॥ नित्य आत्मा परिपूर्ण । अनित्य हे सर्वजन । ऐसें मनीं विवेचन । करित जावें ॥ ३ ॥ सर्व त्रैलोक्यामाझारीं । उपभोग नानापरी । तुच्छ मानावे अंतरीं । विष्ठेसम ॥ ४ ॥ शमदमादि साधन । हळुहळू संपादून । मोक्षहेतूलागीं मन । उदित व्हावें ॥ ५ ॥ जगामाजी सदाचारी । ब्रह्मनिष्ठा परोपकारी । ऐशा गुरूतें सत्वरी । शरण जावें ॥ ६ ॥ मग ते अधिकार पाहून । सांगतील तुजला ज्ञान । जेणें होय समाधान । अक्षयीं तुझें ॥ ७ ॥ सोडवुनी देहबुद्धी । लाविती आत्मसमाधि । ऐक आतां त्याचा विधी । सांगतों तुज ॥ ८ ॥ नव्हेसी तूं स्थूळदेह । तुजला तो दृश्य होय । तैसाचि तो लिंगदेह । नोहेसी तूं ॥ ९ ॥ स्वरूपाचें जें अज्ञान । दोन्ही देहांसी कारण । तोहि नोहेसी तूं जाण । द्रष्टा तूं त्याचा. ॥ १० ॥ तिन्ही देहांचें लक्षण । जाणसी तूं जेणें गुण । तो तूं महाकारण । नोहेसी बा ! ॥ ११ ॥ चहूं देहां विलक्षण । साक्षी याचा तूं चिद्घन । त्वंपदाचें शोधन । ऐसें करी. ॥ १२ ॥ आतां तत्पदशोधन । ऐक स्थिरावुनि मन । विराट पंचभूत जाण । सांडोनि द्यावा. ॥ १३ ॥ इंद्रचंद्रादि सुरगण । हिरण्यगर्भ येणें गुण । अव्यक्त अज्ञान । सोडावेंची. ॥ १४ ॥ चवथा देह मूळमाया । भासविली जगत्रया । तेहि समजोनि वायां । सांडावी पां. ॥ १५ ॥ चारिदेहांपरता । परमात्मा निरुता । त्यासी तुझी अभेदता । पाहे पां बरी. ॥ १६ ॥ घटीं मठीं गगन । असे जैसें एकपण । पिंड ब्रह्मांडीं चिद्गगन । तैसें पाहीं. ॥ १७ ॥ पिंड ब्रह्मांड उपाधी । सोडोनियां शुद्धबुद्धि । चिदाकाश निरवधि । पाहे पां सर्व. ॥ १८ ॥ शुद्ध नभ जें सपुर । जया नाहीं अंतपार । तेंचि ब्रह्म निर्विकार । जाणें बापा ! ॥ १९ ॥ तेंचि निर्मळ निराधार । अखंडित निराकार निश्चित पारावार- । रहित जें कां. ॥ २० ॥ सदा चिद्घनानंद । तें हें जाणें असिपद । देशकाळवस्तुभेद । नाहीं जेथें. ॥ २१ ॥ करीं तयाचें

चिंतन । एकांतासीं बैसून । समकाय दृढासन । करोनियां. ॥ २२ ॥ सोडोनि विषयध्यान । माघारीं फिरवीं मन । हृदयीं चिद्गगन । पाहें पां बरें. ॥ २३ ॥ तेथें न रहातां स्थिर । धावुनि जाईल विषयावर । त्यासी आणूनि वारंवार । स्वरूपीं ठेवीं. ॥ २४ ॥ ऐसा करितां अभ्यास । स्थिरावेल दिवसंदिवस । संकल्पविकल्पास । सांडोनिया. ॥२५॥ जावोनियां विलयासीं। सर्व दुःखाचिया राशी । मोद प्रमोदानंदेसी । सुखिया तेथें. ॥ २६ ॥ दृश्य द्रष्टा दर्शन । त्रिपुटी हे होय क्षीण । तेथें आपुला आपण । दुसरा नाहीं. ॥ २७ ॥ नाहीं सृष्टीचा व्यापार । ब्रह्मा विष्णु महेश्वर । इंद्रादिक सुरवर । नसतीं तेथें. ॥ २८ ॥ तेव्हां स्फूर्ति स्फुरण । हेंहि जाय वितळून । न म्हणतां एकपण । जैसें तैसें. ॥ २९ ॥ ऐसें निर्विकारपण । सृष्टीपूर्वीं ब्रह्मजाण । तेथें अहं ऐसें स्फुरण । होतें जालें. ॥ ३० ॥ तिचें नांव मूळमाया । चिद्विवर्त गा सखया ! प्रसवली गुणत्रया । अहंकारासी. ॥ ३१ ॥ तया अहंकारापासून । जन्म अवकाशालागून । त्याचे पोटीं झाला पवन । अग्नी तेथें. ॥ ३२ ॥ अग्नीपोटीं जालें जळ । जळ अवनीचें तें मूळ । पृथ्वी वनस्पती सकळ । प्रसवली. ॥ ३३ ॥ वनस्पतीयोगें रेत । रेताचिनि प्राणी होत । ऐसा मायेचा संकेत । प्रगटला. ॥ ३४ ॥ शुद्धस्वरूपीं स्फुरण । तया मायेमाजी जाण । व्यापक जें चैतन्य । ईश्वर तो. ॥ ३५ ॥ तेणें मायेच्या योगानें । केलें सृष्टिविस्तारण । पिंडब्रह्मांड रचून । व्याप्त जाला. ॥ ३६ ॥ तोचि अविद्या घेउनि । पिंडामाजी प्रवेशोनि । मिथ्या सृष्टी जीवपणीं । मानिली सत्य ॥ ३७ ॥ ब्रह्मा विष्णु महेश्वर । होवोनियां तो ईश्वर । स्थिति उत्पत्ति संहार । करीतसे. ॥ ३८ ॥ अग्नि पाणी वर्षून । प्राणी मरती संपूर्ण । पृथ्वी जाय विरून । उदकामाजी ॥ ३९ ॥ अग्नि आपासि गिळून । जाय वायासी मिळून । वायु आकाशीं पळून । लयासी जाय. ॥ ४० ॥ शब्द आणि अवकाश । अहंकार स्फूर्तिभास । प्रकृतींत समरस । होती सर्व ॥ ४१ ॥ ब्रह्म आणि मूळमाया । एकपण असे तया । जैसी शरीराची छाया । शरीरासवें. ॥ ४२ ॥ जैसी सुवर्णाची कांती । किंवा दीपकाची दीप्ति । अभेदत्वें निश्चिती । असे सदा. ॥ ४३ ॥ मायायोगें भासे जग । तेंहि ब्रह्मीं एकलग । जैसे सुवर्णाचे नग । सोनेपणें. ॥ ४४ ॥ जैसा तंतुयोगें पट । किंवा मृत्तीयोगें घट । दुजा भासे परिस्पष्ट । एकपणें. ॥ ४५ ॥ तैसें ब्रह्मीं जग भासे । भासे परी दुजें नसे । एकपणीं भ्रमवशें । भासलें दुजें. ॥ ४६ ॥ भ्रमवशें शुद्ध दोर । भासे

लागे फणिवर । तैसें ब्रह्म निर्विकार । विकारीं भासे ॥ ४७ ॥ आदिमध्य-अवसानीं । रज्जू जाला नाहीं फणी । तैसें ब्रह्म जगपणीं । जहालें नाहीं. ॥ ४८ ॥ ब्रह्म अद्वय निर्मळ । शुद्ध बुद्ध सर्वकाळ । नसे द्वैताचा मळ । जयाठायीं. ॥ ४९ ॥ ऐसा अनुभव घेउनि । राजयोगिया होवोनि । जीवन्मुक्तीसी भोगुनी । राहे सुखें ॥ ५० ॥ सेवुनि दया क्षमा शांति । भक्ति प्रेम भगवंतीं । करी सत्कर्माची रीती । पाहिल्यासम. ॥ ५१ ॥ रघुवीराची शिकवण । ऐशापरी उमजून । जहालों मी **निरंजन** । तैसा तूं होई ॥ ५२ ॥

---

# निरंजन रघुनाथकृत

## ( गोंधळी. )

शुक सांगे परिक्षिती । ऐक कथा भागवती ॥ ध्रुवपद. ॥ देहनगर अष्टपुरी जी । पुरंजन राज्य करी जी । बुद्धि तयाची अंतुरी जी । गुणवती सुंदरी जी । त्याचा अहंकार परधान जी । दुष्टराशी काय दुर्जन जी । राजा त्याच्या स्वाधीन झाला जी । त्यानें खेळ काय मांडिला जी । राणी-राजाचे माझारि जी । विपत्र पाडियलें भारी जी । पुढें होणाराची गती. ॥ शुक०॥ १ ॥ याव यात्र काय परधाना जी । माझ्या जीवींच्या जीवना जी । जाऊं विषयाच्या वना जी । भोगूं परावी अंगना जी । मनपवन वारूवरी जी । संकल्पाचा साज करी जी । इंद्रियदळभार हाकारी जी । राजा शिकारी निघाला जी । मनवारूवर बैसला जी । पुढें होणाराची गती. ॥ शुक०॥ २ ॥ मग त्या पुरजन रायानें जी । आत्मराज्य काय सोडिलें जी । नसतें जिवपण जोडिलें जी । पांच वनें ओलांडिलीं जी । गेला विषयाच्या वना जी । गेला वासनेच्या दरीं जी । सहा चोरांनीं गांठिलें जी । घे धे घे घे काय बोलती जी । आशा राक्षसिणी गर्जती जी । द्वेष-भेदादि वनचरें जी । खाती फोडोनि उदर जी । राजा मनीं दचकला जी । काय रे ! अहंकारा परधाना ! जी । वन रे ! मोठे भयंकर जी । त्याचा अंत काय लागेना जी । मला रे ! दिशाभुली झाली जी । राणी कुठं रे ! राहिली जी । ऐशा होणाराची गती ॥ शुक० ॥ ३ ॥ इकडे बुद्धि पट्टराणी जी । पतिव्रता सत्वगुणी जी । तिनें रोदना मांडिलें जी । हरि बा हरि नारायणा ! जी । काय रे ! करूं या प्राक्तना जी ।

राजा कोणीकडे गेला जी । इनें बा ! तप काय मांडिलें जी । उपभोगासि सांडिलें जी । घालुनी वैराग्याची धुनी जी । विवेकाच्या काय अंगणीं जी । संग्रामाच्या वज्रासनीं जी । मोक्षहेतु धरुनी मनीं जी । सद्गुरु देव आराधिला जी । त्यांनीं बोधपुत्र दीधला जी । पुढें होणाराची गती. ॥ शुक० ॥ ४ ॥ बोध बुद्धीतें बोलत, जी । 'राजा कोठें सांग मला जी । त्याचा शोध मी लावीन जी । तुजलागीं भेटवीन जी ' । बुद्धि ह्मणे, 'ऐक सुता रे ! जी । विषयवनीं तुझा पिता रे ! जी । अहंकार घेउनी गेला रे ! जी । तेथें गुंतोनि राहिला रे ! जी ' । ऐकुनि मातेच्या वचना जी । बोध प्रतिज्ञा बोलत जी, । 'राजा घेउनि येइन जी । तुला सुखी काय करिन जी ' । पुढें होणाराची गती. ॥ शुक० ॥ ५ ॥ विवेकाचा वारु भला जी । त्यावरी बोध स्वार झाला जी । शांति क्षमा दोहीं करीं जी । चौऱ्या ढाळिती सुंदरी जी । शमदम संगें बळ जी । तोफा वैराग्य तुंबळ जी । मग त्या विषयवनाला जी । त्यागरूप अग्नी दिला जी । महा चोर काय पळती जी । भेद वनचर जळती रे ! जी । मग त्या बोधराजियानें जी । अद्वैताच्या काय शस्त्रानें जी । अहंकार तो मारिला जी । इंद्रियवंध तो बांधिला जी । मनवारू फिरविला जी । ऐशा होणाराची गती. ॥ शुक० ॥ ६ ॥ पुरंजन राजियाला जी । रामा बोध घेउनियां आला जी । बुद्धीलागीं भेटविलें जी । बुद्धि आत्मयाची भेटी जी । निरालंबीं मिठी पडली जी । गेला दुःखाचा दुकाळ जी । झाला सुखाचा सुकाळ जी । ब्रह्मपदसिंहासनीं जी । आत्मा शोभे अद्वयपणीं जी । वसता झाला निरंजन जी । ऐशा होणाराची गती. ॥ शुक० ॥ ७ ॥

श्रीदत्तमहाराज, काशी.



श्रीनिरंजन स्वामींचे नातू विश्वनाथबोवा, यांनीं
स्थापन केलेली मूर्ति.

॥ श्रीराम ॥

# निरंजन स्वामीकृत भूपाळ्या.



## भूपाळी दत्ताची १.

उठि उठि दत्तात्रया, करुणासिंधु कृपालया ।
उठवी माता अनुसूया, प्रेमें टाळ्या पिटूनिया ॥ धृ ॥
सप्तपंचम अरुणोदय । जाला स्नानाचा समय ।
भानुप्रकाश होऊं पाहे । रविरश्मि दाटल्या ॥ १ ॥
उठले साधकांचे वृंद । करिति तवनामाचा छंद ।
हृदयीं ध्याती ब्रह्मानंद । प्रेमभावें करूनी ॥ २ ॥
व्यास वाल्मीक नारदमुनि । आदि करोनि सर्व मुनी ।
उभे राहिले आंगणीं । दर्शनासी पातले ॥ ३ ॥
गंगायमुना सरस्वती । तुंगभद्रा भागीरथी ।
मनिकर्णिका भीमरथी । स्नान घालूं पातल्या ॥ ४ ॥
इंद्रचंद्रादि सुरगण । आले दर्शनालागून ।
करिती स्तोत्र अनुवादन । कीर्ति तुझिया नामाची ॥५॥
ऐकुनि मातेची करुणा । उठला साधकांचा राणा ।
निरंजनाचीये मना । प्रेमानंद दाटला ॥ ६ ॥

## भूपाळी दिगंबराची २

उठि उठि दिगंबरा । स्वामि सद्गुरु दातारा ।
सर्व त्रैलोक्यउद्धारा । करुणाकरा उठि वेगीं ॥ धृ ॥
पंचपंच उषःकाळ । सप्तपंच अरुणाचळ ॥
करितां षट्कर्मे सोज्वळ । होती वेळ सर्वेशा ॥ १ ॥

भागीरथीसी जाऊन । सारूनिया संध्यास्नान ॥
पंढरपुरासी चंदन । लावावया जाणें कीं ॥ २ ॥
कृष्णातीरासी जाऊन । कर्म माध्यान्हीं करून ॥
करवीर क्षेत्रामाजी जाण । भिक्षाटन मागणें ॥ ३ ॥
पंचालेश्वर सिद्धस्थान । तेथें सारुनी भोजन ।
सर्वेचि सांभवी प्राशन । तुळजापुरीं करणें कीं ॥ ४ ॥
सेखाचळावरि आसन । करोनि माहूरासी जाण ।
तेथे करोनि शयन । जन्मस्थान पाहे पां ॥ ५ ॥
पश्चिमे गिरनार जाण । तेथें सारोनि आसन ।
मुद्रा खेचरि लावून । सोहंध्यान साधी कां ॥ ६ ॥
सर्व त्रैलोक्या माझारी । प्राणी कोणी स्मरण करी ।
तत्क्षणीं तेथवरी । जाणे लागे सर्वेगा ॥ ७ ॥
ऐकुनि भक्ताची करुणा । उठिला भाक्तांचा राणा ।
निरंजनाचिया मना । प्रेमानंद दाटला ॥ ८ ॥

## भूपाळी २

उठाउठारे लोकरि । सत्वर यारे शुद्धीवरी ।
उघडा कपाटें अंतरीं । ज्ञानदृष्टी अवलोका ॥ धृ ॥
आलें आहे विघ्न भारी । काळ टपला दुर्धांतरी ।
नित्य करिताहे चोरी । आयुष्याची दुपर्‍या ॥ १ ॥
सरला चौऱ्यांशीचा तम । नरतनु आली अनुक्रम ।
इचा मानुनि संभ्रम । ज्ञानदृष्टी उघडा रे ॥ २ ॥
सद्गुरु वचनाचा उदय । प्रकाश जाला भानूदय ।
जागे व्हा रे मनोमय । स्वरुप पहा आपुले ॥ ३ ॥
वाचे घ्यारे रामनाम । निरंजन सांगे उत्तम ।
तुमचा हरेल भवश्रम । निर्भय व्हाल अंतरीं ॥ ४ ॥

## भूपाळी ४

उठि उठि कृष्णाबाई । स्वरूपसुंदर कान्हाई ।
काशीं पान्हा भरोनि तुजला हुंबरती गाई ॥ धृ ॥
रथारूढ रविभास्कर उदया आला तमारी ।
सरली चारी प्रहर रात्र गेली आंधारी ॥
उठोनिया गोकुळिंचे जन अनुसरले संसारीं ।
गोपवृंद दधिमंथन करिती उठली घुमारी ॥ १ ॥
रावे अविसाळिं या वृक्षावरुने किलबिलती ।
मधुवनाच ठायीं कोकिळ सुस्वरें गाती ॥
कमळकळांच्या भोंवते भोंवते मधुकर रुंजती ।
मयूर पिच्छें उचलुनि टाहो उच्चस्वरें करिती ॥ २ ॥
चिमणाल्यां वासुरें पुच्छ उचलोनी धावती ।
त्यांची माई त्याला तुजवीण न पेऊं देती ॥
उंची माना करुनि गाई शोवताच्या पहाती ।
हंबरडे फोडुनि सखया तुजला बाहाती ॥ ३ ॥
चिमणाल्या घोंगड्या चिमण्या वेताट पहाती ।
चिमणाले गोपाळ आले तुझ सांगाती ॥
वडजे आणि वाकडे नाचत नाचत येती ।
बोबडिया शब्दानें सखया तुजला बाहाती ॥ ४ ॥
द्वारिं येउनि उभी राधा सुंदर वेल्हाळी ।
ऐकुनिया शब्दासि जागा जाला वनमाळी ॥
नंदयशोदा प्रेमें हसोनि पीटीली टाळी ।
निरंजन आरती घेउनि भावें ओंवाळी ॥ ५ ॥

## भूपाळी ५

उठि उठि वो बलभीमा स्वामिसुंदर गुणसीमा ।
उठवि अंजनिमाता अंतरिं धरूनिया प्रेमा ॥ धृ ॥

पूर्वे दिशेसी भानु उदयो व्हावया पाहे । कमलदळाच्या भ्रमरालागीं सुटका होताहे । निबिड वनाचे ठाई कोकिळ मंजुळ बोबाये । चरावया चालिले पक्षी मार्गी बहू वाहे ॥ १ ॥

गंगाद्वारा प्रति मुनिवर चालिले स्नाना । ब्रह्मगिरीच्या वरुते जाती निजतपआचरणा । साधकजन पातले सखया तुझिया दर्शना । त्यांजप्रति दे भेटी सत्वर वायुनंदना ॥ २ ॥

सर्वेहि वानरगण जाले तुजभोवते गोळा । चिमणालीं लेंकुरें उडति उभवुनि लांगूला । तुझिया योगें शोभा दिसती सर्वेहि कपिकूळा । सत्वरि जागा होई माझ्या तान्हुल्या बाळा ॥ ३ ॥

निरंजन सुखधामविलासि गोदेचे तटीं । सद्गुरु श्रीरघुनाथ अला आहे पंचवटी । ऐकुनिया वचनासि अरूळी देउनिया मोठी । उठिला श्रीहनुमान प्रेमें टाळीया पीटी ॥ ४ ॥

## भूपाळी ६ शंकराची

उठोनिया प्रातः काळीं । वदतां शंभुनामावळी ॥
होउनि पातकांची होळी । चंद्रमौळीपद लाभे ॥ ध्रु ॥
काशीक्षेत्रामाजी देव । चौदा नामें सदाशिव ॥
त्याचे नामें वदतां सर्व । जीवा मोक्ष होतसे ॥ १ ॥
ओंकारेश्वर त्रिलोचन । आदि महादेव जाण ॥
कृत्तिवासाचें दर्शन । घेतां जन उद्धरती ॥ २ ॥
रत्नेश्वर आणि चंद्रेश्वर । केदारेश्वर धर्मेश्वर ॥
नित्य आत्मा वीरेश्वर । कामेश तो स्मरावा ॥ ३ ॥
विश्वकर्म्यानें पूजिला । विश्वकर्मेश्वर तो झाला ॥
मणिकर्णेश्वर शोभला । नानापूजा उपचारें ॥ ४ ॥
मुक्तिक्षेत्राचा अभिमानी । अविमुक्तीश्वर नामें करुनि
विश्वेश्वर शूळपाणी । निरंजनें वर्णिला ॥ ५ ॥

## भूपाळी ७ नरहरीची

उठि उठि नरहरिराया प्रगटे हृदयस्तंभीं या ।
सद्भावें प्रल्हाद विनवी चिंतुनिया पाया ॥ धृ ॥
दुष्ट पिता हा कामवैरी माझा अपकारी ।
तुझा दास ह्मणवुनिया मजला बहुतापरि मारी ।
सर्व जगीं हा बळिष्ट आतां कोण यासि वारी ।
तुज वाचुनिया दुसरा नाहीं आमुचा कैवारी ॥ १ ॥
अहंकार पर्वतावरुनि मजला लोटिलें ।
क्रोधाग्नीच्या योगें येणें मला आटिलें ।
मोहनदी माझारिं नेउनि मजला बुडवीलें ।
मदमत्सर हस्तीचा करुनि मजला तुडवीलें ॥ २ ॥
अविद्यामायेच्या हस्तें विषय वीष दिधलें ।
आशातृष्णा शस्त्रें येणें मजला छेदिलें ।
नानापरि दुःखाचे अपाय मजलागीं केले ।
तुझिया कृपादृष्टी मजला नाहीं बाधलें ॥ ३ ॥
तूं तरि अखंड व्यापक सर्वीं भरोनी उरलासी ।
इच्छामात्रें ब्रह्मांडाची घडमोडी करिसी ।
निजभक्ताच्यासाठीं नानापरि रूपें धरिसी ।
पूर्ण मला भरवसा आहे हृदयांतरवासी ॥ ४ ॥
सद्गुरु नारद प्रसादयोगें बोध असा स्फुरतां ।
हृदयस्तंभीं व्यापक नरहरि जाला अवतरता ।
हिरण्यकश्यप काम मारुनि सिंहनाद करितां ।
निरंजन प्रल्हाद केला स्वरुपीं अनुसरता ॥ ५ ॥

॥ श्रीराम ॥

# निरंजन स्वामीकृत पाळणे.

## पाळणा दत्ताचा १

जो जो जो जो रे मुनिवर्या । स्वामी दत्तात्रया ॥
सांगुनि पूर्वींचा निजपर्या । हालविती अनुसूया ॥ धृ ॥
असतां निजसदनीं अत्रिमुनी । मागितलें मज पाणी ।
मुसळ थांबविलें तेंचि क्षणीं । ऐकुनि मुनिची वाणी ॥ १ ॥
नारद मुनिनें तें पाहुनि । सांगितलें सुरसदनीं ।
हरि-हर-ब्रम्ह्यांच्या त्रैपत्नी । क्षोभविल्या अभिमानी ॥ २ ॥
त्यांनीं आपुलाले दादुले । छळणासी धाडिले ।
त्यांहीं अडवुनिया मज वहिले । भिक्षेसी मागितले ॥ ३ ॥
मग म्यां तीर्थातें शिंपिले । तिन्ही बाळें केलें ।
भोजन घालुनिया निजवीलें । संवत्सर बहु गेले ॥ ४ ॥
उमा सावित्री लक्ष्मी । आल्या आमुच्या धामीं ।
त्यांनीं मागितलें निजस्वामी । सांडुनि आपुली मी मी ॥ ५ ॥
मग म्यां दाखविलें देवत्रय । तो तूं दत्तात्रय ।
निरंजनासि आश्रय । सखया तुझा होय ॥ ६ ॥ जो जो ॥

## पाळणा विष्णूचा २

जो जो जो जो रे गोविंदा चिमण्या बाळ मुकुंदा ।
सांडुनि सृष्टीचा श्रमधंदा निजनिज आनंदा ॥ धृ ॥
अपुल्या मायेच्या योगानें त्रिगुणात्मक होऊन ।
करिसि उत्पत्तिपाळण विश्वसंहारण ॥ १ ॥
अनुग्रह करिसि भक्तासी निग्रह अभक्तासी।
सेवुनि ऋषिच्या शापासी दश अवतारा येसी ॥ २ ॥
मच्छकच्छ तूं सूकर होउनि सिंहाकार ।
वामन चिमणासा सुंदर होसी फरशधर ॥ ३ ॥

रामश्रीकृष्ण होउन राहसी बौद्धपणें ।
कलंकिरूप घेउन करिसि विश्वहानन ॥ ४ ॥
प्रळयांबू ठाइं पवित्र लहानसें वटपत्र ।
पाळख टांगियला विचित्र नाहीं दोरसूत्र ॥ ५ ॥
निरंजनवासी श्रीधर निजुनी पत्रावर ।
निजपद अंगुष्ठ सकुमार चोखी वारंवार ॥ ६ ॥

---

॥ श्रीराम ॥

# निरंजनस्वामीकृत आरत्या

## आरती रामाची १

जयदेव जयदेव जयजय श्रीरामा । आरती ओवाळूं तुज मेघश्यामा॥धृ॥
लीला दाउनि अगणित आले पंचवटीं । वसते झाले येउनि गंगातिरनिकटीं ।
सीता लक्ष्मण रघुविर धूर्जटी । चवदा वर्षे केल्या तपाच्या कोटी । १ जयदेव॥
छायारूपें सीता लंकासि नेली । म्हणवुनिया श्रीरामें वनचरें मेळविलीं ।
दंडुनिया रजनीचर कांता सोडविली । तेहतिसकोटि देवाची सुटका केली ॥ जयदेव ॥ २ ॥
आडवि जाउनि अवघी ऋषीमंडळी । श्रीरामासि अणिलें गोदातिर जवळी ।
वामांकावरि सीता शोभे ते काळीं । नीरंजन आरति घेउनि ओवाळी ॥ ३ ॥ जयदेव ॥

## शेजारती अवधूताची २

सुखिं निद्रा करी आतां स्वामी अवधूता । सद्गुरु स्वामी अवधूता ।
चिन्मय सुखधामीं जाउनि । पहुडा एकांता ॥ धृ ॥
वैराग्याचा कुंचा घेउनि चौक झाडला ।
त्याचेवरतें सप्रेमाचा शिडकावा केला ।

पायघड्या घातल्या सुंदर नववीधा भक्ती ।
ज्ञानाच्या समया उजळुनि लाविल्या दीप्ती ॥ १ ॥
द्वैताचें कपाट लोटुनि एकत्र केलें ।
दुर्बुद्धीच्या गाठी तोडुनि पडदे सोडिले ।
भावार्थाचा मंचक हृदयाकाशीं टांगला ।
मनाचीं सुमनें जोडुनि केलें सेजेला ॥ २ ॥
आशातृष्णा कल्पनेचा सांडूनि गलबला ।
दयाशांति-क्षमा दासी उभ्या सेजेला ॥
अलक्ष उन्मनि घेउनि नाजुक दुशाला ॥
निरंजन सद्गुरुस्वामी नीजीं नीजेला ॥३॥

## काकड आरती दत्ताची ३.

काकड आरती स्वामी श्रीगुरुदत्ता । सद्भावें ओवाळू चिन्मयरूप अवधूता ॥ धृ ॥

प्राणापानसमानव्यान उदान मिळाले ।
सुषुम्नेचे मार्गें दर्शनासि पातले ॥१॥
सोहं शद्बध्वनी मिळोनी सर्वांनीं केला ।
दशनादाचा घोष अखंडित चालिला ॥२॥
कुंडलनीचा वेढा काढुनि कांकडा केला ।
सत्रावीचीं घृतें नेउनि पूर्ण भिजवीला ॥३॥
सद्गुरुवाक्याचा चिन्मय प्रकाश पडला ।
निश्चय कांकडा नेऊनि तेथें पेटवला ॥४॥
निरंजन ओवाळू जातां तद्रूप झाला ।
सद्गुरुप्रसादें अहंभाव निमाला ॥५॥

## आरती दत्ताची ४.

जयदेव जयदेव जय दत्तात्रया । आरती ओवाळूं तुझीया पायां ॥ धृ ॥
पंचप्राण वाती एकत्र केली । तुझिये नामस्मरणीं घृतीं भिजविली ॥ हृदयीं

ध्यान ध्यातां प्रदीप्त झाली । मन हें उजळुनीयां एकारत केली ॥१॥ कल्पनेचा वायू समूळ नीमाला । सोहंभावें दीप अक्षई ठेला । सर्वांभूतीं दिगंबर प्रकाशला । द्वैताचा तमरज विलयासी गेला ॥ २ ॥ सरली वाती ज्योती एकत्र झाली । भ्रांतीची काजळी समूळ नीमाली । सद्गुरु प्रसादें युक्ती फावली । निरंजन धृती स्वस्वरूपीं ठेली ॥३॥

## आरती जगदंबेची ५

जय जयवो जगदंबा अंबा सप्तशृंग-वासिनी हो ।
आदिमाय चित्शक्ति व्यक्ति-मात्राचीं स्वामिनीं हो ॥ धृ०॥
निष्प्रपंच ब्रह्माचे ठायीं प्रगटित झाली तुझि ध्वनि हो ।
अहंब्रह्म हें बोलुनि झालिस रज-तम-सत्व तिन्हीं हो ॥
जीवेश्वर निजसत्तें निर्मित केलें अपुलेपणीं हो ।
पंचभूतातें मिळवुनि रचले ब्रह्मांडा लागुनी हो ॥ १ ॥
जारज-श्वेदज-अंडज-उद्भिज योन्या नानापरी हो ।
समष्टि अभिमानी ईश्वर कर्ता सर्वांवरी हो ॥
ब्रह्मा-विष्णू-महेश पाळण-उत्पत्ति-क्षय करी हो ॥
इंद्र-चंद्र-भोगेंद्र केले देवयक्षकिन्नर हो ॥ २ ॥
विद्याऽविद्या शक्ति दोन्हीं तुझ्या विलक्षण हो ।
अविद्येचे योगें समूळ भूलवीलें जन हो ॥
रघुविरगुरुच्या स्वमुखें विद्यारूपें तूं प्रगटुनि हो ।
संसारीं सोडविला सर्वा परी त्वां निरंजन हो ॥ ३ ॥

## आरती तुळजापूर भवानीची ६

जय जय मायभवानी अंबा तुळजापुरवासिनी हो ।
चित्शक्ति श्रीदुर्गा भैरवि अघतमविनाशनी हो ॥ धृ० ॥
कृतयुगाचे ठायिं दैत्य म्हैसासुर प्रगटला हो ।
त्याच्या त्रासाभेणें मोठा हाहाःकार उठला हो ॥ १ ॥

गाईच्या रूपानें पृथ्वी ब्रम्ह्यातें जाउन हो ।
होती जालि कष्टि अपुलें गाऱ्हाणें सांगुन हो ॥
तेव्हां हरिहरब्रह्मा आले तुजलागीं शरण हो ॥ २ ॥
वंदुनिया स्तुतिस्तवनें अंबे करिति तव विनवणी ।
रक्षी विश्वजगातें ह्मणवुनि लागति ते चरणीं हो ।
अभयवरातें देउनि सुरवर पाठावेिले ते क्षणीं हो ॥३॥
नाना अयुधें सेवुनि धरिला अष्टभुजा अवतार हो ।
अउट कोटि चामुंडा घेऊनि सांगातें हो ।
सिंहारुढ होउनिया केला दैत्यांचा संहार हो
हेल्याच्या रूपानें पळतां जाला ह्मैसासुर हो ।
ते काळीं शस्त्रानें उडवुनि दिधलें त्याचें शिर हो
जयजयकारें सुरवर कारिति निरंजन परिकर हो ॥ ४ ॥

## आरती गजवदनाची ७.

जयदेव जयदेव जयजय गजवदना । आरती ओवाळू तुज अद्वयरदना ॥ धृ ॥
शुंडादंड विराजित सुंदर परिकर । सर्वांगासीं लेपन केला सिंदूर ॥
मृगमद भाळीं शोभतसें दुर्वांकूर । दोंदावरुते चिमणा विलसे फणिवर॥
स्वच्छंदें नेसुनिया पीतांबर पिवळा । लीलामंते नाचतसे वेळोवेळीं ॥
निजभावें येउनियां सिद्धीचा मेळा । टाळ विणे घेउनियां गाती मंजूळा ।२।
हरिहर ब्रह्मादिक करिती तवस्मरण ।
नासुनि त्यांचें संकट करिसी निर्विघ्न ।
रघुविरस्मरहा प्रियकर गौरीनंदन ।
सद्भावें वंदितसे तुज नीरंजन ॥ ३ ॥

## आरती मारुतीची ८.

जय जय बलभीमा बलभीमा । अगाध तवगुण-महिमा ॥ धृ ॥
वंदुनिया श्रीरामा केली । निजबळ तूं बळसीमा ॥ १ ॥
सीताशोक निवारून । केले लंकापुरिच्या दहना ॥ २ ॥

द्रोणाचळ गिरि अणिला । बंधु लक्ष्मण वांचविला ॥ ३ ॥
निरंजन तवपायीं । भावें ठेवित येउनि डोई ॥ ४ ॥

## आरती शिवाची ९.

जय जय वो शिवसांबा अंबादेवीच्या निजवरा हो ।
जटाजूट शुळपाणी कर्पुरगौरा गंगाधरा हो ॥ धृ ॥
पंचवदन शशिभूषण नंदीवहना दिगंबरा हो ।
कपाळपाणी शंभू नीळग्रीवा शिवशंकरा हो ।
भस्मधूलित वपु सुंदर शोभे भाळीं नेत्र तिसरा हो ॥ १ ॥
वामांकवरि गिरिजा शोभे कमळाक्षा सुंदरी हो ।
जीच्या ईक्षणमात्रें जगनगरचना नाना परि हो ।
स्थिरचर सुरनर किन्नरव्यक्ती ब्रह्मांडाभीतरि हो ॥ २ ॥
व्याघ्रांबर फणिवरधर लवथव गजचर्मांबरधरा हो ।
रुद्राक्षाचे भूषण मस्तकीं भूषित बिल्वतुरा हो ।
स्मशान निलईं क्रिडसि संगिं घेउनिया सहचरा हो ॥ ३ ॥
रघुविर प्रियकर वंदुनि करितों निरंजन आरती हो ।
सद्भावें गुणकीर्तीवर्णन केली यथामती हो ।
भूधर शिणला जेथें तेथें माझी प्रज्ञा किती हो ॥ ४ ॥

## शेजारती विष्णूची १०.

सुखें निद्रा करी आतां स्वामी गोविंदा, श्रीहरि स्वामी गोविंदा॥
विनविति लक्षुमी लागुनि पादारविंदा ॥ राम ॥ धृ ॥
विवेक वैराग्य शमदमादि साधन ।
नारदल्हाद घेउनिया भक्तजन ॥ राम ॥
मुमुक्षत्वें केलें नवविध भक्ती लागून
आपुलाल्या सदनासि गेले निजसमाधानें ॥ राम ॥ १ ॥
श्रवणाचा मंनक उंची शेषाचा केला ।
मननाचीं सुमनें जोडुनि रचिलें शेजेला ॥ राम ॥

चिद्रत्नाचा दीप निजध्यासें उजळिला ।
अज्ञानाचा तम साक्षात्कारानें गेला ॥ राम ॥ २ ॥
जीवशिवाचे कपाट दोन्ही एकत्र केले ।
असिपदाचें कुलुप त्याच्या वरुते लाविलें ॥ राम ॥
चिज्जडाच्या सूक्ष्म ग्रंथीं लागीं सोडिलें ।
आनंदाचे पडदे उकलुनि मोकळे केले ॥ राम ॥ ३ ॥
सोहंभावें करूनियां पूजाउपचार ।
निरंजन आरती ओवाळूनि वारंवार ॥ राम ॥
अद्वय चित्शक्ति सेवेलागीं सादर ।
सुखासनीं पहुडले लक्षुमीवर ॥ राम ॥ ४ ॥

## आरती खंडेरायाची ११.

जयदेव जयदेव जय खंडेराया । भवतम संहारुनिया दाखवि निजमाया ॥धृ॥
॥ शिवशंकर गौरीवर हर करुणाकर । निजभक्ताच्या साठीं घेउनि अवतार
भूलोकाच्या ठायीं येवुनि सत्वर ।
मणि-मल्हादिक दैत्या केला संहार ॥ १ ॥
सर्वांगातें लावुनि भंडार पिवळा ।
कंठीं भूषण शोभे रुद्राक्षमाळा ।
सह्याद्रीचे वरुते बैसुनि अवलीळा ।
हरहर वदनीं बोलतसे वेळोंवेळां ॥ २ ॥
वसवोनिया बहुसुंदर सुस्थळ जेजोरी ।
म्हाळसा शोभतसे वामांकावरी ।
रघुविर-प्रिय अवतार तो हा मल्हारी ।
म्हणवुनि निरंजन गुण गातो बहुपरी ॥ ३ ॥

## आरती विष्णूची १२.

जय जय लक्षुमिकांता शेषशायी नारायणा हो ।
भक्तजनातें रक्षुनि करिसी तापत्रयहरणा हो ॥ धृ ॥

आदि अनादि सर्वां विश्वासी तूं निज आधार हो ।
तुझिया ठायीं कल्पित जाले जगनग चराचर हो ॥
त्रिगुणात्मक होउनिया ब्रह्माविष्णू महेश्वर हो ।
स्वच्छंदानें करिसि उत्पत्ति स्थिती आणि संहार हो ॥ १ ॥
युगायुगाचे ठाईं जन्मा येउनि वारंवार हो ।
मच्छकच्छवराह घेसी सिंहादिक अवतार हो ॥
शरणागत रक्षुनिया करिसी दुःखाचा परिहार हो ।
दुष्टजनातें दंडुनि हरिसि पृथ्वीचा भूभार हो ॥ १ ॥
मृगजळवत हा सेवुनि लटिका मायावी संसार हो ।
नाना लीला दावुनि शेवटिं होसी निर्विकार हो ॥
सच्चितसुखघन आत्मा निर्मळ सर्वांचें निजसार हो ॥
नीरंजनगुण गातो नकळे तव स्वरुपाचा पार हो ॥३ ॥

## आरती लक्ष्मीकांताची १३

जयदेवजयदेव जय लक्ष्मीकांता । क्षिरसागरिं अहिशयना स्वामी आनंता ॥धृ ॥
शंखचक्रगदापद्म भूषण ।
पदकमळाचे ठायीं ध्वज आंकुश चिन्ह ॥
कमळा तिष्ठत चरणीं सेवे लागून ।
फणिवर धरी वरी छाया प्रेमें डोलून ॥ १ ॥
नाभीकमळीं निर्मित चतुरानन जाला ।
तुझिया स्वरुपालागुनि पाह्यासी गेला ॥
न कळे ह्मणवुनि मागें परतुनिया आला ॥
तपसामर्थ्यें करिता झाला सृष्टीला ॥ २ ॥
अंबऋषीच्या साठीं घेऊनि अवतार ।
सत्वरिं जयविजयाचा केला उद्धार ।
निरंजन आरति घेउनि परिकर ॥
सद्भावें ओवाळू येती सुरवर ॥ ३ ॥

## आरती भैरवाची १४

जयदेव जयदेव जय भैरवराया । इच्छा वाटतसे बहु तुझे गुण गाया ॥ धृ ॥

कैलासाहुनि येणें केलें सत्वर ।
काळभैरवरूपें घेउनि अवतार ॥
पंचक्रोशीमाजी पापाचे भार ।
दंडुनिया भक्ताचा करिसी उद्धार ॥ जय ॥ १ ॥
काशीक्षेत्राचा बहु केला प्रतिपाळ ।
ह्मणवुनि तुज ह्मणती श्रीक्षेत्रपाळ॥
अखंड हस्तकिं शोभे डमरु त्रिशूळ ।
सर्वहि छेदन केलें असुराचें कूळ ॥ २ ।
अश्वारूढ होउनि पृथ्वीचिया वरी ।
निजदासाचें रक्षण करिसि बहुपरी ॥
स्वच्छंदानें येउनिया कृष्णातीरीं ।
शरणागत नीरंजन आरती करी ॥ ३ ॥

## आरती शंकराची १५

जयजय शिवशंकरा कर्पुरगौरा गिरिजावरा हो ।
कृष्णातीरनिवासा स्वामी श्रीशकुंतेश्वरा हो ॥ धृ ॥
जटाजूट शशिभूषण नीलग्रीवा गंगाधरा हो ।
दशभुजपंचानना त्रिशूलपाणी विश्वंभरा हो ।
पिनाकधर हरशंभुनंदीवाहना दिगंबरा हो ॥ १ ॥
ब्राह्मणशापें मघवा होउनिया पक्षि आपण हो ।
कृष्णातीरीं तप केलें तेणें वृक्षावरी बसूनि हो ।
ह्मणवुनि येणें केलें सांडुनि कैलासालागुन हो ॥ २ ॥
आपुल्या ईक्षणमात्रें करुनि इंद्राचा उद्धार हो ।
भक्तजनाच्या साठीं वसते झाले नीरंतर हो ।
निरंजन गुण गातो होउनि चरणाचा किंकर हो ॥ ३

## आरतीं रामदासाची १६

आरती रामदासा नित्यानंद विलासा ।
कृपासिंधू स्वामीराया परळीगडनिवासा ॥ धृ ॥
कलियुगीं ब्रम्हविद्या प्रगटाया लागुन ।
द्विजकुळीं प्रगटले महारुद्र आपण ।
ब्रह्मचर्या संपादोनी केलें गंगातीरा येणें ॥१॥
घेवोनि रामभेटी वर्णियले कीर्तीगुण ।
दासबोध ग्रंथ केला दीनजनांलागून ।
त्वरितचि मुक्ति जोडे करितां त्याचें श्रवण ॥ २ ॥
दयाक्षमाशांतिभक्तिवैराग्य निर्मळ ।
निजअंगें आचरोनी मार्ग केला सोज्वळ ।
निरंजनादिक भक्त उद्धराया सकळ ॥ ३ ॥

## आरती कृष्णेची १७

जयदेव जयदेव जय माय कृष्णे । अघतम संहारुनिया हरि मम भवतृष्णे ॥धृ॥
विष्णूच्या निजअंकीं प्रगटुनिया जाण ।
निर्मळ जळ तुंबळ खळ पर्वत भेदून ॥
पूर्वसमुद्रालागुनि केलेसें गमन ।
अघटित घटना तुझें न कळे विंदान ॥ १ ॥
अगाध तवगुणमहिमा श्रुतिशास्त्रे गाती ।
त्रैलोक्याचे ठायीं वर्ते तव ख्याती ।
सर्वेहि तीर्थे निशिदिनिं तवपायीं वसती ।
मुनिवर सुरवर येऊनि सुस्नान होती ॥ २ ॥
दर्शनस्पर्शनमात्रें तापत्रय हरिसी ।
निजदासातें मुक्तिपद अक्षयीं देसी ।
सद्भावें निरंजन लागे चरणासी ॥ ३ ॥

## आरती मारुतीची १८

जयदेवजयदेव जयजय हनुमंता । आरति ओवाळूं तुज वायु सुता ॥ धृ ॥
अंजनीच्या उदरीं प्रगटुनिया जाण ।
उन्मतांचि क्षणीं केलें उड्डाण ।
स्पर्शुनिया रविमंडळ जालें से येण ।
अगाध तवगुणमहिमा न कळे विंदान ॥ १ ॥
दशरथतनुजाची तनु होतां विखंडा ।
द्रोणाचळ उचलुनिया नेता प्रचंडा ॥
मार्गीं सहजीं त्याचा पडलासे गुंडा ।
तो हा पृथ्वीवरुते शोभे जरांडा ॥ २ ॥
रघुवीराचे चरणीं ठेवुनीया प्रीती ।
त्रैलोक्याचे ठायीं वाढवीली ख्याती ॥
सद्भावें नीरंजन करितो आरती ।
पूर्णकटाक्षें ईक्षण करि त्याच्या वरुती ॥ ३ ॥

## शेजारती मारुतीची १९

सुखि निद्रा करी आतां स्वामि बलभीमा श्रीगुरु स्वामी बरुभीमा
जालीसे बहु निशि आतां ध्यावें विश्रामा ॥ धृ ॥ देवा ॥
सीतेच्या शोधासि केलें लंकेसी जाण ।
मारुनि जंबूमाळी केले रावणदंडण ॥ देवा ॥
लीलामात्रें पुच्छालागीं अग्नि लावून ।
अर्धक्षणामाझारि केलें लंकेचें दहन ॥ १ ॥
समुद्राच्या वरुते वेगि बांधुनि सेतूला ।
दशकंधरपुरिवरुते जाउनि चढाविला हल्ला ॥ देवा ॥
लक्ष्मणाच्या साठीं उचलुनि द्रोणाचळ नेला ।
रामाचें निजसाह्य करुनिया विजयो मेळविला ॥ देवा ।

जाउनीया पाताळीं लोटुनि दिधलें देवीला ।
महिरावण घेउनिया पायाखालीं रगडीला ॥ देवा ॥
निरंजन विलासि रघुविर संतुष्ट केला ।
कीर्ती जयजयकार तुमचा त्रैलोकीं जाला ॥ देवा ॥ ३ ॥

## आरती यतीची २०.

जयजय वो यतिवर्या सच्चित् सुखघन विलासिया हो ।
सद्भावें ओवाळू अरती अखंड अविनाशिया हो ॥ धृ ॥
आदीमध्यें अंतीं अवघा आत्मा निर्विकार हो ।
भवसंसारापासुनि व्हावा विश्वाचा उद्धार हो ॥
म्हणवुनि धारण केली नरतनु माया विश्वाकार हो ॥ १ ॥
वर्णाश्रम धर्मातें संपादुनिया यथान्वयें हो ।
वेदोदित मार्गानें करुनि साधन चतुष्टय हो ।
प्रणवाच्या उच्चारें जाले चित्स्वरूपिं तन्मय हो ॥ २ ॥
ब्राह्मणयोनी ठायीं सुंदर अधिकारि पाहुन हो ।
नासुनि अज्ञानासी नेत्रीं घालुनि ज्ञानांजन हो ।
महावाक्यविचारें त्यातें केलें निरंजन हो ॥ ३ ॥

## आरती गीतेची २१

जयदेव जयदेव जय भगवद्गीते । तापत्रय संहारुनि वारी भवदुरितें ॥धृ॥
पार्थरथावरि बसले असतां भगवान ।
त्याच्या मुखकमळांतुनि जालिसि निर्माण ।
तव श्रवणाच्या योगें पंडूनंदन ।
मोहातीत होउनिया जाला पावन ॥ १ ॥
अष्टादश अध्यायीं तूझा विस्तार ।
लेखनपठणश्रवणें उद्धरिसि नर ।
हरिहर-ब्रह्मा स्तविति तुज वारंवार ।
अगाध महिमा नकळे कवणासी पार ॥२॥

श्रीकृष्णें काढुनिया वेदाचें सार ।
प्रगट केली ब्रम्हविद्या परिकर ॥
सर्वहि विश्वजनाचा केला उद्धार ।
निरंजनपद देउनि हरिला संसार ॥ ३ ॥

## आरती २२ सरस्वतीची.

जयदेव जयदेव जय अद्वयमूर्ति । सच्चिदानंदेंद्र श्रीसरस्वती ॥ धृ ॥
स्वगतादिक भेदाचा जेथें मळ नाहीं ।
नानाभारीं विवर्जित निजवस्तु पाहीं ।
सर्व श्रुतीचा अन्वय जाला जे ठायीं ॥
तें हें ब्रह्म गुरुरूप जाणा लवलाहीं ॥ १ ॥
ज्याच्या सत्तामात्रें जग सर्वहि विलसे ॥
जैसें रज्जूवरुते सर्पत्व भासे ।
नामरूपात्मक सर्वहि कल्पांतीं नासे ॥
परि हे निश्चळ निर्मळ सद्रूप अविनाश ॥ २ ॥
ज्याच्या प्रकाशयोगें रविशशिचा महिमा ।
मनबुद्ध्यादिक इंद्रिय वर्तति निजकर्मा ॥
सर्व प्रकाशक अलिप्त कर्म आकर्मा ।
ज्ञानाज्ञानावांचुनि ज्ञानचि निःसिमा ॥ ३ ॥
परिच्छेद त्रय नसती ज्यालागीं ।
ऐशा अनंत स्वरूपा ध्यावी निजयोगी ॥
दुःखाचा संस्पर्श न दिसे त्या आंगीं ।
नीरंजन होउनिया विचरति निःसंगी ॥ ४ ॥

## आरती २३ गुरुची

जयजयाजी गुरुवरा । स्वामी सद्गुरुदातारा ।
ज्ञानदीपें ओवाळीन । सर्व साराचिये सारा ॥ धृ ॥
अन्नमय प्राणमय मनोमय विज्ञान ।

आनंदादि पंचकोशी वर्ते तुझी सत्ता जाण ॥
त्याहुनि वेगळा तूं अस्तिभाति प्रियपण ।
तुरीय चवथा तूं ज्ञेयज्ञानाविहीन ॥ १ ॥
ब्रह्मादिक बाळकाची मूळभूत जे माया ।
नसोनि भासलीसे तुझे सत्तेनें वाया ।
तीहूनी वेगळा तूं नसे ते तुझिया ठाया ।
सत्यज्ञान पूर्णानंता सर्वाधार गुरुराया ॥ २ ॥
पिंडब्रह्मांडाच्या ग्रासें तुजलागीं पाहूं जातां ।
ध्यानचि हरपलें मग कैचा मी ध्याता ॥
मन हें मावळणें शद्बा आली निशद्बता ।
निरंजन ह्मणावया नाहीं कोणीही निरुता ॥ ३ ॥

## आरती २४ शंकराची

जयदेव जयदेव जयजय शिवसांबा । आरती ओंवाळूं तुजसह हेरंबा ॥ धृ ॥
माथा मुकुट जटेचा हेमाकृति पिंवळा ।
भस्म विलेपन आंगीं रुद्राक्ष-माळा ।
नाना सर्पविभूषण शोभे अवलीळा ।
कंठीं धारण केलें दुर्धर हळहळा ॥ १ ॥
दशभुज पंचानन शिरिं भागिरथी विलसे ।
कर्पुरवर्ण विराजित मंदस्मित भासे ।
प्रतिवदनीं नेत्रत्रय सुंदररूप दिसे ।
मन्मथ मरोनि गेला ज्याच्या सहवासें ॥ २ ॥
गजचर्मांबर ओलें वेष्टुनिया वरुतें ।
त्रिशूळ डमरु हस्तकिं घेउनि पाशांतें ।
दंडन करि दुष्टाचें खंडुनि बहुमत्तें ॥ ३ ॥
वामांकावरि गिरिजा शोभे सुंदरी ।
सव्यांकावरि गणपति पाशांकुशधारी ।

निरंजन पंचारति घेउनिया करीं ।
सद्भावें ओवाळी हरगुरु शशिधारी ॥ ४ ॥

## आरती ज्ञानोबाची २५.

जयजयाजी ज्ञानदेवा आदि देवाचिये देवा ।
संपूर्ण ज्ञानियांचा तूचि एक पूर्ण ठेवा ॥ धृ ॥
ब्रह्मादिक जगताचा कर्ता धरता संहरता ।
नित्यमुक्त ज्ञानरूप मायादेवीचा भर्ता ।
करोनि सर्व कांहीं स्वयें असे आकर्ता ।
ऐसि या ईश्वराची नसे तुझे ठायिं वार्ता ॥ १ ॥
ईशजिव नानाभेदें जींच्या योगें भासला ।
अष्टधा भेदयुक्त प्रकृतीच्या परि जाला ।
जगत्पटीं ओतप्रोत अंतर्बाह्य संचला ।
ऐसाहि आदिपुरुष तुझे ठायीं नाहीं जाला ॥ २ ॥
अधिष्ठानविवर्त्तत्वें वेद करिती वर्णन ।
चिच्छक्तीच्या योगें खेळे आपले ठायीं आपण ।
ऐसा जो कां परमात्मा तोही होतां स्वरूपीं लीन ।
चिच्छक्ति हे मावळलि तेथें कैचें ज्ञानाज्ञान ॥ ३ ॥
जरि कांहिं स्तुति करुं तरि येतें वाच्यपण ।
श्रुति जेथें मौनावल्या इतराचा पाड कोण ।
निरंजनरघुनाथ सांडी ओवाळोनी मन ।
मीपण हारपलें जालें परेलागीं मौन ॥ ४ ॥

## आरती सूर्याची २६.

जयदेव जयदेव जयजय श्रीसूर्या ।
एकारति ओवाळु सुरगण-प्रभुवर्या ॥ धृ ॥
द्वादश नामें करुनि करितां तव प्रणती ।
दोष निवारुनि इच्छित मनोरथ पुरती ।

अर्घ्यप्रदान करितां पुण्याची प्राप्ती ।
दर्शनमात्रें साधक भवसागर तरती ॥ १ ॥

ब्राह्मणकुळासि दैवत तुजवांचुनि नाहीं ।
त्रिकाळ अर्घ्य देती द्विजवर लवलाहीं ॥
प्रथम अहूति अर्पण यज्ञाचे ठायीं ।
सर्व जगाचि दृष्टी तुजयोगें पाहीं ॥ २ ॥

दशयोजन मोठा रथ निजसारथि अरुण ॥
सप्तमुखाचा अश्व शोभतसे वहन ।
अठ्यायशीसहस्र ऋषि करिति स्तवन ।
निरंजन प्रार्थितसे करुनिया नमन ॥ ३ ॥

## आरती गणपतीची २७

जयजयाजी विघ्नहरा ब्रह्मरूपा निर्विकारा ।
पंचारति ओवाळीन निजभावें लंबोदरा ॥ धृ ॥

दिव्यतेजःपुंज मूर्ति गजानन वक्रतुंड ।
शुर्पकर्ण एकदंत सरळ शोभे शुंडादंड ॥
नेत्रयुग्मीं चंद्रसूर्य प्रभा फांकलि उदंड ।
चतुर्वेद मूर्तिमंत बाहु शोभति प्रचंड ॥ १ ॥

रत्नखचित मुकुटावरि कलगि मोतियाचा तूरा ।
नवरत्नमाळा कंठीं मध्यें शोभतसे हीरा ॥
केयूर कटकादि मिति नाहिं अळंकारा ।
पीतांबरावरि कांचिरत्नजाडित कडदोरा ॥ २ ॥

कस्तूरिचा टिळा भाळीं अंगिं सिंदूराची उटी ।
दिव्य पुष्पांचिया माळा दुर्वांकुर मुगुटीं ॥
पाशांकुश उर्ध्व करी हातिं मोदकाची वाटी ।
वेळोवेळा अभयकर होत असे भक्तासाठीं ॥ ३ ॥

## आरती २८ रामाची.

जयजयाजी रामराया करि कृपेची छाया ।
पंचारति ओवाळुनि करूं कुरवंडी पाया ॥ धृ ॥
ब्रह्मयाच्या वरदानें दैत्य रावणकुंभकर्ण ।
अजिंक होवुनिया देव पीडिले संपूर्ण ।
दितिकुळ तृप्त जालें भक्षुनिया ऋषिगण ॥ १ ॥
भूभार हारावया रघुकुळीं अवतार ।
कौसल्येचे ठाईं जालें परब्रह्म साकार ।
दाशरथि रामचंद्र मूर्ति सावळि सुंदर ।
देव पुष्पवृष्टि करिति अयोध्येसि जयजयकार ॥ २ ॥
शेष सेवा करावया जाला बंधु लक्ष्मण ।
ताटिकेसी मारियलें केलें मखाचें रक्षण ।
शिवचाप भंगोनिया वरिली सीता सुलक्षण ।
भार्गवाचा गर्व हरिला येतां अयुध्येलागुन ॥ ३ ॥
पितृआज्ञे वनवास देवकार्यार्थ केला ।
सुग्रिवादि वानरांचा समुदाय मेळविला ।
पाण्यावरि दगडांचा दृढसेतु बांधिला ।
रावणातें दंडुनिया सीताशोक निवारिला ॥ ४ ॥
पुष्पकविमानांत सीतारामलक्ष्मण ।
नळनीळ जांबुवंत सुग्रिव भक्त हनुमान ।
अयोध्येसि येते जाले भरतासि संबोखुन ।
रघुराज गुरुपायीं ठेवि मस्तक निरंजन ॥ ५ ॥

# निरंजन स्वामीकृत फुस्ट आर्या.

## आर्या १.

सावध होइ मनारे नाहीं सुख या कदापि संसारीं ।
आठवितां कंसारी तरि मग सुख या उदंड संसारीं ।

## आर्या २.

धन्य ह्मणावे तेचि ज्यांनीं स्वरुपींच वृत्ति वाढविली ।
विषयगजाचें शुंडपासुनि वृत्ती हळूंच सोडविली ॥ १ ॥

# निरंजन स्वामीकृत दोहरे.

## दोहरा १

निरंजन मन मारा नहि छोडदिया घरदार ।
फीर फीर घर कुल्याय गामन मतंग अनिवार ॥ १ ॥

# निरंजन स्वामीकृत श्लोक.

## स्फुट श्लोक. १

ऐका ब्रह्म कसें अखंड विलसे चिद्रूप तें फारसें ।
त्याचा पार नसे अनावरपणें स्वातंत्र्य तेणें वसे ॥
विश्वामाजि असे परंतु न दिसे धुंडाळिल्या डोळसे ।
रघुनाथासि पुसे निरंजनिं वसे तेव्हांचि तें गीवसे ॥ १ ॥

## स्फुट श्लोक २.

नाशिकपंचवटीं बहूत निकटीं गोदावरीचे तटीं ।
नांदे श्रीरघुनाथमूर्ति बरवी पाहूं चला हो दिठीं ।
ज्याचे पादपद्मांबुजासि नमितां जीवासि हाती सुटी ।
ब्रह्मानंदसुखासि पावुनि हरे भवताप ऊठाउठी ॥ १ ॥

# निरंजनस्वामीकृत अष्टक

## रघुविराष्टक १

जनस्थान गंगातटीं सव्यभागीं । वसे श्रीगुरूराज सर्वज्ञ योगी ।।
जगीं योग्य जो कीर्ति वाचेसि गाया । नमस्कार त्या श्रीरघूराज पाया ।।१।।
वैराग्य ज्यांचे वदुं काय वाणी । स्वर्गादिकीं भोगहि तुच्छ मानी ।
नसे दूसरा त्यापरी आचराया । नमस्कार त्या श्रीरघूराजपायां ।। २ ।।
रक्षोनिया धर्म वर्णाश्रमातें । सदा आचरे वेद आज्ञा क्रमातें ।
लावीतसे लोकहि आचराया । नमस्कार त्या श्रीरघूराज पायां ।। ३ ।।
क्षमादयाशांति उदारतेला । सेवोनिया पूर्णपणें निवाला ।
जयाचे घरीं बोध आला वसाया । नमस्कार त्या श्रीरघूराजपायां ।। ४ ।।
विज्ञानिचा केवळ पूर्ण सिंधू । नसे चित्तवृत्ती तरंगादि बाधू ।
करी योजना साधकांतें तराया । नमस्कार त्या श्रीरघूराज पायां ।। ५ ।।
वदे सर्वदा नम्रवाचेसि वाणी । वसे अर्थ तो वेदशास्त्रीं पुराणीं ।।
सदा झीजवी ऊपकारार्थ काया । नमस्कार त्या श्रीरघूराज पायां ।। ६ ।।
मुमुक्षू जनांतें करी शक्तिपाता । करूं जे शकेना कदाही विधाता ।।
अनाथा जिवाची करी दूर माया । नमस्कार त्या श्रीरघूराज पायां ।। ७ ।।
नव्हे सद्गुरू मानवी हा कदापी । परब्रह्मरूपें जगा मुक्ति मापी ।
वसे नित्य नीरंजनाचेचि ठाया । नमस्कार त्या श्री० ।। ८ ।।

## गोपालकृष्णाष्टक २.

जन्मोनी व्रज गोकुळीं यदुकुळीं मूर्ती बरी सावळीं ।
शोभे भूषणयुक्त रूप बरवी मंडीत मुक्ताफळी ।
ज्याचा पार अपार सार मथितां वेडावल्या त्या श्रुती ।
सद्भावें नमितो लया यदुविरा गोपाळकृष्णाप्रती ।। १ ।।
देहूडा पद ठेवुनी निशिदिनीं व्यक्ती बहू ठेंगणी ।
लीला दाउनि फारसी बहु करी वेणूचिया सुध्वनी ।।

पंचत्री न करीं धरी बहु परी नाना अयूधाप्रती ।
सद्भावें नमितों तया यदुविरा गोपाळकृष्णाप्रती ॥ २ ॥
माळाचक्र गळां सुशंख बरवा गोवर्धनातें धरी ।
मर्दूनी फणिपाळ काळ रगडी पायांतळीं श्रीहरी ॥
गाई वत्ससहीत युक्त बरव्या पादांबुजा चाटिती ।
सद्भावें नमितों तया यदुविरा गोपाळकृष्णाप्रती ॥ २ ॥
कर्णीं कुंडल शोभताति बरवे मकराकृती ते बरे ।
वाटे चंद्र दिवाकरासि उपमा निर्मीत हे दूसरे ॥
हस्तीं कंकण शृंखळा बहुबऱ्या त्या सुप्रभा विलसती ।
सद्भावें नमितों तया यदुविरा गोपाळकृष्णाप्रती ॥ ३ ॥
माथा मूगुट साजिरा बहु बरा शोभे तयासी तुरा ।
भाळीं टीळक रेखिला परिमळा चर्चूनियां केशरा ॥
स्वच्छंदें निजमस्तकीं धरितसे शिवसांबगौरीप्रती ।
सद्भावें नमितों तया यदुविरा गोपाळ कृष्णाप्रती ॥ ५ ॥
राधारुक्मिणि यूवत्या बहुबऱ्या दोहींकडे साजिऱ्या ।
वस्त्रें भूषणयुक्त फार बरव्या लाहानशा गोजिऱ्या ॥
पायांचे निकटीं वसे खगपती वैचित्र्य त्याची गती ।
सद्भावें नमितों तया यदुविरा गोपाळकृष्णाप्रती ॥ ६ ॥
गंगेपासुनि दीडयोजन असे मोहोदधी क्षेत्रहो ।
नांदे त्यास्थळिं प्रेमयुक्त बरवा श्रीकृष्णगोपाळ हो ।
ज्याचे पादपदांबुजासि नमितां जोडे बहू संपती ॥
सद्भावें नमितों तया यदुविरा गोपाळकृष्णाप्रती ॥ ७ ॥

## भैरव अष्टक ३

### श्लोक.

श्रीकाशीपुरि क्षेत्ररक्षण करि विघ्नाप्रती संहरी ।
दुष्टा दंडुनि पातकां परिहरी सुष्टासि स्वर्गांतरी ॥
नेवोनि अति सौख्य देउनि तया मुक्तीवधी सुंदरी ।
त्या भैरवचरणांबुजीं मन रमो माझें मिलिंदापरी ॥ १ ॥

भस्मोध्दूलित अंग शोभत सदा रुद्राक्षमाला धरी ।
चौफेरी उधळे गुलाल सगळा पोषाक तो भर्जरी ।
कस्तूरीतिलकासि लावुनि वरी ऊटी बरी केशरी ॥
त्या भैरवचरणांबुजीं मन रमो माझें मिलिंदापरी ॥ २ ॥
माथा शोभति पिंगटा बहुजटा सुस्निग्ध त्या चोखटा ।
वेष्टूनी मुकुटाकृती चमकती वीचित्र ज्याच्या सटा ॥
भ्रूपल्लव विकटा विलोकुनि भटा भीती वसे अंतरीं ।
त्या भैरवचरणांबुजीं मन रमो माझें मिलिंदापरी ॥ ३ ॥
अतसीचे कुसुमासमा तनुरमा नासापुटें साजिरीं ।
दृष्टी सौख्य करीं वसे अतिबरी आकर्ण नेत्रांतरी ॥
मीशाला अति पीळ नीळ परि जा बिंबोष्ठ गल्लावरी ।
त्या भैवरचरणांबुजीं मन रमो माझें मिलिंदापरी ॥ ४॥
रत्नाचे बहु हार मौक्तिक गळां हे मात ते ओविली ।
लावोनी पदकासि लोंबति सदा एकावळी गोविली ॥
कर्णीं कुंडल सूर्यमंडळ परि त्रैलोक्य तेजें भरी ।
त्या भैरवचरणांबुजीं मन रमो माझें मिलिंदापरी ॥ ५ ॥
मृगश्रृंगांकित पुंगिनादश्रवणें माथा अही डोलवी ।
वेदें जें प्रतिपाद्य आद्य निज ते डमरूकरीं बोलवी ॥
सत्वादि त्रिगुणात्मरूपचि असे त्रीशूळ ज्याचे करीं ।
त्या भैरवचरणांबुजीं मन रमो माझें मिलिंदापरी ॥ ६ ॥
ज्याची कीर्ति दिगंतरीं निनदती कंपीत होती अरी ।
शंभूची नगरी अचिंत्य सुगरी आखंड वस्ती करी ।
विज्ञाना विवरी गुणत्रयनुरी ठेवोनि चीदंबरीं ।
त्या भैरवचरणांबुजीं मन रमो माझें मिलिंदापरी ॥ ७ ॥
शोभे ज्ञाननिधीच सर्व अगळा विश्वाहुनी वेगळा ।
तेज्याचा पुतळा सुखाब्धि विमळा आचिंत्य ज्याची लिळा ।
सर्वांलाश्रय व्हावया वदविली नीरंजनीं वैखरी ।
त्या भैरवचरणांबुजीं मन रमो माझें मिलिंदापरी ॥ ८ ॥

श्रीराम.

# निरंजन स्वामी कृत अभंग.

## अभंग १.

अहो धन्य तेचि जाणा । जे कां जाणती आपणा ।
धन्य त्याची देशभूमी । चित्त अर्पियलें रामीं ॥ १ ॥
मातापितरें धन्य केलीं । कुळें बेताळीं तारिलीं ॥ २ ॥
केली कल्पना खंडण । चुकविलें येणें जाणें ॥ ३ ॥
निरंजनीं झाले स्थिर । गुरु पाहिला रघुवीर ॥ ४ ॥

## अभंग २

धन्य ते संसारीं प्राणी उदासीन । निजरूपीं मन ठेलें ज्यांचें ॥ १ ॥
जयांचिया वृत्ती मागे ऊलटल्या । स्थिति पालटल्या एकसरा ॥ २ ॥
त्याच्या दरशनें जोडे पुण्यराशी । स्पार्शितां पायासी मुक्ति जोडे ॥ ३ ॥
निरंजन ह्मणे तया शरण जावें । स्वकार्य साधावें तया कृपें ॥ ४ ॥

## अभंग ३

धन्य तेचि प्राणी स्वरुपिं वेधले । अंतरीं बोधले एकसरा ॥ १ ॥
कल्पनेचें झाड टाकिलें छेदून । वैराग्याचें उष्ण वरी दीलें ॥ २ ॥
सद्गुरुवाक्याचा लाऊनिया अग्न । जहाले निमग्न ब्रह्मरूपीं ॥ ३ ॥
निरंजन ह्मणे ठाईंच निमाले । पुन्हा नाहीं आले आकारासीं ॥ ४ ॥

## अभंग ४

निंदकाचें घर असावें शेजारी । उणें सर्वांपरी लक्षीतसे ॥ १ ॥
निंदक आमूचा सोइरा सज्जन । धुणें मोलवीण धूवीतसे ॥ २ ॥
निंदकाची जात सूकराप्रमाणें । न ठेवी मळीण संतांलागीं ॥ ३ ॥
निरंजन ह्मणे निंदुनीया घ्यावें । दोषातीत व्हावें सर्वांपरी ॥ ४ ॥

## अभंग ५

ऐक रे निंदका जळो तूझें तप । योग खटाटोप सर्व काहीं ॥ १ ॥

अंतरिं मांगासी देउनिया थारा । वरती आचारा दाखवीसी ॥ २ ॥
तुझे अंगीं पाप ताप वसे सदा । पराव्याची निंदा करीतोसी ॥ ३ ॥
निरंजन ह्मणे नरकाची सामुग्री । मेळवीसी बरी निंदका तूं ॥ ४ ॥

अभंग ६

निंदक ह्मणजे खेड्याचा कुतरा । साधुच्या धोतरा फाडूं धावे ॥ १ ॥
हाड ह्मणुनीया उगारितां धोंडा । विचकूनी तोंडा पूढें धावे ॥ २ ॥
पळोनियां जातां करि पाठलाग । मनामाजि राग धरूनीयां ॥ ३ ॥
निरंजन ह्मणे मुकाट्या बैसावें । श्वान सांडी हाव भुंकायाची ॥ ४ ॥

अभंग ७

हरिभक्ति करा साडूनि फुगारा । जन्म बारोबारा येणें नाहीं ॥ १ ॥
संपत्तिच्या भरी नका जाऊं कोणी । राहिल ठिकाणीं जैशी तैशी ॥ २ ।
पुत्रमित्रदारा मसाणिचे बोळावे । यांसि जीवेंभावें भूलूं नका ॥ ३ ॥
निरंजन ह्मणे सखा करा हरी । जन्ममृत्यू फेरी चुके जेणें ॥ ४ ॥

अभंग ८

आपुणाचि देव झाला । सर्व होऊनि राहिला ॥ १ ॥
तोचि धन्य या संसारीं । चूकविली जन्मफेरी ॥ २ ॥
चारि वर्णिताती गूण । साहि झाले बंदीजन ॥ ३ ॥
निरंजन धन्य झाला । रघुवीर गुरू केला ॥ ४ ॥

अभंग ९

आधिं देव आपुण व्हावें । मग देव पाहूं जावें ॥ १ ॥
तैसें झाल्या वांचुनि कांहीं । अनुभव सत्य येतचि नाहीं ॥ २ ॥
आपण राज्यावरी बैसावें । सौख्य उपभोग घ्यावे ॥ ३ ॥
आपण मेल्यावीण कांहीं । स्वर्ग दीसतची नाहीं ॥ ४ ॥
रघुवीरासि शरण जावें । निरंजन तेणें व्हावें ॥ ५ ॥

अभंग १०

खोड्यामधीं पाय घातला ज्या द्वारें । काढावा सत्वरें तिकडोनी ॥ १ ॥

चक्रव्यूहामाजी शिरावें जेथूनी । यावें परतूनि त्याचि वाटे ॥ २ ॥
तैसेंचि हें मन उठिलें जेथूनी । न्यावें त्या ठिकाणीं फीरुनियां ॥ ३ ॥
सहजीं जाईल मन हें विलया । मुक्त होणें जाया नको कोठें ॥ ४ ॥
निरंजन सांगे अनुभवाची गोष्टी । नको होऊं कष्टी आणीकानें ॥ ५ ॥

अभंग ११

हिऱ्याचे शस्त्रानें हिऱ्याची घडणी । दुसरि करणी नाहीं तेथें ॥ १ ॥
काष्टसंघट्टनीं निघे जैसा अग्नी । काष्टातें जाळूनी टाकीतसे ॥ २ ॥
तैसें हें मनानें मनाचि मारावें । सहजची व्हावें ब्रह्म मग ॥ ३ ॥
निरंजन सांगे रघुनाथाची खूण । करा त्याप्रमाणें तुह्मी सर्व ॥ ४ ॥

अभंग १२

धन्य रघुनाथ सद्गुरू पाहिला । संशय हा गेला ऊठाऊठी ॥ १ ॥
वेदशास्त्रें ज्यासी देताती संमत । तें हें मूर्तीमंत दाखवीले ॥ २ ॥
बहूत ठिकाणीं पाहियलें ज्ञान । परि ते अज्ञान दिसुनी आ॑ ॥
निरंजन ह्मणे रघुविरासारिखा । दुजा नाहीं देखा कलीमाजी ॥ ४ ॥

अभंग १३

रघुनाथ माझा सद्गुरु सोयरा । नाहीं पारावारा त्याचे गूणा ॥ १ ॥
बहूता जनाशी तारक तो जाला । धर्म प्रगटला कलीमाजी ॥ २ ॥
एका द्विजालागीं काशिक्षेत्रामाजी । दर्शन जी तेथें त्यानें दीलें ॥ ३ ॥
निरंजन ह्मणे द्वारके माझारी । दर्शन द्विवारीं मज जालें ॥ ४ ॥

अभंग १४

दयाळा कृपाळा स्वामि दिगंबरा । कृपेच्या दातारा दीनबंधू ॥ १ ॥
संसाराचे संगें बहु कष्टी झालों । त्रितापें तापलों देहसंगें ॥ २ ॥
तुजवीज कोण आह्मांसी निर्वाणीं । येई चक्रपाणी धांवोनीयां ॥ ३ ॥
निरंजन ह्मणे देई आतां भेटी । नको करूं कष्टी देवराया ॥ ४ ॥

अभंग १५

दिगंबरा स्वामि अगा दयाघना । येऊंदे करुणा अनाथाची ॥ १ ॥

मायामोहजाल टाकावे छेदून । करावें धावणें दीनबंधू ॥ २ ॥
अनाथासि आह्मां तुजवणि आतां । कोण आहे त्राता सर्वांपरी ॥ ३ ॥
निरंजन ह्मणे देई आतां भेटी । नको करूं कष्टी देवराया ॥ ४ ॥

अभंग १६

मायामोहपाश सोडवि संसार । हेंचि वारंवार मागतसे ॥ १ ॥
नलगे संपत्ति धनाचिये राशी । वैकुंठ मिराशी आह्मांलागीं ॥ २ ॥
एकवेळां पाय दाखवी सत्वरी । हेचि सर्वांपरी मागतसे ॥ ३ ॥
निरंजन ह्मणे देई आतां भेटी । नको करूं कष्टी देवराया ॥ ४ ॥

अभंग १७

षडभूजमूर्ति सावळी सुंदर । रूपमनोहर देखियली ॥ १ ॥
शंखचक्र हातीं त्रिशूळ डमरू । कासे पीतांबरु कसीयेला ॥ २ ॥
माळा कमंडलू शोभति दोंहातीं । गळां वैजयंती रुळतसे ॥ ३ ॥
निरंजन ह्मणे सद्गुरु निधान । हेंची माझें धन सर्वांपरी ॥ ४ ॥

अभंग १८

आम्ही तरी जालों सर्वस्वी उदास । धरियेली कास देवा तूझी ॥ १ ॥
सोडियले सर्व घरे संवसार । लौकिक वव्हार घेणें देणें ॥ २ ॥
सर्व जगताची नाहीं आह्मां लाज । जाहलों निर्लज्ज सर्वांपरी ॥ ३ ॥
निरंजन ह्मणे स्वामि दत्तात्रया । सांभाळीं सखया कृपासिंधू ॥ ४ ॥

अभंग १९

मायबाप आणि सोईराधाईरा । तूचि दिगंबरा आम्हालागीं ॥ १ ॥
तुजवीण आतां आह्मासी जिवलग । आहे कोण सांग देवरावा ॥ २ ॥
पापी तरी आम्ही आठवितों तूज । कां गा नये लाज बाळकाची ॥ ३ ॥
निरंजन ह्मणे देवा तुझे पायीं । ठेवियेली डोई सर्वांपरी ॥ ४ ॥

अभंग २०

मज नाहीं धन संपत्तीची चाड । आयुष्यही वाड नको आह्मां ॥ १ ॥
सिद्धीचीही आह्मा नको खटाटोपी । मुक्तीही आटोपी तूझी तूंची ॥२॥

सोडियेली आशा आह्मी सर्वांपरी । वाईट वा बरी देवराया ॥ ३ ॥
निरंजन ह्मणे गुण तुझे गाऊं । संगतीनें राहूं संतांचिये ॥ ४ ॥

अभंग २१

नाहीं आह्मां पापपुण्यासी कारण । नाहीं येणें जाणें स्वर्गलोकीं ॥ १ ॥
पातकाचा वाटा निंदकासी दीला । स्तुति करिति त्याला पुण्य दीलें ॥२॥
दोन्हींभागीं आह्मी अलिप्त सर्वदा । स्तुती करो निंदा कोणी तरी ॥३॥
निरंजन ह्मणे निरंजन आह्मी । कर्मया कर्मीं अलिप्तची ॥ ४ ॥

अभंग २२

दत्तत्रया स्वामि सर्वांचा हो दाता । नाहीं ठाव रीता तयावीण ॥ १ ॥
भागीरथीमाजी सारूनिया स्नान । करि भिक्षाटन कोल्हापूरीं ॥ २ ॥
पंचाळेश्वरासी भोजनासि जावें । आसन करावें शेषाचळीं ॥ ३ ॥
माहूरपर्वतीं करुनिया निद्रा । गिरिनारीं मुद्रा सारीतसे ॥ ४ ॥
निरंजनिं वनिं अक्षई रहातो । धावूनीया येतो आठवितां ॥ ५ ॥

अभंग (ग्रंथाचे) २३

येई वो श्रीगूरू स्वामि दत्तात्रया । दयाळा सखया दीनबंधू ॥ १ ॥
अनाथाचा नाथ कृपेचा सागर । बहू तूं उदार सर्वांगूणें ॥ २ ॥
भक्तकाजासाठीं धाऊनियां येसी । हेचि वागवीसी ब्रीद सदा ॥ ३ ॥
निरंजन ह्मणे धाउनिया यावें । ग्रंथ ऊठवावे जळाले ते ॥ ४ ॥

अभंग २४

गिरनारा ठाईं भेटुनीया तुवां । शब्द देवदेवा बोलीलासी ॥ १ ॥
निःसंग कविता गाई माझे गूण । निर्गूण सगूण कैसे तरी ॥ २ ॥
करिसि जे कविता चालेल पृथ्वीवरी । होईल सर्वांपरी मान्य सदा ॥३॥
निरंजन ह्मणे तरि त्वां सत्वरि यावें । ग्रंथ ऊठवावे जळाले ते ॥ ४ ॥

अभंग २५.

तुझे आज्ञेवरुनी वदलों कविता । पद आणि ग्रंथा करूनीयां ॥ १ ॥
तेथें जालें विघ्न जळाली कविता । रक्षा आली हातां मुष्टीभरी ॥ २ ॥

तेचि रक्षा आतां बांधोनीं पदरीं । सप्तशृंगावरी आलों स्वामी ॥ ३ ॥
निरंजन ह्मणे धाऊनीयां यावें । ग्रंथ ऊठवावे जळाले ते ॥ ४ ॥

अभंग २६

स्वामी दिगंबरा न येसि दातारा । निश्चय हा खरा ऐके माझा ॥ १ ॥
पहिल्यासारीखे सिद्ध व्हावे ग्रंथ । हेंचि मनोरथ पूरवावें ॥ २ ॥
नाहींतरी देह तवपायीं ठेवीला । निश्चय हा केला पूर्णपणें ॥ ३ ॥
निरंजन ह्मणे धाऊनीयां यावें । ग्रंथ ऊठवावे जळाले ते ॥ ४ ॥

अभंग २७

इतुक्यानें तूज कष्टवीतों देवा । परंतु केशवा न बोलेचि ॥ १ ॥
तुझा पूर्णपणें मजसी भरंवसा । ह्मणोनियां ऐसा निश्चय केला ॥ २ ॥
तुझे कीर्ती गूण वर्णिले ज्या ग्रंथीं । त्याची रक्षा माती व्हावी काय ॥ ३ ॥
निरंजन ह्मणे धाऊनीयां यावें । ग्रंथ ऊठवावे जळाले ते ॥ ४ ॥

अभंग २८

ऐसे पांच दिन सरोनिया गेले । रात्रिं स्वप्नीं आले दत्तात्रय ॥ १ ॥
ह्मणति निरंजना खेद न करी मना । ग्रंथ अवलोकना ऊठ वेगीं ॥ २ ॥
जागें होवोनिया रक्षेसि पाहीलें । तंव ते ग्रंथ जाले पहिल्यावाणी ॥ ३ ॥
निरंजन ह्मणे धन्य आजी झालों । आनंद पावलों गुरुकृपें ॥ ४ ॥

अभंग २९

रघुवीरकृपा बरि संपादीली । तेचि कामा आली यथाकाळीं ॥ १ ॥
दत्तात्रय स्वामी संकष्टा पावले । दुःख नीवारीलें सर्व माझें ॥ २ ॥
धन्य आह्मी जालों संसारा येऊन । आतां गाऊं गूण श्रीगुरूचे ॥ ३ ॥
निरंजन ह्मणे अपराध क्षमा । करा सर्वोत्तमा अनाथाचा ॥ ४ ॥

अभंग ३०.

येई येई दत्तात्रया । माझ्या कीर्तनाच्या ठाया ॥ १ ॥
रंगदैवता आमुची । तूंचि सर्वापरी साची ॥ २ ॥

गावे तुझे कीर्तिगुण । ऐसें इच्छी माझें मन ॥ ३ ॥
निरंजन ह्मणे देवा । घेई आतां माझी सेवा ॥ ४ ॥

अभंग ३१.

आइके हो कांते माझें हें उत्तर । लुटवी संसार सर्व कांहीं ।
उत्तम-वसनें भांडें पात्र धन । संग्रह करणें काशा आह्मां ॥ २ ॥
लिहिलें प्राक्तनीं न चुके सर्वथा । मग कां हें वृथा सांठवावें ॥ ३ ॥
ऐसा बोलुनीया शुद्ध निरंजन । दि॰ा लुटवून संवसार ॥ ४ ॥

अभंग ३२.

आत्मा तो निर्गूण अवयवावीण । सांगतों मी खूण त्याची तुह्मा ॥ १ ॥
बोलतां जे नये बोलोनि दावीतों । चंद्र दाखवीतो शाखेहूनी ॥ २ ॥
टाकोनि पोकळी शब्दाचा किंकार । पाहे चिदाकार आकाशासी ॥ ३ ॥
चिद तो प्रकाश सदा अविनाश । दिवसरात्रि वास नाहीं जेथें ॥ ४ ॥
निरंजन ह्मणे तेंचि चिदाकाश । आत्मा सावकाश ओळखीतो ॥ ५ ॥

अभंग ३३.

काय वर्णू त्याचीं थोरी । नित्य वाचे ज्याच्या हरी ॥
अहो सर्व चराचर । दृष्टि पाहे ब्रह्माकार ॥ २ ॥
तेणें योगयाग केले । सर्व कर्मे संपादीले ॥ ३ ॥
निरंजन वदे वाणी । तोचि संतशिरोमणी ॥ ४ ॥

अभंग ३४.

पामर जनाचा काय संवसार । वृथा भूमिभार केला तेणें ॥ १ ॥
शिणविली माता पिता दोघे जण । जन्मासि येऊन श्रमी जाला ॥ २ ॥
वाचेलागि कदा नये रामनाम । कर्महीं निष्काम नाहीं केलें ॥ ३ ॥
निरंजन ह्मणे तयाचें हें मूख । पाहूं न सन्मूख दृष्टीलागीं ॥ ४ ॥

अभंग ३५.

आह्मी जालों रे भाग्यवंत । घरा आले साधुसंत ॥ १ ॥
आजि सुदिन आह्मासी । प्राप्त झाली सूखराशी ॥ २ ॥

जाली आनंदाची सीमा । नाहिं जयासी उपमा ॥ ३ ॥
निरंजन मन धालें । पापतापदैन्य गेलें ॥ ४ ॥

अभंग ३६.

प्रथम नमन मारुतिरायासी । चिंतन मानसीं करूनीया ॥ १ ॥
जेणें सीताशोक केला निवारण । लंकेपी जाळून शुद्ध केलें ॥ २ ॥
तो हा बलभीम येवो या कीर्तनीं । देवो प्रेमधणीं आह्मालागीं ॥ ३ ॥
रघुवीरगूण गाय निरंजन । वायूचा नंदन आठवोनी ॥ ४ ॥

अभंग ३७.

स्वामि रुद्रअवतार । त्यांसि वंदूं वारंवार ॥ १ ॥
गाउं वाचेलागीं गूण । धन्य मारूती ह्मणून ॥ २ ॥
मनीं करूनीया ध्यास । नयनिं पाहूं सावकाश ॥ ३ ॥
जो कां निरंजनवासी । भावें शरण आह्मी त्यासी ॥ ४ ॥

अभंग ३८

देंवा देई तुझी भक्ती । आह्मां नको चारी मुक्ती ॥ १ ॥
देवा देई ऐसें प्रेम । जेणें येई तूज धाम ॥ २ ॥
गुण गाऊं वेळोवेळां । तुज येई कळवळा ॥ ३ ॥
ह्मणे निरंजन दास । आह्मां देई भक्तीरस ॥ ४ ॥

अभंग ३९

काय वांचूनीया केलें । तुज नाहीं आठविलें ॥ १ ॥
व्यर्थ घातलें आयुष्य । भोगविषयाच्या मिसें ॥ २ ॥
देवा गेलों गेलों वाया । धांव धांव विठ्ठराया ॥ ३ ॥
करि कृपेचें पोषण । ह्मणे दास निरंजन ॥ ४ ॥

अभंग ४०

दवा देई ऐसें देणें । नको कोणासी मागणें ॥ १ ॥
पुरे होऊं दे वासना । सर्व माझी नारायणा ॥ २ ॥

हेंचि देई मजलागीं । धन्य होईन मी जगीं ॥ ३ ॥
निरंजन लागे पायां । कृपा करा रघूराया ॥ ४ ॥

अभंग ४१

नको नको संवसार । देव अंतरला दूर ॥ १ ॥
जळो विषयवासना । वीसरलों नारायणा ॥ २ ॥
जन्म व्यर्थ घालवीला । अंतकाळ नेटीं आला ॥ ३ ॥
निरंजन ह्मणे आतां । धांव पाव रघूनाथा ॥ ४ ॥

अभंग ४२

सर्पाचिये तोंडी विषाची गरळ । चालणें सरळ नाहीं कदा ॥ १ ॥
तैसा निंदक जो जातीनेंही खळ । बोले अमंगळ सर्वा जना ॥ २ ॥
साधु तरि त्याच्या बापाचा वयरी । दाट्ठनिया करी निंदा त्याची ॥ ३ ॥
निरंजन ह्मणे शांतीचा तो मंत्र । तेणें अपवित्र आकळावा ॥ ४ ॥

अभंग ४३

आपूण नरकीं बुडोनि वडील । बाळासी पुढील सांगताती ॥ १ ॥
करावा संसार चांगला थाट्टन । लोकीं भलेपण मेळवावें ॥ २ ॥
न कळे आपण केला संवसार । काय हितकर जाला बहु ॥ ३ ॥
निरंजन ह्मणे रांडेच्या गाढवा । काय हितठेवा बोललासी ॥ ४ ॥

अभंग ४४.

तेंचि वयराग्य म्हणूं आह्मी पूरें । नाहीं तरी बा रे जैसें जैसें ॥ १ ॥
सर्व विश्व डोळां पाहे आत्माकार । द्वैत विकार न ये कदा ॥ २ ॥
मृगजळवत उपभोग नाना । दिसताती जाणा जयालागीं ॥ ३ ॥
विषयातें घेणें आणिक टाकणें । विसरलें मन ज्याचें सदा ॥ ४ ॥
निरंजन ह्मणे तो गुरु आमूचा । अनुभव साचा ज्याशीं आहे ॥ ५ ॥

अभंग ४५

सुखासाठीं जग भोगीति विषय । परि दुःखमय होती बहू ॥ १ ॥
जैसा पतंग धावे दीपावरी । सुख नाहीं परी दुःख होय ॥ २ ॥

सर्व संवसार दुःखाचा सागर । नाहीं अंतपार तयालागीं ॥ ३ ॥
निरंजन ह्मणे सोडा संवसार । उतरील पार हरी तुह्मां ॥ ४ ॥

अभंग ४६

तेची भक्ती खरी । देव अंतरीं बाहेरी ॥ १ ॥
चराचर नरनारी । दिसे जयालागीं हरी ॥ २ ॥
जया देवभक्तपण । नाहीं द्वैताचें भान ॥ ३ ॥
बोले नित्य निरंजन । करा तयासी वंदन ॥ ४ ॥

अभंग ४७

देहे पंढरी पंढरी । आत्मा उभा वीटेवरी ॥ १ ॥
लिंग देहाचें राउळ । बुद्धि रुक्मीणि वेल्हाळ ॥ २ ॥
मन पुंडलीक उगा । वृत्ति स्थिर चंद्रभागा ॥ ३ ॥
निरंजन ह्मणे हरी । देखियला निजघरीं ॥ ४ ॥

अभंग ४८

काय होऊं उतराई । तया सद्गुरूच्या पाईं ॥ १ ॥
ज्याच्या वचनें संसार । उठाउठीं जाला दूर ॥ २ ॥
देऊं धनसंपत्तीसी । तरि ते मिथ्या जडराशी ॥ ३ ॥
देह करावा अर्पण । तरि तो नाशवंत जाण ॥ ४ ॥
निरंजन ह्मणे फार । करूं आतां नमस्कार ॥ ५ ॥

अभंग ४९

कामक्रोध यांनीं बहूत गांजीलें । श्रम बहु जाले जीवालागीं ॥ १ ॥
धाव हरी आतां न पाहीं निर्वाण । आले पंचप्राण कंठाप्रशीं ॥ २ ॥
जरि तूं न येसी आतां देवराया । तारे दास वायां जाऊं पाहे ॥ ३ ॥
निरंजन ह्मणे स्वामी रघुवीरा । यावें गोदातीरा दीनबंधू ॥ ४ ॥

अभंग दत्तजन्माचे.

ॐ नमोजी गुरु स्वामी दत्तात्रया । कृपाळू सखया दीनबंधू ॥ १ ॥
तुझे कीर्तीगूण वर्णाया लागून । इच्छितसे मन माझें बहू ॥ २ ॥

तरि देई मती वदावया वाणी । आनंदाची खाणी प्रगटाया ॥ ३ ॥
आयका हो तुह्मी श्रोते संतजन । जन्म सुलक्षण श्रीदत्ताचा ॥ ४ ॥
सावित्री आणिक लक्ष्मी पार्वती । एके ठायीं स्थीति जाली होती ॥ ५ ॥
अकस्मात आली नारदाची फेरी । विणा स्कंधावरी घेउनीया ॥ ६ ॥
देवोनिया त्यातें बैसाया आसन । पुसती वर्तमान त्रैलोकींचें ॥ ७ ॥
अहो नारदमुनी त्रैलोक्यभुवनी । आह्मा ऐशा कोणी असती काय ॥ ८ ॥
पतिव्रता आणि सर्व सत्ता आंगीं । ऐशा कोणी जगीं असती काय ॥९॥
ऐशा गर्विष्ट पाहे तिघीजणी । बोले नारदमुनी तयांलागीं ॥ १० ॥
तुमचीयाहुनि श्रेष्ठ कोटीगूण । देखिलीसे जाण पतिव्रता ॥ ११ ॥
भूलोकाचे ठायीं अत्रिमुनिजाया । सती अनुसूया नाम तिचें ॥ १२ ॥
तुम्हां ऐशा दासी तिजला शोभती । काय सांगू ख्याती तिची तुह्मा ।१३।
ऐसें आयकोनी मुनींचें वचन । मनामाजीं खिन्न जाल्या तीघी ॥ १४ ॥
आपुलिया घरा उठोनिया गेल्या । पतीसी बोलल्या जाऊनियां ॥ १५ ॥
आइका हो तुह्मा आमुचें वचन । कासावीस प्राण होती बहू ॥ १६ ॥
अनुसूयेची कीर्ती नारदमुनीनीं । वर्णिली येवोनि आम्हांपाशीं ॥ १७ ॥
तरि तुह्मी जावें मृत्युलोकाठायीं । अनुसूयेचे गृहीं लागवेगीं ॥ १८ ॥
हरोनिया तीच्या सत्वालागीं जाण । यावें परतून नीजघरा ॥ १९ ॥
स्त्रियांचें वचन आयकोनी कानीं । तिघे तत्क्षणीं उठीयेले ॥ २० ॥
ब्रह्मा विष्णू आणि तिजा चंद्रमौळी । निघाले ते काळीं मृत्युलोकां ॥२१॥
स्नानसंध्येलागीं अत्रिमुनि गेला । माध्यान्हीं पातला दिनमणी ॥ २२ ॥
तयाकाळीं तिघे होवोनि अतीत । गले अकस्मात भिक्षेलागीं ॥ २३ ॥
अनुसूयेलागीं मारूनीया हाक । बोलती कौतुक करोनीयां ॥ २४ ॥
भिक्षा घाली माते आम्हासी सत्वर । नग्न दिगंबर होवोनीयां ॥ २५ ॥
नाहीं तरि आम्ही जातों परतोनि । सत्वासी घेउनी तुझ्या आतां ॥ २६ ॥
आयकोनि ऐसें अतिथिवचन । पतिव्रतारत्न चिंतावलें ॥ २७ ॥
करोनीया मनीं पतीचें चिंतन । तीर्थातें घेऊन शिंपीयलें ॥ २८ ॥

तंव ते तिघेजण झाले चिमणेबाळ । रांगती लाडिवाळ होवोनियां ॥२९॥
अनुसूया नग्न होवोनि आपण । करि दुग्धापान तयां लागीं ॥ ३० ॥
तिघेजण एक्या पालखीं घालून । ओंविया गाऊन हालवीत ॥ ३१ ॥
इतुकियामाजी अत्रिमुनी आले । बाळांतें पाहिलें निज डोळां ॥ ३२ ॥
विस्मित होवोनि आपुलीया मनीं । ह्मणे श्रेष्ठ कोणी असती हे ॥ ३३ ॥
असो या लागून झाले बहुदिन । स्वर्गींचें भुवन शून्य ठेलें ॥ ३४ ॥
लक्षुमी पार्वती सावित्री या तीन्हीं । चिंताग्रस्त मनीं जाल्या बहू ॥ ३५ ॥
एके ठायीं सर्व होवोनीया गोळा । चिंता वेळोवेळां करितातो ॥ ३६ ॥
इतुक्यांत आली नारदाची फेरी । मंजुळ उच्चारी नाममंत्र ॥ ३७ ॥
देवोनि आसन बैसवीले मुनी । करिती विनवणी तयालागीं ॥ ३८ ॥
आमुचे भ्रतार गेले कोणीकडे । आम्हांसी सांकडें घालोनीयां ॥ ३९ ॥
तयांवीण आम्हां नगमेचि क्षण । जाले बहुदिन तयालागीं ॥ ४० ॥
तयांवीण सर्व शोभीत मंदीर । दिसति भयंकर आम्हांलागीं ॥ ४१ ॥
तुम्हांप्रती कोठें भेटतील तरी । सांगावें सत्वरीं आम्हांलागीं ॥ ४२ ॥
तंव बोले मुनि तया स्त्रियांप्रती । देखियेले पती तुमचे म्यां ॥ ४३ ॥
अनुसुयेचे घरीं तिघेजण बाळ । होवोनि लडिवाळ खेळताती ॥ ४४ ॥
आयकोनि ऐसें मुनींचें वचन । विस्मित होऊन बोलति त्या ॥ ४५ ॥
आमुचीया बोल्या गेले सतीघरीं । आम्हांलागीं घोरीं घालूनियां ॥ ४६ ॥
चला जाऊं आतां तयेचिया घरा । मागूनि भ्रतारा घेऊं आजी ॥४७॥
अभिमान दूर सांडुनिया जाण । पातल्या शरण अनुसयेसी ॥ ४८ ॥
म्हणती ' वो माते देई चूडेदान । करि बोळवण आम्हांलागीं ॥ ४९ ॥
भ्रतारावांचूनि आमुचे पंचप्राण । कंठापाशीं जाण आले माते ॥ ५० ॥
सर्वभावें आतां शरणागत आह्मी । द्यावे आमुचे स्वामी आह्मांलागीं ' ॥५१॥
पतिव्रता ह्मणे ' न्यावे आपुले पती । धरुनीया हातीं आपुलाले ॥५२॥
तंव त्या बोलती तिघीजणी तीतें । ओळख आह्मांतें नपडेची ॥ ५३ ॥
समान दिसती ब्रह्माविष्णुरुद्र । तिन्ही मुखचंद्र सारिखेची ॥ ५४ ॥

माय होवोनियां न होय मावशी । द्यावे हो आम्हांसी ओळखूनी ॥५५॥
ऐशा त्या वेल्हाळा पाहूनियां दीन । केलेंसें विंदान अनुसूयेनें ॥५६ ॥
पतीच्या तीर्थासी शिंपूनी मागुती । तिघींचेही पती दाखवीले ॥ ५७ ॥
ब्रम्हाविष्णुरुद्र होवोनि प्रसन्न । म्हणे 'वरदान मागें कांहीं' ॥५८॥
म्हणे अनुसूया 'द्यावे ऐसे वर । तिघेही कुमर तुम्हां ऐसे'॥ ५९ ॥
तथास्तु म्हणोनि देऊनीयां वर । ब्रह्मा हरीहर जाते झाले ॥ ६० ॥
तयांच्या प्रसादें जाले तिघे पुत्र । उत्तम पवित्र पुण्यशीळ ॥ ६१ ॥
विरंचीचा चंद्र शिवाचा दुर्वास । विष्णूचा तो अंश दत्तात्रय ॥ ६२ ॥
तया काळीं हर्ष जाला जयजयकार । येती सुरवर तया ठायां ॥ ६३ ॥
आनंदोनि देव वर्षति सुमनें । करिति निंबलोण सर्व जग ॥ ६४ ॥
निरंजन ह्मणे धन्य आजि दिन । पाहिलें निधान दत्तात्रय ॥ ६५ ॥

अभंग ५०

आह्मी आहों त्या गांवींचे । जुनें मिराशी आधींचे ॥ १ ॥
रूपालागीं नाहीं ठाव । त्या गांवाला कैचें नांव ॥ २ ॥
नाहीं द्वैताचा सोस । तेथें कैचा गांव-कूस ॥ ३ ॥
जग कुळवाड्याची वाण । तेथें कैंचें पाटिलपण ॥ ४ ॥
फिकी अनंत ऊपमा । तेथें कैची चतु:सीमा ॥ ५ ॥
नाहीं मायेचें अंजन । म्हणवुनि होय निरंजन ॥ ६ ॥

अभंग ५१

प्रल्हाद-कैवारी येई नरहरी । हृदयस्तंभांतरीं प्रगटे माझ्या ॥ १ ॥
काम हा दुर्धर हिरण्यकश्यपु । मारोनिया रिपु टाकी माझा ॥ २ ॥
मग मी होईन सर्वापरि सुखी । तुझें नाम मुखीं गावोनिया ।
निरंजन म्हणे स्वामी रामराया । दूर करीं माया-मोह माझा ॥ ४ ॥

**अभंग ५२**

अंजनी-नंदना येइ वायुसुता । सकळ-गुणवंता कळानिधि ।
तुझें नाम जरि उच्चारिलें वाणी । काळाचिये मनीं धाक वाटे ॥ २ ॥

तुझिया बळाची कोण करि सीमा । स्वामि बलभीमा महारुद्रा ॥ ३ ॥
निरंजन भावें शरण आला तुज । राखि माझी लाज सर्वोपरी ॥ ४ ॥

**अभंग ५३**

शिव जाला मार्तंड । मोडावया दैत्यबंड ।
करि दुष्टालागी दंड । भक्ताखंड रक्षिता ॥ १ ॥
मागूं प्रेमाची हे वारी । नरदेह रविवारीं ।
आलिया संसारीं । चुकवूं फेरी सर्वस्वें ॥ २ ॥
स्मरोनिया त्याचे गुण । येळकोट गाऊं गाण ।
भुंकूं होउनिया श्वान । त्याचे द्वारीं सर्वदा ॥ ३ ॥
निरंजन आला वाघा । जाउनि मल्हारीला सांगा ।
चरणीं थोडी जागा । द्यावी भागा येइल ती ॥ ४ ॥

अभंग ५४

हिंगणा शेजारीं उगवला चंदन । परि त्याचा गूण याला नये ॥१ ॥
बोरीच्या शेजारीं केलें केळीवन । परि त्याचा गूण याला नये ॥ २ ॥
मर्कटा शेजारीं बांधिलें हरिण । परि त्याचा गूण याला नये ॥ ३ ॥
खळाचे शेजारीं साधु निरंजन । परि त्याचा गूण याला नये ॥ ४ ॥

श्रीराम.

# निरंजन स्वामीकृत मराठी पदें.

## पद १.

येई येई श्रीगुरुराया । मुनिदत्तात्रया । करुणा करी ममनिजसखया । दाखवि तवपाया ॥ धृ ॥

बुडतों मी भवसागरडोहीं वेष्टुनिया मोहें ।
वाचविता यापासुनि मजला तुजविण कोण आहे ॥ १ ॥
कामादिक रिपु जळचर मोठे तोडिति लवलाहें ।
म्हणवुनिया तुज आठवितों मनीं पसरुनिया बाहे ॥ १ ॥
घरदारासुतसंपत्ति पाहुनि भुललों मी वायां ।
करितां त्यांची नित्य भरोभरि क्षिण झाली काया ।
दुःख असें परि मानुनिया सुख पडलों आपाया ।
चैन नसे क्षण एकहि एथें भाजति बहु लाह्या ॥ २ ॥
पसरुनिया खदिराचे इंगळ वरि केली शय्या ।
सर्पफणाताळीं बैसुनि दर्दुर मानितसे छाया ।
मूर्खपणें भ्रमलों मी देवा दुस्तर तवमाया ।
तैसें या संसाराठायीं सुख कैचें होया ॥ ३ ॥
धावुनिया पद दाखवि झडकरि निरंजनस्वामी ।
भक्तींचें बळ पुष्कळ प्रेमा देई तवनामीं ।
तारुनिया मज सत्वर नेई अपुले निजधामीं ।
या समयीं जरि सत्वर येसिल तरि हरि तरतों मी ॥ ४ ॥

## पद २ (गिरनाराचें)

लवकर देई भेटी । दिगंबर स्वामी या ॥ धृ ॥
सावळी सुंदर तनु । उगवले कोटी भानु ।
लावण्यता किती वानु । शक्ती नाहीं गायया ॥ १ ॥

कासियला पितांबर । माथा मुगुट सुंदर ।
गळां मुक्तचामीकर । गुंफीयल्या जाळिया ॥ २ ॥ दिगं.
षड्भुजा सकुमार । षडायुधें सुंदर ।
आंगीं कस्तुरी केशर । लावुनिया उटीया ॥ ३ ॥ दिगं.
स्वामि त्रैलोक्यविहारी । देखियला गिरनारीं ।
निरंजनें डोळेभरी । जीवन्मुक्त व्हावया ॥ ४ ॥ दिगं.

## पद ३

स्वामी रघुवीरा, मजला न्यावें हो निजमाहेरा । धृ ।
बरवी होते मी निजमाहेरीं । बापाचे घरीं । ज्ञप्ति अव्याक्ति घेऊनि पोरीं ।
खेळले बोहोरी । नाहीं पाहिला दुसरा वारा ॥ १ ॥
कोठुनि कल्पना रांड आली । विवसी घरघाली ।
तिनें इतुकी कळ लावुनि दिली । मध्यस्थी केली ।
अहंकार हा केला नवरा ॥ २ ॥ स्वामी रघु० ॥ २ ॥
कामाजीपंत वडिल भावाचा । लाविला दावा ।
आशा तृष्णा ह्या नंदाजावा । गाती उपरावा ।
मोठ्या गांजिति त्या सिरजोरा । स्वामी ॥ ३ ॥
चिंता सासू हे बहु ख्यातारी । घालिति घोरी ।
मन हा सासुरा कारभारी । गांजितो भारी ।
बहु श्रमले मी या संसारा । स्वामी रघु० ॥ ४ ॥
निरंजन झाला सासुरवासी । दुःखाच्या राशी ।
दाटुन जोडिल्या बहु सायासी । टाकुनी सुखासी ।
कंटाळुनि गेलों बहु संसारा । स्वामी रघु० ॥ ५ ॥

## पद ४

संसार वायां गेला । परमार्थ नाहीं झाला । धृ ।
पाहुनि लोकांचें वैराग्य । त्यजिले दाराघरसुत-भाग्य ।
मानुनि वर्णाश्रम आयोग्य । झाला गोसावी ॥ १ ॥

मागुनि घरोघरीं पिष्ट । भोजन सारावें यथेष्ट ।
सदासर्वदा मांगिष्ट । डोळे फिरवावे ॥ २ ॥
केला मठीमध्यें वास । लोकां दाखवि संन्यास ।
चित्तीं विषयाचा ध्यास । नाहीं खंडला ॥ ३ ॥
प्रपंच ना निरंजन । झाली दोही भागीं हानि ।
रघुवीर दयाघन। नाहीं पाहिला ॥ ४ ॥

पद ५

( उत्खातं निधिशंकया इत्यादि वैराग्यशतकांतील श्लोकावर )

तृष्णे सोडि हो मजलागुनी । रांडे पापिणी ॥ धृ ॥
द्रव्यासाठीं म्यां पृथ्वी खणिली । पर्वतावरिली ।
झाडें होतीं ते नव्हतीं केलीं । प्राप्ती न झाली ॥ १ ॥
उदिमासाठीं मी बहुत फिरलों । सिंधु उतरलों ।
सेवा नृपतीची करिता झालों । परि नाहीं धालों ॥ २ ॥
बहुत केले म्यां मंत्रतंत्र । करणी विचित्र ।
पुजिले स्मशानीं पिशाचमात्र । वाईट अपवित्र ॥ ३ ॥
प्राप्त न झाला फुटकी कवडी । करितां धडमोडी ।
निरंजन तृष्णेसि कर जोडी । मज आतां सोडी ॥ ४ ॥

पद ६

ब्रम्ह झालों आम्ही ब्रम्ह झालों । झालों ह्मणों तरि झालों ना गेलों ॥ धृ ॥
आपुला विसर पाडियला । ठाईठाईचिये ठाई विसरलों ॥ १ ॥
ब्रम्हासि पाहतां ब्रम्हरूप झालों । पाह्यासि न ठेलों कोण मी कैसा ॥ २ ॥
सूक्ष्म पाहतां अणुरेणु आंत । ब्रम्हांडें पोटांत साठविसा ॥ ३ ॥
निरंजन म्हणे निरंजन आम्ही । रघुनाथस्वामीकृपें झालों ॥ ४ ॥

पद ७

नाहीं नाहीं नाहीं अवघें नाहीं नाहीं । नाहीं ह्मणों तरि आहे सर्वाठायीं जैसेंचि तैसें ॥ धृ ॥

मी नाहीं तूं नाहीं विश्व सारें नाहीं । आहे सर्वाठायीं कोरेंचें कोरें ॥ १ ॥

वेदशास्त्र सारे बोलताति नाहीं । नाहीं ह्मणतां तेंहि झालें नाहीं ॥ २ ॥

पिंड ब्रह्मांडादि कांहीं झालें नाहीं । जीवशिव पाहीं मिथ्या सारे ॥३॥

निरंजन ब्रह्म ह्मणणें हेंहि नाहीं । आतां उगे राहीं बोलूं नये ॥ ४ ॥

पद ८

गेली गेली रे नरतनु हे वाया ॥ धृ ॥ धाकुट मनिं मनिं इष्ट असेल तें मिष्ट भरुनि तनु धष्टपुष्ट बहु केली ॥ १ ॥

तरुणपणीं मदमस्त विषय बहु स्वस्थ करुनि घरिं सुस्त निजुनि निजवस्तु हारवीली ॥ २ ॥

वृद्धपणीं ममपुत्र मित्रघर कलत्र ह्मणवुनि परतंत्रता अंतरीली ॥ ३ ॥

विषयभोग बहु रोग जडुनि तनु वियोगसमयीं रघुविर-पदीं मति नाहीं जडली ॥ ४ ॥

पद ( दक्षिणामूर्तीचें ) ९.

सद्भावें नमितों मी सद्गुरु श्री दक्षिणमूर्ती । निराकार निजस्वरुप निरंतर चिदानंद-स्फूर्ती ॥ धृ ॥

दर्पणांत प्रतिबिंब जयापरि द्वैतभाव भासे ।
स्वप्नांतरिं भ्रम नाना जागृत झाल्यावरि नासे ।
तया रीति निज बोध झालिया आत्मा एक असे ॥ १ ॥
पूर्वीं विश्व जयापरि अंकुर निज बीजा आंत ।
माया-कल्पित जग हें अवघें झालें विकसीत ।
इंद्रजाळ कर्त्यापरि शिव हा साधन-विरहीत ॥ २ ॥
सत्य स्फुरणें मिथ्या जग हें सत्यत्वें दावी ।
वेदाचें वचनानें जिव निज ब्रह्महि मिळवी ।
अनुभव देउनि आश्रित जन हे भवसागर तरवी ॥ ३ ॥
छिद्र घटांतरिं दीप असे परि बाहेरीं तेज दिसे ।

त्याजपरि विश्वाला जाणत निजबोधा वसे ।
रज्जूसर्पपरि जग नसतांहि ज्यायोगें भासे ॥ ४ ॥
देहाला मी ह्मणवुनि अवघें भुललें विश्व कसें ।
स्त्री बालांध जडापरि यानें कांहीं ज्ञान नसे ।
मायामोह-निवारणकर्ता सद्भक्तासी दिसे ॥ ५ ॥
माया अवर्णचि स्वरुपातें आच्छादुनि ठेलें ।
जैसे चंद्रदिवाकर अवघे राहूनें गिळिले ।
मूढ अवस्था सरल्या हो तो सुखिया जो बोले ॥ ६ ॥
जागृतस्वप्नसुषुप्त्यावस्था बाल्यादिक त्रयी ।
अहं ऐसा अनुभव स्फुरतो हा ज्याचे ठायीं ।
तो आत्मा निजहृदयीं ध्याती योगीजन पाहीं ॥ ७ ॥
नानापरिचे जग हें कारण कर्तृत्वें भासे ।
स्वामीसेवक शिष्यगुरू आणि पितापुत्र दिसे ।
तै अवस्था ज्यास्तव त्याला भुलले जग कैसें ॥ ८ ॥
आकाशादिक पंचभूतें आणि चंद्र अर्क पाहीं ।
चराचरादि निर्मित झालें अष्टमूर्ति ठायीं ।
जे जे उद्भव झाले ते ते या वांचुनि नाहीं ॥ ९ ॥
सर्वात्मक शिववर्णन केलें शंकरस्वामीनें ।
त्याचे श्रवणें मननें अक्षई शिवपद पावणें ।
अणिमादिक सिद्धीतें लाहुनि सर्वसुखी होणें ॥ १० ॥
श्रीदाक्षिणमूर्तीचें अष्टक निरंजन वदला ।
घेउनिया श्रीरघुवीरसद्गुरु-स्वामी-आज्ञेला ।
कर्ता सद्गुरु ऐसा निश्चय ठेवुनिया वहिला ॥ ११ ॥

## पद १०

मानवा शरण हरीला जाई रे । धृ ।
या वितभरि पोटासाठीं किति करशिल रे खटपटी ।
पूर्वी लिहिलेसें ललाटीं रे ॥ १ ॥

काय भुललासी संसारा । पुत्रधनसंपत्ति आणि दारा ।
अवघा मिथ्या मायेचा पसारा ॥ २ ॥
नाहीं स्थिरता या देहाला । भ्रम कैचा पडला तुला ।
आतां येईल यमाचा घाला रे ॥ ३ ॥
पाहें निरंजनि रघुवीरा । तोडी भवबंधन वागुरा ।
लावी काळरिपुवरी तुरा रे ॥ ४ ॥

पद ११

चला जाऊं पाहूं डोळा रामरूप सावळें ॥ धृ ॥
गंगेचिये परतटीं । अरुणा-वरुणा-मध्यवेटी ।
रम्यस्थळ पंचवटी । शोभताती राउळें ॥ १ ॥
लक्ष्मुमण बंधु पाठीं । अंकीं सीता गोरटी ।
रत्नाचिये हार कंठीं । अलंकार पीवळे ॥ २ ॥
उभें ठकारांचें ठाण । घेऊनिया धनुर्बाण ।
पुढें उभा हनुमान । रूप शोभे कोंवळें ॥ ३ ॥
निरंजनीं रघुवीर । तो हा रणरंगधीर ।
न पवेचि अंतपार । वेदमती चावळे ॥ ३ ॥

पद १२.

भक्ताचिये प्रेमासाठीं सोडिली म्यां लाज रे ॥ धृ ॥
धुवी पांडवांचे घोडे । सदा राहे मागेपुढें ।
घाली आंगणींचे सडे । बांधुनिया माज रे ॥ १ ॥
सुयोधना रागें आलों । विदुराचे घरा गेलों ।
आवडीनें कण्या प्यालों । जोंधळ्याचें प्याज रे ॥ २ ॥
वेडीं गोवळ्याचीं पोरें । त्यांचें ताक प्यालों बा रे ।
खाई भिलटिचीं बोरें । आवडीचें चोज रे ॥ ३ ॥
शुद्ध निरंजनवासी । तो मी आलों आकारासी ।
बांधियलों प्रेमपाशीं । करी भक्तकाज रे ॥ ४ ॥

श्रीदत्त पद १३.

ऐका रे सखयांनो तपसुनि घ्या अपुलें नाणें ।
संशय दूर करावा अंतरीं सांडुनि अभिमान ॥ धृ ॥
चौर्यांसी खर्चुनिया मोलें घेतलें सोनें ।
तसेंच न ठेवावें आपणा कळतें म्हणवून ।
चवकोनी कसवटीस पुरतें पहा जें घांसून ॥ १ ॥
आपणापेक्षां वडील त्याला सद्गुरु ह्मणवून ।
दाखवावें सोनें अंतरगाठी सोडून ।
सरसनिरस पाहुनिया त्याची सांगेल तो खूण ॥ २ ॥
तपसुनि न पाहतां शेवटीं होईल कीं हान ।
टाकुनि हेमा बेगड धराल झगझग पाहून ।
बरें बरें शोधा हें सांगतसे निरंजन ॥ ३ ॥

पद १४.

गंगा बाई तव महिमा वर्णूं काई । प्रगटूनि शिवमौळाचे ठायीं ।
दाऊनि गौतमऋषि मी साई । त्र्यंबक अब्धि मध्यें प्रवाहीं ।
पूजा घेसी ठाई ठाई ॥ १ ॥
गंगा गंगा हे शब्द आई । प्राणी वदतां कोणे ठाई ।
विझवीसि भवदुरिताची खाई । वर्षूनि कृपामेघ लवलाहीं ॥ २ ॥
पाहतां त्रैलोक्याचे ठाई । तुझिया ऐसें दैवत नाहीं ।
प्रत्यहीं सिंहस्थाचे ठाई । तीर्थें नाहाती तुझिये पायीं ॥ ३ ॥
सांडुनि हृदयींची द्वयिताई । निरंजन टेकितसे डोई ।
क्षेत्रीं भिक्षा मागुनी खाई । बसला तुझिये सन्निध ठाई ॥ ४ ॥

पद १५

म्या सद्गुरूसी लाविलें लग्न ॥ धृ ॥
पश्चात्तापीं व्याळ करित आग जाळ माझे आंगीं जाळिला मदन ॥ १ ॥
गुरुकृपा निजबोध करित भवच्छेद सद्गुरुरूप पाहिलें सघन ॥ २ ॥

सोहं बुद्धीचे शेजे पहुडुनि आत्मबुद्धीचा शेला
वोढुनि सुखी निरंजन मगन ॥ १ ॥

पद १६

दुस्तर हा भवसागरखोली तरकों कीं आम्ही ।
पैलतिरा जायासि कारण झाले गुरु स्वामी ॥ धृ ॥
वाईट हा भवसागर येणें बहु बुडविलें ।
आजवरी मजलागी येणें बहु कष्टी केलें ।
दैवोदय झाला म्हणवुनिया सद्‌गुरु भेटले ॥ १ ॥
गुरुनें किल्ली दाउनिया मनसूत्रा फिरवीलें ।
सिंधुतटाकीं असतां मजला मार्गे सरवीलें ।
भावसिंधू नातळतां गुरुनें पैलतिरा नेलें ॥ २ ॥
अगाध गुरुचा महिमा त्यांनीं अघटित हें केलें ।
निरंजन पद देउनि भवभय विलयासी नेलें ।
मीच एकला नाहीं ऐसें पुष्कळ तारीले ॥ ३ ॥

पद १७

बोलतांचि नय तें मी बोलूं काय । प्रसाद गुरुरायें केला गे माय ॥ धृ ॥

साखरेचि गोडी नयेचि सांगतां अनुभवाची कथा तैसी गे माय । तृप्ती ज्याची त्याजपाशीं गे माय । सांगूं जातां श्रमराशी गे माय । निर्गुण ते अविनाशी गे माय ।

श्रुतिसि सांकडें बोला मौन पडे अनिर्देश्य सर्व देशिं गे माय ॥ १ ॥
परेचें जे पर तुर्येचें निजघर आनंद आपार असे गे माय । आसंग सर्वदा वसे गे माय । द्वैताचा लेशहि नसे गे माय । स्थूळ दृष्टिसि न दिसे गे माय । मनाचें उन्मन इंद्रिया अज्ञान पाहतां मीपण ग्रासे गे माय ॥ २ ॥

विश्वीं म्हणुं तरि आहे विश्वातीत साक्षित्वाची मात नसे गे माय ।
अपुलें आपण असे गे माय । अखंडत्वें अविनाश गे माय ।
निजतेजें प्रकाशे गे माय । ध्येय ध्याता ध्यान जाय ।
हारपुन नेणिव निवसे गें माय ॥ ३ ॥

अनुभवाची खूण अनुभवी जाणे दुसऱ्या कठिण मोठें गे माय। रघुविर सद्गुरु भेटे गे माय। तेव्हांचि बंधन तुटे गे माय। भवाचा हा भ्रम फिटे गे माय। निरंजनिं मनिं जनिं वनिं ध्यानिं ब्रम्हचि सर्व दाटे गे माय ॥ ४ ॥

## पद १८

सुखि झालों ती खुण सांगू काई हो। चिन्मय वस्तु कोंदली सर्वांठायीं ॥ धृ ॥ जिकडे पाहूं तिकडे ब्रम्हसार हो। देहिं पाहतां भेदेलसें आंतर हो। जगद्गुरु व्यापला जगदाकार ॥ १ ॥ सद्गुरुचें अवघें कृपादान हो। कानीं माझे घातलेंसे अंजन हो। नेत्राविण दाविलें गुप्तधन हो ॥ २ ॥ काय होऊं तयासि उतराई। कोटिजन्म घेतलेया लवलाही हो। उपकार गुरूचा न फिटे कांहीं हो ॥ ३ ॥ रघुनाथपायासि निरंजन हो। वारंवार ओवाळी जीवप्राण हो। कांहीं केल्या न फिटे स्वामीऋण हो ॥ ४ ॥

## पद १९

सति म्हणे सखयांनो घेऊं आला तुम्ही वाण। दुरवर शोधुनि पहावें वाइट आहे निर्वाण ॥ धृ ॥

वाणावरुतें द्रव्य म्हणुनिया आशेनें येतां। फुकटचि मिळतें म्हणवुनिया त्या लोभानें घेतां। बरवें नाहीं नाहीं पुरतें विचारा चित्ता ॥ १ ॥

भ्रताराचे संगें सखये लागतें जाणें। स्तनपानाचें लेंकरूं घरांत द्यावें झोकून। असतां पदरीं आयुष्य त्वरितचि लागतसे मरणें ॥ २ ॥

चांगलें घर असतां अग्नी द्यावा लावून। पुरता विचार करुनि माझें वानासि घेणें। तैसा हा परमार्थ असे हें वदे निरंजन ॥ ३ ॥

## पद २०

यारे सखयांनों हरीगुण गाऊं। धरुनि सत्संगा पैलतिरा जाऊं जाऊं ॥ धृ ॥ हरिभजनाविण काळ व्यर्थ गेला। वृथा संसारीं काय भुलुनि ठेला। पीयूष टाकुनिया कांजी काय प्याला। सर्व समजुनिया पीसे काय झालां

झालां ॥ १ ॥ पैल भवसिंधू । पूर आला भारी । यमदंडाचा मेघ शिळाधारी । मृत्युविजाचा कडकडाट भारी । त्यानें दंडियल्या बहु नर नारी नारी ॥ २ ॥ गुरुचरणाची थडि आली नौका । वरि बैसुनिया जाऊं परलोका ॥ निरंजनि रघुनाथसखा तयाप्रसादें मारूं काळ बोका बोका ॥ ३ ॥

## पद २१

चला सखयांनों द्वारकेसि जाऊं । रूप श्रीहरिचें दृष्टिलागि पाहूं पाहूं ॥ धृ ॥ उभा राहिलाहे गोमतीचे तटीं । परब्रह्म हा पूर्ण जगजेठी । रूप पाहोनिया मदन आला पोटीं । तोचि नांदतसे जाउनिया बेटीं बेटीं ॥ १ ॥

एकवेळां जरि द्वारकेसि जातां । श्रमावाचुनिया मोक्ष येत हातां । होत उद्धार पितर पिंडीं साता । जरि सप्रेमें हरि गुण गातां गातां ॥ २ ॥ याचिलागी जाती हरिजन । दृढनिश्चय करुनिया मन । सर्व वेंचिति जाउनिया धन । गुरुकृपें पावला निरंजन जन ॥ ३ ॥

## पद २२.

मोतीं हो माझें हारपलें वो सये । सापडोनि दिल्हें गुरुरायें ॥ धृ ॥
चिन्मय मोतीं सुंदर जडित । बहुत काळ मजपाशीं होतें ।
सहजगति हारपलें अवचितें । नकळे सये झालि कैसी गत ॥ १ ॥
फार वो दिन भ्रांतिमाजी गेले । अवचिता मोतीं नाकिं चापचिलें ।
भ्रमाचे हातीं नाहिं तें लागलें । तेव्हां हो माझें मन धडाडिलें ॥२॥
वेदशास्त्र ज्योतिषी धुंडीले । त्यांनीं हो कर्मग्रह सांगितलें ।
विधान त्याचें म्यांहो बहु केलें । त्याचियानें कांहीं नाहीं झालें ॥ ३ ॥
नेति धोति घरहि शोधिलें । इडा पिंगळा केर पाखडिलें ।
षड्चक्र उतरंडिसी धुंडिलें । मोति हो सये नाहिं सापडलें ॥४॥
तीर्थयात्रा देव नवसीले । व्रतें तपगळहीं टोचिले ।
इंद्रियदमन कडेलोट केलें । नवसासी देव न पावले ॥ ५ ॥
जिव हो माझा झाला होता वारा । दैवोदय जाहला सामोरा ।
सजाजि मी गेलें सद्गुरुचे घरा । मनासि माझ्या दिलें त्यांनिं धीरा ।६।

गुरुनें कृपादृष्टि हो पाहिलें । मोतीं हो माझे गळ्यांत दाविलें ।
तेव्हां हो माझें मन आनंदलें । निरंजनिं रघुनाथ भेटले ॥ ७ ॥

पद २३.

सांपडलें वो मजला सखये सद्गुरुचें धन । समाधान झालें वो माझें फिरलेलें मन ॥ धृ ॥

गूरूनें कृपाळ होउनि मजला दिधलें दाऊन ।
स्वर्गमृत्युपाताळ आवघें गेलें व्यापून ।
अफाट जिकडे तिकडे उरले दाहि दिशा भरुन ॥ १ ॥
अचाट धन सांपडलें तेथें झालों श्रीमान ।
देतां घेतां कोणालागीं नाहीं कीं वाण ।
नेइल त्याला कोणी ऐसा नाहीं अनुमान ॥ २ ॥
जिकडे तिकडे भरोनि अवघें गेलेंसें धन ।
त्या वांचुनिया कोठें नाहीं राती ठिकाण ।
तद्रूप होउनि ठेला अंतरबाह्य निरंजन ॥ ३ ॥

पद २४

ऐका रे सखयांनो स्वधर्म सांभाळा आपला ।
परधर्माचे मार्गे वायां शिणतां काशाला ॥ धृ ॥
स्वस्वरूपाला अवलोकावें धरोनिया ध्यान ।
कर्म अकर्मा विरहित ऐसी जाणुनिया खूण ।
याविण दुसरें करितां वायां होइल की शीण ॥ १ ॥
शुकदत्तात्रय याज्ञवल्कि आणि कपिलमहामुनी ।
याची मार्गे गेले स्वधर्म ऐसें आचरोनी ।
ब्रह्मनिष्ट हे ठाउक एसें झालें सर्वजनीं ॥ २ ॥
स्वधर्मदीक्षा धारण करुनी साधन उपाय ।
भावें दृढ धरावे जाउनि सद्गुरुचे पाय ।
कृपाळ होउनि दावुनि देतिल निरंजन ठाय ॥ ३ ॥

## पद २५

साधा रे गुरुभक्ती । अंतरीं सांडुनि विभक्ती ।
भवभ्रम दूर करा रे व्यक्ती टाकुनि अव्यक्ती ॥ धृ ॥
एकावांचुनि दुसरें नाहीं या नामें भक्ति ।
निर्गुण सगुण झाले म्हणतां आलि विभक्ती ।
दिसणें तितुकें मिथ्या ऐसी वेदाची उक्ति ॥ १ ॥
भक्ता लागी रक्षुनि दुष्ट संहार ।
युगायुगाचे ठायीं जन्मतसे वारंवार ।
अखंड आद्यय असतां त्याचा कैचा अवतार ॥ २ ॥
बाहुल्याला सत्य म्हणुनिया लावावी लग्न ।
जंवरि झालें नाहीं सद्गुरुसीं लग्न ।
निरंजनि रघुनाथ भेटल्या स्वरूपीं निमग्न ॥ ३ ॥

## पद २६

अंतर्यामीं कोण आहे हा पाडारे ठायीं ।
यावांचुनी परमार्थी पहातां कांहीं सुख नाहीं ॥ धृ ॥
जन्मापासुनि शेवटवरतें ब्रह्मचर्य केलें ।
स्त्रीमात्राचें कैसें मुख तें नाहीं पाहिलें ।
परतुनि जन्मा घेतां अवघें व्रत वायां गेलें ॥ १ ॥
गृहस्थाश्रम संपादुनिया यागविधी केले ।
आल्या विप्रालागीं भोजन बहुतां घातलें ।
पुण्यबळाचें योगें कारण जन्मासी झालें ॥ २ ॥
वानप्रस्थालागीं जाउनि आरण्य सेविलें ।
कंदमुळातें खाउनि स्त्रीपुरुषांनीं व्रत केलें ।
देह दंडिला परंतु खंडण जन्मा न झालें ॥ ३ ॥
सोडुनिया संसारा केला चतुर्थ आश्रम ।
मी संन्यासी झालों ऐसा मानुनि संभ्रम ।

शुद्धतत्व ठायिं न पडतां झाला तो भ्रम ॥ ४ ॥
दंडकमंडलु त्यागुनि शेवटीं झालासे हंस ।
दैत भाव हा नाहीं गेला आंतरिंचा भास ।
निरंजन रघुनाथपदासी कैसा त्या वास ।' ५ ॥

## पद २७.

त्याग करा संगाचा अंतरिं होऊनि उदास ।
अखंड निश्चळ व्हारे स्वरूपीं करानिया वास ॥ धृ ॥
यागयोगकर्मांचे ठायीं आसक्त न व्हावें ।
दानधर्मफळ हेतुलागीं कदापि न ध्यावें ।
जितुकें होईल तितुकें सर्वहि ब्रह्मीं अर्पावें ॥ १ ॥
जपतप अनुष्ठानीं कांहीं करूं नये वांछा ।
तीर्थें क्षेत्रें पाहण्यासाठीं फिरूं नये स्वैच्छा ।
स्वर्गभोगप्राप्तीची अंतरिं धरुं नये इच्छा ॥ २ ॥
विषयासी मन चिंतिल त्याला चिंतूं न द्यावें ।
कल्पनेसी छेदुनि संकल्पानें नासावें ।
गुरु रघुनाथप्रसादें आक्षइ निरंजन व्हावें ॥ ३ ॥

## पद २८.

त्यागा रे स्त्रीसंगा अंतरिं होउनि ऊदास ।
करितां संग स्त्रियांचा झाला बहुतांचा नाश ॥ धृ ॥
शिवसांभाचें लिंग गळोनि पडलें भूमिला ।
वृंदेच्या भस्मावरि जाउनि विष्णू लोळला ।
सरस्वतीच्या योगें ब्रह्मा अपूज्य तो झाला ॥ १ ॥
आहिल्येचे संगें छिद्रें पडलीं इंद्राला ।
गुरुपत्नीच्या योगें कळंक झाला चंद्राला ।
तारेच्या संगानें वाळी प्राणासि मुकला ॥ २ ॥
सीतासंगें रावण मेला लंकेची होळी ।

पांचाळीचे संगें कौरव बुडवीली कूळी ।
अठराक्षौणि सैन्य बुडालें झाली रांगोळी ॥ ३ ॥
स्त्रिया भेणें कार्तिकस्वामी गेला कपाटीं ।
कलियुगाचे मानव तेथें कायसी गोष्टी ।
म्हणवुनिया निरंजन लपाला सद्गुरुचे पाठीं ॥ ४ ॥

## पद २९.

धन्य धन्य हो सद्गुरु भवसिंधूचें तारू ॥ धृ ॥
बुडतां भवडोहीं बहु खोली । करणी अघटित केली ।
बांधुनि ज्ञानाची सांगडी । पावविलें परथडी ॥ १ ॥
मोहोपंकाचे गर्तेत पडतां अकस्मात । ज्ञप्ति देउनिया मज हात ।
काढियलेंसे त्वरित ॥ २ ॥
देउनिया दृष्टी मज वहिली । माया विलया नेली ।
निरंजनपद मज दिल्हें । स्वरूपीं निश्चळ केलें ॥ ३ ॥

## पद ३०

झाले जगदंबा जगदंबा वरिलें सद्गुरुसांबा ॥ धृ ॥
काम क्रोधहोदंभा ठाईंच वधिलें शुंभनिशुंभा ॥ १ ॥
भावभक्तिचा टेंभा घेउनि नाचूं रंग स्वयंभा ॥ २ ॥
रघुविर शेंदुर भाळीं । निरंजन शोभतसे काळीं ॥ ३ ॥

## पद ३१.

त्याला सुख नाहीं सुख नाहीं जागृत ज्याचे साही ॥ धृ
वेदशास्त्र बहु शिकला । लोकीं इच्छितसे मानाला ॥ ३ ॥
जपतप साधन केलें । परि मन सिद्धी इच्छित ठेलें ॥ २ ॥
बाहेर साधु झाला । अंतरिं इच्छी धनदाराला ॥ ३ ॥
निरंजन कवी झाला । जरि तो चढला अभिमानाला ॥ ४ ॥

## पद ३२.

त्याचा गुरु हिरवा गुरु हिरवा आपल्या ह्मणवी बरवा ॥ धृ ॥

मीच एकला ज्ञानी वरकड जग सारें अज्ञानी ॥ १ ॥
ह्मणवुनिया वेदांती लोकीं भांडत टाकुनि शांती ॥ २ ॥
योगयाग ज्यां केला पापी ह्मणवितसे लोकांला ॥ ३ ॥
निरंजन सुखि झाला दुःखी ह्मणती जन रे त्याला ॥ ४ ॥

पद ३३

त्याला शुभ अवघें शुभ अवघें । आपुले स्वरुपीं जागे ॥ धृ ॥
सद्गुरूची आज्ञा घे । लोकीं वेड्यावाणी वागे ॥ १ ॥
वस्तु पडली ठायां । वाचे शुद्ध नये बोलाया ॥ २ ॥
प्रसादवाणी वदला । त्याला लघुगुरु काशाला ॥ ३ ॥
संशय मनिंचा हरला । ध्यातो निरंजन सद्गुरुला ॥ ४ ॥

पद ३४

त्याला दुःख कैचें । समान पहाणें ज्याचें ॥ धृ ॥
कोणी पायां पडला । कोणी येउनि ताडुनि गेला ॥ १ ॥
कोणी पुसती आज्ञा । कोणी करिती शद्बअवज्ञा ॥ २ ॥
कोणीं केली निंदा । कोणी स्तुति केली स्वच्छंदा ॥ ३ ॥
सांडुनि खेद-विषादा । रमतो निरंजन स्वच्छंदा ॥ ३ ॥

पद ३५

कपालेश्वर पंचाक्षर हे उच्चारा वाणी ।
अखंड हृदयीं ध्यातां पळती दुरिताच्या श्रेणी ॥ धृ ॥
कलुषहरण भवतारण निज शिरिं धर्ता शशिअंक ।
कमलासन वंदितसे ज्याच चरणींचा पंक ।
कमलनयन कमलापति ध्यातो हृदयीं निःशंक ॥ १ ॥
पांघरलासे गजचर्मांबर वरि वेष्टुनि सर्पा ।
पाशुपत सेवुनि रचनीचर पाववितो दर्पा ।
पाळितसे निजदास निरंतर दंडुनिया पापा ॥ २ ॥
लेवुनिया रुंडाचें भूषण निजस्वरूपीं डोले ।

लेपुनिया भस्माचें मर्दन सर्वांगा केलें ।
लेख नसे दुरिताचा तें निज नामें तारिलें ॥ ३ ॥
स्वरुपीं निर्मित झालें ज्याच्या हें सारें विश्व ।
स्वच्छंदें जग सारे केलें गजमानव-अश्व ।
स्वप्रकाश सर्वांतरि कर्ता तोचि दीर्घ ऱ्हस्व ॥ ४ ॥
रक्षुनि निजभक्तांतें करितो दुष्टां संहार ।
रतिपतिचा शासनकर्ता शिव कर्पुरगौर ।
रमताहे निरंजन जनिं वनिं गाउनि रघुवीर ॥ ५ ॥

पद ३६

चला रे सखयांनो जाऊं गंगास्नानाला ।
बहुतां दिवसांनीं ऐसा पर्वकाळ आला ॥ धृ ॥
हृद-आकाशीं स्वरूप सुंदर भानू उगवला ।
अविद्या राहूनें त्याचा खग्रास केला ।
एक्या स्नानें करूनि मुक्ती होतसे त्याला ॥ १ ॥
सद्गुरु ब्राह्मण गंगेपाशीं बैसला ।
सत्याचा संकल्प सांगे, जो येइल त्याला ।
क्षणामध्यें नाहीं करितो बहूत पापाला ॥ २ ॥
निरंजन मोठ्यानें सांगे सर्वां लोकांला ।
नरदेहाचा पर्वकाळ जरि व्यर्थचि गेला ।
तरि मग जाणें लागल गाढवाचे जन्माला ॥ ३ ॥

पद ३७

राज्य आह्मां आक्षइ चीरकाळ हो ॥ वस्ति नाहिं दयादेशीचे भूपाळ हो ॥ धृ ॥

नाहिं भूतें दैवतें आणि इंद्र । नाहिं ग्रहनक्षत्रें सूर्यचंद्र ॥ नाहीं तेथें ब्रह्मा विष्णु रुद्र ॥ १ ॥

नाहीं वेदशास्त्राचा कांहीं क्रम । नाहीं योगयागादि क्रियाकर्म ।

नाहीं तेथें वर्णाश्रम धर्म ॥ २ ॥

नाहिं पृथ्वी उदक अग्नि कांहीं । वायु आणि आकाश तेथ नाहीं । स्वर्गमृत्युपाताळ नसे हेंही ॥ ३ ॥

मी मी ऐश्या शद्बासि न बोळून । शुद्धबुद्ध एकला निरंजन। विरळा जाणें ऐसी गुरुखूण ॥ ४ ॥

## पद ३८

देखियला देश म्यां सुलक्षण । सर्व कर्मे तेथींचीं विलक्षण हो ॥ धृ ॥
तेथें एक गोसावीराज भला । सर्व-कळा-कुशळ कवटाला। त्यानें धरुनि चोरटा राजा केला ॥ १ ॥

मुका तेथें घातला कारभारी । परीक्षेसि आंधळा तेथें करी । प्रजा केली समूळ बरोबरी ॥ २ ॥

त्यांनीं सर्व कर्मासी भ्रष्टवीलें । अठरा वर्ण पंगती जेववीले । गौद्विज श्वानाच्या सम केले ॥ ३ ॥

मोडोनिया वस्तीसि ओस केलें । नांगर जुंपुनि कोळशासि पेरिलें । निरंजन ह्मणे हे शुभ झालें ॥ ४ ॥

## पद ३९

सांगतें कुळकथा माझी ऐका हो बाई ।
या सद्गुरुनें नेउनि मजला बुडवीलें डोहीं ॥ धृ ॥
तान्हेलें ह्मणवुनिया पाणी पेयासी आलें ।
सद्गुरुनें घेउनि मजला मधींच लोटिले ।
एक्या बुटकुळीनें बहुत खोली मी गेलें ॥ १ ॥
नाकीं पाणी तोंडीं पाणी कानाचे द्वारीं ।
खालीं पाणी वर्ती पाणी पाणी चवफेरी ।
सर्वाठायीं पाणी जळमय झाले मी सारी ॥ २ ॥
डोहो मोठा खोली येणें बहुतां बुडवीलें ।
माठे मोठे योगी जीवित्वासि मूकले ।
परस्परें चौघांचे तोंडें होतें ऐकिलें ॥ ३ ॥

बहुत काय सांगू आतां लोकांच्या गोष्टी ।
तसेंच घडोनि आलें सखये माझे अदृष्टीं ।
निरंजन रघुनाथें केली नाहींसी सृष्टी ॥ ४ ॥

## पद ४०

झोळी माझी कामधेनु तिचा महिमा काय वानूं ॥ धृ ॥
ब्राह्मणाचे घरीं जावें । माधोकरी मागावें ।
स्वइच्छेतें आणूनिया देइल तितुकेंचि ध्यावें ॥ १ ॥
सात पांच शाखा भात वरण आणि भाकरी ।
पांढऱ्या पुरणपोळ्या अन्न बहू परोपरी ॥ २ ॥
गंगेंत भिजवूनि खावी खडकावरी ।
बुद्धीला प्रकाशिती आणि बहु पुण्यकारी ॥ ३ ॥
बहुकाळ मागतांना कोणी कंटाळेना कदा ।
ह्मणोनि निरंजन मागतों हे सर्वदा ॥ ४ ॥

## पद ४१

सद्गुरुला शरण रिघा रे । दुस्तर भवसिंधु तरा रे ॥ धृ ॥

उदास होउनिया संसारा आजि सारा घेउनि सोडुनि द्या घरदारा । आजि दारा धन हे दृष्टी मागे सारा । आजि सारा मनिं विषयाला विन्मुख व्हा रे ॥ १ ॥

सोडुनि द्या सर्व पिपासा आजि पाशा तोडुनि सोडा सर्वहि आशा । आजि आशाश्वत नरदेहे जाइल नाशा आजि नासाग्रासी लक्षुनि मार्गे पहारे ॥ २ ॥

उगेचि कां रे भ्रमतां वाया आजि वाया जातो ऐसे पाहुनि ठाया । आजि ठाया लक्षुनि निरंजन रघुराया । गुरुरायाचें पद पावुनि सुखरूप व्हा रे ॥ ३ ॥

## पद ४२

नोहे नोहे रे तो ब्रम्हज्ञानी ॥ धृ ॥ ब्रम्हज्ञानी गोष्टी ।

बोले निशिदिनीं होउनि कष्टी ॥ १ ॥ पाहुनीया वेदांती ।
तैसि बळेंचि धरितो शांती ॥ २ ॥
सोडुनिया चित्ताला । बळेंचि दंडि।से देहाला ॥ ३ ॥
धरोनिया ध्यानासि । दृष्टि पाहे झगमगरासी ॥ ४ ॥
निरंजन गुरुकिल्ली । जरि ते ठाउक नाहीं झाली ॥ ५ ॥

## पद ४३

सद्गुरु मार्तंडा मार्तंडा । अखंड झळके खंडा ॥ धृ ॥
भाजुनिया द्वैताला । निश्चयभरित रोडगा केला ॥ १ ॥
चिद्रस पूर्ण स्वयंभा । भरला औटहात कोंठबा ॥ २ ॥
येळकोट संसारा । बोलुनि उधळू दहे भंडारा ॥ ३ ॥
साकळदंड मोहाचा । दिधला सोडुनि श्वानजिवाचा ॥ ४ ॥
निरंजन हा वाघा । सोहं भुंकुनि स्वरुपीं जागा ॥ ५ ॥

## पद ४४

मारतंड चतुराक्षरी मंत्र उच्चारा वाचे । अखंड हृदयीं ध्याता पर्वत जळतिल पापाचे ॥ धृ ॥ मार्गेश्वर षष्ठीला प्रगटुनि वाढविला महिमा । महादेव अवतार प्रगटला भक्तांचे कामा ।
महाळसा निजशक्ति जाउनि पर्णिली रामा ॥ १ ॥
रजनीचर दुष्टांचा केळा समूळ संहार ।
रक्षाया निजदासांलागुनि झाला अवतार ।
रमताहे अश्वारुढ होउनि तो हा मल्हार ॥ २ ॥
तगतगीत भंडार पडुनिया झालासे पीत ।
तडिदःप्राय शोभे वस्त्र भूषणमंडीत ।
तत्पर हाउनि श्वान जयाचे संगें धांवत ॥ ३ ॥
उळमळिलें भूमंडळ स्वरुपा धरितां प्रचंड ।
डमरू त्रिशूळ त्यागुनि धरिला खंडा अखंड ।
डमरू वाद्यपरि निरंजन हा स्मरतो मार्तंड ॥ ४ ॥

पद ४५

गुरू नव्हे गुरें ह्मणावी पुष्कळ भरला हाट रे ।
स्वस्त मिळाले तरी त्यजावे अडक्याचे गुरु साठ रे ॥ धृ ॥
साधु साधु ह्मणवोनि लोकीं बहुतसा बोभाट रे ।
भलत्यालागी शिष्य करुनि धन घ्यावें अचाट रे ।
प्रतिवर्षी शिष्याघरि जावें मोठा पलपलाट रे ॥ १ ॥
टोपी माळा घालुनि पुष्कळ टाळविण्याचा थाट रे ।
चौबारा बैसुनिया गावें मेळवुनी जन दाट रे ।
मोठ्यानें आरडुनि सांगावें केलें जें कां पाठ रे ॥ २ ॥
ऐसे गुरु जरि कोणीं केले त्याला लाभला नाट रे ।
नरदेहासी येउनि चुकले निजप्राप्तिची वाट रे ।
निरंजनपद सांडुनि चढले यमपुरीचा घाट रे ॥ ३ ॥

पद ४६

शिष्य नव्हे तो मानवदेहीं पशु चकीलाडा ।
दुपाई गाढव समजुनिया सोडा उकीरडा ॥ धृ ॥
प्रपंचीं मन असतां दारिद्र्यानें व्यापला ।
रांडा पोरें पिडिती खाया नाहीं पोटाला ।
कुटुंबाला टाकुनि सद्गुरु मोठासा केला ॥ १ ॥
गुरुनें कृपाळ होउनि निजगुज सांगितलें ज्ञान ।
निश्चय पुरता नाहीं अंतरिं वाणेना खूण ।
शीतळता नाहीं ह्मणुनिया करितो टुनफून ॥ २ ॥
गुरुचे संगें राहुनि बहुत झाला लोचट ।
पूर्ती पोची वळखुन लोकीं भांडे बळकट ।
प्रपंच ना परमार्थ नाहीं एकही नीट ॥ ३ ॥
ऐसा शिष्या करील त्याची होइल फजीती ।
संगतीचे योगें होई ज्ञानाची माती ।
शाधुनि शिष्य करा निरंजन सांगतसे नीती ॥ ४ ॥

### पद ४७

प्रपंच परमार्थी परमार्थी । चुकला दोन्ही अर्थी ॥ धृ ॥
टोपी टिळे माळा । घालुनि रांडा करितो गोळा ॥ १ ॥
सांगुनिया ज्ञानासी । पैका मागतसे लोकांसी ॥ २ ॥
बाहेर साधू झाला । अंतरिं इच्छी सन्मानाला ॥ ३ ॥
निरंजन हा त्याला । सांगे करिं पुरतें एकाला ॥ ४ ॥

### पद ४८

शिष्या सद्गुरुचा सद्गुरुचा । नोहे तो हा साचा ॥ धृ ॥
वदला कवितावाणी । सुंदर श्लोक पदांतर गाणीं ॥ १ ॥
गोड गळ्यानें गातो । लोकांना बहु टोणपे देतो ॥ २ ॥
उद्धट होउनि बोले । आंगीं अनुभव नसतां डोले ॥ ३ ॥
जनरंजन बहु केलें । परि मन निरंजन न झालें ॥ ४ ॥

### पद ४९

प्रसाद सद्गुरुचा सद्गुरुचा । वेगळाचि गुण त्याचा ॥ धृ ॥
वदला कविता वाणी । ह्मणवी चातुर्याची खाणी ॥ १ ॥
बहुत विद्या शिकला । शास्त्री ऐसें ह्मणती त्याला ॥ २ ॥
योग-समाधी केला । तरि तो ज्ञानी नाहीं झाला ॥ ३ ॥
टाळ विणा वाजविला । निरंजन पद नाहीं त्याला ॥ ४ ॥

### पद ५०

सद्गुरुचा महिमा वर्णूं काई । उपमेसि तयाच्या दुजा नाहीं हो ॥ धृ ॥
परिसाची उपमा देऊं जरी । तरि तो लोहा लागतां सोनें करी ।
न करवे आपुल्या ऐसीपरी ॥ १ ॥ कल्पतरु उपमेलागीं द्यावा ।
तरि तो कल्पीलासि ये अनुभवा । अकल्पित देतसे गुरुठेवा ॥ २ ॥
देव सर्व उपम देऊं जरी । तव ते देती असेल दैवीं जरी ।
गुरु दैवीं नसल्या कृपा करी ॥ ३ ॥ पापतापदैन्य उठाउठी ।
पळुनि जाती जयाची होतां भेटी । निरंजनिं रघुविर घाली पोटीं ॥ ४ ॥

### पद ५१

मनचि कारण अवघें आदिअंतीं जाण । बंध अथवा मुक्ती दोन्ही व्हावया लागुन ॥ धृ ॥ वर्णाश्रमधर्म रूपदेह-अभिमान । आप आणि पर भेदाभेदासि पाहणें । मनाचेंचि योगें अवघें द्वैताचें भान ॥ १ ॥

मनचि आधार सर्वां इंद्रियां लागून ।
कर्माकर्में घडणें अवघें मनचि कारण ।
मनाचेंचि योगें करणें पाप अथवा पुण्य ॥ २ ॥
संकल्प विकल्प करणें मनाचें लक्षण ।
मनाचेंचि योगें होणें मुक्त्या बंधन ।
मरोनिया वारंवार जन्मालागीं येणें ॥ ३ ॥
सद्गुरुप्रसादें मन झालेंसें उन्मन ॥
ध्येयध्याता ध्यान तिन्ही गेलीं हारपून ।
शुद्ध तत्व उरलासे नित्य निरंजन ॥ ४ ॥

### पद ५२

पार्था धैर्य धरी समरीं । समरीं सांगे नीति बरि श्रीहरी ॥ धृ ॥
द्रोण पितामह कर्ण सुयोधन निकट आले वैरी ।
या समयीं तुज मोहें पिडिले म्हणसी मी नमरी ॥ १ ॥
निजधर्माप्रति दूषण लावुनि म्हणवितां क्षेत्री ।
अपकीर्ति त्रैलोकीं होइल अगणित अल्पवरी ॥ २ ॥
आप्त सहोदर मारूं कसे मी म्हणसी सत्य जरी ।
तरि त्या मृत्यू नाहिं कदापि चित्स्वरुपाचे परी ॥ ३ ॥
कर्ता हर्ता मीच असे रे हालवितां दोरी ।
निमित्तास्तव तुजला दाउनि करितों रणबोहोरी ॥ ४ ॥
व्यापक मी सर्वांतरि पार्था जग माझे उदरीं ।
पाहि बरें म्हणवुनिया दावित निजस्वरुपासि हारी ॥ ५ ॥
निरंजनपद पावुनि आक्षइ निजशांतीसी वरी ।
लाभालाभीं समता मानुनि खेद कदा न करी ॥ ६ ॥

## पद ५३

ज्ञानगंगेमाझारि आम्ही न्हालों हो । अंतर्बाह्य सवर्दा शुद्ध झालों हो ॥ धृ ॥ सद्गुरुकृपेचा पर्वकाळ हो । निश्चयाचा संकल्प अळुमाळ हो । भेदाभेदीं सोडुनि दिल्हें पहा हो ॥ १ ॥ ब्रम्हडेहामाझारि बुडी दिल्ही हो । तयाठायीं विश्रांति बहु जाली हो । उठाउठीं तापत्रय गेलीं हो ॥ १ ॥ रघुनाथपायाची शुद्ध धुळी । निरंजन लावुनिया कपाळीं हो । प्रेमानंदें नाचतो वेळोवळीं हो ॥ ३ ॥

## पद ५४

श्रीगुरुनाथा दयाकर झाले । म्हणुनिया मन माझें धालें ॥ धृ ॥
चिद्रस पाजुनि तृप्तचि केले । म्हणुनिया सर्वांग निवालें ॥ १ ॥
आशापाश समूळचि गेले । पूर्णपणाचे ढेकर आले ॥ २ ॥
जन्मांतरिं बहु सुकृत केलें । निरंजनिं रघुनाथ मिळाले ॥ ३ ॥

## पद ५५

मनिं पुरता अनुताप असावा । नलगे जगलोकांत दिसावा ॥ धृ ॥
नलगे वांटुनि पाला खावा । अन्य षड्रस भोग त्यजावा ॥ १ ॥
नलगे वल्कल वेष्टुनि घ्यावें । वस्त्राचे बहु त्याग करावे ॥ २ ॥
नलगे डोइंत भस्म भरावें । जाउनिया वनिं वास करावे ॥३॥
सर्वहि ईश्वरभाव असावा । म्हणणें व्यर्थ निरंजनबावा ॥ ४ ॥

## पद ५६

गुरुजि मजला महाराष्ट्रविद्या येती । याविण दुजी बैसेना माझ्या चित्तीं हो ॥ धृ ॥
अहंब्रह्म अनुभविला ओंकार हो । कका व्यापक पाहिला निर्विकार हो॥
बाराखड्या जें गनग हें भिन्नाकार हो ॥ १ ॥
दश अंक हे दशदिशा सारी हो । भरिव शून्य मोजितां लक्षावरि हो॥
पाहूं जातां प्रसार त्याचा भारी हो ॥ २ ॥
शुद्धतत्व मोजिला गुणाकार हो । द्वैतमाया उडविला भागाकार हो ॥
जमाखर्च जाहला बराबर हो ॥ ३ ॥

निरंजनीं आवडे हचि विद्या हो । वरकड साऱ्या दिसताति अविद्या हो ॥
रघुनाथासि मिळाला शिष्या नाद्या हो ॥ ४ ॥

## पद ५७

ब्राह्मण ऐसें त्यासि म्हणावें । ब्रह्म जयाप्रति झालें ठावें ॥ धृ ॥
ब्रह्म असे जगिं निश्चय केला । यज्ञोपवित विराजित ज्याला ॥ १ ॥
आत्मानात्म विचारित आहे । ज्ञानशिखा शिरिं संतत वाहे ॥ २ ॥
साक्षपणें सर्वांतरवासी । धारण हा श्रौताग्नि जयासि ॥ ३ ॥
श्रीरघुनाथ दयाकर झाला । सत्य निरंजन ब्राह्मण केला ॥ ४ ॥

## पद ५८

नरदेहा येउनि आजि धन्य आह्मि झालों ॥
जाउनिया सर्व क्षुधा पूर्णपणें धालों ॥ धृ ॥
सग्दुरु पदकमळें देखियलीं डोळां । झालें मन उल्हासित निज मन अळिकूळा ॥ १ ॥
त्या सुखासि नाहीं पार करवेना लेखा ।
त्यापुढें स्वर्गसुख तुच्छ दिसे देखा ॥ २ ॥
गुरुचरणीं मस्तकासि टेकवितां बा रे ।
तत्क्षणीं आष्ट अंग निवालें सारे ॥ ३ ॥
निरंजनीं जनीं वनी गुरु रघुराज ।
अभिमान लौकिकादि सोडियेलि लाज ॥ ४ ॥

## पद ५९

योगिया उगाचि शिणसी वायां रे ॥ धृ ॥ अरे नासक्या या शरिरासी । किति नाट करिसीऊ सायासी । नाहिं खरुरीं समंध यासी रे ॥ १ ॥
जैसे गाढवाचें घोडें । बहु धुतल्या नोहे फुडें ।
तैसा देह आत्मया पुढें रे ॥ २ ॥
आहे आत्मा सर्वाठायीं । त्याजवांचुनि कांहीं नाहीं ।
किति कोंडु कोंडु घेसि देहीं रे ॥ ३ ॥

गुरु निरंजन रघुविर । त्याचे वचनीं होउनि स्थीर ।
राहे निजस्वरूपीं निर्भर ॥ ४ ॥

## पद ६०

पाहतां विश्वचि ब्रम्ह खरें । पाहतां दृग्दृश्यार्थ नुरे ॥ धृ० ॥
तरंगाकृती सांडुनि आकृती । निर्मळ जळ सारें ॥ १ ॥
मृगजळ ठायीं रश्मी दिसतां भावाभाव सरे ॥ २ ॥
लावुनिया दिप रज्जु विलोक निःसंशय व्याळ नुरे ॥ ३ ॥
निरंजन मी समजलिया मग देह नसे बा रे ॥ ४ ॥

## पद ६१

गुरुराया तुमचे कृपादानें । संवसारासी येउनि झालों धन्य ॥ धृ० ॥
कृपाळुवा सद्गुरु मायबापा । मार्ग आह्मां दाउनी दिला सोपा ॥१॥
तत्वबोध करोनि लागवेगीं । परब्रह्म केलेसें मजलागीं ॥२॥
मोक्ष आमुचे अंगणीं लाळ घोटी । परमात्मा रिघाया पाहे पोटीं ॥३॥
निरंजन सद्गुरु रघुराजा । कृपा आतां असूं द्या महाराजा ॥४॥

## पद ६२

जगनग सारें पाहतां मजला ब्रह्मचि सर्वहि भासे ।
त्वंपद तत्पद असिपद अवघीं द्वैतभावना नासे ॥ धृ० ॥
जीवात्मा परमात्मा दोघां एकचि पडली गांठी ।
चिन्मय स्वरुपीं मिळणी झाली आनंदाची दाटी ॥
आदीं अंतीं मीच अवघा वेष्टी आणि समष्टी ॥१॥
आत्मा अनात्मा हा केला व्यतिरेके दों ठाईं ।
अन्वयें पाहातां ब्रह्मविरहित कांहीं नाहीं ॥
जैसी मृत्कुंभासि मृत्तिकाची सर्वाठायीं ॥२॥
रघुविरप्रसादें शुद्ध जहालों निरंजन ।
जालों ह्मणुं तरि मजला नाहीं होणेंजाण ।
अस्ति भाति प्रिय अवघा अपुला अपण ॥३॥

पद ६३

आत्मा सत्य जयाप्रती झाला । मिथ्याभास अनात्मा त्याला ॥ धृ० ॥
पाहतां श्रम प्रतीबिंबालागीं । त्याचे श्रम तें बिंब न भोगी ॥
जैसा व्याळ बिळाचे द्वारीं । पहातसे आपुलि कांतारी ॥
मिथ्या मृगजळ कळलें ज्यासी । दिसते परिश्रम नाहीं त्यासी ॥
निश्चय पूर्ण निरंजनिं असतां । सहजची मग निज देही अनास्था ॥१॥

पद ६४

सावध होउनि निजसुख भोगीं जोंते रे वांया ।
श्रमदायक त्या विषया लागुनि सोडुनि दे सखया ॥ धृ० ॥
ब्रह्मानंद वसे तवठायीं तुज ठाउक नाहीं ।
तें सुख विषया ठायीं योजुनि मानीसी नवाई ।
इच्छुनिया मनिं विषया साठीं पडसी आपाई ॥ १ ॥
श्वान जेंसे अस्थीला घेउनि फोडितसे दांतीं ।
मुखांतिल रुधिराला सेवुनि भवितसे तृप्ती ।
तैसी तूं विषयाचे संगें मानिसि सुखप्राप्ती ॥ २ ॥
विषयावरि मन धावुनि जातां पावसि दुःखाला ।
तें मन मार्गें परतुनि येतां होतें सूख तूला ।
म्हणवुनिया मन जेथिल तेथें ठेवुनि राहे भला ॥ ३ ॥
नष्ट जडात्मक विषय मनींहुनि सोडुनिया देई ।
रघुविर सद्गुरु पाहुनि पूर्ता शरण तया जाई ।
निरंजन मग होउनिया तूं पूर्णपणें राही ॥ ४ ॥

पद ६५

बोधभानु उगवला जया ठायीं । भवतम नुरेची तेथें कांहीं ॥ धृ० ॥
कळों आली शुक्तीका स्पष्ट ज्यासी । न भासेची मागुती रौप्य त्यासी ॥१॥
दृष्टिलागी पाहातां शुद्धदोर । न भासेची त्याजला सर्पाकार ॥ २ ॥
रविरश्मि दीसल्या डोळा ज्याला । मृगजळ न वाटे कदा त्याला ॥ ३ ॥
गुरुकृपें उडालें दृश्यभान । सर्वपणें तोची तो निरंजन ॥ ४ ॥

## पद ६६

याचि परि जगदीश्वर पाहे । व्यापुनिया जगदांतारिं आहे ॥ धृ० ॥
तैळ जसें तिळ-अंतरधानी । राहतसे दधि अंतरिं लोणी ॥ १ ॥
काष्ठांतरिं वसताहे अग्नी । गारा शुभ्र तयांतारिं पाणी ॥ २ ॥
स्थावरजंगम अंतरबाह्य । ब्रह्मचि ओतप्रोत सदा हे ॥ ३ ॥
निरंजनिं खुण ठाउक झाली । श्रीरघुनाथ गुरूची किली ॥४॥

## पद ६७

निजस्वरुपीं रत जे नर झाले । ते नर ब्रह्मचि होउनि ठेले ॥ धृ० ॥
मेघमुखींचा बिंदु गळाला । सिंधुत जाउनि सिंधुचि झाला ॥१॥
लवणाचा गज अपीं मिळाला । परतुनिया मग नाहिंच आला ॥ २ ॥
लागुनिया कर्पूर दिपाला । तद्रुप होउनि ठाइं निमाला ॥ ३ ॥
निरंजन रघुनाथ-पदाला । वंदुनिया रघुनाथचि झाला ॥ ४ ॥

## पद ६८

येई येई वो रघुराया । करुणाकर गुरु सखया ॥ धृ० ॥
तुझिया पायासी अंतरलों । दूर विदेशा गेलों ।
मार्गी चालुनिया बहु श्रमलों । कष्टी फारचि झालों ॥ १ ॥
वाटे दैवहिन मी मोठा । प्रारब्धाचा खोटा ।
बुद्धीहीन बहू करंटा । चुकलों निजहित वाटा ॥ २ ॥
पाडस टाकूनिया हरणीला । जाउनि फार सापडला ।
गाईविण जसा वत्साला । व्याघ्र अडवा आला ॥ ३ ॥
तैसें तुजविण हो ये समयीं । बुडतों सिंधू डोहीं ।
धावे पावे हो गुरु आई वायूरुपें येई ॥ ४ ॥
कंठ होउनिया सद्गदित । अरडूनि हाका देत ।
स्वामी अंतरलों चरणांत । उदकें केला घात ॥ ५ ॥
करुणा ऐकुनिया निजकानीं । गुरु झाले जिवदानी ।
जहाजा लावुनिया निजपाणी । ऐलातिरातें आणी ॥ ६ ॥

निरंजन दास तारियला । शोकाविरहित केला ।
येउनि चरणांतें लागला । बहुताचि आनंदला ॥ ७ ॥

पद ६९

काय केले रे नरदेहा येउनी ॥ धृ ॥
निजस्वरुपासी ध्यावें । तेथें विषयभोग चिंतावे ॥ १ ॥
जें मन उन्मन व्हावें । तें मन धनकामिनीवरि धावे ॥ २ ॥
सन्मार्गीं लावावी । ते मति दुष्ट भावना भावी ॥ ३ ॥
अहंब्रह्म हें ध्यावें । सांडुनि पापी बळेंचि व्हावें ॥ ४ ॥
निरंजन ह्मणे चोरा । गाढवा जालासि ह्मातारा ॥ ५ ॥

पद ७०

याचिपरी हे माया पाही । निजस्वरुपीं मुळि झालिचि नाहीं ॥ धृ ॥
सागरिंची जळलाट उडाली । जळपण सांडुनि नाहींच गेली ॥ १ ॥
हेमाचे नग सुंदर केले । अंतरिं बाहेरि हेमचि ठेले ॥ २ ॥
तंतू जोडुनिया पट झाले । तंतूपण हें नाहिंच गेलें ॥ ३ ॥
निरंजन रघुनाथा ठायी । द्वैतपणाचा लेशचि नाहीं ॥ ४ ॥

पद ७१.

तैसी ब्रह्मपदासी माया । भासत नित्यपरी श्रम वायां ॥ धृ ॥
रजताचा श्रम शुक्तीठायीं । भासतसे परि मिथ्या पाही ॥ १ ॥
ग्रीष्म ऋतूच्या उष्ण सळाया । मृगजळ भासत जैसें वायां ॥ २ ॥
रज्जूचा दृढ सर्वचि भासे । स्वप्नींचा गज भ्यासुर दीसे ॥ ३ ॥
बोलत चालत हालत आहे । मिथ्या देह निरंजन वाहे ॥ ४ ॥

पद ७२.

भरलासे गुरु सर्वाठायीं । गुरुवांचुनि मज दीसत नाहीं ॥ धृ ॥
अप गुरुस्थळ रूप गुरूचें । भासतसे मज निश्चइ साचे ॥ १ ॥
वायु अग्नि आकाशहि सारें । दीसतसे गुरु अक्षइं बारे ॥ २ ॥
स्थावर जंगम व्यापुनी गेला । अंतरबाह्य गुरू गुरु झाला ॥ ३ ॥
श्रीरघुनाथ गुरूचा केला । निरंजन गुरु होउनि ठेला ॥ ४ ॥

## पद ७३

साधन त्यानें हेंचि करावें । जाउनिया गुरुपाय धरावें ॥ धृ ॥
कंटाळा विषयाचा आला । संसारासि उदासिन झाला ॥ १ ॥
नरदेह माझा व्यर्थचि गेला । म्हणवुनिया अनुताप उदेला ॥ २ ॥
निजस्वरुपाचा शोध करावा । दुस्तर हा भवसिंधु तरावा ॥ ३ ॥
रघुविर गुरुपद नयनिं दिसावें । वाटल ज्यासि निरंजन व्हावें ॥ ४ ॥

## पद ७४

सिंधुजळाचें सैंधव झालें । शेवटिं सिंधूंत सर्व मिळालें ॥ धृ ॥
तैसी माया शोधुनि पाहे । आदीअंतीं ब्रह्मचि आहे ॥ १ ॥
अळवूनिया घृत लाडू केले । तापवितां घृत ऐसें झाले ॥ २ ॥
मेघमुखींच्या वर्तुळ गारा । अंतरिं बाहेरी आपचि थारा ॥ ३ ॥
श्रीरघुनाथमुखींची वाणी । ब्रह्मचि सर्व निरंजन स्वामी ॥ ४ ॥

## पद ७५

ऐकेहो भिक्षुकवर्या निजभिक्षाधारण-चर्या ॥ धृ ॥
सर्वांतरि ब्रह्मचि पाहे । माधुकरी हेची लाहे ॥ १ ॥
मनिं आत्मानात्म विचारी । हे प्राग प्रणित अवधारी ॥ २ ॥
निजवस्तु संतत लक्षी । अयाचित हें व्रत रक्षी ॥ ३ ॥
सत्स्वरुपीं जागा झाला । तात्कालिक म्हणणें त्याला ॥ ४ ॥
अंतरिं सुस्थीर राहे । उपपन्न हें व्रत वाहे ॥ ५ ॥
निरंजन भिक्षुक झाला । परमामृत सेवन त्याला ॥ ६ ॥

## पद ७६

गुरुनें मजला देवाचे देव केलें हो । अनुभव घेतां प्रत्यया माझ्या आलें हो ॥ धृ ॥
जागृत काळीं विष्णुचें रुप दिल्हें हो ।
स्वप्नामाजी विरंची मज केलें हो ।
सुषुप्तीसी महेशपण आलें हो ॥ १ ॥
रजतमसत्व जहालों त्रिगुणाकार हो ॥

जागृत स्वप्न सुषुप्तिचा व्यवहार हो ।
तुर्यावस्था साक्षीत्वें ब्रह्माकार हो ॥ २ ॥
वेदशास्त्र आमुचे बंदीजन हो ।
वर्णिताती निजमुखें कीर्तीगूण हो ।
इंद्रादिक स्थापित अमुचे जाण हो ॥ ३ ॥
रघुनाथानें मजला ऐसें केलें हो ।
एकाएकीं अढळपद दीलें हो ।
निरंजन अनभुवनिया बोले हो ॥ ४ ॥

पद ७७

श्रीहरि लागुनि धे धे धे प्राण्या ॥ धृ ॥
नरतनु हे तुजला प्राप्त जहाली । तंववरि साधुनि घे घे घे ॥ १ ॥
धन-दारा-सुत-मित्र नव्हे तीं । सर्वहि चोरचि हे हे हे ॥ २ ॥
यमदूतासि पहासी तेव्हां । करसिल मग तूं फे फे फे ॥ ३ ॥
निरंजन तुज सांगतसे खुण । ऐकुनिया मनिं घे घे घे ॥ ४ ॥

पद ७८

तो नर नागवला नागवला । अभिमानें मेला ॥ धृ ॥
रजत ह्मणूनि शुक्तिला । घेउनि संग्रह पुष्कळ केला ॥ १ ॥
भावुनिया उदकाला । धावत मृगजळ पिउ गेला ॥ २ ॥
अमृत घट सांपडला । ह्मणवुनि कांजी पुष्कळ प्याला ॥ ३ ॥
निरंजन प्रभु कळला । नसतां ह्मणतो भवभ्रम टळला ॥ ४ ॥

पद ७९

गाइ मुखिं रघुनाथ कथा रे । जाइल हा नरदेह वृथा रे ॥ धृ ॥
दारा-धन-सुत सर्वहि बा रे । रहातिल जेथिल तेथचि सारे ।
देशभूमि गड मंडळ वाडे । रहातिल ठाइच गाडे घोडे ॥ २ ॥
ठाकर उंची शाक दुशाला । संगि न येतिल कांहि मशाला ॥ ३ ॥
निरंजन रघुनाथ यजी रे । दुर्धर हा संसार त्यजी रे ॥ ४ ॥

पद ८०

नरदेहासी येउनि तो नर झाला आत्मघाती रे
प्रपंच आणि परमार्थी दोन्हींत मेळविली धुळमाती रे ॥ धृ ॥
संसारीं राहुनिया केली बहुतासी कुंची दारे ।
वैराग्यासी सेवुनि करितो सत्पुरुषाची निंदा रे ।
सर्व जगातें सांगे येउनि मजला निशिदिनिं वंदा रे ॥ १ ॥
प्रपंचीं परदारेठायीं बहुत होती आस्था रे ।
परमार्थी स्त्रीवर्णन करितो सेवुनि मूढ अवस्था रे ।
भोगीं त्यागीं दोहीं मार्गी नरक जोडिला नसता रे ॥ २ ॥
कीर्ति असावी ऐसी आस्था पूर्वीपासुनि होती रे
पंडित शास्त्री मागे राहुनि माझिच व्हावी ख्याती रे
लोकांचे सद्गुण ऐकुनिया येतो दांतीकांती रे ॥ ३ ॥
निरंजन गुरुचरणीं येया त्या पुरुषाला चोरी रे ।
श्रमवुनिया जननीला शेवटिं आपण पडला घोरीं रे ।
चौऱ्यांशी लक्षाची त्याला न चुके फिरणें फेरी रे ॥ ४ ॥

पद ८१.

तो नर मुक्तचि आदि अंतीं । गेली मुळिहुनी ज्याची भ्रांती ॥ धृ ॥
जन्म नसे मग मार्गे झाला । अंतरयामीं अनुभव आला ॥ १ ॥
देह नसे मज आतां कांहीं । पहातसे आपणास विदेही ॥ २ ॥
मृत्यु नसे मजलागि कदाही । अजरामर आपणातें पाही ॥ ३ ॥
लागुनिया रघुनाथ पदासा । जन नसतां निरंजन झाला ॥ ४ ॥

पद ८२

तैसें सुख संसाराठायीं । शोधुनि पाहतां कांहिंच नाहीं ॥ धृ ॥
दुर्धर सर्पफणीचे छाये । बैसुनिया सुख पावेल काय ॥ १ ॥
वाटुनिया बचनागा प्याला । सांगा तो नर काय जिवाला ॥ २ ॥
विंगळ अंथरुनी जो निजला । निद्रा काय सुखाची त्याला ॥ ३ ॥
संसारासि निरंजन भ्याला । जाउनिया गुरुपायीं लपाला ॥ ४ ॥

पद ८३

ब्रह्म सदा सर्वांतरि आहे । याचि प्रकारें पंडित पाहे ॥ धृ ॥
ब्राह्मण गौहस्तीचे ठायीं । टाकुनिया देह अंतरीं पाही ॥ १ ॥
चांडाळादि शुनीचे देहे । पहातसे आंतील विदेहे ॥ २ ॥
सर्वांतरि आपणातें पाहे । आपण सर्वहि होउनि राहे ॥ ३ ॥
श्रीरघुनाथ दयाकर झाला । सत्य निरंजन पंडित केला ॥ ४ ॥

पद ८४

त्या गुरु रघुरायाची मी दासी । जहाले सये हो निजनिश्चयेसी ॥ धृ ॥
उघडुनि तत्वाचें भांडार । काढीलें चिद्रत्न तेजाकार । घातले माझे कर्णि मनोहर ॥ १ ॥
निजघरीं बहुकाळींचें ठेवणें । सहजीं मज दिधलें दाऊन ।
जहाली भवदारिद्र्याची हान । टाळिले सये हो जन्म तें मरण ॥ २ ॥
त्या पदीं देह सर्वस्व वाहिला । भाव हा दूजा नाहिंच राहिला ।
रघुविर निरंजनिं म्यां पाहिला । संशय सये हो उठाऊठी गेला ॥ ३ ॥

पद ८५

धन्य स्वामी सद्गुरू रघुराया । तुज पाहतां शीतळ जहाली काया ॥धृ॥
चिन्मयरूप देखिलें वाडेंकोडे । तेंचि भासें सर्वदा मागेंपूढें ॥ १ ॥
उघडितां झाकितां सर्वकाळ । नेत्रीं रूप कोंदलें अळूमाळ ॥ २ ॥
स्थावरादि जंगमा सर्वांठायीं । तुजविण पाहतां कांहीं नाहीं ॥ ३ ॥
निरंजन रघुविर सर्व पाही । तयाविण दुसरा देव नाहीं हो ॥ ४ ॥

पद ८६

आह्मी झालों निर्भर सर्वांपरी । पापपुण्य झोकुनि दिल्हें दूरी ॥ धृ ॥
सांडियले आश्रम वर्ण धर्म । स्नानसंध्या सर्वही क्रियाकर्म ॥ १ ॥
निःसंगाचे संगती संग केला । ह्मणुनिया सर्वही संग गेला हो ॥ २ ॥
निरंजनें रघुवीर अनुभविला । सर्वांपरि निर्भय सदा झाला ॥ ३ ॥

पद ८७

संसार सोडुनि आतां । परमार्थी जाग रे ॥ धृ ॥

शिष्णोदरगोडींसाठीं । वेचिल्या आयुष्यकोटी ।
जिवित्वासी झाल्या तूटी । वृथा क्षीणभाग रे ॥ १ ॥
आप्तवर्ग जाया पुत्र । धनासाठीं सर्व मित्र ।
दुष्टनष्ट अपवित्र । मेल्या देती आग रे ॥ २ ॥
निरंजन ऐसें पाही । दुजे ठायीं सौख्य नाहीं ।
आतां विश्रांतिसी कांहीं । रघुवीरासि माग रे ॥ ३ ॥

पद ८८

दत्तात्रय चतुराक्षरि मंत्र वाचे उच्चारा । निशिदिनिं हृदयी ध्यातां चुकवी जन्ममरणफेरा ॥ धृ ॥

दशदिशांप्रति अगमन ज्याचें एकट निर्द्वंद्व ।
दश अवतारा वरुते विष्णुस्वरुपाचा कंद ।
दत्तचित्त ज्या हृदयीं ध्यातां करि ब्रह्मानंद ॥ १ ॥
तापसियांचा तापशमन जो सर्वांचा त्राता ।
तारितसे भवसागरिं जडमूढ नाम वदनिं गातां ।
तांतडिनें उडि घालित ज्यापरि बाळकासि माता ॥ २ ॥
त्रै देवांचें स्वरूप तें हें जाणे एकत्र ।
त्रैलोक्याचा चाळक ह्मणवी अत्रीचा पुत्र ।
त्रैअवस्था स्वरूप प्रगटवी जेवि कां मित्र ॥ ३ ॥
एकचि स्वरूप सर्वांतरिं तो आहे अद्वय ।
यशकीर्ति तुह्मी गारे त्याची होउनि तन्मय ।
यमाचे भय नाहीं निरंजन जाला निर्भय ॥ ४ ॥

पद ८९

देव देवा मागणें हेंचि तुला । सोडवावें संसाराहुनि मला रे ॥ धृ ॥
कन्यापुत्र नलगेती संतान । वंश माझा होऊं दे निःसंतान ॥ १ ॥
सरोनिया जाऊं दे सर्वधन । घरालागि लागूं दे हूताशन ॥ २ ॥
मरोनिया जाऊं दे निजकांता । वृत्ति सर्व होऊं दे वाताहाता ॥ २ ॥
निरंजन इतुकें झाल्यावरी । सुखरुप होईल सर्वोपरी ॥ ४ ॥

पद ९०

गुरुराज दयाळु ऐसा झाला । त्यानें बिंदू असतां सिंधू केला ॥ धृ ॥
हृदाकाशीं दाविलें मज ध्यान । चिदाकाश व्यापिलेसें संपूर्ण ॥ १ ॥
तेणें मनिं विस्मयसा वाटला । ब्रम्हानंद मानें यसी कोंदाटला ॥ २ ॥
देहभाव सर्वहि लया गेले । योगनिद्रा समाधि आंगीं डोले ॥ ३ ॥
निरंजन जाली वृत्ति स्थीर । निश्चळत्वें पाहिला रघुवीर ॥ ४ ॥

पद ९१

धन्य अजि नरदेह प्राप्त झाला । यानें आत्मलाभ हा मोठा दिला ॥धृ॥
तिर्यगादि सर्वही योनिठाई । श्रम जाले ते आतां सांगु काई ॥ १ ॥
जन्मोजन्मीं सुकृत बहु केलें । ह्मणोनिया हें फळ प्राप्त झालें हो ॥२॥
उपकार मोठासा येणें केला । गुरुकृपापात्र हा होता झाला ॥ ३ ॥
निरंजन नरदेहालागी वाणी । एथोनिया राहिलीं येणीं जाणीं ॥ ४ ॥

पद ९२

नरदेह योग्य हा उपकारी । याला काय योजितां हो व्यवहारीं ॥ धृ ॥
जन्मोजन्मिं प्रपंच तुम्ही केला । तेणें काय तुम्हांसी लाभ दिला हो ॥१॥
गुरुपायीं ठेवूनि निजडोई । शुद्धतत्व अपुलें पाडा ठाईं हो ॥ २ ॥
निरंजन रघुवीर दृष्टि पाहा । प्रेतावाणी पडोनि उगे राहा हो ॥ ३ ॥

पद ९३

मरोनिया मारक तोचि जाला । कदाकाळीं पाहुं नगे त्याला ॥ धृ ॥
सांडोनिया स्वहित मार्गालागीं । कोकशास्त्र शिकला लागवेगीं हो ॥१॥
गुरुकृपें कोणासी प्राप्ति झाली । त्याचे चित्तीं संशय नाना घाली हो ॥२॥
जैसें श्वान जातसे पिसाळोनी । दुसऱ्यासि मारिताहे डंखानी ॥३॥
निरंजन सांगतो सर्व लोकां । त्याचे जवळीं जाउनि बैसूं नका ॥४॥

पद ९४

महाराजा सद्गुरु स्वामिराया । कदाकाळीं सोडूं नये तुझीया पाया ॥धृ॥
तुजलागीं पहातां सर्वकाळ । दुःख नाहीं पाहिलें कोणे वेळे ॥ १ ॥

पापताप दइन्य मजलागी । ठावें नाहीं जाहलें तुझे संगीं ॥ २ ॥
आजवरी सुखाचा काळ गेला । एथूनिया वियोग नसो मला ॥ ३॥
निरंजन लोळतो पायावरी । रघुनाथ सद्गुरु कृपा करी ॥ ४ ॥

## पद ९५

धन्य धन्य सद्गुरु रघुराया । सर्वांवरी सारिखी तुझी माया ॥ धृ ॥
तुझी कीर्ती ऐकूनी बहुतापरी । ह्मणूनियां पातले वेषधारी ॥ १ ॥
शास्त्री आणि पंडीत तपेश्वर । सर्व कळा कुशल विद्याधर हो ॥ २ ॥
परिक्षेसि पहावयालागीं आले । तुज पहातां तयांचे गर्व गेले ॥ ३ ॥
लागोनिया चरणीं झाले लीन । स्वामिकृपें होउनि निरंजन ॥ ४ ॥

## पद ९६

योगालागि उदित आधीं होती । करितांना कुंठीत होति मती ॥ धृ ॥
आरंभासि करितां सर्व सूर । श्रम होतां पळोनी जाती दूर ॥ १ ॥
बोलतांना योगाच्या स्वल्प गोष्टी । क्रियेलागी करितां होती कष्टी ॥२॥
शरिरासि देऊनि कष्ट कांहीं । ह्मणे कलीमाझारी योग नाहीं ॥ ३ ॥
निरंजन सांगतो सर्व जनां । श्रमसाध्य योग हा आहे जाणा ॥ ४ ॥

## पद ९७

सद्गुरु गे मायबाई । तुज वांचुनि करु मि काई ॥ धृ ॥
वाटतें मजला रहावें अक्षयीं । तुझिये पायीं ।
संसार तापत्रया तापला माझा देह । विश्रांती नाहीं ॥ १ ॥
कोठें सुखाची काहीं सोय । म्हणवुनिया त्याजिले सारे तनधन दारा गेहे ॥ २ ॥
भवसिंधु दुस्तर मोठा याचिया तरणोपाई ।
शास्त्रें आणि साधुसंत शोधिले बहुता ठाई ।
निश्चय म्यां पुरता करुनि तवपायीं ठेविली डोई ॥ ३ ॥
निजस्वरुपीं जडली वृत्ति माघारी न फिरे काहीं ।
अविनाश ब्रम्हानंदे कोंदल्या दिशा दाही ॥ ४ ॥

विश्रांति ध्यावयासि आलें मी गुरुमाहेरा ।
आतां मज जाणें नलगे सासुरीया त्या संसारा ।
निरंजन सासुरवासी सांभाळावा रघुवीरा ॥ ५ ॥

## पद ९८

सुखदुःख नाहींत आम्हांपाशीं । प्रतिबिंब भोगितें प्रारब्धासी ॥ धृ ॥
कर्माकर्मीं सर्वदा आम्ही साक्षी । शुध्दबुध्द सर्वकाळ आलक्षीं ॥ १ ॥
जैसें चंद्रबिंब हें उच्चस्थानीं । प्रतिबिंब डोलतें पाण्यावाणी ॥ ५ ॥
प्रतिबिंब सर्वथा सत्य नाहीं । सुखदुःख भोग हे मिथ्या पाही ॥ ३ ॥
रघुवीरें दाविली ऐसी खूण । सर्वांठायीं आलिप्त निरंजन ॥ ४ ॥

## पद ९९

देखिले नवल आम्ही कांहीं । पक्षी दोन एकिया वृक्षाठायीं ॥ धृ ॥
कर्माकर्म तयासी फळें आलीं । तयांमाजी एकानें ते भक्षीलीं ॥ १ ॥
दुजा नाहीं कोठेंहि लिप्त जाला । निजरूपीं सर्वदा तृप्त ठेला ॥ २ ॥
खादल्याचा उदरीं शूळ झाला । बहुकाळ जहाले कष्ट त्याला ॥ ३ ॥
दुरुनिया साक्षित्वें शीव पाही । क्लेशालागि सर्वदा जीव वाही ॥ ४ ॥
मात्रा दिल्हि तयाशि रघुनाथानें । जिव तोचि जाहाला निरंजन ॥ ५ ॥

## पद १००

साधुसमागम सेवुनि बा रे । रहातसे खळ या चित्रकारे ॥ धृ ॥
चंदन हिंग एके ठायीं । बसले परि गुण लागत नाहीं ॥ १ ॥
कोकिळ काकसमागम केला । सुखद नाहीं कदा काकाला ॥ २ ॥
चंडशिळा जरि पडली आपीं । राहिल अंतरीं शुष्क तथापी ॥ ३ ॥
संशयबद्ध निरंजन ठायीं । बसला तरि भव चुकत नाहीं ॥ ४ ॥

## पद १०१

गुरुचरणीं पाहिली गोदावरी । उठाउठी पातकें जालीं दूरी ॥ धृ ॥
चरणद्वय तोची हा ब्रह्मगिरी । पदरज निघाली गोदावरी हो ।
कुशावर्त मुद्रांकित वसुंधरी ॥ १ ॥ तयाठायीं जाउनि स्नान केलें ।
बहुजन्माचें पातक भस्म झालें । येणें जाणें एथुनि आतां गेलें ॥ २ ॥

रघुवीर सद्गुरु शेषशाई । ज्ञानगंगा निघाली त्याचे ठाई ।
निरंजन तयाचे गुण गाई ॥ ३ ॥

पद १०२

धन्य स्वामी सद्गुरु रघुराया । तुझे पायीं ओवाळूं निज काया ॥ धृ ॥
जन्ममरणाविरहीत मज केलें । सुखदुःख सर्वेही लया नेलें ॥ १ ॥
मायामोहो समुळ गेली भ्रांती । चिदानंदीं पावलींसें विश्रांती ॥ २ ॥
अघटीत ऐसें घटवीलें । जीवंतचि असतां मुक्त केलें ॥ ३ ॥
निरंजनीं वस्तीसी दिला ठाव । पुसुनिया टाकिलें नांवगांव ॥ ४ ॥

पद १०३

मला संसारीं कांहीं सुख नाहीं । किति सांगूं मी तूज मायबाई ॥ धृ ॥
जेव्हां पासुनि जन्म लग्न झालें । तेव्हां पासुनि सासुऱ्यासी नेलें ।
गुरुमाहेरा नाहिं येऊं दीलें । नित्य जाचिति मला रांड मेलें ॥ १ ॥
कामक्रोधादि सहा दीरभावें । यांनीं मजलागी नीत्य गांजावें ॥ १ ॥
गाल रगडोनि पुढें दांत खावे । त्याच्या जाचाला कीती सोसावें ॥ २ ॥
मन दादला बहु परद्वारी । घरीं राहिना एके क्षणभरी ।
दृष्टि पाहे लोकांची धननारी । घरीं येउनि मजलागीं मारी ॥ ३ ॥
मृत्यू सासूरा बसोनिया द्वारीं । चिंता सासू दूरूनी हाका मारी ।
आशातृष्णा नंदा जावा घरीं । खावुनि घालिती मजवरी चोरी ॥ ४ ॥
बया झाला होवर भंग त्याचा । तुझी लागूं दे गुरुमाय वाचा ।
आज निघाला दिन सोनियाचा । निरंजन रघुनाथ साचा ॥५॥

पद १०४

संसारा येवुनि प्राण्या केलेंसि त्वां काय रे ॥ धृ ॥
घरदाराधनासाठीं । वेचिल्या आयुष्य-कोटी ।
नरदेहा झाल्या तुटी । करिसी हाय हाय रे ॥ १ ॥
लक्षचौऱ्यांशीची फेरी । फिरतांना कोटींवरी ।
काकताल न्यायापरी । नरतन होय रे ॥ २ ॥

नाहीं केलें तीर्थाटन । देवपूजा संतर्पण ।
न वर्णिले हरीगुण । शिणविली माय रे ॥ ३ ॥
निरंजन रघुवीर । तो हा भृगु अवतार ।
व्हावयासी भवपार । शरण तया जाय रे ॥ ४ ॥

## पद १०५

हे गंगा । भवतापत्रयभंगा । प्रियदायक श्रीरंगा । वसलीसे शिवअंगा । देवऋषींचे वृंद । धरुनि मनीं छंद । निशिदिनीं इच्छिति तवसत्संगा ॥ १ ॥

हे गोदा । प्रगटुनि विष्णुपदा । करिसी अघतम छेदा । देसी मुक्तिप्रसादा । भक्तजनातें संकटिं रक्षुनि लाविसि अतुले नादा ॥ २ ॥

हे गौतमी । बहु तीर्थांची स्वामी । पुरवित गौतम कामीं । पावन करि निजनामीं । नित्य निरंतर स्नान त्या नांदवि निजसुखधामीं ॥ ३ ॥

हे स्वर्धुनी । आतमसुखाची खाणी । रघुविरगुरुसुखधानी । निर्मळ जीचें पाणी । नित्य निरंजन सेवित असतां झाला ब्रम्हज्ञानी ॥ ४ ॥

## पद १०६

ऐके हो निजवस्तुनिधाना । रघुविर गुरुराणा ॥ धृ ॥
दाखवितो मी उकलुनिया निज अंतरिच्या खुणा ।
अधिकारी मी नसतां कांहीं बोधियलें वचना ।
ते निज भावें सेवुनिया मी झालों तृप्तमना ।
पूर्णपणाचे ढेकर ते हे ऐकावे श्रवणा ॥ १ ॥
जहदाजहदपणें मनिं करुनि भागत्यागपणा ।
पंचभूतांचा मानुनिया लय शोधियले गगना ।
त्यागुनि माया भाग जडात्मक काढियलें विगुणा ॥ २ ॥
सच्चिद्सुख आणि नाम रूपात्मक केलें दो ठाई ।
मिथ्या मानुनि नामरुपासी ब्रम्हाचे जग पाही ।
उजळुनिया दिप निरखितां मग व्याळदोरेची जाई ॥ ३ ॥
लहरीवरि जळ सांगरि जैसी चालुनिया जाय ।

तैसी वृत्ती स्वरुपावरुते येति जाति आहे ।
लहरि न होउनि सागरसा मी अढळपणें राहे ॥४॥
आनंदाप्रति टाकुनि मागे पूर्णपदीं गेलों ।
आठव विसर सांडियले परि आहेसा जालों ।
निरंजन मी तद्रुप होउनि सद्गुरुसी वदलों ॥ ५ ॥

## पद १०७

देखिलें रूप डोळां ती खूण सांगु काई ॥ धृ ॥

स्थावर जंगम अवघें जग । ब्रम्ह दिसताहे मज । जैसे सोनियाचे नग सर्वहि सोनेंची भासे ॥ १ ॥ अग्नीला इंधन ! स्वयें जालें अग्निपण । तैसे देह बुद्धि मन । सारे ब्रम्हचि झाले ॥ २ ॥ जें जें तें तें ब्रम्हरूप । जैसें पातळ थिजे तूप । साचे घडले जरी अमूप नाहीं वेगळें ॥३॥ सर्वहि आत्मा निरंजन । नामरूप मिथ्या भान । रघुविरानें ऐसी खूण सांगितली मज ॥ ४ ॥

## पद १०८

संसारभान गेलें वेडेपण अंगा आलें ॥ धृ ॥
नाहीं मनासी ठिकाण । नको वाटे दाराधन ।
सांडियला अभिमान । लाज लोकांची ॥ १ ॥
पोटा मिळालें ते खावें । वस्त्र फाटकें नेसावें ।
वाटे एकांतीं बैसावें । जाऊनी एकलें ॥ २ ॥
वाटे करूं नये पाप । आला पुण्याचा संताप ।
प्रारब्धानें आपोआप । होई तें होवो ॥ ३ ॥
अवघा मीच निरंजन । भासेची मीतूंपण ।
रघुवीर दयाघन । त्यांनीं हें केलें ॥ ४ ॥

## पद १०९

बापिया देह नव्हे तुज कांहिरे बापिया ॥ धृ ॥

अरे तूं निर्गुण निर्विकार । निरंतर अजरामर । पाहे नासकें शरीर रे ॥ १ ॥ निजानंद तूं सत्‌चित् । तूं तो षड ऊर्मी विरहित ।

देह अजरामर कर्शि तरे ॥ २ ॥ मी देही ह्मणतां बा रे । तुज घेणें पडले फेरे । मी ब्रह्म ह्मणतां सरे ॥ ३ ॥ गुरु रघुवीराची खूण । तुज सांगे निरंजन । घेई सखया हें ऐकुन । रे बापिया ॥ ४ ॥

## पद ११०

ऐके हो अनुमान विचारी माया दूर करी । निजवृत्तीनें
आत्मा पाहुनि निश्चय पूर्ण धरी ॥ ध्रु ॥
पंचभुतें आणि इंद्रिय दाही करिसी मेळवणी ।
चाळक त्याचें मन हें समजुनि मानिसि नाहिपणीं ।
सूषुप्तीवत झालेसें परि न चुकती फीरणीं ॥ १ ॥
जागृत स्वप्न सुषुप्त्यावस्था आणुनि ओळखणा ।
साक्षि मि याचा बोलुनि वचनें करिसी अनुमाना ।
कळलें ऐसें लौकिकि दावुनि मिरविसि थोरपणा ॥ २ ॥
लटकी शांती मिरवुनि जगिं म्हणवीसी ज्ञानी ।
बगळा जैसा मत्स्यासाठीं बैसतसे ध्यानी ।
सर्वहि चिन्हें दाखविलीं परि झाली हितहानी ॥ ३ ॥
रघुविर सद्गुरु पाहुनि बरवा शरण तया जाई ।
आत्मा निजवृत्तीसि लक्षुनि ब्रह्मचि तूं होई ।
निरंजन मन तुझिये चरणीं टेकिल किं डोई ॥ ४ ॥

## पद १११.

चला रे सखयांनो रघुविर पाहूं । त्यासान्निध राहूं ॥ ध्रु ॥
हरि हा प्रगटुनिया रविकुळवासी अयोध्यावासी ।
भावें सेवुनिया वैराग्यासी त्यजिले राज्यासी ।
दशरथनंदन मुनिकुळमंडन शोभति ज्याते आजानुबाहू ॥ १ ॥
वसले गंगेचे येउनि तटीं । स्थळ पंचवटी ।
बंधू लक्षुमण प्रिय धूर्जटी । सिता गोरटी ।
वेष्टुनिया मृगचर्म चरितऋषि कर्म निशिदिनिं फळ भक्षुनि करिती निर्वाहु ॥ २ ॥

आला धावुनिया भक्तकाजा । तो रामराजा ।
सर्वे वानरदळ घेतो फौजा बहु गाजावाजा ।
कृपासिंधु जळसिंधु तरुनिया लंकेवरुते म्हणतो जाऊं ॥ ३ ॥
ऐसें कपिमंडळ बोलुनि सारें । आलें परिवारें ।
दिधले निरंजन प्रभुसी घेरे । करिती भुपकारें ।
राम राम हें नाम वदुनि मुखिं संतत घेती हरिगुण लाहू ॥४॥

## पद ११२.

अस्ति भाति हे प्रियरूप हा आत्मा ॥ ध्रु ॥ अस्तिपणें सद्वस्तु निरंतर स्वस्त करुनि भ्रमग्रस्त अखंडित राहे अदिअंतीं ॥ १ ॥

भातिरूप स्वप्रकाश निर्मळ अकाशवत् चित्प्रकाश रविशशि विकास पावति ज्या तेजाचे दीप्ती ॥ २ ॥

प्रीय सतत अप्रीय नसुनि अक्रियपणें जग म्रियमान त्या अनंत स्वरुपें अनंद पावति प्रियतम चित्ती ॥ ३ ॥

अंजन रहित निरंजन रघुविर कंजनयन मनरंजन स्मरुनि झाला चत्सुख व्यक्ती ॥ ४ ॥

## पद ११३

संसारस्वप्न ऐक वो साजणी । विस्मयो मोठा जाला माझे मनीं ॥ ध्रु ॥
भ्रमनिद्रा मोठी ज्या कळेना । जागी असतां डोळे म्या झाकिले ।
भयंकर स्वप्नातें देखिलें । पाहूनिया मनामधिं भ्याले ॥ १ ॥
काय हा सांगू आश्चर्याची गोष्टी । स्वप्नामधिं देखिलि म्यां सृष्टी ।
वेगळाली वेष्टी ते समष्टी । सांगू जातां जिव होतो कष्टी ॥ २ ॥
शुद्धतत्व निर्मळ असतां । प्रकटली तेथें एक कांता ।
पतिविना जाहाली प्रसुत । तोची पुत्र केला तिनें भर्ता ॥ ३ ॥
तियेचे पोटीं तिघे पुत्र जाले । एकांतुनि एक ते काढिले ।
पांचा वाशांचें घरकुलें केलें । आधाराविण अंतराळीं ठेलें ॥ ४ ॥
तिघे मुल खेळाया लागले । बाहुलें त्यांनीं नानापरि केले ।
चौऱ्यांसी लक्ष योनिसी निर्मिलें । तयामधि मजलागीं केलें ॥ ५ ॥

पहिल्यानें केले मज गाय । दुसऱ्या तिसऱ्यानें घोडा हत्ती माये ।
चवथ्यानें मानवाचा देह । अष्टादशवर्ण समुदाय ॥ ६ ॥
वृक्ष पक्षी किडा मुंगी जाले । स्त्रिया पुरुषत्वें मिरवले ।
सांगातिसि बहु मेळविले । बहुता ठायीं संसारासि केलें ॥ ७ ॥
ऐसी मी फिरतां फिरतां साजणी । कितिदा आली मानवाची योनी ।
तेथें म्यां पापपुण्य आचरोनी । भोगियल्या दुःखाच्या श्रेणी ॥ ८ ॥
कुलाळचक्रा सारिखी फिरतां । खेद झाला मोठा माझे चित्ता ।
कोठोनि आले कोण मातापिता । कोहं कोहं कोण माझा कर्ता ॥ ९ ॥
दचकोनि मोठ्यानें बरळले । रघुविर गुरु यांनीं थापटिले ॥
सोहं भावें मज जागें केलें । उठुनिया तेव्हां मी बैसलें ॥ १० ॥
संसारस्वप्न मिथ्या जालें बाई । जन्ममरण मजलागीं नाहीं ।
गेलें ना आले ठाईंचिये ठाईं । निरंजन मी कदा नोहे देही ॥ ११ ॥

## पद ११४

भालचंद्रा रे ये संकटहरणा ॥ धृ ॥ वक्रतुंड गजशुंडदंड द्विजखंड-सहित पाशांकुशधरणा ॥ १ ॥
शूर्पकर्ण कटि व्याळभरण । कारि झटित चरण गणनायक विगुणा ॥ २ ॥
लंबोदर पीतांबर परिकर गलित अधरधर अद्वयरदना ॥ ३ ॥
गौरीनंदन भवभयकंदन वंदन करित निरंजन मूषकवहना ॥ ४ ॥

## पद ११५.

देखिला गे माय नंदाचा नंदन । तेणें माझें मन धालें गे माय । यमुनेचे तटीं तो हा जगजेठी धांवें धेनूचिया पाठीं धावे गे माय । हातीं घेऊनिया काठी गे माय । माथा कुरळ केश दाटी गे माय । वरुते मयूरपिच्छ वेठी गे माय । सावळा सुंदर रूप मनोहर पिवळा पीतांबर कटि गे माय ॥ १ ॥

मेघश्यामवर्ण राजीवनयन केशरीचंदन उटी गे माय । मृगमद लावी लल्लाटी गे माय । शोभे वाघनखपेटी गे माय । घाली गुंजाहार कंठीं गे माय दिव्य मकराकार कुंडलें तळपति बाजुबंद बाहुबटि गे माय ॥ २ ॥

बाळिचा जो बळी कळिकाळा आकळी तो हा आला नंदकुळीं गे माय । धावुनि गोधनें वाळि- गे माय । ढवळी आणि पोवळी गे माय ॥ खाजवि त्या वेळोवेळीं गे माय । गोपाळांचे मेळीं चाले वनमाळी पांघरे कांबळी काळी गे माय ॥ ३ ॥

मुरलीचा रव श्रुतीचा गौरव बोलुनिया भाव दावी गे माय । व्रजनारी नादासी लावी गे माय । नाना पुष्पतुरा खोवी गे माय । देहुडा चरण ठेवी गे माय । जो कां रघुविर तो हा मुरलीधर । निरंजन मनिं भावी गे माय ॥ ४ ॥

पद ११६

गुरुराया वाटतें माझे मनिं । सांगतों मी तें ध्यावें आयकोनी हो ॥धृ॥
उघडितां अज्ञान कपाटासी । ज्ञानयोगें देखिलें स्वरूपासी हो ॥१॥
ज्ञानाज्ञान मनाचे दोन्ही धर्म । माझें रूप निर्मळ तें निर्धर्म ॥२॥
जैसें ज्ञान तैसेंचि अज्ञान । मज नको दोन्हींचें घेणें देणें हो ॥३॥
मी तों सिद्ध सर्वदा निरंजन । साधकासी पाहिजे ज्ञानाज्ञान ॥४॥

पद ११७

पाहिला श्रीहरि उन्मनीचे घरीं । पाहतां पाहणें दूरि जाल गे माय । निश्चळ निर्मळ स्वरूप सोज्वळ त्रिगुणाचा मळ नाहीं गे माय । निर्गुणत्वें सदा राही गे माय । अद्वैताची स्थिती वाहे गे माय । त्याजविना नसे कांहीं गे माय । भास आभासासी अलिप्त दोहींसी आनंदाची रासी पाही गे माय १ जागृती ना स्वप्न सुषुप्ति व्यवहार नाहीं शून्याकार जेथें गे माय ॥

उन्मनि सुंदरि तेथें गे माय । योगी इच्छिताती जीते गे माय । तुर्या ह्मणताती तीतें गे माय । श्रुतीच्या गौरवें गुरुवाक्यासवें पावलों निजपदातें गे माय ॥ २ ॥

पाहूं जातां हारी जालों तदुपरि द्वैताची बोहरी जाली गे माय । जविदशा सर्व गेली गे माय । दीप्तींत दीप्ति मिळाली गे माय ॥ वासना मुळी जळाली गे माय । मीच सर्वोपरी अंतरिं बाहेरि माया विद्या नाहीं जाली गे माय ॥ ३ ॥

अज्ञानाचा सव लोटियेलें ज्ञानवृत्या मानामान गेलें गे माय । मनाचें उन्मन जहालें गे माय ॥ बोलणें सर्व निमालें गे माय । तृप्तीचे ढेकर आले गे माय । रघुवीरप्रसादें शुद्ध निरंजन ब्रह्मानंदें सदा डोले गे माय ॥ ४ ॥

## पद ११८

साजणि ग धन्य जालें श्रीहरिच्या नामस्मरणें ।
त्रैताप हरले माझे संसार उठलें धरणें ॥ धृ ॥
वाचेनें हरिगुण गातां शीतळ जाली काया ।
दैवतें इष्टानिष्ट करितातिसर्वेहि माया ।
सर्वेहि भूतें धरिति कृपेची शीतळ छाया ॥ १ ॥
सद्भावें हरिपदिं जडतां तुटले भवबंधन दोरे ।
मृगजळवत माया जाली समूळ चुकले फेरे ॥
दृष्टीसी दिसतें संये जगनग हें ब्रह्मचि सारे ॥ २ ॥
श्रीहरि रघुविररूपें दयाकर मजवरि जाले ।
अधिकार नसतां मजसि निरंजन पद हें दिल्हें ॥
अनंत ब्रह्मांडाचें राज्य हें घरा आलें ॥ ३ ॥

## पद ११९

आत्मा शुद्ध रे आत्मा शुद्ध रे । जाणती शहाणे ते प्रबुद्ध रे ॥धृ॥
त्रिगुणाचा मळ नाहिं जेथें रे ।
मायाविद्या निरसिल्या तेथें रे ॥ १ ॥
जीवशिव उभयांचे भेद रे ।
स्वरुपीं पाहतां ते आभेद रे॥ २ ॥
सत्यानंद चिदाकाश आत्मा रे ।
तो हाची जीवात्मा परमात्मा रे ॥ ३ ॥
निरंजन ह्मणे ऐसा आत्मा रे ।
जाणे तो ह्मणावा प्राप्त आत्मा रे ॥ ४ ॥

## पद १२०

सखया रे मारुति राया रामाप्रति सांगे वार्ता ।
ठेवुनिया कंठीं प्राण मार्गोप्रति पाहे सीता ॥ धृ ॥
गंगातटिं मृगयेसाठीं धावुनिया तुम्ही गेला ।
होणार न चुके पुढिलें लक्षुमण म्यां धाडिला ।
गोसावी होउनि मेला दशकंधर तेथें आला ।
वाहोनी स्कंदावरुतें अणलें हो मज लंकेला ॥ १ ॥
ब्रम्हऱ्याच्या शापाभेणें न लावुनि मातें हात ।
मी भार्या नोहे ह्मणुनी कराया पाहे घात ।
राक्षसिणी खायासाठी वासुनिया येती दांत ।
नानापरि भय दाखविति ठेवुनिया अशोकांत ॥ २ ॥
रामाचें चिंतन करितां षडमास होत आले ।
श्रीरामावांचुनि सखया जळप्राशन नाहीं केलें ।
प्रियकर मनमोहन माझे कैसे मज विसंबिले ।
पापाचें संचित कैसें या काळीं मातें फळलें ॥ ३ ॥
रामाप्राते जाउनि आतां प्रणिपात माझा सांगे ।
जोडुनि कर माझ्याकडुनि पायाप्रति जाउनि लागे ।
निरंजन राहुनि तूह्मी भरावें मजवरि रागें ।
घेउनिया जावें मजसीं येउनि या लागवेगें ॥ ४ ॥

## पद १२१

भक्तिविण जिणें त्याचें पाहूं नये तोंड । जाला भूमिभार वृथाप्रसवली रांड ॥धृ॥
विषया ध्यास मनीं वाहे निरंतर ।
मुक्तीची वासना नाहीं एक पळभर ॥ १ ॥
जीवा पलीकडे वाटे जासि संसार ।
जाती कुळ अभिमान उचलूनी भार ॥ २ ॥
वैदिक शाहाणा मीच पंडित आगळा ।
चातुर्याचा अहंकार वाहे वेळोवेळा ॥ ३ ॥

वाचे नये राम त्याची शुद्धी नाहीं मती ।
निरंजनीं भेटी नाहीं त्याजला कल्पांतीं ॥ ४ ॥

पद १२२

आपराध क्षमा आतां केला पाहिजे, देवा केला पाहिजे । अबद्ध सुबद्ध गुण वर्णीले तुझे ॥ धृ ॥

न कळेचि टाळ विणा वाजला कैसा, देवा वाजला कैसा ।
अस्ताव्यस्तपणें नाद केला भलतैसा, देवा केसा भलतैसा ॥ १ ॥
नाहीं तालज्ञान नाहीं कंठ सुस्वर, देवा कंठ सुस्वर ।
जाला नाहीं बरा वाचे वर्णउच्चार, देवा वर्णउच्चार ॥ २ ॥
भाव नाहीं पोटीं नाहीं प्रेमपाझर, देवा प्रेमपाझर ।
कीर्तनीं बैसतां मन चिंती संसार, देवा चिंती संसार ॥ ३ ॥
निरंजन ह्मणे आह्मी वेडेबागुडे, देवा वेडेबागुडे ।
गुणदोष न लावावा सेवकाकडे, देवा सेवकाकडे ॥ ४ ॥

पद १२३

रामराया राघोबा रामरामा । तुझे ठायीं राहूं दे माझा प्रेमारे ॥ धृ ॥
नको मज संतती दाराधन । यांचे संगें त्रासलें माझें मन हो ॥ १ ॥
नको यश सत्कीर्ती लोकाचारी । नको मज सन्मान घरींदारीं रे ॥२॥
नको मज अयुष्य देऊं वाड । जिवित्वाची मजला नाहीं चाड रे ॥३॥
नको मज सर्वथा तुजवीण । सत्य बोले त्रिवाचा निरंजन रे ॥ ४ ॥

पद १२४

मोहिलें मन नंदाच्या नंदनें । भुललें तेणें हो घरालागिं येणें ॥ धृ ॥
पाणी हें पात्र घेउनिया पाणी । भरूं मी गेलें यमुनेचें पाणी ।
निबिड वृक्षाखालीं मधूवनीं । देखिला तेथें हो उभा चक्रपाणी ॥ १ ॥
सहजिं तेणें केला वेणूरव । गाइलें सर्वश्रुतींचें वैभव ।
संगित नाना वाद्यांचा गौरव । पातळे तेणें हो मज अष्टभाव ॥ २ ॥
घेउनि निजस्कंदीं म्यां घागरीं । ऐकत उभी राहिलें वीळभरी ॥
सर्वथा नाहीं आले देहावरी । विसरुनि गेलें हो येयाचे मंदीरीं ॥ ३ ॥

सावळा हरी निरंजनवासी । श्रीधर सुरवर सौख्यरासी ।
गोधनासवें पातला घरासी । त्याचिया संगीं आलें अनाथासीं ॥ ४ ॥

पद १२५

तैसा मायिक हा संसार । तैसा मायिक हा सं० ॥ धृ ॥
मृगजळ जैसें भावतरंगीं । दावित उदकाकार ॥ १ ॥
रज्जूवरते पुच्छफणासह । भासत सत्य विखार ॥ २ ॥
शुक्तीचे स्थळीं रजता भावित । सेवुनिया अविचार ॥ ३ ॥
निरंजन हा रघुविर वचनें । मानित देह असार ॥ ४ ॥

पद १२६

जरि तुज निजहित वाटल व्हावें । तरि गुज ऐकावें ।
हरिहर एकचि मानुनिया मनिं । शरण तया जावें ॥ धृ ॥
वोतन धनकण घरसुतजाया । सर्वहि त्यागावें ।
सांडुनि लौकिक थोरपणातें । श्रीहरिगुण गावे ।
भक्तिबळें निजप्रमळ वचनें । दिनिनिशिं अळवावें ॥ १ ॥
निश्चय पाहुनी भक्तजनाचा । श्रीहरि पावतसे ।
धावुनिया पय पाजित जननी । बाळालागि जसें ।
भाव जयापरि त्याजपरी हरी । भक्तालागिं असे ॥ २ ॥
जववरि हरिहर पूर्ण दयाकर । जाले तुज नाहीं ।
तववरि सद्गुरु शास्त्रहि अद्वय । न मिळे तुज कांहीं ।
यास्तव मनुजा तनमन अर्पण । । करि हरिहरपायीं ॥ ३ ॥
निरंजन हें साधन करुनी । गिरनारा गेला ।
दत्तात्रयगुरु पाहुनि नयनीं । पूर्णपणें धाला ।
निजस्वरुपातें पाहुनिया मग । अंतरिं नीवाला ॥ ४ ॥

पद १२७.

बाजी हे बाजी अजि उमजूनि करी ईश्वर राजी ।
भ्रमदायक समजुनि माया चंचळमन अवरि वाजी ॥ ध ॥

धनसंपत्ति वाडे हुडे पालख्या हत्ती घोडे ॥
जायासुत लाडेकोडें सांभाळीं मी मागेंपुढें ॥
सत्यत्वें मानुनि यासी भुलले जन अवघे वेडे ॥ १ ॥
मिथ्या हें सर्वहि असतां दिसताहे सत्यावाणी ॥
रविरश्मि उखर भूमिसि भासतसे जैसें पाणी ॥
कीं गगनीं गंधर्वांच्या उभवील्या नगरश्रेणी ॥ २ ॥
कोईचा आंबा केला मोठासा गारुडियानें ।
घटिकेमधिं आणिलीं त्याला फळपुष्पें आणिक पानें ॥
परिणामीं शोधुनिया पाहतां श्रमदायक होणेंजाणें ॥ ३ ॥
शिवमूर्ती अंतरयामीं वसली ते नयनीं पाहू ।
एकत्वें सारुनि पूजा अद्वय तूं होउनि राहे ।
रघुविरसद्गुरु वचनें निरंजन पद हें लाहे ॥ ४ ॥

## पद १२८

निश्चय पूर्ण करा पूर्ण करा । गुरुवचनें भव सारा ॥ धृ ॥
श्रुतिशास्त्राची उक्ति । होती गुरुवचनानें मुक्ती ॥ १
गुरुचरणीं मन जडलें । त्याला सर्वहि साधन घडलें ॥ २ ॥
गुरुवचनीं जो रहातो । तो नर नारायणरुप होतो ॥ ३ ॥
गुरुपदीं निश्चय होतां । येतें निरंजनपद हातां ॥ ४ ॥

## पद १२९

निशिदिनिं हरिभजनीं हरिभजनीं । रतली ज्याची वाणी ॥ धृ ॥
मेरुकोटी सुवर्ण । त्याला घडलें पृथ्वीदान ॥ १ ॥
अश्वमेध शत केले । तेणें पितर समूळ उद्धरले ॥ २ ॥
तो नर धन्य ह्मणावा । हरिप्रतिमारूप गणावा ॥ ३ ॥
श्रीहरिचे गुण गातां । येतें निरंजन पद हाता ॥ ४ ॥

## पद १३०

तो गिरिकंदरीं या घरीं । राहो अन्य प्रकारीं ॥ धृ ॥

जगनग सर्व पसारा । पाहे चिन्मय आत्मसारा ॥ १ ॥
विचार अंतरिं फळला । ज्याचा भेदाभेद गळाला ॥ ३ ॥
इंद्रिय वळसा बळला । जुनाट वासन वेल जळाला ॥ ३ ॥
रघुविर,गुरुपदीं जडला । जो नर निरंजन रूप जाला ॥ ४ ॥

पद १३१

कांहीं नाहीं रे चित्स्वरुपा वांचुनि । धृ । भूमिरापनल वायू खं आणि भुवनत्रय गुण दिशा दाही ॥ १ ॥ इंद्रचंद्र भोगेंद्र वरुण यम अर्कादिक सुर सर्वहि पाहीं ॥ २ ॥ स्थिरचर जगनग ब्रह्मचि ह्मणवुनि श्रुतिवचनाची ग्वाही ॥ ३ ॥ रघुविरपद सद निरंजन हृत्कमळी संतत वाही ॥ ४ ॥

पद १३२

हे मति परतावी परतावी । रघुविर चरणीं रतावी ॥ धृ ॥
विषयावरि नव जावी । निज मूळठायालागि वसावी ॥ १ ॥
सन्मार्गासि असावी । आत्मा टाकुनि किमपि नसावी ॥ २ ॥
सुखदुःखातित व्हावी । नांदो सत्संगतिचे गांवीं ॥ ३ ॥
निरंजन हें मागे । रघुविर गुरुचरणाप्रति लागे ॥ ४ ॥

पद १३३

रामकृष्ण हरिराम जयजय रामकृष्ण हरिराम ॥ धृ ॥
निशिदिनि वाचेलागि स्मरावा । रामकृष्ण हरि० ।
जाउनिया सत्संग धरावा । रामकृष्ण हरि० ॥
विषयभोग हा त्याग करावा । रामकृष्ण हरि० ।
आत्मस्वरुप निजलाभ वरावा । रामकृष्ण हरि० ॥ १ ॥
वर्णाश्रम धर्मि अचरावे । रामकृष्ण हरि० ।
क्षमा दया शांतिसि धरावें । रामकृष्ण हरि० ॥
कामक्रोध मार्गी नवजावें । रामकृष्ण हरि० ।
दैवें मिळेल तेंचि खावें । रामकृष्ण हरि० ॥ २ ॥

आपण तरुनि लोकां तरवावें । रामकृष्ण हरि० ।
रामकृष्ण वाचे स्मरवावे । रामकृष्ण हरि० ।
भक्तिमार्ग बळकट धरवावे । रामकृष्ण हरि० ।
पापकर्म मागें सरवावें । रामकृष्ण हरि० ॥ ३ ॥
धनदारासुत दूर करावे । रामकृष्ण हरि० ।
सर्व त्यजुनि निरंजन व्हावें । रामकृष्ण हरि० ।
रघुविरगुरुपद दृढ धरावें । रामकृष्ण हरि० ।
दुस्तर भवसिंधूसि तरावें । रामकृष्ण हरि० ॥ ४ ॥

## पद १३४

ऐका हा भवसिंधू कैसा मोठा थोडासा । संताचे संगें जाला जैसा सिंधू बिंदूसा ॥ ध्रु ॥

निजमनाचे योगें दुस्तर मोहें कल्पिलें पाहे ।
मानवादि पशु आणिक नाना देहें दारासुत गेहें ॥ १ ॥
जन्ममरणाची येतां फेरी आलि मज घेरी ।
संतांनिं कृपा केली बरि नेलें परतीरीं ॥ २ ॥
मनाचे पैलिकडे गेलों सिंधू उतरलों ।
चिन्मयस्वरूप स्वयें जालों पूर्णत्वें धालों ॥ ३ ॥
निरंजन ह्मणें संतसंग जाला भवभंग ।
सर्वाठायीं मीच येतां सांग जाहलों चांग ॥ ४ ॥

## पद १३५

धन्य आजि सुदिन उगवला । संतसंग अज्ञांसी प्राप्त जाला ॥ध्रु॥
सहजीं होतां संताची पदभेटीं । पापें गेलीं पळोनि उठाउठी ॥१॥
करुं जाता संतासी संभाषण । ताप गेला अंगीचा सर्व शीण ॥२॥
होतां संतजनाचा समागम । दैन्य गेले संसार सर्वश्रम ॥ ३ ॥
निरंजन ह्मणे मी धन्य जालों । संतजनप्रसादें पूर्ण धालों ॥ ४ ॥

पद १३६

यशोदेबाई लाधलें भाग्य आजि वो ॥ धृ ॥
जो कां व्यापक चराचरी । निर्गुण अद्वय श्रीहरि ।
तो हा आलासे उदरीं महाराज हो ॥ १ ॥
परब्रह्म तुझे घरीं । रांगे आंगणीं ओसरी ।
काय वर्णूं आजि थोरी । वाटे लाज हो ॥ २ ॥
सर्व त्रैलोक्यामाझारी । धन्य तूंचि सर्वांपरी ।
नाहीं उपमा दुसरी । नवलचोज हो ॥ ३ ॥
स्वामि निरंजन वासी । पूर्ण आनंदाची रासी ।
अखंडित तुझेपाशीं । सांगे गूज हो ॥ ४ ॥

पद १३६

सावळा डोळा पाहूं तुळशीदळ निर्मळ वाहूं ॥ धृ ॥
पुण्यक्षेत्र पंढरपूर । चंद्रभागा दक्षिण तिर ।
चला जाऊनि सत्वर । वाळवंटासी राहूं ॥ १ ॥
उभा राहिलासे नीट । पाईं जोडोनिया वीट ।
सुंदर नाभीचे निकट । ठेवूनिया बाहू ॥ २ ॥
ध्वजापताका लावून । येती साधुसंतजन ।
गाती विठोबाचे गुण । घेऊनिया लाहू ॥ ३ ॥
सर्व सांगे निरंजन । धन्य कलियूगीं कीर्तन ।
शुद्ध करोनिया मन । तद्रूप होऊं ॥ ४ ॥

पद १३७

जय जय भीमरथी भिमरथी । अगाध तवगुण कीर्ती ॥ धृ ॥
प्रगटुनि भीमाशंकरीं । येणें केलें त्वां पंढरपुरीं ।
पुंडलिकोंत पोटीं । ठेवुनि घेसी हरिपदभेटी ॥ २ ॥
तुझिया दर्शनमात्रें । होती दुर्जन जन सत्पात्रें ॥ ३ ॥
निरंजन सद्भावें । वंदुनि ह्मणतो तवगुण गावें ॥ ४ ॥

पद १३८

येई वो यदुराज मुरारी गोवर्धनधारी ।
बुडतों मी भवसागर डोहीं येउनि मज तारी ॥ धृ ॥
अविद्या वायूच्या योगें गेलों भवडोहीं ।
मोहो दुरासद दुर्धर याचे आवर्ताठायीं ।
जन्मालयाचे घेरे घेउनि पडिलों प्रवाहीं ॥ १ ॥
कामादिक रिपु जळचर यांनीं घालुनिया मीठी ।
होउनिया श्रमदायक मोठे झोंबति ममकंठी ।
अशा सर्पिणी लागुनि मागें पुरविली पाठी ॥ २ ॥
त्रासियलों बहु या संसारा स्वामी यदुवीरा ।
तुझियाविण जगिं शोधुनि पाहतां न दिसे मज थारा ।
उठी अतां धावुनि वेगीं हे दीनोद्धारा ॥ ३ ॥
निरंजन तव अंकित होउनि मोकलितो धाया ।
पूर्ण दयाकर होउनिया तूं दाखवि निजपायां ।
नाहींतरि मी तुझिया वांचुनि जातों कीं वाया ॥ ४ ॥

पद १३९

सावळिया पंढरिराया । कां नये दीनाची माया ॥ धृ ॥
मी तों अनाथ दुर्बळ । बुद्धीहीन अमंगळ ।
कामक्रोधांनीं सकळ । व्यापिली काया ॥ १ ॥
बुडतों भवाचे सागरीं । कोण आह्मासी उद्धरी ।
तुझिया वांचुनि श्रीहरी । जातों मी वायां ॥ २ ॥
नका पाहूं जी निर्वाण । बहुत झालासे मज शीण ।
सद्भावेंसी निरंजन । लागतों पायां ॥ ३ ॥

पद १४०

सत्वरि धावे पावे हो श्रीहरी । विनविति भावें हो भीमकी सुंदरी ॥ धृ ॥
तूं तंव दीनबंधू दयाकर । सदय पूर्णकृपेचा सागर ॥
धरिसि भक्तासाठीं अवतार । ह्मणवुनि तूंतें हो ध्यातें वारंवार ॥ १ ॥

रुक्मया माझा बंधु मूर्खरासी । दिधलें तेणें मज चैद्यासी ।
वारिता कोणी नाहीं हो तयासी । म्यां तंव तुज हो वरिलें मानसीं ।२।
द्विजवरा हातीं पत्रिका धाडिली । किमपि मनिं शंका नाहीं आली ।
उद्धटपणें बहु म्यां लिहिली । ह्मणवुनि माझी हो निरसांड केली ।।३।।
यदुविरा स्वामी निरंजनवासी । धावुनि आतां येई वो वेगेंसी ।
प्राण हे माझे आले कंठापाशीं । रक्षिता-होई हो येउनि मजसी ।। ४ ।।

पद. १४१

मनुजा राम भजावा रे पळभर व्यर्थ न जावा रे ।। धृ ।।
कैचे हत्ती घोडे पागा कैची घर जिनगानी ।।
आज आहे उद्याचि नाहीं उतरुनि जाइल पाणी ।। १ ।।
कैचे काका बाबा दादा कैचे रांडा पोर ।
संपत सरल्यावरती होती अवघीं हरामखोर ।। २ ।।
हातपाय अपले ह्मणवुनिया न धरी कांहीं भरोसा ।
अंतकाळिंच्या ठायीं पडेल यमाजीचा फासा ।। ३ ।।
निरंजनाच्या वचनालागीं भाव धरुनि ऐकावें ।
नाहीं तरि मग तुजला बाबा नरका लागल जावें ।। ४ ।।

पद १४२.

मन हें श्रीरामीं तन्मय झालें । मनपण हें गेलें ।। धृ ।।
करितां सद्भावें सद्गुरुभक्ति । विषयिं विरक्ती ।
दृष्टी पाहिली चिन्मय व्यक्ति । अद्भुत निजदीप्ती ।। १ ।।
घेणें टाकणें अवघे सरलें । मन मागें फिरलें ।
पाहतां चित्सागरिं जाऊनि शिरलें । लवणापरि विरलें ।। २ ।।
जैसी जळचंचळ वीचि मुराली । जळ होउनि ठेली ।
तैसी सद्वृत्ति ठाइं जिराली । ब्रह्मचि ते झाली ।। ३ ।।
सुलट्या दृष्टीनें उलटे पहातो । निजठायीं रहातो ।
ह्मणे निरंजन सरली वार्ता । रामचीं मी आतां ।। ४ ।।

पद १४३

तया गुरुदयाळाचा उपकार काय वानूं ।
अज्ञान निरसुनि उगविला बोधभानू ॥ धृ ॥
अनंत जन्मवरि घेत आलों मी फेरे ।
तें दुःख मजलागी झालें होतें जें बा रे ।
तें आजि निरसलें ज्याच्या वचनें सारें ॥ १ ॥
आनंदसागरासि मेळविलेंसे नेऊन ।
चिन्मयप्रकाशाचें लेवविलेंसे लेण ।
अढळपदीं मज नांदविलेंसे जेणें ॥ २ ॥
कृपादृष्टि उघडुनि मजलागीं निरखीलें ।
अपुले ह्मणुनिया लागवेगीं संबोखिलें ।
भवरोग निवारूनि अजर अमर केलें ॥ ३ ॥
दुर्जन असतां मी मज केलें निरंजन ।
अनुभव देउनिया चुकवीले येणें जाणें ।
उतराई होऊ काय देऊनिया मी देणें ॥ ४

पद १४४

राममूर्ती ते निजहृदयीं ध्यावी ॥ धृ ॥
श्यामवर्ण भवतरण शरण अघण करुनि भवताप दुरावी ॥ १ ॥
विषमठाण करिं चापबाण हनुमानसहित सीतासति सेवी ॥ २ ॥
श्रीकरुणाकर पीतांबरधर सुंदर प्रियकर सतत यजावी ॥ ३ ॥
रघुविरकंजनयन जलपुंजअयन जो शेषशयन हरि निरंजन भावी ॥ ४ ॥

पद १४५

नित्य गावा रे श्रीहरिगुण महिमा ॥ धृ ॥
भार फार अनिवार त्यजुनि संसार भवार्णवि घोर तरावा ॥ १ ॥
अमल कमलदल मृदुल शुशोभित चरणयुगुलसम हृदयीं ध्यावा ॥ २ ॥
आशापाशसह ऱ्हास करुनि मन नाश हरिपदिं वास करावा ॥ ३ ॥
माइक रंजन जगनगअंजन रहित निरंजन पूर्ण विसावा ॥ ४ ॥

पद १४६

सावध होउनि प्राण्या करि कांहीं उपाय ।
नरतनु गेल्या वरुते करसिल मग काय ॥ धृ ॥
बहुपुण्याचें फळ हे नरदेहे जाण ।
तें तूं दवडिसि वायां पशुपक्षीसमान ॥ १ ॥
मिथ्या धनसुत जाया अवघा संसार ।
ऐसें समजुनि भुलसी कां वारंवार ॥ २ ॥
अयुष्य सरल्यावरुते यमाचे दूत ।
दंडन तुजला करतिल ते श्रम अद्भूत ॥ ३ ॥
सद्गुरुवचनें हरिची धरि कांहीं सोय ।
नरतनु असतां बरवि निरंजन होय ॥ ४ ॥

पद १४७

पाहे रे प्राण्या मिथ्या हा संसार । समजुनि वांया रे भुलसि वारंवार ॥ धृ ॥
अवघी लीला ईश्वराची माया । चाऽति दुजेपणीं जैसी छाया ।
तैसें जग नानात्वें व्यक्ती ह्या । ऐकुनि घेईरे वैदिक उपाया ॥ १ ॥
लौकिकें नित्य डोळ्यानें पाहसी । जन्मले जग न आलें राह्यासी ।
पूर्वज मेले त्याला पाणी देसी । पोटींचे पुत्र रे जाळोनिया येसी ॥ २ ॥
ऐसा क्रम मिथ्या हा पाहून । सांडिसी विषयाच्या साठीं प्राण ।
नेणसी कांहीं अपूणा लागून । ह्मणवूनि तूंते रे लागे जन्म घेणें ॥ ३ ॥
कैशापारि संसारि तरावें । हें तुज जरि नाहिं कांहिं ठावें ॥
तरि त्वां शरण सद्गुरुला जावें । त्याचिया कृपें निरंजन व्हावें ॥ ४ ॥

पद १४८

मानवा अतां तरी होई जागा रे । मानवा ॥ धृ० ॥
साठी बुद्धी जाली नाटी । हातीं घेउनि उठसी काठीं ॥
एक जाली नाक हनवटी रे ॥ १ ॥

तुझ्या घरची रांडापोरें । तुज बोलुनिया निष्ठूर ॥
जाय म्हणती कीं मरमर रे ॥२॥
नाहीं सुटला हातचा बाण । गाई तंववरि हरिचे गूण ॥
तुज लौकरि आहे जाणें रे ॥३॥
गुज सांगे निरंजन । कांहीं तरि करि साधन ॥
ठेंवि हरिपदिं निश्चळ मन रे ॥४॥

पद १४९

मानवा असा कसा तूं पिसा रे ॥ धृ ॥
ज्या पासुनि होतें दुःख । त्याला तूं ह्मणसी सुख ॥
हे विषय नव्हेती विख रे ॥१॥
बहुपापाची स्वामिनी । स्त्री केवळ राक्षसिणी ॥
तिज ह्मणसी तूं पद्मिनी रे ॥२॥
प्रिय ह्मणसी अपुला देहे । तरि नरकाचें तें गेहे ॥
श्रमदायक त्याचा स्नेहे रे ॥३॥
सांडुनिया मी तूं पण । जाई रघुनाथा शरण ॥
होई अद्वय निरंजन रे ॥४॥

पद १५०

धन्य धन्य तूं पंढरीच्या राया रे । धन्य धन्य तूं ॥ धृ० ॥
निकभीमातट दिंडुर वनवासी हो । मुनी पुंडलिक भक्त पुण्यरासीहो ।
तयासाठीं तूं धाउनिया जासी हो ॥
चरणीं विट धरुनी नीट कटिकर ठेवुनि उभा होसी हो ॥१॥
सखा मानुनिया नामदेव शिंपी हो ।
घेऊनि त्याचे प्यालासि दुग्ध पीसी हो ॥
सुरदासा दाउनि वाट सोपी हो ।
जनाबाई म्हणुनि आई धरुनि डोई केशकुरळा चोपी हो ॥२॥
चिखुल तुडविता तुडविले पोरा हो ।
भक्त शोकाकुळ पाहुनिया गोरा हो ॥

जीवें उठविलें त्याच्या कुमारा हो ।
म्हणुनि माहार करुनि जोहार चोख्याचे वोढियले ढोरा हो ॥३॥
हे तों मागें बहुभक्त राक्षियले हो ।
निरंजनाचे ग्रंथ भस्म जाले हो ॥
सप्तश्रृंगि त्वां अणुनिया दिलें हो ।
कृपासिंधु दीनबंधू ब्रिद साच केलें हो ॥ ४ ॥

पद १५१

हरिची भक्ति बरी भक्ति बरी । तारक भवसंसारीं ॥ धृ ॥
सर्वांतरि हरी पहावा । अंतरिं निश्चय भाव धरावा ॥ १ ॥
हरिचे सद्गुण गावे । प्रेमळ वचनानें अळवावे ॥ २ ॥
विषयभोग विसरावे । निरंजन भक्तीनें भजावें ॥ ३ ॥
निशिदिनिं सत्संगासि धरावे । भवजळि रितिनें याचि तरावें ॥४॥

पद १५२

हरिचें नाम बरें नाम बरें । पापी तरले सारे ॥ धृ ॥
अजामिळ भव तरला । म्हणतां नारायण पुत्राला ॥ १ ॥
अळवितां पक्ष्याला । गणिका गेली वैकुंठाला ॥ २ ॥
उलटें नाम स्मरतां । जाला वाल्हाकोळी तरता ॥ ३ ॥
निरंजन हरिनामें । यास्तव घेतो बहु सप्रेमें ॥ ४ ॥

पद १५३

धावे पावे हो सद्गुरुराया । श्रीदत्तात्रया ॥ धृ० ॥
बुडतों भवडोहीं जातो वायां । तुजवांचुनि सखया ॥
शक्तिहिन झाली माझी काया । येऊं दे माया ॥१॥
कामक्रोधादि जळचर भारी । उदकामाझारी ॥
नेतां ओढुनि मज लावुनि दूरी । घालिति घोरीं ॥२॥
आशा सर्पिणी डंखू पाहे । तृष्णा गळग्राहे ॥
करुनि बैसली त्राये त्राये । हरि मजला पाहे ॥३॥

ऐसा निरंजन होउनि दीन । बोलें वचन ॥
न दिसे मजलागीं तुझियावीण । संरक्षिता दीन ॥४॥

पद १५४

भज रे भज प्राण्या रघुवीरचरणा । तापत्रयहरणा ॥धृ०॥
शिळा होती ते मानवी जाली । ज्याच्या पदचाळी ॥
कर्मे विप्रांचीं सिद्धिसि नेलीं । मखरक्षा केली ॥१॥
भावें पाळुनिया पितृवचन । सेवुनिया वन ॥
संगें घेतले वानरगण । सुग्रीव रक्षून ॥२॥
बिभीषण भक्ता संबोखिलें । सुरवर सोडविले ॥
सीता-शोकाचें निरसन केलें । मुनिसदना गेले ॥ ३ ॥
जेणें भक्ताच्या साठीं वहिला । अवतार धरिला ।
वेगीं शरणागत होई त्याला । निरंजन प्रभुला ॥ ४ ॥

पद १५५

आजि भाग्यउदयो मोठा जाला । आत्माराम अनुभवालागीं आला॥धृ०॥
जग अवघें दिसतें चिदाकार । सर्प नाहीं सर्वदा एक दोर ।
सोनें जैसें भासती अलंकार । द्वैतभाव पळोनि गेले दूर ॥ १ ॥
दु:खाध्वंस हाऊनि सुखावाप्ति । अखंडित स्फुरत असे ज्ञप्ती ।
सदोदित आनंदाची प्राप्ती । होति जालि निरंकुशा तृप्ती ॥ २ ॥
नाहीं जाले मरणजन्म फेरे । अज्ञानाचे विळया गेले वारे ।
भस्म केलें संचित कर्म सारें । भवबंध तोडिले सर्व दोरे ॥ ३ ॥
निरंजन जहालों निरंजन । नव्हतो ऐसा अनुभव जाला क्षीण ।
जविदशा सरोनि गेली दनि । रघुराज पावला दयाघन ॥ ४ ॥

पद १५६

आजी धन्य हो तेचि संसारीं । सखा मानितो जयालागीं हरी हरी ।
हरीपायीं ठेवूनिया मन । नित्य युक्तत्वें करुनिया ध्यान ।
करि सेवा श्रद्धायुक्त जाण । प्रिय भावितो ज्यासी भगवान ॥ १ ॥

करुनि इंद्रियग्राम स्वाधीन । सदा सर्वत्रीं बुद्धी समपण ।
सर्वभूतांच्या हितालागीं जाण । रत होवोनि सदा निर्गुण ॥ २ ॥
नाहीं कोणाचा जयालागीं द्वेष । मोह नाहीं अहंकार लेश ॥
सुखदुःखानें नव्हे जया क्लेश । असे ज्या लागीं क्षमाशीळ देश ॥३॥
शत्रुमित्र मान अवमान । स्तुति निंदा ज्यास समसमान ॥
स्थिरबुद्धि नाहीं निकेतन । त्यासि सद्भक्त ह्मणे निरंजन ॥४॥

पद १५७.

नरतनु फाटकी बा दाखवितों उकलून । काय तुह्मी भुलला ती धडफुडी-
ह्मणवून ॥ धृ ॥

पंचविस ठिगळांची देहगोधडी बा रे ।
मागिल संचिताचे तिला लाविले दोरे ॥
प्रारब्ध सुखदुःखरंग दिले काळे गोरे ॥ १ ॥
क्रियमाण सुवाव्यानें शिवोनिया वारंवार ॥
उपयोगी ह्मणोनिया सांभाळितसां फार ।
जरा व्याधी तिजलागीं लागलीसे कसर ॥ २ ॥
चांगली दिसती हे परि अंतरीं खोटी ।
कामक्रोध मोह लोभ विंचू सर्प तिच्या पोटीं ।
आशा तृष्णा कल्पना पिसा ढेकुण दाटी ॥ ३ ॥
जुनाट गोधडीचा सांडुनीया अभिमान ।
चित्जडग्रंथी भेद करुनिया घ्या धन ।
रघुविरगुरुकृपें तुह्मी व्हारे निरंजन ॥ ४ ॥

पद १५८

वैराग्य भाग्य आलें । दारिद्य नाहीं जालें ॥ धृ ॥
नाना विषयांचे भोग । मज दिसताती रोग ।
जाशा वासना वियोग । मन निश्चळ ठेलें ॥ १ ॥
सर्व त्रैलोक्यांचे राज्य । तृणतुल्य वाटे मज ।
इच्छा निमाली सहज । काम नाहीं राहिलें ॥ २ ॥

प्राप्त जालें आत्मसुख । तेणें गेलें सर्व दुःख ।
जाला संसार विन्मुख । आपणासी पाहिलें ॥ ३ ॥
जाली भाग्याची हे सीमा । नाहीं याजसी उपमा ।
तुच्छ वाटताहे रमा । निरंजन बोले ॥ ४ ॥

पद १५९

मनुजा राम सदा वद रे ॥ धृ ॥
भ्रमदायक जग सर्वही मानुनि । माया आस दरे ॥ १ ॥
कामादिक रिपु दंडुनि अंतरिं । सांडी दुर्मद रे ॥ २ ॥
सावळि सुंदर मूर्ति हरीची । ध्याइ मनीं आदरें ॥ ३ ॥
रघुविर अक्षयीं देईल तूंतें । निरंजनपद रे ॥ ४ ॥

पद १६०

काय तुह्मी भुलला रे धनदारा पाहुनी ।
पुढिल दुःख बाबा कानीं घ्यावें आयकुनि ॥ धृ ॥
अंतकाळीं नाहीं कोणी सोडविता येवोनी ।
दिसाल मग तुह्मी हीन दिनाच्यावाणी ।
यमदूत ओढतील काळपाशीं बांधुनि ।
कठिण वाट बा रे चालवीते जाचोनि ॥ १ ॥
कंटक तीव्र मोठे तप्त भूमी वरोनी ।
चालवीति वेगें वेगें आंग जातें फाटोनि ।
कावळे कुतरे ते मांस खाती तोडोनी ।
याहुनी पुढें मोठी यमपुरीं जाचणी ॥ २ ॥
करीताति शस्त्रमारा अग्निस्तंभा बांधोनी ।
झोडोनि पाडितात्ती विंचूसर्प डसवोनी ।
पर्वता वरोनिया खालीं देती ढकलोनी ॥ ३ ॥
बहुत दुःखें ऐसीं पडतील भोगणी ।
याजसाठीं रामराम वाचे गा रे निशिदिनीं ।

सोडवील अंतकाळीं सर्व श्रमापासुनी ।
हितकर माना सारे निरंजनाची वाणी ॥ ४ ॥

पद १६१

तो गुरु श्रीगुरू सद्‌गुरु भवसिंधूचा तारू ॥ धृ ॥
निजदेहीं निजडोळा दाखवि आत्मा देह निराळा ॥ १ ॥
आपुण विश्वाठायीं दाखवि जगनग आपले ठाईं ॥ २ ॥
श्रुतिवचनातें सेवी जिवशिव दोन्ही एकचि दावी ॥ ३ ॥
रघुवीरसद्‌गुरु ऐसा केला निरंजन आपुलासा तो ॥ ४ ॥

पद १६२

धन्य भाग्य त्या नंदयशोदेचें । परब्रह्म येवोनी पुढें नाचे ॥ धृ० ॥
ब्रह्मादीकां न कळे ज्याचा पार । होउनिया चिमणा तो किशोर ।
ठेवुनिया साजिरे कटि कर । नानाछंदें नाचतो वारंवार ॥ १ ॥
तयासंगें नाचती तिन्ही ताल । गाई इच्छें नाचताती गोपाळ ।
गोपगोपी अवघेची गोकूळ । नाचावया लागलें पक्षीकूळ हो ॥ २ ॥
नद्या वृक्ष नाचति ते पाषाण । इंद्रचंद्र आणिक देवगण ।
ऋषि सर्व नाचती तपोधन । कैलासी नाचतसे ईशान हो ॥ ३ ॥
भूमि माथा घेउनी नाचे फणी । उसळलें समुद्राचें पाणी ।
मेघमाळा उडताती गगनीं । अष्टभाव ऊठले निरंजनीं ॥ ४ ॥

१६३

नयनिं पाहे यशोदा नंदराणी । मुखालागि दाखवी चक्रपाणी ॥ धृ० ॥
उघडोनि पाहताची मनें तोंड । तयामाजि पाहिलें हो ब्रह्मांड ।
स्वर्गमृत्यूपाताळ प्रचंड । मेरवादी पर्वतही उदंड हो ॥ १ ॥
नवखंडें आणिक सप्तद्वीप । सप्तसिंधू नद्यांचे वाहे आप ।
ऋषिवृंद करिती घोरतप । नाना क्षेत्रें दैवतें प्रजाभूप हो ॥ २ ॥
देखियलें गोकुळ दुजे दीठी । त्यांत दीसे यशोदाजगजेठी ।
उकलुनि दाखवी मुखपेटी । तया आंत ब्रह्मांडाच्या कोटी ॥ ३ ॥

पाहुनिया विस्मीत जाली मनीं । कृष्णरूप देखिलें जनींवनीं ।
प्राप्त झाली सर्वही सुखधनी । स्थिरभाव पावली निरंजनीं हो ॥ ४ ॥

पद १६४

पाहीन निजडोळां मी श्रीराम । बोलतो ऐसा हें भरत उत्तम ॥धृ॥
छि छि वो माते तुवा काय केलें । जानकीरामा वनासि धाडीलें ॥
दशरथालागीं जीवेंचि मारीलें । धिगधिग तुझें तोंड काळें जालें ॥१॥
नलगे मज राज्यउपभोग । करीन निजदेहाचा मी त्याग ॥
नगमे रामाचा मज वीयोग । लागली चिंता हो काळजासी आग ॥२॥
काय म्यां होतें पूर्वी दोष केले । ह्मणवुनि ऐसें फळ प्राप्त जालें ॥
न कळे राम कोण्या वना गेले । आहाहा मजहो कैसें टाकीलें ॥३॥
सद्गुरुलागीं सांगाती घेवोनी । निघता झाला भक्तशिरोमणी ॥
देखियला रघुविर निरंजनीं । अद्वयभावें हो आनंदला मनीं ॥४॥

पद १६५

केशव केशव वद रे मनुजा निष्काम । हितकारक हे मोठें श्रीहरिचें नाम॥धृ॥
त्रैलोक्याचे ठाई नामाविण सार । न दिसे मजला कांहीं छेदक संसार ॥१॥
शुकसनकादिक करिती नामाचा घोष ।
वाल्मिक नामस्मरणें जाला निर्दोष ॥ २ ॥
भवरोगाची माला निश्चित हे जाण ॥
या वचनाला देती श्रुतिशास्त्र प्रमाण ॥ ३ ॥
रघुविर वचनीं बरवा ठेवुनि विश्वास ।
हरिच्या नामें तरला निरंजन दास ॥ ४ ॥

पद १६६

रघुराया स्वामीया मायबापा । मजवरि असूं द्या पूर्ण कृपा ॥ धृ ॥
दैवयोगें पायासीं अंतरलों । जवळोनि दूरिल देशा गेलों ॥
अमृतासी टाकून कांजी प्यालों । सर्व गुणें बहुत श्रमी जालों हो ॥१॥
तुह्माविण रक्षिता हो मजसी । कोण आहे पराव्या परदेशीं ॥

निवारण करितां दुःखराशी । न देखे मी नयनीं आणिकासी हो ॥२॥
उदयासी पातला पापठेवा । नाहीं केली तुमची कांहीं सेवा ॥
तेणें वाटे माझिया खेद जीवा । काय करूं श्रीगुरु देवदेवा हो ॥३॥
राहुनिया निरंजन कृष्णातटीं । इच्छितसे रघुविर पद-भेटी ॥
प्रेमभरतें आणोनी नेत्रपुटी । हरिसंगें लेहोनी धाडी चिठी हो ॥४॥

पद १६७

धन्य आजी सुदिन प्राप्त जाला । गुरुकृपा दसरा सण आला हो ॥ धृ ॥
गुरुपद वंदोनि वारंवार । मन घोड्यावरुते झालों स्वार ।
छत्र माथा गुरुचा पद्मकर । शमदम सांगाति दळभार ॥ १ ॥
वेदशास्त्रें गाताती पुढें वाणी । दशनाद वाद्यांची झाली ध्वनी ।
निश्चयाच्या ध्वजासीं उभारूनी । वैराग्ययंत्राची दणादणी ॥ २ ॥
देहद्वय ग्रामातें सोडोनी । पंचकोस सीमेसी वोलांडोनी ।
बोधशस्त्र घेवोनि तेजखाणी । भेदासुर मारिला निरंजनीं हो ॥ ३ ॥

पप १६८

काय वानूं तेथींची मी नवाई । रासक्रीडा खेळला शेषशाई ॥ धृ ॥
सोळासहस्र मिळोनी गोपबाळा । मधुवनीं पाहोनी सावळा ।
नानारंग झोकिती वेळोवेळा । हावभाव दाविती सर्वकळा हो ॥ १ ॥
हरिलीला गाउनी सुस्वरीं । टाळविणे मृदंग झल्लरी ।
वेणूरव वाजविती टीपरी । मोरचंग उठलीसे घूमारी ॥ २ ॥
तेथें एक जाहला चमत्कार । सोळासहस्र होउनी श्रीधर ।
वेगळाला गोपीचा धरुनि कर । नाचावया लागला चक्राकार हो ॥ ३ ॥
सुरवर बैसोनी वीमानीं । येते जाले सर्वही क्रीडास्थानीं ।
निरंजन विलासी चक्रपाणी । विलोकुनी वर्षताती सुमनीं ॥ ४ ॥

पद १६९

कृष्णजीचें गाऱ्हाणें सांगायासी । गोपि आली यशोदामातेपाशीं ॥ धृ ॥
लोणी खातां धरोनि कृष्ण हातीं । गोपी जाय नंदाच्या घराप्रती ।

अहो बाई सांगूं मी तूज कीती । येणें केली लोण्याची माझी माती ॥ १ ॥
बोले नंदराणी ते वेल्हाळ । कां गे माझ्या कृष्णावरी घेसी आळ ।
स्तनपान करितसे गोपाळ । नाहिं कोठें गेला हा एकपळ हो ॥ २ ॥
आश्चर्यातें नयनीं गोपी पाहे । एक खेळे दुसरा रांगताहे ।
तिजा गल्लोगल्लीनें धावताहे । त्रिभूवन पाहिलें कृष्णमय हो ॥ ३ ॥
होवोनिया विस्मित गवळणी । ह्मणे मोठा नाटकी चक्रपाणी ।
होवोनिया राहिला जनिवनीं । पूर्णपणें कोंदला निरंजनीं हो ॥ ४ ॥

पद १७०

सद्गुरु कृपाघन अजि वोळले सये । जाहाले मी सुखी तें या वाचे बोलतां नये ॥ धृ ॥

भवताप तपनिच्या अहे तापले देहे ॥
विषय मृगजळ पेऊं पाहे श्रमले बहु मोहें ॥ १ ॥
सुटला अविद्या वायू उठिलि वासनाधूळी ।
संशयकल्पना जीवा घोळी फिरती वाहटुळी ॥२॥
नित्यानित्य द्रुम संघट्टनि वैराग्य अग्नी ।
रिघोनिया पापतृण वनिं जाहली धूणी ॥३॥
शक्तिपात गुरूचें सुतेज कडकली वीज ।
कर्मवृक्ष जळोनिया सहज भाजिलें बीज ॥४॥
रघुविर गुरुमेघ आले बोध वर्षले ।
त्याचिया प्रसादें पूर्ण निरंजन धाले ॥५॥

पद १७१

माझ्या माहेरीची गोष्ट । तुला सांगतें मी स्पष्ट ।
ऐक सांडोनिया कष्ट । ग सये बाई ॥ १ ॥ धृ ॥
गुरु बाप श्रुती माई । संतजन माझे भाई ।
चिदाकासीचे देसाई । अनुभवी जे कां ॥ २ ॥
वस्ती निरंजन देसीं । बहुत जुनाट मिरासी ।
सर्व सुखाचिया रासी । त्यापासी सये ॥ ३ ॥

श्रुती माझी मायबाई । तीचे गुण सांगूं काई ।
जीच्या योगें मज सोई । सांपडली सये ॥ ४ ॥
तीचे पतिव्रतापण । काय सांगू तुजलागून ।
नेणे बापाजी वाचून । दुसरें कांहीं ॥ ५ ॥
गजलागीं नानापरी । शिकविलें वारंवारीं ।
आत्मा अनात्मा कुसरी । निवडुनी दिल्ही ॥ ६ ॥
तिचे वचनीं विश्वास । ठेवूनी मी सावकाश ।
देखियला महापुरुष । सद्गुरुराय ॥ ७ ॥
गुरु बापाजी रायाचें । रूप न बोलवे वाचे ।
परि बोल अबोलाचे । बोलले सये ॥ ८ ॥
रूपावीण रूपवंत । गुणावीण अळंकृत ।
मोठेपणीं त्याचा अंत । नाहीं ग सये ॥ ९ ॥
सर्वांठायीं व्यापून । राहिला अकर्तेपण ।
कदा नाहीं येणें जाणें । तयासि सये ॥ १० ॥
ज्याचिया प्रकाशानें । अग्नी चंद्र सूर्य मन ।
सर्व प्रकाशती जाण । ग सये बाई ॥ ११ ॥
भोगाविण सुखरूप । पुण्यावीण तो निष्पाप ।
ऐसा माझा गुरू बाप । आहे ग सये ॥ १२ ॥
तोचि आकारा येऊन । सांगितलें मज ज्ञान ।
अनुभवासी येऊन । जाले मी सुखी ॥ १३ ॥
संत बंधु जिरायाचे । गुण किति गाऊं वाचे ।।
भाग्यवंत दैवाचे । ते सई बाई ॥१४॥
अनंत ब्रह्मांडांचे । सत्ताधारी राज्य ज्यांचें ॥
अकर्तेपणानें त्यांचें । करितीं राज्य ॥१५॥
श्रुति गुरुच्या वचनीं । नांदतीं तत्परपणीं ॥
ब्रह्मानंद सुखखाणी । भोगितां जे कां ॥१६॥

माझ्या जीवीचे जिवलग । मायबाप बंधूवर्ग ॥
त्याच्या योगें सर्वजग । सुखाचें मला ॥१७॥
त्यांनीं कृपाळू होऊन । माझें केलें समाधान ॥
आवडीनें निरंजन । ठेविलें नांव ॥१८॥

पद १७२

सोडि रे मना या संसारा । ध्याई रघुवीरा ॥ धृ० ॥
उतरुनी भवाच्या सागरा । जासी परतीरा ॥
माझें माझें ह्मणुनिया बा रे । भुलसी तूं कां रे ॥
त्याच्या योगें तुजलागीं फेरे । पडले हे सारे ॥१॥
संतांचीया समागमें राही । करि साधन कांहीं ॥
अविनाश रघुविरा पाहीं । निजअंतरिं बाही ॥२॥
भवसिंधू सहजिं अटेल । संशय फिटेल ॥
रघुविर मीच झालों ऐसें । तुजसीं वाटेल ॥३॥
रघुविर जनिंवनिं पाहसी । निरंजन होसी ॥
विलया जातिल अनायासीं । दुःखाच्या रासी ॥४॥

विडा पद १७३

तांबुल घ्यावा स्वामी विनाविति लक्षुमी ।
भावार्थ मंचकासि बैसुनिया सुखधामीं ॥ धृ ॥
नवविधाभक्तिपानें पिकविलिं कोमळ ।
विज्ञानशुद्धचुना लावियला सोज्वळ ॥ १ ॥
अक्रोधकर्पूरांत वैराग्यसुपारी ।
घोळोनि वारंवार फोडियली नानापरी ।
विचार-वेलदोडे दयाक्षमा लवंगा ।
शांतीच्या कातगोळ्या मेळविल्या सुरंगा ॥३॥
प्रेमाची जायपत्री ब्रह्मानंद जायफळ ।
शेवटिं अर्पियलें सर्व साधनाचें फळ ॥ ४ ॥

निरंजन विलासिया नारायणा स्वामिया ।
अंकित तुमचा मी दास लागतों पायां ॥ ५ ॥

पद १७४

तो म्यां देखियला संन्यासी । सच्चित् सुख-घन-राशी ॥ धृ० ॥
कमंडलू शोभे ब्रह्मांड । मेरू ज्याचा दंड ॥ १ ॥
अष्टदिशाचे प्रावरण । कौपिन सप्तावर्ण ॥ २ ॥
सर्वा सृष्टीचा वेगळा । निर्मळ सोंवळा ॥ ३ ॥
त्याच्या दर्शनें करून । जालों निरंजन ॥ ४ ॥

पद १७५

त्याच्या उपकारा लागुन । नोहे मी उत्तीर्ण ॥ धृ ॥
जन्ममरणाच्या फेऱ्यासी । चुकविलें सायासीं ॥ १ ॥
दुःख नेउनिया विलयासी । दिलें सुख अविनाशी ॥ २ ॥
देह भावासी सोडविलें । निरंजन मज केलें ॥ ३ ॥

पद १७६

बहुता दिवसां घरा आली संतमंडळी ।
वाटतसे मला आजि जाली शुभदिवाळी ॥ धृ ॥
जाहली सुखघनवृष्टि कोंदली सृष्टी ।
आनंदलें मन हर्षदाटी न माये पोटीं ॥ १ ॥
करोनिया देहनिंबलोण ओवाळू प्राण ।
प्रेमामृतें करोनिया घालूं संतांसी स्नान ॥ २ ॥
आत्मानात्म विवेक विचार पूजाउपचार ।
अद्वय चिद्रस निजसार जेववूं फार ॥ ३ ॥
निःसंदेह पणाचा तांबुल अनंद फूल ।
मोद आणि प्रमोदाचीं वस्त्रें देऊं अमोल ॥ ४ ॥
सद्भावेंसि ह्मणे निरंजन मी अकिंचन ।
कांहींच आदर माझियानें न जाला जाण ॥ ५ ॥

पद १७७

हरि हा भक्ताचा सहाकारी ॥ घृ ॥ द्रौपदि छळिता दुष्टजनानीं जाला वस्त्र जरी ॥ १ ॥
पार्थरथाहुनि टाकुनिया उडि समरीं चक्र धरी ॥ २ ॥
गजेंद्राची ऐकुनिया हाक सत्वर धाव करी ॥ ३ ॥
रघुविर सद्गुरु होउनि आपण नीरंजन तारी ॥ ४

पद १७८

आतां सत्वर धांव हरी ॥ घृ ॥
कौरव दुर्जन दुष्ट छळात्मे धरिति मज पदरीं ॥ १ ॥
तुझिया वांचुनि काय करावी भरली हे नगरी ॥ २ ॥
भक्तजनाच्या पाळणकर्त्या संकट घोर हरी ॥ ३ ॥
नीरंजनप्रभु द्रौपदिसाठिं अंबररूप धरी ॥ ४ ॥

पद १७९

वेड्यावाणि वाटतसे मजला बाई वो । हरिवाचुनिया न सुचे अन करु मी काई वो ॥ धृ ॥
कारण याचें तुजला मी सांगुनि देतें वो ।
संतापाशीं जाउनिया बसलें होतें वो ।
त्यांनीं केलें चेटुक हे माझ्या भोवते वो ॥ १ ॥
वृक्ष आणि पाषाण भूमी पाणी वो ।
पशुपक्षी आकाश वायू अग्नी वो ।
सर्वांठायीं दिसतो चक्रपाणी वो ॥ २ ॥
हारीरूप दिसती नरनारी वो ।
पाठ माझी पुरविलि घरींदारीं वो ।
काय सांगूं जाहालों मीच हारी वो ॥ ३ ॥
जनिंवनिं दाटला निरंजनीं वो ।
पूर्णब्रह्म रघुवीर चिन्मयखाणी वो ।
संसाराची झाली धूळधाणी वो ॥ ४ ॥

पद १८०

माधवराया ये मुनिजनमानसहंसा रे ।
दानवदलना हे वृष्णीकुलवत्तंसा रे ॥ धृ ॥
कमलानयना कमलावर कमलाधरणा रे ।
कमलाभरणा कमलासन संकटहरणा रे ।
मज दासाची येऊं दे कांहीं करुणा रे ॥ १ ॥
निजभक्तच्या साठीं तूं अवतरलासी रे ।
द्रौपदिकाजा धाउनिया वेगीं जासी रे ।
गजेंद्राच्या गेलासी हाके सरसी रे ॥ २ ॥
माझ्या वेळे कां जाले तुजला ऐसें रे ।
न कळे माझें संचित हें आहे कैसे रे ।
तारी मातें तुजलागीं कळेल तैसे रे ॥ ३ ॥
निरंजन हा येउनिया लोटांगणीं रे ।
हाका देतो मोठ्यानें केविलवाणी रे ।
देई भेटी येउनिया चक्रपाणी रे ॥ ४ ॥

पद १८१

श्रीगोविंदा मुकुंदा आनंदकंदा रे । झडकरि आतां दाखवी निज पदारविंदा रे ॥ धृ ॥

दानवकदना मंदस्मित कमलावदना रे ।
अंबुजनयना शुकनासिक कुंदरदना रे ।
माधवराया ये मुनिजनमानस सदना रे ॥ १ ॥
जलजाधरणा जलजावर जलजाभरणा रे
जलनिधिशयना जलपूरित जलदावर्णा रे
जगदाधारा शरणागत-भवभय-हरणा रे ॥ २ ॥
तरुतलावरुते बैसुनि येई सत्वरिं आतां रे ।
कामादिक रिपु लौकर करी यांच्या घाता रे ।
तुजवांचुनिया नाहीं मज कोणी त्राता रे ॥ ३ ।

सच्चितसुखघन नीरंजन वीलासीया रे ।
श्रीगुरुमूर्ती करुणाकर हे रघुराया रे ।
दासावरुते करि पूर्ण कृपेची छाया रे ॥ ४ ॥

पद १८२

श्री गोपाळा नंदाच्या चिमण्या बाळा रे ।
नकळे कवणा नानापरी तुझी लीला रे ॥ धृ ॥
निर्गुण असतां उभविसि विश्वभुगोळा रे ।
इतुकें असतां अक्रिय तूं सर्वि निराळा रे ।
तुझिया स्वरुपा लागुनिया जाणे विरळा रे ॥१॥
अजन्मा तूं जन्मूनिया वृष्णीकुळा रे ।
सांडुनि मथुरा आलासी व्रजगोकुळा रे ।
पुतना हारली ओढुनिया अंतरमाळा रे ॥ २ ॥
खेळसि चेंडू मुलासी करुनि गोळा रे
नानापुष्पें वनमाळा घालिसि गळा रे ॥
वादन करिसि मुरलीतें वेळोवेळां रे ॥ ३ ॥
भोगिसि नारी रात्रींतुनि सहस्रसोळा रे ।
शेखीं म्हणसी मी ब्रम्हचारी भोळा रे ॥
नीरंजन हा इच्छित तूज पाहूं डोळां रे ॥ ४ ॥

पद १८३

आतां भय नाहीं भय नाहीं, निर्भय दीशा दाहीं ॥ धृ० ॥
संतसमागम केला तेणें मनिचा संदेह गेला ॥ १ ॥
आपणां वाचुनि कांहीं दूजें सहसा उरलें नाहीं ॥२॥
चिदाकार जग सारें अपणासरसें दिसतें बा रे ॥ ३ ॥
रघुविरगुरुचें देणें मजला केलें निरंजन ॥ ४ ॥

पद १८४

खंडेराया रे शंभु अवतारा । सोडुनिया कोदंडा धरि ॥
करि खंडा मणिमल पुंडाते करि दंडा सुरवर लागति पायां ॥१॥

बरवा सांडुनि अश्वारूढ निजविश्वातें दृढ रक्षिसि करुनि उपाया ॥२॥

कैळासीचा हुडा वहुत अवघडा ह्मणुनि चौघडा वाजवित आलासी जेजुरीठायां ॥३॥

रघुविर सद्गुरु मित्र तुझ्या करिं सूत्र जगाचें ह्मणुनि निरंजन इच्छितसे गुण गाया ॥४॥

पद १८५

सोइरा सद्गुरु ऐसा जोडला मायबाई । संसारचिंता आतां मजलागीं कांहीं नाहीं ॥धृ०॥

दारिद्य गेलें पळुनि ज्याचिया दर्शनमात्रें ॥
ऐकतां वचनें श्रवणीं शीतळ जालीं गात्रें ॥
दाखविलें माझें मजसी निजरूप प्रज्ञानेत्रें ॥१॥
सांगू मी तुजला काई भाग्याची थोर शिराणी ॥
इंद्रादिक सर्वहि देव जोडीती मजला पाणी ।
रवि शशि माझ्या तेजें चालताति दिनरजनी ॥ २ ॥
अंतचि नाही माझा ऐसा मी ऊदंड ।
त्रैकाळ बाधातीत सर्वदा शुद्धाखंड ।
साठविती माझ्या उदरीं अनंतब्रह्मांड ॥ ३ ॥
काय मी होऊं आतां तयासि उतराई ।
रघुविरचरणावरुते सद्भावें ठेवुनि डोई ।
निरंजन टाकुनि देहे गडबडा लोळे भूई ॥ ४ ॥

पद १८६

भाल नेत्रा रे शिवकर्पुर गौरा ॥ धृ ॥
पिनाकधर हर गौरीवर नर किन्नर प्रभुवर शुद्धपवित्रा ॥ १ ॥
व्याघ्रांबरधर गजचर्मांबर भूधर प्रियकर निर्मळ गात्रा ॥ २ ॥
धंड रहित ऊदंड गळ्यामधि रुंडमाळ शोभत विचित्रा ॥ ३ ॥
जटाजूट निळकंठ भस्मधर निरंजनगुरु रघुविरमित्रा ॥ ४ ॥

पद १८८

सत्वरि आतां शरणागत जा रघुराया रे ।
नाहीं तरि हा नरदेहे जातो वायां रे ॥ ध्रृ ॥
नाहीं कांहीं भरवंसा या देह्याचा रे ।
पळपळ होतो विनाश आयुष्याचा रे ।
परतुनिया ऐसा नरदेहे येइल कैचा रे ॥ १ ॥
भाग्य मोठें ह्मणवुनिया मानवयोनी रे ।
सांपडलीसे हे आत्मसुखाची खाणी रे ।
गेल्या वरुते होइल कीं मोठी हानी रे ॥ २ ॥
श्रमदायक हे जाणुनिया घरसुतदारा रे ।
श्रमदायक बहु समजुनिया या संसारा रे ।
चुकवा तुह्मी यमाचा थोर दरारा रे ॥ ३ ॥
रघुविरचरणा लागुनिया शरण रिघावें रे ।
निशिदिनि वाचे लागुनिया हरिगुण गावे रे ।
सद्गुरुवचनें निरंजन अक्षयिं व्हावे रे ॥ ४ ॥

पद १८९

जयजय श्रीरामा जयरामा । देई तवगुणप्रेमा ॥ ध्रृ ॥
संसाराच्या कामा । नरदेह गेला व्यर्थ रिकामा ॥
विसरुनिया तवनामा । केला घप्पाघोळ हमामा ॥ २ ॥
जाली पातकसीमा । सहसा चुकलों सार्थक नेमा ॥ ३ ॥
ऐसें करि वो रामा । गाइ निरंजन तव नामा ॥ ४ ॥

पद १९०.

आतां उतरो श्रीदत्ता माझें संसार ओझें ।
आंगीं विषयाचें शिरलें वारें । केला घरचार ॥
नित्य पोषितां रांडा पोरें झालों बेजार ॥ १ ॥
वायां अभिमान धरिला थोर । बुडविलें घर ॥
माझें माझें हें ह्मणवुनि सारे जालों मी चोर ॥ २ ॥

नाहीं तवभक्ती कांहीं केली वर्णीली ।
तीर्थयात्राही नाहीं जाली तनु व्यर्थचि गेली ॥ ३ ॥
स्वामी तुजवांचुनि कोणी आतां । न दिसे मज पहातां ।
निरंजनाची सोडवि आतां संसारचिंता ॥ ४ ॥

पद १९१.

दिसती मजलागीं अवघे राम । स्थावरजंगम ॥ ध्रु ॥
भावें सद्गुरुच्या जडतां पायां । हारपली माया ॥
जाली रामचि हे माझी काया । जग अगा बाया ॥ १ ॥
दिसतां नग सारे हेमाचि डोळा । नलगे मग गोळा ।
घावा मोजुनिया वजनी ताळा । सरसगट सोळा ॥ २ ॥
लहरी बुद्बुद थिजलें तूप । अवघें घृत आप ।
तैसें जग पाहतां कारण रूप । अवघें चिद्रूप ॥ ३ ॥
नेत्रीं सूदलें ज्ञानांजन । दाखविलें धन ।
मजला केलेंसे निरंजन । रघुविरगुरु येणें ॥ ४ ॥

पद १९२,

पहा रे उघडुनिया आपुला डोळा । सुंदर घननीळा॥ ध्रु ॥
फिरती रवि दिनकर ज्याच्या कळा । तो हा पुतळा ॥
खेळे नंदाघरिं पाईं वाळा वाजवि खुळखुळा ॥ १ ॥
योगीजन ज्याच्या योगें धाले अंतरिं नीवाले ।
होते निर्गुण ते सगुण जाले अकारा आले ॥ २ ॥
जेणें भक्ताच्या साठीं फार धरिले अवतार ।
वधिले निष्ठुरखळबळी असुर कंस चाणूर ॥ ३ ॥
शुद्ध निरंजन चिन्मय नभा अंतरिंचा गाभा ।
नामारूपाची दाउनि शोभा तो विटेवरि उभा ॥ ४ ॥

पद १९३.

देहबुद्धी जावो माझी श्रीहरि सत्वरी । हें देणें देई मातें श्रीहरि ॥ध्रु०॥
संपत्ति वैभव मागत नाहीं नको मित्र पुत्र अंतुरी ॥ १ ॥

विषयाहुनि मन येउनि मागें अखंडित वसो निजघरीं ॥ २ ॥
अद्वय निर्मळ रूप तुझें मज स्पष्ट दिसो आंत बाहेरी ॥ ३ ॥
नाम तुझें हरि प्रेमळ वचनें वदो निरंजन वैखरी ॥ ४ ॥

पद १९४

हरीचे पाय मनिं धरी रे । विषयावरि मन धावुनि जातें त्यातें आवरि रे ॥धृ॥
अभिमानातें सांडुनि सद्गुरुदास्य बरें करि रे ॥ १ ॥
सर्वेहि चालुनि येतिल सिद्धी सहजीं तुझ्या घरिं रे ॥ २ ॥
निरंजन तुज सांगत हितगुज गोष्टी हे बरि रे ॥ ३ ॥

पद १९५

शिवशंकर भोळा गावा । भक्ताचा पूर्ण विसावा ॥ धृ ॥
आंगीं भस्माचें लेपन । शोभे पन्नगाचें लेण ।
गळां रुंडाचें भूषण । वरदायक देवा ॥ १ ॥
गंगापार्वतीचा वर । बैसुनि चाले नंदीवर ।
हरहर बोलुनि दिगंबर । निजअंतरीं ध्यावा ॥ २ ॥
माथा पिंगट जटाभार । करितो स्मशानीं वीहार ।
भक्तां संपति देतो फार । न करितां सेवा ॥ ३ ॥
ज्याचा निरंजनीं वास । सदा वीषयीं ऊदास ।
स्मरतां उद्धरी तो दास । देउनि निज ठेघा ॥ ४ ॥

पद १९६

ते साधु वेगळेचि ज्याचा पूर्ण अनुभाव ।
आत्म सुखें सुखाउनि जाले स्वयें ची देव ॥ धृ ॥
जानामाजी असुनिया दिसति जना ऐसे ।
नकळेचि कोणालागीं त्याचें रूप कैसें ।
स्वधर्म संपादोनि करिति कर्म सायासें ।
अंतरीचे मार्ग शुद्ध चालताति अनारिसे ॥ १
पहाती जग सारें आपुलीया माझारीं ।
स्थावरजंगमादि विलोकिति चिदाकारी ।

दुःखाचा लेश नाहीं जयालागि घरिंदारीं ।
सर्वकाळ सुखि जाले निवोनिया अंतरीं ॥ २ ॥
सोडोनि थोरपण नादीं न लाविती जन ।
न करिति घप्पाघोळ घरोघरीं कीर्तन ॥
घरदार सांडोनिया न सेविति कदा वन ।
ब्रह्मज्ञान सांगुनिया लोकां न मागती धन ॥ ३ ॥
प्रारब्धसुखदुःख देहावरि टाकुन ।
सहजासहजीं अचारती हेचि त्याची मुख्य खूण ॥
अद्वैतबोध जाला गेलें ज्याचें मीतूंपण ।
रघुविर गुरुकृपें जाले स्वयें निरंजन ॥ ४ ॥

पद १९७

रघुवीरा तूंतें आलों मी शरण । विनवीतां प्रेमें भक्त बिभीषण ।
द्विजकूळीं मूनि पौलस्तीतनुज । पातकी दुष्टयोनि मी दितिज ।
द्वेषीया दशशीराचा अनुज । सांडूनि कुळ हो अभिमान लाज ॥ १ ॥
देऊनी सीता घेइ रामभेटी । वदलों बंधूलागीं ऐशी गोष्टी ।
कोपला दुष्ट होउनीया कष्टी । ह्मणवूनि रामा हो घालि ममपृष्टीं ।
तूं तंव दीनबंधु दयानीधी । रक्षिसि शरणागतालागिं आधीं ॥ २ ॥
न धरी माझा त्याग मनामधीं । आपूले ब्रीद हो न्यावें आतां सिद्धी ।
ऐकूनि नीजदासाचें उत्तर । तोषला निरंजन प्रभुवर ।
देउनि त्यातें अखंडित वर । स्थापीला लंके हो मारुनि दशशीर ॥३॥

पद १९८

हरि पाहुं चला जाउनि कुंजवनीं । सजल जलदवपु शोभति सुंदर कंठीं गुंजमणी ॥ १ ॥
सारुनि चिंता व्रजललनाची करितो रंजवनी ॥ २ ॥
मुरली अधरि ठेवुनिया करि नाना उंच ध्वनी ॥ ३ ॥
निरंजनि वनिं व्यापक पाहुनि अक्षइ चिंतु मनीं ॥ ४ ॥

पद १९९

गुरुपाय तुझे चिंतू निश्चिंतपणीं ॥ धृ० ॥
घरदारादिक संसाराची सांडुनि गुंतवणी ॥१॥
इंद्रिय दाही जिंकूं पराक्रमें सेवुनि अंगवणी ॥२॥
निर्भयपद हें चिन्मय ध्याउनि पावूं आनंद मनीं ॥३॥
निरंजन मम होउनि अक्षयिं राहुं निवांत जनीं ॥४॥

पद २००

सावळा विठ्ठल आजि देखियला डोळा ॥
तोचि अठवतो मजलागि वेळोवेळा ॥ धृ० ॥
विटेवरी उभा नीट कटावरि कर ।
मुगुट शोभतो बरा रत्न अळंकार ॥१॥
मकर कुंडलें कर्णि शोभति सुंदर ।
साजिरा घातला कंठिं तुळशीचा हार ॥२॥
कस्तुरी टिळक भाळिं चर्चिला केशर ।
कासिलासे बरा कासेलागि पीतांबर ॥३॥
निरंजनि मनिं ऐसें ध्यान निरंतर ।
उच्चारित सदा वाचे रुक्मिणीचा वर ॥४॥

पद २०१

येई येई श्रीहरि बंधुराया । विनविती द्रौपदि पांडव जाया हो ॥धृ०॥
दीनबंधु ऐसें नाम तुझें । धाउनिया करिसि भक्तकाज ॥
बहूवेळा रक्षिली माझी लाज । म्हणुनिया चिंतिजे देवा तुजहो ॥१॥
निशि गेली पाहुनि दोन प्रहर । घरा आले दुर्वास मुनिवर ॥
होउनिया बोलती क्षुधातुर । ह्मणती आह्मा भोजना दे सत्वर ॥२॥
तुजवरि ठेवुनि विश्वास । स्नानालागिं धाडिलें सर्वत्रास ॥
घरीं नाहीं अन्नाचा एक लेश । ह्मणोनिया मांडिला तुझा ध्यास हो ॥३॥
राहूनिया तुळशीवृंदावनीं । हाका मारी पांचाळी दीनवाणी ॥
निरंजन विलासी चक्रपाणी । संकष्टासी पावला तत्क्षणीं हो ॥४॥

पद २०२

बहूत साजिरी डोळां देखिली पंढरी ।
लक्ष्मीसहित जेथें नांदतो श्रीहरी ॥ धृ० ॥
नामाचा गजर अखंडित महाद्वारीं ॥
करिती कीर्तन संत उभे गरुडपारीं ॥ १ ॥
तुळशीमाळा-बुका दोन्हीं घेउनीया हातीं ।
उल्हासुनि मुनिजन दर्शनासि येती ॥ २ ॥
नाना वाद्यध्वनि आणि पताकांचे भार ।
दुमदुमित सदा दिसे सर्वही नगर ॥ ३ ॥
निरंजन ह्मणे प्रति दुसरें वैकुंठ ।
फार वर्णूं काय मूर्तिमंत ब्रह्मपीठ ॥ ४ ॥

पद २०३

धन्य आजि भाग्य माझें उदयासी आलें ।
सद्गुरुचे पाय निजनयनीं पाहिले ॥ धृ० ॥
सद्गुरुचे पदीं ऐसें अनंत ब्रह्मांड ।
होती जाती परि गुरुपाउलें अखंड ॥ १ ॥
सर्वांचें तें सार नाहीं जयालागि पार ।
तयाच्या दर्शनें जाला नाहीं संसार ॥ २ ॥
पाहतांचि क्षणीं नाहीं आपणा ठीकाण ।
सर्वेहि दाटला चिदानंद पूर्णघन ॥ ३ ॥
निरंजन म्हणे मुख्य सद्गुरुचे पाय ॥
पाहिल्या वांचुनि नाहिं आणि तरणोपाय ॥ ४ ॥

पद २०४

सत्वारि धाउनि आतां येईं दयावंता ।
मजवरि कृपा करी लक्ष्मीच्या कांता ॥ धृ० ॥
गोविंदा गोपाळा कृष्णा माधवा अनंता ।
तुजविण मनीं माझ्या वाटतसे चिंता ॥ १ ॥

संसार-सागरिं बहु जहालों मी श्रमी ।
तुझिया चरणीं देवा राहिन विश्रामीं ॥ २ ॥
अनाथा लागुनि आह्मां कोण तुजवीण ।
निर्वाणीं रक्षिता आहे पाहे विचारून ॥ ३ ॥
निरंजन ह्मणे शेषशाई नारायणा ।
अनाथा जीवाची स्वामी येऊं दे करुणा ॥ ४ ॥

पद २०५

धन्य ते पंढरी धन्य पंढरीचे जन । हरि नामाचा घोष नित्य होतसे भजन ॥ धृ ॥
तीर्थाचें माहेर ते हे वाहे चंद्रभागा ।
जीच्या दर्शनमात्रें मिळे वैकुंठीं जागा ॥ १ ॥
आषाढी कार्तिकी यात्रा मिळतसे फार ।
येताती सज्जनजन विश्वहि अपार ॥ २ ॥
लक्ष्मी राधिका भामा आणि रखुमाई ।
इतुक्यासहित नांदे स्वामी शेषशाई ॥ ३ ॥
निरंजन ह्मणे धन्य पंढरी महिमा ।
पाहती जाउनि त्याचे सुकृताचा सिमा ॥ ४ ॥

पद २०६.

अहो म्यां गुरु केला गुरु केला । विचार नाहीं कळला ॥ धृ
एक रुपया दिधला । अडखर्चास पावला पडला ॥ १ ॥
मंत्र होता सांगितला । तोही बहुतकाळ म्यां जपला ॥ २ ॥
नेणुनिया आपणाला । न कळे देव ह्मणूं कोणाला ॥ ३ ॥
निरंजन ह्मणे त्याला । ऐसा गुरु जुंपी औताला ॥ ४ ॥

पद २०७.

अरे मज गुरु करा गुरु करा । किति सांगूं या पोरां ॥ धृ ॥
मजसारिखा ज्ञानी । पृथ्वविरुता नाहीं कोणी ॥ १ ॥
गुरु घरोघरीं असती । परि ते माझ्या समान नसती ॥ २ ॥

बहुत शिष्य ग्यां केले । मंत्राचि सांगुनिया उद्धरिले ॥ ३ ॥
निरंजन ह्मणे ऐसे । कलियुगिं मातले हैसे ॥ ४ ॥

पद २०८

एकचि ब्रह्म जगीं विलसे । त्याविण आणिक कांहीं नसे ॥ ध्रु ॥
जारजश्वेदज अंडज उद्‌भिज भेद अनेक असे ।
नामरूपात्मक भासतसे जग चित्रविचित्र ठसे ।
कटककुंडल केयुर बेसर एकचि हेम जसे ।
त्यापरि चिद्रुप येकचि अनेक भासत भ्रांति वसे ॥ १ ॥
ग्रामकसंधिपथांतरि पाहुनि खुंट उभा सगळा ।
मंदमती मनिं मानित तस्कर कापुं अला हे गळा ।
शुक्तिपणाप्रति नेणुनि रौप्यचि भासतसे विव्हळा ।
तद्वत ब्रह्मचि भासतते जग मूर्ख जना सकलां ॥ २ ॥
धावतसे मृग रश्मिसि नेणुनि अंबु दिठीं सरिसा ।
रज्जुपणाप्राति नेणुनिया मूढ मानित सर्प जसा ।
पावतसे भय कंप मनिं अहि बुद्धिचिया सरिसा ।
ब्रह्मपदाप्रति नेणुनिया भव पाहत अज्ञ तसा ॥ ३ ॥
जन्म शतावधि वेंचुनि सद्‌गुरुपाय मनीं धरिले ।
ते नर अद्वय ब्रह्मसनातन लक्षुनिया तरले ।
भेद अभेदपणाप्रति सांडुनि मीपण विसरले ।
शुद्ध निरंजन होउनि आपण पूर्णपणें उरले ॥ ४ ॥

पद २०९

दत्तात्रय श्रीगुरुमूर्ती । वंदुनीया मागू स्फूर्ती ॥ धृ ॥
हृदयीं चिंतुनिया ध्यान । करूं पायांचें पूजन ।
गाऊं वाचेलागीं गुण । महिमा सत्कीर्ती ॥ १ ॥
नाम गाऊं वारंवार । उतरूं दुस्तर हा संसार ।
करूं आपुला उद्धार । मोडूं आवर्ती ॥ २ ॥

कीर्तन समारंभामधीं । वीसरूनी आधिव्याधी ।
साधु उघड समाधि । तुर्येचा पती ॥ ३ ॥
विसरूं देवभक्तपण । स्वयें होऊं निरंजन ।
जेथें सर्वेहि मिथ्यापणें । माया प्रवर्ती ॥ ४ ॥

पद २१०

श्रीदत्तात्रया अवधूता दिनानाथा रे ।
दीनबंधू सत्वरि धाव आतां रे ॥ धृ० ॥
दृढतर गुंतलों मोहपाशीं रे ।
तेणें योगें पावलों दुःखराशी रे ॥
क्लेश होती बहुताचि मानसीं रे ।
पंचप्राण आले हे कंठापाशीं रे ॥ १ ॥
स्मरतांचि धावसी लागवेगीं रे ।
ऐसी कीर्ती जहाली असे जगीं रे ।
वर्णिताति पुराणें तुजलागीं रे ॥
योगीजन चिंतिति अंतरंगीं रे ॥ २ ॥
मुनिवरा स्वामिया दिगंबरा रे ।
भक्तासाठीं धरिसी अवतारा रे ॥
निरंजना चरणीं देई थारा रे ।
छेदीं छेदीं या भवसंसारा रे ॥ २ ॥

पद २११

गेली रे वयासा गेली रे । विषयचोरांनीं बुद्धी नेली रे ॥ धृ ॥
सोडुनिया हरिनामामृत रे नामामृत रे ।
विषय सेविले श्वानमूत रे ॥ १ ॥
नेणोनि स्वहित आपुलें कांहीं रे आपुले कांहीं रे ।
साधूची संगति केली नाहीं रे ॥ २ ॥
सोडोनिया चिदात्मा शुद्ध रे आत्मा शुद्ध रे ॥
देहाचिया संगें होती बद्ध रे ॥ ३ ॥

मायारहित तं शुद्ध निरंजन रे ।
अद्वयरूप सश्चित्सुख परिपूर्ण रे ।
नामरूप सहजीं मिथ्यापण रे ।
रज्जुवरतें ज्यापरि सर्पभान रे ॥ ४ ॥

पद २२३

तो गुरु । भवसिंधूचें तारूं । उतरी पैलपारुं । साधक जन आधारू ।
बोधशस्त्र घेउनिया सत्वरि करि निर्मुळ संसारू ॥ धृ ॥

आचार्य । सर्वांमाजी आर्य ज्ञानदानीं औदार्य । साधुनि दे निजकार्य ।
शक्तिपात सामर्थ्यें बळानें प्रगट करी चित्सूर्य ॥१॥

तो स्वामी । करि वीरक्ति कामीं । आचरवि निष्कामीं । प्रेगा जडवी
रामीं । निरंजनपद देउनि अक्षयिं नांदवि निजसुखधामीं ॥३॥

पद २२४

सद्‌गुरुकृपें जहाली जागृती । फीटलि माझी सर्वहि भ्रांती ॥धृ०॥
दीसतें तें तें सर्व लया गेलें । अदृश्यरूप अनुभवा आलें ।
अनुभव घेणें नाहींच उरलें । अनुभवी त्या वांचोनि संचले ॥ १ ॥
अनादितम होति जे सुषुप्ति । ते लया गेली तत्वज्ञानें भ्रांती ।
ज्ञानि मी वाटे तेहि स्वप्न स्थिति । हे सरलि जेथें होते जाणा जागृती ।२
तम काशालिप्त नोहेचि आकाश । अज्ञानज्ञानाविण चिदाकाश ।
अलिप्त तैसें मिथ्याबुद्धिभास । बंध आणि मोक्ष हाहि नसे सोस ॥ ३ ॥
सच्चिदानंद अद्वय परिपूर्ण । बोलति श्रुति स्वरुप लक्षण ।
अनृत जडदुःख भेदातें घेऊन । न ह्मणे कांहीं हो स्वयें निरंजन ॥ ४ ॥

पद २२५

तेचि साधु ऐसें ओळखावे । भवसिंधु तरावा ज्याचे नांवें ॥ धृ ॥
सोडुनिया लौकिक प्रवृत्तीसी । सेवुनिया सन्मार्ग निवृत्तीसी ।
लोटोनिया माघारीं सद्‌वृत्तीसी । स्वतःसिद्ध जाले सुखराशी हो ।१।
ज्ञान आणि अज्ञान वारिले । द्वैताद्वैत शद्बासि विसरले ।
सोहं भाव भाविताही शीणले । निजबोधें परिपाका ऐसें आले हो।

ज्याचे घरीं वैराग्य वाहे पाणी । उपरम खेळताहे अंगणीं ।
शांति विलसे अर्धांगी पट्टराणी । सर्वात्मत्वें भोगिती राजधानीं हो ।। ३ ।।
ब्रह्मविद नोहे तें ब्रह्मरुप । रुप असतां जाणावें तें अरूप ।
निराकार निर्गुण निष्पाप । जनासहित निरंजन आपिआप हो ।।४।।

पद २२६

तो हा नंदाघरीं कृष्ण सावळा । होउनि चिमणासा दाखवि लीळा ।।धृ।।
रविशशि ह्या ज्याचीया कळा । जो कां पूर्णब्रह्म पूतळा ।
जो कां आदि मायेचा पति । विधि हरिहर जया वंदिती ।
श्रुतिशास्त्रादि जया वर्णिती । जाली शेषाची कुंठित मति ।। १ ।।
जेणें शंखासुर जिवें मारिला । जळीं मंदराचळ पृष्ठीं तारिला ।
धरुनि दंतावरि सर्व पृथ्वीला । नखें आसुर वीदारिला ।। २ ।।
बळि पाताळीं घातला बळें । केलीं राजाचीं कुळें निर्मुळें ।
दशशीराचे छेदिले गळे । निजभक्ताचे पुरविले ळळे ।। २ ।।
कलिमाजी बौध्य होउन । पुढें कलंकी रुप घेउन ।
सर्व विश्वाचें संहारण । करुनि आकर्ता निरंजन ।। ४ ।।

पद २२७

भक्तिविण जिणें त्याचें पाहों नये तोंड । जाला भूमिभार वृथा प्रसवली रांड ।धृ।
विषयाचा ध्यास मनिं वाहे निरंतर । मुक्तीची वासना नाहीं एक पळभर ।।१।।
जीवापैलिकडे वाटे ज्यास संसार । जाति कुळ अभिमान उचलोनि भार ।।२।।
वैदिक शाहानामीच पंडित आगळा । चातुर्याचा अहंकार वाहे वेळोवेळा ।।३।।
वाचे नये राम त्याची शुद्ध नाहीं मती। निरंजनभेटि नाहीं त्याजला कल्पांतीं ।४।

पद २२८

राम मुखाप्रति आला रे । भवताप नीवाला ।। धृ ।।
अनंतजन्मिचे फिरतां फेरे । अवचट नरदेह जाला रे ।। १ ।।
जाउनि सर्वहि विषयबुद्धि । अनुताप मनिं उदेला रे ।। २ ।।
दृश्य विलक्षण राम सनातन । दृढतर निश्चय केला रे ।। ३ ।।
निरंजनपद पावुनि अक्षयिं । भेद भयासुर मेला रे ।। ४ ।।

## पद २२९

सद्गुरुराया नावाडी भेटला । ठायींचे ठायीं भवसिंधु आटला ॥ धृ ॥
निर्मळ ब्रह्म भास्कर माध्यान्हीं । अनादि विद्या उखर भूमिस्थानीं ।
माया मृगजळ उसळलें साजणी । अक्षोभ मोठें भवाब्धिचें पाणी ॥१॥
जन्ममरणाचे आवर्त फिरती । हर्षशोकाचे खळाळ वाजती ।
कामक्रोधादि जळचरें तळपती । वाटे मी तेथें बुडालों निश्चिती ॥ २ ॥
देसीकरा येवीं दानपैं केलें । भक्ति वैराग्य हाणोनि आवलें ।
विज्ञान नौका तारुवें पेलिलें । युक्तीनें मज वरुतें घेतलें ॥ ३ ॥
पाहूं मी गेलें भवसिंधूजीवन । तंव नाहीं कांहीं वृथा झाला शीण ॥
बुडतां तरलों हेंहि मिथ्याभान । जैसा मी तैसा शुद्ध नीरंजन ॥४॥

## पद २३० [ जाणे जोशी ].

ऐक पिंगळ्याचा संवाद । तुझें बरें होइल दादा ॥ धृ० ॥
ऐक सांगतों पिंगळा । आलि सृष्टीला अवकळा ॥
निळ्या घोड्याचा बा स्वार । करिल पृथ्वीचा संहार ॥ १ ॥
आणि एक अवघड आहे । होइल ब्रह्मांडाला भय ॥
पृथ्वी पाण्यांत विरेल । पाणी अग्नी संहारील ॥ २ ॥
अग्नि वारा झडपील । वायु आकाशीं दडेल ।
गुणांत मिळेल आकाश । माया करील गुणग्रास ॥ ३ ॥
महत्तत्व जाइल लया । मूळ प्रकृतिच्या ठाया ॥
प्रकृतिपुरुष अभिन्नपणीं । सुखें बसतिल निरंजनीं ॥ ४ ॥

## पद २३१ ( बाळसंतोषाचें )

बाळसंतोस आम्ही बाळसंतोस ॥ धृ ॥ झालों सर्वस्वें उदास ॥ १ ॥
त्यागुनी विषयाचा ध्यास ॥ २ ॥ इंद्रियग्राम केला ओस ॥ ३ ॥
झालों सद्गुरुचे दास ॥ ४ ॥ नाहीं द्वैताचा भास ॥ ५ ॥
प्रपंच मिथ्या हा साभास ॥ ६ ॥ निरंजनीं अक्षयिं वास ॥ ७ ॥

## पद २३२ ( जोगी भराडी )

चांग भला नाथ तुझा । हेत पुरवावा माझा ॥ धृ ॥

निर्गुण पुरिच्या भैरवा । धाव रे गुरु देवदेवा ॥ १ ॥
बोध त्रिशूळ घेउन । छेदि माझे भवबंधन ॥ २ ॥
महावाक्य डमरुवाद । करुनि दवडी माझा भेद ॥ ३ ॥
तुझी कृपा योगेश्वरी । करो भवभय दूरी ॥ ४ ॥
तुझें नाम उच्चारून । होइन सुखी नीरंजन ॥ ५ ॥

पद २३३

येई वो माउली माझे श्रीकृष्ण माउली गे ।
लागलेसें मन माझें तुझिये पाउलीं गे ॥ धृ ॥
नखचंद्राची कांती माये व्यापियेलि नभा ।
अंगुळ्या शोभति इंद्रनिळाचा पैं गाभा ।
वज्रांकुशध्वज याची अगणित शोभा ।
ब्रह्मादि इच्छिति चरणरजाचिये लाभा ॥ १ ॥
रुणझुणती नूपुरें चरणीं ब्रिदाचा तोडर ।
आंड बुलि शोभे रत्नखचित सुंदर ।
कटिसूत्र मेखळा क्षुद्र घंटिकेचा भार ।
शब्दानें सांगति उपनिषदाचें सार ॥ २ ॥
तायतळ्यामधि शोभे श्वेतवाघनख ।
रत्नाच्या पेटियावरि यंत्र रेखा अंख ।
कटकें शोभति दोन्ही हातीं सिंहमुख ।
कर्णाचीं कुंडलें करिताति लखलख ॥ ३ ॥
सरळनासिका सौम्यदृष्टीचे पाहणें ।
कुरळकेशाची दाटी आकृति लहान ।
निरंजनाप्रति ऐसें आवडतें ध्यान ।
संपूर्णाचे सार पूर्ण ब्रह्म सनातन ॥ ४ ॥

पद २३४

येई वो सखे कृष्णाई तान्हुले तुझियासाठीं स्तन माझे पान्हेले ॥धृ०॥
यशोदा ह्मणे ऐके हो साजणी । काळधा डोह विषाचीच खाणी ।
उडोनि पक्षि जाइना वरोनि । कान्हया माझा बुडाला जीवनीं ॥ १ ॥

निरंजन ह्मणे प्राणी वेडे रे प्राणी वेडे रे ।
नेणति स्वहित जैसे रेडे रे ॥ ४ ॥

पद २१२

भवमोचका हरि तूं सत्वरि धाउनि ये ॥ ध्रु ॥
कामादिक रिपु छळिती मातें दुर्धर हाय हाय ॥ १ ॥
या भवडोहीं वाहुनि जातों न सुचेचि उपाय ॥ २ ॥
तूं तव दीनजनाचा त्राता आणि बहु सदय ॥ ३ ॥
निरंजन तवदर्शनइच्छुक दाखवि चरणद्वय ॥ ४ ॥

पद २१३

दयाळा करुणाघना लक्षुमिरमणा ये ये ये ।
तारुनिया मज वेगीं देवराया पायापाशीं ठाव दे ॥ध्रु०॥
बुडतों या भवडोहीं पडलो प्रवाहीं कामक्रोध खळाळीं ॥१॥
पतित मी पापी दुष्ट खळ मोठा निष्ठुर ।
परि तूं दीनाचा बंधू देवराया न धरि मज दूर ॥ २ ॥
अजामेळ पापी आणि गणिका ते कुंटीनी ।
उद्धरिले रामा तुवां अंतकाळीं लागवेगीं येऊनी ॥३॥
निरंजन दीन पावे शीण तुजवीण कीं ।
ऐसियातें न तारितां येऊं पाहे ब्रीदालागीं उणें कीं ॥ ३ ॥

पद २१४

धन्य तेचि आजि उदासीन मानोनि शीण ।
संसाराचे ठाईं ज्याचें मन त्रासले जाण ॥ ध्रु ॥
पहा पहा कैसा हा संसार आहे दुर्धर ।
ज्याच्या योगें जन्म वारंवार जाहाले फार ॥ १ ॥
वस्त्रपात्र धोल देतो जव तव करीती आर्जव ।
नाहीं तरि मग दारासुत बांधव ह्मणती गर्दभ ॥ २ ॥
आशा तृष्णा मनिं अनिवारा करिति भडिमारा ।
अंतरिं बाहेरि नाहीं थारा सुखाचा वारा ॥ ३ ॥

न कळे मी आहे निरंजन जहालों दीन ।
विषयाचे साठीं वनवन करितो जाण ॥ ४ ॥

पद २१५.

धन्य धन्य त्या गोकुळीच्या नारी । प्रेमभावें स्वाधिन केला हरी रे॥ धृ॥
जो कां नये योगीयाचें ध्यानीं । यज्ञयागीं न जाय अभिमानी ॥
दानधर्मी जयाची बहुत वाणी । गोपी धरिती स्वकरें त्याचा पाणि रे ॥१॥
चारी वेद जयाची कीर्ति गाती । साही शास्त्रें वर्णिति ज्याची ख्याती ।
अष्टादश पुराणें ज्यातें ध्याती । तो हा करी स्वमुखें गोपीस्तुति रे ॥२॥
नेणो काय तपासि आचरल्या ।
तया योगें हरिच्या सख्या झाल्या ॥
अंतरबाह्य श्रीकृष्णरूपीं ठेल्या ।
नेत्र द्वारें गोविंदमूर्ति प्याल्या रे ॥ ३ ॥
असो आतां फारसें सांगूं काई ।
गोपि आणि गोपाळा भेद नाहीं ॥
अद्वयत्वें निरंजन पाहीं ।
लीलामात्रें दावितात नवाई रे ॥ ४ ॥

पद २१६

सारथि पार्थाचा भगवान् । कौरव छळितां द्रौपदिवस्त्रें झालासे परिधान् ॥ धृ ॥
दुर्वासातें भोजन दिधलें खाऊनि भाजीपान ॥ १ ॥
निजहस्तानें घोडे धुतले होउनि गाडीवान ॥ २ ॥
निरंजनपद देउनि शेवटिं केला आत्मसमान ॥ ३ ॥

पद २१७

तारी या भवभ्रमी माय लक्ष्मी क्षेत्र करवीरवासीनि ॥ धृ ॥
तूं सदानंद चिच्छक्ति । भक्तजन भक्ति ।
साधु विरक्ति । ज्ञानीजन मुक्ति ।
व्यक्त अव्यक्ति आससी व्यापूनी ॥ १ ॥

हे ब्रह्मादिके तव बाळे । बहु लडिवाळ ।
तुझिया लीळे । खेळती खेळ ।
उत्पति स्थिती मोडुनि ॥ २ ॥
उन्मनी तूं निजगूज । जगद्रुम बिज ।
अनादि अज । रक्षि ममलाज पर-मनभ-सौदामिनी ॥ ३ ॥
तूं जगन्माय कनुवाळ । दंडुनि काळ ।
करिसि प्रतिपाळ । तोडि भवजाळ । प्रेम दे निरंजनीं ॥ ४ ॥

पद २१८

गोविंदा रामा येरे गोपाळा रामा येरे ॥ धृ ॥
करितां संसारसाधन । बहूत जालासे मजला शीण ।
कंठिं आले पंचप्राण ओढति सांवरा रे ॥ १ ॥
ऐकुनि गजेंद्राची ध्वनी । धावलासि चक्रपाणी ॥
तैसा लागवेगें करुनि येई तूं बा रे ॥ २ ॥
द्रौपदीच्या वस्त्रहरणीं । वस्त्रें जालासि ते क्षणिं ॥
तैसा माझिये धावणी वेगीं धाव रे ॥ ३ ॥
जनीं वनीं निरंजनीं । तुझा वास अक्षइपणीं ॥
नलगे तूंतें येणीं जाणीं प्रगटे येथेंचि त्वरें ॥ ४ ॥

पद २१९

तो हा योगि सर्वत्र जगीं मान्य । तयाहूनि ईश्वर नाहीं अन्यहो ॥ धृ ॥
चिन्मयरूप सर्वही विश्व पाही । जैसें सोनें नगाचा अंतरग्राही ॥ १ ॥
दयाशांति बाणली ज्याचें आंगीं । पूर्णानंदें डुलत अंतरंगीं ॥ २ ॥
इष्टानिष्ट न स्फुरे ज्याचे मनीं । देहबुद्धि न स्मरे अहंपणीं ॥ ३ ॥
गुरुकृपें लेउनि ज्ञानांजन । शुद्धबुद्ध जाहला निरंजन ॥ ४ ॥

पद २२०

हे मना । सांडि दुर्वासना । सावध होई सजना । होसिल केविलवाणा ॥
यमाचें भय दुर्धर मोठें नको धरूं अडाना ॥ १ ॥

हे चित्ता । सोडिं विषयचिंता । मिथ्यागृह सुतकांता । त्यागुनि रिघे सुपंथा ।
श्रीगुरुवचनीं भाव धरुनि दृढ सेवित जा एकांता ॥२॥
हे बुद्धि । सांडुनि दृश्य उपाधी । आत्मपदातें शोधी । साधी ऐक्यसमाधि ॥
सागरमिळणी सरितेचे परि होउनि राहे चिदाब्धि । ॥ ३ ॥
हे आहं । न वदे देह कदाहं । न ह्मणे कोहं कोहं । मानी हंसःसोहं ॥
नीरंजनपद पावुनि बरवें अपमानातें करि नाहं । ॥ ४ ॥

पद २२१

जय गुरु श्रीदत्ता अवधूता । तारीं मजला आतां ॥ धृ ॥
घेउनि प्रपंच माथां । बुडतों भवसागरिं मी वृथा ॥ १ ॥
जन्ममरण प्रवाहीं । पडलों पळभरि स्थिरता नाहीं ॥ २ ॥
विचार दृष्टी पाहतां । तुजविण न दिसे कोणी त्राता ॥ ३ ॥
तूंचि एक निज भक्ता । अक्षयिं निरंजन पद देता ॥ ४ ॥

पद २२२

विश्वीं असतां विश्वातीत होउनि पाही रे ।
मग तूं ब्रह्म आहेसि संदेह नाहीं रे ॥ धृ ॥
जें जें दिसतें हें जग तुझिया डोळा रे ।
मिथ्या सर्व अष्टधाप्रकृति मेळा रे ।
त्याचा द्रष्टा त्याहुनि तूं नित्य निराळा रे ।
अज्ञानें एकत्र नकरि गोळा रे ॥ १ ॥
स्थूळदेह सर्वस्वें नाशिवंत रे ।
लिंगदेह तैसाची अंतवंत रे ।
कारण तिसरा भ्रमरूप हा निश्चित रे ।
साक्षियाचा चिन्मय तूं दृश्यातीत रे ॥ २ ॥
हरिगुरुकृपें करुनि शुद्धबुद्धी रे ।
त्वंपद आणि तत्पद वाच्य उपाधि रे ।
त्यागुनि युक्त्या लक्षार्थी ऐक्य साधी रे ।
घटमठ-त्यागें नभ जैसें निरावधी रे ॥ ३ ॥

नंदराय शोकाकुल जाले । प्राण ग सये माझेहि चालिले ।
मुखभरुनि नाहीं मी बोलिलें । अहा रे दैवा कैसें ओढवलें ।। २ ।।
चेंडूदांडू लगोऱ्याचा खेळ । वेताटी वेणुंसि दोरीचें जाळ ।
पाहुनि यासीं वाटे तळमळ । सवगडे तुझे मिळाले गोपाळ ।। ३ ।।
गर्गमुनि बोलीले वचन । कृष्ण हा तुझा ब्रह्मचि निर्गुण ।।
अविनाशी अचळ निरंजन । तें काय मृषा जालें हो वचन ।। ४ ।।

पद २३५

येशोदे बाई कृष्ण तुझा आला । नवसासी ईश्वर पावला ।। धृ ।।
यमुनाडोह भयंकर जाणा । काळयानें उभारिल्या फणा ।
त्याचियावरि नाचे तुझा कान्हा । शब्द होतो मोठा दनाना ।। १ ।।
नंदराय दैवाचा आगळा । ह्मणोनि कृष्ण देखियला डोळां ।
लावण्यखाणी मदनाचा पुतळा । पुरवी दृष्टीचा सोहळा ।। २ ।।
पाडस वनिं हरिणीला भेटले । गाइवत्सें एकत्र जहाले ।
पक्षिणीचे पिलें मिसळले । तैसें आज तुजलागीं जालें ।। ३ ।।
वचन झालें गर्गाचें सफळ । कृष्ण हा तुझा ह्मणुं नये बाळ ।
निरंजन अविनाशी अचळ । नाटकि मोठा खेळतसे खेळ ।। ४ ।।

पद २३६

संत घरा आले महंत घरा आले । पापताप दैन्य सये उठोनिया गेलें ।धृ।
ज्ञान अर्क उदय झाला संकटं पळालीं । पातकें जळालीं ।।
दुःख लया गेलें विषयवासना गळाली ।। १ ।।
बोधवृष्टि झालि तेणें तिन्ही ताप गेलें । अंतर निवालें ।।
अष्टअंग सुखी होउनि ब्रह्मरूप जालें ।। २ ।।
संतकृपें चिद्रत्न हातालागिं आलें । दैन्य दूर झालें ।।
कृतकृत्य होउनि ठेलें । पूर्णपणें धाले ।। ३ ।।
गुरु रघुराज संत भेटतांचि बाई । लागतांचि पाई ।।
निरंजन होउनि ठेलों द्वैत आतां नाहीं ।। ४ ।।

पद २३७

हे मन माझी भागीरथी माउली ॥ धृ० ॥

श्रीहरि पदाचें नेटि । फोडोनि ब्रह्मांड पेटी ॥

सत्य लोकीं ब्रह्मयानें पूजिलि ॥ १ ॥

करुनि तपाच्या कोटि । पूर्वज उद्धारासाठीं ॥

भगिरथें प्रार्थुनिया आणिली ॥ २ ॥

भेदोनि भूतळवाटी । गेली पाताळाचे पोटीं ॥

सदाशिवें जटाजूटीं वाहिली ॥ ३ ॥

निरंजनें पाहतां दृष्टीं । जालि बहु तुष्टि पुष्टि ॥

ते हे गंगा सिंधूभेटी चालिली ॥ ४ ॥

पद २३८

नमो काशी वाराणसी पुण्यराशी । सकळ सुरसहित शिव तेथींचा निवासी ।धृ।

विश्व निर्माइता विश्व परिपालिता विश्व संहारिता विश्व भर्ता ।

नागभूषण सदा भस्म लेपन करी अक्षमाला धरि मोक्षदाता ॥१॥

बिंदुमाधव हरि पंचगंगातिरिं वंदिला सुरनरीं सौख्यकारी ।

धुंडि हा गणपती भजनकर्त्यांप्रति देत सुंदरमति पाशधारी ॥२॥

दंडपाणि महा पाप भय संहारी कालभैरव करी दुःखभंगा ।

क्षेत्रींचीं देवता काशि नामें स्मृता वंदिली म्यां आतां गुहागंगा ॥३॥

अन्नपूर्णा बरि अन्नदाना करि त्रिपुरहरसुंदरी जगन्माता ।

तीर्थ मणिकर्णिका भवजलधितर्णिका देत निरंजना सौख्य गातां ॥४॥

पद २३९

हे गंगा भवतापत्रय भंगा । आवडति श्रीरंगा ।

बसलीसे शिवअंगा । दर्शनमात्रें पावन करि जग उद्धरीं कीटपतंगा ॥१॥

हे भागीरथी अंबा । अति सुखदायक सांबा ।

लालन करि हेरंबा । प्रियकर देवकदंबा ।

त्रैलोक्याप्रति पावन करिते भेदुनि हिमनग तुंबा ॥ २ ॥

हे जान्हवी । मोहतम आपन्हवी ।
निजस्वरुपातें दावी । भवभय समुळ दुरावी ।
नीरंजनपद देउनि अक्षयीं नांदवि निजसुख गावीं ॥३॥

पद २४०

हे काशी । चैतन्याची राशी ।
शंभूची मीराशी । दुर्लभ जे अमरासी ।
सर्वऋषीजन साधन करिति होउनि क्षेत्र निवासी ॥ १ ॥
वाराणसी । दुःखभयातें नाशी ।
इच्छित हे सर्वांसी । ह्मणुन काला हणसि ।
इंद्राची जे अमरपुरी ते जाणा ईची दासी ॥ २ ॥
अविमुक्ति । दे सर्वांसी मुक्ति ।
सांडुनि विषयासक्ति । कारतां ईची भक्ति ॥
नीरंजनपद अक्षयिं लाभे । अनृत नव्हे वचनोक्ति ॥ ३ ॥
राम आले । भरतासी क्षेम दिले ।

पद २४१

रामसुंदर शामसीता वामलोचनिं लक्ष्मण हनुमान सुग्रिध
अंगदादिक सर्व वानर पुष्कराऋढ होउनि अतिसंभ्रमें बहु
मंडळीसह विजयि होउनि राम ॥ धृ ॥
राम निजसुखधाम पूर्णकाम मनविश्राम पावननाम ऐकुनि
यम कांपत व्योमकेशा प्रेमसंभ्रम दैत्यकुळीचा होम होउनि
व्योमपंथें नेमरक्षित सांडुनि श्रम ॥ १ ॥
भरत इच्छित संग सप्रजपुंग उडवित रंग चमूचतुरंग सुल-
क्षणरंग बहुत तुरंग विराजित अंग तळपति मृंग निनदति
तुंग भेरि मृदुंग वेणुरव चंग अयोध्ये राम ॥ १ ॥
देव किन्नर इंद्र अप्सर जानकिवर पूजुनि सुर गेलियावर
युक्त परिचर छत्रचामर टाळिती वर रूप नागर युवतिसुंदर सौध
शीखर राहुनि भर पुष्प वर्तति जोडुनि कर नीरंजनप्रभु राम ॥ ३ ॥

पद २४२

क्षेत्रपाळा रे भैरव कलिमाळा ॥ ध्रु ॥ इंद्रनीळसम कीळ वपूवरि
पळि मिशाचा भाळ विशाळा ॥ १ ॥
भीमपराक्रम दंडभयंकर खंड करिसि दानव अवलीला ॥ २ ॥
पुंगि नाद हरि खेद मनाचा भेद दवडुनि धरिसी त्रिशूळा ॥ ३ ॥
डमरुनिनदतव गोड करुनि बरि होउ निरंजन वर्णितसे लीळा ॥ ४ ॥

पद २४३

सांब गावारे शंकर हर भोळा । रुंडमाळा शिरिं व्याळ विराजित
हळाहळ करि कंठिं झळाळा ॥ १ ॥
जटाजूट शिरिं धुवट दिसतसे स्पष्टपणें श्रीविष्णूबाळा ॥ २ ॥
व्याघ्रांबर गजचर्मांबर करि मृगवरसेवित चंडत्रिशूळा ॥ ३ ॥
नंदीवहन हारकामदहनकर निरंजन वर्णितसे लीळा ॥ ४ ॥

पद २४४

येई येई शिवविश्वनाथ देवा रे । काशिक्षेत्राधीप अविनाश मूर्ती रे ।
सर्व जगदांतरि तुझी ज्ञान स्फूर्ती रे ।
सिद्ध साधक जन वर्णिताति कीर्ती रे ।
सुरपति अहि किन्नरनर रजनीचर करिती सर्व सेवा रे ॥ १ ॥
गाण रावण आणि चंडिनंदि ढवळा रे ।
भृंगि रिठी धुंडिदेवि शैल बाळा रे ।
ब्रह्मा हरि इंद्र वरुण करुनि भूतें गोळा रे ।
तालगीत बहु संगित नत्य करिसि करुनि हावभावा रे ॥ २ ॥
नंदीवहन कामदहन रुद्र अक्षभूषा रे ।
भस्म गुंठुनिया वेष्टिसि अहीशा रे
भक्त कल्पद्रुम निजजन परितोषा रे ।
स्वपद शरण हरुनि मरण करुनि तरण देशी निजठेवा रे ॥ ३ ॥
सत्य निर्गुण निष्क्रिय सौख्यराशीरे ।

विश्व व्यापक तूं सर्वांतरवासी रे ।
नित्य निरंजनपणें राहिलाशी रे ।
मातातीत पूर्णब्रह्म द्वैतरहित एकपणें जीवांविसी जीवा रे ॥ ४ ॥

पद २४५

धन्य या नरदेहा आलों कृपा केलि देवा रे ।
सद्गुरुच्या योगें ठाई पडला निजठेवा रे ॥ धृ ॥
गजतुरंगादि देही बरडावरती पेरुनि ओवा रे ।
ज्ञानजळाविण सुकोनि गेला पडोनि वरता मोवा रे ॥ १ ॥
बहुजन्माचें सुकृत फळलें सांपडला देह केव्हां रे ।
श्रवणें मननें भगवद्भजनें घडली साधुसेवा रे ॥ २ ॥
धनदारासुत संपतिचा बहु पडला होता गोवा रे ।
देहयंत्रावरि फिरोनि उलटा उडोनि गेला रावा रे ॥ ३ ॥
नामरुपात्मक मिथ्या अवघ्या समजुनि हरिच्या मावा रे ।
निरंजनिं रघुनाथप्रसादें जाला पूर्ण विसावा रे ॥ ४ ॥

पद २४६

तारिन दुस्तर हा संसार ॥ धृ ॥
भक्तासी तरि तारितसे परि दुष्टां करुनी मार ॥ १ ॥
पाहा पाहा माझ्या नामें एक्या केला बहु उद्धार ॥ २ ॥
दनि मि बंधु ऐसा लौकिक झाला माझा फार ॥ ३ ॥
भक्तअभक्ता साठि युगायुगीं धरितों मी अवतार ॥ ४ ॥
सत्यप्रतिज्ञा माझी ऐका मजसि करा अपकार ॥ ५ ॥
पूसना मजसी स्तन पाजूं अलि काय तिचा उपकार ॥६॥
भक्ताच्या तारि अंकित घरचा जालों पाडीवार ॥ ७ ॥
नीरंजन मी असतां या जगिं जालों कीं साकार ॥ ८ ॥

पद २४७

काय या संसारि सुख वाटतसे या लोकां रे ॥
शोधुनि पाहतां दुःखचि सारें वरि काळाचा धोका रे ॥धृ०॥

गर्भवास सोसुनिया ठोके घेउनि शहाणा झाला रे ।।
बाइल केली सर्वेचि मेली पैका खर्चुन गेला रे ।। १ ।।
खायालागीं अन्न मिळेना मिळतां रोगें पिडिला रे ।
विषयभोग स्वच्छंदें करितां दंडुनि कैदी पडला रे ।। २ ।।
पाउस नाहीं पाणी नाहीं राज्यक्रांत बहु जाले रे ।
ऐसी चिंता वाहतां वाहतां अयुष्य निघून गेलें रे ।। ३ ।।
दुःखरूप संसार समजुनि सत्संगाप्रति केलें रे ।
निरंजन रघुनाथप्रसादें ते नर सुखरूप जाले रे ।। ४ ।।

पद २४८

तो हरी मज दीसतो सर्वत्र । त्या योगें सम जाले अरिमित्र ।। धृ ।।
सर्वदा समसाम्य ज्याची स्थिती । गुणसाम्या मूळ प्रकृतीचा पति ।
समान वसे जो का सर्वाभूतीं । ज्याचिये ठायीं नसे भेदमती ।। १ ।।
पूतना विष पाजायासि आली । तिजला गति वैकुंठीं दिधली ।
सनकादिकां जे कां प्राप्ति झाली । ते प्राप्ति जेणें शिशुपाळा दिली ।। २ ।।
प्रकृतिपुरुषात्मक सर्व जग । मुळींच दोघालागीं एक अंग ।
अंगेविण असे जो अव्यंग । सच्चिदानंद अद्वय श्रीरंग ।। ३ ।।
जें जें हें आहे तें तें अवघा हरि । मीपण आतां उरली नाहीं उरी ।
रघुविर कृपा निरंजनीं बरी । ह्मणोनि वाटे हरि चराचरीं ।। ४ ।।

पद २४९

त्याचें मज पावलें सर्व कांहीं । ज्यासि मजसी अंतर उरलें नाहीं ।। धृ ।।
एकरूप सर्व मी सर्वाधार । ऐसा ज्याचा अनुभव झाला स्थीर
द्वैतबुद्धि उरला नाहीं थार । अद्वयबोधें नांदतो निरंतर रे ।। १ ।।
तो जे चाली ती माझी प्रदक्षिणा । तो जें बोले ती माझी स्तुति जाणा ।
तो जें पाहे तें माझें दर्शन माना । त्याचें मन तें माझी स्थानरचना रे ।।२।।
तो जे सेवि ते मज उपभोग । तो जे करि ती माझी पूजा सांग ।
त्याचें देह ते जाणा माझें आंग । त्या नज दुजा उरला नाहीं भाग रे ।।३।।

त्याला माझें जें कांहीं एकपण । ठावें झालें द्वैतासि ग्रासुन ।
पूर्णब्रह्म जो कां मी सनातन । तो मी जाणा सदेह निरंजन रे ॥ ४ ॥

पद २५०

ऐसा गे माय कैसा हा ज्ञानी । मायेचे केलेलें खरें न मानी ॥ धृ ॥
बुद्धि बाईलच्या स्वाधिन झाला । अहंकारभाऊ वेगळा केला ॥ १ ॥
बाप ईश्वर तो आज्ञा जे करि । तयाचे मानसीं भय न धरि ॥ २ ॥
जातिकुळाची ते सांडिली लाज । प्रवृत्तीचे तरि न करि काज ॥ ३ ॥
निरंजन तरि यालागि वाणीं ; पाहूं जातां नव्हे ज्ञानि अज्ञानी ॥ ४ ॥

पद २५१

तैसें मन जालें मन जालें । सद्गुरुनें मज कथिलें ॥ धृ ॥
स्थूळदेह हा आपुला विराटपुरुषालागिं मिळाला ॥ १ ॥
लिंगदेह जो कांहीं हिरण्यगर्भा वाचुनि नाहीं ॥ २ ॥
कारणदेह तिसरा माया कार्यरूप हा सारा ॥३॥
साक्षी प्रत्यगात्मा तो गुरु निरंजन परमात्मा ॥४॥

पद २५२

याजपरि होउनि रहा रे ज्ञानी हो । नाहीं तरि भवपुरी वाहा रे ॥धृ॥
हें जग अवघें भगवान । आतां कोणापाशीं घ्या सन्मान ।
कोणा दाखवावें दांभिकपण । आतां कोणाचें दुखवावें मन रे ॥१॥
अवघा सच्चित्सुख भरलासे । क्रोधयां वाकवनाचे त्रासे ।
सांडा कुटिळपणाचें पिसें । माना साधू तितुके गुरु असे रे ॥२॥
पहा आपुलें रूप निर्मळ । मन अवरुनि घ्या सकळ ।
हे अमानित्वादि धर्म । माना विषयभोग विटाळ रे ॥३॥
नको आतां जन्ममरण । सांडा गृहदारासुतधन ।
जगि वार्ता समानपण । श्रीहरिसी भजा आमित्र रे ॥४॥
स्वयं होउनि नीरंजन । घ्यारे जनसंगा सोडून ।
करा वेदांताचे विवरण । घ्यारे परमतत्व दर्शन रे ॥५॥

पद २५३

ते धाले । बोध रसायन प्याले । सुखसिंधूत बुडाले ॥
स्वस्वरुपीं स्थिर जाले । धन्य धन्य ह्मणवुनिया वचनें ढेंकर दीले ॥१॥
ते गेले । ब्रह्मकवच दृढल्याले । घेउनि विवेक भाले ॥
मारुनि भेद रिसाले । विजयश्रीनें फुगुनि लोकीं माईनासे जाले ॥२॥
ते आले । निजसदनांत रिघाले । सुखशय्यारूढ जाले ॥
सदा झुलति मतवाले । सहजसमाधि मुद्रा लागुन अंतर्बाह्य निवाले ॥३॥
ते जाले । जिताचि असतां मेले । मरोनि सांगूं ठेले ॥
शांतिरसाचे ओले । माया-अंजनरहित निरंजन रघुविरगुरुचे चेले ॥४॥

पद २५४

ये करविरनिवासिनि भवनाशिनि विश्वकाशिनि दुःखशोषिनि ।
नानावेषिनी चित्प्रकाशिनी भक्ततोषणी लक्ष्मी सुवासिनी ॥ ध्रु०॥
तुझे अधरिचा रंग पाहुनि विष्णू झाला दंग त्याला नसतांहि
जाला साकार सांग तुझें अलकाचा पुंग पाहुनि देव जाले भंग ॥१॥
करिति गुंजारव तुंग पाहुनि नेत्रीचा पांग हरिण होउनि ठेले दंग ॥
गेले वना सोडुनि संग फिरति चुंग असुनिया वनीं ॥ १ ॥
पाहुनि वदन अरविंद चंद्रकांति करुनि मंद जाला तव चरणीं ।
सरळनासिक स्फुंद दंतपंक्ति कळ्या कुंद भाळ विशाळ रुंद वाणि ।
वट सुगंध येति परिमळ मिलिंद पाहुनि तुझा काटेबंद सिंह तो ।
निया फंद होउनि वहन सोसी बंद जगत्कंद माय त्रैलोक्यपावन ॥
आदिशक्ति जगन्माय जालया साह्य तुझे पाय आह्मालागीं उगे काय ।
देई देई निजठाय तुजवांचुनि उपाय व्यर्थ करोनिया काय वृथाश्रम ।
हाय हाय करि पूर्ण कृपासाह्य निजप्राप्ति जेणें होय देई ऐसाचि न्याय ।
निरंजनी मनीं असे करी तैसे चित्सौदामिनी ॥ ३ ॥

पद २५५

ही शारदा । सर्वकळा विशारदा । वेदाची मर्यादा । वारण करिती
दा । भक्तजनांचें रक्षण करिते देउनि पूर्णानंदा ॥ १ ॥

हे भारति । गाढतमा संहारति । ज्योतीची निजज्योति । शिवमुनि दे निजमोती । सर्व जगातें निर्माणत्वें वर्ते जींची ख्याती ॥ २ ॥

सरस्वती । ब्रम्ह्याची जे मति । विरक्ताची गति । चातुर्याची दाती । सर्वारंभीं पूजुनिया नरसुरवर जीतें गाती ॥ ३ ॥

हे वाणि । चैतन्याची खाणी । शद्वाब्धीचें पाणी । शास्त्र जीचे निशाणी नीरंजन रघुनाथ गुरूची जाणा हे अभिधानी ॥ ४ ॥

पद २५६

अरे मी कैसा । जो भाविल त्याला तैसा ।
अभक्ता मी न दिसें दिवसा । भक्ताचा तरि पूर्ण कुवासा ।
पांडव गेले जरि वनवासा । भोजन निशिं दिलें दुर्वासा । पहाता ॥ १ ॥
शिशुपाळा मी वाटे वैरी । त्याची इच्छा त्याशिच मारी ।
कौरव मेले अहंकारीं । मजला मित्र उदासीन अरि नाही सहसा ॥ २ ॥
बसता कल्पतरूचे छाये । जो जें कल्पिल तैसें होय ।
सुरतरु नेणें दोन्ही सोय । प्रिय अप्रिय विवर्जित आहे मी तरि ऐसा ॥३॥
नास्तिकासि मी कोठें नाहीं । अस्तिकासि भेदत्वें राही ॥
ज्ञानियासि तव सर्वाठायीं । स्वयें निरंजन नेणें कांहीं । द्वैतविलासा ।४।

पद २५७

आतां काशासाठीं खेद । जनिं उरला नाहीं भेद ॥ धृ० ॥
अवघा एकचि चित्सिंधु । कोणा वंदू कोणा निंदू ॥ १ ॥
काय घ्यावें आणि टाकावें । कोठें यावें कोठें जावें ॥ २ ॥
ब्रह्मरूप चराचर । ब्रह्मरूप नारीनर ॥ ३ ॥
भवभ्रम गेला शीण । अद्वयरूप निरंजन ॥ ४ ॥

पद २५८

आत्मनिवेदन केलें रे तेणें मीपण गेलें ॥ धृ ॥
देहद्वयाप्रति प्रकृती कारण प्रत्यग पूर्णी मिळालें ॥ १ ॥

कर्मक्रिया सुखदुःखादि सर्वहि वस्तुनें बाधित केलें रे ॥ २ ॥
दृश्यमृगांबु हे असतांचि नाहीं अद्वय एकचि ठेलें रे ॥ ३ ॥
नित्य निरंजन संपूर्ण हे जन रघुवीरप्रसादें जाले रे ॥ ४ ॥

पद २५९

विजयी होईल राम । पूर्ण काम । जनकजे शोक त्यजावा ॥ धृ ॥
दाशरथीचा दूत मी हनुमान । जाळिन लंकाधाम ॥ १ ॥
अठरापद्म चमु सहसुग्रीव आला मेघश्याम ॥ २ ॥
वानरदळ आणि दैत्यकुळासी होईल किं संग्राम ॥ ३ ॥
निरंजन रघुनाथ प्रतापी मारिल रावणकाम ॥ ४ ॥

पद २६०

नरहरिराया करि पूर्ण कृपेची छाया ॥ धृ० ॥
देवा पडतों तुझिया पाया । अवरि अवरि हे तव माया ॥
श्रमलों ईचा योगें वाया । रडता मोकलुनि धाया ॥ १ ॥
भवतापानें भाजति लाह्या । शीतळ नाहीं ठाव बसाया ।
अंतर बाहिर जळती काया । तुजविण करु मी काय उपाया ॥ २ ॥
तुझिया स्वाधिन तुझिया जाया । आह्मासि दाखविति भवभया ।
बांधुनि घालित देहत्रया । गुंतविति स्त्रिपुत्र स्नेहा ॥ ३ ॥
दुस्तर हा भवसिंधु तराया । शिणल्या अनेक साधनि बाह्या ।
निरंजन इच्छित गुण गाया । तवपदिं देई ठाय बसाया ॥ ४ ॥

पद २६१

व्यंकटरमणा । ये सत्वरिं संकटहरणा ॥ धृ ॥
शरणागत मी तुझिया चरणा । चुकवि चुकवि जन्ममरणा ।
लागो मानस तुझिया चरणा । दया करि वो अंबुजनयना ॥ १ ॥
उपाय न दिसे मज भवतरणा । धाव सत्वरि दीनोद्धरणा ।
येऊंदे हरि माझी करुणा । स्वच्छ करी वो अंतःकरणा ॥ २ ॥

वारुनिया अविद्यावरणा । बोधि आपुल्या स्वरुपज्ञाना ।
देई शांति क्षमेच्या भरणा । शरणागत तापत्रयहरणा ॥ ३ ॥
उदार तूं तव भक्तरक्षणा । देई देवा हेचि दक्षणा ।
अगाध तवगुण येवो वदना । कृपादृष्टि करि निरंजना ॥ ४ ॥

पद २६२

जाला शिव मल्लारि याला मागुनि घ्या वारी ।
तुह्मासि येणें नाहीं फिरुनि दुस्तर संसारीं ॥ धृ ॥
भक्तजनां रक्षावें शासन करणें दैत्याला ।
यासाठीं या मृत्यूलोकीं शंभु अवतरला ।
मणिमल्लाचें मर्दन करितां घाम बहुत आला ।
त्या योगें भस्माचा रंग पीतवर्ण जाला ॥ १ ॥
कैलासाहुनि कडे पठारीं प्रस्ताना आले ।
सर्वेचि मारुनि दैत्यठाणें जेजुरि घातलें ।
ह्माळसा हें नाम येणें पार्वतीस दिलें ।
बाणाई या नामें गंगेलागीं बाहिलें ॥ २ ॥
वेगवान नंदीचें वाहन अश्वरूप जालें ।
सामवेदि द्विज शापास्तव श्वानत्वा पावले ।
बाणाईच्या पदस्पर्शानें निजपदा गेले ।
भरित रोडगे वाहुनि पूजन नीरंजनें केलें ॥ ३ ॥

पद २६३

रे मना राहि त्या पाईं साजणा । रे मना ॥ धृ ॥
जो कां वैकुंठिचा राणा । जाला यशोदेचा तान्हा । वन चारितो गोधना ॥ १ ॥
सावळा सुंदर हरी । करी यशोदेची चोरी । गोपिकांतें दावितो खुणा ॥ २ ॥
भक्तासीं जो साहकारी । अल्पा विघ्नांतें नीवारी । ह्मणवि अर्जुनाचा मेहुणा ॥ ३ ॥

नये योगीयाचे ध्यानीं । ऐक्य भावें नीरंजनीं । एसी हे उपासका ॥४॥

पद २६४

नमो देवि जगदंबिका श्रीभवानि । श्रीभवानि महापापसंहारिणी । दुःखनिर्दाळिणी सौख्यखाणी ॥ धृ ॥ अखिल जगकारिणी त्रिगुणवाहिनी नारदादिकमुनि मधुरवाणी । वर्णिती निशिदिनीं विषम भवतारिणी । वंदिलि सुरगणीं दैत्यहानी ॥ १ ॥

अष्ट विविधा करि अष्ट अयुधा धरि । दुष्टमति संहरी महिसअसुरा ।
तुष्ट भक्तावरि कष्टताप परिहारि । इष्ट दे बहुपरि चरणभ्रमरा ॥ २ ॥
ब्रह्मयाच्या रूपें विश्व हें अवतारि विष्णुरूपें करि पालनातें ।
रुद्ररूपा धरि विश्व हें संहरि । सकळ भूता हरि प्रळयवातें ॥ ३ ॥
ब्रम्हविद्या स्वयें योगियाच्या मनिं । होय जे उन्मनि मोक्षदानी ।
द्वैतभय निरसुनि मोहतम ग्रासुनि । राहे नीरंजनि ऐक्यज्ञानी ॥ ४ ॥

पद २६५

निजस्वरूपा भ्रमला रे मानव ॥ धृ ॥
देह अहंता सेविली दृढतर म्हणवुनिया भ्रमला रे मानव ॥१॥
लक्ष चौऱ्यांशीं फिरतां फेरे काळ बहु क्रमला रे ॥ २ ॥
स्वर्गनरक गति पावुनि बहुधा अज्ञपणें दमला ॥ ३ ॥
निरंजनपद पावुनि सहसा नाहीं विश्रमला रे ॥ ४ ॥

पद २६६

कोठें दावि हरी सत्वरीं । आमुचा कुळवैरी सत्वरीं ।
हिरण्याक्षा वधिलें ज्याणें । कपटरूपें समरीं ॥ धृ ॥
घेईन सूड मि निजबंधूचा । मारुनिया स्वकरीं ।
परि तो विष्णू माझ्या भेणें । पळतो देशवरी ॥ १ ॥
मी तरि कैसा पूर्ण प्रतापी । निर्भय ब्रह्मवरी ।
माझें भय मनिं घेउनि त्या स्थळ । सोडविलें अमरीं ॥ २ ॥

बाळ ह्मणे हरि व्यापक माझा । भरला सर्वत्रीं ।
चालविता जो या विश्वातें । होय कळासुत्रीं ॥ ३ ॥
सत्वरि व्यापक पाहे हरी । सत्वरि आमुचा कैवारी ।
सत्वरि हिरण्याक्ष । क्रोडरूपें समरीं ।
स्तंभ सभेचे गुरगुर करितां दचकूनि दैत्य उरि ।
स्तंभालागीं ताडियले तव । नरहरिरूप धरी ।
दैत्यप्रभूतें अंकीं घेउनि । फाडियलें स्वकरीं ।
कडकड दाढा खावुनि मोठा । सिंहनाद करी ॥ ५ ॥
प्रल्हादातें कुरवाळुनिया । स्थापुनि दैत्यपुरी ।
निरंजनपद देउनि अक्षयिं । निर्भय छत्र धरी ॥ ६ ॥

पद २६७

मन उन्मन झालें । बोलणें सर्व निमालें ॥ धृ ॥
एकपणें निजबोध ठसावुनि । अनुभव घेणें उडालें ॥ १ ॥
स्मरणाचे विस्मरण विसराची आठवण पूर्वींच होउनि ठेलें रे ॥ २॥
आत्म अनात्म विवेचन जाउनि द्वैताद्वैत भान गेलें रे ॥ ३ ॥
नित्य निरंजन अनित्यावांचुन सहज समाधित डोले रे ॥ ४ ॥

पद २६८

अजि गोकूळिं कृष्ण प्रगटला । नंदयशोदे हर्ष दाटला ।
सर्व देवां आनंद वाटला । यदुवंशाचा खेद आटला ॥ धृ ॥
नसुनि देवकिला प्रसुतवेदना । पुढें देखियलें निजनंदना ।
बंदिशाळेमधिं तेज माइना । पाहुनि वसुदेव करी प्रार्थना ॥ १ ॥
ह्मणे श्रीकृष्ण लक्ष्मीपति । बाळ होतों मी लहान आकृति ।
नेउनि घाली मज गोकुळप्रति । पुढें मारिन मी कंस दुर्मति ॥ २ ॥
अनकदुंदुभिनें कृष्ण उचलिला । तुटुनि बेडिसह द्वारशृंखला ।
वरि छाया करु शेष पातला । मधुनि यमुनेनें मार्ग दीधला ॥ ३ ॥
नित्य निरंजन निर्गुण स्थिती । ब्रह्मईशादि ज्यासि वंदिति ।
श्रुतिशास्त्रादि ज्यासि वर्णिति । त्यासि गोपी निजपाईं न्हाणिती ॥ ४ ॥

## पद २६९

कृष्ण वेणु वाजवी वृंदावनीं । तेणें रवें तल्लिन जाले प्राणी रे ॥ धृ ॥
विमानाच्या स्वर्गती स्थिर जाल्या । देवस्त्रिया मोहीत होउनि ठेल्या ।
गाई कृष्णासमिप येत्या जाल्या । कर्णपूटें वेणूचा रव प्याला ॥ १ ॥
वत्सें दुग्धपानातें विसरले । मुखिं दुग्ध होतें तें श्रवते जालें ।
पक्षि शह्ब टाकोनि वृक्षीं ठेले । ऋषिकर्म करितां विसरले ॥ २ ॥
वृक्षालागि आनंद अश्रु आले । मयुरांनीं नृत्यासि आरंभीलें ।
हरणांनीं नेत्रासि वाहाटिले । गोवर्धनें रोमांच उभारिलें ॥ ३ ॥
कामज्वरें व्यापिल्या पुलिंदिनी । स्थिर जाले यमुनेचें पाणी ।
मेघमाळा जाहल्या छत्रावाणी । जग जालें तल्लिन निरंजनिं ॥ ४ ॥

## पद २७०

निजरुप भुललासि काइरे बावळ्या ॥
गुरुगुज हें ऐकुनि येइरे ॥ धृ० ॥ जेथें श्रुतिचें बोलणें सरे ॥
ज्यातें जाणतां जाणिव विरे । भेद अभेद ह्मणणें पुरे ॥
अनुभव सरोनि शेवटिं जें उरे । बावळ्या ॥१॥
जैसें स्फटिक शिळेचे ठायीं । जळ सहसा प्रविष्ट नाहीं ॥
तैसी माया न शिरे जे ठायीं । तें हें तुझें रूप निश्चळ पहिरे ॥२॥
जेथें नाहीं भानाभान । जगत् शून्याचें अधिष्ठान ॥
ज्याला शून्य ह्मणती बुद्धीहीन । आहे नाहीं विण जे परिपूर्ण रे ॥३॥
जीव बोधार्थ श्रुति आपण । ज्यास ह्मणती निरंजन ॥
भूमा आनंद सच्चिद्घन । हेचि हेचि रघुविर गुरूची खुण रे ॥४॥

## पद २७१

बांधागे बाई या कृष्णाला रज्जुनें ॥ धृ ॥
आमुचे घरचें खातों लोणी ! तेव्हां ह्मणतो मीच धनी ।
आतां दिसतो चोरावाणी । नलगे सांगणे यशोदे लागी ॥ १ ॥

अनेक गोपी मिळोन आल्या । दावें घेउनी गोळा झाल्या ।
चोर ह्मणतां नाहीं भ्याला । घ्यागे उसने अपुलाले घ्यागे ॥ २ ॥
प्रतिदाव्याच्या बंधनें । दोन बोटें दावे उणें ।
यशोदा श्रमली तेणें । आतां कैसें करणें । बंधनालागि आतां ॥ ३ ॥
बाळ नोहे हा परिपूर्ण । नित्य मुक्त निरंजन ।
याला कैंचे वो बंधन । सोडा मिपणें बांधा या लागीं तुह्मी सोडा मीपण ।४।

पद २७२

भक्तियोगें होतें सर्व । सोडुनि द्यारे तुह्मी गर्व ॥
साधा नरदेहाचें पर्व । देव जोडा खराखुरा ॥ १ ॥
गवळियांचें भाग्य थोर । जाला श्रीहरी किशोर ॥
जावोनिया सर्व घोर । लाभ झाला दूसरा ॥ १ ॥
दशरथाचें साधन । मारुनि तपस्वी श्रावण॥
पोटा रामलक्ष्मण । आले काय विचारा ॥ २ ॥
प्रल्हादाचे कुळीं काय । विष्णु द्वेषाचा उपाय ॥
तेथें नरसिंहाचे पाय । रक्षण करिती लेकुरा ॥ ३ ॥
निरंजनिं हाचि भाव । सर्वी वसतसे देव ॥
भक्तिभावें प्रकट होय । लहानथोर पामरा ॥ ४ ॥

पद २७३

हरिचे गुण गाई । नरतनु गेल्यावरुतें मनुजा करसिल मग काई ॥
हस्तपादकर्णादिक इंद्रिय सावध जंव कांहीं ॥
तंववरि भगवत्प्रसाद सत्वारिं संपादुनि घेई ॥ १
वाणीचा व्यापार निरंतर सारा विषयीं ॥
मन चंचल चक्रापरि फिरतें विषयाचे ठायीं ॥ २ ॥
श्रीहरिप्राप्तीसाठीं शरण संतांतें जाई ॥
निरंजनपद अविनाशी मग पावसि लवलाही ॥ ३ ॥

पद २७४

अरे हरि । तुझि संगत नाहिं रे बरी ॥ ध्रु० ॥

तूं शिरसि घरोघरीं । अरे हरि ॥ दहिदुधाचि करिसि चोरी । अरे हरी॥

लोणि झुगारिसि दुरी । खाविसि माकडाकरीं ॥ १ ॥

अह्मि गवळियाच्या नारी । फितविल्या अमच्या पोरी ॥

रस्त्यांत धरिसि पदरीं । अवळुनिया धरिसि उरीं ॥ २ ॥

मूलाचि करिसि मस्करी । खिजविसी नानापरी ।

घेसि हीरोनि सीदुरि । तसांसि करिसि हुंबरी ॥ ३ ॥

गाई खाजविसि निजकरीं । तया धरुनिया आधरीं ।

दुध पिसी वरचेवरी । पाहतांचि मारिसि मुरी ॥ ४ ॥

यशोदे सांगिनं जरी । उखळासि बांधिन तरी ।

निरंजन असिसि परी । तुझि जाइल मातबरी ॥ ५ ॥

पद २७५

स्थापियला हो आह्मि हृत्कमळीं रामघनश्यामहरी ॥ धृ ॥

जो कां नित्य निर्विकार । नाहीं ज्यासि अंतपार ।

शुद्ध ब्रह्म निराकार । सारांचें निजसार हे ॥ १ ॥

संकल्पें विश्व करी । रुद्रविरंचि होउनि हरी ।

प्रजन स्थिती प्रळय करी । नाना अवतार धरि हो ॥ २ ॥

भक्तरक्षण हेचि कृती । धरूनि चापबाण हातीं ॥

पिशिताशन वधुनि किती । टाकियले नाहिं गणती हो ॥ ३ ॥

निरंजनी हेचि मति । रामनामीं परमप्रीति ।

गुरुवर हे सहजगती । ज्ञानध्यान आलें हातीं हो ॥ ४ ॥

पद २७६

पूजियला हो आह्मि योगिवृंदवंद्य सतत दत्तगुरू ॥ धृ ॥

कृतयुगिं मुनि अत्रि घरीं । विधि हरिहर दत्तवरी ।

त्रिगुणात्मक मूर्ति बरी । अनुसूया हृत्पद्मीं ।

प्रगट जाली हो ॥ १ ॥

कोटि चंद्र समप्रकाश । मोह ध्वांत करुनि नाश ।
निजसुख दे अविनाश । शरणागत सुजनजनाहो ॥ २ ॥
षड्भुजीं षड्अयुध वरि । शंखचक्र उर्ध्वकरीं ।
डमरु त्रिशूळ मध्य धरी । कमडंलु अधोभागि मत्तमाळा ॥ ३ ॥
भागीरथि स्नान करी । भिक्षाटन कोल्हापुरीं ॥
भोजन करि माहूरीं । शेषाचलि शयन करुनि गिरनारी ॥४॥
योगस्थिति द्विभुज होत । सर्वांगीं भस्म खचित ।
जडवत् क्षिति शयन करित । क्वचित बाल क्वचित उन्मत्तपरी हो ॥५॥
अचल स्थिति ब्रह्मधामि । सर्वव्यापि स्मर्तृगामि ।
निरंजन परम स्वामि । मनकुसुमें अर्चियला हो ॥ ६ ॥

पद २७७

भवार्णवीं बुडतों मि तारी रे माधव ।
अशातृष्णा मोहतम वारीं रे माधव ।
दुखालय अशाश्वत देह रे० । चिरस्थायि वृथा हा संदेह रे० ॥२॥
पुत्रमित्रकलत्रादि सर्व रे मा० । माझे ह्मणवुनि व्यर्थ केला गर्व रे मा० ।३।
धनविद्याप्रतिष्टेच्या ठाईं रे । घालविलें वय पूर्ती नाहीं रे मा० ॥४॥
दानपुण्य कांहीं नाहीं घडलें रे । स्वकर्म करितां उणें पडलें रे ॥५॥
विरक्ति आणि भक्ति नाहीं घडली रे । सज्जनाचि हेळणा म्यां केली रे ॥६॥
लोक मज ह्मणताति साधू रे । अंतरिं जागति काम क्रोधू रे ॥७॥
जन्मांतरिं काय पुण्यें केलीं रे । सद्गुरुचि पूर्ण कृपा जाली रे ॥८॥
रघुविरें मज निरंजन केलें रे । पापतापदैन्य विलया गेलें रे माधव ॥९॥

पद २७८.

गोवळा गोपाळ वृंदावनिं वेणु वाहे ।
मोहिलें हें मन नादाधारें मूळा जाय ॥
शबलांश सांडुनि शुद्धांसि मोहरलें मन ।
नादाचे उगमीं कैसें जहालें सुलीन ॥ १ ।

वाच्यांश सांडुनि लक्ष लक्षीसि तो स्वयें ।
लक्ष आणि लक्षीता हेहि तेथें नुरे द्वय ॥ २ ॥
निरंजन निःशब्द नादाचें जन्मस्थान ।
नाद आणि जाहाला जयरामकृष्णार्पण ॥ ३ ॥

## पद २७९

सूक्ष्म गुरुमार्ग गुरुमार्ग । चढतां एकवीस स्वर्ग ।
हातीं घेउनियां ज्ञानखर्ग । घ्यावा अलक्षदुर्ग ॥ धृ ॥
हृदयीं प्रगटति तीन वाटा । दोन गेल्या नीटा ।
एक गेलीसे अव्हाटा । भेदुनि ब्रह्मकपाटा ॥ सूक्ष्म० ॥ १ ॥
सप्तसिंधूचें आवरण । त्या दुर्गाकारण ।
तेथें जाईल बा! कोण । योगींद्रावांचून ? ॥ सूक्ष्म० ॥ ॥ २ ॥
धारा शस्त्राच्या तीक्ष्ण । त्या दुर्गाकारण ।
त्यांहुनि करिती बा गमन । ब्रह्मनिष्ठ जाण ॥ सूक्ष्म० ॥ ३ ॥
सुईच्या रंध्राहुनि लहान । त्या दुर्गाची खूण ।
त्यांतुनि करिती बा गमन । आत्मनिष्ठ जाण ॥ सूक्ष्म० ॥ ४ ॥
जेथें रिघ नाहीं मुंगीला । ठाव कैंचा पक्ष्याला ।
मीन माघारा परतला । कपीशेष राहिला ॥ सूक्ष्म० ॥ ५ ॥
सद्गुरु एकांतासि नेतो । हस्त शिरीं ठेवितो ।
तनुमन घेऊनियां जातो । जिव मारुनि जिववीतो ॥ सूक्ष्म० ॥ ६ ॥
प्रभु निरंजन समर्थ । आमुचा सद्गुरुनाथ ।
तयानें दाखविला निजपंथ । बोलविला सिद्धांत ॥ सूक्ष्म० ॥ ७ ॥

॥ श्री ॥

# निरंजन स्वामीकृत प्रभाती.



## प्रभाती १

जागिये श्री दिगांबर मनमोहन प्यारे ॥ धृ ॥
अरुणभानु प्रगट भयो रथपर असवारे ॥ १ ॥
कमलदले बिकस गई पात भये न्यारे ॥ २ ॥
भ्रमर मिले कुंजगयो करते गुंजा रे ॥ ३ ॥
निरंजन ठाड भयो तोहि गुन ललकारे ॥ ४ ॥

## प्रभाती २

जागिये मुनि राजकुमर दत्तात्रय स्वामी ॥ धृ ॥
साध मिले दरस अयो तजे सकल कामी ॥ १ ॥
ऋषिगण एक ठारेभये असीस देत धामी ॥ २ ॥
अहि सुरेंद्र इंद्र चंद्र गुन गावत नामी ॥ ३ ॥
ले खडाव निरंजन करता गुलामी ॥ ४ ॥

## प्रभाती ३.

जागिये यदुराज गुरुस्वामि अवधूता ॥ धृ० ॥
तिन्हो लोक धन्य भयो अनुसूया माता ॥ १ ॥
धन्य भाग्य पायो हे अत्रिमुनी पिता ॥ २ ॥
इंदु बंधु कृपासिंधु तिन्हो लोक त्राता ॥ ३ ॥
निरंजन शौर करत निशिदिनि गुन गाता ॥ ४ ॥

## प्रभाती ४.

जागीये गुरु योगिराज गिरनारबासी ॥ धृ० ॥
नवहि नाथ जाग रहे सिद्धा चौऱ्यासी ॥ १ ॥
जागे अंबिका देवी अनुसूया डासी ॥ २ ॥
नाथ अवघड डिकरा ठाड चरणपासी ॥ ३ ॥
निरंजन शरण आयो होकर उदासी ॥ ४ ॥

प्रघाती ५

जागिये त्र्यंबकेश्वर गिरजापत साई ॥ ध्रु ॥
तुमहारे मिलन कीते गंगाजी आई ॥ १ ॥
ब्रह्मगिरि निलसाकर कुशाबरत न्हाई ॥ २ ॥
रूपरेख बन बादईपर कंमा बाई ॥ ३ ॥
निरंजन गुरुबर्णन करता मधुराई ॥ ४ ॥

प्रभाती ६

जागे प्रभुनंद कुंमर बवसिंधु विहारी ॥ ध्रु ॥
पूरब दिग लाल भई लुप्त भये तारे ।
अरुण भानु दरस अये रथपर असवारे ॥ १ ॥
गोकुलके बाल अये तुमतो रहे पौढे ।
ब्रजनारि ठाडभयो गौलि गैल ठाडे ॥ २ ॥
गावनके बछियनसे बालिशने छोडे ।
तुजाबिन गौ पिबन दे पिबत नही बछडे ॥ ३ ॥
निरंजन द्वार खडा दरस लेने आया ।
उनपर तुम करो लाल कृपादृष्टी छय्या ॥ ४ ॥

प्रभाती ७

जागे श्रीकृष्ण लाल मोहन मतवाले ॥ ध्रु ॥
पछमते चंद्र जात सुरज पुरब आया ।
तारासह निकल गयो तम परबतछाया ॥ १ ॥
देशदेश पांथ चले तीरथ करवाले ।
पच्छिनके संघ चले त्यज लरकेवाले ॥ २ ॥
धेनुश्रृंग वेनुचंग गोपबाल गावे ।
धेनु ले बन जावन तुजसे बुझ्यावे ॥ ३ ॥
निरंजन गुन गावत पगलागे बैठा ।
उनपर गिरिधारिलाल करो पुरनदीठा ॥ ४ ।

श्री

# निरंजनकृत हिंदुस्थानीं पदें.

## पद १

सबसे खूब बना खूब बना । फकत फकीरी बाना ॥ धृ ॥
किसका नहि शरमिंदा । सबदिन आखत्यारि बंदा ॥ १ ॥
झाडोके फल खावे । गहेरा नदीका जल पीवे ॥ २ ॥
छय्या लाकूल पटावे । ज्याकर जंगल म्यान सोवे ॥ ३ ॥
सदा मगन दिल म्याने । हारदम निरंजनकू जानें ॥ ४ ॥

## पद २

फकिर वो कहेना वो कहेना । सदा मगन मस्ताना ॥ धृ ॥
दुजेकूं नहि जाने । हारदम आपआपकु चिने ॥ १ ॥
रावरंक सम देखे । सुन्ना खाक बराबर लेखे ॥ २ ॥
सहज मिले तो खावे । कोई दिन फाकेसेबी ज्यावे ॥ ३ ॥
छोडी सबकोइ अरसा । हुवा निरंजन का बासा ॥ ४ ॥

## पद ३

हारबिन नहि ठिकानाबे । भुला जगत दिवानाबे ॥ धृ ॥
बाहेर भीतर राम बिराजे । पैठा सबघट म्याने ॥
उसके ऊपर चलते फिरते । कोइ नहि उनकू ज्याने ॥ १ ॥
पानीसे तन पयदा होकर । पानीमो रहबासी ।
पानी भीतर पानी धुंडे । मच्छी होकर प्यासी ॥ २ ॥
आगमनीगम देते है । साखि ब्रह्मरूप जगसारा ।
उसका कहेना कोइ नहि माने झूटा करत खिसारा ॥ ३ ॥
नीरंजन रघुनाथ हुकुमसे करता खूप इसारा ।
गगन जगनसे लगन लगा है । क्या कहुं बारेबारा ॥ ४ ॥

## पद ४.

ब्रह्मरसायन पीयो भाई । दुर्धर हा भव बाधत नाहीं ।। धृ ।।
चिन्मय बनके भीतर ज्यावो । पेट भराकर चिद्रस पीवो ।। १ ।।
आगमनीगम बाड निकालो। अनुभव लेकर बात म बोलो ।। २ ।।
शुकसनकादिक येह रस पीवे । ब्याद मिटाकर साचे जीवे ।। ३ ।।
नीरंजन रघुनाथ दवागू । ब्रह्मदवा खुब होगई लागू ।। ४ ।।

## पद ५

जोगि भया बो दोसो बेसे । छोडी तनकी आसा बे ।। धृ ।।
आपने तनकी सूध नही है हुवा अस्थिपंजर ।
उसके आगे घास फुसे है अच्छी अंबर सुंदर ।। १ ।।
आशा तृष्णा छेदन कालि मन किया है हाजर ।
उसके देखे हाथी घोडे दौलत पसन् बराबर ।। २ ।।
आलख पलखसे धुंद लगी है हुवा मस्त दीवाना ।
उसके लेखे कछु नहि है खट्टामीठा खाना ।। ३ ।।
निरंजन रघुनाथकदमसे लगकर बारोबारा ।
आतमग्यानका प्याला पीकर दशईंद्रीयकूं मारा ।। ४ ।।

## पद ६

सद्गुरु साचा पाया बे । करमका लिखा मिटाया बे ।। धृ ।।
चिदंबरका रतन बिचिछतर गुरुनें मुजे दिखाया ।
उसका तेज पडा है भरपुर भव दारिद्र खोया ।। १ ।।
संचितकी धुलधानी कीई क्रियमानकू तोडा ।
प्रारब्धोकी पेड उखाडी दूम काटके छोडा ।। २ ।।
पापपुन्नको धोकर डाला आलख बनाया आसन ।
श्रीरघुनाथ गुरुका बछेडा उपर चढा निरंजन ३ ।।

## पद ७

गुरुनें बात सुनाया बे । मजकूं फकिर बनाया बे ।। धृ ।।

निराकार सिरताज बनाया निर्गुण उजली सैली ।
चिदंबरकी कफनी डाली चिन्मय हातमो झोली ॥ १ ॥
आतमग्यानका लिया कटोरा घरघर टुका मागे ।
काम क्रोधकी धुनी जलाई अनुहात डंका बाजे ॥ २ ॥
आैट हातका लीया पिंजरा सोहं पोपट बोले ।
निरंजन रघुनाथ सद्गुरु आंदरका पट खोले ॥ ३ ॥

पद ८

गुरुने अमल पिलायाबे । मुजकू गरक सुलाया ने ॥ धृ ॥
अगमनीगमकी बुट्टी गैरी गुरुबचनका पानी ।
मन कुंडेमें खूब घोटके आतमग्यानसे छानी ॥ १ ॥
नयन अगोचरी मुद्रा चढके उलटा माहार देखा ।
उसकेभीतर मुरत पैटि रूप नहिं है रेखा ॥ २ ॥
निरंजन रघुनाथ सद्गुरु एकहि बार मिलाया ।
मेरा चेहरा मुजे दिखाकर अपने आप भुलाया ॥ ३ ॥

पद ९.

हम तो घरबारी घरबारी । करते बडी फकेरी ॥ धृ ॥
शांति क्षमा और दया, तीन्हो औरत हामने किय्या ॥ १ ॥
भावभगत मर्यादा लडका लडकी करते पैदा ॥ २ ॥
आशा तृष्णा मारी, अहंकार निकाला बैरी ॥ ३ ॥
नीरंजन संसारी, किया रघुबिरगुरू कैवारी ॥ ४ ॥

पद. १०

ग्यानी कैकर भूला बे । चिनले आंदरवाला बे ॥ धृ ॥
ब्रह्म न खत्रि बैश मन्हेटा हिंदु और मुसल्ला ।
सबके आंदर होके पैटा एक चलानेवाला ॥ १ ॥
हाथी घोडा चिडिया मुंगी पैदा खलकत सारी ।
एक हुकुमसे चलती है सब काया न्यारी न्यारी ॥ २ ॥

आच्छा माहाल बना उंचा नीच्या तारतखाना ।
सबके आंतर आकाश पैटा खालि नहि ठिकाना ॥ ३ ॥
नीरंजन रघुनाथ हुकुमसे आंदरवाला देखे ।
स्थावर जंगम उच्यानीच्या सबी बराबर लेखे ॥ ४ ॥

पद ११.

गीरनार परबत बिचमो गुरुराज बिराजत है ॥ धृ ॥
सोरट काठाड बिच ठाडे । उंचे भगवे झेंडे गाडे ।
हानाकु झरझराट खुब छोडे । उपर बादलके जुंबाडे जुगते
है पहाडमे ॥ १ ॥ जमियलसुतर सवारी दौडे ।
दामोदर बिनि पर ठाडे । भावनाथ नौबतकू झाडे ।
पारश कोतवाल है घोडे । सोरटके माहालमे॥ २ ॥
निशान रामानंद फडाडे । अंबा राग रागनि छेडे ॥
औघड छडीदार है ठाडे । गोरख जिलीब लेकर दौडे ॥
चढकर आंबारीमो ॥ ३ ॥
उंचे झुकर हे गिरिराज । तापर मुढा है दासाज ॥
तामें बैठें गरिबनवाज । श्रीदत्तात्रय गुरुमहाराज ॥
शंकराच्यारज खवासीनमो ॥ ४ ॥
पाछें अनुसूया माताजी । दुमदारी घर कालीका जी ॥
निरंजन कहे कंदमुलाजी । पुकारता है गुरुजी गुरुजी ॥
फिरत है जंगलमे ॥ ५ ॥

पद १२

तनका नही भरोसा बे । मतकर उनकी आसा बे ॥
खाक जमाकर वोछा पाया । पानी बिना बनाया ॥
उसकी दिवाल मजबुत नहि है वैसी है यह काया ॥ १ ॥
घास जलाकर ताप बनाया सहजासहज बुझावें
वैसी नरतनु साची नहि है हलखपलखमो जावे ॥ २ ॥

खन आंदर खन बाहेर ये दम चलता हरदम ख्याली ॥
बाव पकडकर मोट बंधि है जबि पडेगी खाली ॥ ३ ॥
निरंजननें येही समकर गुरुपग ससि मिलाया ॥
श्रीरघुनाथमें हरसे साच्या अजरामर पद पाया ॥ ४ ॥

पद १३

दुनिया बडी दुरंगी बे कीसे नहि कहे चंगी ॥ धृ० ॥
घरमे लडके बाले नहि तो कहते है ना पूता ॥
बेटा बेटी बहुत भये तो कहते हुवा कुत्ता ॥ १ ॥
पापी पापी उसकू कहते जीस घेर दौलत भारी ॥
छोड दिया तो नामर्दा है करके लेई फकीरी ॥ २ ॥
जटा बढाकर राक लगाई उसकू कहते ढोंगी ॥
दुनियासरिखी रहन चलेतो उसकू कहते भोगी ॥ ३ ॥
ग्गान समजकर ध्यान किया तो सिद्धीकू बतलाना ॥
बडी करामत उसकूं कहते अधोगतीकू जाना ॥ ४ ॥
निरंजन रघुनाथ हुकुम है सब दुनियासे रडना ॥
भले बुरेसे क्या मतलब है आपना कारज करना ॥ ५ ॥

पद १४

साधु समागम सारो भाई । सहज तरोगे ये भवडोहीं ॥ धृ ॥
काहेकु तीरथ फीरत ज्याना । काहुकेर बात पाव दुखाना ॥ १ ॥
जपतपसाधन काहेकू होना । सिस बहाकर देह सुखाना ॥ २ ॥
साच गुरूपग सीस मिलावो । नीरंजनपद आसइ पावो ॥ ३ ॥

पद १५

काहेकु जोग लियामेरे भाई । ग्यानाबिना चिपी उमर खोई ॥ धृ ॥
धोती छोड लंगोटी डारी । खाकलगाकर देह बिघारी ॥ १ ॥
सिरपर भार जटाका लीया । च्यादर आचला लाल रंगाया ॥ २ ॥
घरघर भिछ्या मांगत खाया । घास बिछाकर आसन कीया ॥ ३ ॥
नीरंजनपद भेद न पाया । ग्यान गुरू बिच माटि मिलाया ॥ ४ ॥

पद १६

सद्गुरु साई हमारा । बे भवजलपार उतरा बे ॥ धृ ॥
दिलदरयाका गहेरा पाणी संघय घोर अंधारा ।
आशा कल्पना लाट उछाले विकल्प छूटा वारा ॥ १ ॥
निःसिम भगतका जहाज बनाया आतमग्यान फरारा ।
कडकडाट बैराग्य खेचकर उन्मन गोशा सारा ॥ २ ॥
शांतिक्षमाकी तोफ बनाकर षडमच्छींकूं मारा ।
नीरंजन रघुनाथ सद्गुरु अवघट घाट उतारा ॥ ३ ॥

पद १७

रतनागर सागर म्याने प्रभुराज विराजत है ॥ धृ ॥
गहेरा जल भरपुर दरयाव । आथाफ नहि लगता हे याव । तामे धरति किया जमाव । कुंदरत आज बहारीकी माव । नहि कोई जाने ॥१॥
मथुरा बिंद्राबनके बासी । श्रीगोपाललाल अविनाशी । जिनकी रमा बनी है दासी । सो भये द्वारावतकेबासी । बने रहे राजे ॥ २ ॥
टिकंलाल बडे है माई । जिनकी नागर मुसल लढाई । क्या कहु उसकी खूब बढाई । रजनीचरकीं धूल उडाई । सब कोई जाने ॥३॥
सबमे बडि राणि है रुक्मन । ज्याकर तप कीया दिंडुरबन । हारजी देख फ़ीरत है बनबन । मुरलि बजावत है सन्‌सन्‌सन्‌ । पंढरपुर दर्म्याने ॥४॥
जांबूवंती और भामाजी । जिनकी बिकट बडी है मर्जी । नारद आप-मतलबा गर्जी । उनकू दान कियाथा हारजी । छोडा देकर नाने ॥ ५ ॥
सबमे राधा है हुसियार । जिनपर माधोजीका प्यार । भरि है दौलत अपरंपार । तमाम कुलसारा यखत्यार । सब कोई माने ॥ ६ ॥
देवकी पुरुषोत्तम गोपाल । बसुदेव फेरत है माल । त्रीविक्रम गोवर्धन-लाल । उठाया पर्बतकू बहुसाल । गोकुल रखने ॥ ७ ॥
सबके बिच खडे महाराज । कांचन मोचनका है साज कानन कुंडल मुकुट विराज । पीतांबरधर प्रभु सिरताज । पैटे उचटी काने ॥ ८ ॥

चौभुजरुप खुबहै मुलाम । साधू संतनके निजधाम । छोडा है घरका सब काम । बना है नीरंजन गूलाम । चरणरज धोने ॥ ९ ॥

पद १८

जोग नहि आसाना बे । तनपर उदार होना बे ॥ धृ ॥
नागेंदरके सिरका मनका ज्याकर उठाय लेना ।
हात लगातो बेहतर नहितो आपना जिवडा खोना ॥ १ ॥
सोता है पंचानन उसकूं पुकारकर हटकाना ।
फटका देकर नही मरातो आपना जीसे जाना ॥ २ ॥
परचात नहीं है उसने लोहोके चने चबाकर खाना ।
उसके भीतर चैन पडीतो जोग कमाने आना ॥ ३ ॥
नीरंजन रघुनाथ हुकुमसे छाडी तनकी माया ।
मर्दा मर्दी कलजुगम्याने पूरा जोग कमाया ॥ ४ ॥

॥ पद ॥ १९.

सद्गुरु दैवत साचा भाई । ओहि बराबर और न कोई ॥ धृ ॥
ब्रह्मा विष्णु महेश्वर तीन्हो । सद्गुरुकी सर काई न किन्हो ॥ १ ॥
तेहतिस कोटी सुरेश्वर सारे । गुरुसमता नहि पावत बारे ॥ २ ॥
गुरूने मोहे निरंजन कीया । सब दैवतका देव बनाया ॥ ३ ॥

॥ पद ॥ २०

जोगी जोग कमायाबे । उमरकू नाहाकर खोया बे ॥ धृ ॥
सिरपर लंबी जटा बढाई । तनकू खाक लगाया ।
गाम छोड पाहाडमे पैठा । छोड देई सब माया ॥ १ ॥
धूपकाल देह अगन तपाकर बरस काल सिर लीया ।
थंडकाल पाणीमो सोकर सुका पत्ता खाया ॥ २ ॥
एकपाव वर बैठक साधी रातदीन नहि सोया ।
मौन पकड इंद्रियकू मारा ऊपर हात सुकाया ॥ ३ ॥
आपने आप पछानत नहि तो सब कुछ है पस्ताया ।
निरंजन रघुनाथ गुरुका साच वचन नहि पाया ॥ ४ ॥

॥ पद ॥ २१

अब कै डरना मनवा याद गुरूकी करना ॥ धृ ॥
सगे सैद रे सब कुय छोडे छोडे लडके बाले ।
अब दुनियासे कैकर कहना भाई भतीजे साले ॥ १ ॥
घर छोडे दौलतसे बिछडे पकडा मुलुक बिराना ।
उंचे तंबू हाथी घोडे हमे काहेकू होना ॥ २ ॥
निरंजन रघुनाथ सद्गुरु याद हमेशा करता ।
अव्वल आखर सब कुच पाया अब किसे नहि डरता ॥ ३ ॥

पद २२

सद्गुरु दाता बे । मुजकू च्याहे सो बतलाता बे ॥ धृ ॥
सद्गुरु मातापिता हमारा सद्गुरु सग्गा भाई ।
इस धर्तीके पडदे ऊपर और दुजा नहि कोई ॥ १ ॥
सद्गुरु मेरा महाल मुलक है धनदौलत कुलसारा ।
सद्गुरु देता अनाज पाणी क्या कहु बारोबारा ॥ २ ॥
सद्गुरु मेरा रामरहिम है पिर पैगंबर सारा ।
निरंजन रघुनाथ सद्गुरु भवजल पार उत्तारा ॥ ३ ॥

पद २३

महापंथ चलना जोगी म्हापंथ चलना ॥ धृ ॥
चतुर्दलशटदल दशदल गहेरा महापंथ चलना ।
अष्टदलोका उलटा मोहरा महापंथ चलना ॥
षोडदशल नीचेके बारा महापंथ चलना ।
सहस्रदल द्विदलसे न्यारा महापंथ चलना ॥ १ ॥
अष्टकमलहै एकहि देठे महापंथ चलना ।
भातभातके छोटेमोठे महापंथ चलना ॥
रंग बिरंगी सीधे उलटे महापंथ चलना ।
ठौर ठौरपर दैवत पैठे महापंथ चलना ॥ २ ॥

इडापिंगला रोधन करना महापंथ चलना ।
सीधा मारग चले शिशुम्ना महापंथ चलना ॥
प्राण पलटकर उलटा लाना महापंथ चलना ।
अपान लेकर ऊपर ज्याना महापंथ चलना ॥ ३ ॥
खेचरि मुद्रा दाटा देना महापंथ चलना ।
कुंडलनीकू ऊपर लेना महापंथ चलना ॥
सत्रावीका अमृत पीना महापंथ चलना ॥
कायासे अजरामर होना महापंथ चलना ॥ ४ ॥
सोहं नादका शंख बजाना महापंथ चलना ।
दश नादोका शद्ब खनाना महापंथ चलना ॥
भातभातका होत तनाना महापंथ चलना ।
नाद सुनाकर उन्मन होना महापंथ चलना ॥ ५ ॥
श्रीरघुनाथ गुरुका दीया महापंथ चलना ।
जोग पुरा निरंजन कीया महापंथ चलना ॥
ब्रह्मरंध्र गुंफामो सोया महापंथ चलना ।
अनादिनाथका निजपद पाया महापंथ चलना ॥ ६ ॥

पद २४

लगगइरे चोर गहरी ॥ धृ॥
गुरुनें मजकू मार बिठाया पाणी न मागन दीया ॥ १ ॥
आतमग्यानकी कठर कटारी गुरुनें मेरे छातिन मारी ॥ २ ॥
निरंजन अब नहि जीनेका मिल रह्या रुप नीराकारे ॥ ३ ॥

प्रद २५

गुरुकी अजब करामत बे । क्या कहूं उसकी शामत बे ॥ धृ ॥
आखी भीतर आखी देकर साखी नयन दिखाया ।
एक ठौरपर बैठे बैठे खलफ फिराकर लाया ॥ १ ॥
आग बुझाकर हिर देयानें साचा कीया उजला ।
कानोभी तर आवाज देकर फेरी मनकी माला ॥ २ ॥

जिभ्यासे नहि चाखा वो रस गुरुनें मुज पिलाया ।
जनम जनमकी आशा तृष्णा गर्दी बीच मिलाया ॥ ३ ॥
नहि देखे सो देखादेखी मानी झूटी माया ।
नीरंजन रघुनाथ मेहेरसे साची हिकमत पाया ॥ ४ ॥

पद २६

चलो उसी घर ज्यावे साधू चलो उसी घर जावे जी ।
एकवार जिस ठौर गये पर फेर पलट नहि आवेजी ॥ धृ ॥
शुकसनकादिक जिसी धामके हुवे है रहिवासी जी ।
बडे बडे कल्पांत गये तो बने रहे अविनाशी जी ॥ १ ॥
ग्यान आगनसे तिन देहेकी जलादेव आगपेटी जी ।
गुरु जुगतकी काठी लेकर चढो गगनपर येटी जी ॥ २ ॥
अलख भुवनके भीतर साधू तुमहम नहि कछु दूजे जी ।
उसी तखतसे देखे खलकत ब्रह्मरूप सब सूझेजी ॥ ३ ॥
जाना आना हुवे खिसाना सबही ठौर निरंजन जी ।
देवभगत सब आप बने अपअपना करते पूजन जी ॥ ४ ॥

पद २७

वोहि गुरूका चेला जिसने पिया ब्रह्मरसप्यालाजी ।
जहां देखे तहां आपबिना नहि दिनरयन उजियाला जी ॥ धृ ॥
तंत किया बिच मनका तोना निर्गुन बात पढायाजी ॥
निराधार चिद्गगनबीचमो परबिन खूप उडायाजी ।
गुरु जुगतका तसमा बांधे ग्यानलंगोटा कसकरजी ।
अहंकारका सेर मारक आलख बनाया बसकरजी ॥ २ ॥
निजध्यासका कपडा छानकर पीवे चिन्मय भंग जी ।
सहजसमाधीं अमल चढाकर सदारहे खुषरंगजी ॥ ३ ॥
भेदभावकू कधु नहि ज्याने दूजे कू नहि माने जी ।
फकत अकेला साच निरंजन आप आपकू चीने जी ॥ ४ ॥

पद २८

सुनबे अहेमक नर बात हमारी । कर हरसे यारी ॥ धृ ॥
पगडी सिरपर कैते डिरखता । नखरा बतलाना ।
मुछ्या उलटाकर बल कै देता । आखी मिचकाता ॥ १ ॥
झुटि दो दिनकी जानि दिवाणी । उतरेगा पाणी ।
अखेर होवेगी फाना फानी सबकुच धुधानी ॥ २ ॥
जमके आवेंगे दूत झडाझड । मारेंगे छेकड ।
महि मिलजावे सबकुच अक्कड । होवेगा खुक्कड ॥ ३ ॥
छोडो खटला सबघर दौलतका । हो हारपग सतका ।
कहेता निरंजन तेरे हितका । डर नहि जमदुतका ॥ ४ ॥

पद २९

साईजी धन्य हमारो भाग ॥ धृ ॥
इस नयनोसे देखे गुरुजी आज तुह्मारे पाग ॥ १ ॥
जनम जनमका पातक खोया लागी ग्यानकी आग ॥ २ ॥
जनम मरणका फेरा चुकाया नहि अबजमका लाग ॥ ३ ॥
निरंजन पद पायो अक्षई जहा नहि मनका माग ॥ ४ ॥

दद ३०

ऐसा नहि करना बे नहि करना फेरफेरकर मरना ॥ धृ ॥
हाथी घोडा किडिया होना भैसा कुत्ता चिंडिया ॥ १ ॥
ह्या दोदिन व्हां दोदिन लिय्या भवचक्कर तै हारबिन २ ॥
अच्छी नरदेह पाई जलदी करले अब भरपाई ॥ ३ ॥
रघुवरपद लपटाना बच्चा साच निरंजन होना ॥ ४ ॥

पद ३१

साइजी साच बताया राम ॥ धृ ॥
निरखत ज्याकी चिन्मय छबजब होगय पूरन काम ॥ १ ॥
अलखसे लख लाग गई अब नहि देहनाकि फाम ॥ २ ॥

आपहि राम बने सबलेकर छांड दियोरुपनाम ॥ ३ ॥
निरंजन रघुनाथ मेहरसे होरहै खूब आराम ॥ ४ ॥

पद ३२

धनदौलतके भरोसे क्या सुस्त रह्या है ।
तेरे सिरपर दिनरेणूका लखडा है ॥ धृ ॥
पलपलसे चळी उमर तेरि खबर नहि है ।
जिस घडिमो राम सुमर वोहि सही है ॥ १ ॥
नरतनुबिन औरठौर बख्त नहि है ।
साधुनकें संग भुगतनतख हाई है ॥ २ ॥
निरंजन बात कहत जलदी समजले ।
आप कौन कैसे हैं येहि उमजले ॥ ३॥

पद ३३

वाहवा गनपति सिद्धि-विनायक अजब तुमारी लीला जी ।
चिदाकाश स्व-प्रकाश तुमतो जगज्योत उजियाला जी ॥ धृ० ॥
बाजीगीर तुंबडे गुसय्या दरखत किया पैदा जी ॥
उस दर्खत के उपर खलकत फैलि उचा आधा जी ॥ १ ॥
सत्व और रजतम ये तीन्हों फांद्या बनगई जिनपर जी ॥
वेद-शास्त्र सब पात उन्होके बिषय बेल जिनपर जी ॥ २ ॥
दृष्टी बंदसे जगत् भुला है साचा दरखत देखे जी ॥
बारबार पैदास पावकर पापपुण्य फल चाखे जी ॥ ३ ॥
बिद्याधर तूं निरंजन पर बडि मेहर आब किया जी ॥
माया दरखत बिलकुल काटा आसंग खाडा पाया जी ॥ ४ ॥

पद ३४

वाहवा गुरुपिर मुरसद मौला बडा किया यहसानजी ॥
तन-मन-धन सब कदमोंपरसे करडालू कुर्बान जी ॥ धृ० ॥
बहोत दिनोंसे भूलेथे हं अपनेसे बेहाल जी ॥
सहज तुह्मारा आवाज सुनकर पाये आपना माल जी ॥ १ ॥

छोटे थे हं बडे बने अब प्यादा हूवा फर्जी जी ।
देह धारीकू ब्रह्म बनाया सुनकर मेरी अर्जी जी ॥ २ ॥
काम क्रोधकी गर्दन काटी तोडदिया कूफ रानाजी ॥
शांति क्षमाकी फौज रखी अबी अचल बिठाया ठानाजी ॥ ३ ॥
मेहेर तुह्मारी साई अखिया चढाविया ज्ञानांजन जी ॥
सब खल्कत अब देखन लागे एकहि एक गिरंजनजी ॥ ४ ॥

पद ३५.

अवधूत येहि अरज मेरीरे । दे बे परवा फकीरी ।
क्या राजा क्या परजा शाहु गरज नही है कोनशे ।
देन लेन का काज नहीं है क्या मागे अब किनसे ॥ १ ॥
ऊचा महाल बडी मठमन्या बडा महंति कुरा ।
मेरे मनकू भावत नहि है झुटा ढोंग धतूरा ॥ २ ॥
सूकी रोटी फटी लंगोटी झाडाके तल बासा ।
दौलत औरत कछुनहि चाहि सबही झूट तमाशा ॥ ३ ॥
नीरंजन मन यही फकीरी सदा फकत् मिल रहना ।
दत्त गुरू तूं दाता मेरो बारबार ये कहना ॥ ४ ॥

पद ३६.

वाहवा साई । ये दुनिया खब जमाई ॥ धृ ॥

अपहि जे रुखम दो हुव्वा । बिचमो येक बनाना छाया । सोनर बेद बखानत गवा । भातभातका किया पिलावा । सुरत छुपाई ॥ १ ॥

आपहि आप देखके भूला । नानादेह झुलत है झुला । आपसुख आप मारणेवाला । आपहि बनागुपी रचेला । रहा बताई ॥ २ ॥

आपहि चौपट आपहि सारी । आपहि खेल खिलत खिलारी । चौऱ्याशीलख फिरताफेरी । पक्की नरद घर आन उतारी । पलटन आई ॥ ३ ॥

आपहि लेकर मायाअंजन । झूटा जगदेखता रंजन । आपहि अपना करिता पूजन । सबसे अलग साच निरंजन । भेदन कोई ॥ ४ ॥

पद ३७

सबसे भली फकीरी रे । दौलत क्या करना बुरी ॥ धृ ॥
दौलत पछि सबका डरहै सदा रहे शरमिंदा ।
आखरकु दम बिकल चले जब जम मारेगा कुंदा ॥ १ ॥
एक घडी भिक आट पहर सुख्र अप अखत्यारी बंदा ।
रामनाम जपमाल चली है गुरुध्यानका धंदा ॥ २ ॥
मोठी छाटी फटी लंगोटी हातमो लकाज तुंबा ।
सूखी रोटी खाकर सोवे पाव सरकर लंबा ॥ ३ ॥
निरंजन करी फकेरी छोड देई दिलगीरी ।
अमन चमन दिनरयन बना सुख गुरुकी हिकमत न्यारी ॥ ४ ॥

पद ३८

साहेबके दरबार बीचमो अंदा धुंदी भारीरे ।
दुर्जन तो बैकुंठ चढे है संतनपर अफतारी रे ॥ धृ ॥
अजामिळ पापीका सजा हुवा मरा तब भारीरे ।
भरतसीरखे राजे उनकू तीन जनमकी फेरी रे ॥ १ ॥
गणिका दासी पार उतारी द्रोपदिकू दुखदारी रे ।
न्याय नहि इस दरबारोमे हरजीकी अखत्यारी रे ॥ २ ॥
नहीं किसीके हातमो बाजि राम करेसे होता रे ।
करम धरम फल उनके हतमो चाहे वैसा देता रे ॥ ३ ॥
बडे बडे तापसी बैठे है अबतग नहि है छुटी रे ।
निरंजन तो मगत हुवा अब माया हो यइ झूटी रे ॥ ४ ॥

पद ३९

मै तो गुरुका बंदाबे जम क्या करता रिंदा बे ॥ धृ ॥
गुरु कदम सिर छत्र बिराजे शांति बखतर पेहरा ।
सिले टोप चिन्मय है गहेरा किसका नहि दरारा ॥ १ ॥
दिल घोडेपर चढे सवारी हम तो पंचहत्यारी ।
गुरु मेहरकी ढाल बिराजे जुगत लिई हात छुरी ॥ २ ॥

आतम बोधका हतमो खांडा चिन्मय कडर कटारी ।
माया मांगिन चिले पिलेसे ग्यान सक्ति ले मारी ॥ ३ ॥
गुरुदस्त सिर चमर बिराजे बेद बखानत बंदी ।
निर्भय तखत् निरंजन पाया चढगई निजसुख धुंदी ॥ ४ ॥

पद ४०

झटपट राम सुमरले भाई ॥ धृ ॥
जरामरणके ऊच फरारे रोग फौज जलआई ।
वातपित्त कफ नौबत वाजे जमने धूम मचाई ॥ १ ॥
मातपिता और खेसकबीला सग्गे सोदर भाई ।
तेरे उपर आन बने जब साथी नही है कोई ॥ २ ॥
माया नदी पूर चला है खल्कत सबही बहाई
संतसमागम जलदी करले नरतनु नौका पाई ॥ ३ ॥
नीरंजन रघुनाथ गुरूकी अग्या खूब सुनाई ।
बारबार करनार पुकारे तुजकू राम दुहाई ॥ ४ ॥

पद ४१.

हारम दत्त गुरू गुरू कहना ॥ धृ ॥
सोधे लच्चे भडवे गाढु पास खडे नहि रहना ।
ओही आकर बात कहे तो जबाब कछु नहि देना ॥ १ ॥
दुनियाके मेदान बीचमो नेक चलनसे चलना ।
पूरा संतसमागम करकर सेवाकू नहि टलना ॥ २ ॥
नशीब बढे तो दौलत सबसे बाटबाटकर खाना ।
नहि तो भली फकीरी लेकर बहुत खुसीसे रहना ॥ ३ ॥
नीरंजन रघुनाथ पुकारे दत्तगुरू है सच्चा ।
ठौर ठौर पर वोहि भरा है खूब सबसमजले बच्चा ॥ ४ ॥

पद ४२

मेरा दत्तगुरू कैवारी । दिन दुनियाकु नहि गनते
हं करते फकत् फकीरी ॥ धृ ॥

सहज मिले वो लेकर उनमे करसे गुजरा गुजरी ॥ १ ॥
सदा खुसीसे रहते दिलमे नहि रखते दिलगीरी ।
सुखदुःख समसमान लेखे आशा तृष्णा मारी ॥ २ ॥
नही भरोसा किनका रखते किस्से नहि है यारी ।
और नही मीठा कछु लगता गुरुभगत है प्यारी ॥ ३ ॥
निरंजनरघुनाथ गुरुनें यही राहा सुमधारी ।
यही गैलसे चलते है हं बडी पकड दिलदारी ॥ ४ ॥

पद ४३

हातमो दत्तगुरुके नौकर ॥ धृ ॥
गुरुमेहरका सिले टोप सिर चिन्मय पेहरा बखतर ।
शांतिक्षमाकी ढाल बिराजे बोध फरश है खडतर ॥ १ ॥
मनघोडेकी बाग उटाई हुवे चढाईत ऊपर ।
तोडदिये दुसमान झडाझड कामक्रोध मदमत्सर ॥ २ ॥
प्रेमभगत दरोंज मुशारा पावत है अब भरपूर ।
नहि खाडा नहि नागा करते नहि रहते है बेकर ॥ ३ ॥
निरंजनरघुनाथ शिफारस हुजुर हुव्वा हाजर ।
बडी मेहर साहेबकी हंपर बिचनहि है नाजर ॥ ४ ॥

पद ४४

श्रीरामनामका माहिमा जाने वोहि और नही कोई ॥ धृ ॥

सबदेवनमो शंकर भोला पिया उठाकर बिखका प्याला । हिंमत छांड हुवा जब ढीला रामनाम तब मुखसे बोला । ब्याद मिटाई ॥ १ ॥

प्रल्हादोका बाप हटेला । कीई बेटेऊपर हला । पिलाया कहर जहरका प्याला । साहेब उनसे रखनेवाला । भूलनहि आई ॥ २ ॥

कलजुगम्याने मीराबाई । रामनामसे प्रीत लगाई । बुरा कहने लागे भाई । खिलाइ उनकू बिखकी लोई । साच बचाई ॥ ३ ॥

निरंजनरघुबिरका बेटा । उनकू बडे सापने काटा । रामनामका किया चपेटा । मंतर जंतर सबही झूटा । राम दुहाई ॥ ४ ॥

पद ४५

नरतनु ये अछी पाई समजले भाई ॥ धृ ॥

जलदी संतसमागम करना । बचन कहेसे सो दिलमो धरना । उनके चाल चलनसे चलना । हरदम सेवाकू नहि टलना । छांड बढाई ॥१॥

राम नामसे प्रीत लगाना । अच्छी मूरत मनमो लाना । भाव भगतसे खूब रिझाना । बडी कमाई ॥ २ ॥

भरपुर साहेब सब घट म्यानें । उनकू खूब तऱ्हे पैछाने । झूटा जग सच्चा नहि माने । अपनेकू दुजा मत गांने । बुरी जुदाई ॥ ३ ॥

गुरुमेहरका पेहरे अंजन । हो रहे मुक्त सदा नीरंजन । इसी तऱ्हेसें समजे निजधन । देह रह्या प्रारब्धो आधिन । करे अदाई ॥ ४ ॥

पद ४६

आपना दिल राजी करना पार उतरना ॥ धृ ॥

आपने आप बने दुसमाना मही बीच मिलावे जान । अपनी आप करी पैछान । करना अपनेपर यहसान । भव जल तरना ॥ १ ॥

आपन अपनेकू सुधराना । बूरि राहा छोडकर देना । गुरू बचनका अमृत पीना । देह छांड अजरामर होना । चिप क्या मरना ॥ २ ॥

दैवत अपने हात बनाया । भाव पकडकर पूजा कीय्या । मनकू भावे सो फल पाया । देखो कैसी हरिकी माया । जगदिवाना ॥ ३ ॥

अपने मुखडेकू सिनगारे । वैसा दर्पन बीच सुधारे । नीरंजन कहता सुन प्यारे । अपनी करणी पार उतारे । छांड भर मना ॥ ४ ॥

पद ४७

छाल छबीला मूषकवाला बनाचला मतवाला ॥ धृ ॥

शुंडादंडा प्रचंड बिराजत खंडरदन उजियाला ॥१॥

चारहस्त चौगर्द बिराजें गल मोतनकी माला ॥२॥

सिंदूरमार धुरंधर पेहरे सुंदरलालहि लाला ॥३॥

निरंजन गुन गावत हारदम रघुविरगुरुका चेला ॥४॥

पद ४८

पैठा है सब घटघट म्याने एकहि अंदरवाला रे ॥
उनकू खुबतऱ्हेसे समजे सो जोगींदर बाला रे ॥ धृ० ॥
नहि काला नहि पीला सफेद नहि लाल और नीलारे ॥
चंद्रसुरज आगन बिन उनका बनारह्या उजियालारे ॥१॥
नहि छोटा नहि मोठा उंच्या नहि लंबा और चौडारे ॥
नहि जाता नहि आता सोता नहि बैठा और ठाडा रे ॥२॥
चिदाकाश औकाश बिना खुब बना रह्या भरपूरा रे ॥
नामरूप सब उनके ऊपर झूटा जगत् पसारा रे ॥३॥
फकत् निरंजन दूजेके बिन आपहि आप बिराजे रे ॥
श्रीरघुनाथ गुरुका दिय्या बिरला ऐसा बूझे रे ॥४॥

पद ४९.

श्रीरघुविर गुरुचरण कमलपर बारबार बल जाऊ रे ॥ धृ०॥
सद्गुरुनाथकु संय्या मेरो उनके गुणगण गाऊ रे ॥
चिंताखेद दिगंतर जाकर प्रेमसुशारा पाऊं रे ॥१॥
जिनके कृपासालिसो मेरो सबहीं पातक धोया रे ॥
वचनामृत श्रवण नशे पीकर अजरामरपद पायो रे ॥२॥
जीवभावना निकस गई अब ब्रह्मभावबन आयो रे ।
दुःख दैन्य सब दूर दुरायो निजसुखसे अब धायो रे ॥ ३ ॥
नीरंजनपर गुरु कृपा खुब बनत बनत बन आई रे
आजकालकी नही तपस्या पूरबजनम कमाई रे ॥ ४ ॥

पद ५०

माया के प्रभु सबही जगत नकेश्वर । तुमहो चंद्र दिवाकर सुरनर मुनि किन्नर । यौकर अरोप तुमपर झूटी सब माया । जैशी जलके भीतर बरखन की छाया ॥ १ ॥ जै जै जि दत्तगुरु सच्चित सुखराशी । मन मे रोबल हरि तुमपर अबिनाशी ॥ धृ ॥ तुमसे बेद बखानत पारन कछुपाये । शद्बनकी गती

त्यजकर पाछेफिर आये । मन पवनकी गती नही सबसो तुम न्यारे । शुक-सनकादिक मुनिजन उनसे तुम प्यारे ॥ २ ॥ निर्गूण निर्मल निश्चल भरपूर सबमायी । भूमा अमंत बव्हि पाराबार नही । तुम हो अखंड अद्वय तुमबिन नही कोही । मयातीत निरंजन तुम रघुबिर साई ॥ ३ ॥

॥ श्रीदिगंबरार्पणमस्तु ॥

---

॥ श्रीराम ॥

# निरंजन स्वामीकृत कटिबंध.



## रघुनाथस्वामींचा कटिबंध १

महाराज रघुविरस्वामी सद्गुरु निजवदनीं गावे ॥ धृ ॥

गंगातट अतिनिकट वसुनि । बहु प्रगट नसुनि । जगीं गुप्त आसुनि । एकांतीं बसुनि । बहुकाळ घातला । ठउक नसतां मात कुणाला । वसवुनिया बहुसाल वनाला । कंटाळुनि मनिं दारधनाला । शुकसनकादिक उपमा ज्याला । अवलंबुनि बहु उपवासाला । सहजरितीं मग आटा दिसाला । कालवुनी जळीं मुष्टिपिठाला । गोडी कांहीं नसतां त्याला । प्राशन करितां मिष्टमिष्ट बहु । इष्ट म्हणुनि संतुष्ट असावें । वृक्षाचे तळिं नित्य बसावें । सांगातीर कोणीच नसावें । वैराग्यें शरिरासि कसावें । ग्रामाभीतरि कदा न यावें । शीतउष्णपर्जन्य सहावें । वेन्यासम शरिरासि पहावें । विषयभोगसौख्यासि रुसावें । सुखदुःख समसमान पहावें । संशय मनिचे समुळ खणावे । आत्मानात्म विचारित जावें । योगबळें निद्रेसि निजावें । याचिपरि वैराग्य करुनि । मनिं त्याग धरुनि । चाळिस वर्षे गेलीं सहज स्वभावें । महाराज ॥ १ ॥

मार्गी जातां सहज रितीनें । आकाशगमनीं उर्ध्वगतीनें । आत्मस्वरूप निश्चीत मतीनें । गंगेच्या परतीरास जावें । बसलें असतां असन उडावें । तोंथिल तेथें गुप्तचि व्हावें । दुसऱ्यासी बहुतेज दिसावें । क्षणामाधि काशीप्रति जावें । ऐथें तेथें सतत असावें । कचेश्वराचे संन्निध आपण । गेले असतां विप्र तयास्थळीं । अनुष्ठान करणारे होते । तयाचिया स्वप्नांतरि येऊनि । सांगतसे शिवरघुनाथ हा । ऐष असे मम त्याप्रती तुह्मी । शरण रिघुनिया अनिष्ट जाउनि । इष्ट असेल ते मागुनि घ्यावें । मग ते ब्राह्मण तशाच रितिनें ॥ शरण आलिया मनोगतासम । प्राप्त झालिया जाते झाले । त्याचिपरि दुसऱ्यानें द्विजवर । सप्तशृंगिचे देवीपासुनि । येउनिया निज सांगतसे मज । स्वप्नांतरि अंबनें येउनि ॥सांगितलें जें रघुनाथाचें । दर्शन घेतां रोग हारले ॥ तव ह्मणवुनिया चरणाचे सन्निध। येता झालों ऐसें ॥ ह्मणतां । कृपादृष्टिनें तयासि पहातां । आरोग्य होऊनि द्विजवर आपले घरास गेला । त्या उपरांतिक शितज्वर ॥ शरिरासि पातले । दर्शनासि जन येतांना कंथेत घातलें ॥ वामभागी उचलून ठेविता । कंथा मग तटतटा उडाली ॥ असो याचिपरि चमत्कार झाले । ते आतां कोठवरी वर्णावे ॥ २ ॥

भरला पुण्याचा सागर। कीर्ति झाली पृथ्वीवर ॥ धावुनि येती नारीनर। पाया पडती वारंवार ॥ ह्मणती धन्य धन्य गुरुस्वामी। अनाथ दुर्बळ पापी आह्मी ॥ भुललों भवपाशाचे भ्रमी। होऊनि विषयामाजिल कृमी ॥ झालों संसारामधि श्रमी। आह्मासि तारक व्हावें स्वामी ॥ ऐसें ह्मणोनि वारंवार। सांडुनि प्रापंचिक वेव्हार ॥ त्यजिला बहुला निःसंसार। घालुनि चरणावरुते भार ॥ ह्मणती न्यावे जी भवपार। ऐकुनिया त्याचे वचनाला ॥ तत्वबोध बहुताला केला। त्याचा भवभ्रम विलया गेला ॥ देहभाव समुळ विराला। अनुभव ते वदती अपुलाला ॥ धन्य धन्य आह्मी नीराकार। संगातित अह्मि आकाशवत ॥ सर्वांतर व्यापक असंग आद्वय ॥ अनादिज्ञप्ती असे परपार ॥ नसे आमुचे स्वरूपाचा। याचिपरी बहुतांनीं बोलुनी ॥ आत्मतत्व निजबोधें डोलुनि। स्वरुपीं तन्मय व्हावें ॥ ३ ॥

कालियूगाचे ठायीं जाण। दिधलें आत्मतत्व बहु देणें ॥ चुकलें जन्ममरण हें जेणें। नाहीं केलें येणें जाणें ॥ निराकारीं वस्तिसि पेणे। देऊनिया निज वस्तू लेणें ॥ नांदविले आपुलाले ठाईं। ऐसें देणें दिधलें पाही ॥ अभिमानाचा लेश न कांहीं। अंतर्यामीं ज्याचे नाहीं ॥ सद्‌गुरु मी ऐसेंहि कांहीं। ज्याचे अंतरीं सहसा नाहीं ॥ सर्वांलागुनि स्पष्ट वदावें। आपुलाले सदनाप्रति जावें ॥ माझे सन्निध कोणि न रहावें ॥ पाठीमागें कोणि न यावें ॥ ऐसें बोलुनिया निजभावें। शनैःशनै विपिनांतरिं जावें ॥ एकांतीं जाऊनि बसावें। निजतत्वातें मनिं गिवसावे ॥ संध्याकाळीं उठूनि यावें। गंगेभीतरि स्नान करावें ॥ ब्रह्मकर्म सारे उरकावे। सदाशिवाचे सिन्निध जावें। पिंडिवर पाणि घालावें। उभय हस्त पिंडिचे सान्निध। नेउनिया हळु मान तुकावुनि। मंजुळ शब्दें हळुहळु बोलुनि ॥ शिव शिव शिव शिव। निजवंदनानें गावें ॥ ४ ॥

कर्म अकर्मा विरहित असतां। कर्माचे स्थळीं बहूत आस्था ॥ मर्त्कांचें बहु कारण नसतां। देवाचे स्थाळिं बहुत आस्था ॥ दाउनिया जगिं लोकसंग्रहा। साठीं आपण पूजित जावें ॥ पळभरि तेथे उगीच बसावें। गंगाजळ मग मरोनि घ्यावें ॥ शतैःशनै आपण चलावें। मार्गांतरिं जन बहु सद्भावें ॥ धावुनि येति चरणासन्निध। पाया पडती ॥ कितीक स्तुतिसंवादा करिती। तापत्रय वार्तेसि वदती ॥ धोत्रपात्रद्वय हस्ताकिं असतां। ओले पडदनीं सहित त्यांचे ॥ मनोगतासम उभें असावें। झाल्यावरि मग मान तुकवुनि ॥ सहजगतीनें माठिके भीतरि। गेल्यावरि ते पाठीमागे ॥ थाट जगाचा कपाट उघडे। असतांना मग अफाट यावें ॥ तितुक्यासि बोलुनिया त्याचे। मनोगतासि निववुनिया ॥ मार्गस्थ करावें। लहानथोर समसमान

सारे ॥ श्रीमंत आलिया त्याजप्रती जें । भाषण करणें तशापरीचें ॥ अनाथ दुर्बळ येइल त्यासि । इष्ट असेल ते मिष्ट वदुनिया ॥ उभे असावें । तो बसालिया आपण बसावें ॥ ऐसी लीला कोठवरि वर्णावी सारे । दयाशांतिचे निजभांडारे ॥ फोडुनि जन निववविले सारे । इतुकें असतां कमळपत्रसम ॥ अलिप्त राहुनि । निरंजनातें नयनीं पाहुनि ॥ स्वरूपीं रमत असावें ॥ ५ ॥

## कटिबंध दत्ताचा २.

दत्तात्रया श्रीगुरुमूर्ति । निजहृदयीं संतत ध्यावी ॥ धृ ॥

चतुरानन श्रीविष्णूतनय विख्यात जनीं । त्या उदरीं प्रगटित अत्रि मुनि । जो निर्मळ निश्चळ शुद्धपणी । निज स्वधर्म अपुला तप अचरणीं । गेल्यावरि एकांत वनीं । मग त्याची पत्नी । अनुसूया मृगनयन शुभाननि । पतिव्रतेचि आदि स्वामिनि एकांति असतांना ब्रह्मा विष्णू महेश्वर तिघेजने त्या पतिव्रतेचा चमत्कार पाहुनिया तींतें प्रसन्न जाले । त्रैमूर्त्यात्मक रूप प्रगटले । श्रीदत्तात्रय नाम ठेविलें । रूपसुलक्षण बहुत चांगलें ॥ श्यामवर्ण तनु कमल नयन कमलापति तो हरि कमलासन सपितामह मानुनि अत्रिमुनिचें हृद्गत जाणुनि हस्तकमल जोडुनिया निजमाते प्रति विनवूनि वनांतरिं गेले असतां पृष्ठभागि ऋषिपुत्र लागले ऐसें पाहूनि उदकांतरि सुरसहस्र वरुषे राहुनिया मग बाहेर येतां मुनिपुत्रांतें दाखवुनि भय अपुले मनि मग होउनि निर्भय बालोन्मत्त पिशाच्चावस्था अवलंबुनिया पृथ्वीवरुते फिरति सहज स्वभावी ॥ १ ॥

तो हा श्रीधर करुणाकरु । होउनि दत्तात्रय श्रीगुरु । चिमणे लहानसे लेकरूं । माथा जटा उडति भुरुभुरु । मार्गी चालतसे तुरुतुरु । केव्हां हासत रडत घुरूघुरू । विचरे एकट वनिं निर्भरू । विपिनिं यथापरिचि बाळलिला दाउनिया ऐसि शिशु अचरति जैसी तैसी । नोळखतां अपुले शरिरासी । तन्मय होउनि चित्स्वरुपासि । चालतसे जैसा जडरासी । तापहारण वैकुंठविलासी । सेवुनिया उन्मत्तपणासी । वेड्यावाणी नग्न दिगंबर । भस्म धुलित वपु शोभत सुंदर । सेवुनिया निर्जन गिरि-कंदर । मोठे मोठे पर्वत पाहुनि त्याजमधी चालुनिया जावें । अठा पंधरा दिवसांनीं वृत्तिवीर यावें । फळमुळकंद मिळल तें खावें । पाणि फुटाणे पाणी प्यावें । निशि-दिनिं उगेचि फिरावें । कोणे समयीं बसले असतां व्याघ्रांबर घालुनिया बरवें । त्याचे वरुते अष्टअंग हटयोग करावे । स्वस्तिक गौमुख वीरासन कूर्मासन बरवे कुक्कुट उलटे कुर्मासन घालुनिया सत्वर त्याजवारि मच्छेंद्रपीठ मग पश्चम असन सिद्धासन घालुनिया बरवें त्या उपरांतिक पद्मासन सिंहासन अणखी सुषुप्ति आसन ब्रह्मासन हे आदिकरुनिया नानापरिची आसनविधि सारावी ॥ २ ॥

जो योगेश्वर मुनिसुखधाम । अचरे योगकळा निष्काम । पुरवित योगीजन मनकाम । अष्टहि कुंभक प्राणायाम । त्याचें ऐकुनि ध्यावें नाम । भेदन सूर्य आणि मुझ्याइसि तलिसितकारभ श्राइभ्रमरि मूर्च्छाकुंभक पाहीं । वृत्ति ठेवुनि स्वरुपाठाई कर्णि नादध्वनि ऐकवि गडगडगडगड मेघनाद आणि दननन दनन भेरिनाद छनछननछनन मर्दल वाजति घननन घननन घंटारव अणि खननन खननन काहाळरव सनन सननन वेणुनाद आणि भररभरर भृंगनाद आणि भंभंभंभं शंखनाद आणि चिनिनीनि चिनिनि चौंचिनिरव किनेकिनिनि किनिनिनि किंकीनिरव अदि बहुपरिचि नाद ध्वनि ऐकुनि ऐकुनिया श्रवणीं । निजस्वरुपीं मन उन्मन करुनि योगधारणा अचळसमाधि राज' योगसह बहुत कल्प अचरूनिया एसिं स्वच्छंदें वृत्तिवरि येउनि अहितविहित मन रहित करूनि जगासहित ब्रह्मरूप पहातसे गासावी ॥ ३ ॥

भक्तकाज कल्पद्रुम आगर । स्वप्रकाश जो चिद्रत्नाकर । रमत अहे अखंड महीवर । निबिड वनांतरि हिंडत असतां यदुराजनृप मृगये साठीं फिरतांना त्या नृपतीतें अवधूत पाहिले । त्याचे मन थकित राहिलें । रूप चांगलें श्यामवर्ण पाहुनिया नयनिं शिबिकेतळिं उतरुनि तयानें पदद्वयातें भाळीं वांदिले जोडुनिया कर विनवितसे मज कळले नाहीं कोण तुह्मि हे सांगा स्वामी । पूर्णपणें दिसतां निष्कामी । नांदतसा कवण्हा सुखधामी । शरणागत हा समजुनिया मि कृपा करावी ऐसें ऐकुनि त्याजप्रती अवधूत बोलती । ऐक भूपति निश्चळता सेवुनिया चित्तीं आनंदमय जे माझी वृत्ति । तुज सांगतों ते निजख्याति । निराकार मी संगातीत निःसंग रमतसे विषयभोग मज तुच्छ गमतसे । ऐसें बोलुनि नृपतीला निज नयनिं पाहुनि । कृपाकटाक्षें आत्मसुख निजप्राप्ती देउनि । पाठविला निजगांवीं ॥ ४ ॥

परब्रह्म अवतार परात्पर तो करुणाकर भूलोकीं अवतार प्रगटला धर्मसंस्थापना कराया पृथ्वीवरुते हिंडत असतां कोणे एके समयांतरिं मच्छंद्रनाथजि त्याचा शिष्या गोरक्षक या नामें असतां त्यानें झोळि भिक्षेस्तव ग्रामांत धाडिली भिक्षा घेउनि येतांना दत्तात्रयस्वामी यांनीं सोटा हाटवुनि ते खालीं पाडिली अन्न सर्व घेउनी रिकामीं फिरुनि धाडिलि याजप्रकारें तिन दिन गेल्यावारि तीचे पाठिसी गोरक्ष पातले दत्तात्रय स्वामी तें पाहुनि वदते जाले कोण असा तूं झोळी अमुची उतरुनि घेता । काय तुझें सामर्थ्य अहे तें दाखवि आतां । ऐसें वदतां त्याजप्रती अवधूत बोलता जाला जे त्वां दाखविल्यावारि दाखावेतों मी ऐसे ऐकुनि गोरक्षानी अपुली सिद्धी दाखविली ते ऐकुनि घ्यावी अकाशसंम देह गुप्तपणें वायूचा गमने उदकांतरि

आउनियां बसले ऐसें पाहुनि ततक्षणीं दत्तात्रय यांनीं दर्भसमंतक त्याचे मागे पाठविला तो जेथें जेथें जाइल तेथें पाठिसि ते दर्भसिखा हींडतसे ऐसें पाहुनिया बहु श्रमदायक शरिरासि होउनि श्रीगुरुसंनिध येता जाला । त्याजप्रती प्रत्यूत्तर वदला । माझा उपाय निर्फळ झाला । आतां अपुले सामर्थ्याला । त्वरा करुनिया दाखवि वहिला । ऐसें म्हणतां दत्तात्रय मग बोलति त्याला । जाणें येंणें बहुत कशाला । जयापरी मी वदतों तुजला । तयापरी तूं अचरे वहिला । हस्तकीं घेउनिया शस्त्राला । छेदी आत्तां माझे शरिराला । ऐसें ऐकुनि गोरक्षानें शस्त्र धरुनि श्रीगुरूतें हाणतां इकडिल तिकडे पाराचे व्हावें । शरिरासी कांहीं न लागावें । ऐसे पाहुनि शस्त्र त्यजुनि मग श्रीगुरुचरणीं मस्तका जाउनि ठेवी ॥ ५ ॥

भक्तकाज-कल्पद्रुम श्रीहरि । लीला दावितसे नानापरि । प्रतिदीनि होती जे फेरी । ऐकुनि ध्यावी भक्तचकोरीं । प्रातःसमयीं उठोनिया काशीप्रति जावें । भागीरथीचें स्नान करावें । माध्यान्हीस कोल्हापुरिं यावें । भिक्षाटन ग्रामांत करावें । पांचाळेश्वरि जाउनि खावे । शेषाचळिं मग सहज स्वभावें । जाउनिया आसन सारावें । माहुरगडि निद्रे अचरावें । दत्तात्रय दत्तात्रय नांवें । घेइल त्याचे निकट फिरावें । ध्यान करिल त्या दर्शन द्यावें । श्याम वर्णतनु निर्मळ सिरपुकमळ दळासम नेत्र विराजित । शुक नासिकसे घ्राण शुशोभित भाळविशाळ माळ गळयामधि गरुडपाच अणि निळ करित बहुकिळ फार सारल खचित शिरिं मुकुट विराजे । दीव्य प्रभाकर पाहुनि लाजे । ऐसी कांति जयाप्रति साजे । मकरकुंडलें तळपति कर्णीं । रत्नखचित पादुका चरणीं । पीतांबर शोभतसे जघनिं । उंचि दुपेटा लफ्फेदारी । झग्यावरुनि वेष्टित जरतारी । सहाभूषणें शोभति षट्करीं । मृगमद चर्चित हास्यवदन रघुनाथ प्रसादें रेवतपर्वतीं श्रीगुरु पाहुनि त्या पदकमळीं भाळ निरंजन ठेवीं ॥ ६ ॥

## कटिबंध दत्ताचा ३.

दत्तात्रय जन्मकथा हे ऐकावी चिन्मयखाणी ॥ धृ ॥ कृतायुगाचें ठाइं ब्रह्माविष्णूमहेश्वर यांच्या पत्न्या नानापरिचे अलंकार वस्त्रें लेवुनिया एके ठाइं बसल्या असतां अकस्मात मुनि नारद तेथें येते जाले भाग्य उदेलें ऐसें त्या पत्न्यांनीं बोलुनि बहुत मानसन्मान करुनिया नारदमुनिचें पूजन केलें साभिमान होउनिया त्यातें पुसत्या जाल्या अहो मुनेश्वर त्रैलोक्याचें ठाइं तुमचें फिरणे परंतु अम्हा ऐसी पतिव्रता आणि सत्वशील कोणीहि दृष्टीलागि देखिली असल तरी आह्मासि वदावें ऐसे ऐकूनि नारदमुनिनें हास्य करूनि मग बोलतसे निर्भिडपणानें

काय तुह्मी मनि गर्व धरुनिया व्यर्थ भूलला तुह्माहूनिया श्रेष्ठ आगळ्या पतिव्रता म्यां बहुत देखिल्या परंतु त्यांतिल एक सांगतो अत्रिमुनिची पत्नी जे का अनुसूया मृगनयन शुभानानि पतव्रतेची आदि स्वामिनि हंसगामिनी कीर्ति दिनमणि तिन्ही त्रिभुवनी प्रकाश अगणित विकाशलासे जया सतीचा ऐसें असतां तुह्मासि नकळे काय भूलला तुह्मा ऐशा दासी तिच्या घरीं शोभति ऐसे ऐकुनि सावित्री लक्षुमि पार्वती क्रोधयुक्त होउनीया आपुल्या घरासि जाउनि भर्त्यालागुनि वदती निष्ठुरवाणी ॥ १ ॥

अहो तुह्मी या सर्व जगाचे उत्पत्तिक्षय पाळणकर्ते समर्थ सर्वांहुनि आगळे तशाच तुमच्या पत्न्या आह्मी पातिव्रता सर्वांत श्रेष्ठ परि नारदमुनिनीं अनूसयेची किर्ति वर्णिली । काय ह्मणावे । तरि आतां तूह्मी सत्वर जावें । कैसे करावे । तया सतीचें सत्व हरावें । घरासि परतुनि लौकरि यावे । नाहीतरी मग आमुच्या नांवें । पाणी द्यावें । तुह्मी एकले सुखी असावें । ऐसें एकुनि ब्रह्मा विष्णु महेश्वर तिघे अतीत होउनि अत्रीमुनि निजतपासि गेले ऐसे पाहुनि अनुसूयेसि हाक मारिती घाई करुनीं आहा माय वृथा तूं काय बैससि पाय अमुचे बहुत पोळती तरी आतां तूं नग्नपणानें आह्मासी भीक्षा घालीं वरि वो नाहींतरि आह्मी फिरोनि जातों तुझें सत्व तें हरोनि नेतों ऐसें ऐकुनि । पतिव्रता ती मनांत भ्याली । मुखावरि बहु ग्लानी आली । धैर्य धरुनिया मग सांवरली । बाह्यवृत्ती सारि आवरली । अत्रीमुनिला स्मरती जाली । अंतरयामी शरण रिघाली । भाव धरुनि मनिं भर्ताराचे तीर्थ होतें तें । हस्तार्कि घेउनि । बाहेर येउनि । अतिथिलागीं नयनीं पाहुनि । बहूत धाली । पूर्ण निवाली । ऐसे पाहुनि । तिघा जणासी पालखी घालुनि । हालवुनि गाती गाणीं ॥ २ ॥

ब्रह्मकर्म सारे उरकुनिया । अत्रिमुनि निजघरासि आले । त्रै कुमरांतें नयनिं पाहिलें । आपुल्या मनिं मग विस्मित जाले । असो याजवरि बहूत-काळ गेल्यावरि इकडे स्वर्गलोकिच्या ठाई त्रैदेवाच्या भार्या विस्मित होउनि चिंता करिती काय करावें कसें करावें । कोणीकडेस उठोनि जावें । स्वामीवार्ता न पडे ठावें । कोठें आहेत ह्मणवुनि पहावें । कोणावरुते आतां रुसावें । घात घेतली आमच्या दैवें । कवणालागीं अतां पुसावें । ऐसें ह्मणतां सहज स्वभावें । नारद-मुनिचें येणें जालें । सर्वांनीं तें नयनिं पाहिलें । अहो नारदा यावें यावें । आमुचें निजगुज ऐकुनि घ्यावें । हितकारक तें सांगुनि द्यावें । पती आमुचे कोठें तुह्मी । नयनिं पाहिले असतिल तरि ते सांगुनि द्यावें ऐसें ऐकुनि नारदमुनि मग वदते

जाले । अनुसुयेच्या घरीं पाहिले । तिघेजणे ते बाळे जाले । तथासि तीर्शी शरण रिघुनि या मागुनि घ्यावे ऐसें ह्मणतां तिघीजणी त्या अनुसूयेच्या घरासि जाउनि शरण रिघाल्या निराभिमानें वदता झाल्या माय आमुचे पति आह्मासी द्यावे ऐसें ऐकुनिया मग पतिव्रतेनें तीर्थ शिंपिलें तिघेजणे पहिल्यासम केले ब्रम्हा-हरिहर प्रसन्न जाले । देउनिया वर घरासि गेले । इकडे त्रैअवतार प्रगटले । चंद्र आणि दुर्वास मुनीवर । तिसरा श्रीदत्तात्रय प्रभुवर । त्रैलोक्यामधि ज्याची कीर्ति । ऐकुनिया सुर धाउनि येती । करोनिया नीरंजन आरति । वृष्टी करिति सुमनीं ॥ ३ ॥

## कटिबंध शिवाचा ४

पार्वतिला शिवसांबानें । लेवविलें चिन्मय लेणें ॥ धृ ॥

कोणीएके समयांतरि श्रीशंभुपार्वति नंदीरुढ होउनिया आपण कैलासाहुनि विष्णुभुवन बहुरम्य सुलक्षण वैकुंठाप्रति जाते झाले । तया स्थळीं बहुदेव मिळाले । अळंकारभूषणें चांगले । अंगावरि घालुनिया वहिले । इंद्रचंद्र ब्रह्मादिक आले । श्रीधरवर वेष्टुनीया ठेले । तशाच त्यांच्या पत्न्यांनीं निज । अंगावरुते अळंकार बहु नानापरिचे । लेवुनिया वस्त्रें भरजरिचे । वैभव जें अपुलाल्या घरिंचे । होते ते अंगावरि घालुनि । परस्परेसी थाट दाविति । घाट परोपरि अचाट नग बहु । दाट हेम चकचकाट जडितें । रत्नखचित मोत्याचे सुंदर घोस लोंबति । तेणेंशी बहु कांति शोभती । असो ययापरि सभा दाटली इतुक्यामधि पार्व-तिस घेउनिया आपण श्रीगंगाधर येते जाले । सर्वांनीं ते नयनिं पाहिले । भाग्य उदेलें म्हणूनिया सुर उभे राहिले । जयजयकारे वदते जाले । सर्वांनिं प्रणिपात घातले । उच्चस्थानीं पूजन केले । ययापरीचे अंबीकेसी । निज राणिवसामधि नेउनिया हळु नम्रपणानें बहुत मान सन्मान करुनिया बोलत लक्ष्मी अहो माय ममभाग्य उदेले काय म्हणुनि तव पाय अजी हा ठाय स्पर्शिति ऐसें बोलुनि सर्व स्त्रीया मग नमिती अधोवदने ॥ १ ॥

पाहुनि लक्ष्मीचें वैभव । वस्त्रेंभूषणें घवघव । सुंदर शोभतसे माधव । तैसे ब्रम्हादिकहि देव । दाविति संपत्तीचा गौरव । पाहुनि तल्लिन जाला जीव । गौरिअंतरी उठली हाव । मनांत बोलुनिया शिवाशिव । म्हणे माझें कैसें दैव । धिग्धिग प्रारब्धा कटकटा । कैसा म्यां उचलीला वांटा । नाहीं नाकीं पुरता काटा । उगाचि थोरपणाचा ताठा । भर्ता माझा फार करंटा । काळया माळावरी लंगोटा । जैसा पिंपळ उघडा थोटा । आपले ठायीं म्हणतो मोठा । पुरतें अन्न मिळेना

पोटा । पीतो भांगीचा बहु घोटा । माला वस्त्राचाही तोटा । वितभर नेसतसे लंगोटा । नाही मुगुट बरा गोमटा । म्हणवूनि वाढविल्या जटा । वाइट दिसताति पिंगटा । केशर नमिळेचि मळवटा । ह्मणवुनि लावी धुळिचा पट्टा । त्याला अलंकार वोखटा । कंठी सर्प करिती चटचटा । रुंड वाजतातीं खटखटा । ऐसा पती माझा भिकारी । बरवा न दिसेचि घरींदारीं । ऐशाचीया कफल्लकाची ॥ कांता मीहि कफल्लकाकी । एसी आपुल्या मनांत घोकी ॥ तया काळिं मग अकस्मात ती । सभा विसर्जन होऊनीया ॥ सुर उठोनि गेले । गौरीशंकर घरासि आले । सदाशिव गौरीतें पुसती म्लानवदन तव दीसतसे मज कोण तुला निष्ठुर बोलले सांगे वो मृगनयने ॥ २ ॥

गौरी बोले धरुनि फुगारा अहो शंकरा । पूर्ण उदारा । दया सागरा । तुमची दारा असतांना मज कोण उणें बोलेल हो वचनें परि अंतरिं एक वसतसे अळंकार बहु सोनें ल्यावे । अखंडित घरिं भाग्य असावें । जगामधि बहु मान्य दिसावें । ऐसें ऐकुनि सदाशिवानीं जटेंतुनिया केश काढिला । अंबेच्या हस्तावरि दिधला म्हणे सत्वरि जाउनिया हा केश देवोनि ययाबरोबरि सोनें घेउनि अळंका फार करावे ऐसें ऐकुनि साशंकित होउनिया अंबा निघती जाली विरंचीच्या सदनाप्रती गेली सरस्वतीतें बोलतसे हा केश घेउनि याजभार मज सोनें देणें । ऐसे ऐकुनि तयासि तीनें होती जाली ते ऊदार । अंतरिं सेवुनि अहंकार । सोनें देते भारोभार । म्हणवुनि तुळितां अलंकार । जाला केशाचा बहुभार । शेवटिं रत्नाचें भांडार । वजनीं घातला संसार । परि तो केशचि जाला फार । होउनि गर्वाचा परिहार । जाला वीरंची बेजार । शेवटिं केला नमस्कार । अंबे दारिद्री मी फार । माझा केतुला बंडीवार । आपण सुरपती सदना जाणें ॥ ३ ॥

पाहुनि इंद्रभुवन परिकर । जाती जाली ते सुंदर । आडवा पातला शचिवर । विनवि जोडुनिया दोनी कर । जैसा द्वारीचा किंकर । विनवुनि बोले वारंवार । ह्मणे माय तुज काय अपेक्षित ऐसें ऐकुनि बोलत अंबा केशभार मज सोनें देणें असे तयानें ब्रह्मदेवसम सर्व संपति तुळिलि परंतु सदाशिवाच्या केशभार ते नाहीं भरली । सर्वेचि तेथुनि गिरजा फिरली । वैकुंठाप्रति जाती जाली । लक्षुमिनें पाहुनिया वहिली । बहुप्रकारें पूजा केली । आगतस्वागत पुसूं लागली । तंव अंबेनें वृत्तांत आपुला । सांगतांचि मग तुळा करुनिया लक्ष्मी आपुले अलंकार घालिती ऐसें ऐकुनिया भगवंत पातले ह्मणती गे तूं काय

करिसि हे ऐक तुला मी स्पष्ट सांगतों पार्वतीश जगदीश केश नव्हे हा वेषधारि मज होय गमत जो सर्व क्षितिदश देश मस्तकिं लेश मानितां द्वेषरहित तव मेषगर्वमद क्लेश हारितां गौरिआश्रय करुनिया सामर्थ्य दावितो वजन कराया तया बरोबरि आणी सर्वहि सोनें ॥ ४ ॥

जडाव लक्ष्मीचे पुष्कळ । वजनी घालितां सकळ । केशहि न उचले एकहि तिळ । झाडुनि घर केलें सोज्वळ । भांडें सोन्याचे तुंबळ । वस्त्रें भरजरीचे केवळ । घालुनि उचलूं बोलें बळ तव तो जाग्याहूनि नढळ । पाहुनि रमा करि हळहळ । चिंता लागली तळमळ । हरला गर्व तिचा तात्काळ । नयनीं पाहुनिया भगवंत । त्याप्रति बोले सेवुनि खंत । आतां कैचा पाहतां अंत । कुबेर भांडारी धनवंत । त्याजप्रती बोलावुनि आतां । पुर्ती करावी ऐसें ऐकूनि कुबेरधन मग नवानिधीचा भार घातला । परंतु त्या शिवशंभुजटेचा केश हलेना ऐसें पाहुनि सर्वांनीं मग पार्वतीस प्राणिपात घातले । स्तुतिस्तवन बहु करिते जाले । धन्य तुझा भर्तार सदाशिव पुण्यशील सर्वांत आगळा ॥ कीर्ती तयाची काय वदावी ॥ अखंड वैराग्य ते सेवी ॥ संपाती त्याला कशास व्हावी । माया हे मृगजळवत भावी । आत्मसुखीं मन अक्षयिं ठेवि । त्याची किर्ती मजला ठावी । जाय माय धरि पाय तयाचे । काय तुझ्या मनिं हायहाय ॥ हे सुवर्ण इच्छा व्यर्थ उदेली । ऐसें ऐकुनि गौरी मग कैलासा गेली । सदाशिवातें शरण रिघाली । अधोवदन पाहुनिया खालीं । नम्रपणें मग वदति जालि । आजि समशा माझी पुरली । क्षमा करावि शरणागत मि जाणुनिया शिव निर्भवर मज देणें ॥ ५ ॥

दीनवदन गौरीतें पाहुनि । बोलतसे शिव हास्य करुनिया विलंब होउनि येणें जालें । कीतीक वजनी सोनें आणिलें । बरे बरे पार्वति तुवां तरि वस्ता घडल्या दारिद्री बहु असा भिकारी पडलोंसे मी तुझ्या पदरीं । भाग्यवान पित्याची कुमरी । असतांना त्वा काय म्हणुनि मजलागीं वरिलें । तुझें मनोरथ नाहीं पुरलें । ऐसें ह्मणतां भय भित होउनिया गौरी । विनावितसे स्वामि त्रिपुरारि । अज्ञानी मी अनाधिकारि । तुमच्या स्वरुपा नेणुनिया मी उगिच भ्रमले । सर्वपरि जाउनिया श्रमले । ऐसें ऐकुनि सदाशीव मग प्रसन्न जाले । नि जगुज अपुलें समूळ वदले । ऐक पार्वति चिदाकाश स्वप्रकाश जे अविनाश अखंडित तोचि स्वये तू पूर्णपणे चित्सूवर्ण होउनि जगनग पाहि आपुले ठाइ तूचि तूचि तूं होउनि राही । शोकमोह मग तुजला नाहीं । तरिसि या भवसागर डोहिं ।

असो ययापरि पूर्णबोध ऐकुनिया श्रवणे । मनन करुनिया शुद्धबुद्धिने । आत्मा लक्षुनि चरमवृत्तिनें । निदिध्यास करतांना ऐसा आत्मस्वरुप निजअंगे होउनि । निरंजनाच्या ठायीं राहूनि । डोले ब्रम्हसुखानें ॥ ६ ॥

॥ श्रीदिगंबरार्पणमस्तु ॥

# परिशिष्ट १ लें.

# श्री ज्ञानेश्वर-विरचित

# अनुभवामृत

## प्रकरण १ लें.

यदक्षरमनाख्येयमानंदमजमव्ययं ।
श्रीमन्निवृत्तिनाथेति ख्यातं दैवतमाश्रये ॥ १ ॥
गुरुरित्याख्यया लोके साक्षाद्विद्याहि शांकरी ।
जयत्याज्ञा नमस्तस्यै दयार्द्रायै निरंतरम् ॥ २ ॥
सार्धं केनच कस्यार्धं शिवयोः समरूपिणोः ।
ज्ञातुं न शक्यते लग्नमिति द्वैतच्छलान्मुहुः ॥ ३ ॥
अद्वैतमात्मनस्तत्वं दर्शयन्तौ मिथस्तराम् ।
तौ वंदे जगतामाद्यौ तयोस्तत्वाभिपत्तये ॥ ४ ॥
मूलायाग्राय मध्याय मूलमध्याग्रमूर्तये ।
क्षीणाग्रमूलमध्याय नमः पूर्णाय शंभवे ॥ ५ ॥

ऐसि जे निरुपाधिके। जगाचि जिये जनके। वंदिलि मिया मूळिके। देवोदेवी ॥ १ ॥ जो प्रियूचि प्राणेश्वरि। उलथे आवडिचिये सरोभरि। चारुस्थळि एकाहारि। एकांगाचि ॥ २ ॥ आवडिचेनि वेगे। एकमेका गिळिति अंगे। कीं द्वैताचेनि उपांगे। उगळित आहाति ॥ ३ ॥ एक नव्हति एकसरे। दोघा दोनपण नाहि पुरे। कायि नेणो साकारे। स्वरुपे जिये ॥ ४ ॥ कैसि स्वसुखाचि अळुकि। जे दोनपण मिळोनि एकि। नेंदितीच कवतुकि। एकपण फुटो ॥ ५ ॥ हा ठाववरि वियोगभेडे। जे बाळ जगा यव्हडे। वियालि परि न मोडे। दोघुलेपण ॥६॥ आपले अंगि संसारा। देखिलिये या चराचरा। परि नेदितीच तिसरा। झोक लागो ॥ ७ ॥ कैसा मेळु आला गोडिये। जे दोघे न माति जगि इये। परमाणुमाजिहि उवाये। मांडलि आहाति ॥ ८ ॥ जिहि एक एकेविण। न किजे तृणाचेहि निर्माण। जिये दोघे जीवप्राण। जया दोघा ॥ ९ ॥ जया एक सत्तेचे वसणें। दोघा एका प्रकाशाचे लेणे। जे अनादि एकपणे। नांदति दोघे ॥ १० ॥ भेदे लाजोनि

आवडि । एक रसि देति बुडि । तो भोगणे थाव कादि । द्वैताचा जेथे ॥ ११ जेणे देवे संपूर्ण देवि । जिये वीण कांहि ना तो गोसांवि । किंबहुना एकोपजीवि । एक एकाचि ॥ १२ ॥ घरवाते मोटकि दोघे । जै गोसावि सेजे रिघे । तै दंपत्यपणे जागे । स्वामिनि जे ॥ १३ ॥ दोहो अंगाचि आटणि । गिवसित आहाति एकपाणि । जालि भेदाचिया वाहाणि । अधाधी जे ॥ १४ ॥ विषई येकमेकाचि जिये । येकमेकाचि विषये । जिये दोघे सुखिये । जिया दोघा ॥ १५ ॥ स्त्री-पुरुष-नाम-भेदे । एकले शिवपण नांदे । जग सगळे अधाधे- । पणे जिहि ॥ १६ ॥ दो दांडि एक श्रुति । दो फुलि एक दृति । दो दिवि दिप्ति । एकचि जेवि ॥ १७ ॥ दो होटि एक गोठि । दो डोळा एक दिठि । तेवि दोघिये सृष्टि । समस्त हे ॥ १८ ॥ दाउनि दोनपण । एकरसाचे आरोगण । करिताहेत मेहुण । अनादि जे ॥ १९ ॥ जे स्वामिचिये सत्ता- । वीण असो नेणे पतिव्रता । जीयेवीण सर्वकर्ता । कांहि ना जो ॥ २० ॥ जे कि भाताराचे दिसणे । भातारुचि जियेचे आसणे । नेणिजति दोघे जणे । निवडु जिये ॥ २१ ॥ गोडि आणि गुळु । कापूर आणि परिमळु । निवडिता होय पांगुळु । निवाडुचि ॥ २२ ॥ समग्र दीप्ति घेता । जेवि दीपुचि ये हाता । तेवि जे नित्धारिता । शिवुचि लाभे ॥ २३ ॥ जैसि सूर्य मिरवि प्रभा । प्रभे सूर्यत्वाचा गाभा । तेविं भेद गिळीत शोभा । एकाचि जे ॥ २४ ॥ कि बिंब प्रतिबिंबा द्योतक । प्रतिबिंब बिंबा अनुमापक । तैसे द्वैतमिषे एक । वर्तत असे ॥ २५ ॥ सर्व शुन्याचा निष्कर्षु । जिया वाइला केला पुरुषु । जिये दादुलेनि सत्ताविशेषु । शक्तिचा जाला ॥ २६ ॥ जिये प्राणेश्वरिवीण । शिविहि शिवपण । थारो न शके ते अपण । शिवे घडिलि ॥ २७ ॥ ऐश्वर्येसि ईश्वरा । जियेचे अंग संसारा । आपलाहि उभारा । आपणाचि जे ॥ २८ ॥ पातिचेनि आरूपपणे । लाजोनि अंगाचे मिरवणे । केले जगा यव्हडे लेणे । नामरूपाचे ॥ २९ ॥ ऐक्याच्या दुकाळा । बहुपणाचा सोहळा । जिया सदैवेचिया लिळा । दाखविला ॥ ३० ॥ अंगाचिया आटणिया । कांतु उवाया आणिला जिया । स्वसंकोचे प्रिया । रुढाविलि जेणे ॥ ३१ ॥ जियेते पहावयाच्या लोभा । चढे दृष्टृत्वाचिया क्षोभा । जियेते न देखत उभा । अंगचि सांडि ॥ ३२ ॥ कांतेचिया भिडा । अवगला होय दृश्यायेव्हडा । अंगविला उघडा । जियेविण ॥ ३३ ॥ हा ठाववारि मंदरूपे । जो उवाइलेपणे हारपे । तो जाला

येणे पडपे । विश्वरूप ॥ ३४ ॥ जिया चेवविला शिउ । वेद्याचे वोणे बहु । वाढितेनसि जेउ । जेउनि धाला ॥ ३५ ॥ तया दोघामाजि येखादे । विपाये उमजले होय निदे । तरि घरवात गिळोनि नुसधे । कांहि ना कारे ॥ ३६ ॥ निदेलेने भातारे । जे वियालि चराचरे । जियेचा विसवला नुरे । आपलेपणाहि ॥ ३७ ॥ जव कांत लपु बैसे । तवं नेणिजे जिचा दोषे । जिये दोघे अनारिसे । जिया दोघा ॥ ३८ ॥ जियेचेनि अंगलगे । आनंद आपणा आरोगु लागे । सर्वभोक्ता परि नेघे । जियेविण कांहि ॥ ३९ ॥ किंबहुना जिये । प्रणवाक्षरि विरुढतिये । दशेन्चि हे वैरिये । शिवशक्ति ॥ ४० ॥ जया प्रियेचे जे अंग । जो प्रिय जियेचे चांग । कालउनि दोन्हि भाग । जेवीत आहाति ॥ ४१ ॥ जैसि समीरासगट गति । किं सोनयासगट कांति । तैसि शिवेसि शक्ति । अवघीच जे ॥ ४२ ॥ कां कस्तुरिसगट परिमळु । उष्णतेसहीत अनळु । तैसा शक्तिसि केवळु । शिवचि जो ॥ ४३ ॥ राति आणि दिवो । पातलिया सूर्यठावो । तैसि आपुले साचि वावो । दोघे जिये ॥ ४४ ॥ हे असो नामरूपाचा भेसिरा । गिळित एकार्थाचा उजिरा । नमो तया शिववोहरा । ज्ञानदेवो ह्मणे ॥ ४५ ॥ जयाचे आलिंगनि । विरोनि गेलि दोन्हि । आवघियाचि रजनि । दिठीचि जे ॥ ४६ ॥ जयाचा रूपनिर्द्धारि । गिळित परेसि वैखरि । सिंधुसि प्रळयनीरि । गंगा जैसि ॥ ४७ ॥ किं वायो चळवळेसि । जिराला व्योमाचे कुसि । किं आटला प्रयळ प्रकाशि । सप्रभ भानू ॥ ४८ ॥ तेवि निहाळिता जयाते । गेले पाहाणेसि पाहाते । पूढति तिये घरवाते । वंदिलि मिया ॥ ४९ ॥ जयाचिये अवाहनि । वेदक-वेद्याचे पाणि । न विये परि सांडणी । अंगाचिच करि ॥ ५० ॥ तेथे मि नमस्कारा । लागि उरु जै दुसरा । तै लिंगभेदि परा । जोडु जावें ॥ ५१ ॥ परि सोनेनासि दुजे । नव्हतु लेणे सोनया भजे । हे नमन करणे माझे । तैसे आहे ॥ ५२ ॥ सिंधु आणि गंगे मीळणि । त्रिपुरुपनामाचि मिरवाणि । दिसे तरि काय पाणि । द्वैत होईल ॥ ५३ ॥ सांगता वाचेते वाच्या । ठाव वाच्यवाचकाचा । पढता काय भेदाचा । विटाळ होय ? ॥ ५४ ॥ पाहे पा भास्यभासकता । आपुले ठाई दाविता । काय एकपणे सविता । मोडत असे ॥ ५५ ॥ मात्रान्निया त्रिपुटिया । प्रणव केला चिरटिया । किं 'ण'कार ती रेघटया । भेदवला ॥ ५६ ॥ चांदाचिये दोंदावारि । होत चांदणियाचि विखुरि । कां येउनि दीप्तिवारि । गिवसे दिपु ॥ ५७ ॥ मोतियाचि कीळ । होय मोतियावारि पांगुळ ।

आगळे ते निर्मळ । रूपा ये की ॥ ५८ ॥ अहो ऐक्याचें मुद्दल न ढळे । आणि साजिरेपणाचा लाभु मिळे । तरि स्वतरंगाचि मुकुले । तुरंबु कां पाणि ? ॥ ५९ ॥ म्हणोनि भूतेश–भवानि । वंद्यत्वे न करोनि सिनानि । मी रिघालो नमनि । ते हे ऐसे ॥ ६० ॥ जैसे दर्पणाचेनि त्यागे । प्रतिबिंब बिंबि रिघे । कां बुडि देइजे तरंगे । वायुच्या ठेल्या ॥ ६१ ॥ नातरि नदि जातखेवो । पावे आपला आपण ठावो । तैसा बुद्धित्यागे देविदेवो । वदिलि मिया ॥ ६२ ॥ सांडुनि मीठपणाचा लोभु । मिठे सिंधुचा घेतला लाभु । तैसा अहं देउनि मि शंभु । शांभवी जालो ॥ ६३ ॥ शिवशक्ति-समावेशे । म्या नमन केले ऐसे । रंभागर्भ आकाशे । रिघाला जैसा ॥ ६४ ॥ इतिश्री अनुभवामृते प्रकृतिपुरुषवर्णनं नाम प्रथम प्रकरणम् ।

---

## प्रकरण २ रें.

आता उपायवनवसंतु । जो अज्ञेचा अहेवतंतु । अमुर्तचि मूर्तु । कारुंण्याचा ॥ १ ॥ मोडोनि माया-कुंजरु । मुक्त-मोतियाचा वोगरु । जेवावेता श्रीगुरु । निवृत्ति वंदु ॥ २ ॥ अविद्येचे आटवे । भुंजित जीवपणाचे भवे । तया चैतन्याचिये धावें । धावेकरु जो ॥ ३ ॥ जयाचेनि अपांग-पाते । बंध मोक्षपणियाते । भेटे जाणतया जाणते । जयापासि ॥ ४ ॥ कैवल्य-कनकाचिया दाना । न कडसि थोरसाना । द्रष्टयाचिया दर्शना । पाहाडाउ जो ॥ ५ ॥ सामर्थ्याचेनि बिके । शिवाचेहि गुरुत्व जिंके । आत्मा आत्ममुख देखे । आरसा जिये ॥ ६ ॥ बोधचंद्राचिया कळा । विखुरलिया एकवळा । कृपापुणिव लीळा । करि जयाचि । ॥ ७ ॥ जो भेटलिया सर्वे । पुरति उपायाचे धावें । प्रवृत्ति-गंगा स्थिरावे । सागरि जिये ॥ ८ ॥ जयाचिये अनवसरे । द्रष्टा ले दृश्याचे मोहिरे । जो भेटतखेवो सरे । बहुरूप हे ॥ ९ ॥ अविद्येचे काळवखे । स्वबोध सुदीन फांके । सिवतिलेनि प्रसाद-अर्के । जयाचेनि ॥ १० ॥ जयाचेनि कृपालालिले । जीव हा टावविर पाखाळे । जे शिवपणहि वोवळे । आंगि न लावि ॥ ११ ॥ राखो जाता शिष्याते । गुरुपण धाडिले थिते । तरि गुरु-गौरव तयाते । सांडिचि ना ॥ १२ ॥ एकपण नव्हे सुसास । ह्मणोनि शिष्याचे करोनि मिष । पाहाणेचि आपलि वास । पाहतसे ॥ १३ जयाचे कृपातुषारे । परतले अविद्येचे महुरे । परिनमले अपारे । बोधामृते ॥ १४ ॥ वेद्या देता मिठि । वेदकत्व सुवोनि पोटि । तरि नव्हेचि

उरिटि । दिठि जयाचि ॥ १५ ॥ जयाचेनि सावाये । जीव ब्रह्म उपरि लाहे । ब्रह्म तृणतळि जाय । उदासे जेणे ॥ १६ ॥ उपास्तिवरि राबतया । उपाय फळे येति मोडुनिया । बन चळे जयाचिया । अनुज्ञा कां ॥ १७ ॥ जयाचा दिठिवा वसंतु । न रिघे निगमवना आंतु । तव आपुलिया फळा हातु । न घापति ॥ १८ ॥ पुढे दिठिचेनि अलगे । खांचि कि निवटि मागे । येव्हडिया जैता नेघे । आपणपे जो ॥ १९ ॥ लघुत्वाचिया मुद्‌ले । बैसला गुरुत्वाचिये सेले । नासोनिया नाथिले । सदेव जो ॥ २० ॥ नाही त्या जाळि बुडिजे। तेथे घनवटे येणे तरिजे । जेणे तरलियाहि नुरिजे । कवाणिये ठांई ॥ २१ ॥ जेथे आकाश हे सावेव । न बांधे अवकाशाचि हाव । ऐसे कोणि एक भरीव । आकाश जे ॥ २ ॥ चंद्रादि सुशीतळे । घडिले जयाचेनि मेळे । सूर्य जयाचे उजळे । कड-वसेनि ॥ २३ ॥ जीवपणाचेनि त्रासे । यावया आपुले दशे । शिवहि मुहुर्त पुसे । जया जोसिया ॥ २४ ॥ चांदनें स्वप्रकाशाचे । लेइला द्वैत - दुणिचे । तरि उघडेपण न वचे । चंद्राचे जया ॥ २५ ॥ जो उघड कि न दिसे । प्रकाश परि न प्रकाशे । असतेपणेचि नसे । कवणिकडे ॥ २६ ॥ शब्दाचि लिहि पुसे । तेव्हा तेणेसि चावळे बैसे । दुजियाचा रागि रुसे । एकपणाहि हा ॥ २७ ॥ कांहीबाहि अळु-माळ । देखे जव येखादे वेळ । तव देखतेहि टवाळ । जया गांवि ॥ २८ ॥ आता जो तो इहि शाद्वि । के मेळउ अनुमानाचि मांदि । हा प्रमाणाहि वो नेदी । कवणाहि मा ! ॥ २९ ॥ प्रमाणाचि परिसरे । तै प्रमेय आविष्करे । नवल मेचु धुरे । कांहि-नापणाचि ॥ ३० ॥ तेथें नमने कां बोले । केउति सुउ पाउले । आंगि लाउनि नाडिले । नाम येणे ॥ ३१ ॥ नाहि आत्मया आत्म-प्रवृत्ति । वाढ-विता के निवृत्ति । परि या नामाचि वाय बुंथि । सांडिचिना ॥ ३२ ॥ निवर्त्य तव नाहि । मा निवर्तवि हा काई । तरि कैसा बैसे ठांई । निवृत्तिनामाचा ॥ ३३ ॥ सूर्यासि अंधकारु । कै जाला होता गोचरु । परि तमारि हा डगरु । आलाचि कीं ! ॥ ३४ ॥ लटिके येणे रूढे । जड येणे उाजियेडे । न घडतेहि घडे । याचिया भावा ॥ ३५ ॥ हांगा मायावसे दाविसि । आणि माईक म्हणोनि वाळीसि । अमा-इक तवं नव्हसि । कोणा विषो! ॥ ३६ ॥ शिव शिव सद्‌गुरु । तुजला गूढा काय करु । एकाहि निर्धारा धरु । देतासि कां ॥ ३७ ॥ नामरूपे बहुवसे । पुढा उभारुनि पाडिलि वोस । सत्तेचेनि अवेशे । तोषलासि ॥ ३८ ॥ जीव घेतलियावीण । चाळु नेणसी साजन । मृत्यु नुरे, स्वामिपण । तेंहि नव्हे ॥ ३९ ॥ विशेषाचेनि नावें । आत्मत्व तेहि न साहवे । किंबहुना न व्हावें । कांहीच यया ॥ ४० ॥ रात्रि

नुरेचि सूर्या । नुरे लवण पाणिया । नुरेचि चेइलिया । नीद जैसि ॥४१॥ कापुराचि थळीव । नुरवि आगीचि बरव । नुरेचि रूप-नाव । तैसे यया ॥ ४२ ॥ याचिया हाता पाया पडे । तव वंद्यत्वे पुढा न मंडे । न पडेचि हा भिडे । भेदाचिये ॥ ४३ ॥ आपणाप्रति रवी । उदयो न करि जेवि । हा वंद्य नव्हेचि तेवि वंदिताहि ॥ ४४ ॥ कां समोरपण आपले । न लाहिजे कांहि केले । तैसे वंद्यत्व घेतले । हारोनि येणे ॥ ४५ ॥ आकाशाचा अरिसा । नुठे प्रतिबिंबाचा ठगा । हा वंद्य नव्हे तैसा । नमस्कारा ॥ ४६ ॥ हा नव्हे तरि न हो । हे वेखासे कां घेवो । परि वंदितयाहि ठावो । उरोचि नेदि! ॥ ४७ ॥ अंगोनि एक ना झोळु । फेडिता तो बाहेरिलु । कट फिटे आंतिलु । न फेडिताचि ॥ ४८ ॥ ना ना बिंबपणासरिसे । घेउनि प्रसिबिंब नासे । नेले वंद्यत्व येणे तैसे । वंदितेनसि ॥ ४९ ॥ नाहि रूपाचि जेथे सोय । तेथे दिठिचे काय आहे । आह्मा फळले पाय । ऐसि दशा ॥ ५० ॥ गुणा-तेलाच्या सोइरिका । निर्वाहिलि दीपकळिका । ते काय होईल पोळिका । कापुराचा ॥ ५१ ॥ तया दोघा परस्परे । होइना जव मेळिरे । तंव दोहिचेहि सरे । सरिसोचि ॥ ५२ ॥ तेवि वंदिना मी ययाते । तव गेले वंद्य वंदिते । चेइलिया कांते । स्वप्निचे जेवी ॥ ५३ ॥ किंबहुना यया भाखा । अद्वैताचा उफखा । फेडोनिया स्वसखा । श्रीगुरु वंदिला ॥ ५४ ॥ याचा सख्यत्वाचि नवाई । आंगि येकपणाहि ठाव नाहि । किं गुरु-शिष्य-दुवाई । पवाडु केला ॥ ५५ ॥ कैसा आपणा आपण । दोविण सोइरेपण । हा याहूनि विलक्षण । नाहि ना नोव्हे ॥ ५६ ॥ जग अवघे पोटि माये । गगनायेव्हडा होउन ठाये । कि ते नीस न साहे । नाहिपणाचि ॥ ५७ ॥ कां पूर्णते तरि अधार । सिंधु जैसा दुर्भर । तैसा विरुद्धा पाहुणेर । ययाचे॰ घरि ॥ ५८ ॥ तेजा तमा कांहि । परस्परे निके नाहि । परि सूर्याचे ठांई । सूर्यचि होति ॥५९॥ एक ह्मणता भेदे । तो कि नानात्वे नांदे । विरुद्धे आपणा विरुद्धे । होति काई ! ॥ ६० ॥ म्हणोनि शिष्य-गुरुनाथ । या दो शब्दाचा अर्थ । श्रीगुरुचि होत । दो ठांई ॥६१॥ सुवर्ण आणि लेणे । वसे एके सुवर्णे । कां चंद्र आणि चांदणे । चंद्रि जेवि ॥६२॥ कापुर आणि परिमळु । कापुराचि केवळु । गोडि आणि गुळु । गुळचि तो ॥६३॥ तैसा गुरु-शिष्य-मिषे । हाचि एकला उल्हासे । जरि कांहि दिसे । दोनपणे ॥ ६४ ॥ मुख असे मुखि । आरसा दिसे उखि । हे आपलि वोळाखि । जाणे मुख ॥ ६५ ॥ पाहा पा निरंजनि निदेला । तो निर्विवाद एकला । परि चेता चेववीता जाला । दोन्हि तोचि ॥ ६६ ॥ जे तो चेता चेववी । तेवि हा बुझे बुझावि । गुरु-शिष्य त्व नांदवि । ऐसेनि हा ॥ ६७ ॥

दर्पणेषणि डोळा । आपले भेटिचा सोहळा । भोगिता तरि लीळा । सांगतो हे ॥ ६८ ॥ एवं द्वैता उमसो । नेदूनि ऐक्या विसकुसो । सोइरिकिचा अतिसो । पोखित असे ॥ ६९ ॥ निवृत्ति जया नावं । निवृत्ति जया बरव । जया निवृत्तिचि राणिव । निवृत्तिसि ॥ ७० ॥ वांचोनि प्रवृत्तिविरोधे । निवृत्तिचेनि बोधे । आणिजे तैसा बाधे । निवृत्ति नव्हे ॥ ७१ ॥ आपणा देउनि राति । दिवसा आणि उन्नति । गोसावि हा निवृत्ति । तैसा नव्हे ॥ ७२ ॥ बोपसळेचे बळ । घेवोनि मिरवे रत्नकील । तैसा नव्हे हा निःखळ- । चक्रवार्त्ति ॥ ७३ ॥ गगन सुवोनि पोटि । जै चंद्राचि पघळे पुष्टि । तै चांदणिया उटि । अंगाचि कीजे ॥ ७४ ॥ तैसे निवृत्तिपणा कारण । हाचि आपणया आपण । फुलाचि जाले घ्राण । आपुलें दृति ७५ दिठि मुखाचे बरवे । जरि पाठिकडोनि फावे । तरि अरसे धांडोळावे । लागति काई ७६ कां राती गेलिया । दिवस हान आलिया । काय सूर्यपणे सूर्या । व्हावें असे ॥ ७७ ॥ म्हणोनि बाध्य बाधूनि । घेपे प्रमाणे साधूनि । तैसा नव्हे भरवसेनि । गोसावीं हा ॥ ७८ ॥ ऐसे करणियेवीण । स्वयंभ जे निवृत्तिपण । तयाचे श्रीचरण । वंदिले ऐसे ॥ ७९ ॥ आता ज्ञानदेवो म्हणे । श्रीगुरुप्रणामे येणे । फेडिलि मिया ॠणे । चहू वाचेची ॥ ८० ॥ इतिश्री अनुभवामृते श्रीगुरुवंदनं नाम द्वितीय-प्रकरणम् ।

---

## प्रकरण ३ रें.

जयाचेनि बोभाटे । आत्मयाचि झोप लोटे । तरि ॠण न फिटे । जे चेणेचि नीद कीं ॥ १ ॥ यहूवि परादि चौघी । जीवा मोक्षाचे उपयोगि । अविद्यासंवे अंगि । वेचति कीर ॥ २ ॥ देहासंवे हातपाय । जाति मनासंवे इंद्रिये । कां सूर्यासवें जाय । किरणजाळ ॥ ३ ॥ नातरि निद्रेचे आवधि । स्वप्ने सरति आधि । तेवि अविद्यासंबंधि । आटति ईया ॥ ४ ॥ परि मृते लोहे होति । तिये रसरूपे जीति । जळोनि इंधने येति । वन्हिदशे ॥ ५ ॥ लवण अंगे विरे । परि स्वादे जाळे उरे । मरोनि जागरे । जिये नीद ॥ ६ ॥ तेवि अविद्यासंवे । चौघि वेंचति जिवे । परि तत्वज्ञानाचेनि नावे । उठति ईया ॥ ७ ॥ आता तत्वज्ञान-दिवा । मरोनि इहि लावावा । तरि तोहि तिना लेवा । बोध्यरूपे ॥ ८ ॥ येउनि स्वप्ने मेळवि । गेलिया आपणपे दावि । दोन्हि दिठि नांदवि । नींद जैसि ॥९॥ जिति अविद्या तैसि । अन्यथाबोधे गिवसि । तोचि यथाबोधेसि । निमालि

उठे ॥ १० ॥ परि जिति ना मोलि । आविद्या हे न मोकालि । बंध-मोक्षि घालि । बांधोनिया ॥ ११ ॥ मोक्षाचि बंध होय । तरि मोक्ष शब्द कां साहे । परि अज्ञाना घरि न्राय । वाउगि हे ॥ १२ ॥ बागुलाचेनि मरणे । तोषावे कि बाळपणे । येरा तोचि नाहि, मा कोण्हे । मानावा मृत्यु ॥ १३ ॥ घटाचे नाहीपण । फुटलियाचि नागवण । मानिति तें जाण । ह्मणो येति ॥१४॥ ह्मणोनि बंध तव वावो । मा मोक्षा के प्रस्तावो । परि मरोनि केला ठावो । अविद्या ह्या ॥ १५ ॥ आणि ज्ञानबंध ऐसे । शिवसूत्राचेनि मिषे । ह्मणितले असे । सदाशिवे ॥ १६ ॥ वैकुंठिचेहि सुजाणे । ज्ञानपाशी सत्वगुणे । बांधिजे हे बोलणे । बहू केले ॥ १७ ॥ परि शिवे कां श्रीवल्लभे । बोलिले येणेंचि लोभे । मानु ते नव्हे हे लाभे । न बोलताहि ॥ १८ ॥ जो आत्मा ज्ञानमात्र निःखळ । तोहि घे ज्ञानाचे बळ । तरि सूर्य चिंति सवळ । तैसे नोव्हे ॥ १९ ॥ ह्मणोनि ज्ञाने श्लाघतु मोहे । तै ज्ञानपण धाडिले वाये । दीप वांचुनि दिवा लाहे । तै अंग भुलला की ॥ २० ॥ आपणापे आपणासि । नेणता देशोदेशि । आपणाते गिवसि । हे कीर होय ॥ २१ ॥ परि बहुता का दिया । आपणपे आठविलिया । ह्मणे मि मिया । कैसा रिझो ॥ २२ ॥ तैसा ज्ञानरूप आत्मा । ज्ञानेचि आपलि प्रमीं । करिता सोहमा । ऐसा बंधु ॥ २३ ॥ जे ज्ञान स्वये बुडे । ह्मणोनि भारि नावडे । ज्ञाने मोक्ष घडे । तो निमालेनि ॥ २४ ॥ म्हणोनि परादि वाचा । तो शृंगार चौ अंगाचा । वेचु अविद्या जीवाचा । जीवत्वत्यागे ॥ २५ ॥ अंगाचेनि इंधने दाहसु । उठोनि ज्ञानाग्निप्रवेशु । करिता तेथे भस्मलेशु । बोधाचा उरे ॥२६॥ जाळि ना जळावेगळ । कापूर न दिसे आडळ । परि होउनि परिमळ । उरे जेवि ॥ २७ ॥ अंगि लाविता विभूति । परमाणु तितके झडति । तरि पांडुरत्वे कांति । उरे जेवि ॥ २८ ॥ ना वोहळा अंगि जैसे । पाणि पाणिपणे नसे । तरि वोल्हासाचे मिषे । अथीच कि ॥ २९ ॥ नातरि मध्यान्हकाळि । छाया न दिसे वेगाळि । परि असे पांयातळि । रिघोनिया ॥३०॥ तैसे ग्रासुनि दूसरे । स्वरूपि स्वरुपाकारे । आपलेपणे उरे । बोध जो का ॥ ३१ ॥ ते ऋणशेष वाचा ह्या । न फेडवेचि मरोनिया । हे पायां पडोनि मिया । सोडविले ॥ ३२ ॥ म्हणोनि परा पश्यंति । मध्यमा ह्मन भारति । या निस्ताराव्या लागति । ज्ञानेचि पां ॥ ३३ ॥ इतिश्री अनुभवामृते वाक्चतुष्टय-ऋण-निरसनं नाम तृतीय प्रकरणम् ।

# प्रकरण ४ थें

आता अज्ञानाचेनि मारे । ज्ञान अभेदे वावरे । नीद सारोनि जागरे । नांदिजे जेवि ॥ १ ॥ कां दर्पणिचा निघाला । ऐक्यबोध पाहिला । मुख भोगि आपला । आपणाचि ॥ २ ॥ ज्ञान जिया तियापरि । जगि आत्मैक्य करि । तै सुरिया खोचे सुरि । तैसे जाले ॥ ३ ॥ लावि आंत ठावोनि कोपठा । तो साधि आपणासगटा । कां बांधे आपणया चोरटा । मोटेमाजि ॥ ४ ॥ आगि पोतासाचेनि मिषे । आपणपे जाळिले जैसे । ज्ञाने अज्ञाननाशे । तैसे केले ॥ ५ ॥ अज्ञानाचा टेंका । नसताहि ज्ञान अधिका । फांके जव उपखा । आपलाहि पडे ॥ ६ ॥ दशाहि ते निमालिया । येणे जे उवाया । ते केवळ नाशावया । दीपाचे परि ॥ ७ ॥ उठणे कि पडणे । कचभाराचे कोण जाणे । फांकणे कि सुकणे । जाईउळाचे ॥ ८ ॥ तरंगाचे रूपा येणे । तयाचि नाव निमणे । कि विजुचे उदैजणे । तोचि अस्तु ॥ ९ ॥ तैसे खाउनि अज्ञान । तंवरिच वाढे ज्ञान । जव आपले निधन । निःशेष साधि ॥१०॥ जैसे कल्पांतिचे भरते । स्थळा जळा दोहिते । बुडाविल्या अरोते । राहोचि नेणे ॥ ११ ॥ कां विश्वाहि वेगळ । वाढे जै सूर्यमंडळ । तै तेज-तम निःखळ । तेचि होय ॥ १२ ॥ ना निद मारुनि । आपणपेहि नुरोनि । जागणे ठाके होउनि । जागणे जे ॥ १३ ॥ तैसे अज्ञान अटोनिया । ज्ञान येत जे उवाया अवं । ज्ञाने ज्ञान गिळोनिया । ज्ञानचि होय ॥ १४ ॥ ते वेळि पुनवा भरे । ना अंवसे सरे । ते चंद्रि उरे । सत्रावि जैसि ॥ १५ ॥ कां तेज्यांतरे नाटोपे । कोण्हे तमे न वासिपे । ते उपमेचे जाउपे । सूर्य नव्हे ॥ १६ ॥ म्हणोनि ज्ञाने उजळे ।कां अज्ञानकरि रुळे। तैसे नव्हें निर्वाळे । ज्ञानमात्र जे ॥ १७ ॥ परि ज्ञानपणे निःखळ । तेचि कि तया कळे । काय देखिजे बुबुळे । बुबुळाते ॥ १८ ॥ आकाश आपणया रिघे । आगि आपणया लागे । आपला माथा वळघे । आपण कोण्ही ॥ १९ ॥ दिठि आपणया देखे । स्वाद आपणया चाखे । नाद आपले आइके । नादपण काई ॥ २० ॥ सूर्य सूर्याते विवळे । कां फळ आपणया फळे । परिमळ परिमळे । घेपत असे ॥ २१ तैसे आपणया आपण । जाणते नव्हे जाण । म्हणोनि ज्ञानपणेवीण । ज्ञानमात्र जे ॥ २२ ॥ आणि ज्ञान ऐसि सोय । ज्ञानपणेचि जरि साहे । तरि अज्ञान हे नोव्हे । ज्ञानपणेचि ॥ २३ ॥ जैसे तेज जे आहे । ते अंधार कीर नव्हे । मा तेज तरि होय । तेजासि काई ॥ २४ ॥ म्हणोनि जाणने नेणने । हे नाहिच जया होणे । आता मिथ्या ऐसे येणे । बोले गमे ॥ २५ ॥ कांहिच नाहि सर्वथा । ऐसि

जरि व्यवस्था । तरि नाहि हे प्रथा । कोण्हासि पा ॥ २६ ॥ शुन्य-सिद्धांत-बोधु । कोण सत्ता होय सिद्धु । नसताचि अपवादु । वस्तुसि हा ॥२७॥ मालविता दिवे मालविता जरि माल्वे । तरि दीप नाहि हे फावे । कोण्हासि पा ॥ २८ ॥ निदेचे आलेपणे । निदेले ते जाय प्राणे । तै निद भुलि हे कोणे । अनुभवीजे ॥ २९ ॥ घट घटपणे असे । तद्भंगे भंग आभासे । सर्वथा नाहि तेथ नसे । कोणे म्हणावे ॥ ३० ॥ म्हणोनि कांहि—नाहि—पण । देखता नाहि आपण । ऐसे नहोनि आसणेपण । असणे जे ॥ ३१ ॥ परि आणिका कां अपणया । न पुरेचि विषो व्हावया । म्हणोनिहि असावया । कारण किं ॥ ३२ ॥ जो निरंजनि निदेला । आणिके नाहि देखिला । आपलाहि निमाला । आठव तया ॥ ३३ ॥ परि जिवे नाहि नोव्हे । तैसे शुद्ध आसणे आहे । बोलणे हि न साहे । आहे-नाहि-पणाचे ॥ ३४ ॥ दिठि आपणया मुरडे । तै दिठिपणाचि मोडे । परि नाहि नोव्हे हे फुडे । जाणोचि कि ॥ ३५ ॥ काळा राहे काळवखा । तो आपणा ना आणिका । न चोजवे तरि असिका । हा मिवाणे ॥ ३६ ॥ तैसे आसणे कां नसणे । हे कांहिच मा नसेपणे । नसोनि जे आसणे । ठाये ठाव ॥ ३७ ॥ निःखळपणे आपला । आकाशाचा संच उरला । तो स्वये असे पुढिला । कांहि ना कि ॥ ३८ ॥ कां अंगिके निर्मळपाणि । हारातिलिया पोखरणि । ते आणिका वांचुन पाणि । सगळेचि अथि ॥ ३९ ॥ आपणा भागु तैसे । आसणेचि जे असे । असे नाहि ऐसे । सांडोनिया ॥ ४० ॥ निदेचे नाहिपण । विझालिया जागरण । आसिजे । नेणो कोण । होउनिया ॥ ४१ ॥ कां भुई कुंभ ठेविजे । तैं सकुंभता अपजे । तो नेलिया म्हणिजे । तेणेविण ॥४२॥ परि दोन्हिहि भाग । न शिवत भूमिचे अंग । ते वेळि ऐसे चांग । चोख जे आसणे ॥ ४३ ॥ इतिश्रीमंत् अनुभवामृते अज्ञान—निरसन—शून्य--खंडनं नाम चतुर्थ प्रकरणम् ।

---

## प्रकरण ५ वें.

तेविंचि सत्ता प्रकाश सुख । या तिहि उगे लेख । विषपणे विष । विषा नाहि ॥ १ ॥ कांति काठिन्य कनक । तिन्हि मिळुन एक । द्राव गोडि पियुष । पियुष जेविं ॥ २ ॥ उजाळ दृति मार्दव । या तिहि तिहि उणीव । देखिजे सावेव । कापुरी एकि ॥ ३ ॥ अंगे कीर उजाळ । उजाळ तोचि मवाळ । कां दोन्हि ना परिमळ । मात्र जो ॥ ४ ॥ ऐसि इये कापुरपाणि । तिन्हि इये तिन्हि उणि । इया परि आटणि । सत्तादिका ॥ ५ ॥ यऱ्हवि सच्चिदानंदभेदे । चालिले

तिन्हि पदे । परि तिन्हि उणि आनंदे । केलि येणें ॥ ६ ॥ जे सत्ताचि प्रकाशु । प्रकाशाचि सत्ता उल्हासु । हे न निवडे मिठांशु । अमृति जेवि ॥ ७ ॥ शुक्ल पक्षिच्या सोळा । दिवसा वाढति कळा । परि चंद्र मात्र सगळा । चंद्रि जेवि ॥ ८ ॥ येंथि पडता उदक । थेंबा धरो ये लेख । परि पडला ठांई उदक । वांचुनि आहे ॥ ९ ॥ तैसे असदाचिये व्यावृति । सद म्हणो आले श्रुति । जडाचिये समाप्ति । चिदपण ऐसे ॥ १० ॥ दुःखाचिये सर्वनासे । उरले ते सुख ऐसे । निगादिले निश्वासे । प्रभुचेनि ॥ ११ ॥ ऐसि सत्प्रतियोगिये । असदादि तिन्हि इये । लोटता जालि त्राय । सत्तादिका ॥ १२ ॥ एवं सच्चिदानंद । आत्मा हा ऐसा शब्द । अन्य व्यावृत्ति सिद्ध । वाचक नव्हे ॥ १३ ॥ सूर्याचे प्रकाशे । जे कांहि आभासे । तेणे तो दिसे । सूर्य काई ॥ १४ ॥ तेविं जेणे तेजे । वाचेसि वाच्य सुजे । ते वाचा प्रकाशिजे । हे के आहे ॥ २५ ॥ विषय नोव्हे कोण्हाहि । जया प्रमेयत्वाचि नाहि । तया स्वप्रकाशा काई । प्रमाणे होति ॥ १६ ॥ प्रमेय परिच्छेदे । प्रमाणत्व नांदे । ते काय स्वतःसिद्धे । वस्तुचे ठांई ॥ १७ ॥ म्हणोनि सच्चित्सुख । हे बोल वस्तुवाचक । नव्हति हे शेष । विचाराचे ॥ १८ ॥ ऐसोनि इये प्रासिद्धे । चालिलि तिन्हि पदे । मग द्रष्टया स्वसंवादे । भेटति जेव्हा ॥ १९ ॥ ते वेळि वरिसोनि मेघ । समुद्र होवोनि वोघ । सरे दावोनि माग । हार-ते जैसा ॥ २० ॥ फळ विउनि फुल सुके । फळपाके रस पोखे । तोहि रस उफरते । तृप्तिदानि ॥ २१ ॥ अहुति आग्नि अंतु । घालुनि वोसरे हातु । सुख चेवउनि गीतु । उगा राहे ॥ २२ ॥ नाना मुखा मुख दाउनि । अरिसा जाय निघोनि । कां निदेले चेवउनि । चेववितें जैसे ॥ २३ ॥ तैसे सच्चिदानंद चोखटा । दाउनि द्रष्टया द्रष्टा । तिन्हि पदे लागति वाटा । मौनाचिया ॥ २४ ॥ जे जे बोलिजे ते ते नव्हे ।होय ते तवं न बोलवे । साउलिवरि न मववे ।मविते जैसे ॥ २५ ॥ मग आपालियेकडे । मवितियासि पडे । ते लाजलाजु अखडे । मविति जैसि ॥ २६ ॥ तैसे सदचि स्वभावे । असद तवं नव्हे । मा सदत्व संभवे । सदासि काई ॥ २७ ॥ अचिदाचेनि नाशे । जे चिन्मात्र आले दशे । आता चिन्मात्राचि मा कैसे । चिन्मात्रि इये ॥२८॥ नीद प्रबोधाचेठाई । नसे तैसे जागणेहि । तेवि चिन्मात्र मा काई चिन्मात्रि इये ॥२९॥ ऐसे यया सुखपणे । नाहि दुःख कीर होणे । आता सुखाचि मा होणे । सुखासि काई ॥ ३० ॥ म्हणोनि सद सदत्वे गेले । चिद चिदत्वे मावळले । सुखा सुख जाले । कां हि ना किं ॥ ३१ ॥ आता द्वंद्वाचि लवचक । सांडुनि दुनिचे कंचुक । सुखमात्रचि एक । स्वये आथि ॥ ३२ ॥ वरि एकपणे

गणिजे । तै गणितेनसि होय दुजे । ह्मणोनि कांहि न गणिजे । ऐसें एक ॥ ३३ ॥ सुखा अतोनि निघणे । तै सुखिया सुखि तेणे । हे सुखमात्रचि मा कोणे । अनुभवावे ॥ ३४ ॥ जै प्रकृति डंकु अनुकरे । तै प्रकृति डंके अवतरे । मा डंकुचि डंका भरे । ऐसे आहे ॥ ३५ ॥ तैसे आपलेनि सुखपणे । जया नाहि सुखावणे । आणि नाहि हेहि जेणे । नेणिजे सुखे ॥ ३६ ॥ अरिसा न पाहाता मुख । स्वये सन्मुख ना विन्मुख । तैसे नसोनि सुखासुख । सुखचि जे ॥ ३७ ॥ आता न लाविता उसु । तै जैसेनि असे रसु । तेथिचा जो मिठांशु । तोचि जाणे ॥ ३८ ॥ कां न साज्जिता विणा । तो नाद जेवि अबोलना । तयाते तेणेचि जाणा । व्हावे जैसे ॥ ३९ ॥ नाना पुष्पाचिया उदरा । न येता पुष्पसारा । आपणाचे भवरा । व्हांवे पडे ॥ ४० ॥ न रांधिता रससोय । ते गोडि कैसि आहे । हे पाहाणे ते नव्हे । आणिका जोगे ॥ ४१ ॥ तैसे सुखपणा येवो । लाजे आपले सुख पावो । ते आणिका चाखोसुवो । येइल काई ॥४२॥ देहाचिये दुपारि । चंद्रमा जैसा अंबरि । ते आसणें चांदावरि । जाणावे कि ॥४३॥ रूप नाहि तै लावण्य । अंग नुठि तै तारुण्य । क्रिया नसे तै पुण्य । कैसे असे ॥ ४४ ॥ जै मनाचा अंकुर नुदैजे । तैचेनि मकरध्वजे । आसणे हे न साजे । तरि तेचि घडे ॥ ४५ ॥ कां वाद्य-विशेषाचिये सृष्टि । जै जन्म नये दृष्टि । तै नाद ऐसि गोठि । नादाचि जोगि ॥४६॥ नाना काष्ठाचिया विटाळा । वोसरालिया अनळा । लागणें ते केवळा । अंगासिचि ॥४७॥ दर्पणाचिये नियमे । विण मुखि मुख प्रेमे । आणिजेत क्रमे । वर्मे येणे ॥४८॥ न पेरिता पीक जोडे । ते मुढाचि आहे रोकडे । ऐसिया सोई उघडे । बोलणे हे ४९ ॥ एवं विशेष सन्मान्य । दोन्हिते नातळे चैतन्य । जे भोगिजे अनन्य । तणेसि सदा ॥ ५० ॥ आता यावरि जे बोलणे । ते येणेचि बोले साहने । जे मौनाचेहि पठणे । पीउनि गेले ॥ ५१ ॥ एवं प्रमाणे प्रमाण । येणे केले अप्रमाण । दृष्टांते वाहाले आण । दिसावयाचे ॥ ५२ ॥ जेथे अंगाचिच अनुपपत्ति । ह्मणेनि आटल्या उपपत्ति । तेथे उठलि पाति । लक्षणाचिया ॥ ५३ ॥ उपाय मागिल पाय । घेउनि जाले वाय । प्रतिति सांडिलि सोय । प्रत्ययाचि ॥५४ ॥ येथ निर्धारेसि विच्यार । निमोनि गेला साचार । स्वामिचे संकटि शूर । सुभट जैसा ॥ ५५ ॥ नाश साधोनि आपला । बोध बोधेसि लाजिला । नुसधेपणे थोटावला । अनुभव येथे ॥ ५६ ॥ भिंगाचिया चडळा । पदराचा पुंजा वेगळा । करिता जैसा निफाळा । अंगाचा होय ॥ ५७ ॥ कां गजवजिला उभा । पांघुरणे केळिचा गाभा । सांडिते वोळि उभा । कैचा कीजे ॥ ५८ ॥ तैसे अनुभाव्य अनु-

भावक । इंहि दोहि अनुभूतिविक । ते गेलिया कैंचे एक । एकासिचि ॥ ५९ ॥ अनुभव हा ठाववारि । आपुलिच अनवसरि । तेथें अक्षराचि हारि । वाईल काई ॥६०॥ जेथ परेसि पडे मिठि । तेथे नादा सळ उठि । मा वावरिजैल होटि । हे के आहे ॥ ६१ ॥ चेइलिया पाठि । चेवणयाच्या गोठि । किं धाला बैसे पाठि । रंधनाचिया ॥ ६२ ॥ उदेलिया दिवसपति । ते कि दिवे सेजे येति । पीकला सेति सुजति । नांगर काई ॥ ६३ ॥ म्हणोनि बंधमोक्षाचे व्याज । निमालिया जाले काज । आतां निरुपण भोज । वळघेल कांई ॥ ६४ ॥ इतिश्री अनुभवामृते सच्चिदानंदविवरणं नाम पंचम प्रकरणम् ॥

---

## प्रकरण ६ वें.

आणि पुढिला कां आपणपे । जे विसराचेनि हाते हारपे । ते शब्देचि घेपे । अठवोनिया ॥१॥ इतुलिया परोते । चांगावें नाहि शब्दाते । जे स्मारकपणे कीर्तिते । भोगि हा जगि ॥ २ ॥ बाप उपयोगि वस्तु शब्द ! । जिया धरा सधर नाद । अमूर्तांचा विषद । अरसा नव्हे ॥ ३ ॥ पाहाते आरसा पाहे । येथे कांहि नवल आहे । परि दर्पणे येणे होय । न पाहातेहि पाहाते ॥ ४ ॥ वडिल अव्यक्ताचिया वंशा । उद्यतकर सूर्य जैसा । येणे येके गुणे आकाशा । अंबरत्व ॥ ५ ॥ आपण तव खपुष्प । परि फळ दे सद्रूप । शब्द मविते माप । कोण आहे ॥ ६ ॥ दिवसाते उरउ गेला । तवं रात्रिचा द्रोह आला । ह्मणोनि सूर्य यया बोला । उपमा नव्हे ॥७॥ प्रवृत्ति आणि निवृत्ति । विरुद्धाहि हात धरिति । ते शब्देचि चालति । येकलेनि ॥८॥ हा अविद्या--अंगि पडे । तै नाथिले ऐसे रुढे । जे न लाहे तीन कवडे । साच वस्तु ॥ ९ ॥ विधि--निषेधाच्चिया वाटा । दाविता हाचि दिवटा । बंध--मोक्ष कळिकटा । सिष्ट हाचि ॥ १० ॥ शुद्ध शिवाचे शरीरि । हा कुमार जीवत्व भरि । जैसा अंगे पंच्याक्षरि । तेवि हा बोल ॥ ११ ॥ जीव देहि बांधला । तो बोले एके सुटला । आत्मा बोलेचि भेटला । आपणपया ॥ १९ ॥ हा साह्य आत्मयाचे । करावया अंगे वेचे । गोमटे काय शब्दाचे । येकैक वाणु ॥ १३ किंबहुना हा शब्दु । स्मरणदानि प्रसिध्दु । परि ययाहि संबंधु । नाहि येथे ॥ १४ ॥ आत्मया यया बोलाचे । कांहि उपेगा न वचे । स्वसंवेद्या कोण्हाचे । वोझे आथि ॥ १५ ॥ आठवे कां विसरे । विषो होउनि अवतरे । परि वस्तुसि वस्तु दूसरे । असेना कि ॥ १६ ॥ आपण आपणयाते । आठवि विसरे केउते ।

काय जीभ जिभेते । चाखे न चाखे ॥ १७ ॥ जागतया नींद नाहि । मा जागणे घडे काई । स्मरणास्मरणे दोहि । स्वरूपि तैसि ॥ १८ ॥ सूर्य रात्रिते नेणे । मा दिवो काय जाणे । तेवि स्मरणास्मरणे । वस्तुचे ठांई ॥ १९ ॥ एवं स्मरणास्मरण नाहि । तरि स्मारके काज काई । ह्मणोनि इये ठांई । बोल न सरे ॥ २० ॥ आणिक एक शब्दे । काज कीजे भले सिद्ध । परि धिवसा न बांधे । विच्यारा येथे ॥ २१ ॥ जे बोले अविद्या नासे । मग आत्मया आत्मा दिसे । हे ह्मणतखेवो पिसे– । पण आलेच किं ॥ २२ ॥ सूर्य रातिते मारील । मग आपणा उदो करील । हे कुडे न सरति बोल । साचाचे गांवि ॥ २३ ॥ चेइलिया नींद रुसे । ऐसि नीद ए ; असे । किं चेईले चेउ बैसे । ऐसे चेणे आहे ॥ २४ ॥ ह्मणोनि नाशावया पुरति । अविद्या नाहि निरुति । मा आत्मा आत्मप्रतीति । रिगेल कैसा ॥ २५ ॥ अविद्या तवं स्वरूपे । वांझेचे कीर जाउपे । मा तर्कांचे खुरपे । खांडि कोण्हा ॥ २६ ॥ दीपाचिये सोये । अंधार कीर न साहे । परि तेथे कांहि आहे । जावया जोगे ॥ २७ ॥ इंद्रधनुषि शीत । कोण पा न घालिते । ते दिसे तैसे होते । साच जारि ॥ २८ ॥ अगस्तिचिया कवतुका । पुरति जरि मृगतृष्णिका । तरि मारे देतो तर्का । अविद्येविषि ॥ २९ ॥ साहे बोलाचि वळघि । ऐसि अविद्या अथि जगि । तरि जाळो ना का अगि । गंधर्वनगरें ॥ ३० ॥ जेथे साउलि न पडे । तेथे नाहि जेणे पाडे । मा जेथे पडे तेथे जोडे । पदार्थ काई ॥ ३१ ॥ मृगजळ जेथे नुमंडे । तेथे असे कोरडे । मा उमंडे तेथे जोडे । वोल्हासा काई ॥ ३२ ॥ दिसतचि स्वप्न लटिके । ते जागरे होय ठाउके । तेवि अविद्याकाळि सतुके । अविद्या नाहि ॥ ३३ ॥ वोडंबरिचिया लेनिया । घरे भरति अतुडलिया । कि नागवे नागविलिया । विशेष काई ॥ ३४ ॥ मनोरथाचे परियळ । अरोगु का सहस्र वेळ । परि उपवासा वेगळ । आण अथि ॥ ३५ ॥ हे दिसे तैसे असे । तरि चित्रिचे पाउसे । वोलावोत मानसे । आगराते ॥ ३६ ॥ कालउनि अंधारे । लिहु येति अक्षरे । तरि मसिचे वोरबारे । सिणे कोण ॥ ३७ ॥ आकाश काय नीळे । न देखति हे डोळे । अविद्येचि टवाळे । जाण तैसि ॥ ३८ ॥ आणि इयेचे अनिर्वाच्यपण । ते दुजे देवांगण । आपला अभाव आपण. । साधित असे ॥ ३९ ॥ अविद्या येणे नावे । मि विद्यमान नव्हे । हे अविद्याचि स्वभावे । सांगत असे ॥४०॥ ना कांहि जरि आहे । तरि निर्धारु कां न साहे । जेवि घट-भात्रि भोय । अंकित दिसे ॥४१॥ अविद्या नाशि आत्मा । ऐसि न घडे प्रमा । सूर्यांअंगि तमा । घडे योग ॥४२॥ हे अविद्या तरि मायावि । मायांविपण न लपवि । सहजि आलि अभावि । आपुलिया

॥४३॥ बहुतापरि ऐसि । अविद्या नाहि अपैसि । आता बोल हाव वसि । कोण्हावरि ॥४४॥ साउलियेते सबळे । खोचिलिया भोइ आदळे । किं हाणतिलिया अंतराळे । थोटावे हात्रु ॥ ४५ ॥ मृगजळाचे पानी । कां गगनाचे अलिंगनि । नातरि चुंबनि । प्रतिबिंबाचे ॥ ४६ ॥ उठावला तवका । तवं सुना ठाव पडे असिका । अविद्यानासि तर्का । तैसे होय ॥ ४७ ॥ ऐसि हि अविद्या नाशावि । हे कोण्हि वाहेल जिवि । तेणे साल काढावि । आकाशाचि ! ॥ ४८ ॥ तेणे सेळि गळा दुहावि । गुढगा वास पाहावि । वाळउनि कांचरि करावि । सांजवेळेचि ॥ ४९ ॥ जांभइ वाटुनि रसु । तेंणे काढावा बहुवसु । कालउनि आळसु । मोधळा पाजावा ॥ ५० ॥ तो पाटा पाणि परतो । पडालि सावालि उलथो । वारियाचे तांथु । वळो सुखे ॥ ५१ ॥ तो आगुलाते मारो । प्रतिबिंब खोळे भरो । तळहातिचे विंचरो । केश सुखे ॥ ५२ ॥ घटाचे नाहिपण फोडो । गगनाचे फुले तोडो । सशाचे मोडो । सिंग सुखे ॥ ५३ ॥ तो कापुराचि मसि करो । रत्नदीपि काजळ धरो । वांझेचे लेकरु । परणो सुखे ॥ ५४ ॥ अंवसेचे सुधाकरे । पोसो पाताळिचे चकोरे । मृगजळिचि जळचरे । धरो सुखे ॥ ५५ ॥ असो हे किति बोलावे । अविद्या रचालि अभावे । आता काय नाशावे । शब्दे येणे ॥ ५६ ॥ जे नाहि तयाचे नाशे । शब्द नये प्रमाणदसे । अंधारि अंधारा जैसे । नोव्हे रूप ॥ ५७ ॥ अविद्या नाहि ज्याति । तेथे नाहि ह्मणतया युक्ति । दुपारिच्या होति वाति । अंगाणिचिया ॥ ५८ ॥ न पेरिता सेति । संवगणि जे जाति । तया लाजेपरति । जोड आहे ॥ ५९ ॥ खवनियाचिया अंगा । जेणे केला वळघा । तो न करिता उगा । धारि होता ॥ ६० ॥ पाणियावरि वरखु होता कोण विशेषु । अविद्यानासि उन्मेषु । फांकावे तैसा ॥ ६१ ॥ माप मापपणे श्लाघे । जव आकाश मउ न रिघे । तम न पाहता वाउगे । दीपाचे जन्म ॥ ६२ ॥ गगनाचि रससोय । जीभ अरोगु जै जाय । तै रसना हे होय । अडनाव किं ॥ ६३ ॥ न निफजतेनि अन्ने । जेवणे तेचि लंघने । निमालेनि नयने । देखणा अंध ॥ ६४ ॥ नव्हतेनि वल्लभे । अहेवपण शोभे । खाता न खाता गाभे । केळिचे जैसे ॥ ६५ ॥ स्थूळ सूक्ष्म कोण एक । पदार्थ न प्रकाशे अर्क । परि रात्रिविखि अप्रयोजक । जालाचि किं ॥६६॥ दिठिसि काय एक न फावे । परि निदेते न देखवे चेता न संभवे । म्हणोनिया ॥ ६७ ॥ चकोराचिया उदिमा । लटकेपणाचि सीमा । जरि दिवसाचि चंद्रमा । गिवसु वैसे ॥ ६८ ॥ नुसधिया साचा । मुका होय वाचकाचा । अंतराळे पांयाचा । पेंधा होय ॥ ६९ ॥ तैसे अविद्या सन्मुखे ।

सिद्धांतप्रतिछेदके । उठालि निरर्थके । प्रमाणे होति ॥ ७० ॥ अंवसे आला सुधाकर । न करिच काय अंधार । अविद्यानासि विच्यार । तैसा होय ॥७१॥ आता अविद्याचि नाहि । हे कीर म्हणु कायी । परि ते नाशिता कांहि । नुरेचि शब्द ॥ ७२ ॥ कैसेनहि वस्तु नसे । जै शब्दार्थ होउ बैसे । तै निरर्थकपणे नाशे । शब्दहि थिता ॥ ७३ ॥ यालागि अविद्येचिया महुरा । उठालियाहि विच्यारा । अंगाचाचि संसारा । होउनि ठेला ॥ ७४ ॥ ह्मणोनि अविद्येचेनि मरणे । प्रमाणा येईल बोलणे । हे अविद्याचि नाहिपणे । घडो नेदि ॥ ७५ ॥ तरि आत्मा ह्यान आत्मया । दावोनि बोल महिमे इया । येईल हे सविया । विरुद्धाचि ॥ ७६ ॥ पाहावया दिवसु । कीजे वातिचा सोसु । तो तेव्हडाहि उद्वसु । उदीम पडे ॥ ७७ ॥ आपणया आपणासि । लागले लग्न कोण्हे देसि । सूर्य निजांग ग्रासि । ऐसे ग्रहण आहे ॥ ७८ ॥ गगन आपणया निगे । सिंधु आपणया रिगे । आपला माथा वळघे । आपण कोण्हि ॥ ७९ ॥ चराचरांते पाणि । पाजु येइल येके क्षणि । परि पाणियासि पाणि । पाजु ये काई ॥ ८० ॥ साट तिशा दिवसा । येखादा होय ऐसा । सूर्यास सूर्य जैसा । डोळा दावि ॥ ८१ ॥ कृतांत जरि कोपेल । तरि त्रैलोक्य जाळिल । वांचुनि आगि लाविल । आपणा काई ॥ ८२ ॥ आपणपे आपणया । समोर व्हावया । दर्पणेविण धात्रया । ठाकि आहे ॥ ८३ ॥ दिठि दिठिते रिघो पाहो । शके रुचि रुचिते खावो । चेता आणि चेवो । ते नाहिच किं ॥ ८४ ॥ चंदन चंदना लावि । रंग रंगपणा रावि । मोतिपण मोति लेववि । ऐसे कैचे ॥ ८५ ॥ सोनेपण सोने कसि ॥ दीपपण दीप प्रकाशि । रसपण बुडि दे रसि । ते के जोडे ॥ ८६ ॥ शिवमुगुट आइता । म्हणोनि चंद्र बैसला वरुता । परि चंद्र चंद्राचे माथा । बैसे काई ८७ ॥ तैसा आत्मराज तवं । ज्ञानमात्र भरिव । ज्ञाने ज्ञाना खेव । कैसे दिजे ॥ ८८ ॥ आपलेनि जाणपणे । आपणा जाणो नेणे । डोळया आपले पाहाणे । दुवाड जैसे ॥ ८९ ॥ दिगंतरा पैलिकडिचे । धाउनि सुरिया खोंचे । मा तियेसि तियेचे । अंग फुटे ॥ ९० ॥ आरिसा आपुलिये । अंगि आपणा पाहे । तरि जाण-जाणो लाहे । आपणाते ॥९१॥ रसवृत्ति रस उगाणे। जिव्हा घेउ जाणे । परि काय कीजे नेणे । आपणा चाखो ॥ ९२ ॥ तरि जिभे ह्यान आपले । पावणे ह्मणो काय ठेले । तैसे नव्हे संचले । तेचि ते किं ॥ ९३ ॥ तैसा आत्मा सांच्चिदानंदु । आपणया आपण सिध्दु । आता काय दे शब्दु । तयाते तया ॥ ९४ ॥ कोणा प्रमाणाचे हाते । वस्तु न घे आपणाते । जे स्वये आइते ।

घे ना नेघे ॥ ९५ ॥ म्हणोनि आत्मा आत्मलाभे । नांदवोनि शब्द शोभे । येइल ऐसा न लाभे । उमस घेवो ॥ ९६ ॥ एवं मध्यान्हिचि दिवि । तम दवाडि ना दिवो दावि । तेवि उभयता पदवि । बोला जालि ॥ ९७ ॥ जे अविद्या नाहिपणे । नाहि तियेते काय नाशणे । आत्मा सिद्धाचि मा तेणे । काय साधावे ॥ ९८ ॥ ऐसा उभय पाक्षि । बोल न लाहोनि नाखि । शरपला प्रळयोदाकि । बोध जैसा ॥ ९९ ॥ आता बोला भागु कांहि । असणे जया ठांई । अर्थता तरि नाहि । निपठोनिया ॥ १०० ॥ बागुल आला म्हणते । बोलणे जैसे रिते । आकाश वोळंबते । ताळि हान ॥ १०१ ॥ तैसि निरर्थक जल्पे । इये उठलि सपडपे । शोभति जैसि लेपे । रंगावरि ॥१०२॥ एवं शद्बैकजीवने । बापुडि ज्ञानाज्ञाने । साचपणे वने । चित्रिचि जैसि ॥ १०३ ॥ यया शब्दाचा निमाला । महाप्रळय हो सरला । अभ्रासवे गेला । दुर्दिन जैसा ॥ १०४ ॥ इति श्रीमत् अनुभवामृते शद्बखंडनं नाम षष्ठप्रकरणम् ।

---

## प्रकरण ७ वें.

यऱ्हवि तरि अज्ञाना । जै ज्ञानाचि नसे क्षोभना । तै तरि काना । खालीच दडे ॥ १ ॥ आड सुवोनि अंधारि । खद्योत दीप्ति झिरमिरि तेसे हे लटिके वरि । अनादि होय ॥ २ ॥ हे जाणनियाचे घरि । खांचिले अनन न करि । काय चांदणा उठे लहरि । मृगजळाचि ॥ ३ जैसि स्वप्नि स्वप्नमहिमा । कि तमि मान असे तमा । तेवि अज्ञान-गरिमा अज्ञानिचि ॥ ४ ॥ कोल्हेरिचे वारु । न येति धार धरु । नये लेणा शृंगारु । वोडंबरीचा ॥५॥ आणि ज्ञान जे म्हणिजे । ते अज्ञानाचि पा दुजे । एक लपवोनि दाविजे । एक जैसे ॥६॥ परि असो हा प्रस्तावो । आधि अज्ञानशुद्धि घेवो । मग तयाचे लागि लाहो । ज्ञानही लटिके ॥७॥ अज्ञान ज्ञानाते । आधिष्ठुन जारे । वर्ते तरि जेथे असे त्याते । नेण कां न करि ॥ ८ ॥ अज्ञाने जेथे असावें । तेथे सर्वनेण व्हांवे । ऐसि जाति स्वभावे । अज्ञनाचि ॥ ९ ॥ शास्त्रसंमत ऐसे । अज्ञान ज्ञानीच असे । तेणे तो गिवसे । आश्रय जरि ॥ १० ॥ तरि न उठता दुजे । अज्ञान जे बीज । ते अथि हे बुझे । कोण हान ॥ ११ ॥ अज्ञान आपणाते । जडत्वे नेणे निरुते । अप्रमाण प्रमाणाते । येत असे ॥१२॥ यालागि अज्ञान । करि आपले ज्ञान । म्हणता घेववि मौन । विरोधाचे ॥१३॥ जाणति वस्तु एक। ते अज्ञाने कीजे मुर्ख । तै अज्ञान हे लेख । कवण धरी ॥ १४ ॥

आपणयाहि पुरता । नेण न करि जाणतां । तेथा अज्ञाने ह्मणतां । लाजिजे की ॥ १५ ॥ अभाळे भानु आसे । ते अभ्र कोण्हे प्रकाशे । सुषुप्ति सुषुप्तिस दुसे । ते तेचि कोण्हे ॥ १६ ॥ तैसे अज्ञान असे जेथ । तेचि जरि अज्ञान आंते । तरि अज्ञान अज्ञानाते । नेणत गेले ॥ १७ ॥ नातरि अज्ञान एक घडे । हे जयास्तव निवडे । ते अज्ञान नव्हे फुडे । कोण्हे काळि ॥ १८ ॥ पडळ आथि डोळा । आणि डोळा नव्हे आंधळा । तरि त्या पोकळा । बोलिया कि ॥ १९ ॥ इंधनाचे आंगि । खवळलेनि अगि । न जळे तै वाउगि । शक्तिचि ते ॥ २० ॥ अंधार कोंदोनि घरि । घरा पडसाई न करि । तै अंधारु येहि अक्षरि । न ह्मणावा तो ॥ २१ ॥ वोसरु नेदि नागणे । तियेते नीद कोण ह्मणे । दिवसा नाणि उणे । ते रात्रि कैचि ॥ २२ ॥ तैसे आत्मत्वि अज्ञान असके । असता तो तेणे कां न माखे । तै अज्ञान शब्दा लटिके । आलेच की ॥ २३ ॥ यऱ्हावी तरि आत्मया । माजि अज्ञान असावया । कारण ह्मणता न्याया । चुकिजे की ॥ २४ ॥ अज्ञान तमपेठ्इनि । आत्मा प्रकाशाचि खाणि । आता दोहीसि मीळनि । एक कैसि ॥ २५ ॥ निद्रा आणि जागरु । आठव आणि विसरु । इये युग्मे एक हारु । चालति जरि ॥२६॥ सीतातप येकवट । वस्तिच वाहे वाट । तमे बांधिजे मोट । सूर्यरस्मिचि ॥ २७ ॥ नाना राति आणि दिवो । येति एके ठांई राहो । तै आत्मा जीवे जिवो । अज्ञानाचेनि २८ हं असो मृत्यु आणि जिणे । ये शोभति मेहुणे । तरि अज्ञाने आसणे । आत्मेनसि ॥ २९ ॥ अहो आत्मेन जे बाधि । तेचि आत्मेनसी नांदे । ऐसि कायसी विरुद्धे । बोलणे ईये ॥ ३० ॥ अहो अंधारपणाचि पैज । सांडोनि अंधाराचि तेज । जाला तै सहज । सूर्याचे तो ॥ ३१ ॥ लांकुडपण सांडिले । आणि आगिपण मांडिले । तै तोचि आगि जाले । इंधन की ॥ ३२ ॥ कां गंगा पावतखेवो । आन पणाचा ठावो । सांडि तै गंगा हो । लांहे पाणि ॥३३॥ तैसे अज्ञान ते अज्ञान नव्हे । ह्मणोनि आत्मा असो लाहे । यव्हवि अज्ञान ते आहे । वेगळेचि ॥ ३४ ॥ आत्मेनसि विरोधि । ह्मणोनि नुरे एक संधि । ना वेगळे तरि सिद्धी । जाईचिना ॥३५॥ लवणाचि मासोळि । होय जरि जिव्हाळि । तरी जळि ना जळावेगळी । न जिये जेवी ॥ ३६ ॥ जे येथे अज्ञान नसे । तरीच आत्मा असे । हे बोलणे वायसे । नायकावे की ॥ ३७ ॥ दोरि सर्पाभास होय । तो तेणे दोरे बांधो नये । ना दवडणेही न साहे । जयापरि ॥ ३८ ॥ ना ना पुनवेचे अंधारे । देहाभिगे रात्रि मोहरे । की येताचि सुधाकरे । गीळिले जेवि ॥ ३९ ॥ तियापरि उभयथा । अज्ञानशब्द

गेला वृथा । हा तर्कावांचोनि ज्ञाता । स्वरुपे मये ॥ ४० ॥ अज्ञानस्वरूप कैसे । कार्यानुमेय असे । कि प्रत्यक्ष दिसे । धांडोळिता ॥ ४१ ॥ प्रत्यक्षादि प्रमाणि । कीजे जयाचि घेणि । ते अज्ञानकार्य ह्मणोनि । अज्ञान नव्हे ॥ ४२ ॥ अंकुरोसि सरळ । वेलि दिसे वेल्हाळ । ते बीज नव्हे केवळ । बीजकार्य ॥ ४३ ॥ कां शुभाशुभरूपे । स्वप्नसृष्टि आरोपे । ते नीद नव्हे जाउपे । नीदेचे कीं ॥ ४४ ॥ ना चांद एक असे । तो व्योमि दुणा दिसे । ते तिमिरकार्य जैसे । तिमिर नव्हे ॥ ४५ ॥ तैसें प्रमाता प्रमेय । प्रमाण हे जे त्रय । ते अज्ञानाचे कार्य । अज्ञान नव्हे ॥४६॥ ह्मणोनि प्रत्यक्षादिकि । अज्ञान कार्य विशेषी । न घेपे ये विखि । आन नाहि ॥ ४७ ॥ अज्ञानकार्यपणे । घेइजे ते अज्ञान ह्मणने । तरि घेताति जे करणे । ते तयाचिच की ॥ ४८ ॥ स्वप्नि दिसे ते स्वप्न । मा देखता काय आन । तैसे कार्यचि अज्ञान । केवळ जरि ॥ ४९ ॥ तरि चाखला गुळ गुळे । माखले काजळ काजळे । काय घेपे दिजे मुळे । आपुले मुळा ॥ ५० ॥ तैसे कारण अभिन्नपणे । कार्यही अज्ञान होणे । ते अज्ञान मा कोण्हे । काय घेपे ॥ ५१ ॥ आणि घेते घेवविते ऐसा । व्यवहार ये उमासा । तरि प्रमाण जाला मासा । मृगजळीचा ॥ ५२ ॥ जे प्रमाणाचिया माया । न सांपडेचि वाया । तया आणि खपुष्पा । विशेष काई ॥ ५३ ॥ ना हे प्रमाणाचि नुरवी । मा अथि कोण प्रस्तावि । येणेहि बोले जाणावि । अज्ञान उखि ॥ ५४ ॥ एवं प्रत्यक्ष अनुमान । यया प्रमाणा भाजन । नहोनि अप्रमाण । अज्ञान जाले ॥ ५५ ॥ आत्मया स्वप्न दाउ । न शके कीर बहु । परि ठाये ठाउ । निदेजउ न शके ॥ ५६ ॥ ना स्वकार्याते विये । कारणपणाहि नये । मा अज्ञान ऐसे विये । कोण साच ॥ ५७ ॥ हे असो जिये वेळे । आत्मपणे निःखळे । आत्मा अज्ञानमेळे । असे जरि ॥५८॥ न करिता मथन । काष्टि असे अवस्थान । जैसे कां हुताशन । सामर्थ्याचे ॥ ५९ ॥ जै आत्मा ऐसे नाव । न साहे आत्मत्वरव । तै आज्ञान हावं । बांधे तेथे ॥ ६० ॥ काय दीप न लाविजे । तैच काजळि फेडिजे । कि नुगवत्या चाळिजे । रुखाचि छाया ॥ ६१ ॥ नुठता देहदशा । के लाविजे चिकसा । न घडता आरसा । उटिजे कायि ॥ ६२ ॥ उव्हाचे दुधि । सायेचि व्हावि अधि । मग फेडु या बुद्धि । पवाडु कीजे ॥ ६३ ॥ तैसे आत्मयाचे ठाई । जै आत्मपणा ठाव नाहि । तेव्हा अज्ञान हे कायी । कासया ऐसे ॥ ६४ ॥ ह्मणोनि तेव्हा अज्ञान नसे । हे जालेचि आहे अपैसे । आता तरि कायसे । नाहि ह्मणो ॥ ६५ ॥ ऐसाही आत्मा जेव्हा । नातळे भावाभावा । अज्ञान असे तेव्हा । परि ते ऐसे ॥ ६६ ॥ घटाचे नाहीपण । फुटोनि होय चूर्ण । सर्वा

परि मरण । मारवले । ॥ ६७ कां निदे नीद आलि । मूर्च्छा मूर्च्छित जालि । अंधारि पडलि । अंध कूपि ॥ ६८ ॥ अभाव अवघडला । केळिचा गाभा मोडला । चाखळा अमुडला । आकाशाचा ॥ ६९ ॥ निवटलिया सूदले विष । मुक्याचे बांधले मुख । नुठता लेख । पुसिले जैसे ॥७० ॥ तैसे अज्ञान आपले वेळे । भोगि हेहि टवाळ । आता तरि केवळ । वस्तुचि असे ॥ ७१ ॥ देखे वांज कैंचि विये । विरुढति भाजलि बिये । सूर्य कोण्हा लाहे । अंधाराते ॥ ७२ ॥ तैसा चिन्मात्रि चोखडा । भलतैसा अज्ञानझाडा । घेतला तरि पवाडा । येईल काई ॥ ७३ ॥ सायेचिये चाडे । डव्हळिता दुधाचे भांडे । ते दिसे कां विघडे । विचारि पा ॥ ७४ ॥ नीद धरावया हाति । चेउनि उठला झडति । तरि ते लाभे कि थिति । नाशलि होय ॥७५॥ तेवि अज्ञान ऐसे । पाहावया कायसे पिसे । न पाहता अपैसे । न पाहाणेनि गेले ॥ ७६ ॥ एवं कोण्हेही पारे । अज्ञानभावाचि उजरि । न पडेचि नगरि । विच्याराचिये ॥ ७७ ॥ अहो कोण्हेही वेळे । आत्मा अथवा वेगळे । विच्याराचे डोळे । देखते कां ॥ ७८ ॥ ना निर्धाराचे तोंड न माखे । हे प्रमाण स्वप्ने नाईके । निरुक्ति हान मुके । अनसाईपणा ॥ ७९ ॥ इतुलियाहि भागु । अज्ञान हा मागु । निवे ऐसा वागु । पढता का देवो ॥ ८० ॥ अंवसेचे चंद्रबिंबे । निर्वाळालेंपे शोभे । कां मांडवति खांबे । शशविषाणाचे ॥८१॥ गगनफुलाचिया माळा । वांझे जालयाच्या गळा । घापति तो सोहळा । सांगता हा ॥ ८२ ॥ अगुन कासविचे तूप । भरु आकाशाचे माप । साचा येति संकल्प । ऐसे ऐसे ॥ ८३ ॥ एवं पुढत पुढति । किति अणावे निरुक्ति । आता नाहि ते किति । वटवटु पा ॥ ८४ ॥ ह्मणोनि अज्ञान अक्षरे । नुमघु आता नीदसुरे । परि आणिक एक स्फुरे । इयेविषई ॥ ८५ ॥ जे आपणा ना आणिकाते । देखोनि होय देखते । वस्तु तैसिया पुरते । नव्हे अंगे ॥ ८६ ॥ ते हे आपणापुढे । दृश्य पघळे यव्हडे । आपण करि फुडे । द्रष्टेपण ॥८७॥ जेथे आत्मत्वाचे सांकडे । तेथे हे उठेल यव्हडे । उठले ते तव रोकडे । देखत असे ॥ ८८ ॥ न दिसे तरि अज्ञान । आहे हे नव्हे आन । येथे दृश्य अनुमान । प्रमाण जाले ॥ ८९ ॥ चंद्र एक असे । तो व्योमि दुणा दिसे । डोळा तिमिर जैसे । मानु ये की ॥ ९० ॥ भूमि वेगाळि झाडे । पाणि घेति कोण्हकडे । न दिसाति आणि आपाडे । सांजि असति ॥ ९१ ॥ तरि भरवसेनि मुळे । पाणि घेति हे न ढळे । तैसे अज्ञान हे कळे । दृश्यास्तव ॥ ९२ ॥ चेईलिया नींद जाय । निद्रिता दाउवि नव्हे । परि स्वप्न दाउन आहे । ह्मणो ये की ॥ ९३ ॥ ह्मणोनि

वस्तु मात्र चोखे । दृश्यादि हे फांके । तरि अज्ञान अथि सुखे । ह्मणो ये की ॥९४॥ अगा ऐसिया ज्ञानाते । अज्ञान ह्मणने केउते । काय दिवो करि तयाते । अंधार ह्मणिपे ॥ ९५ ॥ चंद्रापासोनि उजळ । वस्तु राविलि धवल । होय तया काजळ । ह्मणिजेत असे ॥ ९६ ॥ आगिचे काज पाणि । निफजा जरि आणि । अज्ञान इया वाहानि । मानु तरि ॥ ९७ ॥ कळि पूर्ण चंद्रमा । अणुन मेळवि अमा । तरि ज्ञान ते अज्ञाननामा । पात्र होय ॥ ९८ ॥ वोरसोनि लोभे । विष का अमृत दुभे । ना दुभे तरि लाभे । विष ह्मणने ॥ ९९ ॥ तैसा जाणनियाचा व्यवहारु । जेथे मावळला सुभरु । तेथे आत्मा आणि पुरु । अज्ञानाचा ॥१००॥ तया नाव अज्ञान ऐसे तरि ज्ञान व्हांवे ते कैसे । यन्हवि कांहि असे । आत्मया काई ॥१॥ कांहिच जया न होणे । होय ते स्वये नेणे । शून्याचि दे वाणे । प्रमाणासि ॥ २ ॥ ऐसे ह्मणावया जोगे । नाचरे कीर अंगे । परि नाहीपणाहि लागे । जोडावांचि ॥ ३ ॥ कोण्हाचे आसनेन असे । किं कांहि देखता दिसे । हे आथि तरि कायसे । हारतलेपण ॥ ४ ॥ मिथ्या वादाचि कुटी आलि । ते निवांतचि साहिलि । परि विशेषा दिधाले । पाठि जेणे ॥ ५ ॥ जो निमालि नीद देखे । तो सर्वज्ञ यव्हाडिया चुके । परि दृश्याचिया न ठके । सोईच जो ॥ १०६ ॥ वेद काई येक न बोले । परि नावाचि नाहि घेतले । ऐसे कांहि जोडले । नाहि जेणे ॥ १०७ ॥ सूर्य कवणा न पाहे । परि आत्मा दाविला आहे । गगन व्यापूनि ठाये । ऐसि वस्तु ॥ ८ ॥ देह हाडाचि मोळि । मी ह्मणोनि पोटाळि । तो अहंकार । गाळि । पदार्थ हा ॥ ९ ॥ बुद्धि बोधा सोंके । ते येव्हडि वस्तु चुके । मनाहूनि कल्पनिके । कोण आहे ॥ ११० ॥ विषयाचिये बरडि । अखंड घांसिति तोंडि । ते इंद्रिये गोडि । न घेति हे ॥ ११ ॥ मीपणासगट । खाउनि भरी जे पोट । ते कोण्हाहि कटकट । फावेल का ॥ १२ ॥ जो आपणा नव्हे विषो । तो कोण्हाला हे देखो । जे वाणि न सके चाखो । आपणपे ॥ १३ ॥ जया आपले मुख । पोहावयांचे मुख । न बने मा आणिक । रिगेल के ॥ १४ ॥ हे असो नावेरूपे । पुढासूनि उमोपे । जेथ आलि वासिपे । अविद्या हे ॥ १५ ॥ खेळिजे वाधिकडे ते अंतचि बाहेर सवडे । तैसा निर्णयो सुनाट पडे । केला जेथे ॥ १६ ॥ मस्तकांत निर्धारिलि । छाया उडे जो आपलि । तयाचि फाकावलि । बुद्धि जैसि ॥ १७ ॥ तैसा टनकोनि सर्वथा । ते हे ऐसि व्यवस्था । निर्णयो करितो चूकता । इये वस्तु ॥ १८ ॥ आतां सांगिजे ते केउते । शब्दाचा संच्यार नाहि जेथे । कि दर्शनाचि तेथें । राणिव अथि ॥ १९ ॥ जयाचेनि बळे । अचक्षु-

पण अंधळे । फिटोनि वस्तुसि मिळे । देखणि दशा ॥१२०॥ आपलेचि दृश्यपण । उमखो न लाहे आपण । द्रष्टृत्वासिहि आण । पडलि असे ॥ २१ ॥ कोण कोण्हा भेटे । दिठि कैचि फुटे । ऐक्यासगट पोटे । अटोनि गेलि ॥ २२ ॥ येव्हडेहि सांकडे । सारुनि येकिकडे । उघडिलि कवाडे । प्रकाशाचि ॥ २३ ॥ दृश्या चियें सृष्टि । वोपित दिठिवरि दिठि । उठलिसे तळवटि । चिन्मात्राचे ॥ २४ ॥ दर्शन रिद्धि बहुवसा । चित्छेष मातला ऐसा । जे सिळा न पाहे आरसा । वैद्यरत्नाचा । ॥ १२५ ॥ क्षणक्षणा नीच नवि । दृश्याचि चोख पदवि । दिठिकरवि वेढवि । उदार जो ॥ २६ ॥ मागील क्षणिाचि अंगें । पारखी ह्मणोनि वेगे । सांडुनि दिठि रिघे । नवीया रूपा ॥२७॥ तैसेच प्रतिक्षणि । जाणिवेचि लेणि । लेवउनि चित्त आणि । जाणतेपणा ॥२८॥ तया परमात्मपदि चित्छेष । ना कांहि तया सुसास । आणि होय यव्हडि कास । घातलि जेणे ॥ २९ ॥ सर्वज्ञतेचि परि । चिन्मात्राचे तोंडवरि । परि एकाहि प्रमाणाचे घरि । जाणिजेना ॥ १३० ॥ एवं ज्ञानाज्ञानाचि मिठि । ते ते फाकतसे दिठि । दृश्यपण ये भेटि । आपलिया ॥३१७॥ ते दृश्य मोटके देखे । आणि स्वयें द्रष्टत्वे तोषे । तेचि दिठिचेनि मिषे । माजि दाटे ॥ ३२ ॥ तेधवा देणे घेणे घटे । परि ऐक्याचे सूत न तुटे । जैसे मुखाचे मुखवटे । दर्पणे केले ॥ ३३ ॥ अंगे अंगाधारि पहुडे । परि चेइला वेगळा न पडे । तया वारुवाचेनि पडे । घेणे देणे ॥ ३४ ॥ पाणि कल्लोळाचेनि मिषे । आपणपे वल्हावे जैसे । वस्तुवरि वस्तु तैसे । खेळो सुखे ॥ १३५ ॥ गुंफिवा ज्वाळाचिया माळा । लेइलिया अनळा । भेदाचिया विटाळा । पडणे आहे ॥३६॥ कि रस्मिचेनि परिवारे । वेढोनि घेतला थोरे । सूर्यासि दूसरे । बोले ये काई ॥३७ चांदणियाचा गिवसु । चांदावरि बहुवसु । काय केवळपणा त्रासु । देखिजेल ॥३८॥ दळाचिया सहस्त्रवरि । फांके आपुलिये परि । पारी नाहीच दूसरि । भाष्र कमळि ॥ ३९ ॥ सहस्त्रवारि बाह्या । सहस्त्राजुर्ना राया । तरि तो काय तया । येकोत्तरावां ॥ १४० ॥ सवकटाचिया वोजा । पदर बहुवे पुंजा । परि तांथुवि दुजा । भाव आहे ॥ ४१ ॥ कोडिवरि शब्दाचा । मेळावा जरि वाचेचा । मीनला तरि वाचा—। मात्राचि कि ॥ ४२ ॥ तैसे दृश्याचे डाखाळे । नाना दृष्टिचे उमाळे । उठति लखावेगळे । द्रष्टत्वेहि ॥ ४३ ॥ कां गुळाचा बांधा । फुटालिया मोडिचा धांदा । जाला तरि नुसधा । गुळाचि तो ॥ ४४ ॥ तैसे दृश्य दावोनि देखो । कि बहु होउनि फाको । परि भेदाचा नव्हे विखो । तेचि ह्मणोनि ॥१४५॥ तया परमात्मियाचिया भाषा । न पडेचि दुसरि रेषा । जरि विश्व अशेषा । भरले

असे ॥ ४६ ॥ दुग्धंधा क्षीरोदाकि । वाणे परि अनेकि । दिसति तरि तितुकि । सुते अथि ॥ ४७ ॥ पातयाचि मिठि । नुकालिता दिठि । अवघिया सृष्टि । पाहे जरि ॥ ४८ ॥ न फुटता बीजकणिका । माजि विस्तारे वट आसिका । तरि इया अद्वैतफाका । उपमा अथि ॥ ४९ ॥ मग माते मिया देखावे । ऐसे जरि भरे हांवे । तरि अंगाचि ये विसावे । सेजेवरि ॥ १५० ॥ पातयाचि मिठि । पडलिया दिठि । आपलिया पोटि । रिघोनि असे ॥ ५१ ॥ कां नुदेलिया सुधाकरु । आपणपे भरे सागरु । ना कूर्मि गिळि विस्तारु । आपेआप ॥ ५२ ॥ अंवसेचे दिवसि । सत्रावियेआंशे । स्वये जैसे शशी । रिघणे होय ॥ ५३ ॥ तैसे दृश्य जीणता द्रष्टे । पडे जैताचिये कटे । तया नाव वावटे । आपणपाचि ॥ ५४ ॥ सहजे आपणचि आहे । तरि कोण कोण्हाते पाहे । ते न देखणेचि होय । स्वरूपनिद्रा ॥ १५५ ॥ ना न देखणे नको । ह्मणे मी माते देखो । तरि आपेआप विखो । अपैसा असे ॥ ५६ ॥ जे अनादि दृश्यपण । अनादीच देखणे । हे आता काय कोण्हे । रचु जावे ॥५७॥ आवकाशेसी गगन । स्पर्शेसि पवन । का दीप्तिसि तपन । संबधु कीजे ॥ ५८ ॥ विश्वपणे उजियेडे । तरि विश्वचि देखे फुडे । नाहितरि तेव्हडे । नाहिच देखे ॥ ५९ ॥ विश्वाचे आसणे नाहि । विपाये बुडाले तेहि । तरि दशा ऐसिहि । देखताचि असे ॥ १६० ॥ कापुरा अथि चांदणे । परि तोचि न माखे तेणे । तैसे केवळ जे देखणे । ठाये ठाव ॥ ६१ ॥ किंबहुना ऐसैसे । वस्तु भलतये दशे । देखताचि असे । आपणयाते ॥ ६२ ॥ मनोरथाचि देशांतरे । मनि प्रकाशोनि नगरे । मग तेथे आदरे । हिंडिजे जैसे ॥ ६३ ॥ कां दाटला डोळा डोळिया । डोळाचि चितारा होउनिया । स्फुरे चोख ह्मणोनिया । विस्मयो नाहि ॥ ६४ ॥ यालागि एके चिद्रूपे । आपणिया आपणपे । देखिजे का आरोपे । काय काज ॥ १६५ ॥ कीळेचे पांघरूण । अपजावि रत्नकण । सोने ले सोनेपण । जोडजोडु ॥ ६६ ॥ चंदन सौरभ वेढि । सुधा आपणपा वाढि । गूळ चाखे गोडि । ऐसे अथि ॥ ६७॥ की उजाळाचे कळे ' कापुरा पूट दीधले । ताउनि उन केले । अगिते काई ॥६८॥ ना जैसि लता । आपले वेलि गुंडाळता । घर करि न करिता । जियापरि ॥ ६९ ॥ कां प्रभेचा उभला । दीपप्रकाश संचला । तैसा चैतन्ये गिवसला । चिद्रूप स्फुरे ॥ १७० ॥ ऐसे आपले आपण । आपले निरिक्षण । करावे येणेवीण । करितचि आसे ॥ ७१ ॥ तैसे देखणे न देखणे । हे अंधारे चांदणे । माजि चंद्रत्वा उणे । स्फुरते काई ॥ ७२ ॥ ह्मणोनि हे न व्हावे । ऐसेहि करु पावे । तरि तैसाचि स्वभावे । अद्वैता असे ॥ ७३ ॥ जे द्रष्टा दृश्य ऐसे । दोन्हिपण अळुमाळ दिसे ।

तैहि परस्परानुप्रवेशें । कांहि ना कि ॥ ७४ ॥ भलतेथे भलतेव्हा । माझारिलिया दृष्टिभावा । आटणि करित खेवा । येति दोन्हि ॥ १७५ ॥ तेथे दृश्य द्रष्टा भरे । द्रष्टेपण दृश्यी सरे । दोन्हि न होनि उरे । दोन्हिचे साच ॥ ७६ ॥ कापुरि अग्निप्रवेशु । कां आगि घातला पोतासु । हा नेणिजे सौरसु । वेचु जाला ॥७७ ॥ एका एक वेंचला । शून्यबिंदु पुसिला । द्रष्टा दृश्याचा मेळा । तैसे होय ॥ ७८ ॥ किंबहुना आपुलिया । प्रतिबिंबा झोंबिलिया । झोंबिसगट अटोनिया । जाइजे जेवि ॥ ७९ ॥ तैसे रुसता दिठि । द्रष्टा दृश्य भेटि । येति तेथे मिठि । दोहिचि पडे ॥ १८० ॥ न मिळता पूर्वापर । तंवरीचि सरितासागर । मग येकवट नीर । जैसे होय ॥ ८१ ॥ किंबहुना हे त्रिपुटि । सहजे होत राहाटि । प्रतिक्षणि भेटि । करीतसे ॥ ८२ ॥ दोन्हि विशेषे गिळि । मग निर्विसिष्टा उगळि । उघड झापि एक डोळि । वस्तुचि असे ॥ ८३ ॥ पातया पातें मिळे । कि दङ्मात्र सैंघ पघळे । तिये उन्मिळिता मावळे । नवलाव की ॥ ८४ ॥ द्रष्टा दृश्याचे ग्रासि । मद्धे लेख विकाशि । योग भूमिका ऐसि । अंगि वागे ॥ १८५ ॥ उठला तरंग बैसे । पुढिल अंशु नुमसे । ऐसे ठाई जैसे । पाणि होय ॥ ८६ ॥ का नीद सरोनि गेली । ज्याप्रति नाहि चेईलि । तेव्हा होय आपलि । स्थिति जैसि ॥ ८७ ॥ नाना एका ठाउनि उठि आणि अन्यत्र नव्हे पैठि । हे गमे तैसिया दिठि । दिठि सूता ॥ ८८ ॥ कां मावळो सरला दिवो । राति न करि प्रस्तावो । तेव्हा गगना जो भावो । वाखाणिला ॥ ८९ ॥ घेतला स्वास बुडाला । घापता नाहि उठला । ऐसा दोहीसि शिवतिला । नव्हे जो अंशु ॥ १९० ॥ कां अवघाचि कराणि । सर्व विषयाचि घेणि । करिता एके क्षणि । जे कांहि असे ॥ ९१ ॥ तयासारिखा ठावो । हा निकराचा आत्मभावो । आता येणे हा पाहो । न पाहो लाभे ॥ ९२ ॥ काय आपलिये भूमिके । आरसा आपले निके । पाहो न पाहो शके । ऐसे अथि ॥ ९३ ॥ समोर पाठमोरया । मुखे होइजे आपलिया । वांचुन आरिसया । ठाकि आहे ॥ ९४ ॥ सर्वांग देखणा रवि । परि ऐसे घडे केवि । जे उदो-अस्तांचि चवि । स्वयें घेपे ॥ १९५ ॥ रस आपणया पिये । कि तोंड लपउन ठाये । हे रसपणेचि नव्हे । तया जोगे ॥ ९६ ॥ तैसे पाहाणे न पाहाणे । पाहाणेपणेचि हा नेणे । आणि दोन्हिहि येणे । स्वये आसिजे ॥ ९७ ॥ पाहणेचि म्हणोनिया । पाहणे नव्हें आपणया । तै न पाहाणे अपसया । हाचे आहे ॥ ९८ ॥ आणि न पाहणे कैसे । आपणपे पाहो बैसे । तरि पाहाणे ऐसे । हाचे पूढति ॥ ९९ ॥

हे दोन्हि परस्परे । नांदति येके हारे । बाधूनि येरयेरे । नाहिसि केलि ॥ २०० ॥ पाहाणया पाहाणे आहे । तरि न पाहाणेहि हा नव्हे । म्हणोनि याचि सोय । नेणति दोन्हि ॥ १ ॥ एवं पाहाणे न पाहाणे । चोरोनि यया असणे । ना पाहिले तरि कोण्हे । काय पाहिले ॥ २ ॥ दिसत्यानें दृश्य भासे । तया नाव देखिले ऐसे । तरि दृश्यास्तव दिसे । ऐसे नाहि ॥ ३ ॥ दृश्य कीर दृष्टि दिसे । परि साच द्रष्टा असे । आता नाहि तेथे कैसे । देखिले होय ॥ ४ ॥ मुख दिसो कां दर्पणि । परि आसणे तया मुखपाणि । तरि जालि ते वायाणि । प्रतीति की ॥ २०५ ॥ देखताचि आपणयाते । आलिया निद्रेचिनि हाते । तया स्वप्ना ऐसे येथे । निहाळिजे ॥ ६ ॥ निद्रिस्त तव सुखासनि । वाहिला अन्य वाहाणि । ते साच कि तेसनि । पावला दशा ॥ ७ ॥ ते निद्रा जेव्हा नाहि । तेव्हा तो जैसा ठाईंचे ठाई । तैसाच स्वप्नि कांहि । न दाविजे की ॥ ८ ॥ की शिसेविण एके । राज्य करीति रंके । देखिले तैसे सतुके । अथि काई ॥ ९ ॥ तान्हेलया मृगतृष्णा । न भेटता सीण जेसना । माते भेटलीया कोण्हा । काय भेटले ॥ २१० ॥ की साउलिचेनि व्याजे । मेळविले दुजे । तयाचे करणे वांझे । जाले जैसे ॥ ११ ॥ तैसे दृश्य करोनिया । द्रष्टयातेच द्रष्टया । दावोनि धाडिले वांया । दाविले-पणहि ॥ १२ ॥ जे द्रष्टा तो द्रष्टाचि आहे । मा दावणे कायसे वाये । न दाविजे तरि तो नव्हे । तया काई ॥ १३ ॥ आरसा पाहुन राहे । तरि मुखचि वांया जाय । ना तेणेवीण आहे । आपणपे की ॥ १४ ॥ तैसि आत्मयाते आत्मया । न दाविच पै माया । तरि आत्मा वावो कि वांया । तोचि कि ना ॥ २१५ ॥ ह्मणोनि आपणपे द्रष्टा । न करिता असे पैठा । आता जालाचि या दिठा । कां करावा ॥ १६ ॥ ना मानु ते दाविले । तरि पुनरुक्त जाले । येणेहि बोले गेले । दावणे वृथा ॥ १७ ॥ दोरा सर्पाभासा । साचपणे दोर जैसा । द्रष्टा दृशि तैसा । द्रष्टा साच ॥ १८ ॥ दर्पणे आणि मुखे । मुख दिसे हे न चुके । पारि मुखि मुख सतुके । दर्पणि नाहि ॥ १९ ॥ तैसा द्रष्टा दृश्य दोहो । साच कि देखता ठावो । ह्मणोनि दृश्य ते वावो । देखिले जरि ॥ २२० ॥ वाव कीर होय । परि दिसत तव आहे । येणेहि बोले होय । देखिले ऐसे ॥ २१ ॥ जरि आन आनाते । देखोनि होय देखते । तरि मानो येते । देखिले ऐसे ॥ २२ ॥ येथे देखोनि का न देखोनि । ऐक्य कि नाना होउनि । परि हा वांचोनि । देखणे असे ॥ २३ ॥ आरिसेन हो कां दाविले । परि मुखेचि मुख देखिले । तो न दावि तरि संचले । मुखि मुख ॥ २४ ॥ तैसे

दाविते जरि नाहि । तरि हाचि यया ठांई । ना दाविले तरिहि । हाचि यया २२५
ज्यागृतीने दाविला । कां निदा हारविला । परि जैसा एकला । पुरुष पुरुषि ॥२६॥
कां रायाते रावो । ऐसा दाविजे प्रत्ययो । तरि ठाये ठावो । राजाचि तो ॥ २७ ॥
ना रायपण राया । न अणिजे प्रत्यया । तरि काय उणे तया । माजि असे ॥२८॥
तैसे दाविता न दाविता । हा यया परौता । चढे ना तुटे आइता । असताचि असे ॥ २९ ॥ अथवा निमित्तवसे । हाचि यया दाउ बैसे । देखते नाहि तै आरसे । देखावे कोणे ॥२३०॥ दीप दावि तयाते रचि । कि तेणे सिद्धि दीपाची । तैसि सत्ता निमित्ताचि । येणेचि साच ॥ ३१ ॥ वन्हिते वन्हिसिखा । प्रकाशि कीर देखा । परि वन्हि न होउनि लेखा । येईल कायी ॥ ३२ ॥ ह्मणोनि स्वयं प्रकाशा यया । आपणापे देखावया । निमित्त हा वांचोनिया । नाहिच मा ॥३३॥ आणि निमित्त जे बोलावे । ते येणेचि असोनि दावावे । देखिले तरि स्वभावे । दृश्य ही हा ॥ ३४ ॥ भलतेनि विंन्यासे । दृश्यपणे दिसे । हा वांचुनि नसे । येथे कांहि ॥ २३५ ॥ लेणे आणि भांगारे । भांगारचि एक स्फुरे । कां जेथें दूसरे । नाही ह्मणोनि ॥ ३६ ॥ जळ तरंग दोहि । जळावांचुनि नाही । ह्मणोनि आन कांहि । दिसे ना नसे ॥ ३७ ॥ हो का घ्राणानुमेयो । येवो कां हाति घेवो । लाहा कां दिठि पाहो । भलतैसा ॥ ३८ ॥ परि कापुराचे ठाई । कापुरावांचुनि नाहि । तैसे भलतिया रिति पाहि । हाचि यया ॥ ३९ ॥ आतां दृश्यपणे दिसो । कां द्रष्टा होउनि असो । परि हा वांचोनि अतिसो । नाही येथे ॥ २४० ॥ गंगा गंगापणे वाहो । कां समुद्र होवोनि राहो । परि पाणिपण नोव्हे । आणिक ते ।४१। थिजावे कि विघरावे । हे अप्रयोजक आघवे । घृतपण नव्हे । अनारिसे ॥ ४२ ॥ ज्वाळा आणि वन्हि । न लेखिजेति दोन्हि । वन्हिमात्र ह्मणोनि । आन नाहि ॥ ४३ ॥ तैसे दृश्य का द्रष्टा । या दोन्हि दशा वांजटा । पाहाता एकटा । स्फूर्तिमात्राते ॥ ४४ ॥ इये स्फुर्तिचिया कडोनि । नाहि स्फूर्ति मात्रा वांचोनि । तरि कोण काय देखोनि । देखतसे ॥ २४५ ॥ पुढे फरके ना दीसते । ना माघे डोकावि देखते । पाहाता येणे याते स्फुरद्रूपाचि ॥ ४६ ॥ कल्लोळे जाळि घातले । सोने सोने पांघुरले । दिठिचे पाय गुंतले । दिठिसीचि ॥ ४७ ॥ श्रुतिसि मेळविलि श्रुति । दृतिसि मेळविलि दृति । कां तृप्तिसि तृप्ति । वोगारिलि ॥ ४८ ॥ गुळे गुळ परवडिला । मेरु सुवर्णे मढिला । ज्वाळा गुंडाळिला । अनळ जैसा ॥ ४९ ॥ हे बहु काय बोलिजे । नभ नभाचिये सेजे । तेथे कोण्हे निजिजे । कां जागा कोण ॥ २५० ॥ हा येणे पाहिला ऐसा । कांहि न पाहिला जैसा ।

आणि न पाहाता हि तैसा । पाहातान्चि हा ॥ ५१ ॥ येथे बोलणे न साहे । जाणणे न समाये । अनुभव न लाहे । अंग मिरउ ॥ ५२ ॥ ह्मणोनि ययाते येणे । या परिचे पाहाणे । पाहतां कांहि कोण्हे । पाहिलें नाहि ॥ ५३ ॥ किंबहुना ऐसैसे । आत्मेन आत्मा न प्रकाशे । ना चेतवि चेवउ बैसे । ययास्तव ॥ ५४ ॥ स्वये दर्शनान्चिया सवा । अवधियान्चि जात फावा । परि निजात्मभावा । न मोडता ॥ २५५ ॥ न पाहाता ऐसे पाहे । तरि तेचि पाहाणे होय । आणि न पाहाणे न तरि जाय । न पाहाणे पाहाणे ॥५६ ॥ भलतैसा फाके । परि एकपणा न मुके । संकोचे तरि असिके हाचि अथि ॥ ५७ ॥ सूर्याचिया हाता । अंधार नये सर्वथा । मा प्रकाशाचि कथा । ऐकतां कां ॥ ५८ ॥ अंधार का उजियेडु । सकळा एक अखंडु । जैसा का मार्तेडु । भलतेथे ॥ ५९ ॥ तैसा अवडतिये भूमिके । अरुढलिया कवतुके । परि ययाते हा न चुके । हाचि ह्मणोनि ॥ २६० ॥ सिंधूचि सीमा न मोडे । पाणिपणा सळु न पडे । वरि मोडुत कां गाडे । तरंगाचे ॥ ६१ ॥ रश्मि सूर्य आथि । परि बिंबाबाहेर जाति । ह्मणोनि बोध संपत्ति । उपमा न मनि ॥ ६२ ॥ सोनियाचा रवा । रवेपणाचा ठेवा । अवधिया अवयवा । लेणे नव्हे ॥ ६३ ॥ आणि पळेहेचा दोडा । न पडता तढा । जग तव कापडा । भरेना कि ॥ ६४ ॥ न फेडिता आडवावो । दिगंतोनि दिगंता जावो । नये मा पावो । उपमा काई ॥ २६५ ॥ ह्मणोनि इये आत्मलीळे । नाहि आन कांटाळे अताा ययाचिये तुळे ॥ हाचि होय ॥ ६६ ॥ स्वप्रकाशााचिया घांसि । जेविता बहु वेगेंसि । वेचेना परि कुसि । वाखोपा न पडे ॥ ६७ ॥ ऐसा निरुपमापरि । आपलिये विलासावरि । आत्मा राणिव करि । आपला ठाई ॥ २६८ ॥

---

## प्रकरण ८ वें.

तयाते म्हणपे अज्ञान । तरि न्याया भरले रान । आता म्हणो तयाचे ज्ञान । उपसाहो अम्हि ॥ १ ॥ तरि प्रकाशिते ते अज्ञान । ऐसे म्हणने हान । निधि दावि तया अंजन । म्हणिजे जैसे ॥२॥ सुवर्ण गौरि अंबिका । न ह्मणिजे काय काळिका । तैसा आत्मप्रकाशका । अज्ञानवादु॥२॥ यन्हवि शिवोनि प्रिथ्विवरि । तत्वाचिया वाणिपरि । जयाचे रश्मिकरि । उजाळा येति ॥४॥ जेणे ज्ञान सज्ञान होय । दृङ्मात्र दृष्टिते विये । प्रकाशाचा दिवस पाहे । प्रकाशासि ॥ ५ ॥ तयाते कोण्हे निकृष्टे । दाविले अज्ञान खोटे । ना सूर्य तम मोटे । बांधता होय ॥ ६ ॥ अपुर्व ज्ञानाक्षरि । वसता ज्ञानाचि

थोरि । अज्ञान शब्दार्थाचि उजरि । अपूर्व नव्हे ॥ ७॥ लाखेचिये मांदुसे । आगिचे ठेवणे जैसे । आंत बाहेर सरिसे । करोनि घालि ॥ ८ ॥ म्हणोनि जग ज्ञाने स्फुरते । आणि बोलता अज्ञान वादाते । विखुरालि होति आंते । वाचेचिये ॥ ९ ॥ अक्षरि तव गोवधु । पुढारा अनृत बाधु । मा कैसा अज्ञानकदु । ज्ञानि कीजे ॥ १० ॥ आणि अज्ञान म्हणने । हे स्फुरतसे अर्थपणे । आता हेचि ज्ञान कवणे । मानिजेना ॥११॥ असो हे आत्मराजे । आपणाते जेणे तेजे । आपणाचि देखिजे । बहुवेपरि ॥१२॥ निर्वचिता जे झावळे । तेचि कि लाहाति डोळे । डोळिया पुढेहि मिळे । तेचि तया ॥ १३ ॥ ऐसे अज्ञान जे आहे । ते अज्ञान म्हणे मी विये। येणे अनुमाने हो पाहे । अथि ऐसे ॥ १४ ॥ तव ज्ञान त्रिशुद्धि नाहि । हे जग ठेविले ठाई । जे धर्मधर्मित्व नाहि । ज्ञानाज्ञानाचे ॥ १५ ॥ काजळ मोति विये । राखोंडिया दीपु जिये । तारि ज्ञान धर्म होय । अज्ञानाचा ॥ १६ ॥ चंद्रमा निघति ज्वाळा । आकाश आते शिळा । तरि अज्ञान उजळा । ज्ञानाते विये ॥ १७ ॥ क्षिराब्धि काळकूट । हे एकेपरि विकट । परि काळकूटि चोखट । अमृत नाहि ॥ १८ ॥ ना अज्ञानि ज्ञान जाले । ते होताचि अज्ञान गेले । पूढति ज्ञान येकले । अज्ञान नाहि ॥ १९ ॥ म्हणोनि सूर्य सूर्या येव्हडा । चंद्र चंद्रासि सांगडा । दीपाचिया पाडिपाडा। ऐसा दीपु ॥२०॥ प्रकाश तो प्रकाश कि। हे न वचे यया चुकि। म्हणोनि जग असाकि वस्तुप्रभा ॥२१॥ आणि विभाति यस्य भासा । सर्वमिदं हा ऐसा । श्रुति काय वायसा । ढेकर देति ॥ २२ ॥ यालागि वस्तुप्रभा । वस्तुचि पावे शोभा । जात असे लाभा । वस्तुसीचि ॥ २३॥ वांचोनि वस्तु यया । आपणा प्रकाशावया । अज्ञान हेतु वाया । बोलणे अवघे ॥ २४ ॥ एवं अज्ञान सद्भावो । कोण्हे परि न लाहो । अज्ञान विषइ पावो । पाहो ठेल्या ॥ २५ ॥ तमाशा उजिरा । न जोडेचि दिनकरा । रात्रिचिया घरा । गेला जरि ॥२६॥ का नीद खोळे भरिता । जागणेहि न ये हाता । येकले टळटाळेता । ठाकिजे जेविं ॥२७॥ तैसे आमचेनि नावे । अज्ञान ज्ञान दोन्हि नव्हे । अम्हालागि गुरुदेवे । आम्हीच केलो ॥२८॥ हा ठाववरि गुरुराये । नांदविले उवाये । जे आम्हि न समाये । अम्हामाजि ॥ २९॥ अम्हि अम्हिपणे न सटो । अंगि लागले न फुटो । स्वसंविति न घसवटो । कैवल्येहि ॥३०॥ परि आम्हि आम्हि आहो । ते केसे पाहो जावो । तंव काय किजे ठावो । लाजिजे ऐसा ॥३१॥आमचि करावया गोठि । ते जन्मालेच नाहि वागसृष्टि । आमुते देखे ते दिठि । दिठिच नव्हे ॥ ३२ ॥ अमुते करोनि विखो भोगहि न सके चाखो । आमुते अम्हि न देखो । आम्हिपणे ॥ ३३ ॥ प्रगटो लपो न लाहो । येथे नाहि नवलावो । परि कैसा नेणो विपावो ।

असणियाचा ॥ ३४ ॥ किंबहुना श्रीनिवृत्ति । ठेविले असों जयेस्थिति । ते कार्य देऊ शाति । वाचेच्यिा ॥ ३५॥ तेथे समोर व्हावया । अज्ञानाचा पाडु यया । केउते मेलिया माया । होउ पाहे ॥ ३६ ॥ आणि अज्ञानाचा प्रवर्तु । नाहि जया गांवा आतु । तेथें ज्ञानाचि तरि मातु । कोण जाणे ॥ ३७ ॥ राति ह्मणोनि दिवे । पडति कि लावावे । वांचोनि सूर्यासवें । ठानदिवि असे ॥ ३८ ॥ ह्मणोनि अज्ञान नाहि तेथेचि गेले ज्ञानहि । आता निमिषोन्मेषा दोहि । ठेलि वाट ॥ ३९ ॥ एवं ज्ञानाज्ञाने । या दोहीचि अभिधाने । अर्थाचेनि अनाने । उपलविलि ॥ ४० ॥ तव जैसि दंपत्ये परस्परे तोडोनि पालटिलि शिरे । तेथे पालट नाहि परिसरे । दोहिचे जिणे ४१ कां पाठि दाविला होय । तो दीपूचि वांया जाय । आणि दिठि अंधारे पाहे । ते दिठीचि वृथा ॥ ४२ ॥ ऐसे ज्ञान अज्ञाना आले । अज्ञान ज्ञाना गेले । तेथे फळेवीण वांझोले । दोन्हि जालि ॥ ४३ ॥ तैसे निपटोनि नेणिजे । ते अज्ञान शब्दे बोलिजे । आणि सर्व जेणे सुजे । ते ज्ञान ऐसे ॥ ४४॥ येथे जाणे तो नेणे । नेणे तोचि जाणे । अता के आसणे । ज्ञानाज्ञाना ॥ ४५ ॥ एवं ज्ञानाज्ञाने दोन्हि । पोटि सुवोनि आहनि । उदेला चिद्गगनि चिदादित्य हा ॥ ४६ ॥

इति श्रीमदनुभवामृते ज्ञानाज्ञानातीतवस्तुप्रतिपादनं नाम अष्टम प्रकरणम्

---

## प्रकरण ९ वें

आता अमोद सुनास जाले । श्रुतिस श्रवण रिघाले । आरसे उठिले । लोचनाचे ॥ १ ॥ जीभ बोळलि रसे । कमळ सूर्यपणे प्रकाशे । चकोर कां जैसे । चंद्रमा जाला ॥ २ ॥ फुले जालि भ्रमर । तरुणिया जाले नर । जाला आपुला सेजार । निद्राळुचि ॥ ३ ॥ आपुलेनि समीरपणे । वेल्हावताति विजने । माथेचि चापेपणे । बहकताति ॥ ४ ॥ च्युतांकुर जाला कोकीळ । अंगवले मलयानीळ । रस जाला रसाळ । रसनावंत ॥ ५ ॥ दिठिवियाचा रवा । नागरीयचा ठेवा । वडिला कोरवा । परि जैसा ॥ ६ ॥ तैसे भोग्य भोग भोक्ता । दृश्य दिसणे देखता । हे सरले अद्वैता । अफूटामाजि ॥ ७ ॥ सेवंतेपणा बाहेरि । न निघताचि परि । पाति सहस्रवरि उपलविलि ॥ ८ ॥ नवनवा अनुभवि । वाजता वाधावी । परि अन्योक्तिचा गांवि । न निघे तो ॥ ९ ॥ विषयाचेनि नांवे । सुखे इंद्रियाचे थवे । सैरा घेति धांवे । समोरहि ॥ १० ॥ परि आरसा शिवो शिवे । तव दिठि दिठिते फावे । तैसे जाले धांवे । वृत्ति यया ॥ ११ ॥ नाग मुदि कांकण । त्रिलिंगि

भेदलि खुण । घेता तरि सुवर्ण । घेइजे कि ॥ १२ ॥ कां वेचुनि अणु कल्लोळ । ह्मणोनि घापे करतळ । तेथे तरि निःखळ । पाणीच फावे ॥ १३ ॥ हातापासि स्पर्श । डोळयापुढे रूपसु । जिभे गमे मिष्टांशु कोण्हिरक ॥ १४ ॥ परि परिमळा परोते । आसणे नाहिं कापुराते । तैसे बहुतापरि स्फुरते । तेन्चि स्फुरे ॥ १५ ॥ ह्मणोनि शब्दादि पदार्थ । श्रोत्रादिचे संघात घ्यावया जेथे हात उजू होति ॥ १६ ॥ तेथें संबंध होय न होय । तव दिठिचे काय आहे । मग असतचि नव्हे । संबंध ना ॥ १७ ॥ जिये पेरि दिसति उसि । तिये लाभति रसि । कां कळा निवडे शशि । पुनवेचिया ॥ १८ ॥ पाडिले चांदावरि चांदणे । समुद्रि जाले वर्षणे । विषय विषई करणे । भेटति तैसि ॥ १९ ॥ ह्मणोनि तोंडा आड पडे । तेचि वाऱ्या वावडे । परि समाधि न मोडे । मौन मुद्रेचा ॥ २० ॥ व्यापाराचे गाडे । मोडताहि अपाडे । परि अक्रियेचे न मोडे । पाउल कही ॥ २१ ॥ पसरूनि निवृत्तिची वांवे । दिठि रूपाते देखवे । परि दृश्याचेनि नावें । कांहीच न देखे ॥ २२ ॥ तमाते घ्यावया । उचलिल्या जरि सहस्र बाह्या । परि सेवटि रवि यया । हाचि जैसा ॥ २३ ॥ कां स्वप्निचिया विलासा । भेटेन इया आशा । उठला तव जैसा । तोन्चि तो कि ॥ २४ ॥ तैसा उदेलेनि विषये । ज्ञानिया विषई होउ जाय । तव दोन्हि न होनि होय । काय नेणो ॥ २५ ॥ चंद्र वेंचु गेला चांदणे । तव वेंचिले काय कोण्हे । विउनि वांझे स्मरणे । होत जैसि ॥ २६ ॥ प्रत्यहारादि योगि । अंग टेंकिलें योगि । ते झाले यया मार्गि । देहाचे चांद ॥ २८ ॥ येथे प्रवृत्ति बहुडे जिणे । आणि निवृत्तिसि बाधणे । आता प्रत्यङ्मुखपणें । प्रच्यार दिसे ॥ २८ ॥ द्वैतदशेचे अंगण । अद्वैत वोळगे आपण । भेद तवं तवं दूण । अभेदासि ॥२९॥ कैवल्याहि चढावा । करीत विषयसेवा । जाला भक्त भज्य कालवा । भक्तिच्या घरि ॥ ३० ॥ घरामाजि पाय । चालता मार्ग होय । ना बैसे तरि आहे । पाव णेचि ॥ ३१ ॥ तैसे भलतेहि करिता । येथे कांहि पाहिजे आता । तैसें कांहि न करिता । ठाकिजे ना ॥ ३२ ॥ आठव आणि विसरु । तयाते घेउ नेंदि पसरु । दशेचा व्यवहारु । असाधारणु ॥ ३३ ॥ जालि स्वेच्छाचि विधि । स्वैर जालि समाधि । दशा या मोक्षसिद्धि । बैसो घापे ॥ ३४ ॥ देवेचि जाला भक्तु । ठावोचि जाला पंथु । होवोनि ठेला येकांतु । विश्वाचि हे ॥ ३५ ॥ भलतेउतेनि देवे । भलतेनि भक्त व्हांवे । बैसला तेथे राणिवे । अकर्म हा ॥ ३६ ॥ देवाचिया दाटाणि । देउळा जालि आटाणि । देशकालादि वांटाणि । होईचि ना ॥ ३७ ॥ देवि देवाचि न माये । मा दैविके असो पाहे । तेथे परिवार

बहुवे । अघटता किं ॥ ३८ ॥ ऐसिया स्वामि-भृत्य-संबंधा । लागि उठाठि जरि श्रद्धा । तरि देवचि नुसधा । भविजे किं ॥ ३९ ॥ अवघिया उपन्यारा । जपध्यान निर्धारा । नाहि आन दूसरा । देवावांचुनि ॥ ४० ॥ आता देवातेचि देवे । देववरि भजावे । आपणाचेनि नावें । भलतेया ॥४१॥ देव देउळ परिवार । कीजे कोरोनि डोंगर । तैसा भक्तिचा व्यवहार । कां न करावां ॥ ४२ ॥ अहो मुगि मुग जैसे घेता न घेता आन नसे । केले देवपण तैसे । दोहिपरि ॥४३॥ पाहे पा अवघिया । रुखि रुखाचि छाया । परि दूसरा नव्हे तया । विस्तार जेवी ॥ ४४ ॥ अखताचि देवता । अखताचि असे न पूजिता । मा अखति काय आता । पुजु जावें ॥ ४५ ॥ दीप्तिचि लुगडि । दीपकळिके तू वेढी । हे न ह्मणता ते उघडि । ठाके काई ॥ ४६ ॥ कां चंद्राते चंद्र काळिका । न ह्मणिजे पा लोका । तरि तो असिका । तोचि तो कीं ॥ ४७ ॥ की अगीपण अगी । असतचि असे अंगि । मा कासियालागि । दीपण देणे ॥ ४८ ॥ ह्मणोनि भजता भजावे मा न भजता काय चेवे । ऐसे नाहि स्वभावे । श्री शिउचि असे ॥ ४९ ॥ आता भक्ति अभक्ति । जाले ताट येके पाति । कर्माकर्माचिया वाति । मालवोनिया ॥ ५० ॥ ह्मणोनि उपनिषदे । अथातादेशादि निदे । ते निंदाचि विशदे । स्तोत्रे होति ॥ ५१ ॥ नातरि निंदास्तुति । दोन्हि मौनासाटि जाति । मौना मौन अथि । न बोलताहि ॥ ५२ ॥ घालिता अव्हासवा पाय । शिवयात्रा होत जाय । शिवा गेलिया नव्हे । कंहि जाणे ॥ ५३ ॥ चालणे आणि बैसक । दोन्हि मिळोनि एक । नव्हे ऐसे कवतुक । यया ठांई ॥ ५४ ॥ यऱ्हवि अडळलिया डोळा । शिवदर्शनाचा सोहळा । भोगिजे भलतिये वेळा । भलतेनें ॥५५॥ कां समोर दिसे शिवही । पारि देखिले कांहीच नाही । जे देवा भक्ता दोही । सरिसा पाडु ॥ ५६ ॥ आपणचि चेंडु सुटे । मग आपणया उपटे । तेणे उदळला दाटे । आपणपाचि ॥५७॥ ऐसि जारि चेंडुफळि । देखिजे का एके वेळि । तरि बोलि सरलि । प्रबोधाचि ॥ ५८ ॥ कर्माचा हात न लागे । ज्ञानाचे कांहि न रिघे । ऐसिच होत आंगे । उपास्ति हे ५९ निफजे ना निमे । आपेआप घुमे । सुखासुख उपमे । देवलसिया ६० कोण्हि एक अकृत्रिम । भक्तिचे हे वर्म । योग--ज्ञान–विश्राम– । भूमिका हे ॥६१॥ अंगे कीर एक जाले । नामरूप.चे मासले । होते तेहि आटले । हारिहर येथे ॥ ६२ ॥ अहो अर्धनारिनटेश्वरे । गिळीत उगळीत परस्परे । ग्रहण जाले एकसरे । सर्वग्रासे ॥ ६३ ॥ वाच्यजात खाउनि । वाचकत्व पीउनि । टाकिलि निदेजउनि । परा येथे ॥ ६४ ॥ शिवशिव समर्था स्वामि । येव्हडिये आनंदभूमि ।

घेपे दीजे एकी आम्हि । ऐसे केले ॥ ६५ ॥ चेतचि चेवविले । निदेले निजविले । अह्मा आम्हि आणिले । नवल जि तुझे ॥ ६६ ॥ आम्हि निख्खळ जि तुझे । वरि लोभे म्हणसि माझे । हे पुनरुक्त साजे । तू ह्मणोनि ॥ ६७ ॥ कोण्हाचे कांहि न घेसि । आणि आपले कोण्हा नेदेसि । कोण जाणे भोगिसि । गौरव कैसा ॥ ६८ ॥ गुरुत्वे जेव्हडा चांगु । तेव्हडाचि तारुनि लघु । लघु गुरु जाणे तो पांगु । तुझा करी ॥ ६९ ॥ शिष्या देता वाटे । अद्वैताचा समो न फुटे । तरि काह्मा होति भाट शास्त्रे तुझि ॥ ७० ॥ किंबहुना दातारा । मी–तु–पणाचा संसारा । वेंचोनि हेसि सोइरा । तेणेचि तोषे ॥ ७१ ॥ इतिश्रीमदनुभवामृते जीवन्मुक्ति–अभेदभक्ति–सहजस्थिति–वर्णनं नाम नवमप्रकरणम् ।

---

## प्रकरण १० वें.

परिगा श्रीनिवृत्तिराया । हातातळि निवविले स्वामिया । तरि ते निवांतचि भोगावें कि ॥ १ ॥ परि महेसे सूर्याहाति । दीधलि जे तेजसुति । तिये प्रभे अंतर्गति । जग केले ॥ २ ॥ चंद्रासि अमृत घातले । ते काय तयाचि इतुले । कां सिंधु मेघा दीधले । तो मेघाचि भागु ॥ ३ ॥ दिवा जो उजियेडु । तो घराचा सुरवाडु । गगनि अथि पवाडु । तो जगाचा की ॥ ४ ॥ अगाधे उचंबळति । ते चंद्रिचि ना शक्ति । वसंत करि तै होति । झाडपानें ॥ ५ ॥ म्हणोनि हे ऐश्वर्य । दैविकेचे औदार्य । वांचोनि स्वातंत्र्य । माझे नाहि ॥ ६ ॥ आणि हा येव्हडा ऐसा । परिहार देउ कायिसा । प्रभुप्रभावविन्यासा । आड ठावोमि ॥ ७ ॥ आम्हि बोलिलो जे कांहि । ते प्रगटचि असे ठांई । स्वयंप्रकाशा काई । प्रकाशावे बोले ॥ ८ ॥ विपाये अह्मि हान । कीजेते पा मौन । तरि कां जानि जन । दीसते ना ॥ ९ ॥ जनाते जने देखता द्रष्टेचि दृश्य तत्वता । कोण्हा न होनि आइता । सिद्धांतचि असे ॥ १० ॥ यया परोते कांहि । सच्चिद्रहस्य नाही । यया अधिही । असतचि असे ॥ ११ ॥ म्हणोनि ग्रंथप्रस्तावो । न घडे हे ह्मणो पावो । परि सिद्धानुवाद लाहो । आवडि करु ॥ १२ ॥ पढियंते सदा तेचि । परि भोगिजे नवि नवि रुचि । म्हणोनि हा उचितूचि । अनुवाद सिद्ध ॥ १३ ॥ यया कारणे मिया । गोप्य दाविले बोलोनिया । ऐसे नाहि आपसया । प्रकाशुचि ॥ १४ ॥ आणि पूर्ण अहंता वेठलो । सैघ आम्हिच दाटलो । मा लोपलो ना

प्रगटलो । कोण्हाहूनि ॥ १५ ॥ आप आपणापे । निरूपण काय वोपे । की उगेपणे हारपे । ऐसे आहे ॥ १६ ॥ ह्मणोनि माझी वैखरि । मौनाते ह्मणे मौन धरी । हे पाणियावरि मकरि । रेखिलि पा ॥ १७ ॥ एवं दशोपनिषदे । पुढारि न ढाळिति पदे । देखोनि बुडि बोधे । दीधलि येथे ॥ १८ ॥ ज्ञानदेव ह्मणे श्रीमत् । हे अनुभवामृत । सेवोनि जीवन्मुक्त । होवोत ऐसे ॥ १९ ॥ मुक्ति कीर वेल्हाळ । ते हे अनुभवामृत निखळ । अमृतही घोटि लाळ । अमृते येणे ॥ २० ॥ निशिनिशीचाही चांद होय । परि पुनवेचा अनूचि आहे । हे कां मी ह्मणो लाहे । सूर्यदिठि ॥ २१ ॥ प्रिया सावाइलि होय । तै अंगिचा अंगि न समाये । यऱ्हवि तेथेचि आहे । तारुण्य की ॥ २२ ॥ वसंताच्या आल्या । फुलि फाळि आपुल्या । गगनि पेलति ढाळया । फैलति झाडे ॥ २३ ॥ यालागि हे बोलणे । अनुभवामृतपणे । स्वानुभूति परगुणे । वोगरिलि ॥ २४ ॥ आणि मुक्त मुमुक्षु बध । तवांचि योग्यता भेद । अनुभवामृत स्वाद । विरुद्ध जवं ॥ २५ ॥ गंगावगाहना आलि । पाणिये गंगाचि जालि । कां तिमिरे भेटलि । सूर्या जैसि ॥ २६ ॥ जैसे अकारादि अक्षरा । भेटति पन्नास मात्रा । कां वोघ जैसे सागरा । आंत आले ॥ २७ ॥ नाहि परिसाचे कसवटि । तवांचि वाणियाच्या गोठि । मग पंधराविंयाच्या पाठि । बैसावे कीं ॥ २८ ॥ तैसि तये ईश्वरि । अंगुलि नुभवेचि दूसरि । किंबहुना सरोभरि । शिवेंसि तया ॥ २९ ॥ ह्मणोनि ज्ञानदेवो ह्मणे । अनुभवामृते येणे । सण भागिजे सणे । विश्वाचेनि ॥३०॥

इति श्री अनुभवामृते श्रीगुरुप्रतापग्रंथ-प्रशंसावर्णनन्नाम दशम प्रकरणम्

## निरंजन रघुनाथकृत पदपदावर

## यांची सूचि.

---

**समाप्त.**

## शुद्धिपत्रक.

## अनुभवामृत-पद-बोधिनी.

| पृष्ठ. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध |
|---|---|---|---|
| १९ | २ | ब्रह्म | ब्रह्मा |
| २४ | ५ | पाढाऊ | पाहाडाउ |
| २५ | ३ | एकच | एकत्व |
| ,, | २१ | जयाचेया | जयाचेनि |
| ३१ | ७ | लिपी | लिही |
| ,, | २२ | आता पुरे जो तो | आता जो तो |
| ४६ | १०-११ | आणि तृतीय ....बोलिजेला | ( द्विरुक्ति झाली आहे ) |
| ५० | ५ | अज्ञानावरि | अज्ञानाघरी |
| ६० | १७ | जागणेचि | जागणें जें |
| ,, | २५ | तेव्हलि | ते वेळीं |
| ६१ | २० | तोचि कि | तेचि कि |
| ६२ | २४ | परिपलु | परिमळु |
| ६७ | १२ | माणुसपणें | मानसें पणे |
| ७६ | ५ | चेविते जैसे | चेवविते जैसे |
| ७७ | ४ | मवितया से पडे | मवितयासि पडे |
| ,, | ५ | कडे से पडे | कडेस पडे |
| ८० | ४ | न लाविता उसु | आता न लावितां उसु |
| ८१ | ३ | तैसे सुख आपणपें येवो | तैसें सुखपणा येवो |
| ८३ | १० | मुडांचि आहे | मुढाचि आहे |
| ९५ | १० | साहे बोलचि | साहे बोलाचि |
| ९७ | ० | मनोरथांचे परिमळ | मनोरथांचे परियळ |
| १०५ | १२ | ताहीं तेयाचेनि | जे नाहीं तेयाचेनि |
| ११० | २१ | येथें ७५ वी ओवी गळली आहे ती :— | ह्मणोनि अविद्येचेनि मरणे । प्रमाणा येईल बोलणे । हे अविद्याचि नाहीपणे । घडो नेदी ॥७५॥ |

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
| --- | --- | --- | --- |
| १११-१२ | .... | ओवीचे आंकडे ७५ ते ८२ | ७६ ते ८३ |
| ११६ | १७ | आता काय हे शब्दू | आता काय दे शब्दू |
| ११७ | १५ | बोध जैसा | वोध जैसा |
| ११९ | ९ | यऱ्हहि तरी | येऱ्हवी तरी |
| १२१ | १३ | तेणे सर्व नेण | तेथें सर्व नेण |
| १२२ | ५ | अज्ञान ते प्रमाणाते येत असे काय | अज्ञान ते आपणाते जाणत नाहीं. आणि अप्रमाण ह्मणजे मिथ्या जे अज्ञान ते प्रमाणाते येत असे काय. |
| १२२ | १७ | जाणता तो | जाणतो |
| १२५ | ६ | जाणणे हे आणि | जाणणे हे अज्ञान आणि |
| १२५ | २२ | आत्म्या सहित होईल | आत्म्या सहित होईल. न कळणे हे तम आणि द्रष्ट्याची दृष्टी हेच कोणी एक सूर्य-रश्मी या उभयतांची माट बांधून एकत्र करून मी अज्ञानी ऐसे कोणी मानील तरी अज्ञानाचे असणे आत्म्या सहीत होईल. |
| १२७ | २५ | ममुष्य देहाचे ठायी | मनुष्य देहाचे ठायी. |
| १३१ | ७ | आणि घेते घेविते | आणि घेते घेवविते |
| १३३ | ३ | के लाविजेचि कसा | के लाविजे चिकसा |
| १३३ | ७ | चालण्याचा | चाळण्याचा |
| १३३ | ९ | एकचि कसा | एक चिकसा |
| १३७ | ७ | पाहिले असता | पाहिले असता मात्र अज्ञान नाहीसे होते तेव्हां अर्थात् पूर्वी न पाहिले असता |
| १३७ | ८ | विचारे करून पाहिले | विचारे करून न पाहिले |
| १३९ | ७ | पुड्ती पुड्ती | पुढती पुढती |

